श्रीमद्भगवत्पतञ्जलिविरचित

# व्याकरणमहाभाष्य

## मूळ आणि
## मराठी भाषांतर

भाग दुसरा

( अ. १ पा. ३, ४; अ. २ संपूर्ण )

भाषांतरकार

**महामहोपाध्याय वासुदेवशास्त्री अभ्यंकर**



पुणे

शके १८६३

## भूवादयो धातवः ॥ १।३।१ ॥

कुतोऽयं वकारः । यदि तावत्संहितया निर्देशः क्रियते भ्वादय इति भवितव्यम् । अथासंहितया भूआदय इति भवितव्यम् ॥ अत उत्तरं पठति ।

**भूवादीनां वकारोऽयं मङ्गलार्थः प्रयुज्यते ।**

**माङ्गलिक आचार्यो महतः शास्त्रौघस्य मङ्गलार्थं वकारमागमं प्रयुङ्क्ते । मङ्गलादीनि मङ्गलमध्यानि मङ्गलान्तानि हि शास्त्राणि** प्रथन्ते वीरपुरुषाणि च भवन्त्यायुष्मत्पुरुषाणि चाध्येतारश्च मङ्गलयुक्ता यथा स्युरिति ॥ अथादिग्रहणं किमर्थम् । यदि तावत्पठ्यन्ते नार्थ आदिग्रहणेन । अन्यत्रापि ह्ययं पठन्नादिग्रहणं न करोति । क्वान्यत्र । मृडमृदगुधकुषक्लिशवदवसः क्त्वा[१.२.७] इति । अथ न पठ्यन्ते नतरामर्थ आदिग्रहणेन । न ह्यपठिताः शक्या आदिग्रहणेन विशेषयितुम् । एवं तर्हि सिद्धे सति यदादिग्रहणं करोति तज्ज्ञापयत्याचार्योऽस्ति च पाठो बाह्यश्च सूत्रादिति । किमेतस्य ज्ञापने

---

(सू.१) भूवादयः येथें हा वकार कुठून आला आहे ? जर वर्णांचा अतिशय सांनिध्यामुळें संधि करून उचार करावयाचा असेल तर 'भ्वादयः' असा उच्चार केला पाहिजे. आतां संधि न करितां उच्चार कर्तव्य असेल तर 'भू आदयः' असा निर्देश करण्यांत आला पाहिजे. तेव्हां काय उद्देशानें हा वकार घातला आहे ?

याच्या उत्तरादाखल पुढील वचन लिहीत आहें—

मांगलिक असा हा आचार्य विशाल अशा व्याकरणशास्त्राच्या मंगलासाठीं 'भूवादयः' या शब्दामध्यें एक आगंतुक म्हणून अपूर्व वकार घालीत आहे. आरंभीं, मध्यें आणि शेवटीं मंगल केलें असतां त्या शास्त्रांचा जगांत फैलाव होतो, व त्या शास्त्रांना निर्माण करणारे पुरुष मोठे पराक्रमी आणि दीर्घायुषी बनतात. तसेंच त्या शास्त्रांचें अध्ययन करणारे पुरुषही मंगलयुक्त व्हावेत या सद्धेतूनें आचार्य मंगलसूचक वकार घालीत आहेत.

आतां येथें आदि शब्द घातला आहे तो कशासाठीं ?

जर भू, एध वगैरे सर्व शब्द ओळीनें पठन केले जात आहेत तर आदि शब्द घालण्यात कांहीं उपयोग नाहीं. अन्य ठिकाणींही हा आचार्य ओळीनें शब्दांचा पाठ करतो तेथें आदि शब्द घालण्याच्या भरीस पडत नाहीं.

अन्य ठिकाणीं म्हणजे कुठें ?

मृडमृदगुधकुषक्लिशवदवसः क्त्वा(१।२।७) येथें.

आतां जर भू, एध वगैरे शब्दांचा पाठ नसेल तर आदि शब्द घालण्यांत मुळींच अर्थ नाहीं. कारण ज्या शब्दांचा पाठच केलेला नाहीं त्यांचा आदि शब्दानें बोध होणें शक्यच नाहीं.

असें असतां ज्यापेक्षां हा आचार्य आदि शब्द घालून ठेवीत आहे त्यापेक्षां भू, एध वगैरे शब्दांचा पाठ आहे पण तो सूत्राच्या बाहेर आहे असें आचार्य सुचवीत आहेत.

असें करण्याचें काय फळ ?

---

१. क्रियावाचक असून भ्वादिगणपठित अशीं जी शब्दस्वरूपें तीं धातुसंज्ञक होतात. उदा.– भवति, एधते, अस्ति, जुहोति.

प्रयोजनम् । पाठेन धातुसंज्ञेत्येतदुपपन्नं भवति ॥

## पाठेन धातुसंज्ञायां समानशब्द-प्रतिषेधः ॥ १ ॥

पाठेन धातुसंज्ञायां समानशब्दानां प्रतिषेधो वक्तव्यः । या इति धातुर्या इत्याबन्तः । वा इति धातुर्वा इति निपातः । नु इति धातुर्नु इति प्रत्ययश्च निपातश्च । दिविति धातुर्दिविति प्रातिपदिकम् ॥ किं च स्याद्यद्येतेषामपि धातुसंज्ञा स्यात् । धातोः [३.१.९१] इति तव्यदादीनामुत्पत्तिः प्रसज्येत । नैष दोषः । साधने तव्यदादयो विधीयन्ते साधनं च क्रियायाः । क्रियाभावात्साधनाभावः । साधनाभावात्सत्यामपि धातुसंज्ञायां तव्यदादयो न भविष्यन्ति ॥ इह तर्हि याः पश्य आतो धातोः [६.४.१४०] इति लोपः प्रसज्येत । नैष दोषः । अनाप इत्येवं सः ॥ अस्य तर्हि वाशब्दस्य निपातस्याधातुरिति प्रातिपदिकसंज्ञायाः प्रतिषेधः प्रसज्येत । अप्रातिपदिकत्वात्स्वाद्युत्पत्तिर्न स्यात् । नैष दोषः । निपातस्यानर्थकस्य प्रातिपदिकत्वं चोदितं तत्रानर्थकग्रहणं न करिष्यते । निपातः प्रातिपदिकमित्येव ॥ इह तर्हि

ज्यांचा पाठ केला आहे त्यांनाच धातुसंज्ञा होते. पाठ नाहीं त्यांना धातुसंज्ञा होत नाहीं हें जुळून येतें.

(वा.१) धातुपाठामध्यें जे घेतले आहेत त्यांना धातुसंज्ञा होते असें म्हटलें तर धातुपाठांतील शब्दांसारखे जे शब्द त्यांना धातुसंज्ञा प्राप्त होत आहे, तिच्या निषेधादाखल वचन करावें. जसें– या असा धातु आहे. त्यासारखा या असा आबन्त शब्द आहे. वा असा धातु आहे, व 'वा' असा निपात आहे. नु असा धातु आहे आणि नु असा प्रत्यय व निपातही आहे. तसेंच दिव् असा धातु आहे आणि प्रातिपदिकही आहे. तेव्हां धातूसारख्या या वगैरे शब्दांना धातुसंज्ञा प्राप्त होत आहे.

धातूसारख्या शब्दांना धातुसंज्ञा झाली तर काय बरें बिघडेल ?

धातूच्या पुढें करावयास सांगितलेले तव्यत् (३।१।९६) वगैरे प्रत्यय ह्यांच्याही पुढें करावयाची पाळी येईल.

हा दोष येत नाहीं. कारण, कर्म वगैरे जीं कारकें त्या अर्थी तव्यत् वगैरे प्रत्यय सांगितले आहेत. आणि कारक तर क्रियेवर अवलंबून असतें. या, वा, नु ह्या शब्दांना क्रिया हा अर्थ नसल्यामुळें तेथें कारकाचा संबंध लावतां येत नाहीं. म्हणून त्यांच्यापुढें तव्यत् वगैरे प्रत्यय होऊं शकणार नाहींत.

तर मग याः पश्यसि येथें आबन्ताला धातुसंज्ञा झाली तर 'आतो धातोः' (६।४।१४०) यानें आकाराचा लोप होईल.

हा दोष येत नाहीं. कारण क्त्वः, श्रः वगैरे उदाहरणांमध्यें लोप होण्याकरितां आबन्ताखेरीज इतरांना तो लोप सांगितला (६।४।१४० वा.१) आहे.

तर मग निपात जो वा शब्द त्याला धातुसंज्ञा झाली असतां 'अधातुः' (१।२।४५) या पर्युदासामुळें प्रातिपदिकसंज्ञेचा निषेध होईल. तेव्हां प्रातिपदिकसंज्ञा न झाल्यामुळें त्याच्या पुढें विभक्तिप्रत्ययाची उत्पत्ति होणार नाहीं.

हा दोष येत नाहीं. कारण अनर्थक निपाताला प्रातिपदिकसंज्ञा होण्याकरितां मुद्दाम वचन केलें आहे (१।२।४५वा.१२). त्यांतील 'अनर्थक' हा शब्द काढून टाकून 'निपातः प्रातिपदिकम्', निपाताला प्रातिपदिकसंज्ञा होते,

२. त्यामुळें आणपयति, वट्टति इत्यादिक अपशब्दांना धातुसंज्ञा होत नाहीं. अर्थात् भ्वादिकांचा पाठ केला तो उपलक्षण नसून इतकेच धातु आहेत अशी धातूंची इयत्ता दाखवितो.

त्रस्नू इत्यचि श्नुधातुभ्रुवां य्वोरियङुवङौ [६.४.७७] इत्युवङादेशः प्रसज्येत । नैष दोषः । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति न प्रत्ययस्योवङादेशो भवतीति यदयं तत्र श्नुग्रहणं करोति ॥ अस्य तर्हि दिव्शब्दस्याधातुरिति प्रातिपदिकसंज्ञायाः प्रतिषेधः प्रसज्येत । अप्रातिपदिकत्वात्स्वाद्युत्पत्तिर्न स्यात् । नैष दोषः । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयत्युत्पद्यन्ते दिव्शब्दात्स्वादय इति यदयं दिवः सावौत्त्वं शास्ति । नैतदस्ति ज्ञापकम् । अस्ति ह्यन्यदेतस्य वचने प्रयोजनम् । किम् । दिव्शब्दो यत्प्रातिपदिकं तदर्थमेतत्स्यात् । अक्षद्यूरिति । न वा अत्रेष्यते । अनिष्टं च प्राप्नोतीष्टं च न सिध्यति । एवं तर्ह्यननुबन्धकग्रहणे न सानुबन्धकस्येत्येवमेतस्य न भविष्यति । एवमप्यननुबन्धको दिव्शब्दो नास्तीति कृत्वा सानुबन्धकस्य ग्रहणं विज्ञास्यते ॥

## परिमाणग्रहणं च ॥ २ ॥

परिमाणग्रहणं च कर्तव्यम् । इयानव-

---

एवढेंच मोघम वचन करण्यांत येईल.

तर त्रस्नू या द्विवचनान्तामध्यें नु या प्रत्ययाला (३।२।१४०) धातुसंज्ञा झाली असतां 'अचिश्नुधातु' (६।४।७७) यानें उवङादेश प्रसक्त होईल.

हा दोष येत नाहीं. कारण ज्यापेक्षां श्नु-प्रत्ययाला मुद्दाम उवङादेशाचें विधान करीत आहे त्यापेक्षां 'प्रत्ययाला उवङादेश होत नाहीं' असें हा आचार्य सुचवीत आहे.

तर मग दिव् शब्दाला धातुसंज्ञा झाली असतां 'अधातुः' या पर्युदासामुळें प्रातिपदिक-संज्ञेचा निषेध प्रसक्त होईल. तेव्हां प्रातिपदिक-संज्ञा न झाल्यामुळें त्याच्या विभक्तिप्रत्ययाची उत्पत्ति होणार नाहीं.

हा दोष येत नाहीं. कारण ज्यापेक्षां हा आचार्य प्रथमैकवचनप्रत्यय पुढें असतांना दिव् शब्दाला औकाराचें विधान करीत आहे (७।१।८४) त्यापेक्षां दिव् शब्दाच्या पुढें विभक्तिप्रत्यय उत्पन्न होतात, असें तो सुचवीत आहे.

हें औत्वविधान ज्ञापक होऊं शकत नाहीं. कारण या औत्त्वाचें विधान करण्याचें उदाहरण निराळें आहे.

तें कोणतें ?

जो दिव् शब्द प्रातिपदिकसंज्ञक आहे त्याच्यासाठीं हें औत्वविधान संभवेल; उदा. अक्षद्यूः.

पण अक्षद्यूः येथें औत्त्व केलेला शिष्ट प्रयोग नसल्यामुळें औत्त्व होणें इष्टच नाहीं. शिवाय जेथें औत्व होणें इष्ट नाहीं तेथें तें होऊं लागेल, व जेथें औत्त्व होणें इष्ट आहे तेथें तें होणार नाहीं. कसेंही असो, तें ज्ञापक होऊं शकत नाहीं.

असें आहे तर 'अनुबन्धरहिताचें ग्रहण केलें असतां तेथें अनुबन्धसहिताचें ग्रहण करूं नये' या परिभाषेनें क्विबन्त दिव्धातूविषयीं औत्त्व प्रवृत्त होणार नाहीं.

तरी देखील अनुबन्धरहित असा दिव् शब्द नसल्यामुळें सानुबन्धक अशा दिव् शब्दाविषयीं औत्त्व करतां येईल.

(वा. २) भू, एध, स्पर्ध अशा क्रमानें भ्वादिकांचा पाठ केला आहे. तेथें अमुक वर्णाला

---

३. अक्ष-उपपदपूर्वक दिव् धातूहून क्विप् प्रत्यय 'अधातुः' या पर्युदासाला मागें सारून 'कृत्तद्धित' (१।२।४६) यानें कृदन्तत्वास्तव प्रातिपदिकसंज्ञा.

४. दिवु अशा उकारेत्संज्ञक धातूहून क्विप् प्रत्यय केला आहे तेव्हां वु हें तेथें अनुबन्धसहित आहे.

५. अव्युत्पन्न दिव् शब्द मनांत न घेतां हें लिहिलें आहे. एकंदरींत ज्ञापक संभवत नाहीं असें तात्पर्य आहे.

धिर्धातुसंज्ञो भवतीति वक्तव्यम् । कुतो ह्येतद्भूशब्दो धातुसंज्ञो भविष्यति न पुनर्भ्वेधशब्द इति ॥

यदि पुनः क्रियावचनो धातुरित्येतल्लक्षणं क्रियेत । का पुनः क्रिया । ईहा । का पुनरीहा । चेष्टा । का पुनश्चेष्टा । व्यापारः ॥ सर्वथा भवाञ्शब्देनैव शब्दानाचष्टे न किंचिदर्थजातं निदर्शयत्येवंजातीयिका क्रियेति । क्रिया नामेयमत्यन्तापरिदृष्टा । अशक्या क्रिया पिण्डीभूता निदर्शयितुं यथा गर्भो निर्लुठितः । सासावनुमानगम्या । कोऽसावनुमानः । इह सर्वेषु साधनेषु संनिहितेषु कदाचित्पचतीत्येतद्भवति कदाचिन्न भवति । यस्मिन्साधने संनिहिते पचतीत्येतद्भवति सा नूनं क्रिया । अथवा यया देवदत्त इह भूत्वा पाटलिपुत्रे भवति सा नूनं क्रिया ॥ कथं पुनर्ज्ञायते क्रियावचनाः पचादय इति । यदेषां करो-

आरंभ करून अमुक वर्णावर पुरा होणाऱ्या समुदायाला धातुसंज्ञा होते असें वचन करावें. म्हणजे धातुसंज्ञेचे अवधिभूत असे जे भ्वादि शब्द त्यांचा विभाग कळेल. नाहीं तर 'भू' एवढ्याच समुदायाला धातुसंज्ञा होते आणि 'भ्वेध' या समुदायाला धातुसंज्ञा होत नाहीं हें कशावरून बरें ठरवितां येईल ?

आतां जर 'क्रियावचनो धातुः' म्हणजे क्रियारूप अर्थाला दाखविणारा जो भ्वादिकांतील शब्द तो धातुसंज्ञक होतो असें संज्ञेचें लक्षण केलें तर समान शब्दांना धातुसंज्ञेचा प्रतिषेध, आणि भ्वादिक शब्दांचा विभाग याबद्दल वचन करण्याची जरूर नाहीं. कारण या, वा वगैरे समान शब्द किंवा भ्वेध इत्यादिक विशिष्ट समुदाय क्रिया दाखवूं शकत नाहींत.

पण ती क्रिया म्हणजे काय ? (त्या क्रियेचें स्वरूप काय तें समजलें पाहिजे.)

क्रिया म्हणजे ईहा.

ईहा म्हणजे तरी काय ?

ईहा म्हणजे चेष्टा होय.

चेष्टा म्हणजे तरी काय ?

चेष्टा म्हणजे व्यापार होय[६].

शब्दाचा अर्थ विचारला असतां तेथें तूं दुसरा शब्द सांगत आहेस, पण 'अमुक एक स्वरूपाची क्रिया आहे' असें क्रियेचें स्वरूप कांहीं एक सांगत नाहींस.

क्रिया म्हणून जी एक वस्तु आहे तिला मूर्त स्वरूप नसल्यामुळें ती सर्वथा दृग्गोचर होण्यासारखी नाहीं. तेव्हां 'अमुक क्रिया' अशा रीतीनें मूर्त स्वरूपांत ती दाखविणें अशक्य होय. सबब क्रियेचें प्रत्यक्ष होत नाहीं. जसें— कुक्षिस्थ गर्भाचें प्रत्यक्ष होत नाहीं त्याप्रमाणेंच हें होय. तेव्हां क्रिया ही वस्तु अनुमानानें समजणारी आहे.

ते अनुमान कोणतें ?

लोकांमध्यें स्वयंपाकाचीं सर्व साधनें तयार असूनही एखादे वेळींच पचति असा पच् धातूचा प्रयोग केला जातो आणि एखादे वेळीं केला जात नाहीं. तेव्हां प्रयोग होतो त्या वेळीं तो प्रयोग ज्या एका अधिक वस्तूवर अवलंबून होतो ती वस्तु क्रिया होय. किंवा देवदत्त नांवाचा मनुष्य या गांवीं असलेला तो जिच्या योगानें पाटलिपुत्र शहरामध्यें असूं शकतो ती क्रिया होय.

पण पच् वगैरे धातु हे क्रियेला प्रतिपादन करतात हें कसें बरें जाणलें जात आहे ?

ज्यापेक्षां या पच् वगैरे धातूंचा करोति-धातूबरोबर सामानाधिकरण्यानें म्हणजे सामान्य-विशेष-भावानें अन्वय दिसतो त्यापेक्षां

६. कोणी ईहाशब्दानें क्रियेला ओळखतात तर कोणी चेष्टाशब्दानें व कोणी व्यापारशब्दानें ओळखतात. म्हणून ईहा इत्यादिक अनेक शब्दांनीं येथें क्रिया कळविली आहे.

तिना सामानाधिकरण्यम् । किं करोति पचति । किं करिष्यति पक्ष्यति । किमकार्षीत् अपाक्षीदिति ॥ तत्र

**क्रियावचन उपसर्गप्रत्ययप्रतिषेधः॥३**

क्रियावचने धातावुपसर्गप्रत्यययोः प्रतिषेधो वक्तव्यः । पचति प्रपचति ॥ किं पुनः कारणं प्राप्नोति ।

**संघातेनार्थगतेः ॥ ४ ॥**

संघातेन ह्यर्थो गम्यते सप्रकृतिकेन सप्रत्ययकेन सोपसर्गेण च ॥

**अस्तिभवतिविद्यतीनां धातुत्वम्॥५॥**

अस्तिभवतिविद्यतीनां धातुसंज्ञा वक्तव्या । यथा हि भवता करोतिना पचादीनां सामानाधिकरण्यं निदर्शितं न तथास्त्यादीनां निदर्श्यते । न हि भवति किं करोति अस्तीति ॥

**प्रत्ययार्थस्याव्यतिरेकात्प्रकृत्यन्तरेषु**

प्रत्ययार्थस्याव्यतिरेकात्प्रकृत्यन्तरेषु मन्यामहे धातुरेव क्रियामाहेति । पचति पठति । प्रकृत्यर्थोऽन्यश्चान्यश्च प्रत्ययार्थः स एव ॥

**धातोश्चार्थाभेदात्प्रत्ययान्तरेषु**

धातोश्चार्थाभेदात्प्रत्ययान्तरेषु मन्यामहे धातुरेव क्रियामाहेति । पक्ता पचनम् पाक इति । प्रत्ययार्थोऽन्यश्चान्यश्च भवति प्रकृत्यर्थः स एव ॥ कथं पुनर्ज्ञायतेऽयं

---

पच् वगैरे धातु क्रियावाचक होत; जसें– 'किं करोति'– काय करीत आहे, अशा क्रियावाचक म्हणून प्रसिद्ध असलेल्या कृ-धातूनें प्रश्न केला असतां 'पचति'– शिजवीत आहे, असें उत्तर देण्यांत येतें. तसेंच 'किं करिष्यति' –काय करील, असा प्रश्न केला असतां 'पक्ष्यति' –शिजवील, असें उत्तर मिळतें व 'किमकार्षीत्' –काय करिता झाला, असा प्रश्न केला असतां 'अपाक्षीत्'– शिजविता झाला, असें उत्तर मिळतें. क्रियाविषयक प्रश्नाचें उत्तर क्रियाविषयकच असणें योग्य असल्यामुळें पच् वगैरे धातु क्रियावाचक ठरतात. तेथें–

(वा.३) क्रियावाचकाला धातुसंज्ञा होते असें म्हटलें असतां उपसर्ग आणि प्रत्यय एतद्विशिष्टाला धातुसंज्ञा न होण्याकरितां वचन करावें; जसें– पचति, प्रपचति.

पण उपसर्ग आणि प्रत्यय एतद्विशिष्टाला धातुसंज्ञा प्राप्त होते यांचें काय बरें कारण?

(वा.४) प्रकृति, प्रत्यय आणि उपसर्ग या तिघांच्या संघातापासून अर्थ मनांत येत आहे म्हणून.

(वा.५) अस्, भू आणि विद् या शब्दस्वरूपांना धातुसंज्ञा होण्यासाठीं मुद्दाम वचन केलें पाहिजे. कारण, जसें तूं करोति-धातूबरोबर पच् वगैरे धातूंचें प्रश्नोत्तररूपानें सामानाधिकरण्य दाखविलेंस तसें या अस् वगैरेंचें सामानाधिकरण्य दाखविलें जात नाहीं. कारण किं करोति? –'काय करीत आहे', असा प्रश्न केला असतां त्याचें उत्तर अस्ति– 'आहे', असें देण्यांत येत नाहीं.

पचति या ठिकाणीं जो प्रत्ययाचा अर्थ मनांत येतो तोच अर्थ पठति असा दुसऱ्या प्रकृतीचा प्रयोग केला असतां तेथेंही प्रत्ययाचा अर्थ मनांत येतो,आणि प्रकृतीचा अर्थ मात्र निराळा मनांत येतो. यावरून प्रत्ययासकट समुदाय हा क्रियेचा वाचक नसून केवळ धातुच क्रियेचा वाचक आहे असें आम्ही समजतों.

तसेंच पच्– धातूच्या पुढें निरनिराळा प्रत्यय केला असतां तेथें पच् धातूचा अर्थ बदलत नसल्यामुळें धातुच क्रियेला दाखवितो असें आम्ही समजतों; जसें– पक्तिः पचनं पाकः येथें प्रत्ययाचा अर्थ पुंलिंग, स्त्रीलिंग वगैरेंमुळें निरनिराळा भासतो आणि प्रकृतिभूत पच्-धातूचा अर्थ मात्र तिन्ही ठिकाणीं एकच भासतो.

पण प्रकृतिप्रत्ययविशिष्ट संघातापासून अर्थ

प्रकृत्यर्थोऽयं प्रत्ययार्थ इति।

सिद्धं त्वन्वयव्यतिरेकाभ्याम् ॥६॥

अन्वयाच्च व्यतिरेकाच्च। कोऽसावन्वयो व्यतिरेको वा। इह पचतीत्युक्ते कश्चिच्छब्दः श्रूयते पच्शब्दश्चकारान्तोऽतिशब्दश्च प्रत्ययः। अर्थोऽपि कश्चिद्गम्यते विक्लित्तिः कर्तृत्वमेकत्वं च। पठतीत्युक्ते कश्चिच्छब्दो हीयते कश्चिदुपजायते कश्चिदन्वयी। पच्शब्दो हीयते पठ्शब्द उपजायतेऽतिशब्दोऽन्वयी। अर्थोऽपि कश्चिद्धीयते कश्चिदुपजायते कश्चिदन्वयी। विक्लित्तिर्हीयते। पठिक्रियोपजायते कर्तृत्वं चैकत्वं चान्वयि। ते मन्यामहे यः शब्दो हीयते तस्यासावर्थो योऽर्थो हीयते यः शब्द उपजायते तस्यासावर्थो योऽर्थ उपजायते यः शब्दोऽन्वयी तस्यासावर्थो योऽर्थोऽन्वयी ॥ विषम उपन्यासः। बहवो हि शब्दा एकार्था भवन्ति। तद्यथा। इन्द्रः शक्रः पुरुहूतः पुरंदरः। कन्दुः कोष्ठः कुशूल इति। एकश्च शब्दो बह्वर्थः। तद्यथा। अक्षाः पादाः माषा इति। अतः किं न साधीयोऽर्थवत्ता सिद्धा

---

मनांत येत असतां तेथें हा अर्थ प्रकृतीचा आणि हा अर्थ प्रत्ययाचा असा विभाग कशावरून बरें जाणला जात आहे?

(वा. ६) प्रकृतिप्रत्ययांच्या अर्थांचा विभाग अन्वय आणि व्यतिरेक या दोहोंवरून ठरविला जात आहे.

अन्वय आणि व्यतिरेक यांचें स्वरूप काय?

पचति असें उच्चारिलें असतां तेथें चकार शेवटीं असलेला असा एक पच् शब्द ऐकूं येतो व दुसरा प्रत्यय म्हणून अति शब्द ऐकूं येतो. तसेंच विक्लित्ति म्हणजे शिजणें हा एक अर्थ मनांत येतो आणि कर्ता व एकत्व हाही अर्थ मनांत येतो. आतां पठति असें उच्चारिलें असतां तेथें कोणी एक शब्द निघून जातो व कोणी एक शब्द नवीन येतो आणि कोणी एक पहिला आहे तोच कायम राहतो. म्हणजे पच् शब्द निघून जातो, पठ् शब्द नवीन येतो व अति शब्द आहे तोच कायम राहतो. तसा अर्थ देखील कोणी एक निघून जातो, कोणी एक नवीन येतो व कोणी एक पहिलाच कायम राहतो. विक्लित्ति हा अर्थ निघून जातो, पठन म्ह. म्हणणें हा अर्थ नवीन येतो आणि कर्तृत्व व एकत्व आहे तेंच कायम राहतें. यावरून आम्ही असें समजतों की जो शब्द निघून गेला त्याचाच तो अर्थ, जो अर्थ निघून जातो. जो शब्द नवीन आला त्याचाच तो अर्थ, जो अर्थ नवीन येतो, आणि जो शब्द कायम राहिला त्याचाच तो अर्थ, जो अर्थ कायम राहतो.

हा उपपादनाचा प्रकार बरोबर नाहीं. कारण शब्द अनेक व त्या सर्वांचा अर्थ एक असेही शब्द आहेत; जसें– इन्द्रः, शक्रः, पुरुहूतः, पुरंदरः हे चारी शब्द इन्द्ररूपी एकाच अर्थाला दाखवितात. तसेंच कन्दुः, कोष्ठः, कुसूलः हे शब्द एकाच अर्थाला दाखवितात. याच्या उलट म्हणजे शब्द एक व त्याचे अर्थ मात्र अनेक असेही शब्द आहेत; जसें– अक्षाः, पादाः, माषाः हे शब्द प्रत्येकीं अनेक अर्थाला दाखवितात, अनेक शब्द एका अर्थाला दाखवितात आणि एक शब्द अनेक अर्थाला दाखवितो.

---

७. तेव्हां पच्, पठ्, हे अनेक शब्द एकाच अर्थाला दाखवितात असेंही म्हणतां येईल. तेथें एक अर्थ म्हणजे सामान्य क्रिया होय. शिजविणें, पठन करणें हे विशेष अर्थ प्रकरणावरून ठरवावेत.

८. मागें सूत्र १।२।६४ टीप पहावी. त्यांत अक्ष वगैरे शब्दाप्रमाणें पच् या प्रकृतीचेच क्रिया आणि कर्ता असे अनेक अर्थ मानतां येतील.

भवति। नापि ब्रूमोऽर्थवत्ता न सिध्यतीति। वर्णितार्थवत्तान्वयव्यतिरेकाभ्यामेव। तत्र कुत एतदयं प्रकृत्यर्थोऽयं प्रत्ययार्थ इति न पुनः प्रकृतिरेवोभावर्थौ ब्रूयात्प्रत्यय एव वा। सामान्यशब्दा एत एवं स्युः। सामान्यशब्दाश्च नान्तरेण प्रकरणं विशेषणं वा विशेषेष्ववतिष्ठन्ते। यतस्तु खलु नियोगतः पचतीत्युक्ते स्वभावतः कस्मिंश्चिद्विशेषे पचतिशब्दो वर्तते ऽतो मन्यामहे नेमे सामान्यशब्दा इति। न चेत्सामान्यशब्दाः प्रकृतिः प्रकृत्यर्थे वर्तते प्रत्ययः प्रत्ययार्थे ॥

### क्रियाविशेषक उपसर्गः ॥७॥

पचतीति क्रिया गम्यते तां प्रो विशिनष्टि॥ यद्यपि तावदत्रैतच्छक्यते वक्तुं यत्र धातुरुपसर्गं व्यभिचरति यत्र न खलु तं व्यभिचरति तत्र कथम्। अध्येति अधीत इति। यद्यप्यत्र धातुरुपसर्गं न व्यभिचरत्युपसर्गस्तु धातुं व्यभिचरति। ते मन्यामहे य एवास्याधेरन्यत्रार्थः स

---

या उपन्यासावरून काय सिद्ध होतें ? या उपन्यासावरून तरी शब्दाला अर्थवत्त्व आहे असें नाहीं का सिद्ध होत ? अर्थात् होत आहेच.

यावरून अर्थवत्ता सिद्ध होत नाहीं असें आमचें म्हणणें नाहीं, कारण अन्वयव्यतिरेकावरून ती सिद्ध करून दाखविली आहेच. पण तेथें हा प्रकृतीचा अर्थ आणि हा प्रत्ययाचा अर्थ अशी जी अर्थाची विभागणी केली ती कशावरून? प्रकृतिच किंवा प्रत्ययच दोन्ही अर्थांचें प्रतिपादन करतो असेंच म्हणणें योग्य नव्हे काय ?

प्रकृतिच किंवा प्रत्ययच दोन्ही अर्थांचें प्रतिपादन करतो असें म्हटलें असतां हे सामान्य शब्द आहेत असें म्हणावें लागेल. आणि सामान्य शब्द म्हणून जे असतात ते तर प्रकरण किंवा विशेषण शेजारीं असल्यावांचून विशेष अर्थाला दाखवूं शकत नाहींत. परंतु ज्यापेक्षां 'पचति' असें म्हटलें असतां खरोखर स्वभावतःच व हटकून पच् शब्द कांहीं एक विशेष अर्थाला दाखवितो, त्यापेक्षां हे सामान्य शब्द नव्हेत असें आम्ही समजतों. जर हे सामान्य शब्द नव्हेत तर प्रकृतिही आपल्या अर्थाला दाखविते, आणि प्रत्ययही आपल्या अर्थाला दाखवितो असेंच ठरतें.

(वा.७) पचति असें म्हटलें असतां पच् धातूपासून क्रिया मनांत येते. आणि त्या क्रियेला प्र हा उपसर्ग विशेष प्रकारानें स्पष्ट करतो.

जेथें धातु हा उपसर्गाला सोडून असतो तेथें उपसर्ग हा क्रियेवरील विशेष दाखवितो असें म्हणणें जरी शक्य आहे, तरी पण ज्या ठिकाणीं धातु हा उपसर्गाला सोडून असतच नाहीं त्या ठिकाणीं कसें ? जसें—अध्येति, अधीते.

---

९. सामान्य क्रिया आणि सामान्य कारक या दोन्ही अर्थांचें.

१०. उपसर्गविशिष्टाला क्रियावाचकत्व कां मानूं नये या आक्षेपाच्या निरसनाकरितां हें वचन लिहिलें आहे. अन्वयव्यतिरेकावरूनच उपसर्ग हा क्रियाविशेषाचा द्योतक ठरतो. तेव्हां धातुच क्रियेला दाखवितो असें सिद्ध होतें.

११. केवळ पचति असा प्रयोग केला असतां तेथें पच् धातूपासून मनांत येणाऱ्या क्रियेपेक्षां प्रपचति असें म्हटलें असतां तेथें कांहीं विशिष्ट तऱ्हेची क्रिया मनांत येते. त्यावरून उपसर्ग हा त्या क्रियेवरील विशेष दाखवितो असें ठरतें. हे म्हणणें जेथें उपसर्गरहित धातूचाही व उपसर्गसहित धातूचाही प्रयोग होत असेल तेथें जमेल. अधीते येथें उपसर्गरहित धातूचा प्रयोग नसल्यामुळें उपसर्गानें विशेष दाखविला असें म्हणण्याला मार्ग नाहीं. जी कांहीं क्रिया मनांत येत आहे ती उपसर्गविशिष्टापासूनच येत आहे. तेव्हां अशा ठिकाणीं उपसर्गविशिष्टाला धातु हें नांव द्यावें लागेल.

इहापीति । कः पुनरन्यत्राधेरर्थः । अधिरुपरिभावे वर्तते ॥ इह तर्हि व्यक्तमर्थान्तरं गम्यते । तिष्ठति प्रतिष्ठत इति । तिष्ठतीति व्रजिक्रियाया निवृत्तिः प्रतिष्ठत इति व्रजिक्रिया गम्यते । ते मन्यामह उपसर्गकृतमेतद्येनात्र व्रजिक्रिया गम्यत इति । प्रोऽयं दृष्टापचार आदिकर्मणि वर्तते । न चेदं नास्ति बह्वर्था अपि धातवो भवन्तीति । तद्यथा । वपिः प्रकिरणे दृष्टश्छेदने चापि वर्तते । केशश्मश्रु वपतीति । ईडिः स्तुतिचोदनायाच्ञासु दृष्टः प्रेरणे चापि वर्तते । अग्निर्वा इतो वृष्टिमीट्टे मरुतोऽमुतश्च्यावयन्तीति । करोतिरभूतप्रादुर्भावे दृष्टो निर्मलीकरणे चापि वर्तते । पृष्ठं कुरु । पादौ कुरु । उन्मृदानेति गम्यते । निक्षेपणे चापि वर्तते । कटे कुरु । घटे कुरु । अश्मानमितः कुरु । स्थापयेति गम्यते । एवमिहापि तिष्ठतिरेव व्रजि-

---

जरी अशा ठिकाणीं धातु हा उपसर्गाला सोडीत नाहीं तरी पण अधि हा उपसर्ग इङ् धातूला सोडून राहतो; त्यामुळें इतर ठिकाणीं जो अधि या उपसर्गाला अर्थ आहे तोच अधीते येथेंही आहे.

इतर ठिकाणीं अधि या उपसर्गाला कोणता अर्थ आहे ?

उपरिभाव (उत्कर्ष) या अर्थी अधि हा शब्द[12] आहे.

तर मग तिष्ठति, प्रतिष्ठते या ठिकाणीं स्पष्टच निराळा अर्थ मनांत येतो. तिष्ठति म्हणजे उभा राहतो; अर्थात् गमनक्रियेची निवृत्ति मनांत येते. आणि प्रतिष्ठते म्हणजे चालूं लागतो; अर्थात् गमनक्रिया उपस्थित होते. यावरून येथें जी गमनक्रिया मनांत येते ती उपसर्गामुळें येते असें आम्ही समजतों.[13]

प्र शब्द हा तिष्ठतिला सोडूनही[14] असणारा असा आदिकर्म (आरंभ) या अर्थाचा आहे. शिवाय धातु हे अनेक अर्थांना दाखवीत नाहींत असें[15] नाहीं. जसें– पेरणें या अर्थी पाहिलेला वप् धातु छेदनार्थालाही दाखवितो; उदा. केशश्मश्रु वपति.[16] स्तुति, चोदना व याच्ञा या अर्थी पाहिलेला ईड् धातु प्रेरणा करणें ह्या अर्थालाही दाखवितो; उदा. अग्निर्वा इतो वृष्टिमीट्टे[17] मरुतोऽमुतश्च्यावयन्ति. तसेंच करोति धातु 'नसलेल्याची उत्पत्ति' या अर्थी पाहिलेला निर्मल करणें या अर्थालाही दाखवितो; उदा. पृष्ठं कुरु, पादौ कुरु (स्वच्छ कर असा अर्थ मनांत येतो). ठेवणें या अर्थीही करोति धातु आहे; उदा. कटे कुरु, घटे कुरु, अश्मानमितः कुरु (स्थापन कर असा अर्थ मनांत येतो.) याप्रमाणें प्रकृत-

---

१२. तेव्हां उत्कर्षयुक्त अध्ययन असा अधीते याचा अर्थ होय.

१३. प्रतिष्ठते येथें जी गमनक्रिया मनांत येते ती केवळ प्र-शब्दापासून मनांत येते असें म्हटलें तर 'स्था'याला धातुसंज्ञाच होणार नाहीं. केवळ स्था-पासून गमनक्रिया मनांत येते असेंही म्हणतां येत नाहीं. कारण तिष्ठति यापासून गमननिवृत्ति हा अर्थ मनांत येत असल्यामुळें गमनक्रिया हा तिष्ठतीचा अर्थ हें म्हणणें विरुद्ध होतें. तेव्हां उपसर्गविशिष्ट तिष्ठतीचा 'गमनक्रिया' अर्थ होय असें म्हणणें ओघानेंच प्राप्त होतें. अर्थात् उपसर्गविशिष्टाला धातुसंज्ञा प्रसक्त होते असा आक्षेप समजावा.

१४. तेव्हां प्रचक्रमे येथें प्र शब्द ज्या अर्थाला द्योतित करतो तोच अर्थ प्रतिष्ठते येथें प्र शब्दानें द्योतित केला आहे असें अनुमान काढतां येतें.

१५. धातूंना अनेकार्थप्रतिपादकत्व असल्यामुळें गतिनिवृत्ति या अर्थाच्याही तिष्ठति-धातूला गतिवाचकत्व विरुद्ध होत नाहीं. तेव्हां प्रतिष्ठते याचा गमनाला आरंभ करतो असा अर्थ होत असल्यामुळें तिष्ठति धातुच क्रियावाचक ठरतो.

१६. येथें छेदन करतो असा अर्थ मनांत येतो.

१७. येथें प्रेरणा करतो असा अर्थ मनांत येतो.

क्रियामाह तिष्ठतिरेव व्रजिक्रियाया निवृत्तिम् ॥ अयं तर्हि दोषः । अस्तिभवतिविद्यतीनां धातुत्वमिति ॥

यदि पुनर्भाववचनो धातुरित्येवं लक्षणं क्रियेत। कथं पुनर्ज्ञायते भाववचनाः पचादय इति। यदेषां भवतिना सामानाधिकरण्यम्। भवति पचति। भवति पक्ष्यति। भवत्यपाक्षीदिति ॥ कः पुनर्भावः। भवतेः स्वपदार्थो भवनं भाव इति। यदि भवतेः स्वपदार्थो भवनं भावो विप्रतिषिद्धानां धातुसंज्ञा न प्राप्नोति। भेदः छेदः। अन्यो हि भावोऽन्योऽभावः। आतश्चान्यो भावोऽन्योऽभाव इति यो हि यस्य भावमिच्छति स न तस्याभावं यस्य चाभावं न तस्य भावम् ॥ पचादीनां च धातुसंज्ञा न प्राप्नोति। यथा हि भवता क्रियावचने धातौ करोतिना पचादीनां सामानाधिकरण्यं निदर्शितं न तथा भाववचने धातौ

स्थलींही तिष्ठति धातुच गमनक्रियेला प्रतिपादन करतो. आणि तिष्ठति धातुच गमनक्रियेच्या निवृत्तीला दाखवितो.

तरं[१८] मग अस्ति (अस्), भवति (भू), विद्यति (विद्) यांना धातुसंज्ञा होण्यासाठीं मुद्दाम वचन करावें लागेल असा दोष येतो. आतां जर भाव या अर्थाला दाखविणारा धातु असें धातुसंज्ञेचें लक्षण केलें गेलें तर?

पण पच् वगैरे धातु भाववाचक आहेत हें कशावरून ठरविलें जात आहे?

ज्यापेक्षां पच् वगैरेंचे भूधातूबरोबर सामानाधिकरण्य घडत आहे त्यापेक्षां ते भाववाचक आहेत असें ठरतें; जसें—भवति पचति[१९], भवति पक्ष्यति, भवति अपाक्षीत् वगैरे.

पण भाव म्हणजे काय?

भूधातूचा स्वतःचा अर्थ भवनं भावः म्हणजे सत्ता. जर 'भवनं भावः' असा विग्रह केल्यानें भूधातूचा स्वतःचा अर्थ सत्ता होय तर त्या भावाशीं विरुद्ध अशा अर्थाला दाखविणाऱ्यांना धातुसंज्ञा प्राप्त होऊं शकत नाहीं; जसें, भेदः, छेदः वगैरे. भाव म्हणून जो अर्थ आहे तो निराळा व अभाव म्हणून जो पदार्थ तोही निराळा होय[२०]. आणखीही भाव पदार्थ निराळा आणि अभाव पदार्थ निराळा असें मानण्याचें कारण की जो ज्याचा भाव (सत्ता) इच्छितो म्हणजे जो असावा असें इच्छितो, तो त्याचा अभाव म्ह. तो नसावा असें इच्छीत नाहीं. आणि ज्याचा अभाव इच्छितो त्याचा भाव इच्छीत नाहीं.

शिवाय पच् वगैरेंना धातुसंज्ञा होऊं शकत नाहीं. कारण 'क्रियेला दाखविणारा तो धातु' असें धातुसंज्ञेचें लक्षण केलें त्या वेळीं जसें तुला करोति-बरोबर पच् वगैरेंचें सामानाधिकरण्य दाखवितां आलें तसें 'भाव या अर्थाला दाखविणारा तो धातु' असें धातूचें लक्षण केलें त्या वेळीं भवति-बरोबर पच् वगैरेंचें सामानाधि-

१८. 'क्रियावचनो धातुः' असें धातूचें लक्षण केलें तर (आणि 'भाववचनो धातुः' असें लक्षण केलें असतां पचादिक आणि अस्त्यादिक या दोन्ही प्रकारच्या शब्दांना धातुसंज्ञा होईल).

१९. शिजवीत आहे, शिजवीत असेल, शिजवीत होता, तसेंच जात आहे, जात असेल, जात होता इत्यादि प्रयोगांवरून शिजविणें, गमन करणें वगैरे हे भावाचेच म्हणजे असण्याचेच विशेष प्रकार आहेत. तेव्हां पच् वगैरे धातु भाववाचक आहेत असें म्हणण्यास हरकत दिसत नाहीं.

२०. घटादिकांच्या नाशाला भेद हें नांव लावलें जातें व रज्जु वगैरेंच्या नाशाला छेद असें नांव दिलें जातें. नाश म्हणजे अभाव. नाशाच्या वेळीं तेथें सत्ता असत नाहीं. तेव्हां अभाव हा भावाचा विरोधी असल्यामुळें त्या अभावाला दाखविणाऱ्या भिद्, छिद यांना 'भाववचनो धातुः' असें लक्षण केलें असतां धातुसंज्ञा होणार नाहीं. म्हणून धातूच्या पुढें करावयास सांगितलेला घञ् प्रत्यय भेदः, छेदः येथें करितां येणार नाहीं असा दोष येतो.

**निदर्श्यते । करोतिः पचादीनां सर्वान्कालान्सर्वान्पुरुषान्सर्वाणि वचनान्यनुवर्तते भवतिः पुनर्वर्तमानकालं चैवैकत्वं च ॥ का तर्हीयं वाचोयुक्तिर्भवति पचति भवति पक्ष्यति भवत्यपाक्षीदिति । एषैषा वाचोयुक्तिः । पचादयः क्रिया भवतिक्रियायाः कर्त्र्यो भवन्तीति । यद्यपि तावदत्रैतच्छक्यते वक्तुं यत्रान्या चान्या च क्रिया यत्र खलु सैव क्रिया तत्र कथम् । भवेदपि भवेत् । स्यादपि स्यादिति । अत्राप्यन्यत्वमस्ति । कुतः । कालभेदात्साधनभेदाच्च । एकस्यात्र भवतेर्भवतिः साधनं सर्वकालश्च प्रत्ययः । अपरस्य बाह्यं साधनं वर्तमानकालश्च प्रत्ययः ॥ यावतात्राप्यन्यत्वमस्ति पचादयश्च क्रिया भवतिक्रियायाः कर्त्र्यो भवन्तीत्यस्त्वयं कर्तृसाधनः । भवतीति**

करण्य दाखवितां येतें[21] नाहीं. कारण, करोति (कृधात्वर्थ) हा पच् वगैरेंच्या पुढें कोणताही लकार, कोणताही पुरुष आणि कोणतेंही वचन असलें तरी त्यांच्या अर्थाबरोबर संबंध पावतो. आणि भवति (भूधात्वर्थ) हा मात्र वर्तमानकाळ व एकत्व असतांनाच पच् वगैरेंच्या अर्थाबरोबर संबंध पावतो.

**बरें तर मग भवति पचति, भवति पक्ष्यति, भवत्यपाक्षीत् इत्यादि प्रयोग कोणत्या संबंधावर अवलंबून होतात ?**

**शिजविणें वगैरे क्रिया हा भवति—क्रियेचा कर्ता होय.**

**जेथें निरनिराळ्या दोन क्रिया आहेत तेथें इतर क्रियाही भवति—क्रियेचा कर्ता हें म्हणणें जुळतें. तरी पण जेथें तीच क्रिया पुनः निर्दिष्ट आहे (म्हणजे निरनिराळ्या दोन क्रिया नसून दोन वेळां उच्चारलेली क्रिया एकच आहे) तेथें कसें[22] ? जसें— भवेदपि भवेत् स्यादपि स्यात्.**

येथें क्रियेचा भेद आहेच.

तो कसा ?

कालभेदामुळें व साधनभेदामुळें एकाच भवति—क्रियेचा भेद होतो.

ह्या ठिकाणीं एका म्हणजे दुसऱ्या भवति-क्रियेचा मागील भवतिक्रिया हा कर्ता आहे आणि त्या दुसऱ्या भू—धातूच्या पुढील प्रार्थनाबोधक लिङ् प्रत्यय सामान्यरूपानें तिन्हीही काळ दाखवितो व पहिल्या भवतीचा कर्ता **देवदत्त वगैरे बाहेरचा असून त्या पहिल्या भूधातूपुढील लिङ् प्रत्यय वर्तमानकाळ दाखवीत आहे. हल्लींची देवदत्ताची स्थिति अशीच असू दे असा अर्थ आहे. तेव्हां साधनभेदामुळें आणि कालभेदामुळें प्रकृतस्थळींही क्रियाभेद आहे. एकंदरींत शिजविणें वगैरे क्रिया ह्या भवति—क्रियेचा कर्ता होण्याला कांहींच हरकत दिसत नाहीं[23].**

असें आहे तर मग येथें भावशब्द 'भवतीति भावः' असा कर्तृप्रत्ययान्त असो[24].

२१. किं करोति पचति, किं कुर्वन्ति पचन्ति, किं करिष्यति पक्ष्यति, किमकार्षीत् अपाक्षीत्, अशा रीतीनें सर्व प्रकारांनीं पच् वगैरेंचे करोति-बरोबर सामानाधिकरण्य दिसतें. तसें भवतिबरोबर दिसत नाहीं. पूर्वीं जें भवतिबरोबर सामानाधिकरण्य दाखविलें तेथें भवति पचति, भवति पक्ष्यति, भवत्यपाक्षीत् असें फक्त वर्तमानकाळीं एकवचनीं भवति यानेंच दाखविलें आहे. तेव्हां 'पचति भवति' हें सामानाधिकरण्यच नव्हे असें सिद्ध होतें. तेव्हां त्यांना धातु असें म्हणतां येणार नाहीं.

२२. एकच क्रिया ही आपणच आपला कर्ता होऊं शकत नाहीं.

२३. 'भाववचनो धातुः' असें धातूचें लक्षण केलें असतां भावाच्या म्हणजे सत्तेच्या विरुद्ध अर्थ दाखविणाऱ्या भिद् वगैरे धातूंना आणि भवति-क्रियेशीं सामानाधिकरण्य नसल्यामुळें पच् वगैरे धातूंना धातुसंज्ञा होणार नाहीं, असे दोष येतात. याकरितांच येथून पुढें भाव याचा अर्थ निराळा घेत आहेत.

२४. तेव्हां उत्पन्न होणारा जो अर्थ त्याला भाव असें म्हणतां येतें. शिजविणें वगैरे क्रिया ह्या उत्पन्न होणाऱ्या असल्यामुळें त्यांनाही भाव असें म्हणण्यास हरकत नाहीं,

भाव इति। किं कृतं भवति। विप्रतिषिद्धानां धातुसंज्ञा सिद्धा भवति। भवेद्विप्रतिषिद्धानां धातुसंज्ञा सिद्धा स्यात्प्रातिपदिकानामपि प्राप्नोति। वृक्षः प्लक्ष इति। किं कारणम्। एतान्यपि हि भवन्ति॥ एवं तर्हि कर्मसाधनो भविष्यति। भाव्यते यः स भाव इति। क्रिया चैव हि भाव्यते स्वभावसिद्धं तु द्रव्यम्। एवमपि भवेत्केषांचिन्न स्याद्यानि न भाव्यन्ते। ये त्वेते संबन्धिशब्दास्तेषां प्राप्नोति। माता पिता भ्रातेति। सर्वथा वयं प्रातिपदिकपर्युदासान्न मुच्यामहे॥ पठिष्यति ह्याचार्यो भूवादिपाठः प्रातिपदिकाणपयत्यादिनिवृत्त्यर्थ इति। यावता पठिष्यति पचादयश्च क्रिया भवतिक्रियायाः कर्त्र्यो भवन्तीत्यस्त्वयं कर्तृसाधनः। भवतीति भाव इति। किं वक्तव्यमेतत्। न हि। कथमनुच्यमानं गंस्यते। एतेनैवाभिहितं सूत्रेण भूवा-

असें करण्यांत काय साधलें जात आहे ?

भावाच्या विरुद्ध अशा अभावार्थाला दाखविणाऱ्या भिद् वगैरेंना धातुसंज्ञा साधली जात आहे.[25]

असें करण्यांत भिद् वगैरेंना धातुसंज्ञा सिद्ध होईल. पण वृक्ष, प्लक्ष वगैरे प्रातिपादिकांनाही धातुसंज्ञा प्राप्त होते.

काय कारण ?

त्या प्रातिपदिकांचा अर्थ झाड वगैरे हेही उत्पन्न होणारेच आहेत. असें आहे तर मग येथें भाव शब्द 'भाव्यते यः[26] स भावः' असा कर्मप्रत्ययान्त घेतां येईल. क्रियाच साध्य असते. द्रव्य तर स्वभावतःच सिद्ध आहे.

तरीही ज्या प्रातिपदिकांचे अर्थ नवीन साधिले जाणार नाहींत त्यांना धातुसंज्ञा होणार नाहीं. पण जे हे संबंधी शब्द आहेत त्यांना धातुसंज्ञा प्राप्त होते; जसें—माता,[27] पिता, भ्राता, वगैरे. एकंदरींत प्रातिपदिकांना धातुसंज्ञेच्या निषेधाकरितां वचन करणें यांतून आमची केव्हांही सुटका होत नाहीं.[28]

तर मग आतां हे दोष जाण्याकरितां येथें गणपाठच करावा. आचार्य वार्तिककारही असेंच सांगणार आहेत की 'प्रातिपदिक आणि आणपयति इत्यादि शब्दांना धातुसंज्ञा होऊं नये याकरितां भू वगैरेंचा पाठ करावा'. तेव्हां अर्थातच वृक्ष, प्लक्ष इत्यादिक आणि मातृ, पितृ इत्यादिक प्रातिपदिकें यांना धातुसंज्ञा होणार नाहीं. आतां या पाठपक्षीं या, वा, नु इत्यादिकांना धातुसंज्ञा होईल असा जो दोष येतो तो 'भाववचनो धातुः' असें धातूचें लक्षण केलें म्हणजे येणार नाहीं. भाव शब्द मात्र तेथें भवतीति भावः असा कर्तृसाधनच घ्यावा. म्हणजे भवतिक्रियेच्या कर्त्यालाच धातुसंज्ञा होईल. शिजवणें, गमन करणें वगैरे ज्या पच्यादिक्रिया त्या भवतिक्रियेचा कर्ता होतातच. तेव्हां पच्, गम् वगैरेंना धातुसंज्ञा होण्याला कांहींच अडचण येणार नाहीं.

पण त्यासाठीं 'भाववचनो धातुः' असें स्वतंत्र वचन केलें पाहिजे कीं काय ?

वचन करावयास नको.

तर मग सांगितल्याशिवाय कशावरून हें गवसणार आहे ?

---

२५. भेद, छेद हे जरी मूळ वस्तूचा अभाव करणारे आहेत तरी स्वतः ते उत्पन्न होणारे आहेत.

२६. भाव्यते म्ह. साध्यते म्हणजे सिद्ध वस्तूवर नवीन साधिला जाणारा जो अर्थ तो भाव होय. शिजविणें, गमन करणें हें पूर्वसिद्ध अशा तांदूळ वगैरे पदार्थावर नवीन घडून येणारे अर्थ आहेत, म्हणून त्यांना भाव म्हणतां येतें व त्या भावाचे वाचक पच्, गम् वगैरेंना धातुसंज्ञा होते.

२७. सिद्ध अशा स्त्रीव्यक्तीवर अपत्यजन्मानें मातृत्व हें साध्य होतें. तसेंच पुरुषव्यक्तीवर पितृत्व, भ्रातृत्व, हें होय.

२८. कारण प्रत्येक पक्षीं कोणत्या तरी प्रातिपदिकांना धातुसंज्ञा प्राप्त होत आहे.

दयो धातव इति । कथम् । नेदमादिग्रहणम् । वदेरयमौणादिक इञ्कर्तृसाधनः । भुवं वदन्तीति भूवादय इति ॥

**भाववचने तदर्थप्रत्ययप्रतिषेधः ॥८॥**

भाववचने धातौ तदर्थस्य प्रत्ययस्य प्रतिषेधो वक्तव्यः । शिश्ये इति । किं च स्यात् । अशितील्यात्त्वं प्रसज्येत । तद्धि धातोर्विहितम् ॥

**इतरेतराश्रयं च प्रत्यये भाववचनत्वं तस्माच्च प्रत्ययः ॥९॥**

इतरेतराश्रयं च भवति । केतरेतराश्रयता । प्रत्यये भाववचनत्वं तस्माच्च प्रत्ययः। उत्पन्ने हि प्रत्यये भाववचनत्वं गम्यते स च तावद्भाववचनादुत्पाद्यः । तदेतदितरेतराश्रयं भवति । इतरेतराश्रयाणि च न प्रकल्पन्ते ॥

**सिद्धं तु नित्यशब्दत्वादनाश्रित्य भाववचनत्वं प्रत्ययः ॥१०॥**

सिद्धमेतत् । कथम् । नित्याः शब्दाः । नित्येषु च शब्देष्वनाश्रित्य भाववचनत्वं

---

'भूवादयो धातवः' या सूत्रानेंच हें प्रतिपादन केलें आहे.

तें कसें ?

सूत्रामध्यें आदि शब्द घातला आहे असें समजू नये. तर वद धातूच्या पुढें कर्ता या अर्थी औणादिक इञ् प्रत्यय करून साधलेला वादि शब्द घातला आहे. 'भुवं वदन्तीति भूवादयः' असा विग्रह आहे. तेव्हां भाव या अर्थाला दाखविणारे शब्द धातुसंज्ञक होतात असा सूत्राचा अर्थ होतो.[२९]

(वा.८) भाव या अर्थाला दाखविणारे शब्द धातुसंज्ञक होतात असा अर्थ केला असतां भावार्थी केलेल्या प्रत्ययाला धातुसंज्ञा प्राप्त होते तिच्या निषेधाकरितां वचन केलें पाहिजे; जसें शिश्ये.[३०]

भावार्थक प्रत्ययाला धातुसंज्ञा झाली असतां काय बिघडेल ? 'आदेच उपदेशे' (६।१।४५) यानें शित् प्रत्यय पुढें नसतां करावयास सांगितलेले आत्त्व होईल. कारण तें धातूला करावयास सांगितलें आहे.[३१]

(वा.९) येथें अन्योन्याश्रयरूपदोष येतो.

तो अन्योन्याश्रयदोष कसा येतो ?

प्रत्यय उत्पन्न झाल्यानंतर धातूचें भाववाचकत्व कळून येतें.[३२] आणि अगोदरच भाववाचकत्व गृहीत धरून धातुसंज्ञा करून पुढें तो प्रत्यय करावा लागतो असा अन्योन्याश्रय होतो. आणि इतरेतराचा आश्रय करून असलेलीं कार्यें तर अस्तित्वांत येऊं शकत नाहींत.

(वा.१०) प्रत्यय करण्याच्या पूर्वी भाववाचकत्व कळून येत असल्यामुळें हें साधत आहे.

तें कसें ?

शब्द हे नित्य आहेत म्हणून. नित्य शब्दांविषयीं (खरोखरीचें) भाववाचकत्व

---

२९. सूत्रांतील भूवादि हा शब्द भाववचन या अर्थाचा आहे. भवतीति भूः असा भू हा शब्द भाव या अर्थाचा आहे, वदतीति वादि असा वादि हा शब्द वचन या अर्थाचा आहे. 'वसिवपि' (उणादि. ४।१२४) या सूत्रानें वादिशब्दामध्यें इञ् प्रत्यय झाला आहे.

३०. सूत्रांतील भूवादि याचा अर्थ भाववचन असा घेतला तर त्याचा 'भ्वादिगणांतील शब्द' असा अर्थ घेतां येणार नाहीं, म्हणून शिश्ये येथें दोष दिला आहे. शिश्ये हें भावेप्रयोगांतील क्रियापद आहे. शीधातूहून लिट् प्रत्यय केला आहे.

३१. 'आदेच उपदेशे' यानें सांगितलेलें आत्त्व अनैमित्तिक आहे. फक्त शित् प्रत्यय पुढें असतां त्याचा निषेध केला आहे.

३२. केवळ धातूचा प्रयोग नसल्यामुळें प्रत्यय करण्यापूर्वी धातूचें भाववाचकत्व कळण्यास मार्ग नाहीं. तेव्हां भाववाचकत्व कळून येत नसल्यामुळें धातुसंज्ञा अस्तित्वांत येऊं शकत नाहीं.

प्रत्यय उत्पद्यते ॥

**प्रथमभावग्रहणं च ॥११॥**

प्रथमभावग्रहणं च कर्तव्यम्। प्रथमं यो भावमाहेति। कुतः पुनः प्राथम्यं किं शब्दत आहोस्विदर्थतः। किं चातः। यदि शब्दतः सनादीनां धातुसंज्ञा न प्राप्नोति। पुत्रीयति वस्त्रीयतीति। अथार्थतः सिद्धः सनादीनां धातुसंज्ञा स एव तु दोषो भाववचने तदर्थप्रत्ययप्रतिषेध इति। एवं तर्हि नैवार्थतो नापि शब्दतः। किं तर्हि। अभिधानतः। सुमध्यमेऽभिधाने यः प्रथमं भावमाह ॥

इह य एव भाववचने धातौ दोषास्त एव क्रियावचनेऽपि। तत्र त एव परिहाराः।

---

गृहीत न धरतां प्रत्ययाची कल्पना करावयाची असते.[33]

(वा.११) 'प्रथमभाव' या शब्दाचें ग्रहण करावें. म्हणजे 'प्रथमभाववचनो धातुः' असें धातुसंज्ञेचें सूत्र करावें. प्रथमतः जो भाव या अर्थाला प्रतिपादन करतो तो धातु होय.

पण तें प्राथम्य कोणापेक्षां समजावयाचें ? काय शब्दापेक्षां प्राथम्य समजावयाचें (म्हणजे प्रथमतः उच्चारलेला असा जो शब्द भाव या अर्थाला दाखवितो तो धातु असें समजावें),किंवा अर्थापेक्षां प्राथम्य घ्यावयाचें ? (म्हणजे तो शब्द स्वतः मागून उच्चारलेला का असेना, पण ज्या शब्दानें भाव हा अर्थ प्रथमतः दाखविला जातो तो धातु असें समजावें.)

जर शब्दापेक्षां प्राथम्य गृहीत धरलें तर पुत्रीयति[34] व स्त्रीयति इत्यादि स्थलीं सन्, क्यच् वगैरेंना धातुसंज्ञा होऊं शकत नाहीं. आतां अर्थापेक्षां प्राथम्य गृहीत धरलें तर सन् वगैरेंना धातुसंज्ञा होऊं शकते तरी पण 'भावार्थाला दाखविणारा तो धातु' असें म्हटलें तर शिश्ये इत्यादि ठिकाणीं जो दोष येतो तो जाण्याकरितां भावार्थी केलेल्या प्रत्ययाला धातुसंज्ञेच्या निषेधाकरितां वचन केलें पाहिजे असें जें पूर्वी सांगितलें आहे तो दोष कायम राहतो.

असें आहे तर शब्दाच्या दृष्टीनें किंवा अर्थाच्या दृष्टीनेंही प्राथम्य आम्ही घेत नाहीं.

तर कसें घेतां ?

प्रतिपादनक्रियेच्या दृष्टीनें प्राथम्य आम्ही गृहीत धरतों. पूर्वोक्त दोन्ही तऱ्हा सोडून देऊन ही एक मधलीच प्राथम्याची तऱ्हा आम्ही स्वीकारतों. अन्यानें न दाखविलेल्या अशा भाव या अर्थाला जो प्रतिपादन करतो तो धातु[35] असा अर्थ.

'भावार्थाला दाखविणारा तो धातु' या लक्षणावर जे दोष येतात ते दोष 'क्रियेला प्रतिपादन करणारा तो धातु' या लक्षणावरही

---

३३. परमार्थतः भाववाचकत्व केवळ धातूला संभवत नाहीं. कारण केवळ धातूचा लोकामध्यें प्रयोग नाहीं. तर प्रत्ययविशिष्ट धातूलाच तें आहे. तथापि शास्त्रप्रक्रियानिर्वाहाकरतां कल्पिलेलें जें भाववाचकत्व तें केवळ धातूलाही संभवते. तसलें काल्पनिक भाववाचकत्व गृहीत धरून प्रत्यय करावयाचा असल्यामुळें अन्योन्याश्रयदोष येत नाहीं.

३४. प्रथम या शब्दाचा संबंध भाववचनाकडे केला असतां शब्दापेक्षां प्राथम्य ही तऱ्हा निघते, व प्रथम या पदाचा संबंध भावाकडे देला असतां अर्थापेक्षां प्राथम्य ही तऱ्हा उद्भवते. त्यांत पहिल्या तऱ्हेनें पुत्रीयति येथें प्रथम उच्चारलेला पुत्रशब्द भाव या अर्थाला दाखवीत नाहीं आणि जो क्यच् भावार्थाला दाखवितो तो प्रथमोच्चारित नाहीं असा दोष येतो.

३५. प्रथम नव्हे अशाही क्यच् प्रत्ययानें आपला भाव म्ह. क्रिया हा अर्थ प्रथमच दाखविला आहे. त्या प्रयोगामध्यें तो अर्थ प्रकृति वगैरे इतर कोणीही दाखविला नाहीं. शिश्ये येथें धातूच्या पुढें भाव या अर्थी प्रत्यय केला तेथें धातूनें तो अर्थ प्रथमतः दाखविला आहे, आणि त्याच्यापुढील प्रत्ययानें तोच अर्थ पुनः दाखविला आहे, असें प्रकृत स्थळीं नसल्यानें क्यच् प्रत्ययानें दाखविलेला भाव हा अर्थ प्रथमतःच होतो.

तत्रेदमपरिहृतमस्तिभवतिविद्यतीनां धातुत्वमिति। तस्य परिहारः। कां पुनः क्रियां भवान्मत्वाहास्तिभवतिविद्यतीनां धातुसंज्ञा न प्राप्नोतीति। किं यत्तद्देवदत्तः कंसपात्र्यां पाणिनौदनं भुङ्क्त इति। न ब्रूमः कारकाणि क्रियेति। किं तर्हि। कारकाणां प्रवृत्तिविशेषः क्रिया। अन्यथा च कारकाणि शुष्कौदने प्रवर्तन्तेऽन्यथा च मांसौदने। यद्येवं सिद्धास्तिभवतिविद्यतीनां धातुसंज्ञा। अन्यथा हि कारकाण्यस्तौ प्रवर्तन्तेऽन्यथा हि भ्रियतौ॥ षड्भावविकारा इति ह स्माह भगवान्वार्ष्यायणिः। जायतेऽस्ति विपरिणमते वर्धतेऽपक्षीयते विनश्यतीति। सर्वथा स्थित इत्यत्र धातुसंज्ञा न प्राप्नोति। बाह्यो ह्येतेभ्यस्तिष्ठतिः। एवं तर्हि क्रियायाः क्रिया निवर्तिका भवति द्रव्यं द्रव्यस्य निवर्तकम्। एवं हि कश्चित्कंचित्पृच्छति। किमवस्थो देवदत्तस्य व्याधिरिति। स आह। वर्धत इति। अपर आह। अपक्षीयत इति। अपर

येतात. तेथें पहिल्या तऱ्हेच्या लक्षणावर आलेल्या दोषांचा ज्या उपायांनीं परिहार केला त्याच उपायांनीं दुसऱ्या तऱ्हेच्या लक्षणावर आलेल्या दोषांचा परिहार होतो.

त्यांत 'अस्, भू आणि विद् यांना धातुसंज्ञेचें विधान केलें पाहिजे' असा जो दोष दाखविला त्याचा मात्र परिहार केला नाहीं.

त्याचा परिहार आतां सांगतों.

पण अगोदर असें विचारतों की, क्रियाशब्दाचा कोणता अर्थ समजून 'अस्, भू आणि विद् यांना धातुसंज्ञा प्राप्त होत नाहीं' असें तूं म्हणत आहेस? काय देवदत्त कंसपात्रामध्यें हातानें भात खातो इत्यादि गोष्टी पाहून त्यांना का क्रिया समजून म्हणत आहेस?

कर्ता वगैरे कारकांना आम्ही क्रिया असें म्हणत नाहीं.

तर मग कशाला क्रिया म्हणतां?

कर्ता वगैरे कारकांची जी एक विशेष प्रकारची प्रवृत्ति ती क्रिया होय. कर्ता, करण वगैरे कारकांची शुष्क ओदनाविषयीं जी प्रवृत्ति होते ती एक निराळीच म्हणजे मंद दिसते. आणि मांसौदनाविषयीं जी प्रवृत्ति होते ती निराळीच म्हणजे जोराची दिसते. यावरून कारकांची प्रवृत्तिही कारकांपेक्षा निराळी आहे. तीच क्रिया होय. असें आहे तर मग सहजच अस्, भू, विद् यांना धातुसंज्ञा सिद्ध होत आहे. कारण अस्तिक्रिया अशा स्वरूपाची जी कारकांची प्रवृत्ति ती निराळी आहे व भ्रियतिक्रिया अशा स्वरूपाची जी प्रवृत्ति ती निराळी आहे.[३६]

उत्पत्ति, सत्ता, परिणाम, वृद्धि, ह्रास आणि विनाश असे क्रियेचे सहा प्रकार सांगतात. वार्ष्यायणि आचार्यांनीं सत्ता ही स्पष्टच क्रियेमध्यें गणिली आहे.

इतकें झालें तरी स्थितः येथें स्था शब्दाला कोणत्याही प्रकारानें धातुसंज्ञा प्राप्त होऊं शकत नाहीं. कारण स्थिति म्हणून जिला म्हणतात ती वर दाखविलेल्या सहा प्रकारच्या बाहेरची[३७] आहे.

असें आहे तर क्रियेची निवर्तक क्रियाच असते. आणि द्रव्याचें निवर्तक द्रव्य होत असतें. असें पहा की, कोणी एक मनुष्य कोणा एकाला असें विचारीत आहे की, देवदत्ताचा आजार कोणत्या अवस्थेंत आहे? तो सांगतो– वाढत्या प्रमाणांत आहे. दुसरा

३६. अस्तिक्रिया म्हणजे आत्मधारणाविषयीं प्रवृत्ति. भ्रियतिक्रिया म्हणजे आत्मत्यागाविषयीं प्रवृत्ति. ही प्रवृत्ति नाइलाजास्तव होते. हा विचार स्वतंत्र आहे.

३७. देवदत्तः तिष्ठति असें म्हटलें असतां तेथें तिष्ठति याचा अस्ति असा अर्थ लोकांमध्यें प्रतीत होत नाहीं. दुसरीही कोणतीच क्रिया तेथें दिसत नाहीं.

आह। स्थित इति। स्थित इत्युक्ते वर्धतेश्चापक्षीयतेश्च निवृत्तिर्भवति ॥ अथवा नान्तरेण क्रियां भूतभविष्यद्वर्तमानाः काला व्यज्यन्ते। अस्त्यादिभिश्चापि भूतभविष्यद्वर्तमानाः काला व्यज्यन्ते ॥ अथवा नान्यत्पृष्टेनान्यदाख्येयम्। तेन न भविष्यति किं करोति अस्तीति ॥

अथ यद्येव क्रियावचनो धातुरित्येष पक्षोऽथापि भाववचनो धातुरिति किं गतमेतदियता सूत्रेणाहोस्विदन्यतरस्मिन्पक्षे भूयः सूत्रं कर्तव्यम्। गतमित्याह। कथम्। अयमादिशब्दोऽस्त्येव व्यवस्थायां वर्तते। तद्यथा। देवदत्तादीन्समुपविष्टानाह देवदत्तादय आनीयन्तामिति। त उत्थाप्यानीयन्ते। अस्ति प्रकारे वर्तते। तद्यथा। देवदत्तादय आढ्या अभिरूपा दर्शनीयाः पक्षवन्तः। देवदत्तप्रकारा इति गम्यते। प्रत्येकं चादिशब्दः परिसमाप्यते।

---

एक सांगतो— आतां कमी कमी होत चालला आहे. तिसरा एक सांगतो— देवदत्ताचा आजार आतां 'स्थित' म्हणजे आहे त्या स्थितींत आहे. येथें 'स्थित' असें म्हटलें असतां वृद्धि व ह्रास या क्रियेची निवृत्ति समजली[38] जाते.

अथवा क्रियेवांचून अखण्डदण्डायमान अशा कालाचे भूत, भविष्य, वर्तमान इत्यादि भेद होऊं शकत नाहींत. तेव्हां अस्ति अभूत् भविष्यति तिष्ठति अस्थात् स्थास्यति वगैरे अस्त्यादिकांनींही त्या कालांची अभिव्यक्ति होत आहे, म्हणून त्यांचे अर्थही क्रियाच होत असें ठरवितां येतें.

आतां एक विचारलें असतां तेथें भलतेंच उत्तर देतां येत नाहीं. त्यामुळें 'काय करीत आहे ?' असें विचारलें असतां 'आहे' असें उत्तर देतां येत[39] नाहीं.

'क्रियेला[40] दाखविणारा तो धातु' हा पक्ष असो किंवा 'भाव या अर्थाला दाखविणारा तो धातु' हा पक्ष असो पण 'भूवादयो धातवः' एवढ्याच सूत्रानें काम भागतें? किंवा एखाद्या पक्षीं जरा मोठें सूत्र करावें लागेल ?

आहे तेवढ्याच सूत्रानें काम भागतें.

तें कसें ?

आदि शब्द हा व्यवस्था म्हणजे मर्यादा या अर्थाला दाखविणारा असा एक आहे; जसें— देवदत्ताला आरंभ करून एका ठिकाणीं घोळका करून बसलेले पाहून देवदत्त, चैत्र वगैरेंना घेऊन ये असें सांगितलें असतां त्या देवदत्त वगैरेंना उठवून आणिलें जातें. आणि दुसरा एक आदि शब्द सारखेपणा या अर्थाला दाखविणारा आहे. जसें— देवदत्तादि पुरुष धनाढ्य, सुस्वरूप, प्रेक्षणीय आणि आप्तगोत वगैरेंनीं युक्त असे आहेत, असें म्हटलें असतां येथील 'देवदत्तादि' या आदिशब्दापासून 'देवदत्तासारखे' असा अर्थ मनांत येतो. आणि येथें प्रत्येकाशीं आदिशब्दाचा संबंध केला जात आहे. तेव्हा 'भ्वादयः' आणि 'वादयः' अशीं

---

३८. क्रियेची निवृत्ति क्रियाच करूं शकते असा स्वाभाविक नियम आहे. तेव्हां ज्यापेक्षां स्था याचा अर्थ वृद्ध्यादि क्रियेची निवृत्ति दाखवीत आहे त्यापेक्षां तो अर्थ क्रियाच होय असें अनुमान होतें. तेव्हां 'स्था' याला धातुसंज्ञा होण्यास अडचण नाहीं.

३९. अस्त्यादिकांच्या अर्थाला क्रियात्व नाहीं. म्हणून तसें उत्तर देतां येत नाहीं, असें नव्हे तर 'तो आहे' असें नक्की समजूनच तसा प्रश्न विचारला असल्यामुळें त्याचें 'आहे' असें उत्तर देतां येत नाहीं.

४०. हालचाल करणाऱ्या अशा कर्ता, कर्म वगैरे साधनांकडून साध्य केला जाणाऱ्या अर्थाला व्याकरणशास्त्रामध्यें 'क्रिया' असें म्हणण्याची वहिवाट आहे. वरील तऱ्हेच्या साधनांकडून, आणि जें हालचाल करीत नाहीं अशाही प्रकारच्या साधनांकडून साध्य केला जाणाऱ्या अर्थाला 'भाव' हें नांव देण्याची वहिवाट आहे.

भ्वादय इति च वादय इति च। तद्यदा तावत्क्रियावचनो धातुरित्येष पक्षस्तदा भू इत्यत्र य आदिशब्दः स व्यवस्थायां वर्तते वा इत्यत्र य आदिशब्दः स प्रकारे। भू इत्येवमादयो वा इत्येवंप्रकारा इति। यदा तु भाववचनो धातुरित्येष पक्षस्तदा वा इत्यत्र य आदिशब्दः स व्यवस्थायां भू इत्यत्र य आदिशब्दः स प्रकारे। वा इत्येवमादयो भू इत्येवंप्रकारा इति ॥ यदि तर्हि लक्षणं क्रियते नेदानीं पाठः कर्तव्यः। कर्तव्यश्च। किं प्रयोजनम्।

**भूवादिपाठः प्रातिपदिकाणपयत्यादिनिवृत्त्यर्थः ॥ १२ ॥**

भूवादिपाठः कर्तव्यः। किं प्रयोजनम्। प्रातिपदिकाणपयत्यादिनिवृत्त्यर्थः। प्रातिपदिकनिवृत्त्यर्थं आणपयत्यादिनिवृत्त्यर्थंश्च। के पुनराणपयत्यादयः। आणपयति वट्टति वड्ढतीति ॥

**स्वरानुबन्धज्ञापनाय च ॥ १३ ॥**

स्वरानुबन्धज्ञापनाय च पाठः कर्तव्यः। स्वराननुबन्धांश्च ज्ञास्यामीति। न ह्यन्तरेण पाठं स्वरा अनुबन्धा वा शक्या विज्ञातुम् ॥ ये त्वेते न्याय्यविकरणा उदात्ता अननुबन्धकाः पठ्यन्त एतेषां पाठः शक्योऽ-

---

येथें दोन पदें घातल्यासारखीं होतात. त्यांत जेव्हां 'क्रियावाचक धातु' हा पक्ष स्वीकारला जातो तेव्हां भूशब्दापुढील आदि शब्द मर्यादा या अर्थाला दाखवील. म्हणजे भू आहे प्रथम ज्यांमध्यें, आणि वा धातूसारखे क्रियेला दाखविणारे ते धातु होत असा सूत्राचा अर्थ होतो. आतां जेव्हां 'भाववाचक तो धातु' हा पक्ष स्वीकारला तेव्हां वा-शब्दापुढील आदि शब्द मर्यादा या अर्थाला दाखवील व भू-शब्दापुढील आदि शब्द सारखेपणा या अर्थाला दाखवील. तेव्हां 'वा' आहे प्रथम[४१] ज्यांमध्यें, आणि भू-धातूसारखे भाव या अर्थाला दाखविणारे ते धातु होत असा अर्थ होतो.

जर 'क्रियेला दाखविणारा तो धातु' किंवा 'भाव या अर्थाला दाखविणारा तो धातु' असें धातुसंज्ञेचें लक्षण केलें जात आहे तर आतां भ्वादि गणांचा पाठ करावयास नको.

पाठ करावयास पाहिजे.

त्याचा काय उपयोग ?

(वा.१२) भूवादि शब्दांचा पाठ करावयास पाहिजे.

त्याचा काय उपयोग ?

कांहीं[४२] प्रातिपदिकांना आणि आणपयति इत्यादि अपभ्रंशशब्दांना धातुसंज्ञा न व्हावी यासाठीं पाठाचा उपयोग होत आहे.

आणपयति वगैरे अपभ्रंश शब्द ते कोणते ?

आणपयति[४३], वट्टति, वड्ढति वगैरे.

(वा.१३) अमुक धातु उपदेशकालीं अमुक स्वराचा (उदात्त किंवा अनुदात्त वगैरे स्वराचा) आहे हें, आणि अमुक धातूला अमुक इत्संज्ञक वर्ण—इ, लृ, ऋ, इर् वगैरे जोडला आहे हें कळविण्यासाठीं धातुपाठ केला पाहिजे. धातूंचा प्रत्यक्ष पाठ केल्याशिवाय त्यांतील उदात्तादि स्वर व इकार वगैरे अनुबन्ध आम्हाला कळणें शक्य नाहीं.

आतां जे धातु उदात्त स्वराचे असून इत्संज्ञक वर्णरहित असे आहेत व ज्यांच्यापुढें सामान्यतः धातुत्वावर अवलंबून असलेकांना.

---

४१. अर्थात् या वेळीं दुसऱ्या गणाच्या आरंभीं वा धातु पठन करून तो वादिगण भ्वादिक सर्व गणांच्या प्रथमतः योजावा.

४२. क्रियावाची अशा हिरुक्, पृथक् इत्यादि-

४३. आणपयति हा शब्द आज्ञापयति या अर्थी अपभ्रंश झाला आहे.

कर्तुम् । एतेषामप्यवश्यमाणपयत्यादिनिवृत्त्यर्थः पाठः कर्तव्यः । न कर्तव्यः । शिष्टप्रयोगादाणपयत्यादीनां निवृत्तिर्भविष्यति । स चावश्यं शिष्टप्रयोग उपास्यो येऽपि पठ्यन्ते तेषामपि विपर्यासनिवृत्त्यर्थः । लोके हि कृष्यर्थे कसिं प्रयुञ्जते दृश्यर्थे च दिशिम् ॥

## उपदेशेऽजनुनासिक इत् ॥१।३।२॥

उपदेश इति किमर्थम् । अभ्र आँ अपः । उद्देशे योऽनुनासिकस्तस्य मा भूदिति ॥ कः पुनरुद्देशोपदेशयोर्विशेषः । प्रत्यक्षमाख्यानमुपदेशो गुणैः प्रापणमुद्देशः । प्रत्यक्षं तावदाख्यानमुपदेशः । तद्यथा । अगोज्ञाय कश्चिद्गां सक्थनि कर्णे वा गृहीत्वोपदिशति । अयं गौरिति । स प्रत्यक्षमाख्यातमाह । उपदिष्टो मे गौरिति । गुणैः प्रापणमुद्देशः । तद्यथा । कश्चित्कं-

ला विकरणप्रत्यय करावयाचा असतो, अशा धातूंचा पाठ न केला तरी चालेल.

पण तसल्या धातूंचा पाठ केला नाहीं तर धातुसंज्ञेपासून दूर असलेल्या आणपयति वगैरेंमध्यें त्या धातूंचा शिरकाव होईल तो न व्हावा यासाठीं त्यांचाही पाठ अवश्य केला पाहिजे.

तसल्या धातूंचा पाठ करावयास नको. कारण शिष्ट लोकांनीं प्रयुक्त असलेल्या शब्दांचें व्याख्यान करण्यासाठीं हें शास्त्र प्रवृत्त झालें आहे. तेथें आणपयति वगैरें-सारख्या शब्दांचा शिष्ट लोकांनीं प्रयोग केलेला आढळांत येत नाहीं. म्हणून त्यांचा प्रयोग केला जाणार नाहीं, भू वगैरेंचा होणारा प्रयोग शिष्टांनीं केलेला असल्यामुळें पाठ नसला तरी त्यांना धातुसंज्ञा होईल.

शिष्टांचा प्रयोग पाहून तदनुसारच धातुसंज्ञा करावयाची असें मात्र प्रत्यक्ष पाठ केला तरी अवश्य गृहीत धरलेंच पाहिजे. कारण ज्या धातूंचा पाठ केला आहे त्या धातूंचाही विपर्यास न व्हावा. कारण लोकांमध्यें पाहिलें तर कृष् धातूच्या अर्थी कस् धातूचा प्रयोग केलेला दृष्टीस पडतो. तसेंच दृश् धातूच्या अर्थी दिस् धातूचा प्रयोग करतात. तो तसा प्रयोग न व्हावा यासाठीं शिष्टांचा प्रयोग अवश्य अनुसरला पाहिजे.

(सू.२) येथें 'उपदेशे' हा शब्द कशाकरितां घातला आहे ?

अभ्र आँ अपः[2] येथें उद्देशामध्यें अनुनासिक असलेल्या आकाराला इत्संज्ञा न व्हावी याकरितां घातला आहे.

उद्देश आणि उपदेश यांच्या अर्थामध्यें काय बरें फरक आहे ?

प्रत्यक्षमाख्यानमुपदेशः, गुणैः प्रापणमुद्देशः. कोणत्याही वस्तूचें स्वरूप प्रत्यक्ष कळविणें याला उपदेश म्हणतात; जसें– ज्या मनुष्याला बैल म्हणजे काय हें माहीत नाहीं, त्याला दुसरा कोणी एक बैलाच्या कानाला किंवा मांडीला धरून 'हा बैल' असें सांगतो. त्यानंतर तो मनुष्य बैल कसा असतो हें मला प्रत्यक्ष सांगितलेंस अशा अर्थाचें 'उपदिष्टो मे गौः' असें म्हणतो. आकार, रंग वगैरे खुणा सांगून वस्तु कळविणें याला उद्देश असें म्हणतात; जसें– कोणी एक मनुष्य दुसऱ्या

१. उपदेशकालीं उच्चारलेला जो अनुनासिक स्वर त्याला इत् असें नांव मिळतें; उदा०– एध, स्पर्ध वगैरे; येथें शेवटचा अकार, तसेंच सुप्प्रत्ययांतील शेवटचा उकार.

२. अभ्र आँ अपः येथें सप्तम्यर्थद्योतक अशा आङ्‌या निपाताला 'आङोऽनुनासिकश्छन्दसि' (६।१।१२६) यानें अनुनासिक केला आहे. प्रत्यक्ष न उच्चारतां अनुनासिक या शब्दानें सांगितला असल्यामुळें उपदिष्ट नव्हे, तर उद्दिष्ट होय.

चिदाह । देवदत्तं मे भवानुद्दिशत्विति । स इहस्थः पाटलिपुत्रस्थं देवदत्तमुद्दिशति । अङ्गदी कुण्डली किरीटी व्यूढोरस्को वृत्तबाहुर्लोहिताक्षस्तुङ्गनासो विचित्राभरण ईदृशो देवदत्त इति। स गुणैः प्राप्यमाणमाह । उद्दिष्टो मे देवदत्त इति ॥

**इत्संज्ञायां सर्वप्रसङ्गोऽविशेषात् ॥१॥**

इत्संज्ञायां सर्वप्रसङ्गः । सर्वस्यानुनासिकस्येत्संज्ञा प्राप्नोति । अस्यापि प्राप्नोति । अभ्र आँ अपः । किं कारणम् । अविशेषात् । न हि कश्चिद्विशेष उपादीयत एवंजातीयकस्यानुनासिकस्येत्संज्ञा भवतीति । अनुपादीयमाने विशेषे सर्वप्रसङ्गः ॥ किमुच्यतेऽनुपादीयमाने विशेष इति । कथं न नामोपादीयते यदोपदेश इत्युच्यते । लक्षणेन ह्युपदेशः । संकीर्णावुद्देशोपदेशौ । प्रत्यक्षमाख्यानमुद्देशो गुणैश्च प्रापणमुपदेशः । प्रत्यक्षं तावदाख्यानमुद्देशः । तद्यथा । कश्चित्कंचिदाह । अनुवाकं मे भवानुद्दिशत्विति । स तस्मा आचष्टे । इषेत्वकमधीष्व । शंनोदेवीयमधीष्वेति । स प्रत्यक्षमाख्यातमाह । उद्दिष्टो मेऽनुवाकस्तमध्येष्य इति । गुणैश्च प्रापणमुपदेशः । तद्यथा । कश्चित्कंचिदाह । ग्रामान्तरं गमि-

---

एका मनुष्यास म्हणत आहे की तूं मला देवदत्ताचें स्वरूप सांग. तो मनुष्य येथेंच असून पाटलिपुत्रामध्यें असलेल्या देवदत्ताच्या खुणा सांगतो— बाहुभूषणें घातलेला, कुंडलें कानांत असलेला, मुकुटानें युक्त, विशाल वक्षःस्थलाचा, लठ्ठ आणि वाटोळ्या दंडांचा, डोळे लाल असलेला, उंच नाकाचा व चित्रविचित्र नानाप्रकारचे अलंकार घातलेला असा देवदत्त नांवाचा माणूस आहे. या खुणांवरून ज्याच्या मनांत देवदत्ताचें स्वरूप आलें तो मनुष्य देवदत्ताचें स्वरूप सांगणाऱ्या माणसाला म्हणतो की तूं मला देवदत्ताचें स्वरूप सांगितलेंस, अशा अर्थाचें 'उद्दिष्टो मे देवदत्तः' असें म्हणतो.

(वा.१) अनुनासिकाला सांगितलेली इत्संज्ञा जो जो म्हणून अनुनासिक आहे त्या सर्वांला ती प्राप्त होत आहे. अभ्र आँ अपः येथील अनुनासिकालाही इत्संज्ञा प्राप्त होत आहे.

काय कारण ?

अमुक एक प्रकारच्या अनुनासिकाला इत्संज्ञा होते असा कांहीं विशेष दाखविला गेला नाहीं म्हणून. तेव्हां विशेष कांहीं न सांगतां 'अनुनासिकाला इत्संज्ञा होते' इतकेंच मोघम मोघम म्हटलें असल्यामुळें सर्व अनुनासिकांना इत्संज्ञा प्राप्त होणारच.

पण 'कांहीं विशेष दाखविला नाहीं'. असें कसें बरें म्हणतां येईल ? 'उपदेशे' असें जें येथें म्हटलें आहे हाच विशेष दाखविला नाहीं का ?

उपदेशे असें म्हटलें आहे खरें परंतु खुणांनीं जो अर्थ कळविला जातो तेथेंही उपदेश शब्द दृष्टीस पडतो. तेव्हां उद्देश आणि उपदेश या शब्दांच्या अर्थांमध्यें फार घोटाळा दिसतो. प्रत्यक्षमाख्यानमुपदेशः, गुणैश्च प्रापणमुद्देशः. प्रत्यक्ष अर्थ दाखविणें तेथेंही उद्देश शब्द घालतात. आणि खुणांनीं अर्थ कळविणें त्यालाही उपदेश म्हणतात. त्यांत प्रत्यक्ष अर्थ दाखविणें, याला उद्देश म्हटलेलें दृष्टीस पडतें, तें असें— कोणी एक दुसऱ्या एकाला म्हणत आहे की अनुवाकं मे भवानुद्दिशतु— तूं मला अनुवाक सांग. तेव्हां तो दुसरा मनुष्य त्याला म्हणतो की ज्यामध्यें 'इषे त्वा' शब्द आहेत, आणि ज्यामध्यें 'शं नो देवी' शब्द आहेत तो अनुवाक म्हण. त्यावर पहिला मनुष्य प्रत्यक्ष सांगितलेल्या अनुवाकाबद्दल दुसऱ्या मनुष्याला उत्तर देत आहे की, 'उद्दिष्टो मेऽनुवाकः'— तूं मला अनुवाक सांगितलास, तो मी म्हणेन. तसेंच

ष्यामि पन्थानं मे भवानुपदिशत्विति । स तस्मा आचष्टे । अमुष्मिन्नवकाशे हस्तदक्षिणो ग्रहीतव्योऽमुष्मिन्हस्तवाम इति । स गुणैः प्राप्यमाणमाह । उपदिष्टो मे पन्था इति । एवमेतौ संकीर्णावुद्देशोपदेशौ ॥ एवं तर्हीत्कार्याभावादत्रेत्संज्ञा न भविष्यति । ननु च लोप एवेत्कार्यं स्यात् । अकार्यं लोपः । इह हि शब्दस्य द्व्यर्थ उपदेशः । कार्यार्थो वा भवत्युपदेशः श्रवणार्थो वा । कार्यं चेह नास्ति । कार्ये चासति यदि श्रवणमपि न स्यादुपदेशोऽनर्थकः स्यात् ॥ इदमस्तीत्कार्यम् । अभ्र आँ अटितः । अनन्तरलक्षणायामित्संज्ञायां सत्यामादितश्च [७.२.१६] इतीट्प्रतिषेधः प्रसज्येत ॥

**सिद्धं तूपदेशनेऽनुनासिकवचनात् ॥२**

सिद्धमेतत् । कथम् । उपदेशने योऽनुनासिकः स इत्संज्ञो भवतीति वक्तव्यम् । किं पुनरुपदेशनम् । शास्त्रम् । सिध्यति । सूत्रं तर्हि भिद्यते ॥ यथान्या-

---

खुणांनीं अर्थ कळविणें यालाही उपदेश म्हणतात. तें असें– कोणी एक मनुष्य दुसऱ्या एका मनुष्याला म्हणतो की मी गांवाला जाणार आहें; त्या गांवाचा रस्ता तूं मला सांग (पन्थानं भवानुपदिशतु). तेव्हां दुसरा मनुष्य पहिल्याला म्हणत आहे की, इतक्या अंतरावर गेल्यानंतर उजव्या हाताकडील रस्ता धर आणि त्यापुढें इतक्या अंतरावर गेल्यानंतर डाव्या हाताकडील रस्ता धर. त्यावर पहिला मनुष्य खुणेनें कळविलेल्या रस्त्याविषयीं उत्तरादाखल (उपदिष्टो मे पन्थाः) तूं मला रस्ता सांगितलास असा उपदेश शब्द वापरीत आहे. अशा रीतीनें उद्देश आणि उपदेश या शब्दांच्या अर्थाविषयीं घोटाळा होत आहे. तेव्हां उपदेश शब्द घातला तरी अभ्र आँ अपः येथील उद्देशभूत अनुनासिकालाही इत्संज्ञा प्राप्त होत आहे.

असें आहे तर अभ्र आँ येथील अनुनासिकाला इत्संज्ञा केल्यापासून कांहीं फायदा होत नसल्यामुळें त्याला इत्संज्ञा होणार नाहीं.

पण इत्संज्ञा केली असतां 'तस्य लोपः' यानें त्याचा लोप करणें हाच संज्ञा करण्यांत फायदा मिळत आहे ना ?

लोप करणें याला इत्संज्ञेचा फायदा असें म्हणतां येत नाहीं. कारण शास्त्रामध्यें शब्दाचा उपदेश करण्यांत दोन फायदे असतात. एक त्या शब्दापासून कांहींतरी कार्य व्हावें, किंवा त्या उपदिष्ट शब्दाचें प्रयोगामध्यें श्रवण तरी व्हावें. प्रकृतस्थलीं आङला जें अनुनासिकाचें विधान केलें त्या अनुनासिकापासून कांहीं कार्य उत्पन्न होऊं शकत नाहीं. तेव्हां कांहीं कार्य उत्पन्न होत नसतां जर त्या अनुनासिकाचें प्रयोगामध्यें श्रवणही होणार नाहीं तर त्या अनुनासिकाचें विधान करणें अगदींच फुकट होईल.

तर मग 'इत्संज्ञक हे अवयव नव्हेत' या पक्षीं येथें इत्संज्ञेचा हा फायदा आहे की अभ्र आँ अटितः येथील अनुनासिक आकाराला इत्संज्ञा केली असतां 'आदितश्च' (७।२।१६) यानें अट् धातूच्या पुढील क्त प्रत्ययाला इडागमाचा निषेध प्राप्त होतो.

(वा.२) अभ्र आँ येथील अनुनासिकाला इत्संज्ञा न होणें हें साधत आहे.

तें कसें ?

उपदेशनामध्यें प्रत्यक्ष उच्चारलेला जो अनुनासिक तो इत्संज्ञक होतो असें सूत्र करावें.

पण उपदेशन म्हणजे काय ?

---

३. 'अनेकान्ता अनुबन्धाः' म्हणजे इत्संज्ञक हे अवयव नव्हेत या पक्षीं इत्संज्ञक असा आकार ज्याच्याजवळ आहे अशा धातूच्या पुढील निष्ठाप्रत्ययाला इडागम करूं नये असा आदितश्च याचा अर्थ होतो.

समेवास्तु । ननु चोक्तमित्संज्ञायां सर्वप्रसङ्गोऽविशेषादिति । नैष दोषः । उपदेश इति घञयं करणसाधनः । न सिध्यति । परत्वाल्ल्युट् प्राप्नोति । न ब्रूमोऽकर्तरि च कारके संज्ञायाम् [३.३.१९] इति । किं तर्हि । हलश्च [३.३.१२१] इति । तत्रापि संज्ञायामिति वर्तते न चैषा संज्ञा । प्रायवचनादसंज्ञायामपि भविष्यति । प्रायवचनात्संज्ञायामेव स्याद्वा न वा न ह्युपाधेरुपाधिर्भवति विशेषणस्य वा विशेषणम् । यदि नोपाधेरुपाधिर्भवति विशेषणस्य वा विशेषणं कल्याण्यादीनामिनङ् [४.१.१२६] कुलटाया वा [१२७] इनङ्विभाषा न प्राप्नोति । इनङेवात्र प्रधा-

---

उपदेशन म्हणजे शास्त्र होय.

अशा रीतीनें इष्ट सिद्ध होतें खरें, पण मूळ सूत्राचा विपर्यास होतो.

तर मग मूळचें जसें सूत्र आहे तसेंच तें असूं दे.

पण 'अमुक एक प्रकारच्या अनुनासिकाला' असा कांहीं विशेष दाखविला नसल्यामुळें सर्वच अनुनासिकाला इत्संज्ञा प्राप्त होत आहे असा दोष आतांच दाखविला आहे ना ?

हा दोष येत नाहीं. कारण 'उपदेश' या शब्दामध्यें करणीं घञ् प्रत्यय केला आहे (३।३।१९) असें समजावें.

करण या अर्थी घञ् प्रत्यय करतां येत नाहीं. कारण घञाला ल्युट् पर असल्यामुळें (१।४।२) त्याला मागें सारून ल्युट् प्रत्यय (३।३।९७) प्राप्त होत आहे.

उपदेश या शब्दामध्यें 'अकर्तरि च कारके' (३।३।१९) यानें घञ् प्रत्यय केला असें आम्ही म्हणत नाहीं.

तर काय म्हणत आहां ?

'हलश्च' (३।३।१०१) या सूत्रानें उपदेशशब्दामध्यें घञ् प्रत्यय केला आहे व तो घञ् प्रत्यय अनवकाशत्वास्तव करणीं ल्युट् प्रत्ययाचा बाधक असल्यामुळें ल्युट्च्या प्राप्तीची शंकाच उद्भवत नाहीं.

पण 'हलश्च' या सूत्रामध्येंही 'संज्ञायाम्' या पदाची अनुवृत्ति आहे. आणि उपदेश हा शब्द तर संज्ञा नव्हे. (तेव्हां येथें 'हलश्च' यानें घञ् प्रत्यय कसा बरें करतां येईल ?)

'हलश्च' या सूत्रामध्यें पूर्वसूत्रांतून 'प्रायेण' या पदाचीही अनुवृत्ति येत आहे. त्याचा संज्ञायां या पदाशीं संबंध केला असतां 'संज्ञा पाहिजे' हें घञ् प्रत्ययाचें निमित्त प्रायः आहे. अर्थात् क्वचित्स्थलीं संज्ञा नसतांनाही घञ् होतो, असा हलश्च याचा अर्थ होत असल्यामुळें उपदेश हा शब्द संज्ञा नसला तरी देखील तेथें घञ् प्रत्यय होईल.

'प्रायेण' याचा संबन्ध 'संज्ञायाम्' या पदाशीं न होतां मुख्य अशा घञ्प्रत्ययाकडेच होईल. तेव्हां संज्ञा असतांनाच घञ् प्रत्यय प्रायः होईल. म्हणजे संज्ञा असतांनाच क्वचित् होणार नाहीं. कारण उपाधीला उपाधि किंवा विशेषणाला विशेषण लागू होत नाहीं, असा न्याय आहे.

जर उपाधीला उपाधि किंवा विशेषणाला विशेषण लागू करावयाचें नाहीं तर 'कल्याण्यादीनामिनङ्' (४।१।१२६) याच्यापुढील 'कुलटाया वा' (४।१।१२७) या सूत्रानें इनङ् आदेशाचा विकल्प होणार नाहीं.

'कुलटाया वा' या सूत्रामध्यें विधेय अस-

---

४. उपदिश्यतेऽनेन असा विग्रह केला म्हणजे उपदेशन या शब्दाचा शास्त्र असा अर्थ होतो. उपउपसर्गपूर्वक दिश् धातूहून करण या अर्थी ल्युट् प्रत्यय केला आहे (३।३।९७).

५. विधेय असल्यामुळें ढक् प्रत्ययाला प्राधान्य आहे. तेव्हां त्याच्याशींच विकल्पाचा संबंध व्हावा. इनङ् या आदेशाशीं होऊं नये.

नम्। विहितः प्रत्ययः प्रकृतश्चानुवर्तते। इह तर्हि वाकिनादीनां कुक्च [४.१.१५८] पुत्रान्तादन्यतरस्याम् [१५९] इति कुग्विभाषा न प्राप्नोति। अत्रापि कुगेव प्रधानम्। विहितः प्रत्ययः प्रकृतश्चानुवर्तते। एवं न चेदमकृतं भवति नोपाधेरुपाधिर्भवति विशेषणस्य वा विशेषणमिति न च कश्चिद्दोषो भवति। एवं च कृत्वा घञ्न प्राप्नोति॥ एवं तर्हि कृत्यल्युटो बहुलम् [३.३.११३] इत्येवमत्र घञ्भविष्यति॥

## हलन्त्यम्॥ १। ३। ३॥

**हलन्त्ये सर्वप्रसङ्गः सर्वान्त्यत्वात्॥ १**

हलन्त्ये सर्वप्रसङ्गः। सर्वस्य हल इत्संज्ञा प्राप्नोति। किं कारणम्। सर्वान्त्यत्वात्। सर्वो हि हल् तं तमवधिं प्रत्यन्त्यो भवति॥

**सिद्धं तु व्यवसितान्त्यत्वात्॥ २॥**

सिद्धमेतत्। कथम्। व्यवसितान्त्यत्वात्। व्यवसितान्त्यो हलित्संज्ञो भवतीति वक्तव्यम्। के पुनर्व्यवसिताः। धातुप्रातिपदिकप्रत्ययनिपातागमादेशाः। सिध्यति। सूत्रं तर्हि भिद्यते॥ यथान्या-

---

त्यामुळें इनङ् आदेशच प्रधान आहे. ढक् प्रत्यय 'स्त्रीभ्यो ढक्' (४।१।१२०) या पूर्वसूत्रानेंच होत आहे. येथें फक्त त्याच्या अनुवादादाखल अनुवृत्ति करावयाची आहे.

तर मग 'वाकिनादीनां कुक् च' (४।१।१५८) याच्या पुढील 'पुत्रान्तादन्यतरस्याम्' (४।१।१५९) या सूत्रानें कुगागमाचा विकल्प होणार नाहीं. येथेंही विधेय असल्यामुळें कुगागमच प्रधान आहे. फिञ् प्रत्यय 'उदीचां वृद्धादगोत्रात्' (४।१।१५७) यानेंच होत आहे. येथें फक्त अनुवादादाखल त्याची अनुवृत्ति होत आहे.

अशा रीतीनें मागून चालू असलेल्या प्रत्ययाचें आश्रयण केलें नाहीं असेंही होत नाहीं, व उपाधीला उपाधि किंवा विशेषणाला विशेषण लागू केलें असेंही होत नाहीं. दोषही कांहीं येत नाहीं. एकंदरींत उपदेश हा शब्द संज्ञा नसल्यामुळें तेथें घञ् प्रत्यय प्राप्त होऊं शकत नाहीं.

असें आहे तर 'कृत्यल्युटो बहुलम्' (३।३।११३) येथील बहुलग्रहणाचे जोरावर उपदेश शब्दामध्यें घञ् प्रत्यय करण्यांत येईल[६].

(सू.३, वा.१) अन्त्य म्ह. शेवटच्या हलाला म्ह. व्यंजनाला इत्संज्ञा सांगितली असतां सर्वच हलांना इत्संज्ञा होऊं लागेल.

काय कारण ?

व्यंजन म्हणून जितकें आहे तें सर्व कोणत्या तरी समुदायाचें अन्त्य होत आहे म्हणून.

(वा.२) इष्ट असलेल्या व्यंजनालाच इत्संज्ञा होणें हें साधत आहे.

तें कसें ?

व्यवसितांचा अन्त्य म्ह. शेवटचा जो हल् तो इत्संज्ञक होतो असें म्हटलें असतां हें साधत आहे.

व्यवसित म्हणजे कोण ?

धातु, प्रातिपदिक, प्रत्यय, निपात, आगम आणि आदेश या नांवांचे शब्द ते व्यवसित होत.

अशा रीतीनें इष्ट साधत आहे पण मूळ सूत्रांत बदल होत आहे ना ?

---

६. 'कृत्यल्युटो बहुलम्' येथें 'बहुलम्' असा योगविभाग करावा. त्याचा अर्थ सर्वच कृत्प्रत्यय क्वचित् विपर्यासानेंही होतात असा होतो. त्यामुळें उपदेश शब्द संज्ञा नसतांही तेथें घञ् प्रत्यय होण्यास अडचण नाहीं.

१. धातु, प्रातिपदिक वगैरे उपदेशामध्यें शेवटीं असलेलें व्यंजन इत्संज्ञक होतें; उदा०— शीङ् वगैरे धातूमधील शेवटचा ङकार.

समेवास्तु। ननु चोक्तं हलन्त्ये सर्वप्रसङ्गः सर्वान्त्यत्वादिति। नैष दोषः। आहायं हलन्त्यमित्संज्ञं भवतीति सर्वश्च हल् तं तमवधिं प्रत्यन्त्यो भवति तत्र प्रकर्षगतिर्विज्ञास्यते। साधीयो योऽन्त्य इति। कश्च साधीयः। यो व्यवसितान्त्यः॥ अथवा सापेक्षोऽयं निर्देशः क्रियते न चान्यत्किंचिदपेक्ष्यमस्ति तेन व्यवसितमेवापेक्षिष्यामहे॥

**लकारस्यानुबन्धाज्ञापितत्वाद्धल्ग्रहणाप्रसिद्धिः॥ ३॥**

लकारस्यानुबन्धत्वेनाज्ञापितत्वाद्धल्ग्रहणस्याप्रसिद्धिः। हलन्त्यमित्संज्ञं भवतीत्युच्यते लकारस्यैव तावदित्संज्ञा न प्राप्नोति॥

**सिद्धं तु लकारनिर्देशात्॥ ४॥**

सिद्धमेतत्। कथम्। लकारनिर्देशः कर्तव्यः। हलन्त्यमित्संज्ञं भवति लकारश्चेति वक्तव्यम्॥

**एकशेषनिर्देशाद्वा॥ ५॥**

अथवैकशेषनिर्देशोऽयम्। हल् च हल् च हल्। हलन्त्यमित्संज्ञं भवतीति॥

---

तर मग मूळचें आहे तसेंच सूत्र असो.

पण अन्त्य हलाला इत्संज्ञा होते असें म्हटलें तर सर्वच हल् कोणत्या तरी समुदायाचा अन्त्य होत असल्यामुळें सर्वच हलांना इत्संज्ञा होऊं लागेल असा दोष दाखविला आहे ना?

हा दोष येत नाहीं. कारण अन्त्य हल् इत्संज्ञक होतो असें हा आचार्य सांगत आहे. आणि सर्वच हल् कोणत्या तरी समुदायाचा अन्त्य होत आहेच. तेव्हां अन्त्य शब्द घालण्यांत अर्थ नसल्यामुळें त्या अन्त्य शब्दार्थाविषयीं प्रकर्ष म्हणजे कांहीं विशेष समजला पाहिजे. तो असा की चांगला जो अन्त्य तो येथें अन्त्य शब्दानें घेतला आहे.

चांगला अन्त्य तो कोणता?

व्यवसितांच्या शेवटीं जो असतो तो चांगला अन्त्य होय.

अथवा सापेक्ष अशा अर्थाचा अन्त्य शब्द येथें उच्चारला आहे.

पण 'अमुकाचा अन्त्य' असें त्यानें अपेक्षिलेलें दुसरें कांहींच येथें दाखविलें नाहीं. तेव्हां व्यवसिताचाच अन्त्य असें आम्ही गृहीत धरूं.

(वा.३) हल् या माहेश्वरसूत्रांतील लकाराला दुसऱ्या कोणत्याही सूत्रानें इत्संज्ञा सांगितली नसल्यामुळें ह्या प्रकृत सूत्रांतील हल् शब्दाचा अर्थच कळत नाहीं.[२] आणि येथें तर अन्त्य हल् इत्संज्ञक होतें असें सांगितलें जात आहे. तेव्हां हल् या शब्दानें कोणते वर्ण घ्यावेत ते समजत नसल्यामुळें या सूत्राचा अर्थच होऊं शकत नाहीं.

(वा. ४) प्रथमतः लकाराला इत्संज्ञा झाली पाहिजे ती साधत आहे.

ती कशी?

शेवटीं असलेलें हल् आणि लकार हे इत्संज्ञक होतात असें म्हणावें. म्हणजे 'हलन्त्यम्' असा सूत्रामध्यें लकार जास्त घालावा.

(वा. ५) किंवा सूत्रांतील 'हल्' हा शब्द एकशेष करून उच्चारला आहे. तो असा. हल् च हल् च हल्. शेवटीं असलेलें हल् इत्संज्ञक होतें.[३]

---

२ कारण लकाराला इत्संज्ञा झाल्याशिवाय हल् या शब्दाचा अर्थ कळवून देणारें सूत्र(१।१।७१)च प्रवृत्त होत नाहीं.

३. यांपैकीं एक हल् शब्द हकाराच्या जवळचा लकार या अर्थाचा आहे. अर्थात् ह्रस्व ल् असा तेथें समास सोडवावा. दुसरा हल् शब्द हकारापासून लकारापर्यंतचे वर्ण अशा अर्थाचा प्रत्याहार आहे. तेव्हां 'नपुंसकमनपुंसकेन०'(१।२।६९) यानें एकशेष केल्यानें हलन्त्यम् हा निर्देश बरोबर जुळून येतो.

अथवा लृकारस्यैवेदं गुणभूतस्य ग्रहणं तत्रोपदेशेऽजनुनासिक इत् [१.३.२] इतीत्संज्ञा भविष्यति ॥ अथवाचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति भवति लकारस्येत्संज्ञेति यदयं णलं लितं करोति ॥

**प्रातिपदिकप्रतिषेधोऽकृत्तद्धिते ॥६॥**

अकृत्तद्धितान्तस्य प्रातिपदिकस्य प्रतिषेधो वक्तव्यः। उदश्वित् शकृदिति। अकृत्तद्धितान्तस्येति किमर्थम्। कुम्भकारः नगरकारः। औपगवः कापटव इति ॥

**इदर्थाभावात्सिद्धम् ॥ ७ ॥**

इत्कार्याभावादत्रेत्संज्ञा न भविष्यति ॥ इदमस्तीत्कार्यं तित्स्वरितम् [६.१.१८५] इति स्वरितत्वं यथा स्यात्। नैतदस्ति। प्रत्ययग्रहणं तत्र चोदयिष्यति ॥ इदं तर्हि। राजा तक्षा। ञ्नित्यादिर्नित्यमित्याद्युदात्तत्वं यथा स्यात्। ञ्नितीत्युच्यते तत्र व्यपवर्गाभावान्न भविष्यति ॥ इदं तर्हि। स्वर्।

---

अथवा हल् या माहेश्वरसूत्रामध्यें आणि 'हलन्त्यम्' या प्रकृत सूत्रामध्यें हकाराच्या पुढें जो लकार दिसत आहे तो मूळचा स्वरांतील लृकार असून त्याच्या मागील अकाराबरोबर गुणरूप (६।१।८७) एकादेश केला आहे. तो गुण लपर (१।१।५१) अल् असा केला आहे. त्यामुळें हल् असा आकार बनला आहे. अर्थात् मूळचा लृकार असल्यानें त्याला 'उपदेशेऽजनुना०' (१।३।२) यानें इत्संज्ञा होईल.

किंवा ज्यापेक्षां णल् आदेशामध्यें इत्संज्ञक असा लकार जोडला जात आहे त्यापेक्षां लकार व्यंजनाला इत्संज्ञा होते असें आचार्यांचा व्यवहार सुचवीत आहे.[४]

(वा.६) कृत् प्रत्यय शेवटीं असलेले किंवा तद्धित प्रत्यय शेवटीं असलेले शब्द वगळून प्रातिपदिकांतील शेवटींच्या व्यंजनाला इत्संज्ञेचा निषेध व्हावा ह्याकरितां वचन करावें; जसें— उदश्वित्, शकृत् वगैरे. येथें कृदन्त आणि तद्धितान्त शब्द वगळून असें म्हटलें तें कशासाठीं ?[५] कुम्भकारः, नगरकारः; औपगवः कापटवः.

(वा. ७) उदश्वित् वगैरे ठिकाणीं इत्संज्ञाप्रयुक्त कांहीं कार्य नसल्यामुळें तकाराला इत्संज्ञा होणार नाहीं.

पण 'तित्स्वरितम्'(६।१।१८५) यानें स्वरित स्वर होणें हें इत्संज्ञेचें कार्य आहे ना!

हा इत्संज्ञेचा उपयोग येथें होऊं शकत नाहीं. कारण 'तकारेत्संज्ञक प्रत्ययाला स्वरित स्वर होतो' असें तेथें (६।१।१८५, वा.१) वार्तिककार सांगणार आहेत.

तर मग राजा तक्षा या ठिकाणीं प्रातिपदिकाच्या शेवटच्या नकाराला इत्संज्ञा झाली तर 'ञ्नित्यादिर्नित्यम्' (६।१।१९७) यानें आद्युदात्त स्वर होईल तो न होण्याकरितां निषेध केला पाहिजे.

तेथें ञ्निति असें म्हटलें आहे, म्हणजे ञकारेत्संज्ञक किंवा नकारेत्संज्ञक पुढें असतां तो स्वर सांगितला आहे. येथें नकारेत्संज्ञक पुढें नसल्यामुळें आद्युदात्त स्वर होणार नाहीं.

तर स्वर् या अव्ययांतील रेफाला इत्संज्ञा झाली असतां 'उपोत्तमं रिति' (६।१।२१७)

---

४. णल् यामध्यें लकार जोडण्याचें फळ 'लिति' (६।१।१९३) या सूत्रानें उदात्त होणें हें होय. पण जर लकाराला इत्संज्ञाच होऊं शकत नाहीं तर णलामध्यें लकार जोडणें विफल होतें. यावरून लकाराला इत्संज्ञा होते असें अनुमान निघत आहे.

५. कुम्भकारः वगैरे ठिकाणीं अण् हा कृत् प्रत्यय (३।२।१) आणि तद्धितप्रत्यय (४।१।९२) झाला आहे. त्या प्रत्ययासहित समुदायाला 'कृत्तद्धित०' (१।२।४६) यानें प्रातिपदिक संज्ञा झाल्यामुळें अण् प्रत्ययांतील णकाराला इत्संज्ञानिषेध प्राप्त होतो, तो सोडविण्याकरितां 'अकृत्तद्धिते' असें येथें म्हटलें आहे.

उपोत्तमं रिति [६.१.२१७] इत्येष स्वरो यथा स्यात्। स्वरितकरणसामर्थ्यान्न भविष्यति। न्यङ्स्वरौ स्वरिताविति॥ इह तर्हि। अन्तर्। उत्तमशब्दस्त्रिप्रभृतिषु वर्तते न चात्र त्रिप्रभृतयः सन्ति॥ इह तर्हि सनुतर् उपोत्तमं रितीत्येष स्वरो यथा स्यात्॥ अन्तोदात्तनिपातनं करिष्यते स निपातनस्वरो रित्स्वरस्य बाधको भविष्यति॥ एतच्चात्र युक्तं यदित्कार्याभावादित्संज्ञा न स्यात्। यत्रेत्कार्यं भवति भवति तत्रेत्संज्ञा। तद्यथा। आगस्त्यकौण्डिन्ययोरगस्तिकुण्डिनच् [२.४.७०] इति॥

## न विभक्तौ तुस्माः॥ १।३।४॥

## विभक्तौ तवर्गप्रतिषेधोऽतद्धिते॥१॥

विभक्तौ तवर्गप्रतिषेधोऽतद्धित इति वक्तव्यम्। इह मा भूत्। किमोऽत् [५.३.१२]। क्व प्रेप्सन्दीप्यसे। क्वार्धमासा इति॥ स तर्हि प्रतिषेधो वक्तव्यः। न वक्तव्यः। आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति न विभक्तौ तद्धिते प्रतिषेधो भवतीति यदयमिदमस्थमुः [५.३.२४] इति मकारस्ये-

---

यानें स्वर होईल.

'न्यङ्स्वरौ स्वरितौ' (फिट्. ४।६) यानें स्वर् शब्दाला स्वरित स्वराचें विशेष विधान केलें आहे. त्यामुळें त्याला रित्स्वर (६।१।२१७) होणार नसल्यामुळें त्यांतील रेफाला इत्संज्ञाही होणार नाहीं.

तर मग अन्तर् या शब्दाला रित्स्वर होण्यासाठीं त्यांतील रेफाला इत्संज्ञा होईल.

उत्तम हा शब्द 'कमींत कमी तिघांमधील शेवटचा' अशा अर्थाचा आहे. आणि अन्तर् येथें तर दोनच अच् आहेत. अर्थात् रित्स्वर प्राप्त होऊं शकत नसल्यामुळें रेफाला इत्संज्ञा होणार नाहीं.

तर सनुतर् या शब्दाला रित्स्वर होण्यासाठीं त्यांतील रेफाला इत्संज्ञा होईल.

सनुतर् शब्दामध्यें अन्तोदात्त स्वराचें निपातन केलें आहे.[६] तो अन्तोदात्त स्वर रित्स्वराचा बाधक होईल. तेव्हां सनुतर् शब्दामधील रेफाला इत्संज्ञेचें कार्य नसल्यामुळें इत्संज्ञा होत नाहीं. आणि उपयोग होत नसल्यामुळें इत्संज्ञा होत नाहीं असेंच म्हणणें येथें योग्य आहे.[७] जेथें इत्संज्ञा केली असतां तिच्यामुळें कांहीं उपयोग होण्यासारखा असेल तेथें इत्संज्ञा होणारच; जसें आगस्त्यकौण्डिन्ययोरगस्तिकुण्डिनच्' (२।४।७०) या सूत्रानें प्रकृतिभूत कुण्डिन या प्रातिपदिकाला कुण्डिनच् असा आदेश सांगितला आहे. त्यांतील चकाराला इत्संज्ञा होते. कारण अन्तोदात्त स्वर (६।१।१६३) होणें हा त्याचा उपयोग आहे.

(सू.४,वा.१) तद्धितप्रत्यय वगळून इतर विभक्तिप्रत्ययांतील तवर्गाला इत्संज्ञा होत नाहीं[१] असें वचन करावें. कारण सप्तम्यन्त किम् शब्दाच्या पुढें 'किमोऽत्'(५।३।१२) या सूत्रानें केलेल्या अत् प्रत्ययांतील तकाराला इत्संज्ञेचा निषेध होऊं नये; जसें— क्व प्रेप्सन्, क्वार्धमासाः.

तर मग तसें सूत्र केलें पाहिजे.

तसें सूत्र करावयास नको. कारण ज्या अर्थी हा आचार्य 'इदमस्थमुः' (५।३।२४) या सूत्रानें सांगितलेल्या थमु प्रत्ययांतील मकाराला इत्संज्ञा होऊं नये म्हणून त्याचें अन्त्यत्व घालविण्याकरितां त्याच्यापुढें इत्संज्ञक उकार जोडतो त्या अर्थी तद्धितप्रत्ययांतील विभक्तीविषयीं 'न वि-

---

६. 'स्वरादि०'(१।१।३७)या सूत्रावरील स्वरादि गणामध्यें सनुतर् असा अन्तोदात्त पाठ आहे.

७. सरसकट कोणत्याही प्रातिपदिकांतील शेवटच्या वर्णाला इत्संज्ञा होत नाहीं असें म्हणणें योग्य नव्हे.

१. विभक्तिप्रत्ययांतील त, थ, द, ध, न, स आणि म या वर्णांना इत्संज्ञा होत नाहीं; उदा०–जस्, आत्, स्मिन्.

त्संज्ञापरित्राणार्थमुकारमनुबन्धं करोति ॥ यद्येतज्ज्ञाप्यत इदानीमित्यत्रापि प्राप्नोति । इत्कार्याभावादत्रेत्संज्ञा न भविष्यति ॥ इदमस्तीत्कार्यं मिदचोऽन्त्यात्परः [१.१.४७] इत्यचामन्त्यात्परो यथा स्यात् । इशभावे कृते नास्ति विशेषो मिदचोऽन्त्यात्पर इति वा परत्वे प्रत्ययः पर इति वा । स एव तावदिशभावो न प्राप्नोति । किं कारणम् । प्राग्दिशः प्रत्ययेष्वित्युच्यते । कः पुनरर्हतीशभावं प्राग्दिशः प्रत्ययेषु वक्तुम् । किं तर्हि । प्राग्दिशोऽर्थेष्विशभावः किंसर्वनामबहुभ्योऽद्व्यादिभ्यः प्रत्ययोत्पत्तिः ॥ एवं तर्हि तदोऽप्ययं वक्तव्यः । तदश्च मिदचोऽन्त्यात्परत्वेन न सिध्यति । ननु चात्राप्यत्वे कृते नास्ति विशेषो मिदचोऽन्त्यात्पर इति वा परत्वे प्रत्ययः पर इति वा । तदध्यत्वं न प्राप्नोति । किं कारणम् । विभक्तावित्युच्यते ॥ एवं तर्हि यकारान्तो दानीं करिष्यते । किं यकारो न श्रूयते ।

---

भक्तौ' हा प्रतिषेध प्रवृत्त होत नाहीं असें तो सुचवितो.

जर असें असेल तर इदानीम् येथील दानीम् (५।३।१८) प्रत्ययाच्या मकाराला इत्संज्ञानिषेध होणार नाहीं.

मकाराला इत्संज्ञा केली असतां तिचा इदानीम् येथें कांहीं उपयोग संभवत नसल्यामुळें इत्संज्ञा होणार नाहीं.

मकाराला इत्संज्ञा केली असतां तिचा उपयोग असा आहे की 'मिदचोऽन्त्यात्' (१।१।४७) या परिभाषेनें स्वरांपैकीं शेवटच्या स्वरापुढें दानीम् प्रत्यय व्हावा.

दानीम् प्रत्ययाच्या प्रकृतिभूत इदम् शब्दाला 'इदम इश्' (५।३।३) यानें इश् आदेश केला असतां दानीम् प्रत्यय मित् म्हणून अचांपैकीं शेवटच्या अचाच्या पुढें केला काय किंवा साधा प्रत्यय म्हणून इदम् शब्दाच्या पुढें केला काय यांत कांहीं फरक होत नाहीं.

फरक आहे तो असाः— दानीम् प्रत्यय मकारेत्संज्ञक म्हणून इदम् शब्दांतील शेवटच्या स्वरापुढें केला असतां तो इशादेशच मुळीं येऊं शकत नाहीं.

इशादेश येऊं शकत नाहीं याचें काय कारण ?

'प्राग्दिशः' (५।३।१) या अधिकारांतील प्रत्यय पुढें असतां इश् आदेशाचें विधान केलें आहे म्हणून.

'प्राग्दिशः' या अधिकारांतील प्रत्यय पुढें असतां इशादेश होतो असें कोण म्हणतो ?

तर मग काय म्हणतां ?

प्राग्दिशः या अधिकारामध्यें निर्दिष्ट असा अर्थ विवक्षित असतां इदम् शब्दाला इश् आदेश होतो, व किम्, बहु, आणि द्वि शब्दांपुढील शब्द वगळून सर्वनामसंज्ञक शब्दांच्या पुढें प्रत्यय उत्पन्न होतो असें म्हणतों.

तर मग दानीम् हा प्रत्यय तद् शब्दाच्या पुढें होतो असें वचन करावें. कारण दानीम् प्रत्यय हा मकारेत्संज्ञक म्हणून अन्त्य स्वराच्या पुढें केला असतां इष्ट साधत नाहीं.

पण तदानीं येथेंही तद् शब्दाला अत्व (७।२।१०२) केलें असतां दानीम् प्रत्यय मकारेत्संज्ञक म्हणून शेवटील स्वराच्या पुढें केला काय किंवा साधा प्रत्यय म्हणून तद् शब्दाच्या पुढें केला काय यांत कांहीं फरक नाहीं.

पण जें अत्व केलें असतां फरक होत नाहीं तें अत्वच मुळीं प्रत्यय करण्याच्या पूर्वी येऊं शकत नाहीं.

काय कारण ?

विभक्ति पुढें असतां अत्वाचें विधान केलें आहे म्हणून.

लुप्तनिर्दिष्टो यकारः ॥

[ आदिर्ञिटुडवः ॥१।३।५॥ ]

[ षः प्रत्ययस्य ॥१।३।६॥ ]

चुटू ॥१।३।७॥

चुञ्चुप्चणपोश्चकारप्रतिषेधः ॥१॥

चुञ्चुप्चणपोश्चकारस्य प्रतिषेधो वक्तव्यः। केशचुञ्चुः केशचणः ॥

इदर्थाभावात्सिद्धम् ॥२॥

इत्कार्याभावादत्रेत्संज्ञा न भविष्यति॥ इदमस्तीत्कार्यं चितोऽन्त उदात्तो भवतीत्यन्तोदात्तत्वं यथा स्यात्। पित्करणमिदानीं किमर्थं स्यात्।

पित्करणं किमर्थमिति चेत्पर्यायार्थम् ॥३॥

पित्करणं किमर्थमिति चेत्पर्यायार्थमेतत्स्यात्॥ एवं तर्हि यकारादी चुञ्चुप्चणपौ। किं यकारो न श्रूयते। लुप्तनिर्दिष्टो यकारः ॥

इर उपसंख्यानम् ॥४॥

इर उपसंख्यानं कर्तव्यम्। रुधिर्। अरुधत् अरौत्सीत्॥ अवयवग्रहणात्सिद्धम्। रेफस्यात्र हलन्त्यम् [१.३.३] इतीत्संज्ञा

---

असें आहे तर मग मकाराच्या पुढें शेवटीं यकार जोडून म्ह. दानीमृय् असा प्रत्यय करण्यांत येईल. अर्थात् मकार हा उपदेशांतील शेवटचा नसल्यामुळें त्याला इत्संज्ञा येऊंच शकत नाहीं.

दानीम् प्रत्ययाच्या शेवटीं यकार जोडला आहे तर त्याचें सूत्रामध्यें (७।३।१८) श्रवण कां बरें होत नाहीं ?

'दानीमृय् च' अशा स्थितींत त्या यकाराचा लोप[२] झाला असल्यामुळें त्याचें श्रवण होत नाहीं.

(सू.७, वा.१) चुञ्चुप् आणि चणप् (५।२।२६) या प्रत्ययांतील आरंभींच्या चकाराला इत्संज्ञेच्या निषेधाकरितां वचन करावें; जसें— केशचुञ्चुः केशचणः.

(वा.२) सदर प्रत्ययांच्या चकाराला इत्संज्ञा केली असतां तिचा कांहीं उपयोग होत नसल्यामुळें येथें इत्संज्ञा होणार नाहीं.

पण 'चितः' (६।१।१६३) या सूत्रानें अन्तोदात्त स्वर होणें हा पूर्वोक्त प्रत्ययांच्या चकाराला इत्संज्ञा करण्याचा उपयोग होत आहे.

तर मग आतां वरील प्रत्ययांना जो शेवटीं इत्संज्ञक पकार जोडला आहे त्याचा काय उपयोग होईल ?

(वा.३) इत्संज्ञक पकार जोडल्याचा काय उपयोग' असें म्हणणें असेल तर पाळीनें एकदां 'सुप्पितौ' (३।१।४) हाही अनुदात्त स्वर प्रवृत्त व्हावा हा इत्संज्ञक पकार जोडण्याचा उपयोग होईल.

तर मग आतां चुञ्चुप् आणि चणप् या प्रत्ययांच्या आरंभीं यकार जोडला आहे असें समजावें.

सूत्रामध्यें तो यकार ऐकूं कां बरें येत नाहीं ?

त्या जोडलेल्या यकाराचा 'लोपो व्योः' (६।१।६६) यानें लोप झाला आहे.

(वा.४) धातूंतील 'इर्' या वर्णसमुदायाला इत्संज्ञा होते असें म्हणावें; जसें— 'रुधिर् आवरणे' या धातूंतील इर् एवढ्याला इत्संज्ञा झाल्यामुळें अरुधत् अरौत्सीत् येथें 'इरितो वा' (३।१।५७) या सूत्रानें च्लि प्रत्ययाच्या स्थानीं

---

२. चकार हा वल् पुढें असल्यामुळें 'लोपो व्योर्वलि' (६।१।६६) या सूत्रानें यकाराचा लोप झाला आहे.

१. उपदेशामध्यें धातूच्या आरंभीं असलेल्या ञि टु डु यांना इत्संज्ञा होते; उदा०— ञिमिदा स्नेहने, टुवेपृ कम्पने, डुपचष् पाके.

१. प्रत्ययाच्या आरंभीं असलेल्या षकाराला इत्संज्ञा होते; उदा०— प्राचां ष्फ तद्धितः (४।१।१७).

१. प्रत्ययाच्या आरंभीं असलेल्या चवर्ग आणि टवर्ग या वर्णांना इत्संज्ञा होते; उदा०— चाप्, जस्, टक्, ङा.

भविष्यतीकारस्योपदेशेऽजनुनासिकः [१.३.२] इति ।

**अवयवग्रहणादिति चेदिदिद्विधिप्रसङ्गः ॥५॥**

अवयवग्रहणादिति चेदिदिद्विधिरपि प्राप्नोति । भेत्ता छेत्ता । इदितो नुम्धातोः [७.१.५८] इति नुम्प्राप्नोति ॥ यदि पुनरयमिदिद्विधिः कुम्भीधान्यन्यायेन विज्ञायते । तद्यथा । कुम्भीधान्यः श्रोत्रिय इत्युच्यते । यस्य कुम्भ्यामेव धान्यं स कुम्भीधान्यः । यस्य पुनः कुम्भ्यां चान्यत्र च नासौ कुम्भीधान्यः । नायमिदिद्विधिः कुम्भीधान्यन्यायेन शक्यो विज्ञातुम् । इह हि दोषः स्यात् । टुनदि । नन्दथुरिति ॥ एवं तर्हि नैवं विज्ञायत इकार इदस्य सोऽयमिदित् तस्येदित इति । कथं तर्हि । इकार एवेत् इदित् इदिदन्तस्येति ॥ अथवा ऋकारस्यैवेदमित्वंभूतस्य ग्रहणम् । तत्रोपदेशेऽजनुनासिक इतीत्संज्ञा भविष्यति ॥ अथवाचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति नैवंजातीयका-

---

अङ् आदेश विकल्पानें झाला आहे.

इर् या समुदायांतील रेफाला 'हलन्त्यम्' यानें इत्संज्ञा होईल, आणि इकाराला 'उपदेशेऽजनु०' यानें इत्संज्ञा होईल. तेव्हां त्याकरितां मुद्दाम वचन करावयास नको. इकार आणि रेफ असे उभयतां ज्याचे इत्संज्ञक आहेत तो इरित् असा इरितो वा या सूत्रांतील इरित् शब्दाचा अर्थ समजावा.

(वा.५) इकार आणि रेफ असे उभयतां पार्थक्यानें इत्संज्ञक झाले तर इकारेत्संज्ञकावर अवलंबून असलेला विधि प्रसक्त होत आहे. म्हणजे भेत्ता, छेत्ता येथें 'इदितो नुम् धातोः' (७।१।५८) यानें नुमागम होऊं लागेल.

आतां जर हा इकारेत्संज्ञकावर अवलंबून असलेला विधि कुम्भीधान्यन्यायानें म्हणजे जेथें एकटा इकारच इत्संज्ञक असेल तेथेंच होतो असें समजलें तर वरील दोष येत नाहीं. तें असें– कुम्भीधान्यः श्रोत्रियः असें म्हटलें असतां ज्याचें धान्य एकट्या घागरीमध्येंच आहे त्याला कुम्भीधान्य हें नांव लागू होतें आणि ज्याचें धान्य घागरींत असून अन्यत्रही सांठविलें आहे त्याला कुम्भीधान्य हें नांव लागू होत नाहीं. त्याप्रमाणें भिद्, छिद् धातूंना इकाराशिवाय दुसरा रेफ इत्संज्ञक असल्यामुळें त्यांना इदित् म्हणतां येत नाहीं. तेव्हां अर्थात् त्या धातूंना नुमागम होत नाहीं.

कुम्भीधान्यन्यायाला अनुसरून हा इदित् धातूला सांगितलेला नुमागमविधि प्रवृत्त होतो असें म्हणणें शक्य नाहीं. कारण 'टुनदि समृद्धौ' या धातूचें नन्दथुः असें रूप होतें तेथें नुमागम होणार नाहीं.

असें आहे तर मग इदित् हा समास 'इत् इत् यस्य' असा बहुव्रीहि करीत नाहीं. म्हणजे ज्याचा ऱ्हस्व इकार इत्संज्ञक आहे त्या धातूला नुम् होतो असा अर्थ आम्ही करीत नाहीं.

तर कसा करतां ?

इकार एव इत् इदित् असा कर्मधारय समास करतों. आणि तें धातूचें विशेषण करतों. तेव्हां तदन्तविधि झाल्यामुळें इत्संज्ञक ऱ्हस्व इकार ज्या धातूच्या शेवटीं आहे त्या धातूला नुमागम होतों असा 'इदितो नुम्' याचा अर्थ आम्ही समजतों.

किंवा मूळ भिदृ, छिदृ असे ऋकारान्त धातु असून त्या ऋकाराला रपर (१।१।५१) असा इकार (७।१।१००) आदेश करून भिदिर्, छिदिर् असा धातुपाठामध्यें निर्देश केला आहे तेथें त्या ऋकाराला 'उपदेशेऽजनु०' यानें इत्संज्ञा होईल. 'इरितो वा' (३।१।५७) येथील इरित् हा समास 'ऋ इत् यस्य' असा सोडवावा त्या ऋकाराला पूर्वीप्रमाणेंच रपर असा इकार आदेश करून इरित् असें सूत्रकारांनीं उच्चारिलें आहे. तेव्हां इरित् याचा ऱ्हस्व ऋकारे-

नामिदिद्विधिर्भवतीति यदयमिरितः कांश्चिन्नुमनुषक्तान्पठति। उबुन्दिर् निशामने। स्कन्दिर् गतिशोषणयोः॥ अथवाचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयतीर्शब्दस्येत्संज्ञा भवतीति यदयमिरितो वा [३.१.५७] इत्याह॥ अथवान्त इति वर्तते॥

[ लशक्वतद्धिते ॥१।३।८ ]

तस्य लोपः ॥१।३।९॥

तस्यग्रहणं किमर्थम्। इत्संज्ञकः प्रतिनिर्दिश्यते। नैतदस्ति प्रयोजनम्। प्रकृतमिदिति वर्तते। क्व प्रकृतम्। उपदेशेऽजनुनासिक इत् [१.३.२] इति। तद्वै प्रथमानिर्दिष्टं षष्ठीनिर्दिष्टेन चेहार्थः। अर्थाद्विभक्तिविपरिणामो भविष्यति। तद्यथा। उच्चानि देवदत्तस्य गृहाणि। आमन्त्रयस्वैनम्। देवदत्तमिति गम्यते। देवदत्तस्य गावोऽश्वा हिरण्यं च। आढ्यो वैधवेयः। देवदत्त इति गम्यते। पुरस्ता-

---

त्संज्ञक असा अर्थ होतो.

अथवा ज्यापेक्षां हा आचार्य ज्यांतील इर् या वर्णांना इत्संज्ञा आहे असे 'उबुन्दिर्, स्कन्दिर्' वगैरे धातु नकारघटित असे पठन करीत आहे त्यापेक्षां इकार व रेफ ज्यांतील इत्संज्ञक आहेत अशा प्रकारच्या धातूंना इदित् या नांवावर अवलंबून असलेला विधि (नुम्) होत नाहीं असें सुचवीत आहे.

किंवा ज्या धातूंतील इर् हा शब्द इत्संज्ञक आहे अशा धातूंच्या पुढील च्लि प्रत्ययाला अङ् आदेशाचें विधान करतो (३।१।५७) त्यापेक्षां 'इर्' या शब्दाला इत्संज्ञा होते असें आचार्य सुचवीत आहे.

अथवा 'गोः पादान्ते' (७।१।५७) या सूत्रांतून 'अन्ते' या पदाची अनुवृत्ति 'इदितो नुम्' (७।१।५८) या सूत्रामध्यें येत आहे. तेव्हां ज्या धातूंतील शेवटीं असलेला इकार इत्संज्ञक आहे त्या धातूला नुमागम होतो असा अर्थ झाल्यामुळे उपान्त्य इकार इत्संज्ञक असलेल्या धातूला नुम् होणार नाहीं. एकंदरींत 'इर उपसंख्यानम्' हें वचन करावयास नको.

(सू.९) येथें 'तस्य' हा शब्द कशाकरितां घातला आहे?

लोप कोणाचा सांगितला आहे तें कळविण्यासाठीं येथें तस्य हा शब्द घातला आहे. त्या तच्छब्दानें मागील इत्संज्ञकाचा परामर्श होतो.

यासाठीं तच्छब्द घालण्याची गरज नाहीं. कारण पूर्वसूत्रामध्यें घातलेला इत् शब्द येथें अनुवृत्त होत आहे.

कोणत्या पूर्वसूत्रामध्यें इत् शब्द घातला आहे?

'उपदेशेऽजनुनासिक इत्' या सूत्रामध्यें.

पण तेथें प्रथमा विभक्ति लावून इत् असा शब्द उच्चारला आहे. आणि येथें तर षष्ठी लावून उच्चारिलेल्या इतः अशा शब्दाचा उपयोग आहे.

उपयोगाला अनुसरून इत्-शब्दापुढील विभक्ति पालटण्यांत येईल; जसें– उच्चानि देवदत्तस्य गृहाणि आमन्त्रयस्वैनम्, म्ह. 'देवदत्ताचीं उंच घरें आहेत; याला हाक मार', असें वाक्य उच्चारिलें असतां तेथें पूर्ववाक्यामध्यें देवदत्ताचीं असें जरी म्हटलें आहे तरी पुढील वाक्यामधील अर्थाच्या धोरणानें देवदत्ताला अशा स्वरूपानें त्याचा संबंध मनांत येतो; म्हणजे षष्ठी काढून तिच्या जागीं द्वितीया आणिली जाते. किंवा देवदत्तस्य गावोऽश्वा हिरण्यं च, आढ्यो वैधवेयः म्हणजे

---

१. तद्धितप्रत्यय वगळून प्रत्ययाच्या आरंभीं असलेले ल, श आणि कवर्गांतील वर्ण हे इत्संज्ञक होतात; उदा०– ल्युट्, शस्, क्त, खश्.

१. इत्संज्ञा झालेल्या वर्णाचा लोप होतो; उदा०– गमनम्, भूभृतः, येथें ल्युट् प्रत्ययांतील लकाराचा व शस् प्रत्ययांतील शकाराचा लोप झाला आहे.

२. आढ्यो वैधेयः असा येथें पाठभेद आहे. वैधेय म्हणजे मूर्ख.

त्षष्ठीनिर्दिष्टं सदर्थाद्द्वितीयानिर्दिष्टं प्रथमानिर्दिष्टं च भवति । एवमिहापि पुरस्तात्प्रथमानिर्दिष्टं सदर्थात्षष्ठीनिर्दिष्टं भविष्यति ॥ इदं तर्हि प्रयोजनम् । येऽनेकाल इत्संज्ञास्तेषां लोपः सर्वादेशो यथा स्यात् । अथ क्रियमाणेऽपि च तस्यग्रहणे कथमिव लोपः सर्वादेशो लभ्यः । लभ्य इत्याह । कुतः । वचनप्रामाण्यात् । तस्यग्रहणसामर्थ्यात् ॥

**इतो लोपे णल्क्त्वानिष्ठासूपसंख्यानमित्प्रतिषेधात् ॥ १ ॥**

इतो लोपे णल्क्त्वानिष्ठासूपसंख्यानं कर्तव्यम् । णल् । अहं पपच । क्त्वा । देवित्वा सेवित्वा । निष्ठा । शयितः शयितवान् । किं पुनः कारणं न सिध्यति । इत्प्रतिषेधात् । प्रतिषिध्यतेऽत्रेत्संज्ञा । णलुत्तमो णिद्वा भवति । क्त्वा सेण्न किद्भवति । निष्ठा सेण्न किद्भवतीति ॥

**सिद्धं तु णलादीनां ग्रहणप्रतिषेधात् ॥ २ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । णलादीनां ग्रहणानि प्रतिषिध्यन्ते । णलुत्तमो वा णिद्ग्रह-

---

'गाई, घोडे, सोनें हें सर्व देवदत्ताचें आहे, रांडलेक संपन्न आहे' असें म्हटलें असतां तेथें पूर्ववाक्यामध्यें 'देवदत्ताचें' असें जरी म्हटलें आहे तरी पुढील वाक्यामधील अर्थाच्या धोरणानें देवदत्त अशा स्वरूपानें त्याचा तेथें संबंध मनांत येतो. म्हणजे देवदत्त शब्दापुढील षष्ठी काढून तिच्या ऐवजीं प्रथमा आणिली जाते. त्याप्रमाणें येथेंही पूर्वसूत्रामध्यें प्रथमा लावून उच्चारलेला इत् हा शब्द प्रकृत सूत्रांत अनुवृत्त केला असतां येथील अर्थाला अनुसरून प्रथमाविभक्ति काढून तिच्या ऐवजीं षष्ठी होऊन त्याचा संबंध होईल.

तर मग तच्छब्द घालण्याचें हें प्रयोजन समजावें की ञि ढु डु असा जो इत् नांवाचा शब्द अनेक वर्णांनीं घटित आहे त्याचा सर्वांचा लोप व्हावा.

पण तस्य हा शब्द सूत्रामध्यें घातला तरी देखील सर्वांचा लोप होणें शक्य आहे काय?

होय. सर्वांचा लोप होणें शक्य आहे.

तें कसें ?

तस्य हा शब्द मुद्दाम घातल्याचे जोरावर.[३]

(वा.१) हा जो इत्संज्ञकाचा लोप सांगितला आहे तेथें णल्, क्त्वा आणि क्त क्तवत् या प्रत्ययांतील आरंभींच्या वर्णांचा लोप होण्याबद्दल त्यांचें ग्रहण करावें; जसें– णल्– अहं पपच, क्त्वा–देवित्वा सेवित्वा, क्त, क्तवत्– शयितः शयितवान्.

पण काय कारणानें बरें त्या वर्णांचा लोप होऊं शकत नाहीं ?

त्या ठिकाणीं त्या वर्णांना इत्संज्ञेचा प्रतिषेध केला जात आहे म्हणून; जसें– उत्तम पुरुषांतील णल् प्रत्यय विकल्पानें णकारेत्संज्ञक होतो (७।१।९१). अर्थात् एकदां त्या णकाराला इत्संज्ञा होणार नाहीं. इडागम झालेला क्त्वा प्रत्यय ककारेत्संज्ञक होत नाहीं (१।२।१८). तसेंच इडागम झालेला क्त किंवा क्तवत् प्रत्यय ककारेत्संज्ञक होत नाहीं (१।२।१९). अर्थात् तशा ठिकाणीं ककाराला इत्संज्ञा होणार नाहीं.

(वा.२) णल् वगैरेंतील णकार वगैरेंचा लोप साधत आहे.

तो कसा ?

उत्तमपुरुषांतील णल् प्रत्यय णित् या शब्दाखालीं विकल्पानें येतो; कित् या शब्दाखालीं सेट् क्त्वा प्रत्यय येत नाहीं. तसेंच कित् या शब्दाखालीं सेट् क्त व क्तवत् प्रत्यय

---

३. तस्य हा शब्द घालूनही जर 'अलोऽन्त्यस्य' (१।१।५२) या परिभाषेनें अन्त्य वर्णाचा लोप होईल तर तें काम तस्य या शब्दांवाचूनही भागत आहे. तेव्हां तस्य हा शब्द व्यर्थ होईल.

णेन गृह्यते। क्त्वा सेण्न किद्ग्रहणेन गृह्यते। निष्ठा सेण्न किद्ग्रहणेन गृह्यते इति॥

**निर्दिष्टलोपाद्वा॥ ३॥**

निर्दिष्टलोपाद्वा सिद्धमेतत्। अथवा निर्दिष्टस्यायं लोपः क्रियते तस्मात्सिद्धमेतत्॥

**तत्र तुस्मानां प्रतिषेधः॥ ४॥**

तत्र तुस्मानां प्रतिषेधो वक्तव्यः। तस्मात् तस्मिन्। यस्मात् यस्मिन्। वृक्षाः प्लक्षाः। अचिनवम् असुनवम् अकरवम्॥

**न वोच्चारणसामर्थ्यात्॥ ५॥**

न वा वक्तव्यः। किं कारणम्। उच्चारणसामर्थ्यादत्र लोपो न भविष्यति॥

**अनुबन्धलोपे भावाभावयोर्विप्रतिषेधादप्रसिद्धिः॥ ६॥**

अनुबन्धलोपे भावाभावयोर्विरोधादप्रसिद्धिः। न ज्ञायते केनाभिप्रायेण प्रसजति केन निवृत्तिं करोतीति॥

**सिद्धं त्वपवादन्यायेन॥ ७॥**

सिद्धमेतत्। कथम्। अपवादन्यायेन॥ किं पुनरिह तथा यथोत्सर्गापवादौ।

---

येत नाहींत. असा त्या त्या सूत्रांचा अर्थ करून णलादिकांचें णित् वगैरे शब्दांनीं ग्रहण करणें याचाच फक्त प्रतिषेध केला आहे म्हणून. अर्थात् णकारादिकांना इत्संज्ञा कायमच आहे.

(वा.३) किंवा इत्संज्ञेचे उद्देश्य म्हणून निर्दिष्ट केलेले जे अनुनासिक अच् वगैरे त्यांचा 'तस्य लोपः' यानें लोप सांगितला जात आहे. त्याला इत्संज्ञेची जरूर नाहीं. तेव्हां णलादिकांतील णकारादिकांना इत्संज्ञेचा प्रतिषेध केला तरी देखील त्यांचा लोप होईल.

(वा.४) इत्संज्ञेचे उद्देश्य म्हणून धरलेल्यांचा लोप सांगितला आहे असें गृहीत धरलें असतां तवर्ग, सकार आणि मकार यांचा लोप होत नाहीं, असें लोपाच्या निषेधाकरितां वचन करावें; जसें— तस्मात् तस्मिन्, यस्मात् यस्मिन्, वृक्षाः प्लक्षाः, अचिनवम् असुनवम् अकरवम्.

(वा.५) तवर्ग, सकार आणि मकार यांना हा लोपाचा प्रतिषेध सांगावयास नको.

काय कारण?

उच्चारण केल्याचे जोरावर त्यांचा लोप होणार नाहीं।[५]

(वा.६) इत्संज्ञकांच्या लोपाविषयीं भाव आणि अभाव यांचा विरोध असल्यामुळें प्रामाण्य सिद्ध होत नाहीं।[६] म्हणजे काय कारणानें अनुबन्ध जोडतो व काय कारणानें त्यांचा लोप करतो याचा थांग लागत नाहीं.

(वा.७) इत्संज्ञकाच्या लोपाचें प्रामाण्य साधत आहे.

तें कसें?

अपवादाला जसें प्रामाण्य आहे त्याप्रमाणें इत्संज्ञकांच्या लोपालाही प्रामाण्य आहे.

पण येथें तसें प्रामाण्यबीज काय आहे

---

४. दाखल केलेल्या उदाहरणांमधील तवर्ग सकार व मकार हे उपदेशामध्यें शेवटीं असल्यामुळें हलन्त्य सूत्रानें सांगितलेल्या इत्संज्ञेच्या उद्देश्याखालीं येतात. सबब त्यांचा लोप प्रसक्त होतो. इत्संज्ञा पावलेल्यांचा लोप असें पूर्वी गृहीत धरलें होतें त्या वेळीं 'न विभक्तौ' यानें इत्संज्ञेचा निषेध केला असल्यामुळें त्यांचा लोप होत नाहीं. आणि आतां मात्र लोप होऊं लागेल. सबब निषेध करणें जरूर आहे.

५. जर लोप होईल तर त्या तकारादिकांचा उपदेश विफल होईल.

६. इत्संज्ञकांचें सूत्रामध्यें उच्चारण केलें असल्यामुळें उदाहरणामध्यें त्यांचें अस्तित्व अनुज्ञात होतें. आणि त्यांच्या लोपाचें विधान केलें असल्यानें त्यांचें नास्तित्व अनुज्ञात होतें. तेव्हां अस्तित्व व नास्तित्व हे परस्परविरोधी असल्यामुळें त्यांपैकीं कोणालाच खरेपणा देतां येत नाहीं.

भावो हि कार्यार्थोऽनन्यार्थो लोपः॥८

कार्यं करिष्यामीत्यनुबन्ध आसज्यते कार्यादन्यन्मा भूदिति लोपः ॥

अथ यस्यानुबन्ध आसज्यते किं स तस्यैकान्तो भवत्याहोस्विदनेकान्तः ।

एकान्तस्तत्रोपलब्धेः ॥ ९ ॥

एकान्त इत्याह । कुतः । तत्रोपलब्धेः । तत्रस्थो ह्यसावुपलभ्यते । तद्यथा । वृक्षस्था शाखा वृक्षैकान्त उपलभ्यते ॥

तत्रासरूपसर्वादेशदाप्प्रतिषेधे पृथक्त्वनिर्देशोऽनाकारान्तत्वात् ॥१०॥

तत्रासरूपविधौ दोषो भवति । कर्मण्यण् [३.२.१] आतोऽनुपसर्गे कः [३] इति कविषयेऽणपि प्राप्नोति ॥ सर्वादेशे च दोषो भवति। दिव औत्सर्वादेशः प्राप्नोति॥ दाप्प्रतिषेधे पृथक्त्वनिर्देशः कर्तव्यः । अदाब्दैपाविति वक्तव्यम् । किं पुनः कारणं न सिध्यति। अनाकारान्तत्वात् । ननु चात्त्वे कृते भविष्यति । तद्धयात्त्वं न प्राप्नोति । किं कारणम् । अनेजन्तत्वात् ॥ अस्तु तर्ह्यनेकान्तः ।

---

जसें उत्सर्गापवादांच्या प्रामाण्याविषयीं आहे ?

(वा.८) कांहीं एक विशिष्ट कार्य व्हावें या उद्देशानें इत्संज्ञक जोडला जातो आणि कार्यांवांचून दुसरें 'अस्तित्व' म्हणजे उदाहरणामध्यें त्याचें अस्तित्व नसावें या उद्देशानें त्याचा लोप सांगितला जातो. तेव्हां दोन्ही गोष्टींचें प्रामाण्य सिद्ध होतें.

आतां हा अनुबंध ज्याला जोडला जातो त्याचा एक अवयव म्हणून जोडला जातो किंवा अनवयव म्हणून जोडला जातो ?

(वा.९) अनुबन्ध हा अवयव म्हणून जोडला जातो.

हें कशावरून ?

जसें वृक्षाची शाखा छेदनाचे पूर्वी त्या वृक्षाची अवयव अशीच दृष्टीस पडते तसें अनुबंध ज्याला जोडलेला असतो त्या ठिकाणीं तो लोप करण्याचे पूर्वी तसाच दिसतो.

(वा.१०) अनुबन्ध हा अवयवच आहे असें ठरविलें असतां असरूप अशा प्रत्ययविधीविषयीं दोष येतो, जसें— कर्मण्यण् (३।२।१) या अण् प्रत्ययाचा 'आतोऽनुपसर्गे कः' (३।२।३) यानें सांगितलेला क प्रत्यय हा अपवाद आहे. म्हणून क-प्रत्ययाच्या उदाहरणांमध्यें अण् प्रत्यय कधींही होत नसतो. परंतु अनुबन्ध हा अवयव म्हटला असतां क प्रत्यय हा अण् प्रत्ययापेक्षां असरूप असल्यामुळें 'वाऽसरूपोऽस्त्रियाम्' (३।१।९४) या परिभाषेला अनुसरून क प्रत्यय हा अण् प्रत्ययाचा विकल्पानें बाधक होईल. तेव्हां क-प्रत्ययाच्या विषयामध्येंही एकदा अण् प्रत्यय होऊं लागेल. तसेंच सर्वादेशाविषयींही दोष येतो; जसें—'दिव औत्'(७।१।८४) यानें सांगितलेल्या औ आदेशाचा तकार अनुबंध हा अवयव असल्यामुळें तो आदेश अनेकाल् समजला जाईल,आणि दिव् या सर्वाचे स्थानीं(१।१।५५) होऊं लागेल. तसेंच 'दाधा घ्वदाप्'(१।१।२०); येथें 'अदाब्दैपौ' असा दाप् आणि दैप् या उभयतांचा पार्थक्यानें निर्देश केला पाहिजे.

दाप् या पदानेंच त्या उभयतांचा संग्रह कां बरें साधत नाहीं ?

दैप् धातु आकारान्त नाहीं म्हणून.

दैप् धातूच्या ऐकाराला आत्व (६।१।४५) केलें असतां आकारान्त झाल्यामुळें दाप् या शब्दाखालीं दैपूही येऊं शकेल.

पण दैप् धातूच्या ऐकाराला तें आत्वप्राप्त होऊं शकत नाहीं ना ?

काय कारण ?

दैप् धातु हा एजन्त नाहीं म्हणून.

तर मग जोडलेला अनुबन्ध हा अनवयव असो.

**अनेकान्ते वृत्तिविशेषः ॥ ११ ॥**

यद्यनेकान्तो वृत्तिविशेषो न सिध्यति । किति णितीति कार्याणि न सिध्यन्ति । किं हि स तस्येद्भवति येनेत्कृतं स्यात् ॥ एवं तर्ह्यनन्तरः ।

**अनन्तर इति चेत्पूर्वपरयोरित्कृतप्रसङ्गः ॥ १२ ॥**

अनन्तर इति चेत्पूर्वपरयोरित्कृतं प्राप्नोति । वुञ्छण् ॥

**सिद्धं तु व्यवसितपाठात् ॥१३॥**

सिद्धमेतत् । कथम् । व्यवसितपाठः कर्तव्यः । वुञ् छण् ॥ स चावश्यं व्यवसितपाठः कर्तव्यः ।

**इतरथा ह्येकान्तेऽपि संदेहः॥१४॥**

अक्रियमाणे व्यवसितपाठ एकान्तेऽपि संदेहः स्यात् । तत्र न ज्ञायते किमयं पूर्वस्य भवत्याहोस्वित्परस्येति ॥ संदेहमात्रमेतद्भवति सर्वसंदेहेषु चेदमुपतिष्ठते व्याख्यानतो विशेषप्रतिपत्तिर्न हि संदेहादलक्षणमिति पूर्वस्येति व्याख्यास्यामः॥

**वृत्ताद्वा ॥ १५॥**

वृत्ताद्वा पुनः सिद्धमेतत् । वृद्धिमन्तमाद्युदात्तं दृष्ट्वा ञिदिति व्यवसेयम् । अन्तोदात्तं दृष्ट्वा किदिति ॥ युक्तं पुनर्यद्-

(वा.११) अनुबन्ध हे अवयव न मानले तर कित्, णित् इत्यादि स्थलीं बहुव्रीहि समास होऊं शकत नाहीं. त्यामुळें ज्याचा अवयव ककार इत्संज्ञक आहे अशावर अवलंबून असलेलीं कार्यें साधत नाहींत. इत्संज्ञक ककार हा त्याचा अवयव आहे काय की ज्यामुळें तो कित् आहे असें समजून त्यामुळें तीं करितां येतील ?

असें आहे तर तो अनुबंध जवळ असल्यामुळें ज्याच्याजवळ इत्संज्ञक ककार आहे अशा अर्थी कित् वगैरे बहुव्रीहि समास होईल.

(वा.१२) ज्याच्याजवळ अशा अर्थी कित्, णित् वगैरे बहुव्रीहि समास गृहीत धरला तर 'वुञ्छण्क०' (४।२।८०) येथें वु आणि छ या दोघांच्या मधील ञकार हा दोघांच्याही जवळ असल्यामुळें ते दोघेही ञित् आहेत असें समजून कार्यें होतील. तसेंच छ आणि क हे दोघे णित् आहेत असें समजून कार्यें होतील.

(वा.१३) ञित्, णित् असें एकालाच समजलें जाईल, व हें सिद्ध होईल.

तें कसें ?

वुञ्, छण्, क असा तुटक तुटक पाठ केला म्हणजे असुक इत्संज्ञक अमक्याचाच आहे असें सहजच ठरेल. आणि तो तुटक पाठ अवश्य केलाच पाहिजे.

(वा.१४) तसा तुटक पाठ केला नाहीं तर अनुबन्ध हे अवयव गृहीत धरले तरीही तो अनुबन्ध पूर्वाचा अवयव किंवा उत्तराचा अवयव असा संशय येणारच.

हा केवळ संशयाभास होय. कारण सर्व संशयित स्थलीं संशय दूर करणारें 'व्याख्यानतो विशेषप्रतिपत्तिर्न हि संदेहादलक्षणम्' हें वचन उपस्थित होतें.[७] तेव्हां 'वुञ् छण्' (४।२।८०) यांत ञ ण् हे जवळ असलेले अनुबन्ध पूर्वाचेच आहेत असें ठरवितां येईल.

(वा.१५) किंवा 'वुञ्छण्' (४।२।८०) या सूत्रानें वु प्रत्यय करून साधलेले 'आरीहणक' इत्यादि प्रयोग वृद्धि (७।२।११७) आणि आद्युदात्तस्वर (६।१।१९७) केलेले पाहून इत्संज्ञक ञकार हा पूर्वाच्याच म्हणजे वु प्रत्ययाच्याच जवळचा धरावा असें ठरवावें. तसेंच प्रयोगांतील अन्तोदात्त स्वर (६।१।१६५) पाहून इत्संज्ञक ककार अमुकाच्याच जवळचा आहे असें ठरवावें. पण हें म्हणणें योग्य आहे काय की प्रयोगांतीं विशेष कार्य

७. ह्या वचनाचा अर्थ मागें लण् या सूत्राच्या शेवटीं (पृ. ८९) पहा.

वृत्तनिमित्तको नामानुबन्धः स्यान्नानुबन्धनिमित्तकेन नाम वृत्तेन भवितव्यम् । वृत्तनिमित्तक एवानुबन्धः । वृत्तज्ञो ह्याचार्योऽनुबन्धानासजति ॥

उभयमिदमनुबन्धेषूक्तमेकान्ता अनेकान्ता इति । किमत्र न्याय्यम् । एकान्ता इत्येव न्याय्यम् । कुत एतत् । अत्र हि हेतुर्व्यपदिष्टो यच्च नाम सहेतुकं तन्न्याय्यम् । ननु चोक्तं तत्रासरूपसर्वादेशदाप्प्रतिषेधे पृथक्त्वनिर्देशोऽनाकारान्तत्वादिति । असरूपविधौ तावन्न दोषः । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति नानुबन्धकृतमसारूप्यं भवतीति यदयं ददातिदधात्योर्विभाषा [३.१.१३९] इति विभाषा शं शास्ति ॥ यदप्युक्तं सर्वादेश इति । अत्राप्याचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति नानुबन्धकृतमनेकाल्त्वं भवतीति यदयं शित्सर्वस्य [१.१.५५] इत्याह ॥ यदप्युक्तं दाप्प्रति-

पाहून अनुबन्ध ठरवावा, आणि अनुबन्ध पाहून त्याला अनुसरून प्रयोग मात्र ठरवूं नये?

होय. आचार्य पाणिनि हा सकल लक्ष्यदर्शी असल्यामुळें तो प्रयोग पाहूनच अनुबन्ध जोडतो. तेव्हां प्रयोगावरूनच अनुबन्ध ठरविणें योग्य आहे.

अनुबन्ध हे अवयव आणि अनवयव, असे दोन प्रकार अनुबंधांविषयीं सांगण्यांत आले; यांमध्यें योग्य प्रकार कोणता?

अनुबन्ध हे अवयव ह्याच प्रकार न्याय्य होय.

हें कशावरून?

अनुबन्ध हे अवयव आहेत याविषयीं आचार्य वार्तिककारांनीं 'उपलब्धेः' असें कारण दाखविलें आहे म्हणून. ज्याविषयीं कारण दाखविलें तेंच न्याय्य होय.

पण वार्तिककारांनींच त्या पक्षावर 'तत्रासरूपसर्वादेशदाप्प्रतिषेधे पृथक्त्वनिर्देशोऽनाकारान्तत्वात्' (वा. १०) असे दोष दाखविले आहेत ना! असरूप अशा अपवादप्रत्ययविधीविषयीं तर दोष येत नाहीं. कारण ज्यापेक्षां हा आचार्य पाणिनि ददाति आणि दधाति या धातूंना ण-प्रत्ययाचा बाध करून श-प्रत्ययाच्या विकल्पाचें विधान करीत आहे त्यापेक्षां 'अनुबन्धामुळें भिन्नरूपता असल्यास ती मानूं नये' असें सुचवीत आहे.

आणखी 'दिव औत्' हा औत् आदेश सर्वाचे ठिकाणीं होईल असें जें म्हटलें तोही दोष येत नाहीं. कारण ज्यापेक्षां 'शकारेत्संज्ञक आदेश सर्वाचे स्थानीं करावा' असें आचार्य विधान करीत आहे त्यापेक्षां 'अनुबन्धामुळें येणारें अनेकाल्त्व मानूं नये' असें सुचवीत आहे. तसेंच आणखीही अदाप् या पदांतील दाप् शब्दानें दैप् धातूचा संग्रह होत

८. 'श्याद्व्यधास्रु०' (३।१।१४१) या सूत्रानें आकारान्त धातूच्या पुढें ण प्रत्यय नित्य करावयास सांगितला आहे. तेव्हां दा आणि धा या धातूंच्या पुढें तो ण प्रत्यय केला असतां दायः, धायः, असें एकच रूप होईल. दुसरेंही ददः, दधः, असें एक प्रकारचें रूप होण्यासाठीं 'ददातिदधात्योर्विभाषा' (३।१।१३९) या सूत्रानें त्या ण प्रत्ययाचा अपवाद म्हणून दा व धा यांचेपुढें विकल्पानें श प्रत्यय करण्यास सांगितला आहे. तेव्हां दायः धायः आणि ददः दधः अशीं दोन्ही तऱ्हेचीं रूपें होतात. तेथें ण प्रत्यय आणि श प्रत्यय यांमध्यें भिन्नरूपता फक्त णकार आणि शकार या अनुबंधांमुळेंच होत आहे. असली ही भिन्नरूपता मानून जर 'वाऽसरूपो०' (३।१।९४) ही परिभाषा प्रवृत्त होईल तर तिनेंच काम भागत असल्यामुळें 'ददातिदधात्योः' या सूत्रांतील विभाषापद व्यर्थ होईल.

९. 'इदम इश्' या सूत्रानें सांगितलेला इशादेश इदम् या सर्वाचे स्थानीं व्हावा यासाठीं 'अनेकाल्' (१।१।५५) या सूत्रामध्यें शित् असें म्हटलें आहे. परंतु इश् हा आदेश अनुबंधामुळें अनेकाल् होत आहे. तेव्हां अनेकाल्त्वामुळेंच तो सर्वादेश होईल. आणि सूत्रामध्यें शित् हा शब्द व्यर्थ होईल.

बेधे पृथक्त्वनिर्देशः कर्तव्य इति। न कर्तव्यः । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति नानुबन्धकृतमनेजन्तत्वं भवतीति यदयमुदीचां माङो व्यतीहारे [३.४.१९] इति मेङः सानुबन्धकस्यात्त्वभूतस्य ग्रहणं करोति ॥

## यथासंख्यमनुदेशः समानाम् ॥ १ । ३ । १० ॥

किमिहोदाहरणम् । इको यणचि [६.१.७७] । दध्यत्र मध्वत्र । नैतदस्ति । स्थानेऽन्तरतमेनाप्येतत्सिद्धम् । कुत आन्तर्यम् । तालुस्थानस्य तालुस्थान ओष्ठस्थानस्यौष्ठस्थानो भविष्यतीति ॥ इदं तर्हि । तस्थस्थमिपां ताम्तम्तामः [३.४.१०१] इति । ननु चैतदपि स्थानेऽन्तरतमेनैव सिद्धम् । कुत आन्तर्यम् । एकार्थस्यैकार्थो द्व्यर्थस्य द्व्यर्थो बह्वर्थस्य बह्वर्थो भविष्यतीति ॥ इदं तर्हि । तूदीशलातुरवर्मतीकूचवाराड्ढक्छण्ढञ्यकः [४.३.९४] इति ॥

---

नसल्यामुळें दाप् व दैप् यांचा पार्थक्यानें निर्देश केलां पाहिजे असें जें म्हटलें आहे तोही पृथक् निर्देश करावयास नको. कारण ज्यापेक्षां हा आचार्य पाणिनि 'उदीचां माङो व्यतीहारे' (३।४।१९) या सूत्रांमध्यें मेङ् धातूंतील एकाराला ङकार या अनुबन्धामुळें धातूच्या शेवटीं नसलेल्यालाही आत्त्व करीत आहे त्यापेक्षां 'अनुबन्धामुळें ज्याचें एजन्तत्व दिसत नाहीं त्याला अनेजन्त असें समजूं नये, तर त्याला एजन्तच समजावें असें सुचवीत आहे.

(सू.१०) या सूत्राचें उदाहरण काय?

दध्यत्र मध्वत्र हें उदाहरण होय. 'इको यणचि' येथें इक् चार व यण् चार आहेत. तेथें क्रमानेंच त्यांचा संबन्ध होतो म्हणून दध्यत्र येथें इकाराला यकारच होतो, आणि मध्वत्र येथें उकाराला वकारच होतो.

हें उदाहरण बरोबर नाहीं. कारण 'स्थानेऽन्तरतमः' (१।१।५०) या परिभाषेनेंही हें उदाहरण साधत आहे.

येथें स्थानी आणि आदेश यांचे आन्तर्य म्हणजे सादृश्य कोणत्या धर्मानें समजावयाचें?

स्थानतः आन्तर्य समजावें. त्यामुळें तालुस्थानाच्या इकाराचे स्थानीं तालुस्थानाचा यकार आणि ओष्ठस्थानाच्या उकाराचे स्थानीं ओष्ठस्थानाचा वकार होईल.

तर मग 'तस्थस्थमिपां ताम्तम्तामः' (३।४।१०१) हें यथासंख्याचें उदाहरण समजावें.

हेंही उदाहरण 'स्थानेऽन्तरतमः' या परिभाषेनें साधत आहे.

पण येथें स्थानी व आदेश यांचें सादृश्य कसें?

येथें अर्थतः सादृश्य आहे. एकत्वार्थक अशा मिप्प्रत्ययाला तसलाच अम्, द्वित्वार्थक अशा तस् व थस् यांना तसलेच ताम् व तम्, आणि बहुत्वार्थक अशा थ याला तसलाच त आदेश होईल.

तर मग 'तूदीशलातुरवर्मतीकूचवाराड्ढक्छण्ढञ्यकः' (४।३।९४) हें यथासंख्याचें उदाहरण समजावें.

आतां हें यथासंख्यसूत्र कशासाठीं केलें

---

१०. कारण अदाप् येथील दाप्शब्दाखालीं दैप् धातूचाही संग्रह होणें इष्ट आहे. परंतु दैप्धातूंतील ऐकाराला पकार असतांनाच आत्त्व झालें तर तो दाप् शब्दाखालीं येऊं शकेल. पण त्या वेळीं तो एजन्त दिसत नसल्यामुळें आत्त्व होणें दूरापास्त आहे.

१. कोणत्याही सूत्रामध्यें स्थानी, आदेश आणि निमित्त ह्यांपैकीं कोणतेही दोघे सारख्या संख्येचे असतील तर त्यांचा तो उदाहरणांतील संबंध तो क्रम न सोडतांच पाहावा; उदा०— 'टाङसिङसा०' (७।१।१२), 'एतेतौ' (७।३।४), 'समूलाकृत०' (३।४।३६), 'हलो यमाम्' (८।४।६४) इत्यादि.

किमर्थं पुनरिदमुच्यते ।

**संज्ञासमासनिर्देशात्सर्वप्रसङ्गोऽनुदेशस्य तत्र यथासंख्यवचनं नियमार्थम् ॥ १ ॥**

संज्ञया समासैश्च निर्देशाः क्रियन्ते । संज्ञया तावत् । परस्मैपदानां णलतुसुस्थलथुसणल्वमाः [३.४.८२] इति । समासैः । तूदीशलातुरवर्मतीकूचवाराड्ढक्छण्ढञ्यकः [४.३.९४] इति । संज्ञासमासनिर्देशादेतस्मात्कारणात्सर्वप्रसङ्गः । सर्वस्योद्देशस्य सर्वोऽनुदेशः प्राप्नोति । इष्यते च समसंख्यं यथा स्यादिति तच्चान्तरेण यत्नं न सिध्यतीति तत्र यथासंख्यवचनं नियमार्थम् एवमर्थमिदमुच्यते ॥ किं पुनः कारणं संज्ञया च समासैश्च निर्देशाः क्रियन्ते ।

**संज्ञासमासनिर्देशः पृथग्विभक्तिसंज्ञ्यनुच्चारणार्थः ॥ २ ॥**

संज्ञया च समासैश्च निर्देशाः क्रियन्ते पृथग्विभक्तीः संज्ञिनश्च मोच्चीचरमिति ॥

**प्रकरणे च सर्वसंप्रत्ययार्थः ॥३॥**

प्रकरणे च सर्वेषां संप्रत्ययो यथा स्यात् । विदो लटो वा [३.४.८३] इति ॥ किं पुनः शब्दतः साम्ये संख्यातानुदेशो

---

जात आहे ?

(वा.१) उद्देश आणि अनुदेश[२] यांचा कांहीं ठिकाणीं संज्ञाशब्दानें व समस्तशब्दानें निर्देश केलेला दिसतो; जसें– 'परस्मैपदानां णलतुसुस्थलथुसणल्वमाः' (३।४।८२) येथें उद्देशाचा परस्मैपद या संज्ञाशब्दानें निर्देश केला आहे, आणि 'तूदीशलातुरवर्मतीकूचवाराड्ढक्छण्ढञ्यकः' (४।३।९४) येथें उद्देश व अनुदेश या उभयतांचाही समासानें निर्देश केला आहे. असा संज्ञाशब्दानें आणि समासानें निर्देश केला असल्यामुळें सगळ्या उद्देशांचा सगळ्या अनुदेशांशीं संबन्ध होऊं लागेल. आणि पहिल्या क्रमांकाच्या उद्देशाचा पहिल्या क्रमांकाच्याच अनुदेशाशीं, दुसऱ्याचा दुसऱ्याशीं, अशा क्रमानेंच त्यांचा संबंध होणें तर इष्ट आहे. ही गोष्ट यत्न केल्यावांचून सिद्ध होणार नाहीं, म्हणून तेथें 'समानसंख्य अशा उद्देश आणि अनुदेश यांचा संबंध क्रमवारीनेंच करावा' असा नियम दाखविण्यासाठीं हें यथासंख्यसूत्र केलें आहे.

पण काय कारणानें बरें उद्देश आणि अनुदेश यांचे निर्देश संज्ञा आणि समास या शब्दांनीं केले आहेत ?

(वा.२) समास केला नाहीं तर प्रत्येकाच्या पुढें निरनिराळी विभक्ति उच्चारावी लागेल, आणि संज्ञा शब्द घातले नाहींत तर सर्व संज्ञींचें वेगवेगळें उच्चारण करावें लागेल, म्हणून संज्ञा व समास यांचे शब्दांनीं निर्देश केले आहेत.

(वा.३) शिवाय त्या प्रकरणांतील पुढील सूत्रांमध्यें सर्वांचा संबंध व्हावा यासाठीं तसा निर्देश केला[३] आहे; उदा.– 'विदो लटो वा' (३।४।८३).

आतां समसंख्याक अशा दोघांमध्यें होणारा संबंध क्रमानेंच होतो हें खरें, पण तें संख्येनें साम्य सूत्रांतील शब्दांत पाहिजे किंवा त्यांच्या

---

२. ज्या अर्थांचा ज्या अर्थांशीं संबंध होतो त्या दोन अर्थांना क्रमानें उद्देश आणि अनुदेश असें म्हणतात.

३. 'परस्मैपदानाम्' (३।४।८२) येथें परस्मैपद हा संज्ञाशब्द उच्चारला नाहीं व णलतुसुस्थलथु० हा द्वंद्वसमास केला नाहीं तर तिपो णल्, तसोऽतुस्, झेरुस् अशा रीतीनें मसो म यापर्यंत सर्वांचा निरनिराळा उच्चार करावा लागेल, आणि तसा केला तर त्याच्या पुढील 'विदो लटो वा' (३।४।८३) या सूत्रामध्यें शेवटच्याच फक्त 'मसो म' यांचा संबंध होईल.

भवत्याहोस्विदर्थतः । कश्चात्र विशेषः ।

**संख्यासाम्यं शब्दतश्चेण्णलादयः परस्मैपदानां डारौरसः प्रथमस्यायवायाव एच इत्यनिर्देशः ॥ ४ ॥**

अगमको निर्देशोऽनिर्देशः। परस्मैपदानां णलतुसुस्थलथुसणल्वमाः [३.४.८२] इति णलादयो बहवः परस्मैपदानामित्येकः शब्दः । वैषम्यात्संख्यातानुदेशो न प्राप्नोति ॥ डारौरसः प्रथमस्य । डारौरसो बहवः प्रथमस्येत्येकः शब्दः । वैषम्यात्संख्यातानुदेशो न प्राप्नोति ॥ एचोऽयवायावः [६.१.७८]। अयवायावो बहव एच इत्येकः शब्दः । वैषम्यात्संख्यातानुदेशो न प्राप्नोति ॥ अस्तु तर्ह्यर्थतः ।

**अर्थतश्चेल्ललुटोर्नन्द्यरीहणसिन्धुतक्षशिलादिषु दोषः ॥ ५ ॥**

अर्थतश्चेल्ललुटोर्नन्द्यरीहणसिन्धुतक्षशिलादिषु दोषो भवति ॥ स्यतासी ऌलुटोः[३.१.३३]। स्यतासी द्वौ ऌलुटोरित्यस्य त्रयोऽर्थाः । वैषम्यात्संख्यातानुदेशो न प्राप्नोति ॥ नन्दिग्रहिपचादिभ्यो ल्युणिन्यचः [३.१.१३४] । नन्द्यादयो बहवो ल्युणिन्यचस्त्रयः । वैषम्यात्संख्यातानुदेशो न प्राप्नोति ॥ अरीहणादयो बहवो वुञादयः सप्तदश। वैषम्यात्संख्यातानुदेशो न प्राप्नोति ॥ सिन्धुतक्षशिलादिभ्योऽणञौ [४.३.९३]। सिन्धुतक्षशिलादयो बहवोऽणञौ द्वौ । वैषम्यात्संख्यातानुदेशो न प्राप्नोति ॥

**आत्मनेपदविधिनिष्ठासार्वधातुक-**

---

अर्थात पाहिजे ? यांत काय फरक होत आहे ?

(वा.४) शब्दांची संख्या सारखी पाहिजे असें गृहीत धरलें तर 'परस्मैपदानां णलतुसुस्थल०' (३।४।८२), 'प्रथमस्य डारौरसः' (२।४।८५), 'एचोऽयवायावः' (६।१।७८) हे अनिर्देश आहेत, म्ह. इष्टार्थबोधक होत नाहींत, तें असें:– परस्मैपदानाम् हा एक शब्द आणि णल्, अतुस्, उस् वगैरे शब्द अनेक. तेव्हां शब्दतः संख्यासाम्य नसल्यामुळें त्यांचा क्रमानें अन्वय होणार नाहीं. तसेंच डारौरस् हे शब्द अनेक व प्रथमस्य हा शब्द एक. तेव्हां शब्दतः संख्यासाम्य नसल्यामुळें त्यांचा क्रमानें अन्वय होणार नाहीं. आणि त्याप्रमाणेंच अयवायावः हे शब्द अनेक व एचः हा शब्द एक. तेव्हां शब्दतः संख्यासाम्य नसल्यामुळें त्यांचाही क्रमानें अन्वय होणार नाहीं.

तर मग अर्थतः संख्यासाम्य असो.

(वा.५) अर्थतः संख्यासाम्य पाहिजे असें गृहीत धरलें तर 'स्यतासी ऌलुटोः' (३।१।३३), 'नन्दिग्रहिपचादिभ्यो ल्युणिन्यचः' (३।१।१३४), 'वुञ्छण्कण्ठ... अरीहणकृशाश्व०' (४।२।८०) आणि 'सिन्धुतक्षशिलादिभ्योऽणञौ' (४।३।९३) इतक्या ठिकाणीं दोष येतो. तो असाः– पहिल्या ठिकाणीं स्य आणि तास् असे दोन अर्थ, व ऌलुटोः याचे ऌट्, ऌङ्, लुट् मिळून तीन अर्थ. तेव्हां अर्थाच्या दृष्टीनें संख्यासाम्य नसल्यामुळें त्यांचा क्रमानें अन्वय होणार नाहीं. दुसऱ्या ठिकाणीं नन्द्यादिक बहुत अर्थ आहेत व ल्युणिन्यचः हे अर्थ तीन आहेत. तेव्हां अर्थतः संख्यासाम्य नसल्यामुळें त्यांचा क्रमानें अन्वय होणार नाहीं. तसेंच तिसऱ्या ठिकाणीं म्हणजे 'वुञ्छण्' येथें अरीहणादि शब्द प्रत्येकीं अनेक असल्यामुळें ते एकंदर बहुत आहेत आणि वुञ्छण् वगैरे प्रत्यय सतरा आहेत. तेव्हां अर्थाच्या दृष्टीनें संख्यासाम्य नसल्यामुळें त्यांचा क्रमानें अन्वय होणार नाहीं. त्याप्रमाणेंच चवथ्या ठिकाणीं सिन्धुतक्षशिलादिक शब्द बहुत आहेत, आणि अण्, अञ् हे प्रत्यय दोन आहेत. तेव्हां संख्यासाम्य नसल्यामुळें त्यांचा क्रमानें अन्वय

**द्विग्रहणेषु ॥ ६ ॥**

आत्मनेपदविधिनिष्ठासार्वधातुकद्विग्रहणेषु च दोषो भवति ॥ आत्मनेपदविधिश्च न सिध्यति । अनुदात्तङित आत्मनेपदम् [१.३.१२] । अनुदात्तङितो द्वावात्मनेपदमित्यस्य द्वावर्थौ । तत्र संख्यातानुदेशः प्राप्नोति ॥ निष्ठा । रदाभ्यां निष्ठातो नः पूर्वस्य च दः [८.२.४२] इति । रेफदकारौ द्वौ निष्ठेत्यस्य द्वावर्थौ । तत्र संख्यातानुदेशः प्राप्नोति ॥ सार्वधातुकद्विग्रहणेषु च दोषो भवति । श्नसोरल्लोपः [६.४.१११] । श्नमस्ती द्वौ सार्वधातुकमित्यस्य द्वावर्थौ तत्र संख्यातानुदेशः प्राप्नोति ॥

**एङः पूर्वत्वे प्रतिषेधः ॥ ७ ॥**

एङः पूर्वत्वे प्रतिषेधो वक्तव्यः । एङः पदान्तादति ङसिङसोश्च [६.१.१०९; ११०] । ङसिङसौ द्वावेङित्यस्य द्वावर्थौ । तत्र संख्यातानुदेशः प्राप्नोति ॥ अस्तु तर्हि शब्दतः । ननु चोक्तं संख्यासाम्यं शब्दतश्चेण्णलादयः परस्मैपदानां डारौरसः प्रथमस्यायवायाव एच इत्यनिर्देश इति । नैष दोषः । स्थानेऽन्तरतमः [१.१.५०] इत्यनेन व्यवस्था भविष्यति । कुत आन्त-

होणार नाहीं.

(वा.६) अर्थतः संख्यासाम्य असल्यास तेथें क्रमानें अन्वय होतो असें गृहीत धरलें तर आत्मनेपदविधि (१।३।१२), निष्ठाप्रत्यय (८।२।४२) आणि सार्वधातुकद्विग्रहण (६।४।१११) इतक्या ठिकाणीं इष्ट नसलेला क्रमानें अन्वय होऊं लागेल असा दोष येतो. तो असाः– 'अनुदात्तङित आत्मनेपदम्' येथें अनुदात्त व ङित् मिळून दोन अर्थ. आत्मनेपद याचेही तङ् व आन मिळून दोन अर्थ. तेव्हां अर्थतः संख्यासाम्य असल्यामुळें त्यांचा क्रमानें अन्वय होऊं लागेल. निष्ठाप्रत्ययामध्येंही तसेंच होईल. 'रदाभ्यां निष्ठातो नः पूर्वस्य च दः' येथें रेफ व दकार मिळून दोन अर्थ. आणि निष्ठा या शब्दाचेही क्त व क्तवतु मिळून दोन अर्थ. तेव्हां अर्थतः संख्यासाम्य असल्यामुळें त्यांचा क्रमानें अन्वय होऊं लागेल. तसाच सार्वधातुकद्विग्रहणांमध्येंही दोष येतो. 'श्नसोरल्लोपः' येथें श्नम् व अस् धातु मिळून दोन आणि सार्वधातुक या शब्दाचे तिङ् व शित् मिळून अर्थ दोन. तेव्हां अर्थतः संख्यासाम्य असल्यामुळें तेथें-ही क्रमानेंच अन्वय होऊं लागेल.

(वा.७) एङ्संबंधीं जे पूर्वरूप तेथें क्रमानें अन्वय होत नाहीं असा निषेध करावा. नाहीं तर 'एङः पदान्तादति' (६।१।१०९), 'ङसिङसोश्च' (६।१।११०) येथें ङसि व ङस् मिळून दोन अर्थ आणि एङ् याचेही ए व ओ मिळून दोन अर्थ. तेव्हां अर्थतः संख्यासाम्य असल्यामुळें तेथें क्रमानें अन्वय होऊं लागेल.

तर मग शब्दतःच संख्यासाम्य हें क्रमानें अन्वय होण्याचें कारण असो.

पण शब्दतः संख्यासाम्य हें कारण म्हटलें तर 'णलादयः परस्मैपदानाम्', 'डारौरसः प्रथमस्य', 'अयवायाव एचः' येथें तसा निर्देश नाहीं असा दोष दाखविला आहे ना ?

हा दोष येत नाहीं. कारण 'स्थानेऽन्तरतमः' (१।१।५०) या परिभाषेनें इष्ट व्यवस्था होईल.

पण येथें सादृश्य कशामुळें आहे ?

'परस्मैपदानाम्' आणि 'लुटः प्रथमस्य' यांच्या उदाहरणांमध्यें अर्थतः सादृश्य आहे. त्यामुळें एकत्वार्थक प्रत्ययाचे स्थानीं एकत्वा-

---

४. सार्वधातुक शब्दानें तिङ् आणि शित् असे दोन अर्थ मनांत येतात म्हणून त्याला सार्वधातुकद्विग्रहण असें म्हटलें आहे.

र्थम् । एकार्थस्यैकार्थो द्व्यर्थस्य द्व्यर्थो बह्वर्थस्य बह्वर्थः । संवृतावर्णस्य संवृतावर्णो विवृतावर्णस्य विवृतावर्णः ॥

**अतिप्रसङ्गो गुणवृद्धिप्रतिषेधे क्ङिति ॥ ८ ॥**

अतिप्रसङ्गो भवति गुणवृद्धिप्रतिषेधे क्ङिति । गुणवृद्धी द्वे क्ङितौ द्वौ । तत्र संख्यातानुदेशः प्राप्नोति ॥ नैष दोषः । गकारोऽप्यत्र निर्दिश्यते । तद्गकारग्रहणं कर्तव्यम् । न कर्तव्यम् । क्रियते न्यास एव । ककारे गकारश्चर्त्वभूतो निर्दिश्यते । गिति किति ङितीति ॥

**उदि कूले रुजिवहोः ॥ ९ ॥**

उदिकूले द्वे रुजिवहौ द्वौ । तत्र संख्यातानुदेशः प्राप्नोति ॥ नैष दोषः । नोदिरुपपदम् । किं तर्हि । विशेषणं रुजिवहोः । उत्पूर्वाभ्यां रुजिवहिभ्यां कूल उपपद इति ॥

**तच्छीलादिषु धातुत्रिग्रहणेषु ॥१०॥**

तच्छीलादिषु धातुत्रिग्रहणेषु दोषो भवति । विदिभिदिच्छिदेः कुरच् [३.२.१६२] । विदिभिदिच्छिदयस्त्रयस्तच्छीलादयस्त्रयः । तत्र संख्यातानुदेशः प्राप्नोति ॥

---

र्थक असाच आदेश होईल. द्वित्वार्थक प्रत्ययाचे स्थानीं द्वित्वार्थक असाच आदेश होईल. तसेंच बहुत्वार्थक प्रत्ययाचे स्थानीं बहुत्वार्थक असाच आदेश होईल. एचोऽयवायावः येथें संवृत अवर्ण ज्यांमध्यें आहे अशा ए ओ यांचे स्थानीं संवृत अवर्णवान् असे अय्, अव् हे आदेश होतील आणि विवृत अवर्ण ज्यांमध्यें आहे अशा ऐ, औ यांचे स्थानीं विवृत अवर्णवान् असे आय् आणि आव् हे आदेश होतील.

(वा.८) आतां हें सूत्र केलें असतां 'क्ङिति च' (१।१।५) या गुणवृद्धिप्रतिषेधाविषयीं दोष येतो. तो असा– गुण आणि वृद्धि मिळून दोन होतात. व क्ङित् येथें कित् आणि ङित् मिळून दोन शब्द होतात. तेव्हां संख्यासाम्य असल्यामुळें तेथें क्रमानें अन्वय होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण 'क्ङिति च' येथें गकाराचेंही उच्चारण केलें आहे.

तर मग तो गकार 'क्ङिति च' येथें घातला पाहिजे.

गकार घालावयास नको. कारण सूत्रामध्यें तो घालून ठेवलाच आहे. म्हणजे ककार पुढें असल्यामुळें मागील गकाराला 'खरि च' (८।४।५५) या सूत्रानें चर्त्वानें ककार करून दुबार ककार उच्चारला आहे. तेव्हां गित् कित् व ङित् पुढें असतां असा अर्थ होतो.

(वा.९) 'उदि कूले रुजिवहोः' (३।२।३१) येथें उद् आणि कूल मिळून दोन उपपदें आहेत. व रुज् आणि वह् मिळून दोन धातु आहेत. तेव्हां संख्यासाम्य असल्यामुळें क्रमानेंच त्यांचा संबंध होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण 'उद्' हा शब्द उपपद म्हणून घातलेला नाहीं. तर रुज् आणि वह् या धातूंचें तें विशेषण होय. उपपद म्हणून घातलेला कूल हा एकच शब्द आहे. तेव्हां कूल हा शब्द उपपद असतांना उद् उपसर्गाच्या पुढील रुज् आणि वह् या धातूंहून खश् प्रत्यय होतो असा त्या सूत्राचा अर्थ आहे.

(वा.१०) ताच्छील्यादिक अर्थी (३।२।१३४) प्रत्यय सांगणाऱ्या सूत्रांमध्यें तीन धातूंचें ग्रहण ज्या सूत्रामध्यें केलें आहे त्या ठिकाणीं दोष येतो. तो असा– विदिभिदिच्छिदेः कुरच्' (३।२।१६२) येथें विद्, भिद् आणि छिद् मिळून तीन धातु. आणि तच्छील, तद्धर्म व तत्साधुकारी तीन अर्थ. तेव्हां संख्यासाम्य असल्यामुळें त्यांचा क्रमानें संबंध होऊं लागेल.

(वा.११) घञ् वगैरे प्रत्यय सांगणाऱ्या

**घञादिषु द्विग्रहणेषु ॥ ११ ॥**

घञादिषु द्विग्रहणेषु दोषो भवति । निरभ्योः पूल्वोः [३.३.२८] । निरभी द्वौ पूल्वौ द्वौ । तत्र संख्यातानुदेशः प्राप्नोति ॥ नैष दोषः । इष्यते चात्र संख्यातानुदेशः । निष्पावः अभिलाव इति ॥ एवं तर्ह्यकर्तरि च कारके भावे चेति द्वौ पूल्वौ च द्वौ । तत्र संख्यातानुदेशः प्राप्नोति ॥

**अवे तॄस्त्रोः करणाधिकरणयोः ॥१२॥**

तॄस्त्रौ द्वौ करणाधिकरणे द्वे । तत्र संख्यातानुदेशः प्राप्नोति ॥

**कर्तृकर्मणोश्च भूकृञोः ॥ १३ ॥**

कर्तृकर्मणी द्वे भूकृञौ द्वौ । तत्र संख्यातानुदेशः प्राप्नोति ॥

**अनवक्लृप्त्यमर्षयोरकिंवृत्तेऽपि ॥१४**

अनवक्लृप्त्यमर्षौ द्वौ किंवृत्ताकिंवृत्ते द्वे । तत्र संख्यातानुदेशः प्राप्नोति ॥

**कृभ्वोः क्त्वाणमुलौ ॥ १५ ॥**

कृभ्वौ द्वौ क्त्वाणमुलौ द्वौ । तत्र संख्यातानुदेशः प्राप्नोति ॥

**अधीयानविदुषोश्छन्दोब्राह्मणानि ॥१६॥**

छन्दोब्राह्मणानीति द्वे अधीते वेदेति च द्वौ । तत्र संख्यातानुदेशः प्राप्नोति ॥

**रोपधेतोः पथिदूतयोः ॥१७॥**

रोपधेतोः प्राचाम् [४.२.१२३] तद्गच्छति पथिदूतयोः [४.३.८५] । रोपधेतौ

---

सूत्रांमध्यें दोन धातूंचें ग्रहण ज्या ठिकाणीं केलें आहे त्या ठिकाणीं दोष येतो तो असाः —'निरभ्योः पूल्वोः' (३।३।२८) येथें निर् आणि अभि मिळून दोन उपसर्ग आहेत. आणि पू व लू मिळून दोन धातु आहेत. तेव्हां संख्यासाम्य असल्यामुळें त्यांचा क्रमानें संबंध होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण येथें निर् उपसर्गपूर्वक पू-धातु व अभि उपसर्गपूर्वक लू-धातु त्याहून घञ् प्रत्यय होतो असा क्रमानें संबंध इष्टच आहे; जसें—निष्पावः, अभिलावः.

असें आहे तर अकर्तरि कारके आणि भावे मिळून दोन अर्थ व पू आणि लू मिळून दोन धातु, असें संख्यासाम्य असल्यामुळें त्यांचा क्रमानें संबंध होऊं लागेल, असा दोष येतो.

(वा. १२) तॄ व स्तॄ मिळून दोन धातु आणि करण व अधिकरण मिळून दोन अर्थ, असें येथें संख्यासाम्य असल्यामुळें त्यांचा क्रमानें संबंध होऊं लागेल.

(वा. १३) 'कर्तृकर्मणोश्च भूकृञोः' (३।३।१२७) येथें उपपद म्हणून गृहीत धरलेलीं कर्ता व कर्म अशीं दोन उपपदें आणि भू व कृ मिळून दोन धातु. तेव्हां संख्यासाम्य असल्यामुळें तेथें क्रमानें संबंध होऊं लागेल.

(वा. १४) 'अनवक्लृप्त्यमर्षयोरकिंवृत्तेऽपि' (३।३।१४६) येथें अनवक्लृप्ति व अमर्ष मिळून दोन अर्थ आणि उपपद म्हणून धरलेले किंवृत्त, म्हणजे किम् या शब्दापासून बनलेला शब्द, व अकिंवृत्त मिळून दोन उपपदें आहेत. तेव्हां संख्यासाम्य असल्यामुळें तेथें क्रमानें संबंध होऊं लागेल.

(वा. १५) 'स्वाङ्गे तस्प्रत्यये कृभ्वोः' (३।४।६१) येथें कृ व भू मिळून दोन धातु व क्त्वा आणि णमुल् मिळून दोन प्रत्यय, असें संख्यासाम्य असल्यामुळें तेथें त्यांचा क्रमानें संबंध होऊं लागेल.

(वा. १६) 'छन्दो ब्राह्मणानि च तद्विषयाणि' (४।२।६६) येथें छन्द व ब्राह्मण मिळून दोन आणि अधीते व वेद मिळून अर्थ दोन असें संख्येनें साम्य असल्यामुळें तेथें क्रमानें संबंध होऊं लागेल.

(वा. १७) 'रोपधेतोः प्राचाम्' (४।२।१२३) आणि 'तद्गच्छति पथिदूतयोः' (४।३।८५) येथें

द्वौ पथिदूतौ द्वौ। तत्र संख्यातानुदेशः प्राप्नोति ॥

**तत्र भवस्तस्य व्याख्यानः क्रतुयज्ञेभ्यश्च ॥१८॥**

तत्रभवस्तस्यव्याख्यानौ द्वौ क्रतुयज्ञौ द्वौ। तत्र संख्यातानुदेशः प्राप्नोति ॥

**संघादिष्वञ्प्रभृतयः ॥१९॥**

संघादिष्वञ्प्रभृतयः संख्यातानुदेशे न सिध्यन्ति ॥ नैष दोषः। घोषग्रहणमपि तत्र कर्तव्यम् ॥

**वैशोयशआदेर्भगाद्यल्खौ ॥२०॥**

वैशोयशआदी द्वौ यल्खौ द्वौ। तत्र संख्यातानुदेशः प्राप्नोति ॥

**ङसिङसोः ख्यत्यात्परस्य ॥२१॥**

ङसिङसौ द्वौ ख्यत्यौ द्वौ। तत्र संख्यातानुदेशः प्राप्नोति।

**न वा समानयोगवचनात् ॥२२॥**

न वैष दोषः। किं कारणम्। समानयोगवचनात्। समानयोगे संख्यातानुदेशं वक्ष्यामि ॥

**तस्य दोषो विदो लटो वा ॥२३॥**

तस्यैतस्य लक्षणस्य दोषो विदो लटो

---

रोपध आणि ईकारान्त मिळून दोन प्रकारचे शब्द, व प्रत्ययार्थ गमनक्रियेचा कर्ता[५] म्हणून धरलेले पन्था आणि दूत हे दोन अर्थ, असें संख्येनें साम्य असल्यामुळें त्यांचा क्रमानें संबंध होऊं लागेल.

(वा.१८) 'क्रतुयज्ञेभ्यश्च' (४।३।६८) येथें 'तत्र भवः' व 'तस्य व्याख्यानः' मिळून दोन प्रकारचे अर्थ आणि क्रतु व यज्ञ मिळून दोन प्रकारचे शब्द, असें संख्यासाम्य असल्यामुळें त्यांचा क्रमानें संबंध होऊं लागेल.

(वा.१९) 'संघाङ्कलक्षणेष्व०' (४।३।१२७) येथें अञ्प्रत्ययान्त, यञ्प्रत्ययान्त व इञ्प्रत्ययान्त मिळून तीन प्रकारचे शब्द आणि संघ, अङ्क व लक्षण मिळून तीन प्रकारचे अर्थ, असें संख्यासाम्य असल्यामुळें त्यांचा क्रमानें संबंध होत असल्यानें तिन्ही अर्थी तिघांहून प्रत्यय होणार नाहींत.

हा दोष येत नाहीं. कारण तेथें घोष हा अर्थ अधिक घालावयाचा (४।३।१२७ वा.१) आहे. तेव्हां अर्थ चार आणि शब्द तीन असें वैषम्य होत आहे म्हणून त्यांचा क्रमानें संबंध होऊं शकत नाहीं.

(वा.२०) 'वैशोयशआदेर्भगाद्यल्खौ' (४।४।१३१) येथें प्रत्ययविधानाला अवधि म्हणून धरलेल्याचीं विशेषणें वैशोभग व यशोभग मिळून दोन शब्द आणि यल् व ख मिळून दोन प्रत्यय, असें संख्यासाम्य असल्यामुळें तेथें त्यांचा क्रमानें संबंध होऊं लागेल.

(वा.२१) 'ख्यत्यात्परस्य' (६।१।११२) येथें ङसि व ङस् मिळून दोन प्रत्यय आणि ख्य व त्य मिळून दोन प्रकारचे वर्णसंघ, असें संख्यासाम्य असल्यामुळें तेथें त्यांचा क्रमानें संबंध होऊं लागेल.

(वा.२२) हा दोष येत नाहीं.

काय कारण ?

समसंख्याक असे जे अनेक त्यांचें एका सूत्रामध्यें उच्चारण केलें असेल तरच तेथें क्रमानें संबंध होतो, असें म्हणतों.

(वा.२३) समसंख्याक अशांचें एका सूत्रामध्येंच उच्चारण असलें पाहिजे असें म्हटलें तर त्यावर दोष येतो, तो असा– 'विदो लटो वा' (३।४।८३) या सूत्रामध्यें समसंख्याकांचें उच्चारण केलें नसल्यामुळें विद्धातूपुढील लटाचे स्थानीं केलेल्या परस्मैपदप्रत्ययांचा

---

५. 'रोपधेतोः' (४।२।१२३) हें सूत्र 'शेषे' (४।२।९२) या अधिकारांत आहे. त्या अधिकारामध्यें सांगितलेले प्रत्यय 'तत्र जातः' (४।३।२५) इत्यादि अर्थींही होतात. त्या अर्थांमध्यें तद्गच्छति हा अर्थ आहे. तेथेंच गच्छति या क्रियेचा कर्ता म्हणून पथिदूतयोः असें म्हटलें आहे असा रोपधेतोः आणि पथिदूतयोः यांचा संबंध आहे.

**ध्माधेटोः नाडीमुष्टयोश्च ॥२४॥**

ध्माधेटोर्नाडीमुष्टयोश्च संख्यातानुदेशो न प्राप्नोति ॥

**खलगोरथात् इनित्रकट्यचश्च ॥२५॥**

संख्यातानुदेशो न प्राप्नोति ॥

**सिन्ध्वपकराभ्यां कन् अणञौ च ॥२६॥**

संख्यातानुदेशो न प्राप्नोति ॥

**युष्मदस्मदोश्चादेशाः ॥२७॥**

युष्मदस्मदोश्चादेशाः संख्यातानुदेशेन न सिध्यन्ति ॥

तस्माद्यस्मिन्पक्षेऽल्पीयांसो दोषास्तमास्थाय प्रतिविधेयं दोषेषु ॥ अथवैवं वक्ष्यामि । यथासंख्यमनुदेशः समानां स्वरितेन । ततोऽधिकारः । अधिकारश्च भवति स्वरितेनेति । एवमपि स्वरितं दृष्ट्वा संदेहः स्यात् । न ज्ञायते किमयं समसंख्यार्थ आहोस्विदधिकारार्थ इति । संदेहमात्रमेतद्भवति सर्वसंदेहेषु चेदमुपतिष्ठते व्याख्यानतो विशेषप्रतिपत्तिर्न हि संदेहाद-

---

व णलादिकांचा क्रमानें संबंध होणार नाहीं.

(वा.२४) 'नाडीमुष्ट्योश्च' (३।२।३०) येथें ध्मा धेट् या धातूंचें उच्चारण नसल्यानें नाडी, मुष्टि आणि ध्मा धेट् यांचा क्रमानें संबंध होणार नाहीं.

(वा.२५) 'इनित्रकट्यचश्च' (४।२।५१) येथें खल, गो आणि रथ या शब्दांचें उच्चारण नसल्यामुळें त्यांचा प्रत्ययांशीं क्रमानें संबंध होणार नाहीं.

(वा.२६) अणञौ च' (४।३।३३) येथें सिन्धु व अपकर या शब्दांचें उच्चारण केलें नसल्यामुळें त्यांचा प्रत्ययांशीं क्रमानें संबंध होणार नाहीं.

(वा.२७) 'बहुवचनस्य वस्नसौ' (८।१।२१), 'तुभ्यमह्यौ ङयि' (७।२।९५) येथें युष्मदस्मद् या शब्दांचें उच्चारण केलें नसल्यामुळें त्यांचा आदेशांबरोबर क्रमानें संबंध होणार नाहीं.

तेव्हां ज्या पक्षीं दोष थोडे संभवतात तो पक्ष स्वीकारून त्या पक्षावर येणाऱ्या दोषांचें कसें तरी निरसन करावें.[६]

किंवा 'यथासंख्यमनुदेशः समानां स्वरितेन', 'अधिकारः' अशीं दोन सूत्रें करण्यांत येतील. म्हणजे 'स्वरितेनाधिकारः' या पुढील सूत्रांतील 'स्वरितेन' हें पद मागील सूत्रांत सामील करावें. समसंख्याक हे स्वरितत्व धर्मानें युक्त असतील तरच त्यांचा क्रमानें संबंध होतो असा सूत्राचा अर्थ होतो. जेथें क्रमानें संबंध इष्ट आहे तेथेंच स्वरितत्वधर्म लाविला आहे असें मानावें. 'अधिकारः' एवढेंच पुढील सूत्र होय. तेथें स्वरितेन हें पद उपस्थित होत आहेच.

तरीही दोष येतोच. कारण स्वरितत्वधर्म पाहून संशय उत्पन्न होणार आहे. तो असाः— काय हा स्वरितत्वधर्म क्रमानें संबंध होण्यासाठीं लाविला आहे किंवा त्या शब्दाची पुढील सूत्रांमध्यें उपस्थिति होण्यासाठीं लाविला आहे ?

हा केवळ संशय येतो इतकेंच. लगेच तेथें निर्णय करतां येतो. कारण कोठेंही संशय

---

६. शब्दतः संख्यासाम्य असून एका सूत्रामध्यें उभयतांचें उच्चारण असेल तरच त्यांचा क्रमानें परस्परांमध्यें संबंध होतो असें गृहीत धरावें. आतां 'बहुवचनस्य वस्नसौ' (८।१।२१) या सूत्रानें युष्मद् शब्दाला नस् आदेशही होईल असा जो दोष येतो त्याचें अनभिधानानें निरसन करावें. म्हणजे 'नः' असा प्रयोग केला असतां त्यापासून लोकांमध्यें तुम्हांला असा युष्मद्शब्दाच्या अर्थाचा बोध होत नाहीं. अशा रीतीनें इतर ठिकाणींही आलेले दोष दूर करावेत.

लक्षणमिति समसंख्यार्थ इति व्याख्यास्यामः ॥

## स्वरितेनाधिकारः ॥१।३।११॥

किमर्थमिदमुच्यते ।

### अधिकारः प्रतियोगं तस्यानिर्देशार्थः ॥ १ ॥

अधिकारः क्रियते प्रतियोगं तस्यानिर्देशार्थ इति । किमिदं प्रतियोगमिति । योगं योगं प्रति प्रतियोगम् । योगे योगे तस्य ग्रहणं मा कार्षमिति ॥ किं गतमेतदियता सूत्रेण । गतमित्याह । कुतः । लोकतः । तद्यथा । लोकेऽधिकृतोऽसौ ग्रामेऽधिकृतोऽसौ नगर इत्युच्यते यो यत्र व्यापारं गच्छति । शब्देन चाप्यधिकृतेन कोऽन्यो व्यापारः शक्योऽवगन्तुमन्यदतो योगे योग उपस्थानात् ॥

### न वा निर्दिश्यमानाधिकृतत्वाद्यथा लोके ॥ २ ॥

न वैतत्प्रयोजनमस्ति । किं कारणम् । निर्दिश्यमानाधिकृतत्वाद्यथा लोके । निर्दिश्यमानमधिकृतं गम्यते । तद्यथा । देवदत्ताय गौर्दीयतां यज्ञदत्ताय विष्णुमित्रायेति । गौरिति गम्यते । एवमिहापि पदरुजविशस्पृशो घञ् [ ३.३.१६ ] सू

---

आला असतां तेथें 'व्याख्यानतो विशेषप्रतिपत्तिर्न हि संदेहादलक्षणम्' हें वचन संदेहनिवृत्तीकरितां उपस्थित होतें. तेव्हां हा असुक ठिकाणचा स्वरितत्वधर्म क्रमानें संबंध होण्यासाठीं लाविला आहे असें ठरेल.

(सू.११) हें सूत्र कशासाठीं केलें आहे ?

(वा.१) पुढील प्रत्येक सूत्रामध्यें त्या शब्दाचा उच्चार करण्याचा प्रसंग येऊं नये यासाठीं अधिकार केला जातो.

प्रतियोगम् हें काय आहे ?

'योगं योगं प्रति प्रतियोगम्' असा वीप्सार्थी अव्ययीभाव समास केला आहे. पण काय हो, ह्या सूत्रानें शब्दाचें अभिधान करून तेवढ्यानें पुढील प्रत्येक सूत्रामध्यें त्या शब्दाची उपस्थिति हा अर्थ लब्ध होतो काय ?

होय, तो अर्थ लब्ध होतो.

कशावरून ?

लोकावरून. तें असें:— लोकामध्यें या गांवावर किंवा या शहरावर हा मनुष्य अधिकृत आहे असें त्यालाच म्हटलें जातें की जो त्या गांवाचा किंवा त्या शहराचा सर्व प्रकारचा कारभार करतो. तसें शास्त्रामध्यें अधिकृत झालेल्याही शब्दाला कोणत्याही प्रकारची हालचाल करतां येत नसल्यामुळें फक्त पुढील दरएक सूत्रामध्यें उपस्थित होणें याशिवाय दुसरा कोणता बरें व्यापार होऊं शकेल ? तेव्हां अर्थातच अधिकार या शब्दापासून 'प्रत्येक सूत्रामध्यें त्या शब्दाची उपस्थिति' या अर्थाचा लाभ होतो.

(वा.२) प्रकृत सूत्र करण्याचें हें प्रयोजन होत नाहीं.

काय कारण ?

पूर्वी उच्चारलेल्याचा पुढें संबंध होणें हें लोकव्यवहारावरूनच सिद्ध होत आहे. तें असें:— देवदत्ताला गाय द्यावी असें सांगून पुढें यज्ञदत्ताला आणि विष्णुमित्रालाही, इतकेंच म्हटलें तरी तेथें 'गाय द्यावी' असा अर्थ सहजच मनांत येतो. त्याप्रमाणें शास्त्रामध्येंही 'पदरुजविशस्पृशो घञ्' (३।३।१६) या सूत्रानें घञ् प्रत्ययाचें विधान करून पुढें 'सृस्थिरे' (३।३।१७) 'भावे' (३।३।१८) असें म्हटलें असतां तेथें घञ् प्रत्यय होतो असा

---

७. ह्या वचनाचा अर्थ पूर्वी लण् या सूत्रावरील भाष्यामध्यें शेवटीं पाहावा.

१. स्वरितत्वधर्मानें युक्त असलेला शब्द पुढील सूत्रामध्यें उपस्थित होतो; उदा०— प्रत्ययः (३।१।१), धातोः (३।१।९१), ङ्याप् प्रातिपदिकात् (४।१।१).

स्थिरे [१७] भावे [१८] घञिति गम्यते ॥

**अन्यनिर्देशस्तु निवर्तकस्तस्मात्परिभाषा ॥ ३ ॥**

अन्यनिर्देशस्तु लोके निवर्तको भवति । तद्यथा । देवदत्ताय गौर्दीयतां यज्ञदत्ताय कम्बलो विष्णुमित्राय चेति । कम्बलो गोर्निवर्तको भवति । एवमिहाप्यभिविधौ भाव इनुण् [३.३.४४] घञो निवर्तकः स्यात् । तस्मात्परिभाषा । तस्मात्परिभाषा कर्तव्या ॥

**अधिकारपरिमाणाज्ञानं तु ॥ ४ ॥**

अधिकारपरिमाणाज्ञानं तु भवति । न ज्ञायते कियन्तमवधिमधिकारोऽनुवर्तेत इति ॥

**अधिकारपरिमाणज्ञानार्थं तु**

अधिकारपरिमाणज्ञानार्थमेव तर्ह्ययं योगो वक्तव्यः। अधिकारपरिमाणं ज्ञास्यामीति। कथं पुनः स्वरितेनाधिकार इत्यनेनाधिकारपरिमाणं शक्यं विज्ञातुम् । एवं वक्ष्यामि । स्वरिते नाधिकार इति । स्वरितं दृष्ट्वाधिकारो न भवतीति । केनेदानीमधिकारो भविष्यति । लौकिकोऽधिकारः ।

---

अर्थ सहजच मनांत येतो.

(वा ३) एका वाक्यांत उच्चारलेला शब्द पुढील प्रत्येक वाक्यांत उपस्थित होतो. पण पुढील ज्या वाक्यामध्यें तसला दुसरा शब्द उच्चारला असेल त्या वाक्यांत तो पहिला शब्द बंद होतो. तें असें– देवदत्ताला गाय द्यावी असें सांगून विष्णुमित्राला कांबळा द्यावा असें म्हटलें असतां त्या वाक्यांतील कांबळा या शब्दामुळें त्या वाक्यापासूनच गाय या शब्दाची उपस्थिति बंद होते. तसें येथेंही 'अभिविधौ भाव इनुण्' (३।३।४४) या उत्तरसूत्रामध्यें निर्दिष्ट केलेला इनुण्-प्रत्यय 'पदरुजविश०' या पूर्वसूत्रांतील घञ्-प्रत्ययाची अनुवृत्ति बंद करील. तेव्हां 'आक्रोशेऽवन्योर्ग्रहः' (३।३।४५) या सूत्रानें ग्रह-धातूच्या पुढें घञ् प्रत्यय न करतां इनुण् प्रत्यय करण्याची पाळी येईल म्हणून 'स्वरितेनाधिकारः' ही परिभाषा करावी लागते[२] आहे.

(वा.४) अधिकार कोठपर्यंत चालू राहतो याची मर्यादा कळून येत नाहीं.

अधिकार कोठपर्यंत चालू राहतो त्याची मर्यादा कळून येण्यासाठींच तर 'स्वरितेनाधिकारः' हें प्रकृतसूत्र करणें प्राप्त होत आहे. पण 'स्वरितेनाधिकारः' हें प्रकृतसूत्र केलें असतां अधिकाराची मर्यादा कशी बरें कळून येणें शक्य होतें ?

'स्वरिते नाधिकारः' असें 'स्वरिते' हें सप्तम्यन्त पद म्हणण्यांत येईल. म्हणजे स्वरितधर्म दृष्टीस पडला असतां अधिकार चालू राहत नाहीं असा प्रकृतसूत्राचा अर्थ होईल. अर्थात् ज्या सूत्रामध्यें अधिकार नको असेल त्या सूत्रामध्यें स्वरितधर्म मानला जाईल.

पण प्रकृतसूत्राचा वरीलप्रमाणें अर्थ केला असतां स्वरितधर्म हा अधिकार बंद होण्याचें चिन्ह आहे, चालू होण्याचें नव्हे, असें सिद्ध होतें. तेव्हां आतां तो चालू होतो हें कसें बरें कळून येईल ?

देवदत्ताला गाय द्यावी, आणि विष्णुमित्राला व चैत्रालाही, या लोकव्यवहारावरून शास्त्रामध्येंही अमुक शब्द अधिकृत आहे हें

---

२. ही परिभाषा नसेल तर 'आक्रोशेऽवन्योः' येथें शेजारच्या मागील सूत्रांतून इनुण् शब्दाचीच अनुवृत्ति येईल. त्याच्याही मागें असलेल्या 'पदरुजविश' या सूत्रांतील घञ्पदाची अनुवृत्ति येणार नाहीं. आणि परिभाषा केली असतां स्वरितत्व-धर्मानें युक्त असें घञ् पद असल्यामुळें शेजारीं नाहीं तरी देखील घञाचीच अनुवृत्ति पुढें चालू होते. व इनुण् हें पद स्वरितत्वधर्मानें युक्त नसल्यामुळें त्याची अनुवृत्ति होत नाहीं.

**नाधिकार इति चेदुक्तम् ॥ ५ ॥**

किमुक्तम् । अन्यनिर्देशस्तु निवर्तकस्तस्मात्परिभाषेति ॥ अधिकारार्थमेव तर्ह्ययं योगो वक्तव्यः । ननु चोक्तमधिकारपरिमाणाज्ञानं त्विति ।

**यावतिथोऽलनुबन्धस्तावतो योगानिति वचनात्सिद्धम् ॥ ६ ॥**

यावतिथोऽलनुबध्यते तावतो योगानधिकारोऽनुवर्तेत इति वक्तव्यम् ॥ अथेदानीं यत्राल्पीयांसोऽलो भूयसश्च योगानधिकारोऽनुवर्तते कथं तत्र कर्तव्यम् ।

**भूयसि प्राग्वचनम् ॥ ७ ॥**

भूयसि प्राग्वचनं कर्तव्यम् । प्रागमुत इति वक्तव्यम् ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । संदेहमात्रमेतद्भवति सर्वसंदेहेषु चेदमुपतिष्ठते व्याख्यानतो विशेषप्रतिपत्तिर्न हि संदेहादलक्षणमिति प्रागमुत इति व्याख्यास्यामः ॥ यद्येवं नार्थोऽनेन । केनेदानीमधिकारो भविष्यति । लौकिकोऽधिकारः । ननु चोक्तं नाधिकार इति-

---

कळून येईल.

(वा. ५) स्वरितधर्म पाहून अधिकार निवृत्त होतो असा प्रकृतसूत्राचा अर्थ असेल तर त्याविषयीं सांगितलें आहे.

काय सांगितलें त्याहे ?

उत्तरवाक्यामध्यें केलेला निराळ्या शब्दाचा उल्लेख पूर्ववाक्यामध्यें निर्दिष्ट केलेल्या अधिकाराची निवृत्ति करतो म्हणून 'स्वरितेनाधिकारः' ही परिभाषा करावी लागत आहे. म्हणजे अधिकार कोणता हें कळेल, असें सांगितलें आहे.

तर मग अधिकार कोणता हें कळून येण्यासाठींच हें सूत्र करावें. पण अधिकृत कोण हें कळण्यासाठीं प्रकृत सूत्र केलें तर त्याची मर्यादा कळून येत नाहीं असें म्हटलें आहे ना ?

(वा.६) अइउण् वगैरे चवदा सूत्रांपैकीं ज्या क्रमांकाचा वर्ण अनुबन्ध म्हणून जोडला असेल तितक्या सूत्रांमध्यें तो अधिकार चालू राहतो, असें वचन केलें म्हणजे त्याची मर्यादा सिद्ध होते. म्हणजे त्या त्या ठिकाणीं तसे तसे अनुबंध जोडावेत.

आतां जेथें अइउण् वगैरे सूत्रांतील वर्णांची संख्या कमी पडते आणि अधिकृत शब्दाचा संबंध असलेल्या सूत्रांची संख्या अधिक आहे तेथें कसें करावें ?

(वा.७) अधिकृत शब्दाचा संबंध असलेल्या सूत्रांची संख्या बहुत असेल तर तेथें अमुक सूत्राच्या पूर्वीपर्यंत हा अधिकार चालू राहतो असें वचन करावें.

तर मग 'यावतिथोऽलनुबन्धः' हें वचन केलें पाहिजे, आणि कांहीं 'अमुक शब्दाच्या पूर्वी' असें म्हटलें पाहिजे.

वचन करावयास नको. कारण हा केवळ संशय येतो इतकेंच. लगेंच तेथें निर्णय करितां येतो. कारण कोठेंहि संशय आला असतां तेथें 'व्याख्यानतो विशेषप्रतिपत्तिर्न हि संदेहादलक्षणम्' हें वचन संदेहनिवृत्तीकरितां उपस्थित होतें. त्यावरून अमुक सूत्रापर्यंत अमुक अधिकार आहे हें ठरविण्यांत येईल.

असें आहे तर प्रकृत सूत्र करण्याचा कांहींच उपयोग दिसत नाहीं. पण सूत्र केलें नाहीं तर घञ् वगैरे हा अधिकार आहे हें कसें बरें समजेल ?

ज्याप्रमाणें लोकामध्यें मागील वाक्यांतील शब्दाचा पुढील वाक्यामध्यें संबंध आपोआपच मनांत येतो त्याप्रमाणें शास्त्रामध्येंही येईल. पण या संबंधानें प्रश्नोत्तरें आतांच झालीं आहेत. तीं अशीं की– 'स्वरितधर्म पाहून अधिकार निवृत्त होतो असा प्रकृत सूत्राचा अर्थ असेल तर त्याविषयीं सांगि-

---

१. ह्या वचनाचा अर्थ मागें लण् या सूत्रावरील भाष्याच्या शेवटीं पाहावा.

चेदुक्तम् किमुक्तम् अन्यनिर्देशस्तु निवर्तकस्तस्मात्परिभाषा । संदेहमात्रमेतद्भवति सर्वसंदेहेषु चेदमुपतिष्ठते व्याख्यानतो विशेषप्रतिपत्तिर्न हि संदेहादलक्षणमितीनुण्घञिति संदेहे घञिति व्याख्यास्यामः ॥

न तर्हीदानीमयं योगो वक्तव्यः । वक्तव्यश्च । किं प्रयोजनम् । स्वरितेनाधिकारगतिर्यथा विज्ञायेत । अधिकं कार्यम् । अधिकः कारः ॥

अधिकारगतिः । गोस्त्रियोरुपसर्जनस्य [१.२.४८] इत्यत्र गोटाङ्ग्रहणं चोदितं तन्न कर्तव्यं भवति । स्त्रीग्रहणं स्वरयिष्यते । स्वरितेनाधिकारगतिर्भवतीति स्त्रियाम् [४.१.३] इत्येवं प्रकृत्य ये प्रत्यया विहितास्तेषां ग्रहणं विज्ञास्यते । तत्र स्वरितेनाधिकारगतिर्भवतीति न दोषो भवति ॥

अधिकं कार्यम् । अपादानमाचार्यः किं न्याय्यं मन्यते यत्र प्राप्य निवृत्तिः । तेनेहैव स्यात् ग्रामादागच्छति नगरादागच्छति । सांकाश्यकेभ्यः पाटलिपुत्रका अभिरूपतरा इत्यत्र न स्यात् । स्वरितेनाधिकं कार्य

---

तलेंच आहे.

काय सांगितलें आहे ?

उत्तर वाक्यामध्यें केलेला जो निराळ्या शब्दाच उल्लेख तो पूर्ववाक्यामध्यें निर्दिष्ट केलेल्या अधिकाराची निवृत्ति करतो म्हणून 'स्वरितेनाधिकारः' ही परिभाषा करावी लागत आहे. नाहीं तर 'आक्रोशेऽवन्योर्ग्रहः' (३।३।४५) येथें इनुण् व घञ् या दोहोंपैकीं कोणत्या प्रत्ययाची अनुवृत्ति करावी असा संशय उत्पन्न होणार आहे. पण हा केवळ संशय येतो इतकेंच; लगेंच तेथें निर्णय करितां येतो. कारण कोठेंही संशय आला असतां तेथें 'व्याख्यानतो विशेषप्रतिपत्तिर्नहि संदेहादलक्षणम्' हें वचन संशयनिवृत्तीकरितां उपस्थित होतें असें आतांच सांगितलें आहे. तेव्हां घञ् आणि इनुण् या उभयतांच्या अनुवृत्तीबद्दल संशय आला असतां व्याख्यानावरून घञ् प्रत्ययच अनुवृत्त होतो असें ठरविण्यांत येईल. एकंदरींत व्याख्यानावरून अधिकाराच्या निवृत्तीप्रमाणें अनुवृत्तिही ठरविणें शक्य असल्यामुळें प्रकृतसूत्र व्यर्थ होतें.

तर मग आतां हें सूत्र करावयास नको कीं काय ?

सूत्र तर करावयास पाहिजे.

काय प्रयोजन ?

स्वरितामुळें अधिकारगति व्हावी हें प्रयोजन आहे. तें प्रयोजन अधिकारगति, अधिककार आणि अधिककार्य असें तीन प्रकारचें आहे. त्यांपैकीं अधिकारगतीचें उदाहरण— 'गोस्त्रियोरुपसर्जनस्य' (१।२।४८) येथें 'गोस्त्रियोः' याचे ऐवजीं 'गोटाङ्' (१।२।४८, वा.२) असा शब्द घालावा असें म्हटलें आहे तें तसें करण्याची जरूरी नाहीं. कारण 'गोस्त्रियोः' येथील स्त्रीशब्दाचे ठिकाणीं स्वरितत्वधर्म मानण्यांत येईल. त्या स्वरितत्वधर्मामुळें अधिकाराची प्रतीति होते. तेव्हां 'स्त्रियाम्' असाच अधिकार करून जे प्रत्यय सांगितले आहेत त्या प्रत्ययांचें स्त्रीशब्दानें ग्रहण होतें. तेव्हां दोष येत नाहीं. अधिक कार्याचें उदाहरण असें की हा आचार्य पाणिनि मुख्य अपादान कोणतें समजतो ? जेथें संयोगपूर्वक विभाग असतो तें अपादान न्याय्य होय. त्यामुळें ग्रामादागच्छति, नगरादागच्छति, येथें येणाऱ्या मनुष्याचा ग्रामाशीं व नगराशीं संयोगपूर्वक विभाग होत असल्यामुळें तेथेंच अपादानसंज्ञा होईल आणि सांकाश्यकेभ्यः पाटलिपुत्रका अभिरूपतराः म्हणजे सांकाश्य नांवाचे नगरांतील लोकांपेक्षां पाटणा शहरांतील लोक अतिशय सुंदर आहेत या वाक्यामध्यें सांकाश्य नगरांतील लोकांशीं

भवतीत्यत्रापि सिद्धं भवति ॥ तथाधिकरणमाचार्यः किं न्याय्यं मन्यते यत्र कृत्स्न आधारात्मा व्याप्तो भवति। तेनेहैव स्यात् तिलेषु तैलम् दध्नि सर्पिरिति। गङ्गायां गावः कूपे गर्गकुलमित्यत्र न स्यात्। स्वरितेनाधिकं कार्यं भवतीत्यत्रापि सिद्धं भवति। अधिकं कार्यम् ॥

अधिकः कारः। पूर्वविप्रतिषेधा न पठितव्या भवन्ति। गुणवृद्ध्यौत्त्वतृज्वद्भावेभ्यो नुम्पूर्वविप्रतिषिद्धं नुमचिरतृज्वद्भावेभ्यो नुडिति। नुम्नुटौ स्वरयिष्येते। तत्र स्वरितेनाधिकः कारो भवतीति नुम्नुटौ भविष्यतः॥ कथं पुनरधिकः कार इत्यनेन पूर्वविप्रतिषेधाः शक्या न पठितुम्। लोकतः। तद्यथा। लोकेऽधिकमयं कारं करोतीत्युच्यते योऽयं दुर्बलः सन्बलवद्भिः सह भारं वहति। एवमिहाप्यधिकमयं कारं करोतीत्युच्यते

---

पाटलिपुत्र शहरांतील लोकांचा संयोगपूर्वक विभाग होत नाहीं. तेव्हां सांकाश्यकांना अपादान म्हणणें न्याय्य नसल्यामुळें तेथें पञ्चमी विभक्ति करतां येणार नाहीं. परंतु अपादान हा शब्द स्वरितत्वधर्मानें युक्त आहे त्यामुळें 'संयोगपूर्वक विभाग' हा मनानें कल्पिलेला असला तरी चालतो हें अधिक कार्य होतें. म्हणून सांकाश्यकांना अपादानसंज्ञा सिद्ध होते. तसेंच हा आचार्य पाणिनि मुख्य अधिकरण कोणतें समजतो ? जेथें समग्र आधार आधेयाकडून व्यापिला जातो तें अधिकरण न्याय्य होय. त्यामुळें तिलेषु तैलं, दध्नि सर्पिः, या वाक्यांमध्यें तेलानें आणि घृतानें अनुक्रमानें तिल व दधि यांचा प्रत्येक अवयव व्यापिला असल्यामुळें तिल किंवा दधि यांनाच अधिकरणसंज्ञा होईल. आणि गङ्गायां गावः, कूपे गर्गकुलम्, या वाक्यांमध्यें गायी किंवा गर्ग हे त्यांच्या तीरावर असल्यामुळें त्यांच्याकडून गङ्गा किंवा कूप यांचा एक सुद्धां अवयव व्यापिलेला नाहीं. तेव्हां गङ्गा किंवा कूप यांना अधिकरण म्हणतां येणार नाहीं. परंतु अधिकरण हा शब्द स्वरितत्वधर्मानें युक्त असल्यामुळें कल्पिलेला गौण आधार देखील चालतो. म्हणून गङ्गा आणि कूप या गौण आधारालाही अधिकरणसंज्ञा सिद्ध होते. हें अधिक कार्याचें उदाहरण झालें, आतां अधिककाराचें उदाहरण. अधिककार म्हणजे अधिक पराक्रम. स्वरितामुळें तो शब्द आपल्या शक्तीच्या बाहेर कार्य करितो असें असल्यामुळें 'गुण, वृद्धि, औत्व आणि तृज्वद्भाव यांच्यापेक्षां पूर्वविप्रतिषेधानें नुमागम प्रथम होतो' (७।१।९६, वा.१०), 'नुम् 'अचिरऋतः' हा रेफादेश व तृज्वद्भाव यांच्यापेक्षां पूर्वविप्रतिषेधानें नुडागम अगोदर होतो' (७।१।९६, वा.११) वगैरे पूर्वविप्रतिषेधादाखल केलेलीं वचनें करावयास नकोत. कारण नुम् आणि नुट् या शब्दांना स्वरिताचें कवच घालतां येईल. तेव्हां ते अधिक कार्यकर्ते असल्यामुळें गुण वगैरे किंवा नुम्, रेफ वगैरे यांचा बाध करून प्रथमतः होतील.

स्वरितानें युक्त असलेला शब्द अधिक कार्य करतो असें असलें तरी त्यानें पूर्वविप्रतिषेधादाखल केलेल्या वचनांचें काम कसें वरें भागतें ?

लोकव्यवहारावरूनच भागतें. जसें– जो मनुष्य दुर्बल असूनही बलाढ्याच्या बरोबरीनें ओझें वाहतो त्याला हा अधिककार्य करणारा आहे असें लोक म्हणतात. तसें या व्याकरणशास्त्रामध्येंही जो विधि पूर्वी पठित असूनही परपठितविधीचा बाध करतो त्या विधीला हा आपल्या शक्तीच्या बाहेर काम करणारा आहे असें म्हटलें जाईल.

आतांपर्यंत 'स्वरितेनाधिकारः' हें सूत्र करावयास पाहिजे असें जें सांगितलें त्याचाच

योऽयं पूर्वः सन्परं बाधते ॥

अधिकारगतिः स्त्र्यर्था विशेषायाधिकं कार्यम् ।

अथ योऽन्योऽधिकः कारः पूर्वविप्रतिषेधार्थः सः ॥

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये प्रथमस्याध्यायस्य तृतीये पादे प्रथममाह्निकम् ॥

---

या गाथेमध्यें संग्रह केला आहे.

'स्वरितेनाधिकारः' हें सूत्र करण्याचीं तीन प्रकारचीं प्रयोजनें आहेत. त्यांपैकीं अधिकारगति हें पहिलें प्रयोजन स्त्री शब्दाकरतां आहे. स्वरितामुळें स्त्री या अधिकाराची अवगति होते. दुसरें अधिक कार्य हे विशेष अर्थ घेण्याकरतां आहे. अपादान शब्दानें गौण ही अपादान घ्यावयाचें. तिसरें—अधिकः कारः = शक्तीच्या बाहेरही काम करणें हें प्रयोजन पूर्वविप्रतिषेधाचें प्रत्याख्यान करण्याकरितां आहे.

याप्रमाणें भगवान् पतंजलींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्याच्या पहिल्या अध्यायाच्या तिसऱ्या पादांतील पहिलें आन्हिक समाप्त झालें.

## [1]अनुदात्तङित आत्मनेपदम् ॥१।३।१२॥

विकरणेभ्यः प्रतिषेधो वक्तव्यः । चिनुतः सुनुतः लुनीतः पुनीतः । ङित इत्यात्मनेपदं प्राप्नोति ॥ नैष दोषः । नैवं विज्ञायते ङकार इदस्य सोऽयं ङित् ङित इति । कथं तर्हि । ङकार एवेत् ङित् ङित इति ॥ अथवोपदेश इति वर्तते ॥ अथवोक्तमेतत्सिद्धं तु पूर्वस्य कार्यातिदेशादिति ॥ सर्वथा चङङ्भ्यां प्राप्नोति । एवं तर्हि धातोरिति वर्तते । क्व प्रकृतम् । भूवादयो धातवः [१.३.१] इति । तद्वै प्रथमानिर्दिष्टं पञ्चमीनिर्दिष्टेन चेहार्थः । अर्थाद्विभक्तिविपरिणामो भविष्यति । तद्यथा । उच्चानि देवदत्तस्य गृहाणि । आमन्त्रयस्वैनम् । देवदत्तमिति गम्यते । देवदत्तस्य गावोऽश्वा हिरण्यं च । आढ्यो वैधवेयः । देवदत्त इति गम्यते । पुरस्तात्षष्ठीनिर्दिष्टं सदर्थात्प्रथमानिर्दिष्टं द्वितीयानिर्दिष्टं च भवति । एवमिहापि पुरस्तात्प्रथमानिर्दिष्टं सदर्थात्पञ्चमीनिर्दिष्टं भविष्यति ॥

---

(सू.१२) विकरणप्रत्ययांपुढील लकाराचे स्थानीं ह्या आत्मनेपदाचा निषेध करावा; जसें— चिनुतः सुनुतः लुनीतः येथें श्नु (३।१।७३) आणि श्ना (३।१।८१) हे विकरणप्रत्यय ङित् (१।२।४) असल्यामुळें त्यांचेपुढें आत्मनेपद प्राप्त होत आहे.

हा दोष येत नाहीं. कारण ङकार आहे इत्संज्ञक ज्याचा तो ङित्. त्या ङिताहून असा 'ङित्' या पदाचा अर्थ गृहीत धरला जात नाहीं.

तर कसा ?

ङकाररूप जो इत्संज्ञक तो ङित् तदन्ताहून असा अर्थ गृहीत धरला[2] आहे. किंवा 'उपदेशेऽजनु.' (१।२।३) येथून उपदेशे हें पद येथें अनुवृत्त होत आहे. तेव्हां उपदेशांत ङकार जोडला असेल तरच आत्मनेपद होतें. अथवा 'सिद्धं तु पूर्वस्य कार्यातिदेशात्' (१।२।१, वा.७) असें पूर्वी सांगितलेंच आहे.

कोणताही प्रकार असला तरी चङ् आणि अङ् यांच्यापुढें आत्मनेपद प्राप्त होत आहे.

असें आहे तर पूर्वसूत्रांतून धातोः या पदाची येथें अनुवृत्ति करितां येईल.

पूर्वसूत्रामध्यें कोठें 'धातोः' हें पद केलेलें आहे ?

'भूवादयो धातवः' (१।३।१) या सूत्रामध्यें.

पण तें धातुग्रहण प्रथमा विभक्ति लावून उच्चारलें आहे. आणि येथें तर पञ्चमी लावून उच्चारलेलें पाहिजे.

उपयोगाला अनुसरून विभक्ति पालटण्यांत येईल. जसें— देवदत्ताचीं घरें उंच उंच आहेत असें सांगून पुढें 'त्याला हाक मार' असें म्हटलें असतां 'त्या देवदत्ताला' असा अर्थ साहजिकच मनांत येतो, तसेंच बैल, घोडे आणि सोनें हें सर्व देवदत्ताचें आहे असें सांगून पुढें रांडलेक गबर आहे असें म्हटलें असतां तो देवदत्त गबर आहे असा अर्थ मनांत येतो. म्हणजे देवदत्त हा शब्द पूर्ववाक्यामध्यें षष्ठी विभक्ति लावून उच्चारला असतांही पुढें प्रथमा किंवा द्वितीया विभक्ति लावून त्याचा संबंध मनांत येतो. त्याप्रमाणें येथेंही पूर्वसूत्रामध्यें प्रथमा विभक्ति लावून उच्चारलेला असाही धातु शब्द तेथें पंचमी विभक्ति लावून घेतां येईल.

आतां हें सूत्र कशासाठीं केलें आहे ?

---

१. अनुदात्तेत्संज्ञक आणि ङकारेत्संज्ञक धातूंच्या पुढील लकाराचे स्थानीं आत्मनेपदच होतें; उदा०— आस्ते, शेते.

२. श्नु वगैरे विकरणप्रत्यय अतिदेशानें (१।२।४) ङित् समजले तरी त्या प्रत्ययांचे शेवटीं ङकार इत्संज्ञक असत नाहीं.

किमर्थं पुनरिदमुच्यते ।

**आत्मनेपदवचनं नियमार्थम् ॥१॥**

नियमार्थोऽयमारम्भः । किमुच्यते नियमार्थोऽयमिति न पुनर्विध्यर्थोऽपि स्यात् ।

**लविधानाद्विहितम् ॥ २ ॥**

लविधानाद्ध्यात्मनेपदं परस्मैपदं च विहितम् ॥ अस्ति प्रयोजनमेतत् । किं तर्हीति । विकरणैस्तु व्यवहितत्वान्नियमो न प्राप्नोति । इदमिह संप्रधार्यम् । विकरणाः क्रियन्तां नियम इति किमत्र कर्तव्यम् । परत्वाद्विकरणाः । नित्याः खल्वपि विकरणाः । कृतेऽपि नियमे प्राप्नुवन्त्यकृतेऽपि प्राप्नुवन्ति । नित्यत्वात्परत्वाच्च विकरणेषु कृतेषु विकरणैर्व्यवहितत्वान्नियमो न प्राप्नोति ॥ नैष दोषः । अनवकाशो नियमः । सावकाशः । कोऽवकाशः । य एते लुग्विकरणाः श्लुविकरणा लिङ्लिटौ च ॥ यदि पुनरियं परिभाषा विज्ञायेत । किं कृतं भवति । कार्यकालं संज्ञापरिभाषं यत्र कार्यं तत्र द्रष्टव्यम् । लस्य तिबादयो भवन्तीत्युपस्थितमिदं भवत्य-

---

(वा.१) 'तिप्तस्झि' (३।४।७८) या सामान्य सूत्रानें परस्मैपदी आणि आत्मनेपदी असे सर्वच प्रत्यय सांगितले आहेत. त्यांपैकीं अनुदात्तेत्संज्ञक आणि ङकारेत्संज्ञक धातूंच्या पुढें आत्मनेपदच व्हावें, परस्मैपद होऊं नये, यासाठीं हें सूत्र केलें आहे.

परस्मैपदाच्या निवृत्तीसाठीं हें सूत्र केलें आहे असें कां म्हणतां? आत्मनेपदाच्या विधानासाठीं हें सूत्र केलें आहे असें कां म्हणत नाहीं?

(वा.२) 'तिप्तस्झि' (३।४।७८) या सूत्रानें लकाराचे स्थानीं परस्मैपदी आणि आत्मनेपदी अशा अठरा प्रत्ययांचें विधान केलें आहे. त्यानेंच आत्मनेपद विहित होत आहे.

सूत्रारंभाचें हें प्रयोजन आहे खरें, पण शप्, श्यन् वगैरे विकरणप्रत्ययांनीं व्यवधान असल्यामुळें तेथें वरील नियम लागू होणार नाहीं.

येथें असा विचार करावा की स्पर्ध वगैरे अनुदात्तेत् धातूंच्या पुढें अठरा लादेश केले असतां तेथें प्रथमतः विकरण करावेत, किंवा प्रकृतसूत्रानें त्या लादेशांचा नियम करावा.

यांत प्रथमतः काय करावें?

नियमापेक्षां पर असल्यामुळें प्रथमतः विकरण करावेत. शिवाय विकरण हे नित्यही आहेत; कारण नियम केला अथवा न केला तरीही ते प्राप्त होत आहेत. तेव्हां नित्यत्वास्तव आणि परत्वास्तव प्रथमतः विकरण केले असतां त्या विकरणांनीं व्यवधान येत असल्यामुळें तेथें आत्मनेपदच होतें हा नियम लागू होत नाहीं.

हा दोष येत नाहीं. कारण व्यवधान असल्यामुळें नियम लागू होत नसेल तर तो अनवकाश होईल. आणि म्हणूनच तो विकरणांच्या अगोदर लागू पडेल.

नियम हा सावकाश आहे.

तो अवकाश कोणता?

ज्या धातूंच्या पुढील विकरणाचा लुक् किंवा श्लु होतो तेथें, आणि जेथें विकरण होत नाहीं अशा म्हणजे आर्धधातुकसंज्ञक लिङ् किंवा लिट् प्रत्यय केले असतां तेथें, नियमाला अवकाश आहे.

आतां जर 'अनुदात्तङितः' ही परिभाषा समजली जाईल—

परिभाषा समजली तर काय होणार आहे?

तर संज्ञा आणि परिभाषा ह्या कार्यानें आकर्षण केल्या जातात म्हणून जेथें कार्य पठित आहे तेथें त्या उपस्थित होतात. तेव्हां 'तिप्तस्' या सूत्रामध्यें 'अनुदात्तङितः' व 'शेषात्कर्तरि' ह्या परिभाषा उपस्थित झाल्या असतां

नुदात्तङित आत्मनेपदं शेषात्कर्तरि परस्मैपदम् [१.३.७८] इति ॥ एवमपीतरेतराश्रयं भवति। केतरेतराश्रयता। अभिनिर्वृत्तानां लस्य स्थाने तिबादीनामात्मनेपदपरस्मैपदसंज्ञया भवितव्यं संज्ञया च तिबादयो भाव्यन्ते। तदितरेतराश्रयं भवति। इतरेतराश्रयाणि च न प्रकल्पन्ते॥ परस्मैपदेषु तावन्नेतरेतराश्रयं भवति। परस्मैपदानुक्रमणं न करिष्यते। अवश्यं कर्तव्यमनुपराभ्यां कृञः [१.३.७९] इत्येवमर्थम्। ननु चैतदप्यात्मनेपदानुक्रमण एव करिष्यते। स्वरितञितः कर्त्रभिप्राये क्रियाफले [१.३.७२] आत्मनेपदं भवति कर्तर्यनुपराभ्यां कृञो नेति॥ आत्मनेपदेषु चापि नेतरेतराश्रयं भवति। कथम्। भाविनी संज्ञा विज्ञास्यते सूत्रशाटकवत्। तद्यथा। कश्चित्कंचित्तन्तुवायमाह। अस्य सूत्रस्य शाटकं वयेति।

सर्वांच्या एकवाक्यतेनें महावाक्यार्थ होतो तो असा— लकाराचे स्थानीं तिबादिक आदेश असे होतात की ते अनुदात्त आणि ङित् धातूंच्या पुढील लकाराचे स्थानीं आत्मनेपदसंज्ञक होतात आणि इतर धातूंच्या पुढील लकाराचे स्थानीं परस्मैपदसंज्ञक होतात. अशा महावाक्यार्थानें व्यवस्थित लादेश केल्यानंतर मागूनच विकरणप्रत्यय होतो म्हणून कांहीं अडचण येत नाहीं.

तरीही अन्योन्याश्रयदोष येतो.

यांत कसा अन्योन्याश्रय येतो ?

लकाराचे स्थानीं केलेल्या तिबादिकांना आत्मनेपद व परस्मैपदसंज्ञा होणार आहेत, आणि आत्मनेपद व परस्मैपद या संज्ञा झालेले तिबादिकप्रत्यय लकाराचे स्थानीं होणार आहेत, असा अन्योन्याश्रय होतो. आणि अन्योन्यावर अवलंबून असलेलीं कार्यें तर अस्तित्वांतच येऊं शकत नाहींत.

परस्मैपदाविषयीं अन्योन्याश्रय येत नाहीं. कारण 'शेषात्कर्तरि परस्मैपदम्' (१।३।७८) या परस्मैपदविधानाचा आरंभच करण्यांत येणार नाहीं.[३]

पण परस्मैपद या संज्ञाशब्दानें लादेशांचें विधान 'अनुपराभ्यां कृञः' (१।३।७९) येथें आत्मनेपदाच्या बाधासाठीं अवश्य केलें पाहिजे ना ?

'अनुपराभ्यां कृञः' हें सूत्रही आत्मनेपदविधीच्या प्रकरणामध्येंच करण्यांत येईल.[४] तें असें— 'स्वरितञितः कर्त्रभिप्राये क्रियाफले' (१।३।७२), स्वरितेत्संज्ञक आणि ञकारेत्संज्ञक धातूंहून आत्मनेपद होतें, असें सांगून पुढें 'कर्तर्यनुपराभ्यां कृञो न'[५] असें सूत्र करण्यांत येईल.

आत्मनेपदाविषयींही अन्योन्याश्रयदोष येत नाहीं.

तो कसा ?

आत्मनेपद ही संज्ञा लादेश केल्यानंतर होणारी आहे असें समजूनच अगोदर आत्मनेपद हा शब्द काढला आहे. सूत्रशाटकाप्रमाणें हें होय. तें असें— कोणी एक मनुष्य कोष्टयाला म्हणतो की या सुताचा शेला वीण. तेव्हां तो कोष्टी विचार करतो की

३. पूर्वीं दाखविलेल्या महावाक्यार्थामध्यें 'इतर धातूंच्या पुढील लकाराचे स्थानीं परस्मैपदसंज्ञक प्रत्यय होतात' असें जें म्हटलें आहे तेथें 'परस्मैपदप्रत्यय' याच्या ऐवजीं 'इतर प्रत्यय' असें म्हटलें तरी काम भागेल. तेव्हां तिप्, तस् वगैरे नऊ प्रत्ययांचें परस्मैपद या शब्दानें विधान नसल्यामुळें अन्योन्याश्रयदोष येत नाहीं.

४. परस्मैपदप्रकरण आहे तें आत्मनेपदनिषेधप्रकरण करावें.

५. 'शेषात्कर्तरि' हें सूत्र मुळींच काढलें म्हणून त्यांतील 'कर्तरि' हें पद येथें घातलें आहे, आणि आत्मनेपदनिषेधाचें प्रकरण येथून चालू झाल्यामुळें न हें पद घातलें आहे.

स पश्यति यदि शाटको न वातव्योऽथ वातव्यो न शाटकः शाटको वातव्यश्चेति विप्रतिषिद्धम् । भाविनी खल्वस्य संज्ञाभिप्रेता स मन्ये वातव्यो यस्मिन्नुते शाटक इत्येतद्भवतीति । एवमिहापि स लस्य स्थाने कर्तव्यो यस्याभिनिर्वृत्तस्यात्मनेपदमित्येषा संज्ञा भविष्यति ॥ अथवा पुनरस्तु नियमः । ननु चोक्तं विकरणैर्व्यवहितत्वान्नियमो न प्राप्नोतीति । नैष दोषः । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति विकरणेभ्यो नियमो बलीयानिति यदयं विकरणविधावात्मनेपदपरस्मैपदान्याश्रयति । पुषादिद्युताद्यॢदितः परस्मैपदेषु [३.१.५५] आत्मनेपदेष्वन्यतरस्याम् [५४] इति । नैतदस्ति ज्ञापकम् । अभिनिर्वृत्तानि हि लस्य स्थान आत्मनेपदानि परस्मैपदानि च । यत्तर्ह्यनुपसर्गाद्वा [१.३.४३] इति विभाषां शास्ति ॥

किं पुनरयं प्रत्ययनियमः । अनुदात्तङित एवात्मनेपदं भवति भावकर्मणो-

---

विणून तयार झालेल्या वस्तूलाच शेला म्हणतात. तेव्हां शेला असेल तर त्यांत विणण्याचें कांहीं राहिलें नाहीं. आतां जर विणण्याचें राहिलें असेल तर हा शेलाच नव्हे असें होईल. शेला असें म्हणून त्याला वीण असें म्हणणें हें अगदीं परस्परविरुद्ध आहे. तेव्हां सुतें विणल्यानंतर ज्याला शेला हें नांव मिळेल असें वीण असा या गृहस्थाचा अभिप्राय आहे. त्याप्रमाणें येथेंही लकाराचें स्थानीं अशा प्रकारचा आदेश करावा की जो केला असतां त्याला आत्मनेपद ही संज्ञा होईल.

अथवा एकवाक्यता न करतां हा नियमच असूं दे.

पण स्पर्धते इत्यादि स्थलीं नित्यत्वास्तव आणि परत्वास्तव प्रथमतः विकरणप्रत्यय केले असतां त्या विकरणांनीं व्यवधान होत असल्यामुळें तेथें 'अनुदात्तङितः' हा नियम प्राप्त होणार नाहीं असा पूर्वीं दोष दिला आहे ना?

हा दोष येत नाहीं. कारण ज्यापेक्षां हा आचार्य 'पुषादिद्युताद्यॢदितः परस्मैपदेषु' (३।१।५५), 'आत्मनेपदेष्वन्यतरस्याम्' (३।१।५४) या ठिकाणीं विकरणप्रत्ययाचें विधान करतांना निमित्त म्हणून आत्मनेपद व परस्मैपद यांचा आश्रय करीत आहे त्यापेक्षां 'अनुदात्तङितः' इत्यादि नियम बलिष्ठ होय असें तो सुचवीत आहे.

हें ज्ञापक होऊं शकत नाहीं. कारण नियम जरी बलिष्ठ मानला नाहीं तरी तेथें लकाराचे स्थानीं सामान्य सूत्रानें केलेले जे तिबादिक प्रत्यय ते आत्मनेपद किंवा परस्मैपद अशा रूपानें विकरणोत्पत्तीविषयीं निमित्त धरतां येतात.

तर मग 'अनुपसर्गाद्वा' (१।३।४३) या सूत्रानें उपसर्गरहित अशा क्रम्-धातूच्या पुढील लकाराचे स्थानीं जें विकल्पानें आत्मनेपद सांगितलें आहे तें ज्ञापक[६] होईल.

पण काय अनुदात्तेत्संज्ञक किंवा ङकारेत्संज्ञकच धातूंच्या पुढील लकाराचे स्थानीं झालेलें आत्मनेपद कायम राहतें? तसेंच भावे किंवा कर्मणिच केलेल्या लकाराचे स्थानीं झालेलें आत्मनेपद कायम राहतें असा

---

६. हें सूत्र केलें नसतें तर 'शेषात्कर्तरि' या नियमानें फक्त परस्मैपदच राहिलें असतें. परंतु जर विकरणापेक्षां नियम बलिष्ठ नसेल तर क्रम्-धातूच्या पुढील लकाराचे स्थानीं सामान्य सूत्रानें अठरा प्रत्यय केल्यानंतर 'शेषात्कर्तरि' या नियमापेक्षां अगोदर विकरणप्रत्यय होईल आणि मग त्या विकरणानें व्यवधान येत असल्यामुळें नियमाची प्राप्तिच येणार नाहीं. त्यामुळें सर्वच प्रत्यय कायम राहून आपोआपच इष्ट रूपें साधतील. तेव्हां सूत्र व्यर्थ होऊन ज्ञापक होईल.

रेवात्मनेपदं भवतीति । आहोस्वित्प्रकृत्यर्थनियमः । अनुदात्तङित आत्मनेपदमेव भावकर्मणोरात्मनेपदमेवेति । कश्चात्र विशेषः ।

**तत्रप्रत्ययनियमे शेषवचनं परस्मैपदस्यानिवृत्तत्वात् ॥ ३ ॥**

तत्र प्रत्ययनियमे शेषग्रहणं कर्तव्यं परस्मैपदनियमार्थम् । शेषात्कर्तरि परस्मैपदम् [१.३.७८] इति । किं कारणम् । परस्मैपदस्यानिवृत्तत्वात् । प्रत्यया नियताः प्रकृत्यर्थावनियतौ तत्र परस्मैपदमपि प्राप्नोति । तत्र शेषग्रहणं कर्तव्यं परस्मैपदनियमार्थम् । शेषादेव परस्मैपदं भवति नान्यत इति ॥

**क्यष आत्मनेपदवचनं तस्यान्यत्र नियमात् ॥ ४ ॥**

क्यष आत्मनेपदं वक्तव्यम् । लोहितायति लोहितायते । किं पुनः कारणं न सिध्यति । तस्यान्यत्र नियमात् । तद्धयन्यत्र नियम्यते ॥ उच्यते च न च प्राप्नोति तद्वचनाद्भविष्यति ॥ अस्तु तर्हि प्रकृत्यर्थनियमः ।

**प्रकृत्यर्थनियमेऽन्याभावः ॥ ५ ॥**

प्रकृत्यर्थनियमेऽन्येषां प्रत्ययानामभा-

---

हा प्रत्ययनियम आहे किंवा अनुदात्तेत्संज्ञक अथवा ङकारेत्संज्ञक धातूंच्या पुढील लकाराचे स्थानीं झालेल्या तिबादिकांपैकीं आत्मनेपदच कायम राहतें असा प्रकृतिनियम आहे ? तसेंच भावार्थी किंवा कर्मार्थी केलेल्या लकाराचे स्थानीं झालेल्या तिबादिकांपैकीं आत्मनेपदच कायम राहतें असा अर्थनियम आहे ?

या दोन तऱ्हेच्या नियमांमध्यें काय फरक आहे ?

(वा.३) दोन तऱ्हेच्या नियमांमध्यें 'अनुदात्तङिताहूनच केलेलें आत्मनेपद कायम राहतें' असा प्रत्ययनियम गृहीत धरला तर अनुदात्तङित् धातूंच्या पुढील परस्मैपदाच्या निवृत्तीसाठीं 'शेषात्कर्तरि' (१।३।७८) हें सूत्र केलें पाहिजे. काय कारण ? अनुदात्तङित् धातूपुढील परस्मैपदाची निवृत्ति प्राप्त होत नाहीं. कारण प्रत्ययनियमांत आत्मनेपदी प्रत्यय अनुदात्तङित् धातूंच्याच पुढें व भाव आणि कर्म याच अर्थी डांबून ठेविले आहेत. पण अनुदात्तङित् धातु आणि भावकर्म हे अर्थ हे कांहीं आत्मनेपदाच्याच संबंधानें असे डांबले गेले नाहींत. तेव्हां अनुदात्तङित् धातूंचा आणि भाव आणि कर्म या अर्थांचा परस्मैपदाशींही संबंध होईल. तो न व्हावा याकरितां 'शेषात्' हें केलें पाहिजे. तें केलें असतां अनुदात्तङिदादि भिन्न धातूंहून केलेलें परस्मैपद कायम राहतें असा नियम झाल्यामुळें अनुदात्तङित् धातूंच्या पुढें केलेल्या परस्मैपदाची निवृत्ति होते.

(वा.४) प्रत्ययनियम गृहीत धरला असतां क्यष् प्रत्ययान्ताहून आत्मनेपद होण्याबद्दल वचन केलें पाहिजे; जसें— लोहितायति लोहितायते.

पण क्यषन्ताहून आत्मनेपद कां बरें होत नाहीं ?

तें आत्मनेपद अन्य ठिकाणीं म्हणजे अनुदात्तङित् धातूंचे ठिकाणींच निगडित केलें आहे.

क्यषन्ताहून परस्मैपदाचा विकल्प सांगितला असल्यामुळें अर्थात् आत्मनेपद सांगितलेंसें होतें. जरी अनुदात्तङिदादिकांचे ठिकाणींच निगडित केल्यामुळें प्राप्त होत नाहीं तरी 'वा क्यषः' या विकल्पविधीचे जोरावर होईल.

तर मग अनुदात्तङित् धातूंचे पुढें आत्मनेपदच होतें, तसेंच भाव आणि कर्म या अर्थी आत्मनेपदच होतें परस्मैपद होत नाहीं, असा प्रकृतिनियम व अर्थनियम असूं दे.

(वा.५) प्रकृतिनियम आणि अर्थनियम घेतला तर इतर प्रत्ययांचा अभाव होईल.

वः । अनुदात्तङितस्तृजादयो न प्राप्नुवन्ति । नैष दोषः । अनवकाशास्तृजादय उच्यन्ते च ते वचनाद्भविष्यन्ति । सावकाशास्तृजादयः । कोऽवकाशः। परस्मैपदिनोऽवकाशः। तत्रापि नियमान्न प्राप्नुवन्ति ॥ तव्यदादयस्तर्हि भावकर्मणोर्नियमान्न प्राप्नुवन्ति। तव्यदादयोऽप्यनवकाशाः। ते वचनाद्भविष्यन्ति ॥ चिण्तर्हि भावकर्मणोर्नियमान्न प्राप्नोति । चिणपि वचनाद्भविष्यति ॥ घञ्तर्हि भावकर्मणोर्नियमान्न प्राप्नोति । तत्रापि प्रकृतं कर्मग्रहणमनुवर्तते । क्व प्रकृतम् । अण्कर्मणि च [३.३.१२] इति ॥ तद्वै तत्रोपपदविशेषणमभिधेयविशेषणेन चेहार्थः । न चान्यार्थं प्रकृतमन्यार्थं भवति । न खल्वप्यन्यत्प्रकृतमनुवर्तनादन्यद्भवति न हि गोधा सर्पन्ती सर्पणादहिर्भवति ॥ यत्तावदुच्यते नान्यार्थं प्रकृतमन्यार्थं भवतीत्यन्यार्थमपि

म्ह. अनुदात्तङित् धातूंच्या पुढें आत्मनेपदाहून अन्य तृजादिप्रत्यय होणार नाहींत.

हा दोष येत नाहीं. कारण तृजादिप्रत्यय अनवकाश आहेत. तेव्हां त्या तृजादिकांचें विधान केल्याचे जोरावर ते होतील.

पण तृजादिक प्रत्यय सावकाश आहेत ना?

तो अवकाश कोणता?

परस्मैपदी धातु हा तृजादिप्रत्ययांना अवकाश होय.

तेथेंही इतर धातूंहून कर्ता या अर्थी परस्मैपदप्रत्ययच होतात (१।३।७८) असा नियम असल्यामुळें तृजादिक प्रत्यय प्राप्त होऊं शकत नाहींत.

तर मग भावार्थी किंवा कर्मार्थी आत्मनेपदच होतें असा नियम (३।१।१३) असल्यामुळें भाव आणि कर्म या अर्थी तव्यत् (३।१।९६) वगैरे प्रत्यय होणार नाहींत.

तव्यत् वगैरे प्रत्यय देखील अनवकाशच आहेत. सबब विधान केल्याचे जोरावर होतील.

तर मग त्याच नियमामुळें भाव आणि कर्म या अर्थी चिण् (३।१।६६) प्रत्यय होणार नाहीं.

चिण् प्रत्यय देखील विधान केल्याचे जोरावरच होईल.

तर मग त्याच नियमामुळें भाव आणि कर्म या अर्थी घञ्प्रत्यय (३।१।१८।१९) होणार नाहीं.

तेथेंही पूर्वी केलेलें कर्मग्रहण अनुवृत्त होत आहे.

पूर्वी म्हणजे कोठें कर्मग्रहण केलें आहे?

'अण् कर्मणि च' (३।३।१२) येथें.

पण तें तेथें धातूच्या मागील उपपद दाखविणारें आहे, आणि येथें तर प्रत्ययाचा अर्थ दाखविणारें अशा स्वरूपाचें पाहिजे आहे. एका कार्याकरितां उच्चारलेलें पद पुढें चालू झालें म्हणून तेवढ्यानें तें दुसऱ्या कार्याकडे उपयोगीं पडणार नाहीं. बरें, पूर्वसूत्रामध्यें निराळ्या स्वरूपाचा कर्म-शब्द अनुवृत्त झाल्यामुळें येथें निराळ्या स्वरूपाचा बनत नाहीं. कारण घोरपड ही फरपटत दुसऱ्या प्रदेशांत गेली म्हणून तेवढ्यानें तिचा कांहीं साप बनत नाहीं.

एक प्रकारच्या कार्याकरितां उच्चारलेल्या पदाचा दुसऱ्या प्रकारच्या कार्याकडे उपयोग होत नाहीं असें वर म्हटलें आहे खरें, परंतु एका उपयोगासाठीं तयार केलेल्या वस्तूचा

७. एकंदरींत तृजादि प्रत्यय अनवकाश असल्यामुळें ते प्रत्यय नियमांना मागें सारून होतील.

८. कर्तृभिन्न कारक या अर्थी घञ् सांगितला आहे. तेव्हां त्याला अपादान वगैरे इतर अर्थी अवकाश आहे.

९. आणि भावे असें तेथें म्हटलेंच आहे, तेव्हां भाव आणि कर्म या अर्थी घञ् प्रत्यय सांगितला आहे तो अनवकाश होत आहे.

प्रकृतमन्यार्थं भवति। तद्यथा। शाल्यर्थं कुल्याः प्रणीयन्ते ताभ्यश्च पानीयं पीयत उपस्पृश्यते च शालयश्च भाव्यन्ते। यद्प्युच्यते न खल्वप्यन्यत्प्रकृतमनुवर्तनाद्न्यद्भवति न हि गोधा सर्पन्ती सर्पणादहिर्भवतीति भवेद्द्रव्येष्वेतदेवं स्यात्। शब्दस्तु खलु येन येनाभिसंबध्यते तस्य तस्य विशेषको भवति॥

**शेषवचनं च ॥६॥**

शेषग्रहणं च कर्तव्यम्। शेषात्कर्तरि परस्मैपदम् [१.३.७८] इति। किं प्रयोजनम्। शेषनियमार्थम्। प्रकृत्यर्थौ नियतौ प्रत्यया अनियतास्ते शेषेऽपि प्राप्नुवन्ति। तत्र शेषग्रहणं कर्तव्यम्। शेषात्कर्तरि परस्मैपदमेव नान्यदिति॥

**कर्तरि चात्मनेपदविषये परस्मैपदप्रतिषेधार्थम् ॥७॥**

कर्तरि चात्मनेपदविषये परस्मपदप्रतिषेधार्थं द्वितीयं शेषग्रहणं कर्तव्यम्। शेषाच्छेष इति वक्तव्यम्। इह मा भूत्। भिद्यते कुशूलः स्वयमेवेति॥ कतरस्मिन्पक्षेऽयं दोषः। प्रकृत्यर्थनियमे। प्रकृत्यर्थनियमे ता-

---

दुसऱ्या तऱ्हेनेंही उपयोग होतो; जसें— व्रीहि वगैरे धान्य पिकविण्यासाठीं पाटबंधारे केले जातात त्या ठिकाणीं स्नानपान वगैरेही केलें जातें आणि धान्यही पिकविलें जातें. तसेंच आणखीही निराळ्या स्वरूपाचा कर्म-शब्द अनुवृत्त झाल्यामुळें निराळ्या स्वरूपाचा बनत नाहीं. कारण घोरपड ही फरपटत दुसऱ्या प्रदेशांत गेली म्हणून तेवढ्यानें तिचा कांहीं साप बनत नाहीं असें जें म्हटलें आहे तें म्हणणें पदार्थाविषयीं बरोबर आहे; पण शब्द हा ज्या ज्या विशिष्ट अर्थाशीं संबद्ध होतो त्या त्या अर्थाला अनुसरून तो त्यांतील विशेष दाखवितो.

(वा.६) शिवाय अनुदात्तङित् धातूंहून आत्मनेपदच होतें असा प्रकृतिनियम केला असतांही 'शेषात्कर्तरि' हें सूत्र केलेंच पाहिजे.

काय उपयोग ?

अनुदात्तङित् यांखेरीज इतर धातूंना निगडित करण्यासाठीं. अनुदात्तङित् वगैरे धातु आणि भाव, कर्म वगैरे अर्थ हे आत्मनेपदामध्येंच निगडित झाले. परंतु आत्मनेपदप्रत्यय हे कोणत्याच धातूसंबंधानें निगडित झाले नाहींत. ते आत्मनेपदप्रत्यय अनुदात्तङितांखेरीज इतर धातूंच्याही पुढें येतील. त्यासाठीं 'शेषात्' हें सूत्र केलें पाहिजे. अनुदात्तङितांखेरीज इतर धातूंच्या पुढें परस्मैपदच करावें, अन्य करूं नये, असा नियम झाल्यामुळें इतर धातूंच्या पुढें आत्मनेपद होत नाहीं.

(वा.७) आत्मनेपदाला लायक अशा कर्मकर्तरि प्रयोगामध्यें परस्मैपद न व्हावें यासाठीं दुसरा शेष-शब्द सूत्रामध्यें घालावा, म्ह. 'शेषाच्छेषे परस्मैपदम्' असें सूत्र करावें; उदा. भिद्यते कुशूलः स्वयमेव.

दुसरा शेष शब्द घातला नाहीं तर जो दोष दिला तो प्रत्ययनियम किंवा प्रकृत्यर्थनियम यांपैकीं कोणता पक्ष घेऊन हा दोष देत आहांत ?

---

१०. भिद्यते हा येथें कर्तरि प्रयोगच आहे. परंतु कर्मवद्भावानें (३।१।८७) कर्मणिप्रयोगासारखा हा समजला जातो. म्हणून अशा प्रयोगाला कर्मकर्तरि प्रयोग म्हणतात. 'शेषात्कर्तरि' (१।३।७८) येथें प्रकृतिनियम व अर्थनियम घेतला तर अनुदात्तङिद्व्यतिरिक्त धातूंहून कर्तरिप्रयोगामध्यें परस्मैपदच करावें असा अर्थ होईल. तेव्हां भिद्यते असें आत्मनेपद होणार नाहीं असा दोष येतो. 'शेषाच्छेषे' असें म्हटलें म्हणजे अनुदात्तङिद्व्यतिरिक्त धातूहून भावकर्मव्यतिरिक्त अर्थी परस्मैपदच होतें असा अर्थ होईल. तेव्हां भिद्यते येथें हें सूत्र प्रवृत्त होत नाहीं. कर्मवद्भावानें कर्मणि प्रयोगासारखा हा प्रयोग समजला असल्यामुळें येथें भावकर्मव्यतिरिक्त अर्थ होत नाहीं.

वन्न दोषः। प्रकृत्यर्थौ नियतौ प्रत्यया अनियतास्तत्र नार्थः कर्तृग्रहणेन कर्तृग्रहणाच्चैष दोषः॥ प्रत्ययनियमे तर्ह्ययं दोषः। प्रत्यया नियताः प्रकृत्यर्थावनियतौ तत्र कर्तृग्रहणं कर्तव्यं भावकर्मणोर्निवृत्त्यर्थम्। कर्तृग्रहणाच्चैष दोषः॥ प्रकृत्यर्थनियमे शेषग्रहणं शक्यमकर्तुम्। कथम्। प्रकृत्यर्थौ नियतौ प्रत्यया अनियताः। ततो वक्ष्यामि परस्मैपदं भवतीति। तन्नियमार्थं भविष्यति। यत्र परस्मैपदं चान्यच्च प्राप्नोति तत्र परस्मैपदमेव भवतीति॥ तर्हि प्रत्ययनियमे द्वितीयं शेषग्रहणं कर्तव्यम्। न कर्तव्यम्। योगविभागः करिष्यते। अनुदात्तङित आत्मनेपदम्। ततो भावकर्मणोः। ततः कर्तरि। कर्तरि चात्मनेपदं भवति भावकर्मणोः। ततः कर्मव्यतिहारे। कर्तरीत्येव।

---

प्रकृत्यर्थनियमपक्षीं तो दोष येतो.

प्रकृत्यर्थनियमपक्षीं तर हा दोष येणार नाहीं. कारण त्या पक्षीं अनुदात्तङित् धातूंच्या पुढें आत्मनेपदच होतें. तसेंच भाव किंवा कर्म या अर्थी आत्मनेपदच होतें. अशा रीतीनें प्रकृति आणि अर्थ हे आत्मनेपदासंबंधानेंच निगडित झालें आहेत. प्रत्यय मात्र मोकळेच आहेत. अशा स्थितींत 'शेषात्' या सूत्रांतील कर्तरि हा शब्द काढूनच टाकला म्हणजे काम भागेल कारण त्या कर्तृग्रहणामुळेंच हा दोष उद्भवतें[11] आहे.

तर मग प्रत्ययनियमपक्षीं हा दोष आम्ही पुढें करतों. कारण त्या पक्षीं अनुदात्तङित् धातूंच्या पुढेंच आणि भाव व कर्म या अर्थींच आत्मनेपद करावें. अशा रीतीनें प्रत्यय निगडित होतात, परंतु अनुदात्तङित् धातु आणि भाव व कर्म हे अर्थ मोकळेच राहतात. अशा स्थितींत 'शेषात्' या सूत्रांतील कर्तृग्रहण तर टाकतां येत नाहीं. कारण भावे प्रयोगामध्यें आणि कर्मणिप्रयोगामध्यें शेषात् हा नियम लागू पडूं नये याकरितां तें कर्तृग्रहण सूत्रामध्यें ठेवलेंच पाहिजे. आणि त्या कर्तृग्रहणामुळेंच हा दोष उद्भवत आहे.

आतां येथें विचार करितां प्रकृतिनियम व अर्थनियम हा पक्ष घेतला असतां शेषात् हें देखील शेषग्रहण काढून टाकतां येईल.

तें कसें ?

अनुदात्तङित् वगैरे धातु आणि भाव, कर्म वगैरे अर्थ असतांना आत्मनेपदच होतें अशा रीतीनें ते आत्मनेपदासंबंधानें निगडित झालेच आहेत. आतां प्रत्यय मात्र मोकळे राहिले आहेत, त्याकरितां 'परस्मैपदम्' एवढेंच करावें. शेषात् व कर्तरि हे कांहींच नको. 'परस्मैपदम्' हें सूत्र नियमार्थ होईल. तें असें की ज्या ठिकाणीं परस्मैपदी व त्याहून निराळे म्हणजे आत्मनेपदी असे दोन्ही प्रकारचे[12] प्रत्यय प्राप्त होतात तेथें परस्मैपदच होतें.

तर मग आतां प्रत्ययनियमपक्षीं शेषात् ह्या सूत्रीं दुसरें शेषग्रहण केलें पाहिजे.[13]

तें करावयास नको. योगविभाग केल्यानें काम भागेल. तो असा— अनुदात्तङित आत्मनेपदम्' या सूत्राच्या पुढील 'भावकर्मणोः' या सूत्रापुढें असलेल्या सूत्रांतील 'कर्तरि' हें पद अलग करून तेवढेंच एक सूत्र मानावयाचें. तेथें आत्मनेपदम् व भावकर्मणोः या दोन पदांची अनुवृत्ति आहे. भावकर्मणोः हें कर्तरि याचें विशेषण समजावयाचें. तेव्हां कर्म असा जो कर्ता, अर्थात् कर्मकर्ता, त्या

---

११. अनुदात्तङिद्व्यतिरिक्त धातूंच्या पुढें कर्तरिप्रयोगामध्यें परस्मैपदच होतें. ह्या नियमानें भिद्यते कुशूलः येथें 'भावकर्मणोः' या नियमाचा परतवास्तव बाध करून परस्मैपद होऊं लागेल.

१२. भिद्यते कुशूलः येथें 'भावकर्मणोः' या नियमानें आत्मनेपदच प्राप्त होतें. म्हणून हा नियम तेथें लागूं होत नाहीं.

१३. नाहीं तर कर्मकर्तरिप्रयोगामध्यें 'शेषात्०' हा नियम येऊन परस्मैपद होऊं लागेल.

भावकर्मणोरिति निवृत्तम् ॥ यथैव तर्हि कर्मणि कर्तरि भवत्येवं भावेऽपि कर्तरि प्राप्नोति । एति जीवन्तमानन्दः । नास्य किंचिद्रुजतीति ॥ द्वितीयो योगविभागः करिष्यते । अनुदात्तङित आत्मनेपदम् । ततो भावे । ततः कर्मणि । कर्मणि चात्मनेपदं भवति । ततः कर्तरि । कर्तरि चात्मनेपदं भवति । कर्मणीत्यनुवर्तते भाव इति निवृत्तम् । ततः कर्मव्यतिहारे । कर्तरीत्येव । कर्मणीति निवृत्तम् ॥ एवमपि शेषग्रहणं कर्तव्यमनुपराभ्यां कृञः [१.३.७९] इत्येवमर्थम् । इह मा भूत् । अनुक्रियते स्वयमेव । पराक्रियते स्वयमेव । ननु चैतदपि योगविभागादेव सिद्धम् । न सिध्यति । अनन्तरा या प्राप्तिः सा योगविभागेन शक्या बाधितुम् । कुत एतत् । अनन्तरस्य विधिर्वा भवति प्रतिषेधो वेति ।

---

कर्मकर्ता या अर्थी केलेल्या लकाराचे स्थानीं आत्मनेपद होतें, असा त्याचा अर्थ. तेव्हां हें स्वतन्त्र विधान झाल्यामुळें कर्मकर्तरिप्रयोगामध्यें दोष येत नाहीं. त्याचें पुढें 'कर्मव्यतिहारे' एवढें दुसरें सूत्र. येथें कर्तरि या पदाची अनुवृत्ति आहेच. भावकर्मणोः हें मात्र निवृत्त झालें आहे.

भावकर्मणोः हें कर्तरि याचें विशेषण केल्यामुळें कर्मकर्तरि प्रयोगामध्यें जसें आत्मनेपद होतें त्याप्रमाणें भावकर्तरिही आत्मनेपद होऊं लागेल; जसें– एति जीवन्तमानन्दः, नास्य किंचिद्रुजति.[१४]

दुसरा योगविभाग करण्यांत येईल, तो असा– 'अनुदात्तङित आत्मनेपदम्' या सूत्रापुढील 'भावकर्मणोः' या सूत्रामध्यें 'भावे' एवढेंच सूत्र निराळें करून त्याचेपुढें 'कर्मणि' असें दुसरें सूत्र करावें. भावार्थी किंवा कर्मार्थी लकाराचे स्थानीं आत्मनेपद होतें असा त्या दोन्ही सूत्रांचा अर्थ. पुढें 'कर्तरि' हें सूत्र. येथें कर्मणि हें मागील पद अनुवृत्त आहे. त्याच्या मागील भावे हें पद येथें निवृत्त झालें आहे. तेव्हां 'कर्तरि' या विभक्त सूत्रानें कर्मकर्तरि प्रयोगांतच तेवढें आत्मनेपदाचें स्वतन्त्र विधान होत आहे. भावकर्तरि आत्मनेपदाचें स्वतंत्र विधान होत नसल्यामुळें पूर्वोक्त स्थलीं दोष येत नाहीं. पुढें 'कर्मव्यतिहारे' हें सूत्र आहे. तेथें कर्तरि या पदाची अनुवृत्ति आहेच. कर्मणि हें मात्र निवृत्त झालें आहे.

अशा रीतीनें 'भिद्यते कुशूलः स्वयमेव' या कर्मकर्तरि प्रयोगामध्यें प्राप्त झालेल्या परस्मैपदाचें निवारण झालें तरी देखील 'अनुक्रियते स्वयमेव,' 'पराक्रियते स्वयमेव' या कर्तरि प्रयोगांमध्यें 'अनुपराभ्यां कृञः' (१।३।७९) या सूत्रानें परस्मैपद न व्हावें म्हणून तेथें अनुवृत्त होण्याकरितां 'शेषात् कर्तरि' (१।३।७८) या सूत्रामध्यें दुसरा म्हणजे सप्तम्यन्त शेष शब्द घातला पाहिजे. 'भिद्यते कुशूलः स्वयमेव' याप्रमाणें येथें देखील 'कर्तरि' या योगविभागानें काम भागेल.

तसें काम भागणार नाहीं. कारण 'अनुपराभ्याम्' यापेक्षां 'शेषात्' हें सूत्र कर्तरि या योगविभागाला जवळ असल्यामुळें त्याचा फक्त योगविभागाकडून बाध होणें शक्य आहे.

हे कशावरून ?

विधि किंवा निषेध हा आपल्याजवळच्याचाच होतो, दूरच्याचा होत नाहीं अशी परिभाषा आहे. तेव्हां योगविभागाकडून दूरच्या 'अनुपराभ्याम्' या परस्मैपदप्राप्तीचा बाध होणार नाहीं. म्हणून अनुक्रियते पराक्रियते स्वयमेव येथें 'अनुपराभ्याम्' या सूत्रानें

---

१४. 'मनुष्य जिवंत असला म्हणजे त्याला केव्हां ना केव्हां तरी आनंद होणारच', हलीं याला कोणतेंही दुखणें पीडा देत नाहीं', येथें आनंद आणि दुखणें हे भावच क्रियेचे कर्ते आहेत.

परा प्राप्तिरप्रतिषिद्धा तया प्राप्नोति । ननु चेयं प्राप्तिः परां प्राप्तिं बाधते । नोत्सहते प्रतिषिद्धा सती बाधितुम् ॥ एवं तर्हि कर्तरि कर्मव्यतिहारे [१.३.१४] इत्यत्र कर्तृग्रहणं प्रत्याख्यायते तत्प्रकृतमुत्तरत्रानुवर्तिष्यते । शेषात्कर्तरि कर्तरीति । किमर्थमिदं कर्तरि कर्तरीति । कर्तैव यः कर्ता तत्र यथा स्यात् । कर्ता चान्यश्च यः कर्ता तत्र मा भूदिति । ततोऽनुपराभ्यां कृञः । कर्तरि कर्तरीत्येव ॥

## [भावकर्मणोः ॥ १।३।१३ ॥]

## कर्तरि कर्मव्यतिहारे ॥ १।३।१४ ॥

क्रियाव्यतिहार इति वक्तव्यम् । कर्मव्यतिहार इत्युच्यमान इह प्रसज्येत । देवदत्तस्य धान्यं व्यतिलुनन्तीति । इह च न स्यात् । व्यतिलुनते व्यतिपुनत इति ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । क्रियां हि लोके कर्मेत्युपचरन्ति । कां क्रियां करिष्यसि । किं कर्म करिष्यसीति ॥ एवमपि कर्तव्यम् । कृत्रिमाकृत्रिमयोः

---

परस्मैपद होऊं लागेल.

पण पूर्वविप्रतिषेध घेतला असतां 'शेषात्कर्तरि' हें सूत्र पर अशाही 'अनुपराभ्याम्' याला मागें सारील ना ?

'कर्तरि' या योगविभागानें कर्मकर्तरि प्रयोगांमध्यें 'शेषात्' ह्या सूत्राचा बाध होतो. तेव्हां स्वतः बाधित झाल्यामुळें शेषात् हें सूत्र पूर्वविप्रतिषेध घेतला तरी तें दुसऱ्याचा बाध करण्याविषयीं उत्साह धरणार नाहीं.

असें आहे तर 'कर्तरि कर्मव्यतिहारे' येथील कर्तृग्रहणाचें प्रत्याख्यान केलें जाणार आहे, तरी पण तें तेथील कर्तृग्रहण 'शेषात्कर्तरि' या उत्तरसूत्रामध्यें अनुवृत्त होण्याकरितां ठेवण्यांत येईल. तेव्हां 'शेषात्' येथें कर्तरि कर्तरि असे दोन कर्तृ-शब्द झाले.

दोन कर्तृ-शब्दांचा तेथें काय उपयोग ?

कर्ता असा जो कर्ता म्हणजे मूळपासूनच जो कर्ता तशा ठिकाणींच परस्मैपद झालें पाहिजे. जो मूळचा कर्म असून पुढें कर्ता बनला आहे तशा ठिकाणीं म्हणजे कर्मकर्तरि प्रयोगामध्यें शेषात् यानें परस्मैपद होऊं नये. त्यांचे पुढें 'अनुपराभ्यां कृञः' येथेंही कर्तरि कर्तरि हें अनुवृत्त आहेच. तेव्हां तेंही सूत्र कर्मकर्तरिप्रयोगामध्यें येत नाहीं.

(सू. १४) कर्मव्यतिहारे याचे ऐवजीं क्रियाव्यतिहारे असें म्हणावे. कर्मव्यतिहारे असें म्हटलें असतां देवदत्तस्य धान्यं व्यतिलुनन्ति येथें आत्मनेपद होऊं लागेल. आणि व्यतिलुनते व्यतिपुनते येथें होणार नाहीं.

तर मग क्रियाव्यतिहारे असें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण लोकांमध्यें क्रियेला कर्म म्हण्याची वहिवाट आहे: जसें— कोणती क्रिया करशील याचे ऐवजीं कोणतें कर्म करशील असें म्हणतात. तेव्हां लोकांप्रमाणें शास्त्रांतही कर्म-शब्दानें क्रिया समजली जाईल.

तरी देखील 'क्रियाव्यतिहारे' असें म्हटलें पाहिजे. कारण 'कृत्रिमाकृत्रिमयोः कृत्रिमे कार्यसंप्रत्ययो भवति' असा न्याय आहे. तेव्हां कर्मशब्दानें कृत्रिम कर्म जें कर्मकारक त्याचें ग्रहण होईल.

---

१. भाव आणि कर्म या अर्थीं केलेल्या लकाराचे स्थानीं आत्मनेपद होतें; उदा०— ग्लायते भवता, क्रियते कटः.

१. एकाला योग्य असलेली क्रिया दुसऱ्यानें करणें, व दुसऱ्याला योग्य असलेली क्रिया पहिल्यानें करणें हा क्रियाविनिमय होय. अशा प्रकारचा क्रियाविनिमय विवक्षित असल्यास कर्तरिप्रयोगामध्यें लकाराचे स्थानीं आत्मनेपद होतें; उदा०— व्यतिलुनीते, व्यतिपुनीते.

२. देवदत्ताच्या मालकीचें धान्य कापून आणतात. तेथें धान्य या कर्मावरील एकाची मालकी जाऊन दुसऱ्याची उत्पन्न होणें असा कर्माचा विनिमय आहे.

३. याचा अर्थ मागें पहा (१।१।२३, वा. ३).

कृत्रिमे संप्रत्ययो भवति ॥ क्रियापि कृत्रिमं कर्म । न सिध्यति । कर्तुरीप्सिततमं कर्म [१.४.४९] इत्युच्यते कथं च क्रिया नाम क्रिययेप्सिततमा स्यात् । क्रियापि क्रिययेप्सिततमा भवति । कया क्रियया । संपश्यतिक्रियया प्रार्थयतिक्रिययाध्यवस्यतिक्रियया वा । इह य एष मनुष्यः प्रेक्षापूर्वकारी भवति स बुद्ध्या तावत्कंचिदर्थं संपश्यति संदृष्टे प्रार्थना प्रार्थितेऽध्यवसायोऽध्यवसाय आरम्भ आरम्भे निर्वृत्तिर्निर्वृत्तौ फलावाप्तिः । एवं क्रियापि कृत्रिमं कर्म ॥ एवमप्युभयोः कृत्रिमयोरुभयगतिः प्रसज्येत। तस्मात्क्रियाव्यतिहार इति वक्तव्यम् ॥ न वक्तव्यम् । इह कर्तरि व्यतिहार इतीयता सिद्धम् । सोऽयमेवं सिद्धे सति यत्कर्मग्रहणं करोति तस्यैतत्प्रयोजनं क्रियाव्यतिहारे यथा स्यात्कर्मव्यतिहारे मा भूदिति ॥

अथ कर्तृग्रहणं किमर्थम् ।

**कर्मव्यतिहारादिषु कर्तृग्रहणं भावकर्मनिवृत्त्यर्थम् ॥१॥**

---

क्रिया देखील कृत्रिम कर्म होऊं शकते.

क्रिया ही कृत्रिम कर्म होऊं शकत नाहीं. कारण 'कर्तुरीप्सिततमं कर्म' (१।४।४९) असें म्हटलें आहे. तेव्हां द्रव्य जसें क्रियेशीं संबंध पावतें तशी क्रियाच कशी क्रियेशीं संबंध पावूं शकेल.

क्रिया देखील क्रियेशीं संबंध पावते.

कोणत्या क्रियेशीं ?

पाहणी करणें, अभिलाष धारण करणें, निश्चय करणें, या क्रियांशीं इतर क्रिया संबंध पावतात. विचारी मनुष्य जी क्रिया करतो त्या क्रियेची प्रथमतः मनानें पाहणी करतो. नंतर ती क्रिया करावी असा त्या क्रियेसंबंधानें अभिलाष धारण करतो. नंतर त्या क्रियेसंबंधानें निश्चय करतो. नंतर त्या क्रियेचा प्रारंभ होतो. नंतर ती क्रिया शेवटाला जाते. नंतर त्या क्रियेचें फल मिळतें. तेव्हां द्रव्याप्रमाणें क्रियेचा देखील पाहणी करणें वगैरे क्रियांशीं संबंध होत असल्यामुळें क्रियेला कर्मसंज्ञा होण्यास कांहीं हरकत नाहीं. तेव्हां क्रियाही कृत्रिम कर्म होईल.

तरी देखील धान्य वगैरे इतर पदार्थ आणि क्रिया या उभयतांनाही कृत्रिम कर्मत्व असल्यामुळें कर्म शब्दापासून उभयतांची प्रतीति होईल म्हणून 'क्रियाव्यतिहारे' असें म्हटलें पाहिजे.

'क्रियाव्यतिहारे' असें म्हणावयास नको. कारण येथें 'कर्तरि व्यतिहारे' एवढेंच सूत्र केल्यानें काम भागतें. असें असतां ज्यापेक्षां 'कर्तरि कर्मव्यतिहारे' असा कर्म शब्द घातला आहे त्याचें हें प्रयोजन कीं क्रियाव्यतिहार असतांनाच आत्मनेपद व्हावें, आणि कर्मकारकाचा व्यतिहार असतांना होऊं नये.

आतां येथें कर्तरि हा शब्द कशाकरितां घातला आहे ?

(वा.१) कर्तरि कर्मव्यतिहारे इत्यादि सूत्रामध्यें जें कर्तरि असें म्हटलें आहे, तें भावेप्रयोगामध्यें आणि कर्मणिप्रयोगामध्यें

---

४. 'कर्तुरीप्सिततमम्' यानें क्रियेलाही कर्मसंज्ञा करितां येईल.

५. व्यतिहारे एवढेंच म्हटलें असतां तो व्यतिहार कोणाचा अशी आकांक्षा उत्पन्न होईल आणि लगच क्रियेचा असें शीघ्र मनांत येईल. कारण क्रिया ही धातुवाच्य असल्यामुळें अंतरंग आहे. आणि क्रियेचें उद्देश्य हे क्रियेपेक्षां मुख्य असल्यामुळें तेंही मनांत येईल. अशा रीतीनें कर्म शब्दाचें काम कर्मशब्दावांचून भागत आहे.

६. कर्म शब्द अधिक घालण्यांत आचार्यांचा उद्देश असा आहे की कर्म शब्दाचा जो लौकिक-अर्थ क्रिया तोच येथें घ्यावयाचा आहे.

७. ह्या सूत्रामध्यें कर्तरि असें प्रत्यक्ष म्हटलें आहे व पुढील सूत्रांत अनुवृत्तीनें कर्तरि असें

कर्मव्यतिहारादिषु कर्तृग्रहणं क्रियते भावकर्मणोरनेनात्मनेपदं मा भूदिति।

**इतरथा हि तत्र प्रतिषेधे भावकर्मणोः प्रतिषेधः ॥२॥**

अक्रियमाणे कर्तृग्रहणे भावकर्मणोरप्यनेनात्मनेपदं प्रसज्येत। तत्र को दोषः। तत्र प्रतिषेधे भावकर्मणोः प्रतिषेधः। तत्र प्रतिषेधे भावकर्मणोरप्यनेनात्मनेपदस्य प्रतिषेधः प्रसज्येत। व्यतिगम्यन्ते ग्रामाः। व्यतिहन्यन्ते दस्यव इति॥

**न वानन्तरस्य प्रतिषेधात् ॥३॥**

न वैष दोषः। किं कारणम्। अनन्तरस्य प्रतिषेधात्। अनन्तरं यदात्मनेपदविधानं तस्य प्रतिषेधात्। कुत एतत्। अनन्तरस्य विधिर्वा भवति प्रतिषेधो वेति। पूर्वा प्राप्तिरप्रतिषिद्धा तया भविष्यति। ननु चेयं प्राप्तिः पूर्वां प्राप्तिं बाधते। नोत्सहते प्रतिषिद्धा सती बाधितुम्॥ उत्तरार्थं तर्हि कर्तृग्रहणं कर्तव्यम्। न कर्तव्यम्। क्रियते तत्रैव शेषात्कर्तरि परस्मैपदम् [१.३.७८] इति। द्वितीयं कर्तृग्रहणं कर्तव्यम्। किं प्रयोजनम्।

---

ह्या सूत्रांनीं आत्मनेपद न व्हावें यासाठीं म्हटलें आहे.

(वा.२) कर्तरि हा शब्द न घातला तर भावेप्रयोगामध्यें आणि कर्मणि-प्रयोगामध्यें 'कर्तरि कर्मव्यतिहारे' या सूत्रानें आत्मनेपद होऊं लागेल.

तसें झालें असतां काय दोष येतो ?

कर्मव्यतिहारे (१।३।१४) या सूत्रानें सांगितलेल्या आत्मनेपदाचा जो 'न गतिहिंसार्थेभ्यः' (१।३।१५) यापुढील सूत्रानें निषेध केला आहे तो निषेध भावे-प्रयोगामध्यें आणि कर्मणिप्रयोगामध्यें 'भावकर्मणोः' (१।३।१३) यानें सांगितलेल्या आत्मनेपदाचाही होऊं लागेल उदा.— व्यतिगम्यन्ते ग्रामाः, व्यतिहन्यन्ते दस्यवः.

(वा.३) हा दोष येत नाहीं.

काय कारण ?

'न गतिहिंसार्थेभ्यः' हा निषेध जवळ असलेल्या 'कर्मव्यतिहारे' या आत्मनेपदाचाच आहे. दूरच्या 'भावकर्मणोः' या आत्मनेपदाचा नाहीं.

हें कशावरून ?

विधि आणि निषेध हे आपल्याजवळ जो असेल त्याचेच होतात, दूर असलेल्याचे होत नाहींत अशी परिभाषा आहे. तेव्हां 'भावकर्मणोः' यानें सांगितलेल्या आत्मनेपदाचा निषेध होत नसल्यामुळें त्यानें पूर्वोक्त उदाहरणीं आत्मनेपद होईल.

पण व्यतिगम्यन्ते ग्रामाः येथें 'कर्मव्यतिहारे' ही आत्मनेपदाची प्राप्ति, 'भावकर्मणोः' या आत्मनेपदप्राप्तीचा परत्वास्तव बाध करीत आहे ना ?

'न गतिहिंसार्थेभ्यः' यानें 'कर्मव्यतिहारे' या प्राप्तीचा निषेध केला असल्यामुळें स्वतः निषिद्ध झालेली ती 'भावकर्मणोः' या प्राप्तीचा बाध करण्याविषयीं उत्साह पावत नाहीं.

तर मग उत्तरसूत्रामध्यें अनुवृत्ति होण्याकरितां कर्तरि हा शब्द घातला पाहिजे.

तशाकरितांही घालावयास नको. कारण 'शेषात्कर्तरि' या सूत्रामध्यें 'कर्तरि' हा शब्द घातलाच आहे.

पण 'शेषात्कर्तरि' या सूत्रामध्यें आणखी एक 'कर्तरि' ह्या शब्दाची जरूर आहे. त्यासाठीं हा 'कर्तरि' शब्द उपयोगीं पडणार आहे.

तेंथें दुसऱ्या कर्तरि शब्दाचा काय उपयोग आहे ?

कर्ता असाच जो कर्ता म्हणजे मूळापासूनच

---

म्हटल्यासारखेंच होत आहे.

कर्तैव यः कर्ता तत्र यथा स्यात्। कर्ता चान्यश्च यः कर्ता तत्र मा भूदिति ॥

**न[1] गतिहिंसार्थेभ्यः १।३।१५॥**

**प्रतिषेधे हसादीनामुपसंख्यानम् ॥१॥**

प्रतिषेधे हसादीनामुपसंख्यानं कर्तव्यम्। व्यतिहसन्ति व्यतिजल्पन्ति व्यतिपठन्ति ॥

**हरिवह्योरप्रतिषेधः ॥२॥**

हरिवह्योरप्रतिषेधो भवतीति वक्तव्यम। संप्रहरन्ते राजानः। संविवहन्ते गर्गैरिति ॥ न वहिर्गत्यर्थः। देशान्तरप्रापणक्रियो वहिः ॥

**इतरेतरान्योन्योपपदाच्च ॥ १ । ३ । १६ ॥**

**परस्परोपपदाच्च ॥ १ ॥**

परस्परोपपदाच्चेति वक्तव्यम्। परस्परस्य व्यतिलुनन्ति। परस्परस्य व्यतिपुनन्ति ॥

**[नेर्विशः[1] ॥ १ । ३ । १७ ॥]**

**[परिव्यवेभ्यः क्रियः[1] ॥ १ । ३ । १८ ॥]**

**विपराभ्यां जेः[1] ॥ १ । ३ । १९ ॥**

उपसर्गग्रहणं कर्तव्यम्। इह मा भूत्। परा जयति सेनेति ॥ तत्तर्हि वक्तव्यम्।

---

जो कर्ता तसल्या कर्तरि-प्रयोगामध्येंच 'शेषात्' (१।३।७८) या सूत्रानें परस्मैपद व्हावें, आणि मूळचा कर्म असून पुढें जो कर्ता झाला आहे तसल्या ठिकाणीं म्हणजे कर्मकर्तरि-प्रयोगामध्यें त्यानें परस्मैपद न व्हावें.

(सू.१५, वा.१) ह्या निषेधप्रकरणामध्यें हस् वगैरे धातूंचा निर्देश करावा. हस् धातूसारखे शब्द करणें या अर्थाचे जे धातु त्यांहून क्रियाविनिमय असतांनाही आत्मनेपद होत नाहीं; उदा० –व्यतिहसन्ति, व्यतिजल्पन्ति, व्यतिपठन्ति.

(वा.२) हृ आणि वह् या धातूंना आत्मनेपदाचा निषेध लागू होत नाहीं; उदा०– संप्रहरन्ते राजानः, संविवहन्ते गर्गैः.

वह् धातु गति या अर्थाला केव्हांही दाखवीत नाहीं. कारण देशान्तराला पोचविणें हा वह् धातूचा मुख्य अर्थ आहे.

(सू.१६ वा.१) परस्पर हा शब्द उपपद असतांनाही आत्मनेपद करूं नये, असें वचन करावें; जसें– परस्परस्य व्यतिलुनन्ति, परस्परस्य व्यतिपुनन्ति.

(सू.१९) ह्या सूत्रामध्यें वि आणि परा हे उपसर्गच घ्यावेत. कारण परा[2] जयति सेना येथें आत्मनेपद न झालें पाहिजे.

---

१. गति किंवा हिंसा या अर्थाला दाखविणाऱ्या धातूंच्या पुढील लकाराचे स्थानीं क्रियाविनिमय द्योत्य असतां सांगितलेलें आत्मनेपद होत नाहीं; उदा०– व्यतिगच्छन्ति, व्यतिहिंसन्ति.

२. हसतांना बहुधा सूक्ष्म तरी शब्दोच्चार होतोच, या अभिप्रायानें शब्द करणें असें म्हटलें आहे.

३. पोचविणें ही क्रिया गमनक्रियेवांचून होत नाहीं. एखादी वस्तु पोचवितांना गमनक्रिया करावी लागते म्हणून कांहीं तेवढ्यावरून वह् धातूचा तो अर्थ होत नाहीं. संविवहन्ते गर्गैः या उदाहरणांत तर गर्गकुलाबरोबर विवाहसंबंध करतात असाच वह् धातूचा अर्थ आहे. एकंदरींत ह्या वार्तिकामध्यें वह् धातु धाकावयास नको असें सिद्ध होतें.

१. इतरेतर किंवा अन्योन्य हे शब्द ज्याच्या जवळ उच्चारित आहेत अशा धातूंच्या पुढील लकाराचे स्थानीं कर्मव्यतिहार द्योत्य असतांना प्राप्त झालेलें आत्मनेपद करूं नये; उदा०– इतरेतरस्य व्यतिलुनन्ति, अन्योन्यस्य व्यतिलुनन्ति.

१. नि या उपसर्गापुढील विश्-धातूच्या पुढें आत्मनेपद करावें; उदा०– निविशते.

१. परि, वि आणि अव या उपसर्गापुढील क्री-धातूंच्या पुढें आत्मनेपद करावें; उदा०– परिक्रीणीते, विक्रीणीते, अवक्रीणीते.

१. वि आणि परा या उपसर्गापुढील जि-धातूच्या पुढें आत्मनेपद करावें; उदा०– विजयते, पराजयते.

२. येथें परा हें सेनेचें विशेषण आहे, उपसर्ग नव्हे.

न वक्तव्यम् । यद्यपि तावदयं पराशब्दो दृष्टापचार उपसर्गश्चानुपसर्गश्चायं तु खलु विशब्दोऽदृष्टापचार उपसर्ग एव । तस्यास्य को ऽन्यो द्वितीयः सहायो भवितुमर्हत्यन्यदत उपसर्गात् । तद्यथा । अस्य गोर्द्वितीयेनार्थ इति गौरेवोपादीयते नाश्वो न गर्दभ इति ॥

## आङो दोऽनास्यविहरणे ॥ १ । ३ । २० ॥

### आङो दोऽव्यसनक्रियस्य ॥१॥

आङो दोऽव्यसनक्रियस्येति वक्तव्यम् । इहापि यथा स्यात् । विपादिकां व्याददाति । कूलं व्याददातीति ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । इहाङो दोऽनास्य इतीयता सिद्धम् । सोऽयमेवं सिद्धे सति यद्विहरणग्रहणं करोति तस्यैतत्प्रयोजनमास्यविहरणसमानक्रियादपि यथा स्यात् । यथाजातीयका चास्यविहरणक्रिया तथाजातीयकात्रापि ॥

### स्वाङ्गकर्मकाच्च ॥२॥

स्वाङ्गकर्मकाच्चेति वक्तव्यम् । इह मा भूत् । व्याददते पिपीलिकाः पतङ्गमुखमिति ॥

## क्रीडोऽनुसंपरिभ्यश्च ॥ १ । ३ । २१ ॥

---

तर मग तो उपसर्ग-शब्द घातला पाहिजे.

घालावयास नको. कारण जरी हा परा-शब्द उपसर्ग आणि तद्भिन्न अशा दोन्ही प्रकारचा आहे, तरी पण 'वि' हा शब्द फक्त उपसर्गच आहे, या गोष्टीला कोठेंही व्यभिचार नाहीं. तेव्हां अशा त्या वि-शब्दाचा जोडीदार म्हणून घातलेला परा हा शब्द उपसर्गाखेरीज दुसरा कोण बरें योग्य होणार आहे ? तें जसें 'या बैलाला जोडीदार पाहिजे' म्हणून दुसरा आणण्यास सांगितलें असतां बैलच आणण्यांत येतो, घोडें किंवा गाढव आणिलें जात नाहीं.

(सू.२०,वा.१) 'आङो दो' या सूत्रामध्यें[1] 'अनास्यविहरणे' याचे ऐवजीं 'अव्यसनक्रियस्य'[2] असा शब्द घालावा. कारण विपादिकां व्याददाति, कूलं व्याददाति येथेंही आत्मनेपदाचा निषेध झाला पाहिजे.

तर मग अव्यसनक्रियस्य असें सूत्रामध्यें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण येथें 'आङो दोऽनास्ये' एवढेंच सूत्र केल्यानें निर्वाह होत आहे.[3] असें असतां ज्यापेक्षां हा आचार्य विहरण शब्द घालीत आहे त्यापेक्षां त्याचा असा उपयोग आहे की आस्यविहरणासारख्या अर्थाला दाखविणाऱ्याही दा-धातूच्या पुढें आत्मनेपदाचा निषेध व्हावा. ज्या प्रकारची आस्यविहरण म्हणजे तोंड उघडणें ही क्रिया आहे त्या प्रकारचीच विपादिकां व्याददाति येथें फोड फोडणें ही क्रिया आहे.

(वा.२) दा-धातूचा अर्थ जी तोंड उघडणें ही क्रिया ती कर्त्यांच्या स्वतःच्या शरीरासंबंधीं असेल तर आत्मनेपदाचा निषेध होतो, असें वचन करावें; कारण व्याददते पिपीलिकाः पतङ्गस्य मुखम् येथें आत्मनेपदाचा निषेध न झाला पाहिजे.

(सू.२१) अनु, सम् आणि परि हे येथें उपसर्गच[1] घेण्यांत यावेत. कारण अनु क्रीडति

---

१. विदारणाहून भिन्न अर्थाला दाखविणाऱ्या आङ्पूर्वक दा धातूच्या पुढें आत्मनेपद करावें; उदा०- विद्यामादत्ते.

२. व्यसन म्हणजे विभागणें. विभागणें याशिवाय इतर अर्थीं आत्मनेपद होतें. विपादिकां व्याददाति म्हणजे पायाचा फोड फोडतो. फोडणें म्हणजे विभागणेंच होतें, तेव्हां येथें आत्मनेपद होत नाहीं.

३. धातु हा क्रियेचा दर्शक असल्यामुळें दा धातूचा अर्थ जी जी क्रिया ती मुखासंबंधीं नसावी असा अर्थ 'अनास्ये' याचा होईल. आणि तेवढ्यानें काम भागेल.

१. अनु, सम्, परि आणि आङ् या उपसर्गांपुढील क्रीड्-धातूच्या पुढें आत्मनेपद करावें; उदा०- अनुक्रीडते, संक्रीडते, परिक्रीडते, आक्रीडते.

उपसर्गग्रहणं कर्तव्यम्। इह मा भूत्। अनु क्रीडति माणवकमिति॥

समोऽकूजने ॥ १ ॥

समोऽकूजन इति वक्तव्यम्। इह मा भूत्। संक्रीडन्ति शकटानि॥

आगमेः क्षमायाम् ॥ २ ॥

आगमेः क्षमायामुपसंख्यानं कर्तव्यम्। आगमयस्व तावन्माणवक॥

शिक्षेर्जिज्ञासायाम् ॥ ३ ॥

शिक्षेर्जिज्ञासायामुपसंख्यानं कर्तव्यम्। विद्यासु शिक्षते। धनुषि शिक्षते॥

किरतेर्हर्षजीविकाकुलायकरणेषु ॥ ४ ॥

किरतेर्हर्षजीविकाकुलायकरणेषूपसंख्यानं कर्तव्यम्। अपस्किरते वृषभो हृष्टः। अपस्किरते कुक्कुटो भक्षार्थी। अपस्किरते श्वाश्रयार्थी॥

हरतेर्गतताच्छील्ये ॥ ५ ॥

हरतेर्गतताच्छील्य उपसंख्यानं कर्तव्यम्। पैतृकमश्वा अनुहरन्ते। मातृकं गावोऽनुहरन्ते॥

आङि नुप्रच्छयोः ॥ ६ ॥

आङि नुप्रच्छयोरुपसंख्यानं कर्तव्यम्। आनुते शृगालः। आपृच्छते गुरुमिति॥

आशिषि नाथः ॥ ७ ॥

---

माणवकम्[२] येथें आत्मनेपद न झालें पाहिजे.

(वा.१) सम् उपसर्गाच्या पुढील क्रीड् धातु हा शब्द करणें या अर्थाचा नसेल तरच त्याहून आत्मनेपद होतें असें म्हणावें. कारण [३]संक्रीडन्ति शकटानि येथें आत्मनेपद न झालें पाहिजे.

(वा.२) सहन करणें या अर्थाला दाखविणाऱ्या आङ्पूर्वक ण्यन्त गम् धातूच्या पुढें आत्मनेपद होतें, असें म्हणावें; जसें– आग[४]मयस्व तावत्.

(वा.३) जाणण्याची इच्छा करणें हा अर्थ गम्यमान असतां शिक्ष धातूहून आत्मनेपद होतें असें म्हणावें; जसें– विद्यासु शिक्षते, [५]धनुषि शिक्षते.

(वा.४) हर्ष, उपजीविका आणि कुलायकरण हे अर्थ गम्यमान असतांनाच कॄधातूहून आत्मनेपद होतें असें म्हणावें; जसें– अपस्किरते वृषभो हृ[६]ष्टः, अपस्किरते कुक्कुटो भक्षार्थी, अपस्किरते श्वा आश्रयार्थी.

(वा.५) स्वभावतःच दुसऱ्यासारखें वर्तन करणें हा अर्थ गम्यमान असतांना हृ धातूहून आत्मनेपद होतें, असें म्हणावें; जसें पैतृ[७]कमश्वा अनुहरन्ते, मातृकं गावोऽनुहरन्ते.

(वा.६) आङ् या या उपसर्गाच्या पुढील नु किंवा प्रच्छ् या धातूंहून आत्मनेपद होतें असें म्हणावें; जसें–[८]आनुते शृगालः, आपृच्छते गुरुम्. उत्कण्ठापूर्वक शब्द करणें या अर्थी आङ्पूर्वक नु धातु रूढ आहे.

(वा.७) हें मला मिळावें अशी जी इच्छा त्या अर्थींच नाथ-धातूहून आत्मनेपद होतें

---

२. माणवकासहवर्तमान खेळतो असा अर्थ आहे. येथें 'तृतीयार्थे' (१।४।८५) या सूत्रानें अनु शब्दाला कर्मप्रवचनीय संज्ञा झाल्यामुळें तिनें उपसर्गसंज्ञेचा बाध झाला आहे.

३. गाड्या शब्द करतात असा याचा अर्थ आहे.

४. जरा सहन कर (सोस), घाई करूं नकोस, असा येथें अर्थ आहे.

५. धनुर्विद्येचें ज्ञान व्हावें अशी इच्छा करतो, असा येथें अर्थ आहे.

६. बैल आनन्दित होऊन शिंगानें जमीन उकरतो, कोंबडा कांहीं खायला मिळेल म्हणून पायानें जमीन उकरतो, कुत्रा हा बसायला जागा नीट मिळावी म्हणून पायानें जमीन उकरतो, असा अर्थ आहे.

७. घोडे हे स्वभावतःच बापाच्या वळणावर जातात, गायी ह्या स्वभावतःच आईच्या वळणावर जातात, असा अर्थ आहे.

८. कोल्हा उत्कंठित होऊन शब्द करतो असा अर्थ आहे.

आशिषि नाथ उपसंख्यानं कर्तव्यम्। सर्पिषो नाथते। मधुनो नाथते॥

शप उपलम्भने ॥८॥

शप उपलम्भन उपसंख्यानं कर्तव्यम्। देवदत्ताय शपते। यज्ञदत्ताय शपते॥

संमवप्रविभ्यः स्थः ॥१।३।२२॥

आङः स्थः प्रतिज्ञाने ॥१॥

आङः स्थः प्रतिज्ञान इति वक्तव्यम्। अस्तिं सकारमातिष्ठते। आगमौ गुणवृद्धी आतिष्ठते। विकारौ गुणवृद्धी आतिष्ठते॥

[प्रकाशनस्थेयाख्ययोश्च ॥१।३।२३॥]

उदोऽनूर्ध्वकर्मणि ॥१।३।२४॥

उद ईहायाम् ॥१॥

उद ईहायामिति वक्तव्यम्। इह मा भूत्। उत्तिष्ठति सेनेति॥

उपान्मन्त्रकरणे ॥१।३।२५॥

उपाद्देवपूजासंगतकरणयोः ॥१॥

उपाद्देवपूजासंगतकरणयोरिति वक्त-

---

असें म्हणावें; जसें— सर्पिषो नाथते, मधुनो नाथते.

(वा.८) उपलम्भन हा अर्थ गम्यमान असतांना शप—धातूहून आत्मनेपद होतें असें म्हणावें; जसें— देवदत्ताय शपते, यज्ञदत्ताय शपते.

(सू.२२, वा.१) प्रतिज्ञान अर्थ गम्यमान असतांना आङ्-उपसर्गापुढील स्था-धातूहून आत्मनेपद होतें, असें म्हणावें. जसें— अस्तिं सकारमातिष्ठते, आगमौ गुणवृद्धी अतिष्ठते, विकारौ गुणवृद्धी अतिष्ठते.

(सू.२४, वा. १) उभें राहणें याशिवाय पण शरीराची हालचाल गम्यमान असेल तरच उद् उपसर्गापुढील स्था धातूहून आत्मनेपद होतें असें म्हणावें. कारण उत्तिष्ठति सेना येथें आत्मनेपद न झालें पाहिजे.

(सू.२५, वा.१) देवपूजा किंवा संगति करणें या अर्थाला दाखविणारा असा जो उप या उपसर्गापुढील स्था धातु त्याहून आत्मनेपद होतें असें म्हणावें. जसें— आदित्यमुप-

---

९. तूप मिळावें, मध मिळावा अशी इच्छा करतो, असा अर्थ आहे. नाथ्धातूहून 'अनुदात्तङितः' (१।३।१२) या सूत्रानें कोणत्याही अर्थी आत्मनेपद आलेलें आहे, तें फक्त 'मिळण्याची इच्छा' या एकाच अर्थी होतें, असा वार्तिकानें नियम केला आहे.

१०. उपलम्भन म्हणजे प्रकाशित करणें किंवा वाणीनें शरीरस्पर्श करणें. 'स्वरितञितः' (१।३।७२) या सूत्रानें शप्धातूहून आत्मनेपद आलेलेंच आहे; तरी तें क्रियाफल कर्तृगामी असतांनाच होईल. क्रियाफल परगामी असतांनाही आत्मनेपद व्हावें याकरितां हें वार्तिक केलें आहे.

१. सम्, अव, प्र आणि वि या उपसर्गापुढील स्थाधातूहून आत्मनेपद होतें; उदा०— संतिष्ठते, अवतिष्ठते, प्रतिष्ठते, वितिष्ठते.

२. प्रतिज्ञान म्हणजे निश्चित स्वरूपाचें बोलणें किंवा तसेंच मानणें. अस् धातु हा मूळचा केवल सकाररूप आहे असें मानतात; उदा०— स्तः सन्ति. त्या सकाराला गुण म्हणजे अकार आणि वृद्धि म्हणजे अकार असे आगम होतात; उदा०— अस्ति आसीत्. त्या सकाराला गुण म्ह. अकार आणि वृद्धि म्ह. आकार असे आदेश होतात; उदा० असि, आः.

१. आपला अभिप्राय प्रकाशित करणें किंवा विवादस्थलीं निवाडा देणारा असें समजणें हे अर्थ गम्यमान असतांना स्था-धातूहून आत्मनेपद होतें; उदा०— तिष्ठते कन्या छात्रेभ्यः, संशय्य कर्णादिषु तिष्ठते यः.

१. उभें राहणें याशिवाय इतर अर्थाचा आणि उद् या उपसर्गाच्या पुढें असणारा असा जो स्था धातु त्याहून आत्मनेपद होतें; उदा०— गेहे उत्तिष्ठते, मुक्तावुत्तिष्ठते. येथें यत्न करतो असा अर्थ आहे.

२. येथें सेना उत्पन्न होते असा अर्थ आहे.

१. मन्त्रानें केल्या जाणाऱ्या क्रियेचा वाचक जो स्था धातु त्याहून आत्मनेपद होतें; उदा०— ऐन्द्र्या गार्हपत्यमुपतिष्ठते. इंद्रदेवतेच्या ऋचेला ऐन्द्री म्हणतात.

व्यम्। आदित्यमुपतिष्ठते। चन्द्रमसमुपतिष्ठते॥ संगतकरणे। रथिकानुपतिष्ठते। अश्वारोहानुपतिष्ठते॥

बहूनामप्यचित्तानामेको भवति चित्तवान्। पश्य वानरसैन्येऽस्मिन्यदर्कमुपतिष्ठते॥ मैवं मंस्थाः सचित्तोयमेषोपि हि यथा वयम्। एतदप्यस्य कापेयं यदर्कमुपतिष्ठति॥

अपर आह। उपाद्देवपूजासंगतकरणमित्रकरणपथिष्विति वक्तव्यम्। संगतकरण उदाहृतम्॥ मित्रकरणे। रथिकानुपतिष्ठते। अश्वारोहानुपतिष्ठते॥ पथि। अयं पन्थाः स्रुघ्नमुपतिष्ठते। अयं पन्थाः साकेतमुपतिष्ठते॥

## वा लिप्सायाम्॥२॥

वा लिप्सायामिति वक्तव्यम्। भिक्षुको ब्राह्मणकुलमुपतिष्ठते। भिक्षुको ब्राह्मणकुलमुपतिष्ठतीति वा॥

## [अकर्मकाच्च॥ १। ३। २६॥]

## उद्विभ्यां तपः॥ १। ३। २७॥

अकर्मकादित्येव। उत्तपति सुवर्णं सुवर्णकारः॥

## स्वाङ्गकर्मकाच्च॥ १॥

---

तिष्ठते, चन्द्रमसमुपतिष्ठते. संगतिकरणाचें उदाहरण— रथिकानुपतिष्ठते, अश्वारोहानुपतिष्ठते.

येथें दुसरा वैयाकरण म्हणतो—

उपाद्देवपूजासंगतकरणमित्रकरणपथिषु असें म्हणावें.

देवपूजा करणें, संगति करणें व मैत्री करणें हे अर्थ गम्यमान असतांना किंवा पन्था हा कर्ता असतांना उप या उपसर्गापुढील स्था धातूहून आत्मनेपद होतें. देवपूजा व संगति करणें या विषयींचीं उदाहरणें दिलीं. आतां मैत्रीकरणाचें उदाहरण— रथिकानुपतिष्ठते, अश्वारोहानुपतिष्ठते. पथिन् शब्दाचें उदाहरण— अयं पन्थाः स्रुघ्नमुपतिष्ठते, अयं पन्थाः साकेतमुपतिष्ठते.

(वा.२) कांहीं मिळेल या हेतूनें जवळ जाणें असा अर्थ असेल तर उप या उपसर्गापुढील स्था धातूहून आत्मनेपद विकल्पानें होतें असें म्हणावें. जसें— भिक्षुको ब्राह्मणकुलमुपतिष्ठते किंवा उपतिष्ठति.

(सू.२७) येथें अकर्मकात् या पदाची पूर्वसूत्रांतून अनुवृत्ति आहेच. त्यामुळें उत्तपति सुवर्णं सुवर्णकारः येथें सकर्मक तप् धातूहून आत्मनेपद होत नाहीं.

(वा.१) कर्त्याच्या स्वतःच्या अङ्गापैकीं हस्तपादादि अवयव ज्या तप् धातूचें कर्म आहे आणि ज्याच्या मागें उद् किंवा वि उपसर्ग आहे अशा तप् धातूहून आत्मनेपद होतें असें

---

२. सूर्यचंद्राची पूजा करतो असा येथें अर्थ आहे.

३. रथिक आणि घोडेस्वार यांच्यांशीं संगत होतो, म्ह. उपश्लिष्ट होतो, असा येथें अर्थ आहे.

४. 'अडाणी लोक पुष्कळ असले तरी त्यांत एखादा तरी शहाणा निघतोच; असें पहा की या वानरसेनेमध्यें हा एक वानर सूर्याची पूजा करीत आहे,' असें बोलल्यावर दुसरा त्याला म्हणतो—'अरे, हा शहाणा आहे असें समजूं नकोस; हा देखील आमच्यासारखाच आहे; सूर्याची पूजा केल्यासारखें वाटतें ती देखील माकडचेष्टाच आहे.' येथें पहिल्या श्लोकांत सूर्याची पूजा करतो असा अर्थ असल्यामुळें आत्मनेपद झालें आहे, आणि दुसऱ्या श्लोकामध्यें ही माकडचेष्टा आहे, सूर्याची पूजा नव्हे, असा अर्थ असल्यामुळें आत्मनेपद झालें नाहीं.

५. रथिक आणि घोडेस्वार यांच्याशीं मैत्री करतो असा येथें अर्थ आहे.

१. उप या उपसर्गापुढील अकर्मक स्था-धातूहून आत्मनेपद होतें; उदा०— भोजनकाले उपतिष्ठते.

१. उद् किंवा वि या उपसर्गापुढील अकर्मक तप्-धातूहून आत्मनेपद होतें; उदा०— उत्तपते, वितपते सूर्यः.

स्वाङ्गकर्मकाच्चेति वक्तव्यम्। उत्तपते पाणी। वितपते पाणी। उत्तपते पृष्ठम्। वितपते पृष्ठम्॥

अथोद्विभ्यामित्यत्र किं प्रत्युदाह्रियते। निष्टप्यत इति। किं पुनः कारणमात्मनेपदमेवोदाह्रियते न परस्मैपदं प्रत्युदाहार्यं स्यात्। तपिरयमकर्मकः। अकर्मकाश्चापि सोपसर्गाः सकर्मका भवन्ति। न चान्तरेण कर्मकर्तारं सकर्मका अकर्मका भवन्ति। यदुच्यते न चान्तरेण कर्मकर्तारं सकर्मका अकर्मका भवन्तीत्यन्तरेणापि कर्मकर्तारं सकर्मका अकर्मका भवन्ति। तद्यथा। नदी वहतीत्यकर्मकः। भारं वहतीति सकर्मकः। तस्मान्निष्टपतीति प्रत्युदाहार्यम्॥

## आङो यमहनः ॥१।३।२८॥

अकर्मकादित्येव। आयच्छति रज्जुं कूपात्। आहन्ति वृषलं पादेन॥

### स्वाङ्गकर्मकाच्च ॥ १ ॥

स्वाङ्गकर्मकाच्चेति वक्तव्यम्। आयच्छते पाणी। आहत उदरमिति॥

## समो गम्यृच्छिभ्याम् ॥१।३।२९॥

---

म्हणावें; जसें– उत्तपते पाणी, वितपते पाणी, उत्तपते पृष्ठम्, वितपते पृष्ठम्.

आतां येथें उद्विभ्यां या पदाचें प्रत्युदाहरण कोणतें बरें द्यावें ?

निष्टप्यते हें प्रत्युदाहरण द्यावें.

पण या सूत्रानें आत्मनेपद सांगितलें आहे ना ? मग प्रत्युदाहरण आत्मनेपद केलेलेंच देत आहांत याचें काय बरें कारण असावें? परस्मैपद केलेलें प्रत्युदाहरण देतां येत नाहीं काय ?

कारण असें की या सूत्रामध्यें तप् धातु हा अकर्मक पाहिजे आहे. आतां अकर्मक धातु देखील उपसर्ग जोडल्यानें सकर्मक होतात. पण सकर्मक धातु मात्र कर्मकर्तरि प्रयोगाशिवाय अकर्मक होत नाहींत.

'कर्मकर्तरि प्रयोगावांचून सकर्मक धातु हे अकर्मक बनूं शकत नाहींत.' असें जें म्हटलें आहे त्यावर उत्तर– कर्मकर्तरि प्रयोगावांचूनही सकर्मक धातु हे अकर्मक बनूं शकतात. ते असे– 'नदी वहति' या वाक्यांतील वह् धातु अकर्मक आहे. आणि तोच वह् धातु 'भारं वहति' या वाक्यांत सकर्मक आहे. तेव्हां निष्टपति हें प्रत्युदाहरण द्यावें.

(सू.२८) येथेंही अकर्मकात् हा अधिकार आहेच. तेव्हां आयच्छति रज्जुं कूपात्, आहन्ति वृषलं पादेन, येथें आत्मनेपद होत नाहीं.

(वा.१) कर्त्याच्या स्वतःच्या अङ्गापैकीं हस्तपादादिक अवयव ज्याचें कर्म आहे अशा आङ्पूर्वक यम किंवा हन या धातूंहून आत्मनेपद होतें असें म्हणावें; जसें– आयच्छते पाणी, आहते उदरम्.

(सू.२९, वा.१) 'समो गम्' या सूत्रामध्यें प्रत्युदाहरण जुळतें.

---

२. हात तापवितो, पाठ तापवितो असा येथें अर्थ आहे.

३. तेव्हां कर्मकर्तरि प्रयोगामध्यें तप् धातु अकर्मक झाला म्हणजे 'उद्विभ्यां तपः' ह्या प्रकृत सूत्राला उदाहरण मिळणार, पण तेथें कर्मवद्भावानें (३।१।८७) आत्मनेपद सिद्धच आहे. तेव्हां अर्थातच हें प्रकृतसूत्र व्यर्थ होऊन नियमार्थ होईल. तो नियम असा की अशा तप्धातूहून फक्त आत्मनेपदच कर्मवद्भावानें करावें; यक्, चिण् करूं नयेत. तेव्हां अशा स्थितींत उद्विभ्यां हें पद काढलें तर ह्या नियमानें निष्टप्यते येथें यक् होणार नाहीं असें तें

४. तेव्हां उत्तपते सूर्यः हें उदाहरण प्रकृतसूत्राला कर्मकर्तरि प्रयोगावांचून मिळत असल्यामुळें हें सूत्र विधायकच आहे; नियमार्थ नव्हे.

१. आङ् या उपसर्गापुढील अकर्मक असा जो यम् किंवा हन् त्या धातूंहून आत्मनेपद होतें; उदा०— आयच्छन्ते आहते.

२. आपले हात आखडून धरतो, आपल्याच पोटाला मारतो, असा येथें अर्थ आहे.

१. सम् या उपसर्गापुढील अकर्मक असा जो गम्

**समो गमादिषु विदिप्रच्छिस्वरतीनामुपसंख्यानम् ॥ १ ॥**

समो गमादिषु विदिप्रच्छिस्वरतीनामुपसंख्यानं कर्तव्यम्। संविते। संपृच्छते। संस्वरते॥

**अर्तिश्रुदृशिभ्यश्च ॥ २ ॥**

अर्तिश्रुदृशिभ्यश्चेति वक्तव्यम्। मा समृत। मा समृषाताम्। मा समृषत। अर्ति॥ श्रु। संशृणुते॥ दृशि। संपश्यते॥

**उपसर्गादस्यत्यूह्योर्वावचनम् ॥ ३ ॥**

उपसर्गादस्यत्यूह्योर्वेति वक्तव्यम्। निरस्यति निरस्यते। समूहति समूहते॥

**[¹निसमुपविभ्यो ह्वः ॥१।३।३०॥**

**स्पर्धायामाङः ॥ १।३।३१ ॥**

**गन्धनावक्षेपणसेवनसाहसिक्यप्रतियत्नप्रकथनोपयोगेषु कृञः ॥१।३।३२॥**

**अधेः प्रसहने ॥१।३।३३॥**

**वेः शब्दकर्मणः ॥१।३।३४॥**

**अकर्मकाच्च ॥ १।३।३५ ॥**

**संमाननोत्सञ्जनाचार्यकरणज्ञानभृतिविगणनव्ययेषु नियः ॥१।३।३६॥**

**कर्तृस्थे चाशरीरे कर्मणि॥१।३।३७**

**वृत्तिसर्गतायनेषु क्रमः ॥१।३।३८**

**उपपराभ्याम् ॥१।३।३९॥]**

**¹आङ उद्गमने ॥१।३।४०॥**

**ज्योतिषामुद्गमने ॥ १ ॥**

---

विद्, प्रच्छ् आणि स्वृ या धातूंचें ग्रहण करावें; जसें— संवित्ते, संप्रच्छते, संस्वरते.

(वा.२) सम् या उपसर्गापुढील ऋ, श्रु आणि दृश् याही धातूंहून आत्मनेपद होतें असें म्हणावें. ऋ धातूचें उदाहरण— मा समृत, मा समृषाताम्, मा समृषत. श्रु धातूचें

किंवा ऋच्छ् धातु त्यांहून आत्मनेपद होतें; उदा०— संगच्छते, समृच्छते.

१. (३०) नि, सम्, उप आणि वि या उपसर्गांपुढील ह्वा धातूहून आत्मनेपद होतें; जसें— निह्वयते, संह्वयते, उपह्वयते, विह्वयते.

(३१) स्पर्धा गम्यमान असतांना आङ् उपसर्गापुढील ह्वे धातूहून आत्मनेपद होतें; उदा०— कृष्णश्चाणूरमाह्वयते.

(३२) सूचन, भर्त्सन, सेवन, साहसिक्य, गुणाधान, कथन आणि विनियोग हे अर्थ गम्यमान असतांना कृ-धातूहून आत्मनेपद होतें; उदा०— उत्कुरुते, उदाकुरुते, उपकुरुते वगैरे.

(३३) अभिनव अर्थ गम्यमान असतांना अधि या उपसर्गापुढील कृ धातूहून आत्मनेपद होतें; उदा०— शत्रुमधिकुरुते.

(३४) ज्याचें शब्द कर्म आहे अशा आणि वि या उपसर्गापुढें असलेल्या कृ-धातूहून आत्मनेपद होतें; उदा०— स्वरान् विकुरुते.

उदाहरण संशृणुते. दृश् धातूचें उदाहरण— संपश्यते.

(वा.३) उपसर्गापुढील अस् किंवा ऊह् या धातूंहून आत्मनेपद विकल्पानें होतें असें म्हणावें; जसें— निरस्यति निरस्यते, समूहति समूहते.

(३५) वि. या उपसर्गापुढील अकर्मक कृ-धातूहून आत्मनेपद होतें; उदा०—छात्रा विकुर्वते.

(३६) पूजा, उत्क्षेपण, आचार्यकरण, प्रमेयनिश्चय, वेतन देणें, कर्जाची फेड करणें आणि विनियोग हे अर्थ गम्यमान असतांना नी-धातूहून आत्मनेपद होतें; उदा०— शास्त्रे नयते.

(३७) कर्त्यामध्यें असणारा जो अमूर्त्त पदार्थ तो कर्म असेल तर नी-धातूहून आत्मनेपद होतें; उदा०— क्रोधं विनयते.

(३८) कुण्ठित न होणें, उल्हास आणि विस्तार हे अर्थ गम्यमान असतांना क्रम्-धातूहून आत्मनेपद होतें; उदा०— ऋचि क्रमते बुद्धिः.

(३९) कुण्ठित न होणें, उल्हास आणि विस्तार हे अर्थ गम्यमान असतांना क्रम्-धातूच्या मागें फक्त उप किंवा परा या दोहोंपैकींच उपसर्ग असेल तर त्या धातूहून आत्मनेपद होतें; उदा०— उपक्रमते, पराक्रमते.

१. ऊर्ध्वगति हा अर्थ गम्यमान असतांना आङ्

ज्योतिरुद्गमन इति वक्तव्यम्। इह मा भूत्। आक्रामति धूमो हर्म्यतलमिति ॥

[वेः पादविहरणे ॥१।३।४१॥
प्रोपाभ्यां समर्थाभ्याम् ॥१।३।४२
अनुपसर्गाद्वा ॥१।३।४३॥
अपह्नवे ज्ञः ॥१।३।४४॥
अकर्मकाच्च ॥१।३।४५॥
संप्रतिभ्यामनाध्याने ॥१।३।४६॥
भासनोपसंभाषाज्ञानयत्नविमत्युपमन्त्रणेषु वदः ॥१।३।४७॥]

**व्यक्तवाचां समुच्चारणे ॥१।३।४८॥**

व्यक्तवाचामिति किमर्थम्।

वरतनु संप्रवदन्ति कुक्कुटाः।

व्यक्तवाचामित्युच्यमानेऽप्यत्र प्राप्नोति। एतेऽपि हि व्यक्तवाचः। आतश्च व्यक्तवाचः कुक्कुटेनोदित उच्यते कुक्कुटो वदतीति ॥ एवं तर्हि व्यक्तवाचामित्युच्यते सर्व एव हि व्यक्तवाचस्तत्र प्रकर्षगतिर्विज्ञास्यते। साधीयो ये व्यक्तवाच इति। के च साधीयः। येषां वाच्यकारादयो

---

(सू.४०, वा.१) ऊर्ध्वगति ही तेजाची असली पाहिजे असें म्हणावें. कारण आक्रामति धूमो हर्म्यतलात् येथें आत्मनेपद न झालें पाहिजे.

(सू.४८) ज्यांची वाणी व्यक्त आहे अशा अर्थाचा 'व्यक्तवाचाम्' हा शब्द येथें कशाकरितां घातला आहे ?

वरतनु संप्रवदन्ति कुक्कुटाः येथें आत्मनेपद न व्हावें म्हणून घातला आहे.

व्यक्तवाचाम् हा शब्द घातला तरी देखील येथें आत्मनेपद प्राप्त होत आहे. कारण कोंबडे हे स्पष्टवाक् आहेत. शिवाय कोंबडा ओरडला असतां 'कुक्कुटो वदति' असें लोक म्हणतात. यावरूनही ते स्पष्टवाक् होत.

असें आहे तर 'व्यक्तव्याचाम्' असें येथें म्हटलें आहे आणि स्पष्टवाक् तर सगळेच आहेत. तेव्हां येथें म्हणजे व्यक्तवाचाम् या शब्दाच्या अर्थामध्यें एक प्रकारचा अतिशय गृहीत धरला जाईल. म्हणजे ज्यांची वाणी चांगलीच स्पष्ट आहे असा अर्थ समजण्यांत येईल.

चांगली स्पष्ट वाणी कोणाची समजावी ?

ज्याच्या वाणीमध्यें अकारादि वर्ण अभि-

---

उपसर्गापुढील क्रम्-धातूहून आत्मनेपद होतें; उदा०- आक्रमते सूर्यः.

१. (४१) पादन्यास हा अर्थ गम्यमान असतांना वि-उपसर्गापुढील क्रम्-धातूहून आत्मनेपद होतें; उदा०- साधु विक्रमते वाजी.

(४२) प्रारंभ करणें हा अर्थ गम्यमान असतांना प्र किंवा उप या उपसर्गापुढील क्रम्-धातूहून आत्मनेपद होतें; उदा०- प्रक्रमते, उपक्रमते.

(४३) उपसर्गरहित अशा क्रम्-धातूहून आत्मनेपद विकल्पानें होतें; उदा०- क्रमते, क्रामति.

(४४) अपलाप करणें हा अर्थ गम्यमान असतांना ज्ञा-धातूहून आत्मनेपद होतें; उदा०- शतमपजानीते.

(४५) अकर्मक अशा ज्ञा-धातूहून आत्मनेपद होतें; उदा०- सर्पिषो जानीते; 'तुपामुळें प्रवृत्त होतो' असा येथें अर्थ आहे.

(४६) सम् आणि प्रति या उपसर्गापुढील ज्ञा-धातूहून आत्मनेपद होतें, मात्र तो ज्ञा धातु तेथें उत्कण्ठापूर्वक स्मरण या अर्थाला दाखविणारा नसावा, उदा०- शतं संजानीते.

(४७) प्रकाशन, सांत्वन, ज्ञान, उत्साह, विरुद्धवाद आणि इष्ट अर्थाविषयीं प्रवृत्त होणें हे अर्थ गम्यमान असतांना वद्-धातूहून आत्मनेपद होतें; उदा०- शास्त्रे वदते.

१. मनुष्य, देव, दानव वगैरेंचें जें संघानें उच्चारण त्या अर्थी विद्यमान अशा वद्-धातूहून आत्मनेपद होतें; उदा०-संप्रवदन्ते ब्राह्मणाः, संप्रवदन्ते क्षत्रियाः.

वर्णा व्यज्यन्ते। न चैतेषां वाच्यकारादयो वर्णा व्यज्यन्ते। एतेषामपि वाच्यकारादयो वर्णा व्यज्यन्ते। आतश्च व्यज्यन्त एवं ह्याहुः कुक्कुटाः कुक्कुडिति। नैवं त आहुः। अनुकरणमेतत्तेषाम् ॥ अथवा नैवं विज्ञायते व्यक्ता वाग्येषां त इमे व्यक्तवाच इति। कथं तर्हि। व्यक्ता वाचि वर्णा येषां त इमे व्यक्तवाच इति ॥

[अनोरकर्मकात् ॥१।३।४९॥

विभाषा विप्रलापे ॥१।३।५०॥]

अवाद्ग्रः ॥ १ । ३ । ५१ ॥

अवाद्ग्रो गिरतेः ॥ १ ॥

अवाद्ग्र इत्यत्र गिरतेरिति वक्तव्यम्। गृणातेर्मा भूत् ॥ तत्तर्हि व्यक्तव्यम्। न वक्तव्यं प्रयोगाभावात्। अवाद्ग्र इत्युच्यते न चावपूर्वस्य गृणातेः प्रयोगोऽस्ति ॥

[समः प्रतिज्ञाने ॥१।३।५२॥

उदश्चरः सकर्मकात् ॥१।३।५३॥]

समस्तृतीयायुक्तात् ॥१।३।५४॥

तृतीयायुक्तादिति किमर्थम्।

उभौ लोकौ संचरसि इमं चामुं च देवल।

---

व्यक्त होतात त्यांची स्पष्ट वाणी होय. आणि ह्या कोंबड्यांच्या वाणीमध्यें तर अकारादि वर्ण स्पष्ट कळून येत नाहींत. तेव्हां कोंबडे हे स्पष्टवाक् नव्हेत.

पण कोंबड्यांच्याही वाणीमध्यें अकारादि वर्ण स्पष्ट कळून येतात.

कुक्कुट हे कुक् कुट् असा शब्द करतात असें लोक बोलतात. त्यावरूनही त्यांच्या वाणीमध्यें अकारादि वर्ण अभिव्यक्त होतात असें सिद्ध होतें.

तशा अर्थानें ते बोलत नाहींत. तर कुक्कुटांच्या शब्दाचें केवळ तें अनुकरण आहे. तात्पर्य, कुक्कुट हे स्पष्टवाक् नव्हेत.

अथवा व्यक्त आहे वाणी ज्यांची असा 'व्यक्तवाचः' हा समास आम्ही सोडवीत नाहीं.

तर कसा सोडवितां?

व्यक्त आहेत वर्ण ज्यांच्या वाणीमध्यें असा समास सोडवितों.

(सू.५१, वा.१) 'अवाद्ग्रः' येथें 'गिरतेः, असें म्हणावें. कारण क्र्यादिगणांतील गॄ-धातूहून आत्मनेपद न झालें पाहिजे.

तर मग 'अवाद्गिरतेः' असें सूत्र केलें पाहिजे.

तसें सूत्र करावयास नको. कारण अव या उपसर्गापुढें क्र्यादिगणांतील गॄ-धातूचा प्रयोगच नाहीं.

(सू.५४) येथें तृतीयायुक्तात् हा शब्द कशाकरितां घातला आहे?

'उभौ लोकौ संचरसीमं चामुं च देवल' येथें आत्मनेपद होऊं नये याकरितां घातला आहे.

तृतीयायुक्तात् हा शब्द घातला तरी

---

१. मनुष्य वगैरेंच्या उच्चारणक्रियेला दाखविणाऱ्या आणि अनु या उपसर्गापुढें असणाऱ्या अशा अकर्मक वद्धातूहून आत्मनेपद होतें. उदा०– अनुवदते कठः कलापस्य.

१. मनुष्य वगैरेंचें जें परस्परविरुद्ध बोलणें त्या अर्थाला दाखविणाऱ्या वद्धातूहून विकल्पानें आत्मनेपद होतें; उदा– विप्रवदन्ते विप्रवदन्ति वा वैद्याः.

१. अव या उपसर्गापुढील गॄधातूहून आत्मनेपद होतें; उदा०– अवगिरते.

१. प्रतिज्ञान म्हणजे निश्चित स्वरूपाचें बोलणें किंवा तसें मानणें या अर्थाला दाखविणाऱ्या सम् उपसर्गापुढील गॄधातूहून आत्मनेपद होतें; उदा०– शतं संगिरते.

१. उद् या उपसर्गापुढील सकर्मक अशा चर् धातूहून आत्मनेपद होतें; उदा०– गेहमुच्चरते.

१. ज्या क्रियेवर तृतीयान्ताचा अन्वय आहे अशा क्रियेला दाखविणारा जो सम्-उपसर्गापुढील चर् धातु त्याहून आत्मनेपद होतें; उदा०– रथेन संचरते.

तृतीयायुक्तादित्युच्यमानेऽप्यत्र प्राप्नोति। अत्रापि हि तृतीयया योगः॥ एवं तर्हि तृतीयायुक्तादित्युच्यते सर्वत्र च तृतीयया योगस्तत्र प्रकर्षगतिर्विज्ञास्यते। साधीयो यत्र तृतीयया योग इति। क्व च साधीयः। यत्र तृतीयया योगः श्रूयते॥

## [१]दाणश्च सा चेच्चतुर्थ्यर्थे ॥ १ । ३ । ५५ ॥

सा चेत्तृतीया चतुर्थ्यर्थे इत्युच्यते। कथं नाम तृतीया चतुर्थ्यर्थे स्यात्। एवं तर्ह्यशिष्टव्यवहारेऽनेन तृतीया च विधीयत आत्मनेपदं च। दास्या संप्रयच्छते। वृषल्या संप्रयच्छते। यो हि शिष्टव्यवहारे ब्राह्मणीभ्यः संप्रयच्छतीत्येव तत्र भवितव्यम्। यद्येवं नार्थोऽनेन योगेन। केनेदानीं तृतीया भविष्यत्यात्मनेपदं च।

## सहयुक्ते तृतीया स्याद्व्यतिहारे तङो विधिः।

सहयुक्तेऽप्रधाने [२.३.१९] इत्येव तृतीया भविष्यति कर्तरि कर्मव्यतिहारे [१.३.१४] इत्यात्मनेपदम्॥

## [१]उपाद्यमः स्वकरणे ॥१।३।५६॥

देखील वरील उदाहरणामध्यें आत्मनेपद प्राप्त होत आहे. कारण तृतीयान्ताच्या अर्थाचा संबंध चर्-धातूच्या अर्थाला नेहमीं [२]असतोच.

तर मग ज्या अर्थी तृतीयार्थानें युक्त असें येथें म्हटलें आहे, आणि तृतीयार्थाचा योग तर सर्व ठिकाणींच आहे, त्या अर्थी तो तृतीयार्थाचा योग येथें विशेष प्रकारचा गृहीत धरण्यांत येईल. तो असा की चांगला तृतीयार्थाचा योग पाहिजे.

तो चांगला तृतीयार्थाचा योग कोठें असतो ?

ज्या ठिकाणीं तृतीया साक्षात् ऐकण्यांत येते तेथें.

(सू.५५) तृतीया ही चतुर्थीचा अर्थ दाखवीत असेल तर असें येथें म्हटलें आहे, पण तृतीया ही चतुर्थीच्या अर्थाला कशी बरें दाखवील ?

असें आहे तर अशिष्ट व्यवहार दाखवितांना दाण् धातूचा प्रयोग केला असेल तर चतुर्थीच्या अर्थी तृतीया आणि त्या तृतीयेनें युक्त अशा दाण्धातूहून आत्मनेपद हीं दोन्हीही कार्यें याच सूत्रानें सांगितलीं जात आहेत, असें समजावें; जसें – 'दास्या संप्रयच्छते, वृषल्या संप्रयच्छते कामुकः'. आतां जो शिष्ट व्यवहार आहे तेथें 'ब्राह्मणीभ्यः संप्रयच्छति' असेंच होतें.

असें आहे तर मग 'दाणश्च' हें सूत्रच मुळीं करूं नये. पण तृतीया व दाण्धातूहून आत्मनेपद हीं कार्यें कशीं बरीं होतील ?

'सहयुक्तेऽप्रधाने' (२।३।१९) यानें तृतीया होईल, आणि 'कर्तरि कर्मव्यतिहारे' (१।३।१४) यानें आत्मनेपद होईल.

(सू.५६) स्वं [२]शाटकान्तमुपयच्छति येथें यम्-

---

२. संचरणक्रियेचें साधन रथ, घोडा वगैरे कांहीं तरी आहेच. निदान पाय हे कायमचेंच साधन आहे. तेव्हां जरी वाक्यामध्यें तृतीयान्त शब्द नसला तरी ती क्रिया प्रत्यक्ष घडतांना तिला साधन हें कांहीं तरी असणारच,

१. सम् या उपसर्गापुढें असणाऱ्या आणि तृतीयार्थानें युक्त अशा क्रियेला दाखविणाऱ्या दाण्धातूहून आत्मनेपद होतें, मात्र ती तृतीया चतुर्थीच्या अर्थी केलेली पाहिजे; उदा०– दास्या संयच्छते कामुकः.

२. सूत्रांतील चेत् हा शब्द च–शब्दाच्या अर्थी घातला आहे. तेव्हां 'दाणश्च सा च चतुर्थ्यर्थे' असें सूत्र बनतें आणि हा अर्थ निघतो.

३. दानपूर्वक उपभोग घेणें असा संयच्छते या क्रियापदाचा अर्थ आहे. दासी आणि कामुक ह्या दोघांचें इष्ट परस्परांपासून साधत असल्यामुळें येथें क्रियाविनिमय आहे.

१. स्वीकार या अर्थाला दाखविणाऱ्या उप या उपसर्गापुढील यम्-धातूहून आत्मनेपद होतें; उदा०– भार्यामुपयच्छते.

२. आपला पदर घेतो असा येथें अर्थ आहे.

इह कस्मान्न भवति । स्वं शाटकान्तमुपयच्छतीति । अस्वं यदा स्वं करोति तदा भवितव्यम् । यद्येवं स्वीकरण इति प्राप्नोति । विचित्रास्तद्धितवृत्तयः । नातस्तद्धित उत्पद्यते ॥

**[[1]ज्ञाश्रुस्मृदृशां सनः॥१।३।५७॥]**

**नानोर्ज्ञः ॥१।३।५८॥**

**अनोर्ज्ञः प्रतिषेधे सकर्मकवचनम् ॥१॥**

अनोर्ज्ञः प्रतिषेधे सकर्मकग्रहणं कर्तव्यम् । इह मा भूत् । औषधस्यानुजिज्ञासत इति ॥

**न वाकर्मकस्योत्तरेण विधानात् ॥२॥**

न वा कर्तव्यम् । किं कारणम् । अकर्मकस्योत्तरेण विधानात् । अकर्मकाज्जानातेरुत्तरेण योगेनात्मनेपदं विधीयते पूर्ववत्सनः [१.३.६२] इति ॥

**प्रतिषेधः पूर्वस्य च ॥३॥**

पूर्वस्य चायं प्रतिषेधः । स च सकर्मकार्थ आरम्भः । कथं पुनर्ज्ञायते पूर्वस्यायं प्रतिषेध इति । अनन्तरस्य विधिर्वा भवति प्रतिषेधो वेति । कथं पुनर्ज्ञायते सकर्मकार्थ आरम्भ इति । अकर्मकाज्जानातेः सन आत्मनेपदवचने प्रयोजनं नास्तीति कृत्वा सकर्मकार्थो विज्ञायते ॥

---

धातूहून आत्मनेपद कां बरें होत नाहीं ?

मालकी नसलेली वस्तु आपण घेतल्यामुळें तिच्यावर मालकी उत्पन्न करीत असेल तेव्हां आत्मनेपद होणारें आहे

असा अर्थ विवक्षित आहे तर 'स्वीकरणे'[3] असें सूत्रामध्यें म्हटलें पाहिजे ना ?

तसें म्हटलें नसलें तरी चालेल. कारण तद्धितवृत्ति[4] या विचित्र आहेत. म्हणून येथें स्व-शब्दांहून च्वि हा तद्धितप्रत्यय उत्पन्न झाला नाहीं.

(सू.५८, वा.१) 'नानोर्ज्ञः' या सूत्रामध्यें सकर्मक असा शब्द घालावा. कारण औषधस्यानुजिज्ञासते[2] येथें अकर्मक ज्ञा-धातूहून आत्मनेपदाचा निषेध न झाला पाहिजे.

(वा.२) अथवा सकर्मक हा शब्द घालावयास नको.

काय कारण ?

सन्प्रत्ययान्त अशा अकर्मक ज्ञा-धातूहून 'पूर्ववत्सनः' (१।३।६२) या पुढील सूत्रानें आत्मनेपद होणारच आहे.

(वा.३) 'नानोर्ज्ञः' हा निषेध तर 'ज्ञाश्रुस्मृदृशाम्' या पूर्वसूत्रानें प्राप्त झालेल्या आत्मनेपदाचाच आहे. आणि तें पूर्वसूत्र तर सकर्मक ज्ञा-धातूकरितांच आरंभिलें आहे.

पूर्वसूत्रानें प्राप्त झालेल्या आत्मनेपदाचाच हा निषेध आहे हें कशावरून समजावें ?

विधि किंवा निषेध करावयाचा तो आपल्या जवळच्याचाच करावा असा न्याय आहे त्यावरून.

आतां 'ज्ञाश्रुस्मृदृशाम्' हें पूर्वसूत्र सकर्मक ज्ञा-धातूकरितांच आरंभिलें आहे हें कशावरून समजावें ?

सन्प्रत्ययान्त अशा अकर्मक ज्ञा-धातूहून आत्मनेपद होतें असें म्हणण्याचा उपयोग[3]

---

३. नसलेली मालकी उत्पन्न होणें हा अभूततद्भाव होय. तेव्हां त्या अर्थी स्व-शब्दापुढें च्वि हा तद्धितप्रत्यय ( ५।४।५० ) होऊन 'स्वीकरणे' असें झालें पाहिजे.

४. तेभ्यः प्रयोगेभ्यः हिताः तद्धिताः अशी तद्धित-शब्दाची व्युत्पत्ति आहे. तेव्हां तद्धितप्रत्यय केलेले प्रयोग फक्त साधावयाचे, अनिष्टापादन करावयाचें नाहीं.

१. सन्प्रत्ययान्त असे जे ज्ञा, श्रु, स्मृ आणि दृश् हे धातू त्यांहून आत्मनेपद होतें; उदा०— धर्मं जिज्ञासते, शुश्रूषते, सुस्मूर्षते, दिदृक्षते.

१. अनु या उपसर्गापुढील सन्प्रत्ययान्त ज्ञा-धातूहून आत्मनेपद होत नाहीं; उदा० — पुत्रमनुजिज्ञासति.

२. औषधामुळें प्रवृत्त होतो असा येथें अर्थ आहे.

३. कारण 'अकर्मकाच्च' (१।३।४५) या सूत्रानें

[[1]प्रत्याङ्भ्यां श्रुवः ॥१।३।५९॥]

[1]शदेः शितः ॥१।३।६०॥

शदेः शितः परस्मैपदाश्रयत्वादात्मनेपदाभावः ॥ १ ॥

शदेः शितः परस्मैपदाश्रयत्वादात्मनेपदस्याभावः । शीयते शीयेते शीयन्ते ॥ किं च भोः शदेः शित्परस्मैपदेष्वित्युच्यते । न खलु परस्मैपदेष्वित्युच्यते परस्मैपदेषु तु विज्ञायते । कथम् । अनुदात्तङित आत्मनेपदं भावकर्मणोरात्मनपदमित्येतौ द्वौ योगावुक्त्वा शेषात्कर्तरि परस्मैपदमुच्यते । एवं न च परस्मैपदेषूच्यते परस्मैपदेषु च विज्ञायते ॥ कः पुनरर्हत्येतौ योगावुक्त्वा शेषात्कर्तरि परस्मैपदं वक्तुम् । किं तर्हि । अविशेषेण सर्वमात्मनेपदप्रकरणमनुक्रम्य शेषात्कर्तरि परस्मैपदमित्युच्यते । एवमपि परस्मैपदाश्रयो भवति । कथम् । इदं तावदयं

---

होत नाहीं म्हणून सकर्मक ज्ञा-धातूकरितांच तें आरंभिलें आहे असें समजतें.

(सू. ६०, वा. १) शद्धातूपुढील शित्-प्रत्यय हा परस्मैपदावर अवलंबून होत असल्यामुळें शीयते शीयेते शीयन्ते येथें आत्मनेपद करितां येत नाहीं.

पण परस्मैपद पुढें असतां शद्-धातूहून शित् प्रत्यय होतो असें सांगितलें आहे काय?

शद्-धातूपुढील शित् प्रत्यय परस्मैपद पुढें असतांना होतो असें प्रत्यक्ष सांगितलें नाहीं, तरी पण परस्मैपद पुढें असतांनाच होतो असें अर्थात् समजलें जातें.

तें कसें?

'अनुदात्तङित आत्मनेपदम्' आणि 'भावकर्मणोः' हीं दोन सूत्रें सांगून पुढें 'शेषात्कर्तरि परस्मैपदम्' असें म्हटलें आहे. तेव्हां प्रथमतः 'शेषात्कर्तरि' यानें परस्मैपद केल्यानंतर शद्-धातूच्या पुढें केला जाणारा शित् प्रत्यय परस्मैपद पुढें असतांना विहित नाहीं तरी देखील परस्मैपद पुढें असतांनाच होतो[3] असें समजलें जातें.

'अनुदात्तङितः' व 'भावकर्मणोः' हीं दोन सूत्रें सांगून पुढें शेषात्कर्तरि हें सांगितलें आहे असें कोण म्हणेल?

तर काय म्हणेल?

कांहीं एक विशेष मनांत धरल्यावांचून सर्व आत्मनेपदप्रकरण (१।३।१२ ते १।३।७१) सांगून पुढें 'शेषात्कर्तरि परस्मैपदम्' (१।३।७२) हें सांगितलें आहे.

तरी देखील परस्मैपद पुढें असतांनाच शद्-धातूहून शित् प्रत्यय होतो.

तो कसा?

याला असें विचारावें की जर 'शदेः शितः' हें सूत्र नाहीं असें गृहीत धरलें तर

---

अकर्मक ज्ञा-धातूहून आत्मनेपदाचें विधान केलें असल्यामुळें अकर्मक ज्ञा-धातूहून सन्-प्रत्यय केला असतां 'पूर्ववत्सनः' (१।३।६२) यानेंच आत्मनेपद सिद्ध होत आहे.

१. प्रति आणि आङ् या उपसर्गांपुढील सन्नन्त श्रु-धातूहून आत्मनेपद होत नाहीं; उदा० — प्रतिशुश्रूषति, आशुश्रूषति.

१. ज्या उदाहरणामध्यें शकारेत्संज्ञक प्रत्यय होणार आहे त्या उदाहरणामध्यें शद्-धातूहून आत्मनेपद होतें; उदा० — शीयते शीयेते शीयन्ते.

२. 'शद्-धातूच्या पुढील जो शित् प्रत्यय त्याच्या पुढें आत्मनेपद होतें' असा या सूत्राचा अर्थ गृहीत धरून ह्या वार्तिकाची प्रवृत्ति झाली आहे.

३. शीयते येथें शप् हा शित् प्रत्यय होण्यापूर्वी सार्वधातुक प्रत्यय अगोदर केलाच पाहिजे. कारण त्याचें निमित्तच सार्वधातुक प्रत्यय आहे (३।१।६८). सार्वधातुक ही संज्ञा (३।४।११) जरी परस्मैपद व आत्मनेपद या दोघांनाही आहे तरी त्या वेळीं 'शेषात्' यानें परस्मैपदच होणार आहे. कारण शद् धातु हा त्या वेळीं 'अनुदात्तङितः' आणि 'भावकर्मणोः' ह्या दोन्ही सूत्रांचा विषय नसल्यामुळें शेषपदानें घेतां येतो.

प्रष्टव्यः । यदीदं नोच्येत किमिह स्यादिति। परस्मैपदमित्याह । परस्मैपदमिति चेत्परस्मैपदाश्रयो भवति ॥

## सिद्धं तु लडादीनामात्मनेपदवचनात् ॥२॥

सिद्धमेतत् । कथम् । शदेर्लडादीनामात्मनेपदं भवतीति वक्तव्यम् ॥ सिध्यति । सूत्रं तर्हि भिद्यते । यथान्यासमेवास्तु । ननु चोक्तं शदेः शितः परस्मैपदाश्रयत्वादात्मनेपदाभाव इति । नैष दोषः । शित इति नैषा पञ्चमी । का तर्हि । संबन्धषष्ठी । शितो यः शदिः । कश्च शितः शदिः । प्रकृतिः । शदेः शित्प्रकृतेरिति ॥ अथवाहायं शदेः शित इति न च शदिः शिदस्ति त एवं विज्ञास्यामः शदेः शिद्विषयादिति ॥ अथवा यद्यपि तावदेतदन्यत्र भवति विकरणेभ्यो नियमो बलीयानितीहैतन्नास्ति । विकरणो हीहा-

---

काय होईल ?

शद् धातु हा 'शेषात्कर्तरि' येथील शेषपदाखालीं येत असल्यामुळें 'शेषात्कर्तरि' या नियमानें परस्मैपद होईल असें म्हणतों.

परस्मैपद होईल असेंच जर आहे तर परस्मैपद पुढें असतांनाच शद्-धातूहून शित् प्रत्यय होतो असें ठरतें.

(वा.२) शद्-धातूहून आत्मनेपद साधत आहे.

तें कसें ?

शद्-धातुपुढील जे लट् वगैरे प्रत्यय त्यांचे स्थानीं आत्मनेपद सांगावें.

तसें सूत्र केलें असतां साधेल हें खरें, पण मूळ सूत्रांत बदल होतो ना !

तर मग जसें आहे तसेंच सूत्र असूं दे.

पण आहे तसेंच सूत्र ठेवलें तर शद्-धातूच्या पुढें परस्मैपद केल्यानंतर शित् प्रत्यय उत्पन्न होत असल्यामुळें त्यानंतर आत्मनेपद करतां येत नाहीं असा दोष पूर्वी दाखविला आहे ना ?

हा दोष येत नाहीं. कारण शितः येथें शित्-शब्दापुढें पञ्चमी केली आहे असें समजूं नये.

तर कोणती विभक्ति समजावी ?

संबन्धार्थक षष्ठी आहे असें समजावें. तेव्हां शित्प्रत्ययसंबंधीं जो शद् धातु असा अर्थ होतो.

शित्-प्रत्ययासंबंधी शद् धातु कसा समजावा ?

ज्याहून शित् प्रत्यय होतो असा जो शित्-प्रत्ययाचा प्रकृतिभूत शद् धातु तो शित्प्रत्ययसंबंधी समजावा.

अथवा सूत्रामध्यें शितः हें शदेः याला विशेषण दिल्यासारखें दिसतें. पण शद् हा धातु शकारेत्संज्ञक मुळींच नाहीं. तेव्हां अर्थातच शित्प्रत्ययाला विषय अशा शद्-धातूहून आत्मनेपद होतें असा अर्थ गृहीत धरतां येईल.

किंवा जरी एधते इत्यादि अन्य ठिकाणीं विकरणांपेक्षां 'अनुदात्तङितः' इत्यादि नियम

---

४. तेव्हां 'शदेः शितः' हें सूत्र त्या आत्मनेपदप्रकरणामध्यें असल्यामुळें शद्-धातूचें शेषपदानें ग्रहण होणार नाहीं.

५. तेव्हां 'शदेः शितः' हें सूत्र केलें तरी जोंपर्यन्त त्याची प्रवृत्ति नाहीं तोंपर्यंत परस्मैपदच होणार आहे. आणि त्याची प्रवृत्ति तर शित् प्रत्यय केल्यानंतरच होणार आहे.

६. सूत्रामध्यें शितः या पदाच्या ऐवजीं लडादेः असें म्हणावें. लडादेः या पदानें लट्, लोट्, लङ् आणि विधिलिङ् हेच लकार घ्यावेत. असें केलें म्हणजे शित्प्रत्यय करण्यापूर्वींच आत्मनेपद होईल.

७. तेव्हां शित्प्रत्यय होण्यापूर्वींही शित्प्रत्ययप्रकृति होण्याची योग्यता शद्-धातूला असल्यामुळें लट् वगैरेंचे स्थानीं ह्या सूत्रानें आत्मनेपद करतां येईल.

८. हा नियमपक्ष मागें (१।३।१२ वा, १) सांगितला आहे. या पक्षीं 'अनुदात्तङितः' इत्यादि

श्रीयते शित इति ॥

## उपसर्गपूर्वनियमेऽड्व्यवाय उपसंख्यानम् ॥ ३ ॥

उपसर्गपूर्वस्य नियमेऽड्व्यवाय उपसंख्यानं कर्तव्यम् । न्यविशत व्यक्रीणीत । किं पुनः कारणं न सिध्यति । अटा व्यवहितत्वात् । ननु चायमड् धातुभक्तो धातुग्रहणेन ग्रहीष्यते । न सिध्यति । अङ्गस्य ह्यडुच्यते विकरणान्तं चाङ्गम् । सोऽसौ संघातभक्तो न शक्यो धातुग्रहणेन ग्रहीतुम् ॥ एवं तर्हीदमिह संप्रधार्यम् । अट् क्रियतां विकरण इति किमत्र कर्तव्यम् । परत्वादडागमः । नित्या विकरणाः । कृतेऽप्यटि प्राप्नुवन्त्यकृतेऽपि प्राप्नुवन्ति। अडपि नित्यः। कृतेष्वपि विकरणेषु प्राप्नोत्यकृतेष्वपि प्राप्नोति । अनित्योऽट् । अन्यस्य कृतेषु विकरणेषु प्राप्नोत्यन्यस्याकृतेषु शब्दान्तरस्य च प्राप्नुवन्विधिरनित्यो भवति ॥ एवं तर्हीदमिह संप्रधार्यम् । अट् क्रियतां

---

प्रबल आहेत, तथापि येथें तसें नाहीं. कारण 'शदेः शितः' या नियमाच्या प्रवृत्तीला शप् हा विकरणप्रत्ययच शित् म्हणून कारण धरला आहे.[१]

(वा.३) अमुक उपसर्ग पूर्वी असतांना अमुक धातूहून आत्मनेपदच होतें असे जे नियम (१।३।१७) दिले आहेत ते नियम अडागमानें व्यवधान असतांनाही प्रवृत्त होतात असें म्हणावें; जसें— न्यविशत, व्यक्रीणीत.

पण या उदाहरणांमध्यें 'नेर्विशः' (१।३। १७) इत्यादि नियम कां बरें प्रवृत्त होऊं नयेत ?

नि उपसर्ग आणि विश् धातु या उभयतांमध्यें अडागमानें व्यवधान आहे म्हणून.

पण हा अडागम धातूचा अवयव असल्यामुळें अडागम झाल्यानंतर अविश् एवढा विश् धातूच समजण्यांत येईल.

विश्शब्दानें अडागमविशिष्टाचें ग्रहण होऊं शकत नाहीं. कारण अङ्गाला अडागम सांगितला आहे. तें अङ्ग येथें विकरणासहित आहे. तेव्हां धातु आणि विकरण या उभयतांचा जो समुदाय त्याचा अवयव म्हणून झालेल्या अडागमाचें विश् यानें ग्रहण करणें शक्य नाहीं.

तर मग येथें अगोदर हा विचार केला पाहिजे की विश्धातूला अडागम अगोदर करावा किंवा त्या विश्धातूहून विकरणप्रत्यय अगोदर करावा.

मग यांत काय बरें करावें ?

पर असल्यामुळें (१।४।२) अगोदर अडागम करावा.

पण अडागम केला अथवा न केला तरीही प्राप्त होत असल्यामुळें विकरणप्रत्यय हे नित्य आहेत ना ?

विकरण केलें तरी अथवा न केलें तरी प्राप्त होत असल्यामुळें अडागमही नित्य आहेच.

अडागम अनित्य आहे. कारण विकरण केलें असतां एका शब्दाला म्हणजे विश या अकारान्ताला अट् प्राप्त होतो. आणि विकरण केलें नसतां निराळ्या शब्दाला म्हणजे विश् या शकारान्ताला प्राप्त होतो. निरनिराळ्या शब्दाला प्राप्त होणारा विधि अनित्य समजला

---

सूत्रांची 'तिप्तस्' या सामान्यसूत्राशीं एकवाक्यता नाहीं. सामान्यसूत्रानें सर्वत्र १८ प्रत्यय करून नंतर नियम लागू करावयाचे व नियमाच्या बाहेरचे जे प्रत्यय असतील ते काढून टाकावयाचे असतात.

१. तेव्हां अर्थातच शीयते येथें अगोदर शप्-प्रत्यय करून त्यानें व्यवधान असलें तरी 'शदेः शितः' हा नियम प्रवृत्त होतो असें मानलें पाहिजे. येथें शद्-धातूला शीय आदेश (७।३।७८) झाला आहे.

लादेश इति किमत्र कर्तव्यम् । परत्वादडागमः । नित्यो लादेशः । कृतेऽप्यटि प्राप्नोत्यकृतेऽपि प्राप्नोति । नित्यत्वाल्लादेशस्यात्मनेपद एवाडागमो भविष्यति ।

**नित्यत्वाल्लादेशस्यात्मनेपदेऽडागम इति चेदटोऽपि नित्यनिमित्तत्वादात्मनेपदाभावः ॥ ४ ॥**

नित्यत्वाल्लादेशस्यात्मनेपद एवाडागम इति चेदेवमुच्यते । अडपि नित्यनिमित्तः । कृतेऽपि लादेशे प्राप्नोत्यकृतेऽपि प्राप्नोति । अटो नित्यनिमित्तत्वादात्मनेपदस्याभावः ।

**तस्मादुपसंख्यानम् ॥ ५ ॥**

तस्मादुपसंख्यानं कर्तव्यम् ॥ न कर्तव्यम् । अन्तरङ्गस्तर्हि लादेशः । नैतद्विवदामहेऽन्तरङ्गो नान्तरङ्ग इति । अस्त्वयं नित्यश्चान्तरङ्गश्च । अत्र खलु लादेशे कृते त्रीणि कार्याणि युगपत्प्राप्नुवन्ति विकरणा अडागमो नियम इति । तद्यदि सर्वतो नियमो लभ्येत कृतं स्यात् । तत्तु न लभ्यम् । अथापि विकरणादडित्यड् लभ्येतैवमपि कृतं स्यात् । तत्तु न लभ्यम् । किं कारणम् । आङ्गात्पूर्वं विकरणा एषितव्यास्तरतः तरन्तीत्येव-

---

जांतो.[१०]

तर मग आतां येथें विकरणप्रत्ययाचा विचार करण्यापूर्वीं दुसराच एक विचार केला पाहिजे की अडागम पूर्वीं करावा किंवा त्याच्या पूर्वीं लकाराचे स्थानीं तिप्, तस् वगैरे आदेश करावेत ?

यांत काय बरें करावें ?

पर असल्यामुळें लादेशांच्या पूर्वीं अडागम करावा.

पण लादेश नित्य आहे. कारण अडागम केला तरी अथवा न केला तरीही लादेश प्राप्त होत आहे. तेव्हां लादेश नित्य असल्यामुळें प्रथमतः होतील. त्या लादेशामध्यें आत्मनेपद केल्यानंतरच अडागम होऊन न्यविशत इत्यादि रूपें साधतील.

(वा.४) लादेशाला नित्यत्व असल्यामुळें आत्मनेपद केल्यानंतर अडागम होतो असें म्हणणें असेल तर अडागमाचेंही निमित्त नित्य आहे. कारण लादेश केला तरी तो स्थानिवद्भावानें (१।१।५६) लङ् आहेच व लादेश न केला तर तो मूळचाच लङ् आहे

(वा.५) तेव्हां उपसंख्यान केलें पाहिजे.

तें करावयास नको, कारण लादेश हा अडागमापेक्षां अंतरंग आहे.

अडागमापेक्षां लादेश अंतरंग आहे किंवा नाहीं याविषयीं आम्ही चर्चा करीत बसत नाहीं. लादेश हा नित्य असो आणि अंतरंगही असो, तो लादेश केल्यानंतर विकरण, अडागम व नियम हीं तीन कार्यें एकदम प्राप्त होतात. त्यांत जर सर्वांपेक्षां पूर्वीं नियमाची प्रवृत्ति होईल तर साधेल, पण तसें होणें शक्य नाहीं.[११]

आतां जर विकरणापेक्षां पूर्वीं अडागम होईल तरी देखील काम[१२] भागेल. पण तसें करतां येणार नाहीं.

काय कारण ?

तरतः[१३] तरन्ति हीं उदाहरणें सिद्ध होण्यासाठीं विकरण अङ्गकार्यापेक्षां प्रथमतः होतात

---

१०. तेव्हां नित्यत्वास्तव अगोदर विकरणप्रत्यय होणार. त्यानंतर त्या अकारान्त अङ्गाला झालेला अडागम धातूचा अवयव समजला जाणार नाहीं.

११. कारण विकरण व अडागम हे दोघेही नियमापेक्षां पर व नित्य आहेत.

१२. विकरणाच्यापूर्वीं अडागम होईल तो नुसत्या धातूचाच अवयव होईल, तेव्हां अविश् एवढा विश् धातु समजतां येईल.

१३. येथें शप्प्रत्ययाच्या पूर्वीं अंगकार्य इत्व (७।१।१००) होऊं लागेल. शप्प्रत्यय अगोदर

मर्थम् । अडाड्भ्यामप्यन्यदाङ्गं पूर्वमेषितव्यमुपार्च्छदित्येवमर्थम् । तत्र ह्याटि कृते साटस्य ऋच्छिभावः प्राप्नोति । ननु च ऋच्छिभावे कृते शब्दान्तरस्याकृत आडिति कृत्वा पुनराड् भविष्यति । पुनर्ऋच्छिभावः पुनराडिति चक्रकमव्यवस्था प्राप्नोति ॥ नैष दोषः । यत्तावदुच्यत आङ्गात्पूर्वं विकरणा एषितव्यास्तरतः तरन्तीत्येवमर्थमिति । भवेत्सिद्धं यत्र विकरणा नित्या आङ्गमनित्यं तत्राङ्गात्पूर्वं विकरणाः स्युः । यत्र तु खलूभयं नित्यं परत्वात्तत्राङ्गं तावद्भवति ॥ यदप्युच्यतेऽडाड्भ्यामप्यन्यदाङ्गं पूर्वमेषितव्यमुपार्च्छदित्येवमर्थमिति । अस्त्वत्राट् । आटि कृते साटस्य ऋच्छिभाव ऋच्छिभावे कृते शब्दान्तरस्याकृत आडिति कृत्वा पुनराड् भविष्यति । ननु चोक्तं पुनर्ऋच्छिभावः पुनराडिति चक्र-

असें गृहीत धरलें पाहिजे. तेव्हां विकरणाच्यापूर्वी अडागम होत नाहीं. एवढेंच काय पण इतर अंगकार्यापेक्षां देखील अट् व आट् हे अगोदर होत नाहींत. कारण आर्छत् हें उदाहरण साधण्यासाठीं अट् व आट् यांहून अन्य जें अंगकार्य तेंही अट् व आट् यांपेक्षां पूर्वी होतें असें गृहीत धरलें पाहिजे. नाहीं तर ऋ–धातूला ऋच्छ आदेश (७।३।७८) होण्यापूर्वी आट् आगम (६।४।७२) झाला तर त्या आडागमासकट ऋच्छ आदेश होऊं लागेल.

पण ऋ धातूला आडागम केल्यानंतर त्या आडागमासहित ऋ–धातूला ऋच्छ आदेश झाला तरी ऋपेक्षां ऋच्छ हा शब्द निराळा होत असल्यामुळें व त्या ऋच्छ-आदेशाला आडागम केला नसल्यामुळें पुनः आट् आगम होईल.

ऋच्छ हा आदेश केल्यानंतर पुनः आट् आगम होईल तर त्या आडागमासहित ऋच्छ याला पुनः ऋच्छ आदेशही होईल. आणि पुनः आडागम पुनः ऋच्छादेश असें सारखें चक्र सुरू राहिल्यामुळें अव्यवस्था प्राप्त होते.

हा दोष येत नाहीं. तरतः तरन्ति हीं उदाहरणें सिद्ध होण्यासाठीं अंगकार्यापेक्षां विकरण पूर्वी होतात असें गृहीत धरलें पाहिजे असें जें म्हटलें आहे त्यावर उत्तरः–

ज्या ठिकाणीं विकरणाला नित्यत्व आहे आणि अङ्गकार्याला अनित्यत्व आहे तेथें अंगकार्यापेक्षां विकरण पूर्वी होतात हें सहजच सिद्ध[१४] होतें.

आणखीही आर्छत् हें उदाहरण सिद्ध होण्यासाठीं अट् किंवा आट् याहून अन्य जें अंगकार्य तेंही अट् किंवा आट् यापेक्षां पूर्वी होतें असें गृहीत धरलें पाहिजे असें जें म्हटलें आहे त्यावर उत्तरः– आर्छत् येथें ऋच्छादेशापेक्षां पूर्वी आडागम होऊं दे. आट् केल्यानंतर आडागमसहिताला ऋच्छादेशही होऊं दे. ऋच्छादेश केल्यानंतर तो ऋच्छ हा ऋपेक्षां निराळा शब्द होत असल्यामुळें व त्या ऋच्छादेशाला पूर्वी आडागम केला नसल्यामुळें पुनः आट् आगम होईल.

पण पुनः ऋच्छ आदेश, पुनः आट्, असें

---

झाला तर मागून मात्र इत्त्व होत नाहीं. कारण गुणानें (७।३।८४) त्याचा बाध 'इत्त्वोत्त्वाभ्याम्' (७।१।१०२ वा.) होतो. शप्प्रत्ययाच्या पूर्वी गुणानें बाध होत नाहीं. कारण गुणाचा निषेध (१।१।५) आहे.

१४. तात्पर्य अंगकार्यांपेक्षां विकरण पूर्वी होतात असा सरसकट नियम सिद्ध होत नाहीं. तरतः येथें विकरणप्रत्यय केल्यानंतर इत्त्व प्राप्त होत नाहीं. कारण गुणानें बाध होत आहे. तेव्हां इत्त्व अनित्य असल्यामुळें विकरणप्रत्यय पूर्वी होतो. तेव्हां दोष येत नाहीं.

कमव्यवस्था प्राप्नोतीति । नैष दोषः । चक्रकेऽविष्टतो व्यवस्था ॥ अथवा नेरिति नैषा पञ्चमी । का तर्हि । विशेषणषष्ठी । नेर्यो विशिः । कश्च नेर्विंशिः । विशेष्यः । व्यवहितश्चापि शक्यते विशेषयितुम् ॥ अथवा निरपि पदं विशिरपि पदम् । पदविधिश्च समर्थानाम् । व्यवहितेऽपि सामर्थ्यं भवति ॥

[[1]म्रियतेर्लुङ्लिङोश्च ॥१।३।६१॥ ]

[1]पूर्ववत्सनः ॥१।३।६२॥

किमिदं पूर्वग्रहणं सनपेक्षम् । प्राक्सनो येभ्य आत्मनेपदमुक्तं तेभ्यः सनन्तेभ्योऽपि भवतीति । आहोस्विद्योगापेक्षम् । प्रागेतस्माद्योगाद्येभ्य आत्मनेपदमुक्तं तेभ्यः सनन्तेभ्य आत्मनेपदं भवतीति । किं चातः । यदि सनपेक्षं

---

सारखें चक्र सुरू राहिल्यामुळें अव्यवस्था प्राप्त होते असा दोष दाखविला आहे ना ?

हा दोष येत नाहीं. कारण चक्रकस्थलीं इष्ट असेल तशी व्यवस्था[15] करावयाची असा या शास्त्राचा सिद्धान्त आहे.

अथवा 'नेर्विशः' येथील 'नेः' ही पंचमी समजूं नये.

तर कोण समजावी ?

नेः हें विशः याचें विशेषण आहे व ही षष्ठीविभक्ति आहे. तेव्हां नि या उपसर्गाचा जो विश् धातु असा अर्थ होतो.

नि या उपसर्गाचा विश् धातु कसा समजावा ?

जो नि या उपसर्गाचा विशेष्य होतो तो. तो विश् धातु अडागमानें व्यवहित असला तरी देखील नि या उपसर्गाचा विशेष्य होऊं शकतो.

किंवा नि हें पद आहे, व विश् हाही स्वतंत्र पदापैकीं भाग आहे. व जें कार्य दोन पदांसंबंधानें सांगितलेलें असेल तें त्या दोहोंमध्यें अन्वय असला म्हणजे करावें (२।१।१) असा ठरावच आहे. आणि व्यवधान असलें तरी अन्वय होऊं शकतो. तेव्हां कांहीं दोष येत नाहीं.

(सू.६२) काय येथें घातलेला हा पूर्वशब्द सन् प्रत्ययाच्या मागील अशा अर्थानें घातला आहे ? म्हणजे सन् प्रत्ययाच्या मागें असणाऱ्या अशा ज्या धातूहून आत्मनेपद होत असेल त्या धातूहून सन् प्रत्यय केला असतां त्या सन्प्रत्ययान्त धातूहूनही तें आत्मनेपद होतें ? अथवा या प्रकृतसूत्राच्या मागील अशा अर्थानें घातला आहे ? म्हणजे या सूत्राच्या मागील सूत्रांनीं ज्या धातूहून आत्मनेपद सांगितलें आहे त्या धातूहून सन् प्रत्यय केला असतां त्या सन्प्रत्ययान्त धातूहूनही आत्मनेपद होतें ?

या दोन तऱ्हांमध्यें काय फरक आहे ?

जर सनाच्या मागील ह्या अर्थानें पूर्व-शब्द घातला असेल तर निमित्ताला सनः हें विशे-

---

१५. तेव्हां आच्छंद् येथें ऋच्छादेश करून त्याला आडागम केला म्हणजे तेथेंच तें चक्र थांबावयाचें. पुनः ऋच्छादेश करावयाचा नाहीं. एकंदरींत न्यविशत येथें अंतरंगत्वास्तव अगोदर सामान्यसूत्रानें लादेश होतात. नंतर विकरणापूर्वी अडागम होतो. नंतर अविश् एवढा विश् धातु समजून 'नेर्विशः' हा नियम प्राप्त होतो व विकरणापेक्षां नियम प्रबल आहेत (भाग२,पृ.५१) असें मागें सांगितलें असल्यामुळें अगोदर तो नियम लागू करून नंतर विकरण केला म्हणजे उदाहरण साधतें. तेव्हां अडागमानें व्यवधान असले तरी नियम प्रवृत्त होतात असें मुद्दाम वचन करावयास नको.

१. लुङ्, लिङ् किंवा शकारेत्संज्ञक प्रत्यय हे ज्या ठिकाणीं असतील तेथेंच मृङ्धातूहून आत्मनेपद होतें; या तिघांपैकीं प्रत्यय करावयाचा नसेल तर आत्मनेपद होत नाहीं; उदा०— म्रियते, मृषीष्ट, अमृत.

१. सन्प्रत्ययाच्या मागील धातु आत्मनेपदी असेल तर त्या सन्प्रत्ययान्त धातूच्या पुढेंही आत्मनेपद होतें; उदा०— शिशयिषते, आसिसिषते.

निमित्तमविशेषितं भवति । पूर्ववत्सनो न ज्ञायते किमन्ताद्भवितव्यमिति । अथ योगापेक्षमुत्तरत्र विधिर्न प्रकल्पेत। बुभुक्षते उपयुयुक्षत इति॥ यथेच्छसि तथास्तु । अस्तु तावत्सनपेक्षम् । ननु चोक्तं निमित्तमविशेषितं भवतीति । निमित्तं च विशेषितम्। कथम्। सनमेवात्र निमित्तत्वेनापेक्षिष्यामहे । पूर्ववत्सन आत्मनेपदं भवति । कुतः । सन इति ॥ अथवा पुनरस्तु योगापेक्षम् । ननु चोक्तमुत्तरत्र विधिर्न प्रकल्पेतेति । विधिश्च प्रक्लृप्तः । कथम् । उत्तरत्रापि पूर्ववत्सन इत्येवानुवर्तिष्यते ॥

किमर्थं पुनरिदमुच्यते ।

**पूर्ववत्सन इति शदिम्रियत्यर्थम् ॥१॥**

शदिम्रियत्यर्थोऽयमारम्भः । शदिम्रियतिभ्यां सनन्ताभ्यामात्मनेपदं मा भूदिति ॥

**इतरथा हि ताभ्यां सनन्ताभ्यामात्मनेपदप्रतिषेधः ॥२॥**

---

षण लावतां येत नाहीं. तेव्हां सनाच्या मागें असलेल्या धातूप्रमाणें ज्या धातूहून आत्मनेपद होतें म्हणून सांगावयाचें त्या धातूमध्यें कोणता प्रत्यय शेवटीं केलेला असावा तें कळून येत नाहीं.

आतां प्रकृतसूत्राच्या मागील अशा अर्थानें पूर्व शब्द घातला असेल तर सन्प्रत्ययान्त धातूहून आत्मनेपद होतें असें सन्प्रत्ययान्त हें धातूला विशेषण लावतां येईल. पण हा आत्मनेपदाचा विधि पुढील सूत्रासंबंधानें लागू होणार नाहीं; उदा०- बुभुक्षते, उपयुयुक्षते.

तर मग आतां ह्या दोन तऱ्हांपैकीं तुला वाटेल ती तऱ्हा घे.

तर मग सनाच्या मागील अशा अर्थाचा का पूर्वशब्द असेना ! असूं दे.

पण तसें गृहीत धरलें तर धातूला सनः हें विशेषण लागणार नाहीं असें म्हटलें आहे ना ?

धातूलाही सनः हें विशेषण लावतां येतें.

तें कसें ?

ज्या धातूहून आत्मनेपद येथें सांगावयाचें तो धातु कसा असावा अशी आकांक्षा उत्पन्न झाली असतां सन्प्रत्ययच चटदिशीं मनांत येईल; जसें- सन्प्रत्ययाच्या मागील धातूप्रमाणें आत्मनेपद होतें. कोणाहून ? तर सन्प्रत्ययान्त धातूहून.

किंवा प्रकृतसूत्राच्या मागील अशा अर्थाचा का पूर्वशब्द असेना ! असूं दे.

पण तसें गृहीत धरलें तर हा आत्मनेपदाचा विधि पुढील सूत्रासंबंधानें लागू होणार नाहीं असें म्हटलें आहे ना ?

पुढील सूत्रासंबंधानें सन्प्रत्ययान्ताहून आत्मनेपद करतां येईल.

तें कसें ?

पुढील सूत्रांमध्येंही 'पूर्ववत्सनः' असेंच अनुवृत्त करण्यांत येईल.

पण कोणत्या अर्थानें बरें हें सूत्र केलें असावें?

(वा.१) शद् व मृङ् या धातूंसाठीं हें सूत्र आरंभिलें आहे. म्हणजे सन्प्रत्ययान्त शद् आणि मृङ् या धातूंहून आत्मनेपद झालें पाहिजे म्हणून हें सूत्र केलें आहे.

(वा.२) नाहीं तर, म्हणजे हें सूत्र केलें असतें तें होणार नाहीं.

---

२. भुज् आणि युज् या धातूंहून 'भुजोऽनवने' (१।३।६६) आणि 'प्रोपाभ्यां' (१।३।६४) या पुढील सूत्रांनीं आत्मनेपद सांगितलें आहे. त्या धातूंहून सन्प्रत्यय केला असतां त्या सन्प्रत्ययान्त भुज् आणि युज् धातूंहून प्रकृत सूत्रानें आत्मनेपद होत

३. तेव्हां रक्षणभिन्न अर्थीं भुज्धातूहून आत्मनेपद होतें आणि त्याप्रमाणेंच सन्प्रत्ययान्त भुज्धातूहूनही आत्मनेपद होतें असा अर्थ होईल.

इतरथा ह्यनुच्यमानेऽस्मिञ्शदिम्रियतिभ्यां सनन्ताभ्यामात्मनेपदस्य प्रतिषेधो वक्तव्यः स्यात् । शिशत्सति मुमूर्षति ॥ कथं पुनः पूर्ववत्सन इत्यनेन शदिम्रियतिभ्यामात्मनेपदस्य प्रतिषेधः शक्यो विज्ञातुम् । वतिनिर्देशोऽयं कामचारश्च वतिनिर्देशे वाक्यशेषं समर्थयितुम् । तद्यथा । उशीनरवन्मद्रेषु यवाः । सन्ति न सन्तीति । मातृवदस्याः कलाः । सन्ति न सन्तीति । एवमिहापि पूर्ववद्भवति न भवतीति । न भवतीत्येवं वाक्यशेषं समर्थयिष्यामहे । यथा पूर्वयोर्योगयोः सनन्ताभ्यामात्मनेपदं न भवत्येवमिहापि शदिम्रियतिभ्यां सनन्ताभ्यामात्मनेपदं न भवतीति ॥ यदि तर्हि शदिम्रियत्यर्थोऽयमारम्भो विधिर्न प्रकल्पते । आसिसिषते शिशयिषते । अथ विध्यर्थः शदिम्रियतिभ्यां सनन्ताभ्यामात्मनेपदं प्राप्नोति ॥ यथेच्छासि तथास्तु । अस्तु तावत्प्रतिषेधार्थः । ननु चोक्तं विधिर्न प्रकल्पत इति । विधिश्च प्रक्लृप्तः । कथम् । एतदेव ज्ञापयति सन-

---

नाहीं तर, सन्प्रत्ययान्त शद् आणि मृङ् या धातूंहून आत्मनेपदाच्या निषेधादाखल वचन करणें भाग पडणार आहे; उदा. शिशत्सति, मुमूर्षति.

पण सन्प्रत्ययान्त शद् आणि मृङ् या धातूंहून आत्मनेपद होत नाहीं असा अर्थ 'पूर्ववत्सनः' यावरून कसा बरें निघतो ?

पूर्ववत् येथें वतिप्रत्यय लावून निर्देश केला आहे. आणि वति-प्रत्ययाचा निर्देश केला असेल तेथें तें वाक्य कसा शेष लावून पुरें करावें तें आपल्या मर्जीवर अवलंबून राहतें. तें असें– उशीनरवन्मद्रेषु यवाः म्हणजे सातु हे मद्रदेशामध्यें उशीनरदेशाप्रमाणेंच समजावेत. असें म्हटलें असतां तेथें 'सन्ति' किंवा 'न सन्ति' म्हणजे आहेत किंवा नाहींत यांपैकीं वाटेल तें आपल्या इच्छेला अनुसरून जुळवितां येतें. तसेंच मातृवदस्याः कलाः म्ह. आईप्रमाणें इच्या अंगीं कला जाणाव्यात असें म्हटलें असतां तेथें 'आहेत' किंवा 'नाहींत' यांपैकीं वाटेल तें आपल्या मर्जीप्रमाणें लावितां येतें. याप्रमाणें येथें सन्प्रत्ययान्ताहून पूर्वीप्रमाणें आत्मनेपद असें म्हटलें असल्यामुळें त्याच्यापुढें 'होतें' किंवा 'होत नाहीं' या दोहोंपैकीं कोणताही वाक्यशेष लावतां येईल. तेव्हां येथें 'होत नाहीं' हा वाक्यशेष जोडला असतां असा अर्थ होतो:– ज्याप्रमाणें 'नानोर्ज्ञः' आणि 'प्रत्याङ्भ्यां श्रुवः' या दोन पूर्वसूत्रांनीं आत्मनेपद होत नाहीं असा निषेध केला आहे त्याप्रमाणें पूर्ववत्सनः येथेंही सन्प्रत्ययान्त शद् आणि मृङ् ह्या धातूंहून आत्मनेपद होत नाहीं[४] असा निषेध केला जातो.

जर सन्प्रत्ययान्त शद् आणि मृङ् यांहून आत्मनेपद न होण्यासाठीं हें सूत्र केलें असेल तर आसिसिषते, शिशयिषते इत्यादि उदाहरणांमध्यें आत्मनेपद होण्यासाठीं हें सूत्र केलें आहे असें म्हणतां येणार नाहीं. आतां जर आत्मनेपद होण्यासाठीं हें सूत्र केलें असेल तर सन्प्रत्ययान्त शद् आणि मृङ् या धातूंहून आत्मनेपद होऊं लागेल.

तर मग आतां या दोन प्रकारांपैकीं तुला वाटेल तो प्रकार घे. सन्प्रत्ययान्त शद् आणि मृङ् या धातूंहून आत्मनेपद न होण्यासाठीं का हें सूत्र असेना ! असूं दे.

पण तसें गृहीत धरलें तर आसिसिषते, शिशयिषते येथें आत्मनेपद होणार नाहीं त्याची

---

४. येथें पूर्वसूत्रांतून न, शदेः, म्रियतेः या पदांची अनुवृत्ति होऊन अर्थ होतो.

न्तादात्मनेपदं भवतीति यदयं शदिम्रियतिभ्यां सनन्ताभ्यामात्मनेपदस्य प्रतिषेधं शास्ति ॥ अथवा पुनरस्तु विध्यर्थः । ननु चोक्तं शदिम्रियतिभ्यां सनन्ताभ्यामात्मनेपदं प्राप्नोतीति । नैष दोषः । प्रकृतं सनो नेत्यनुवर्तिष्यते । क्व प्रकृतम् । ज्ञाश्रुस्मृदृशां सनः [१.३.५७] । नानोर्ज्ञः [५८] । सकर्मकात्सनो न । प्रत्याङ्भ्यां श्रुवः [५९] सनो न । शदेः शितः [६०] सनो न । म्रियतेर्लुङ्लिङोश्च [६१] सनो नेति । इहेदानीं पूर्ववत्सन इति सन इत्यनुवर्तते नेति निवृत्तम् । एवं च कृत्वा सोऽप्यदोषो भवति यदुक्तं निमित्तमविशेषितं भवतीति ॥ नैव वा पुनरत्र शदिम्रियतिभ्यां सनन्ताभ्यामात्मनेपदं प्राप्नोति । किं कारणम् । शदेः शित इत्युच्यते न च शदिरेवात्मनेपदस्य निमित्तम् । किं तर्हि । शिदपि निमित्तम् । अथापि शदिरेव शित्परस्तु निमित्तम् । न चायं सन्परः शित्परो भवति ।

---

वाट काय ?

वरील उदाहरणांमध्यें आत्मनेपदाचा विधि मानतां येतो.

तो कसा ?

ज्यापेक्षां हा आचार्य सन्प्रत्ययान्त शद् आणि मृ या धातूंहून आत्मनेपदाचा निषेध करतो त्यावरूनच तो असें सुचवितो की सन्प्रत्ययान्त धातूहून आत्मनेपद होतें.

अथवा सन्प्रत्ययाच्या मागील धातूहून जसें आत्मनेपद होतें तसें सन्प्रत्ययान्त अशा धातूहूनही आत्मनेपद होतें या विधीसाठींच का हें सूत्र असे ना ! असूं दे.

पण तसें गृहीत धरलें तर सन्प्रत्ययान्त शद् आणि मृङ् या धातूंहून आत्मनेपद होऊं लागेल असा दोष दाखविला आहे ना ?

हा दोष येत नाहीं. कारण मागून चालू असलेलीं 'सनः' आणि 'न' हीं दोन पदें तेथें अनुवृत्त करण्यांत येतील.

तीं दोन पदें कोठून चालू झालीं आहेत ?

'ज्ञाश्रुस्मृदृशां सनः' (१।३।५७) येथें सनः हें पद आहे. त्याच्या पुढें 'नानोर्ज्ञः'(१।३।५८) येथें न हें पद आहे. सन्प्रत्ययान्त अशा सकर्मक ज्ञा– धातूहून आत्मनेपद होत नाहीं असा त्याचा अर्थ आहे. त्याच्या पुढें'प्रत्याङ्भ्यां श्रुवः' (१।३।५९) हें सूत्र आहे. तेथें सनः आणि न हीं दोन पदें अनुवृत्त आहेत. त्याच्यापुढें 'शदेः शितः' (१।३।६०) हें सूत्र आहे. तेथेंही सनः आणि न हीं दोन पदें अनुवृत्त होत आहेत. त्याच्यापुढें 'म्रियतेर्लुङ्लिङोश्च' (१।३।६१) हें सूत्र आहे तेथेंही सनः आणि न हीं दोन पदें अनुवृत्त होत आहेत. त्याच्यापुढें 'पूर्ववत्सनः' (१।३।६२) हें प्रकृत सूत्र आहे. येथें फक्त सनः हें पद अनुवृत्त होत आहे आणि न हें पद निवृत्त झालें.

शिवाय असें करण्यांत दुसरा एक फायदा असा होतो की येथें दुसऱ्या 'सनः' या पदाचा लाभ झाल्यामुळें 'ह्या सूत्रानें आत्मनेपद ज्या धातूहून सांगितलें त्या धातूला सनः हें विशेषण लावतां येत नाहीं' असें जें म्हटलें होतें तोही दोष येत नाहीं..

अथवा शिशत्सति मुमूर्षति येथें आत्मनेपद प्राप्तच होत नाहीं.

काय कारण ?

'शदेः शितः' असें म्हटलें आहे, तेव्हां केवळ एकटा शद् धातुच निमित्त म्हणून धरलेला नाहीं.

तर काय ?

शित्प्रत्ययही निमित्त धरला आहे. तेव्हां जरी शद्धातुच निमित्त असला तरी तो शित्प्रत्ययपरक असाच शद् धातु निमित्त होणार आहे. म्हणून शिशत्सति येथें शद् धातु आहे तरी शित्प्रत्ययपरक नसल्यामुळें सनाच्या

यत्र तर्हि शिन्नाश्रीयते म्रियतेर्लुङ्लिङोश्चेति। अत्रापि न म्रियतिरेवात्मनेपदस्य निमित्तम्। किं तर्हि। लुङ्लिङावपि निमित्तम्। अथापि म्रियतिरेव लुङ्लिङ्परस्तु निमित्तम्। न चायं सन्परः लुङ्लिङ्परो भवति॥

किं पुनः पूर्वस्य यदात्मनेपददर्शनं तत्सनन्तस्याप्यतिदिश्यते। एवं भवितुमर्हति।

**पूर्वस्यात्मनेपददर्शनात्सनन्तादात्मनेपदभाव इति चेद्गुपादिष्वप्रसिद्धिः॥३॥**

पूर्वस्यात्मनेपददर्शनात्सनन्तादात्मनेपदं भवतीति चेद्गुपादिष्वप्रसिद्धिः। गुपादीनां न प्राप्नोति। जुगुप्सते मीमांसत इति। न ह्येतेभ्यः प्राक्सन आत्मनेपदं नापि परस्मैपदं पश्यामः॥

**सिद्धं तु पूर्वस्य लिङ्गातिदेशात्॥४॥**

सिद्धमेतत्। कथम्। पूर्वस्य यदात्मनेपदलिङ्गं तत्सनन्तस्याप्यतिदिश्यते॥

**क्ञादिषु तु लिङ्गप्रतिषेधः॥५॥**

क्ञादिषु तु लिङ्गस्य प्रतिषेधो वक्तव्यः। अनुचिकीर्षति पराचिकीर्षतीति॥

---

मागील शद् धातु हा आत्मनेपदाला लायक नाहीं म्हणून त्या ठिकाणीं सन्प्रत्ययान्त शद्धातूहूनही आत्मनेपद होत नाहीं.

तर मग ज्या ठिकाणीं शित् प्रत्यय निमित्त धरला नाहीं म्हणजे शित्प्रत्ययाशिवाय दुसरेंही निमित्त धरलें आहे तेथें म्हणजे 'म्रियतेर्लुङ्लिङोश्च' येथें कसें ?

येथेंही केवळ एकटा मृङ् धातूच आत्मनेपदाला निमित्त म्हणून धरला नाहीं.

तर काय ?

लुङ् व लिङ् हेही निमित्त धरले आहेत. तेव्हां जरी मृङ्धातुच निमित्त असला तरी लुङ्लिङ्प्रत्ययपरक असाच मृधातु निमित्त धरला जाणार आहे. म्हणून मुमूर्षति येथें मृङ् धातु आहे तरी तो लुङ्लिङ्प्रत्ययपरक नसल्यामुळें सनाच्या मागील मृङ् धातु आत्मनेपदाला लायक नव्हे म्हणून त्या ठिकाणीं सन्प्रत्ययान्त मृधातूहून आत्मनेपद होत नाहीं.

पण काय जसें सन्प्रत्ययामागील ज्या धातूपुढें आत्मनेपद दिसतें तसें त्याच सन्प्रत्ययान्त धातूहूनही आत्मनेपद होतें असा हा कार्यांचा अतिदेश आहे ?

कार्याला प्राधान्य असल्यामुळें कार्यांचा अतिदेश मानणें योग्य आहे.

(वा.३) सन्प्रत्ययाच्या मागील धातूच्या पुढें आत्मनेपद दिसतें म्हणून सन् प्रत्ययान्त धातूहून आत्मनेपद होतें असें म्हटलें तर जुगुप्सते, मीमांसते, येथें सन्प्रत्ययान्त गुप् वगैरे धातूंहून आत्मनेपद प्राप्त होणार नाहीं. कारण सन्प्रत्ययाच्या मागें असलेल्या या गुप् वगैरे धातूंहून आत्मनेपद झालेलें दृष्टीस पडत नाहीं किंवा परस्मैपदही दृष्टीस पडत नाहीं.

(वा.४) सन्प्रत्ययान्त गुप् वगैरे धातूंहून आत्मनेपद सिद्ध होत आहे.

तें कसें ?

सन्प्रत्ययामागील धातूला असलेलें जें आत्मनेपदाचें निमित्त अनुदात्तेत्त्व, ङित्त्व, वगैरे (१।३।१२) त्याचा सन्प्रत्ययान्ताचे ठिकाणीं अतिदेश केला जात आहे. अर्थात् हा निमित्ताचा अतिदेश आहे.

(वा.५) अनुचिकीर्षति, पराचिकीर्षति, येथें सन्प्रत्ययान्त धातूहून आत्मनेपद न व्हावें यासाठीं सन्प्रत्ययाच्या मागील कृञ् वगैरे धातूचे ठिकाणीं असलेल्या ञकारेत्संज्ञकत्व वगैरे आत्मनेपदनिमित्ताचा निषेध केला

---

५. कारण गुप्, तिज् आणि कित् या धातूंहून सन्प्रत्यय (३।१।६) नित्य होत असल्यामुळें सन्प्रत्ययरहित अशा गुप् वगैरे धातूंचा प्रयोगच नाहीं.

अस्तु तर्हि प्राक्सनो येभ्य आत्मनेपदं दृष्टं तेभ्यः सनन्तेभ्योऽपि भवतीति। ननु चोक्तं पूर्वस्यात्मनेपददर्शनात्सनन्तादात्मनेपदभाव इति चेद्गुपादिष्वप्रसिद्धिरिति। नैष दोषः। अनुबन्धकरणसामर्थ्याद्भविष्यति॥ अथवावयवे कृतं लिङ्गं समुदायस्य विशेषकं भवति। तद्यथा। गोः सक्थनि कर्णे वा कृतं लिङ्गं समुदायस्य विशेषकं भवति॥ यद्यवयवे कृतं लिङ्गं समुदायस्य विशेषकं भवति जुगुप्सयति मीमांसयतीत्यत्रापि प्राप्नोति। नैष दोषः। अवयवे कृतं लिङ्गं कस्य समुदायस्य विशेषकं भवति। यं समुदायं योऽवयवो न व्यभिचरति। सनं च न व्यभिचरति णिचं पुनर्व्यभिचरति। तद्यथा। गोः सक्थनि कर्णे वा कृतं लिङ्गं गोरेव विशेषकं भवति न गोमण्डलस्य॥

---

पाहिजे.[६]

तर मग सन्प्रत्ययाच्या मागील ज्या धातूच्या पुढें आत्मनेपद दिसतें तसें त्याच सन्प्रत्ययान्त धातूहूनही आत्मनेपद होतें असा कार्यातिदेश असूं दे.

पण सन्प्रत्ययाच्या मागील धातूच्या पुढें आत्मनेपद दिसतें म्हणून सन्प्रत्ययान्त अशा त्या धातूहूनही आत्मनेपद होतें असें म्हटलें तर सन्प्रत्ययान्त गुप् वगैरे धातूंहून आत्मनेपद होणार नाहीं असा दोष दाखविला आहे ना?

हा दोष येत नाहीं. कारण त्या गुप् वगैरे धातूंना आत्मनेपद होण्यासाठीं जोडलेला जो इत्संज्ञक अनुदात्तस्वर तो व्यर्थ होतो म्हणून त्या जोरावर सन्प्रत्ययान्त अशा त्या गुप् वगैरे धातूंहून आत्मनेपद होईल.

किंवा समुदायाचे ठिकाणीं कांहीं विशेष दाखविण्याकरितां एखाद्या अवयवाचे ठिकाणीं केलेलें चिन्ह तो विशेष दाखवितें. तें असें— बैलाच्या मांडीला किंवा कानाला केलेली खूण त्या बैलाचा विशेष दाखँवितें. जर अशा रीतीनें अवयवाच्या ठिकाणीं केलेल्या चिन्हाचा समुदायाकडे उपयोग होत असेल तर जुगुप्सयति, मीमांसयति येथेंही गुप्-धातूच्या अनुदात्तेत्संज्ञकत्वामुळें आत्मनेपद होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण अवयवाचे ठिकाणीं केलेल्या चिन्हाचा कोणत्या समुदायाकडे उपयोग करावयाचा? ज्या समुदायाला सोडून जो अवयव केव्हांही असत नाहीं तेवढ्या समुदायाकडे त्या अवयवाच्या चिन्हाचा उपयोग करावा. गुप् हा अवयव जुगुप्स या सन्प्रत्ययान्त समुदायाला सोडून केव्हांही असत नाहीं. आणि तोच गुप् हा अवयव णिच्प्रत्ययान्त जुगुप्सि या समुदायाला सोडून असूं शकतो. तेव्हां गुप् या धातूचें जें अनुदात्तेत्संज्ञकत्व हें चिन्ह त्याचा उपयोग जुगुप्स या सन्प्रत्ययान्त समुदायाकडेसच होतो. आणि जुगुप्सि या णिच्प्रत्ययान्त समुदायाकडे होत नाहीं. जसें— बैलाच्या मांडीवर किंवा कानावर केलेल्या खुणेमुळें त्या बैलाला आखुड मांडीचा, फुटक्या कानाचा असें म्हणतात; तो बैल ज्या समुदायामध्यें आहे त्या समुदायाला तसें म्हणत नाहींत.[७]

---

६. नाहीं तर अनु आणि परा या उपसर्गांपुढील कृञ्-धातूहून परस्मैपद सांगितलें (१।३।७९) आहे. तेव्हां तेथें आत्मनेपद दिसत नाहीं, तरी त्याचें ञकारेत्संज्ञकत्व हें आत्मनेपदाचें निमित्त (१।३।७२) कायम असल्यामुळें त्याचा सन्प्रत्ययान्त धातूचे ठिकाणीं अतिदेश होऊन आत्मनेपद होऊं लागेल.

७. तेव्हां जुगुप्स यांतील गुप् या भागाचें अनुदात्तेत्संज्ञकत्व हें चिन्ह जुगुप्स या समुदायाला लागू होईल.

**प्रत्ययग्रहणं णियगर्थम् ॥ ६ ॥**

प्रत्ययस्य ग्रहणं कर्तव्यम् । पूर्ववत्प्रत्ययादिति वक्तव्यम् । किं प्रयोजनम् । णियगर्थम् । णियगन्तादपि यथा स्यादिति । आकुस्मयते विकुस्मयते । हृणीयते महीयत इति ॥ तत्र को दोषः ।

**तत्र हेतुमण्णिचः प्रतिषेधः ॥ ७ ॥**

तत्र हेतुमण्णिचः प्रतिषेधो वक्तव्यः । आसयति शाययतीति । सूत्रं च भिद्यते ॥ यथान्यासमेवास्तु । कथमाकुस्मयते विकुस्मयते हृणीयते महीयत इति । अनुबन्धकरणसामर्थ्याद्भविष्यति ॥ अथावयवे कृतं लिङ्गं समुदायस्य विशेषकं भवति । तद्यथा । गोः सक्थनि कर्णे वा कृतं लिङ्गं समुदायस्य विशेषकं भवति ॥ यद्यवयवे कृतं लिङ्गं समुदायस्य विशेषकं भवति हृणीययति महीययति अत्रापि प्राप्नोति । अवयवे कृतं लिङ्गं कस्य समुदायस्य विशेषकं भवति । यं समुदायं योऽवयवो न व्यभिचरति । यकं च न व्यभिचरति णिचं तु व्यभिचरति । तद्यथा । गोः सक्थनि कर्णे वा ।

(वा.६) 'पूर्ववत्सनः' येथील सनः हा शब्द काढून टाकून त्याचे जागीं 'प्रत्ययात्' हा शब्द घालावा. म्हणजे 'पूर्ववत्प्रत्ययात्' असें सूत्र करावें.

काय उपयोग ?

आकुस्मयते विकुस्मयते, हृणीयते महीयते, येथें णिच्प्रत्ययान्त आणि यक्प्रत्ययान्त धातूंहूनही आत्मनेपद झालें पाहिजे.

तर मग तसें करण्यास काय हरकत आहे ?

(वा.७) तसें करण्यांत आसयति शाययति येथें हेतुमण्णिच्प्रत्ययान्त धातूंहून आत्मनेपद न व्हावें यासाठीं तशा ठिकाणीं प्रतिषेध केला पाहिजे. शिवाय सूत्राच्या मूळ स्वरूपांतही बदल होत आहे.

तर मुळांत आहे तसेंच सूत्र असूं दे.

आहे तसेंच सूत्र ठेवलें तर आकुस्मयते विकुस्मयते, हृणीयते महीयते, या उदाहरणांची वाट काय ?

त्या धातूंना आत्मनेपद होण्यासाठीं जोडलेला जो इत्संज्ञक अनुदात्त स्वर आणि ङकार तो व्यर्थ होतो म्हणून त्या जोरावर णिच्प्रत्ययान्त आणि यक्प्रत्ययान्त अशा त्या धातूंहून आत्मनेपद होईल.

किंवा कांहीं विशेष दाखविण्याकरितां एखाद्या अवयवाचे ठिकाणीं केलेलें चिन्ह समुदायाचे ठिकाणीं तो विशेष दाखवितें. जसें बैलाच्या मांडीला किंवा कानाला केलेली खूण त्या बैलाचा विशेष दाखविते.

अशा रीतीनें अवयवाचे ठिकाणीं केलेल्या चिन्हाचा समुदायाकडे उपयोग होत असेल तर यक्प्रत्ययान्त हृणीङ्, महीङ् धातूंहून णिच्प्रत्यय करून सिद्ध होणाऱ्या हृणीययति, महीययति या उदाहरणांमध्येंही आत्मनेपद होऊं लागेल.

अवयवाचे ठिकाणीं केलेल्या चिन्हाचा संबंध कोणत्या समुदायाशीं येऊन पोचतो ? जो अवयव ज्या समुदायाला सोडून कधींही असूं शकत नाहीं तेवढ्या समुदायाकडे त्या अवयवाच्या चिन्हाचा संबंध पोचतो. हृणी, मही हे अवयव हृणीय महीय या यक्प्रत्ययान्त समुदायाला सोडून केव्हांही असूं शकत नाहींत. आणि तेच अवयव हृणीयि महीयि या णिच्प्रत्ययान्त समुदायाला सोडून असूं शकतात. म्हणून हृणीङ् महीङ् यांच्या ङित्वाचा संबंध यक्प्रत्ययान्त अशा हृणीय,

८. कुस्म हा धातु अनुदात्तेत्संज्ञक दहाव्या गणामध्यें आहे. त्याहून णिच्प्रत्यय (३।१।२५) झाला आहे. तसेंच हृणीङ् व महीङ् हे ङकारेत्संज्ञक धातु कण्ड्वादि गणामध्यें आहेत. त्याहून यक् प्रत्यय (३।१।२७) झाला आहे.

कृतं लिङ्गं गोरेव विशेषकं भवति न गोमण्डलस्य ॥

## आम्प्रत्ययवत्कृञोऽनुप्रयोगस्य ॥ १।३।६३ ॥

कृञ्ग्रहणं किमर्थम् । इह मा भूत् । ईहामास ईहामासतुः ईहामासुः । कथं चात्रास्तेरनुप्रयोगो भवति । प्रत्याहारग्रहणं तत्र विज्ञायते । कथं पुनर्ज्ञायते तत्र प्रत्याहारग्रहणमिति । इह कृञ्ग्रहणात् । इह कस्मात्प्रत्याहारग्रहणं न भवति । इहैव कृञ्ग्रहणात् ॥ अथेह कस्मान्न भवति । उदुम्भांचकार उदुब्जांचकार । ननु चाम्प्रत्ययवदित्युच्यते न चात्राम्प्रत्ययादात्मनेपदं पश्यामः । न ब्रूमोऽनेनेति । किं तर्हि । स्वरितञितः कर्त्रभिप्राये क्रियाफल आत्मनेपदं भवतीति ॥ नैष दोषः । इदं नियमार्थं भविष्यति । आम्प्रत्ययवदेवेति ॥ यदि

महीय या समुदायाकडे पोचतो; हृणीयि आणि महीयि या णिच् प्रत्ययान्त समुदायाकडे पोचत नाहीं. जसें— बैलाच्या मांडीवर किंवा कानावर केलेल्या खुणेचा संबंध त्या एका बैलाकडेच पोचतो; त्या बैलाच्या घोळक्याकडे पोचत नाहीं.

(सू.६३) येथें कृञः हा शब्द कशाकरितां घातला आहे ?

ईहामास ईहामासतुः ईहामासुः येथें अनुप्रयोग केलेल्या अस्धातूहून आत्मनेपद होऊं नये म्हणून कृञः हा शब्द घातला आहे.

पण येथें अस्धातूचा अनुप्रयोग कसा बरें प्राप्त होतो ?

'कृञ्चानुप्रयुज्यते' (३।१।४०) या सूत्रामध्यें कृञ् हा प्रत्याहार उच्चारला आहे.

पण तेथें कृञ् हा प्रत्याहार उच्चारला आहे असें कशावरून ओळखण्यांत येतें ?

येथें प्रकृतसूत्रामध्यें कृञः असें म्हटलें आहे त्यावरून.

आतां 'आम्प्रत्ययवत्' ह्या प्रकृतसूत्रामध्यें कृञ् हा प्रत्याहार कां बरें घेत नाहीं ?

येथें कृञः असें म्हटलें आहे त्यावरूनच घेत[3] नाहीं.

आतां उदुम्भांचकार उदुब्जांचकार येथें अनुप्रयोग केलेल्या कृ-धातूपुढें आत्मनेपद कां बरें होत नाहीं ?

अहो पण 'आम्प्रत्ययाच्या प्रकृतीप्रमाणें' असें येथें म्हटलें आहे. आणि वरील उदाहरणामध्यें तर आम्प्रत्ययाचे प्रकृतिभूत जे उम्भ आणि उब्ज हे धातु त्यांहून आत्मनेपद झालेलें दृष्टीस पडत नाहीं.

'आम्प्रत्ययवत्' या प्रकृतसूत्रानें आत्मनेपद कां होत नाहीं असें आम्ही म्हणत नाहीं.

तर काय म्हणत आहांत ?

'स्वरितञितः' (१।३।७२) यानें आत्मनेपद कां होत नाहीं, असें म्हणत आहोंत.

हा दोष येत नाहीं. कारण 'आम्प्रत्ययवत्' हें सूत्र नियमार्थ होईल. म्हणजे अनुप्रयोग केलेल्या कृञ्धातूपुढें आत्मनेपद करणें झाल्यास आम्प्रत्ययाची प्रकृति आत्मनेपदी

१. आम् प्रत्यय ज्याहून केला तो धातु आत्मनेपदी असेल तर त्या आम्-प्रत्ययान्ताच्या पुढें अनुप्रयोग केलेल्या कृ-धातूहूनही आत्मनेपद होतें; उदा०— एधांचक्रे.

२. जर 'कृञ्चानुप्रयुज्यते' या सूत्रामध्यें कृञ् हा प्रत्याहार न घेतां एकटा कृ धातुच घेतला तर एकट्या कृ-धातूचाच अनुप्रयोग होत असल्यामुळें आपोआप ह्या प्रकृतसूत्रानें आत्मनेपद त्या कृ-धातूहूनच होईल. तेव्हां येथील कृञः हा शब्द व्यर्थ होईल. त्या जोरावर त्या सूत्रांमध्यें कृञ् हा प्रत्याहार घेऊन कृञ्-शब्दानें कृ, भू आणि अस् या तीन धातूंचें ग्रहण होतें.

३. येथें प्रत्याहार घेऊन कृ, भू, अस् या तिघांचें ग्रहण होईल तर त्याकरितां येथें कृञः असें म्हणण्याचें कारण नाहीं. कारण त्या तिघांचाच अनुप्रयोग होत आहे. तेव्हां येथील कृञः हें व्यर्थ होईल, त्याचे जोरावर येथें प्रत्याहार घ्यावयाचा नाहीं.

नियमार्थं विधिर्न प्रकल्पते । ईहांचक्रे ऊहांचक्र इति । विधिश्च प्रक्लृप्तः । कथम् । पूर्ववदिति वर्तते । आम्प्रत्ययवत्पूर्ववच्चेति ॥

## प्रोपाभ्यां युजेरयज्ञपात्रेषु ॥१।३।६४॥

स्वराद्युपसृष्टादिति वक्तव्यम् । उद्युङ्क्ते अनुयुङ्क्ते ॥ अपर आह । स्वराद्यन्तोपसृष्टादिति वक्तव्यम् । प्रयुङ्क्ते नियुङ्क्ते विनियुङ्क्ते ॥

## समः क्ष्णुवः ॥१।३।६५॥

किमर्थं विदेशस्थस्य ग्रहणं क्रियते न समो गमादिष्वेवोच्येत ।

### समः क्ष्णुवः सकर्मकार्थम् ॥१॥

सकर्मकार्थोऽयमारम्भः । अकर्मकादिति हि तत्रानुवर्तते ॥

## भुजोऽनवने ॥१।३।६६॥

अनवनकौटिल्ययोरिति वक्तव्यम् । इहापि यथा स्यात् । प्रभुजति वाससी । निभुजति जानुशिरसी इति ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । यस्य भुजेरवनमनवनं चार्थस्तस्य ग्रहणं न चास्य

---

असेल तरच करावें. एरवीं करूं नये.

जर 'आम्प्रत्ययवत्' हें सूत्र फक्त नियमार्थ आहे तर ईहांचक्रे ऊहांचक्रे येथें आत्मनेपद करावें असें सांगणारें कोणीच नाहीं असें होईल.

आत्मनेपदाचा विधिही करतां येतो.

तो कसा ?

'पूर्ववत्सनः' येथून पूर्ववत् या पदाची अनुवृत्ति होत आहे. तेव्हां आम्प्रत्ययवत् हें विध्यर्थ होईल आणि पूर्ववत् हे नियमार्थ होईल

(सू. ६४) प्रोपाभ्याम् याच्या ऐवजीं 'स्वराद्युपसृष्टात्' असें म्हणावें. म्हणजे स्वर आरंभीं असलेला कोणताही उपसर्ग चालेल; जसें– उद्युङ्क्ते, अनुयुङ्क्ते.

दुसरा कोणी एक वैयाकरण असें म्हणतो की 'स्वराद्यन्तोपसृष्टात्' असें म्हणावें. म्हणजे स्वर आरंभीं किंवा शेवटीं असलेला कोणताही उपसर्ग चालेल; जसें– प्रयुङ्क्ते, विनियुङ्क्ते, नियुङ्क्ते.

(सू. ६५) 'समो गम्यृच्छि' (१।३।२९) या प्रदेशाचे ठिकाणीं उच्चारलेल्या सम् या उपसर्गाचें पुनः येथें ग्रहण केलें त्यापेक्षां येथील क्ष्णु धातुच 'समो गम्यृच्छि' या सूत्रामध्यें कां घातला नाहीं ?

(वा. १) क्ष्णु धातु सकर्मक असतांही सम् उपसर्गाच्या पुढें आला असतां त्याहून आत्मनेपद झालें पाहिजे यासाठीं 'समः क्ष्णुवः' हें सूत्र केलें आहे. कारण 'समो गमृच्छि०' येथें अकर्मकात् या पदाची अनुवृत्ति येत आहे.

(सू. ६६) येथें 'अनवनकौटिल्ययोः' असें म्हणावें. म्हणजे पालन आणि कौटिल्य या दोन अर्थीं आत्मनेपद होणार नाहीं; उदा०— प्रभुजति वाससी, निभुजति जानुशिरसी.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण पालन करणें आणि त्याशिवाय निराळें म्हणजे भोजन करणें या दोन अर्थांचा जो भुज् धातु त्याचेंच येथें

---

४. तेव्हां कर्तृगामी क्रियाफल असतांना जरी आत्मनेपद (१।३।७२) होईल तरी परगामी क्रियाफल असतांना होणार नाहीं असा दोष येतो.

१. प्र किंवा उप या उपसर्गांपुढील युज्-धातूहून आत्मनेपद होतें; उदा०— प्रयुङ्क्ते, उपयुङ्क्ते.

१. सम् या उपसर्गांपुढील क्ष्णु-धातूहून आत्मनेपद होतें; उदा०— संक्ष्णुते शस्त्रम्.

१. पालनभिन्न अर्थ गम्यमान असतांना भुज् धातूहून आत्मनेपद होतें; उदा०— भुङ्क्ते भुञ्जाते भुञ्जते.

२. येथें भुज्-धातूचा अर्थ कौटिल्य म्हणजे वक्र करणें हा आहे.

भुजेरवनमनवनं चार्थः ॥

**'णेरणौ यत्कर्म णौ चेत्स कर्ता-नाध्याने ॥१।३।६७॥**

**णेरात्मनेपदविधानेऽण्यन्तस्य कर्मण-स्तत्रोपलब्धिः ॥१॥**

णेरात्मनेपदविधानेऽण्यन्तस्य यत्कर्म यदा ण्यन्ते तदेव कर्म भवति तदात्मने-पदं भवतीति वक्तव्यम् ॥

**इतरथा हि सर्वप्रसङ्गः ॥२॥**

इतरथा हि सर्वत्र प्रसङ्गः स्यात् इहापि प्रसज्येत । आरोहन्ति हस्तिनं हस्तिपकाः । आरोहयमाणो हस्ती स्थल-मारोहयति मनुष्यान् ॥ तत्तर्हि वक्त-व्यम् । न वक्तव्यम् । कस्मान्न भवति आरोहन्ति हस्तिनं हस्तिपकाः आरोहय-माणो हस्ती स्थलमारोहयति मनुष्या-निति । एवं वक्ष्यामि । णेरात्मनेपदं भवति । ततोऽणौ यत्कर्म णौ चेत् ।

---

ग्रहण केलें आहे. आणि कौटिल्य या अर्थाचा जो भुज धातु त्याला तसे दोन अर्थ नाहींत. तेव्हां येथें त्याचें ग्रहण होतें नाहीं.

(सू.६७, वा.१) हें जें णि-प्रत्ययान्ताहून आत्मनेपदाचें विधान केलें आहे तेथें अण्य-न्तावस्थेंतील जें कर्म तेंच ण्यन्तावस्थेंतील कर्म असेल तर, म्हणजे निराळें कर्म नसेल तरच, आत्मनेपद होतें असें म्हणावें.

(वा.२) तसें म्हटलें नाहीं तर ज्या ठिकाणीं अण्यन्तावस्थेंतील कर्माहून निराळें कर्म (ण्य-न्तावस्थेंत) असेल अशा सर्व ठिकाणीं आत्म-नेपद करण्याची पाळी येईल. तेव्हां आरो-हन्ति हस्तिनं हस्तिपकाः, आरोहयमाणो हस्ती स्थलमारोहयति मनुष्यान् येथें, म्ह. आरोह-यति येथें, आत्मनेपद होऊं लागेल.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण, या सूत्राचा असा अर्थ वर्णन करण्यांत येईलः– 'णेः', ण्यन्ताहून आत्मनेपद होतें हें एक पोटवाक्य. पुढें 'अणौ यत्कर्म णौ चेत्', अण्यन्तावस्थेंतील

---

३. सूत्रामध्यें अनवने असें म्हटलें आहे. अवन म्हणजे पालन हा अर्थ नसावा, या म्हणण्यावरूनच अवन अर्थ दाखविण्याची योग्यता ज्या भुज्धातू-मध्यें असेल तोच भुज् धातु येथें घेतला जातो. कौटिल्य या अर्थाच्या भुज्धातूला पालन अर्थ दाख-विण्याची योग्यता नसल्यामुळें येथें त्याचें ग्रहण होत नाहीं.

१. ण्यन्त धातूहून आत्मनेपद होतें. अण्यन्त अवस्थेमधील जें कर्म त्यापेक्षां ण्यन्त अवस्थेमध्यें निराळें कर्म नसावें व तें अण्यन्त अवस्थेमधील कर्म ण्यन्त अवस्थेमध्यें कर्ता असलें पाहिजे आणि उत्कंठा-पूर्वक स्मरण हा धातूचा अर्थ नसावा; उदा०–आरो-हन्ति हस्तिनं हस्तिपकाः–माहुत हत्तीवर आरोहण करतात, ही अण्यन्तावस्था होय. हस्ती स्थलमारोह-यति मनुष्यान्– हत्ती हा महातांना आपल्यावरील बैठकीवर आरोहण करवितो, ही ण्यन्त अवस्था होय. अण्यन्त अवस्थेंतील कर्म जो हत्ती तोच प्रयो-जक कर्ता ठेविला आहे, तरी पण अण्यन्त अवस्थेपेक्षां निराळे असे मनुष्य व स्थल हे ण्यन्त अवस्थेमध्यें कर्म असल्यामुळें आरोहयति येथें प्रकृतसूत्रानें आत्मनेपद झालें नाहीं. आतां णिच् प्रत्यय केल्या-नंतरसुद्धां जर रोहि या ण्यन्त धातूचा आरोहण-विषय होतो इतकाच अर्थ विवक्षित असेल तर हस्ती आरोहयते असा प्रयोग होतो; तोच या प्रकृतसूत्राचें उदाहरण होय. येथें रोहि हा धातु अकर्मक आहे त्यामुळें अण्यन्त अवस्थेंतील हत्ती हें जें कर्म त्यापेक्षां निराळें कर्म कोणीही नाहीं. आणि तें जें हत्ती हें कर्म तोच कर्ता आहे. याच अर्थी रोहि या धातूहून आत्मनेपदप्रत्यय शानच् केला असतां आरोहय-माणः असें रूप होतें.

२. सूत्रांतील 'अणौ यत्कर्म णौ चेत्स कर्ता' या पदापासून 'अण्यन्त अवस्थेमध्यें जें कर्म तो ण्यन्त अवस्थेमध्यें कर्ता पाहिजे' एवढी एकच अट दिसते. म्हणून ही दुसरी अट येथें घालावी असें वार्तिककार म्हणत आहेत.

अण्यन्ते यत्कर्म णौ चेण्णौ यदि तदेव कर्म भवति। ततः स कर्ता। कर्ता चेत्स भवति णाविति॥ यद्येवं कर्मकर्तायं भवति तत्र कर्मकर्तृत्वात्सिद्धम्।

**कर्मकर्तृत्वात्सिद्धमिति चेद्यक्चिणोर्निवृत्त्यर्थं वचनम् ॥३॥**

कर्मकर्तृत्वात्सिद्धमिति चेद्यक्चिणोर्निवृत्यर्थमिदं वक्तव्यम्। कर्मापदिष्टौ यक्चिणौ मा भूतामिति॥

**न वा यक्चिणोः प्रतिषेधात् ॥४॥**

न वैष दोषः। किं कारणम्। यक्चिणोः प्रतिषेधात्। प्रतिषिध्येते अत्र यक्चिणौ। यक्चिणोः प्रतिषेधे हेतुमण्णिश्रिब्रूञामुपसंख्यानमिति॥ यस्तर्हि न हेतुमण्णिच्तदर्थमिदं वक्तव्यम्। तस्य कर्मापदिष्टौ यक्चिणौ मा भूतामिति। उत्पुच्छयते पुच्छं स्वयमेव। उदपुपुच्छत पुच्छं स्वयमेव। अत्रापि यथा भारद्वाजीयाः पठन्ति तथा भवितव्यं प्रतिषेधेन। यक्चिणोः प्रतिषेधे णिश्रन्थिग्रन्थिब्रूञात्मनेपदाकर्मकाणामुपसंख्यानमिति॥स चावश्यं प्रतिषेध आश्रयितव्यः।

---

जें कर्म तेंच कर्म ण्यन्तावस्थेमध्यें असेल तर, म्हणजे निराळें कर्म नसेल तर, हें दुसरें पोटवाक्य. पुढें 'स कर्ता', अण्यन्त अवस्थेंतील जें कर्म तो ण्यन्त अवस्थेंतील कर्ता असेल तर, हें तिसरें पोटवाक्य होय; ह्या वाक्यामध्यें अणौ यत्कर्म णौ चेत् या पदांची अनुवृत्ति आहे.

असें आहे तर हा कर्माचा कर्ता केला आहे. तेव्हां तेथें 'कर्मवत्कर्मणा०' यानेंच आत्मनेपद सिद्ध होत आहे.

(वा.३) कर्माचा कर्ता केल्यामुळें 'कर्मवत्कर्मणा० (३।१।८७) यानेंच तेथें आत्मनेपद साधतें असें म्हणणें असेल तर कर्मवत् या अतिदेशानें प्राप्त होणाऱ्या कार्यांमध्यें फक्त आत्मनेपदच व्हावें, आणि यक् व चिण् हे न व्हावेत यासाठीं नियमार्थ हें सूत्र करावें लागणार आहे.

(वा.४) कर्मवद्भावामुळें यक् आणि चिण् हे होतील असा दोष येत नाहीं.

काय कारण ?

'यक्चिणोः प्रतिषेधे हेतुमण्णिश्रिब्रूञाम्' (३।१।८९, वा.१) या वार्तिकानें यक् व चिण् यांचा प्रतिषेध केला आहे.

तर मग जो हेतुमण्णिच् नव्हे त्या ठिकाणीं कर्मवद्भावानें प्राप्त होणारा यक् व चिण् न व्हावा यासाठीं हें सूत्र केलें पाहिजे; जसें— उदपुपुच्छत पुच्छं स्वयमेव.

येथेंही भारद्वाजीय वैयाकरणांच्या मताप्रमाणें वार्तिकपाठ घेतला म्हणजे यक् आणि चिण् यांचा निषेध होईलच. त्यांचा वार्तिकपाठ असा आहे—'यक्चिणोः प्रतिषेधे णिश्रन्थिग्रन्थिब्रूञात्मनेपदाकर्मकाणामुपसंख्यानम्.

वार्तिककारांनीं केलेला हा प्रतिषेध अवश्य स्वीकारलाच पाहिजे.

---

३. अण्यन्त अवस्थेमध्यें जी क्रिया तीच ण्यन्त अवस्थेमध्यें असेल तर, असा अर्थ दुसऱ्या वाक्याचा कौमुदीमध्यें केला आहे.

४. ण्यन्त धातूच्या कर्मकर्तरिप्रयोगामध्यें जर कर्मवद्भावानें कार्यें होतील तर फक्त आत्मनेपदच करावें, यक् किंवा चिण् करूं नये, असा नियम होय.

५. येथें 'पुच्छ उडविणें' अर्थाला दाखविणाऱ्या पुच्छशब्दाहून 'पुच्छभाण्ड'० (३।१।२०) या सूत्रानें स्वार्थी णिङ्प्रत्यय झाला आहे. तेथें सौकर्य दाखविण्याच्या इच्छेनें गाय या कर्त्याची अविवक्षा करून पुच्छ हाच कर्माचा कर्ता बनविला आहे. या वेळीं 'कर्मवत्कर्मणा' (३।१।८७) या कर्मवद्भावानें प्राप्त झालेले यक्चिण्प्रत्यय होऊं नयेत व फक्त आत्मनेपदच व्हावें यासाठीं 'णेरणौ' हें प्रकृतसूत्र आरंभिलें पाहिजे.

६. णिङ् आणि णिच् या उभयतांचाही णिशब्दानें संग्रह होतो. तेव्हां णिङन्त किंवा णिजन्त या दोन्ही ठिकाणीं यक् आणि चिण् यांचा प्रतिषेध

**इतरथा हि यत्र नियमस्ततोऽन्यत्र प्रतिषेधः ॥५॥**

अनुच्यमाने ह्येतस्मिन्यत्र नियमस्ततोऽन्यत्र तेन यक्चिणोः प्रतिषेधो वक्तव्यः स्यात् । गणयति गणं गोपालकः । गणयति गणः स्वयमेव ॥

**आत्मनेपदस्य च ॥६॥**

आत्मनेपदस्य च प्रतिषेधो वक्तव्यः । गणयति गणः स्वयमेव ॥

**आत्मनेपदप्रतिषेधार्थं तु ॥७॥**

आत्मनेपदप्रतिषेधार्थमिदं वक्तव्यम् । गणयति गणः स्वयमेव ॥ इष्यत एवात्रात्मनेपदम् । किमिष्यत एवाहोस्वित्प्राप्नोत्यपि । इष्यते च प्राप्नोति च । कथम् । अणाविति कस्येदं णेर्ग्रहणम् । यस्माण्णेः प्राक्कर्म कर्ता वा विद्यते न चैतस्माण्णेः प्राक्कर्म कर्ता वा विद्यते ॥ इदं तर्हि प्रयोजनमनाध्यान इति वक्ष्यामीति । इह मा भूत् । स्मरति वनगुल्मस्य कोकिलः । स्मरयत्येनं वनगुल्मः स्वयमेवेति ॥ एत-

(वा.५) न स्वीकारला तर जेथें 'णेरणौ' हा नियम प्रवृत्त होऊं शकत नाहीं तेथें यक्-चिण् यांच्या निषेधादाखल स्वतन्त्र वचन करावें लागेल; जसें– गणयति गणं गोपालकः, गणयति गणः स्वयमेवँ.

(वा.६) शिवाय गणयति गणः स्वयमेव येथें कर्मवद्भावानें प्राप्त होणाऱ्या आत्मनेपदाचाही निषेध करावा लागेल.

(वा.७) गणयति गणः स्वयमेव येथें कर्मवद्भावानें प्राप्त होणाऱ्या आत्मनेपदाचा बाध व्हावा म्हणून नियमार्थ 'णेरणौ' हें सूत्र ठेवावें लागेल.

पण गणयति गणः स्वयमेव येथें कर्मवद्भावानें प्राप्त होणारें आत्मनेपद इष्टच आहे ना ?

काय गणयति गणः स्वयमेव येथें 'आत्मनेपद इष्टच आहे' याचा आत्मनेपद होणें इष्ट आहे एवढाच अर्थ, किंवा प्राप्तही होतें असा अर्थ ?

आत्मनेपद इष्टही आहे आणि प्राप्तही होत आहे.

तें कसें ?

'अणौ' येथील णि-शब्दानें कोणता णि-प्रत्यय घ्यावयाचा आहे ?

जो णि-प्रत्यय करण्याच्या पूर्वी त्या णिच्-प्रत्ययाच्या पूर्वीच्या धातूला कर्म किंवा कर्ता आहे तसला णिप्रत्यय घ्यावयाचा आहे. अर्थात् हेतुमत् णिच् या अर्थाचा णि शब्द घातला आहे, आणि गणयति येथील जो णि-प्रत्यय त्याच्यामागील धातूचा स्वतन्त्र प्रयोग नसल्यामुळें णि-प्रत्यय करण्यापूर्वी त्या धातूला कर्म किंवा कर्ता कांहींही नाँहीं.

तर आतां 'णेरणौ' ह्या सूत्राचा उपयोग असा समजावा की आध्यान अर्थ गम्यमान असतांना आत्मनेपदाचा निषेध करावयास पाहिजे. तो निषेध कोणत्या शास्त्राचा हें समजण्याकरितां विधिही केला पाहिजे; उदा०– स्मरति वनगुल्मं कोकिलः, स्मरयत्येनं वनगुल्मः स्वयमेव.

---

सिद्ध होतो.

७. गणधातूहून स्वार्थी णिच् प्रत्यय (३।१।२५) नित्य असल्यामुळें त्याला अण्यन्त अवस्थाच नाहीं. म्हणून येथें 'णेरणौ' या नियमाची प्रवृत्ति होणार नाहीं.

८. कर्मकर्तरिप्रयोगामध्यें कर्मवद्भावानें ण्यन्त धातूहून जर आत्मनेपद होईल तर त्या ण्यन्त अवस्थेमध्यें अण्यन्त अवस्थेंतील कर्म हें कर्ता झालें असेल तरच होईल असा नियम होईल.

९. स्वार्थणिच् किंवा हेतुमण्णिच्.

१०. एकंदरींत स्वार्थणिच् प्रत्यय म्हणजे अण्यन्त अवस्थाच होय. व त्या अवस्थेमध्यें कर्मवद्भावानें आत्मनेपद प्राप्तही होत आहे व इष्टही आहे. स्मरति ही अण्यन्त अवस्था होय. स्मरयति ह्या ण्यन्त अवस्थेमध्यें आत्मनेपद होत नाहीं. वनगुल्म हा आपणच स्मृतिविषय होतो असा अर्थ आहे. येथें कर्मवद्भावानें आत्मनेपद प्राप्त होत आहे.

दपि नास्ति प्रयोजनम् । कर्मोपदिष्टा विधयः कर्मस्थभावकानां कर्मस्थक्रियाणां वा भवन्ति कर्तृस्थभावकश्चायम् ॥ एवं तर्हि सिद्धे सति यदनाध्यान इति प्रतिषेधं शास्ति तज्ज्ञापयत्याचार्यो भवत्येवंजातीयकानामात्मनेपदमिति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । पश्यन्ति भृत्या राजानम् । दर्शयते भृत्यान्राजा । दर्शयते भृत्यै राजा । अत्रात्मनेपदं सिद्धं भवति ॥

**आत्मनः कर्मत्वे प्रतिषेधः ॥ ८ ॥**

आत्मनः कर्मत्वे प्रतिषेधो वक्तव्यः । हन्त्यात्मानम् । घातयत्यात्मेति ॥ स तर्हि वक्तव्यः ।

**न वा ण्यन्तेऽन्यस्य कर्तृत्वात् ॥९॥**

न वा वक्तव्यः । किं कारणम् । ण्यन्तेऽन्यस्य कर्तृत्वात् । अन्यदत्राण्यन्ते कर्मान्यो ण्यन्तस्य कर्ता । कथम् । द्वावात्मानावन्तरात्मा शरीरात्मा च । अन्तरात्मा तत्कर्म करोति येन शरीरात्मा सुखदुःखे अनुभवति।शरीरात्मा तत्कर्म करोति

---

हेंही प्रयोजन होऊं शकत नाहीं. कारण कर्मवद्भावानें होणारे विधि कर्मस्थभावक[११] किंवा कर्मस्थक्रियक धातु असेल तरच होतात. आणि स्मृ हा धातु तर कर्तृस्थभावक आहे.

तेव्हां अशा रीतीनें स्मरयति हें उदाहरण सिद्ध होत असतांनाही ज्यापेक्षां हा आचार्य 'अनाध्याने' म्ह. आध्यानार्थक ण्यन्ताहून आत्मनेपद होत नाहीं असा आत्मनेपदाचा निषेध करीत आहे त्यापेक्षां 'ज्या धातूचें अण्यन्त अवस्थेंतील कर्म ण्यन्त अवस्थेमध्यें कर्ता बनलें आहे, मग तो धातु कर्तृस्थभावक असो किंवा कर्तृस्थक्रियक असो, त्या ण्यन्त धातूहून आत्मनेपद होतें' असें सुचवीत आहे.

असें सुचविल्याचें काय फल ?

पश्यन्ति भृत्या राजानम् या अण्यन्त अवस्थेंतील राजा हें कर्म दर्शयते भृत्यान् राजा, दर्शयते भृत्यै राजा, या ण्यन्त अवस्थेमध्यें कर्ता झालें आहे. तेथें आत्मनेपद सिद्ध होतें.

(वा.८) अण्यन्त अवस्थेमध्यें आत्मा हें कर्म असून तोच जर ण्यन्त अवस्थेमध्यें कर्ता झाला असेल तर तेथें आत्मनेपद होत नाहीं असें म्हणावें; उदा०— हन्त्यात्मानम् घातयत्यात्मानमात्मा.

तर मग तशा ठिकाणीं आत्मनेपदाचा प्रतिषेध केला पाहिजे.

(वा.९) तो प्रतिषेध करावयास नको.

काय कारण ?

ण्यन्त अवस्थेमध्यें कर्ता निराळा आहे. येथें अण्यन्त अवस्थेमध्यें कर्म म्हणून जो आत्मा आहे तो निराळा व ण्यन्त अवस्थेमध्यें कर्ता म्हणून जो आत्मा आहे तो निराळा.

तो कसा ?

एक अन्तरात्मा व एक शरीरात्मा[१२] असे वस्तुतः दोन आत्मे आहेत. त्यांत अन्तरात्मा हा तसें धर्माधर्मरूपी कर्म करतो की ज्यामुळें

---

११. धात्वर्थ हा दोन प्रकारचा आहे. क्रिया आणि भाव हे दोन प्रकार होत. केली जाणारी ती क्रिया व होणारा तो भाव. धात्वर्थाचा आश्रय चंचल असला म्हणजे त्याच्याकडून तो केला जातो असें म्हणतात आणि जो धात्वर्थाचा आश्रय स्थिर असेल त्याचे ठिकाणीं तो घडून येतो असें म्हणतात. आतां क्रिया किंवा भाव यामुळें कर्माच्या स्वरूपांत फरक होत असेल तर त्या धातूला कर्मस्थभावक किंवा कर्मस्थक्रियक असें म्हणतात आणि कर्माच्या स्वरूपांत कांहींच फरक होत नसेल तर त्या धातूला कर्तृस्थभावक किंवा कर्तृस्थक्रियक असें म्हणतात.

१२. अन्तःकरणरूप उपाधीनें युक्त जो आत्मा तो अन्तरात्मा होय आणि शरीररूपी उपाधीनें युक्त जो आत्मा तो शरीरात्मा होय. येथें अण्यन्त अवस्थेमध्यें शरीरात्मा हा कर्म आहे. ण्यन्त अवस्थेमध्यें तो कर्ता नाहीं. तेथें अन्तरात्मा कर्ता आहे.

येनान्तरात्मा सुखदुःखे अनुभवतीति ॥

[भीस्म्योर्हेतुभये ॥१।३।६८॥[1]
गृधिवञ्च्योः प्रलम्भने॥१।३।६९॥
लियः संमाननशालीनीकरणयोश्च ॥ १।३।७० ॥
मिथ्योपपदात्कृञोऽभ्यासे ॥१।३।७१॥ ]

स्वरितञितः[1] कर्त्रभिप्राये क्रियाफले ॥१।३।७२॥

स्वरितञित इति किमर्थम् । याति वाति द्राति प्साति । स्वरितञित इति शक्यमकर्तुम् । कस्मान्न भवति याति वाति द्राति प्सातीति । कर्त्रभिप्राये क्रियाफल इत्युच्यते सर्वेषां च कर्त्रभिप्रायं क्रियाफलमस्ति । त एवं विज्ञास्यामः । येषां कर्त्रभिप्रायमकर्त्रभिप्रायं च क्रियाफलमस्ति तेभ्य आत्मनेपदं भवतीति । न चैतेषां कर्त्रभिप्रायमकर्त्रभिप्रायं च क्रियाफलमस्ति । तथाजातीयकाः खल्वाचार्येण स्वरितञितः पठिता य उभयवन्तो येषां कर्त्रभिप्रायं चाकर्त्रभिप्रायं च क्रिया-

---

शरीरात्मा हा सुखदुःखांचा अनुभव घेतो आणि शरीरात्मा हा तसें चेष्टारूपी कर्म करतो की ज्यामुळें अन्तरात्मा हा सुखदुःखांचा अनुभव घेतो.

(सू.७२) येथें स्वरितञितः हा शब्द कशाकरितां घातला आहे. ?

याति, वाति, द्राति, प्साति येथें आत्मनेपद न व्हावें म्हणून.

स्वरितञितः हा शब्द घातला नाहीं तरी चालेल.

तर मग याति, वाति, द्राति, प्साति येथें आत्मनेपद कां बरें होत नाहीं?

क्रियेचें फल कर्तृगामी असलें पाहिजे असें म्हटलें आहे आणि सर्वच धातूंच्या क्रियेचें फल कर्त्याकडे जाण्याचा संभव आहेच. कारण कोणीही कांहींतरी फळ मिळावें म्हणूनच क्रियेविषयीं प्रवृत्त होत असतो. ज्या धातूंच्या क्रियेचें फळ कर्त्याकडे आणि दुसरीकडे जाण्याचा संभव असून जेव्हां तें कर्तृगामी विवक्षित असेल तेव्हां आत्मनेपद होतें असें समजण्यांत येईल. वर दाखविलेल्या या, वा वगैरे धातूंच्या क्रियेचें फळ कर्त्याकडे आणि दुसरीकडे जाण्याचा संभव नाहीं.

ज्या धातूंच्या क्रियेचें फल कर्त्याकडे आणि दुसरीकडे जाण्याचा संभव असून तसें दोन्ही तऱ्हेनें दाखवितां येतें[2] त्या धातूंना खरोखरच आचार्यांनें इत्संज्ञक स्वरित किंवा ञकार जोडला आहेच.

आतां कर्त्रभिप्राये येथें अभि आणि प्र हे दोन उपसर्ग कशाकरितां उच्चारले आहेत ?

---

१.(६८) णि–प्रत्ययान्त भी आणि स्मि या धातूंहून आत्मनेपद होतें, परंतु धातूचा जो अर्थ भीति किंवा आश्चर्य हें प्रयोजक कर्त्यापासून असलें पाहिजे; उदा०– मुण्डो भापयते, जटिलो विस्मापयते.

(६९) वञ्चना हा अर्थ गम्यमान असतांना णिप्रत्ययान्त गृध् आणि वञ्च् या धातूंहून आत्मनेपद होतें; उदा०– माणवकं गर्धयते, वञ्चयते.

(७०) पूजा,तिरस्कार किंवा प्रतारण हे अर्थ गम्यमान असतांना णि-प्रत्ययान्त लीधातूहून आत्मनेपद होतें; उदा०– जटाभिर्लापयते, श्येनो वर्तिकामुल्लापयते, बालमुल्लापयते.

(७१) मिथ्या–शब्द उपपद असतांना आणि क्रियेची आवृत्ति गम्यमान असतांना णि–प्रत्ययान्त कृ–धातूहून आत्मनेपद होतें; उदा.पदं मिथ्या कारयते, दुष्ट पद वारंवार उच्चारतो, असा अर्थ आहे.

१. स्वरित स्वर आहे इत्संज्ञक ज्यांचा किंवा ञकार आहे इत्संज्ञक ज्यांचा अशा धातूंहून आत्मनेपद होतें, परंतु क्रियेचें फल कर्तृगामी असलें पाहिजे; उदा०– यजमानो यजते, पचते, सुनुते, कुरुते.

२. या, वा इत्यादिक धातूंमध्यें तसें दोन्ही तऱ्हेनें दाखविण्याचें सामर्थ्य नाहीं, कारण शब्दशक्ति कांहीं विचित्र आहे.

फलमस्ति ॥ अथाभिप्रग्रहणं किमर्थम् । स्वरितञितः कर्त्रायें क्रियाफल इतीयत्युच्यमाने यमेव संप्रत्येति क्रियाफलं तत्रैव स्यात् । लूञ् लुनीते । पूञ् पुनीते । इह न स्यात् । यज् यजते । वप् वपते । अभिप्रग्रहणे पुनः क्रियमाणे न दोषो भवति । अभिराभिमुख्ये वर्तते प्र आदिकर्माणि । तेन यं चाभिप्रैति यं चाभिप्रैष्यति यं चाभिप्रागात्तत्र सर्वत्राभिमुख्यमात्रे सिद्धं भवति ॥ कर्त्रभिप्राये क्रियाफल इति किमर्थम् । पचन्ति भक्तकराः । कुर्वन्ति कर्मकराः । यजन्ति याजकाः । कर्त्रभिप्राये क्रियाफल इत्युच्यमानेऽप्यत्र प्राप्नोति । अत्रापि हि क्रियाफलं कर्तारमभिप्रैति । याजका यजन्ति गा लप्स्यामह इति । कर्मकराः कुर्वन्ति पादिकमहर्लप्स्यामह इति । एवं तर्हि कर्त्रभिप्राये क्रियाफल इत्युच्यते सर्वत्र च कर्तारं क्रियाफलमभिप्रैति तत्र प्रकर्षगतिर्विज्ञास्यते । साधीयो यत्र कर्तारं क्रियाफलमभिप्रैति । न चान्तरेण यजिं यजिफलं वपिं वा वपिफलं लभन्ते ।

ते न उच्चारतां 'स्वरितञितः कर्त्रायें क्रियाफले' एवढेंच म्हटलें तर जेथें क्रियेचें फल ती क्रिया होण्याबरोबर लगेंच प्राप्त होतें तेथेंच म्हणजे लुनीते, पुनीते येथें आत्मनेपद होईल, आणि जेथें क्रियेचें फल ती होण्याबरोबर लगेच प्राप्त होत नाहीं तेथें म्हणजे यजते, वपते येथें आत्मनेपद होणार नाहीं. आतां अभि आणि प्र हे उपसर्ग उच्चारले असतां हा दोष येत नाहीं. कारण अभि हा शब्द आभिमुख्य या अर्थाला दाखवितो व प्र-शब्द प्रारंभ या अर्थाला दाखवितो. तेव्हां क्रियेचें फल ज्या कर्त्याच्या संमुख होण्यास आरंभ होत असेल किंवा होईल किंवा झाला असेल अशा सर्व ठिकाणीं म्हणजे कर्त्यानें आपल्याला फल मिळूं लागल्याचें फक्त अनुसंधान केलें असलें म्हणजे तेथें आत्मनेपद साधतें.

आतां येथें क्रियेचें फल कर्तृगामी असलें पाहिजे असें कशाकरितां म्हटलें आहे ?

पचन्ति भक्तकराः, कुर्वन्ति कर्मकराः, यजन्ति याजकाः, येथें आत्मनेपद होऊं नये याकरितां तसें म्हटलें आहे.

पण क्रियेचें फल कर्तृगामी असलें पाहिजे असें म्हटलें तरी देखील या उदाहरणांमध्यें आत्मनेपद प्राप्त होत आहे. कारण येथेंही त्या त्या क्रियेचें फल कर्तृगामी आहेच. गोप्रदानदक्षिणा मिळावी म्हणून ऋत्विज यज्ञ करतात तसेंच रोजमुरा मिळावा म्हणून कामकरी कामें करतात.

असें आहे तर क्रियेचें फल कर्तृगामी असलें पाहिजे असें तर म्हटलें आहे आणि सर्वच ठिकाणीं क्रियेचें कांहींतरी फळ कर्त्याला मिळणारच. तेव्हां येथें कांहींतरी विशेष मानला पाहिजे. तो विशेष असा की क्रियेचें मुख्य जें फल तें तें कर्तृगामी असलें पाहिजे. जी क्रिया केल्यावांचून जें फल उत्पन्नच होऊं शकत नाहीं तें त्या क्रियेचें मुख्य फल होय. स्वर्ग हें यज्ञाचें फल यज्ञक्रिया केल्यावांचून मिळत नाहीं, तसेंच धान्य हें फल पेरणी केल्यावांचून उत्पन्नच होत नाहीं; पण ऋत्विज मात्र यज्ञ केल्यावांचूनही गोप्रदानें मिळवितात. तसेंच कामकरी लोकसुद्धां अनेक प्रकारांनीं रोजमुरा मिळवितात.

३. पुढें कांहीं दिवसांनीं मिळणारें जें फल त्याविषयीं तें मिळेल कीं नाहीं असा संशय येतो; निश्चय होत नाहीं.

४. आचारी स्वयंपाक करतात, चाकर काम करतात, ऋत्विज यज्ञ करतात, असा अर्थ आहे. या वाक्यांतील कर्ते हे दुसऱ्याकरितां काम करीत आहेत हें प्रसिद्धच आहे.

याजकाः पुनरन्तरेणापि यांज गा लभन्ते भृतकाश्च पादिकमिति ॥

[अपाद्वदः ॥ १।३।७३ ॥

णिचश्च ॥ १।३।७४ ॥

समुदाङ्भ्यो यमोऽग्रन्थे॥१।३।७५

अनुपसर्गाज्ज्ञः ॥ १।३।७६ ॥

विभाषोपपदेन प्रतीयमाने ॥१।३।७७ ॥]

## शेषात्कर्तरि परस्मैपदम् ॥१।३।७८॥

**शेषवचनं पञ्चम्या चेदर्थे प्रतिषेधः॥१**

शेषवचनं पञ्चम्या चेदर्थे प्रतिषेधो वक्तव्यः। भिद्यते कुशूलः स्वयमेव। छिद्यते रज्जुः स्वयमेवेति॥ एवं तर्हि शेष इति वक्ष्यामि।

**सप्तम्या चेत्प्रकृतेः ॥२॥**

सप्तम्या चेत्प्रकृतेः प्रतिषेधो वक्तव्यः। आस्ते शेते च्यवन्ते प्लवन्ते ॥

**सिद्धं तूभयनिर्देशात् ॥३॥**

सिद्धमेतत्। कथम्। उभयनिर्देशः कर्तव्यः। शेषाच्छेष इति वक्तव्यम्॥ कर्तृग्रहणमिदानीं किमर्थं स्यात्।

---

(सू.७८ वा.१), जर येथें शेषात् असें पंचमीविभक्ति लावून शेषपद उचारलें आहे तर मागील आत्मनेपद सांगणाऱ्या सूत्रामध्यें पंचमीविभक्ति लावून उच्चारलेले अनुदात्तङित् वगैरे धातुच फक्त येथें वगळले जातील. सप्तमीविभक्ति लावून उच्चारलेले भाव, कर्म वगैरे अर्थ वगळले जाणार नाहींत. तेव्हां प्रकृत सूत्रानें परस्मैपद होऊं लागेल, त्याचा निषेध केला पाहिजे.

असें आहे तर 'शेषात्' याचे ऐवजीं सप्तमी लावून 'शेषे' असा शेष-शब्द घालण्यांत येईल.

(वा.२) सप्तमीविभक्ति लावून शेषशब्द उच्चारला तर आत्मनेपद सांगणाऱ्या मागील सूत्रामध्यें सप्तमीविभक्ति लावून उच्चारलेले भाव, कर्म वगैरे अर्थ फक्त येथें वगळले जातील. पंचमीविभक्ति लावून उच्चारलेले अनुदात्तङित् वगैरे धातु वगळले जाणार नाहींत. तेव्हां आस्ते शेते, च्यवन्ते प्लवन्ते, येथें प्रकृत सूत्रानें परस्मैपद होऊं लागेल, त्याचा निषेध केला पाहिजे.

(वा.३) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

येथें दोन्ही प्रकारचें उच्चारण करावें. म्हणजे 'शेषाच्छेषे कर्तरि परस्मैपदम्' असें सूत्र करावें.

पण आतां शेषे असा शब्द घातला असतां कर्तरि हा शब्द घालण्याचा काय बरें उपयोग

---

१. (७३) अप-उपसर्गापुढील वदधातूहून आत्मनेपद होतें; क्रियेचें फल कर्तृगामी असलें पाहिजे; उदा०— न्यायमपवदते.

(७४) णिच्-प्रत्ययान्त धातूहून आत्मनेपद होतें; क्रियेचें फल कर्तृगामी असलें पाहिजे; उदा०— चोरयते, कारयते.

(७५) सम्, उद्, आङ् या उपसर्गांपुढील यम् धातूहून आत्मनेपद होतें, पण तो शब्दप्रयोग ग्रन्थाविषयींचा नसावा आणि क्रियेचें फल कर्तृगामी असलें पाहिजे; उदा०— व्रीहीन् संयच्छते, भारमुद्यच्छते, वस्त्रमायच्छते.

(७६) उपसर्गरहित अशा ज्ञा-धातूहून आत्मनेपद होतें; क्रियेचें फल कर्तृगामी असलें पाहिजे; उदा०— गां जानीते.

(७७) 'स्वरितञितः' (१।३।७२-७६) इत्यादि पांच सूत्रांनीं जें आत्मनेपद सांगितलें आहे तें विकल्पानें होतें, पण 'क्रियेचें फल कर्तृगामी आहे' ही गोष्ट वाक्यांतील दुसऱ्या पदानें दाखविलेली असली पाहिजे; उदा०— स्वं यज्ञं यजति यजते.

१. 'अनुदात्तङितः' इत्यादि आत्मनेपद सांगणाऱ्या सूत्रांपैकीं कोणतेंही सूत्र जेथें लागू होत नसेल तेथें कर्तरि प्रयोगामध्यें परस्मैपद होतें; उदा०—भवति,

**कर्तृग्रहणमनुपराद्यर्थम् ॥४॥**

अनुपराद्यर्थमेतत्स्यात्। इह मा भूत्। अनुक्रियते स्वयमेव। पराक्रियते स्वयमेवेति ॥ सिध्यति । सूत्रं तर्हि भिद्यते । यथान्यासमेवास्तु । ननु चोक्तं शेषवचनं पञ्चम्या चेदर्थे प्रतिषेध इति। नैष दोषः। कर्तरि कर्मव्यतिहारे [१. ३. १४] इत्यत्र कर्तृग्रहणं प्रत्याख्यायते तत्प्रकृतमिहानुवर्तिष्यते। शेषात्कर्तरि कर्तरीति। किमिदं कर्तरि कर्तरीति। कर्तैव यः कर्ता तत्र यथा स्यात्। कर्ता चान्यश्च यः कर्ता तत्र मा भूदिति ॥

**अनुपराभ्यां कृञः ॥१।३।७९॥**

किमर्थमिदमुच्यते ।

**परस्मैपदप्रतिषेधात्कृञादिषु विधानम् ॥१॥**

परस्मैपदप्रतिषेधात्कृञादिषु परस्मैपदं विधीयते। प्रतिषिध्यते तत्र परस्मैपदं स्वरितञितः कर्त्रभिप्राये क्रियाफल आत्मनेपदं भवतीति ॥ अस्ति प्रयोजनमेतत्। किं तर्हीति ।

**तत्रात्मनेपदप्रतिषेधोऽप्रतिषिद्धत्वात् ॥२॥**

तत्रात्मनेपदस्य प्रतिषेधो वक्तव्यः ।

---

होणार आहे ?

(वा.४) कर्तरि हा शब्द घातला तो 'अनुपराभ्यां कृञः' (१।३।७९) या पुढील सूत्रामध्यें अनुवृत्ति होण्याकरितां घातला आहे असा त्याचा उपयोग होईल. त्यामुळें अनुक्रियते स्वयमेव, पराक्रियते स्वयमेव, येथें परस्मैपद होत नाहीं.

अशा रीतीनें हें साधत आहे खरें पण मूळ सूत्रपाठांत बदल होत आहे ना ?

तर मग मुळांत आहे तसेंच सूत्र असूं दे.

पण पंचमीविभक्ति लावून शेषशब्द उच्चारला असल्यामुळें मागें सप्तमीविभक्ति लावून उच्चारलेले भाव, कर्म, वगैरे अर्थ येथें वगळले जाणार नाहींत; तेव्हां कर्मकर्तरिप्रयोगामध्यें परस्मैपद होऊं लागेल,त्याचा निषेध केला पाहिजे असें सांगितलें आहे ना ?

हा दोष येत नाहीं. कारण 'कर्तरि कर्मव्यतिहारे' (१।३।१४) येथें कर्तरि या शब्दाचा उपयोग होत नसल्यामुळें त्याचें प्रत्याख्यान केलें आहे (भाग२,पृ.५९,वा.३). तो कर्तरि-शब्द प्रकृत सूत्रामध्यें अनुवृत्त करण्यांत येईल. तेव्हां शेषात् कर्तरि कर्तरि अशीं पदें होतात. तेथें कर्तरि कर्तरि असें दोन वेळ जें म्हटलें आहे त्याचा अर्थ काय ? कर्ता याच नांवाचा जो कर्ता म्ह. मुळापासूनच जो कर्ता, अर्थात् शुद्ध कर्ता, तेथेंच परस्मैपद व्हावें, आणि जो मूळचें कर्म असून पुढें कर्ता बनला, म्ह. कर्मकर्ता, तेथें न व्हावें असा त्याचा अर्थ आहे.

(सू.७९) हें[१] सूत्र कशाकरितां केलें आहे ?

(वा.१) कृञादिक[२] धातूंहून परस्मैपदाचा प्रतिषेध केला असल्यामुळें येथें मुद्दाम परस्मैपदाचें विधान केलें आहे. कारण 'स्वरितञितः' (१।३।७२) ह्या सूत्रानें क्रियाफल कर्तृगामी असतां आत्मनेपद सांगितलें आहे. तेव्हां अर्थातच तेथें परस्मैपदाचा प्रतिषेध होत आहे.

हा उपयोग आहे खरा पण—

(वा.२) कृञादिक धातूंहून आत्मनेपदाचा प्रतिषेध केला पाहिजे.

काय कारण ?

---

२. पुढील सूत्रीं शेषे हेंही पद अनुवृत्त करून तें कर्तरि याचें विशेषण करावें. शेष म्हणजे भावकर्मव्यतिरिक्त. तेव्हां शुद्ध कर्तरिप्रयोगामध्येंच पुढील सूत्राची प्रवृत्ति होते, कर्मकर्तरिप्रयोगामध्यें होत नाहीं.

१. अनु आणि परा या उपसर्गांपुढील कृधातूहून परस्मैपद होतें; उदा०—अनुकरोति, पराकरोति.

२. येथें आदि-शब्दानें पुढील सूत्रांतील क्षिप् वगैरे धातूंचें ग्रहण करावें.

किं कारणम् । अप्रतिषिद्धत्वात् । न ह्यात्मनेपदं प्रतिषिध्यते । किं तर्हि । परस्मैपदमनेन विधीयते ॥

**न वा द्युतादिभ्यो वावचनात् ॥३॥**

न वैष दोषः । किं कारणम् । द्युतादिभ्यो वावचनात् । यदयं द्युतादिभ्यो वावचनं करोति तज्ज्ञापयत्याचार्यो न परस्मैपदविषय आत्मनेपदं भवतीति ॥

**आत्मनेपदानियमे वा प्रतिषेधः ॥४॥**

आत्मनेपदनियमे वा प्रतिषेधो वक्तव्यः । स्वरितञितः कर्त्रभिप्राये क्रियाफल आत्मनेपदं भवति कर्तर्यनुपराभ्यां कृञो नेति ॥ सिध्यति । सूत्रं तर्हि भिद्यते । यथान्यासमेवास्तु । ननु चोक्तं तत्रात्मनेपदप्रतिषेधोऽप्रतिषिद्धत्वादिति । परिहृतमेतन्न वा द्युतादिभ्यो वावचनादिति ॥ अथवेदं तावदयं प्रष्टव्यः । स्वरितञितः कर्त्रभिप्राये क्रियाफल आत्मनेपदं भवतीति परस्मैपदं कस्मान्न भवति । आत्मनेपदेन बाध्यते । यथैव तर्ह्यात्मनेपदेन परस्मैपदं बाध्यत एवं परस्मैपदेनाप्यात्मनेपदं बाधिष्यते ॥

**[अभिप्रत्यतिभ्यः क्षिपः ॥ १।३।८० ॥**

**प्राद्वहः ॥ १।३।८१ ॥**

**परेर्मृषः ॥ १।३।८२ ॥**

---

कारण असें की 'अनुपराभ्यां कृञः' यानें आत्मनेपदाचा प्रतिषेध केला नाहीं.

तर काय केलें आहे ?

या सूत्रानें फक्त परस्मैपदाचें विधान[३] केलें आहे.

(वा.३) हा दोष येत नाहीं.

काय कारण ?

ज्यापेक्षां हा आचार्य द्युतादि धातूंच्या पुढील लुङाचे स्थानीं परस्मैपदाचा विकल्प होण्यासाठीं 'द्युद्भ्यो लुङि' (१।३।९१) येथें वाग्रहणाची अनुवृत्ति करीत आहे त्यापेक्षां परस्मैपदाच्या विषयामध्यें आत्मनेपद होत नाहीं असें अर्थातच तो सुचवीत आहे.

(वा.४) अथवा 'स्वरितञितः' या आत्मनेपदनियामक शास्त्रामध्यें अनु आणि परा या उपसर्गांपुढील कृञ्धातूहून कर्तरिप्रयोगामध्यें आत्मनेपद होत नाहीं असा आत्मनेपदाचा निषेध केला पाहिजे.

या रीतीनें इष्ट व्यवस्था साधते ही गोष्ट खरी पण मूळ सूत्रांत बदल होत आहे ना ?

तर मग मुळांत जसें सूत्र आहे तसेंच असूं दे.

पण तसेंच ठेवलें तर 'तत्रात्मनेपदप्रतिषेधोऽप्रतिषिद्धत्वात्' (वा.२) असा दोष दिला आहे ना ?

'न वा द्युतादिभ्यो वावचनात्' (वा.३) असा त्याचा परिहारही केला आहे. अथवा त्याला येथें अगोदर असें विचारावें की क्रियेचें फल कर्तृगामी असतां 'स्वरितञितः' (१।३।७२) यानें आत्मनेपद होतें, पण तेथें सामान्यसूत्रानें परस्मैपद कां बरें होत नाहीं ?

'स्वरितञितः' या आत्मनेपदानें परस्मैपदाचा बाध होतो असें असेल तर ज्याप्रमाणें तेथें आत्मनेपदानें परस्मैपदाचा बाध होतो त्याप्रमाणें 'अनुपराभ्याम्' या परस्मैपदानेंही आत्मनेपदाचा बाध होईल.

---

३. तेव्हां परस्मैपदाचें विधान केलें असल्यामुळें परस्मैपद होईल, आणि आत्मनेपदाचा निषेध केला नसल्यामुळें आत्मनेपदही होईल, असा दोष येतो.

१.(८०)अभि, प्रति आणि अति या उपसर्गांपुढील क्षिप्धातूहून परस्मैपद होतें : अभिक्षिपति, प्रतिक्षिपति, अतिक्षिपति.

(८१) प्र या उपसर्गांपुढील वह्धातूहून परस्मैपद होतें; उदा०— प्रवहति.

(८२) परि या उपसर्गांपुढील मृष्धातूहून परस्मैपद होतें; उदा०— परिमृष्यति.

**व्याङ्परिभ्यो रमः ॥ १।३।८३ ॥**

**उपाच्च ॥ १।३।८४ ॥**

**[विभाषाऽकर्मकात् ॥१।३।८५॥]**

**बुधयुधनशजनेङ्प्रुद्रुस्रुभ्यो णेः ॥१।३।८६॥**

बुधादिषु येऽकर्मकास्तेषां ग्रहणं किमर्थम्। सकर्मकार्थमचित्तवत्कर्तृकार्थं वा ॥

**[ निगरणचलनार्थेभ्यश्च ॥ १।३।८७॥ ]**

**अणावकर्मकाच्चित्तवत्कर्तृकात् ॥१।३।८८॥**

**अणावकर्मकादिति चुरादिणिचो ण्यन्तात्परस्मैपदवचनम् ॥१॥**

अणावकर्मकादिति चुरादिणिचो ण्यन्तात्परस्मैपदं वक्तव्यम्। इहापि यथा स्यात्। चेतयमानं प्रयोजयति चेतयतीति ॥ यदि तर्ह्यत्रापीष्यतेऽणिग्रहणमिदानीं किमर्थं स्यात्। अकर्मकग्रहणमण्यन्तविशेषणं यथा विज्ञायेत। अथाक्रियमाणेऽणिग्रहणे कस्याकर्मकग्रहणं विशेषणं स्यात्। णेरिति वर्तते ण्यन्तविशेषणम्। तत्र को दोषः। इहैव स्यात्। चे-

---

(सू.८६) बुध, युध वगैरे धातूंमध्यें जे धातु अकर्मक आहेत त्यांचें ग्रहण येथें कशाकरितां केलें आहे ?

एका अर्थी धातु अकर्मक असले तरी दुसऱ्या अर्थी ते सकर्मक होतात. तेव्हांही परस्मैपद होण्याकरितां येथें त्याचें ग्रहण केलें आहे. किंवा ज्या प्रयोगामध्यें ह्या धातूंचा कर्ता प्राणी नसेल तेथेंही परस्मैपद होण्याकरितां येथें त्यांचें ग्रहण केलें आहे.

(सू.८८, वा.१) चुरादि ण्यन्त (३।१।२५) असा जो धातु अकर्मक आणि प्राणिकर्तृक आहे त्याहून प्रेरणा या अर्थी हेतुमण्णिच् (३।१।२६) केला असतां त्याहून परस्मैपद होतें असें म्हणावें. कारण 'चेतयमानं यजमानं प्रयोजयति चेतयति' येथें क्रियाफल कर्तृगामी असतांही परस्मैपद झालें पाहिजे.

आतां जर अशा ठिकाणींही प्रकृत सूत्रानें परस्मैपद होणें इष्ट असेल तर मग ह्या सूत्रांतील अणौ या शब्दाचा उपयोग कशा तऱ्हेनें दाखवितां येईल ?

अणौ हा शब्द घातला आहे म्हणून त्याच्याशीं अकर्मकात् याचा संबंध मनांत येतो, हा अणौ शब्द घालण्याचा उपयोग होय.

आतां जर अणौ हा शब्द घातला नाहीं तर अकर्मकात् याचा कोणाकडे संबंध होईल ?

'बुधयुध०' या सूत्रांतून 'णेः' या पदाची अनुवृत्ति येत आहे. तेव्हां अकर्मक असा जो ण्यन्त असें अकर्मकात् हें ण्यन्ताचें विशेषण होईल.

तसें झालें असतां काय दोष येईल ?

---

(८३) वि, आङ् आणि परि या उपसर्गांपुढील रम्-धातूहून परस्मैपद होतें; उदा०– विरमति, आरमति, परिरमति.

(८४) उप या उपसर्गापुढीलही रम्धातूहून परस्मैपद होतें; उदा०–देवदत्तमुपरमति.

(८५) उप या उपसर्गापुढील अकर्मक रम्धातूहून परस्मैपद विकल्पानें होतें; उदा०– उपरमति, उपरमते.

१. णि-प्रत्ययान्त जे बुध, युध, नश, जन, इङ्, प्रु, द्रु आणि स्रु हे धातु त्यांहून परस्मैपद होतें; उदा०– बोधयति पद्मम्, योधयति काष्ठानि.

२. अणावकर्मकात्० (१।३।८८) या पुढील सूत्रानें परस्मैपद होत आहे म्हणून हा प्रश्न केला आहे.

१(८७). णि-प्रत्ययान्त असे जे भक्षण किंवा कम्पन या अर्थाचे धातु त्यांहून परस्मैपद होतें; उदा०– निगारयति, आशयति, चलयति, कम्पयति.

१. जे धातु अण्यन्त अवस्थेमध्यें अकर्मक आहेत आणि ज्यांचा कर्ता प्राणी आहे त्या धातूंहून ण्यन्त अवस्थेमध्यें परस्मैपद होतें; उदा०– शेते कृष्णस्तं गोपी शाययति.

२. चित् हा धातु चुरादि गणामध्यें आहे. त्याहून स्वार्थी णिच्-प्रत्यय नित्य असल्यामुळें त्याची अण्यन्त अवस्थाच नाहीं. म्हणून प्रकृतसूत्रानें परस्मै-

तयमानं प्रयोजयति चेतयतीति । इह न स्यात्। आसयति शाययतीति ॥

**सिद्धं त्वतस्मिण्णाविति वचनात्॥२॥**

सिद्धमेतत् । कथम् । अतस्मिण्णौ योऽकर्मकस्तत्रेति वक्तव्यम् ॥ सिध्यति । सूत्रं तर्हि भिद्यते । यथान्यासमेवास्तु । ननु चोक्तमणावकर्मकादिति चुरादिणिचो ण्यन्तात्परस्मैपदवचनमिति । नैष दोषः । अणाविति कस्येदं णेर्ग्रहणम् । यस्माण्णेः प्राक्कर्म कर्ता वा विद्यते न चैतस्माण्णेः प्राक्कर्म कर्ता वा विद्यते ॥

**[१]न पादम्याङ्यमाङ्यसपरिमुहरुचिनृतिवदवसः ॥१।३।८९॥**

**पादिषु धेट उपसंख्यानम् ॥१॥**

पादिषु धेट उपसंख्यानं कर्तव्यम् । धापयेते शिशुमेकं समीची ॥

**[[१]वा क्यषः ॥ १।३।९० ॥**

**द्युद्भ्यो लुङि ॥ १।३।९१ ॥**

**वृद्भ्यः स्यसनोः ॥ १।३।९२ ॥]**

**[१]लुटि च क्लृपः ॥१।३।९३॥**

---

चेतयमानं प्रयोजयति चेतयति येथेंच परस्मैपद होईल. कारण चुरादिण्यन्तावस्थेमध्यें हा अकर्मक असून प्राणिकर्तृकही आहे, आणि आसयति शाययति येथें ण्यन्त अवस्थेमध्यें अकर्मक नसल्यामुळें होणार नाहीं.

(वा.२) हें साधत आहे.

तें कसें ?

'तशा ण्यन्त धातूहून परस्मैपद होतें की जो णि प्रत्यय नसतांना धातु अकर्मक असून त्याचा कर्ता प्राणी आहे' असें विधान करावें.

या तऱ्हेनें परस्मैपद साधतें खरें पण मूळ सूत्रामध्यें बदल होत आहे.

तर मग मूळचें आहे तसेंच सूत्र असूं दे.

पण मूळचें आहे तसेंच सूत्र ठेवलें तर चेतयति येथें चुरादिणिच्प्रत्ययान्त धातूहून हेतुमण्णिच् केला असतां तेथें परस्मैपद सांगितलें पाहिजे असें म्हटलें आहे ना ?

हा दोष येत नाहीं. कारण 'अणौ' येथील णि-शब्दानें कोणता णि-प्रत्यय घ्यावयाचा आहे ? जो णि-प्रत्यय करण्यापूर्वी त्या णि-प्रत्ययाच्या पूर्वीच्या धातूला कर्म किंवा कर्ता असतो तसला णिप्रत्यय घ्यावयाचा आहे. अर्थात् हेतुमण्णिच् या अर्थाचा णि-शब्द घातला आहे. आणि चेतयति येथील जो पहिला स्वार्थी णि-प्रत्यय त्याच्या मागील धातूचा स्वतन्त्र रीतीनें प्रयोग नसल्यामुळें णि-प्रत्यय करण्यापूर्वी त्या धातूला कर्म किंवा कर्ता काहींही नाहीं.

(सू.८९,वा.१) पा, दम् वगैरे धातूंमध्यें धेट् धातु घालण्यांत यावा; जसें— धापयेते शिशुमेकं समीची.

(सू.९३) येथें चशब्द कशाकरितां घातला

---

पद होणार नाहीं.

३. चेतयति येथें दोन णिच्प्रत्यय आहेत. दुसऱ्या णिच्प्रत्ययान्ताहून परस्मैपद करावयाचें आहे. त्याच्या पूर्वी चेति हा धातु अकर्मक आहे व त्याचा कर्ता प्राणी आहे. तेथें णिच्प्रत्यय जरी आहे तरी तो स्वार्थी णिच्प्रत्यय आहे; तो चालेल.

१. पा, दम्, आङ् उपसर्गापुढील यम् आणि यस्, परि उपसर्गापुढील मुह्, रुच, नृत, वद आणि वस् हे जे णिच्प्रत्ययान्त धातु त्यांहून परस्मैपद करूं नये; उदा०— पाययते, दमयते, आयामयते वगैरे.

१. (९०) क्यष्प्रत्यय (३।१।१३) शेवटीं असलेल्या धातूंहून विकल्पानें परस्मैपद करावें; उदा०— लोहितायति, लोहितायते.

(९१.) द्युतादि गणांतील धातूंच्या पुढील लुङाचे स्थानीं विकल्पानें परस्मैपद करावें; उदा०— व्यद्युतत्, व्यद्योतिष्ट.

(९२.) ज्या उदाहरणांमध्यें स्य किंवा सन् हा प्रत्यय होत असतो त्या उदाहरणांमध्यें, वृत्, वृध्, शृध्, स्यन्द् आणि क्लृप् या पांच धातूंहून परस्मैपद विकल्पानें होतें; उदा०—वर्त्स्यति अवर्त्स्यत् वर्तिष्यते अवर्तिष्यत विवृत्सति विवर्तिषते.

१. ज्या उदाहरणांमध्यें क्लृप्धातूहून लुट्, स्य,

किमर्थश्चकारः । स्यसनोरित्येतदनुकृष्यते । यदि तर्हि नान्तरेण चकारमनुवृत्तिर्भवति द्युद्भ्यो लुङि[१.३.९१]इत्यत्रापि चकारः कर्तव्यो विभाषेत्यनुकर्षणार्थः । अथेदानीमन्तरेणापि चकारमत्रानुवृत्तिर्भवतीहापि नार्थश्चकारेण॥ एवं सर्वे चकाराः प्रत्याख्यायन्ते ॥

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये प्रथमस्याध्यायस्य तृतीये पादे द्वितीयमाह्निकम् ॥ पादश्च समाप्तः ॥

---

आहे ?

पूर्वसूत्रांतील 'स्यसनोः' या पदाची येथें अनुवृत्ति व्हावी म्हणून च शब्द घातला आहे.

चशब्द घातल्यावांचून अनुवृत्ति होऊं शकत नाहीं तर 'द्युद्भ्यो लुङि' (१।३।९१) येथेंही विभाषापदाच्या अनुवृत्तीकरितां चशब्द घातला पाहिजे.

आतां जर तेथें चशब्द घातल्यावांचून विभाषा पदाची अनुवृत्ति होत आहे तर येथेंही चशब्द घालण्यांत कांहीं अर्थ नाहीं. याप्रमाणें अनुवृत्तीकरितां घातलेले सर्व ठिकाणचे चशब्द काढून टाकले तरी हरकत नाहीं.

याप्रमाणें भगवान पतंजलिऋषींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्यांतील पहिल्या अध्यायाच्या तिसऱ्या पादांतील दुसरें आन्हिक समाप्त झालें; व तिसरा पाद समाप्त झाला.

---

किंवा सन् हा प्रत्यय होत असतो त्या उदाहरणांमध्यें कृप्धातूहून परस्मैपद विकल्पानें होतें; उदा०– कल्प्ता कल्पिता कल्प्स्यति कल्पिष्यते चिक्लृप्सति चिकल्पिषते.

## आ कडारादेका संज्ञा ॥१।४।१॥

किमर्थमिदमुच्यते ।

**अन्यत्र संज्ञासमावेशान्नियमार्थं वचनम् ॥१॥**

अन्यत्र संज्ञासमावेशो भवति । कान्यत्र । लोके व्याकरणे च । लोके तावत् । इन्द्रः शक्रः पुरुहूतः पुरंदरः । कन्दुः कोष्ठः कुशूल इति । एकस्य द्रव्यस्य बह्वयः संज्ञा भवन्ति । व्याकरणेऽपि कर्तव्यम् हर्तव्यमित्यत्र प्रत्ययकृत्कृत्यसंज्ञानां समावेशो भवति । पाञ्चालः वैदेहः वैदर्भ इत्यत्र प्रत्ययतद्धिततद्राजसंज्ञानां समावेशो भवति । अन्यत्र संज्ञासमावेशादेतस्मात्कारणादा कडारादपि संज्ञानां समावेशः प्राप्नोति । इष्यते चैकैव संज्ञा स्यादिति तच्चान्तरेण यत्नं न सिध्यतीति नियमार्थं वचनम् । एवमर्थमिदमुच्यते ॥ अस्ति प्रयोजनमेतत् । किं तर्हीति ।

कथं त्वेतसूत्रं पठितव्यम् । किमा कडारादेका संज्ञेति । आहोस्वित्प्राक्कडारात्परं कार्यमिति । कुतः पुनरयं संदेहः । उभयथा ह्याचार्येण शिष्याः सूत्रं प्रतिपादिताः । केचिदा कडारादेका संज्ञेति । केचित्प्राक्कडारात्परं कार्यमिति । कश्चात्र विशेषः ।

**तत्रैकसंज्ञाधिकारे तद्वचनम् ॥२॥**

तत्रैकसंज्ञाधिकारे तद्वक्तव्यम् । किम् ।

---

(सू.१) हें सूत्र कशाकरितां केलें आहे ?

(वा.१) अन्य ठिकाणीं एकाला अनेक संज्ञा असल्याचें दिसून येतें.

अन्य ठिकाणीं म्हणजे कोठें ?

लोकांमध्यें आणि व्याकरणशास्त्रामध्यें. लोकांमध्यें इन्द्रः, शक्रः, पुरुहूतः, पुरंदरः या चारी संज्ञा एका इन्द्राच्या आहेत. तशाच कन्दुः, कोष्ठः, कुसूलः ह्या तीन संज्ञा धान्यागाराच्या एकाच्याच आहेत. व्याकरणशास्त्रामध्येंही कर्तव्यं हर्तव्यं येथील एकाच तव्यशब्दाला प्रत्यय कृत् आणि कृत्य अशा अनेक संज्ञा होत आहेत. तसेंच पाञ्चालः, वैदेहः, वैदर्भः येथील अञ् या एकाच प्रत्ययाला तद्धित व तद्राज अशा बहुत संज्ञा होत आहेत. तेव्हां लोक आणि व्याकरणशास्त्र यांमध्यें एका ठिकाणीं अनेक संज्ञांचा समावेश दृष्टीस पडतो, या कारणावरून एथपासून 'कडाराः कर्मधारये' (२।२।३८) या सूत्रापर्यंत सांगितलेल्या संज्ञांचाही एका ठिकाणीं समावेश प्राप्त होतो. पण एकाला एकच संज्ञा होणें इष्ट आहे. ही गोष्ट तर यत्नावांचून साधणार नाहीं म्हणून नियमार्थ वचन पाहिजे. अशाकरितां हें सूत्र केलें आहे.

हें सूत्र करण्याचा हा उपयोग आहे.

मग आतां तुमचें पुढें काय म्हणणें आहे ?

म्हणणें असें की हें सूत्र कसें पठन करावें ? 'आ कडारादेका संज्ञा' असें पठन करावें किंवा 'प्राक्कडारात्परं कार्यम्' असें पठन करावें ?

काय कारणावरून हा संशय येतो ?

दोन्ही तऱ्हांनीं आचार्यानें शिष्यांना सूत्र सांगितलें आहे. कांहीं एक शिष्यांना 'आ कडारादेका संज्ञा' असें पढविलें आणि कांहीं एकांना 'प्राक्कडारात्परं कार्यम्' असें पढविलें आहे.

या दोन तऱ्हांमध्यें काय फरक आहे ?

(वा.२) त्या दोन तऱ्हांमध्यें पहिली तऱ्हा गृहीत धरली असतां सूत्रामध्यें तो शब्द ठेवलाच पाहिजे.

तो शब्द म्हणजे कोणता ?

एका हा.

---

१. ह्या सूत्रापासून पुढें 'कडाराः कर्मधारये' (२।२।३८) या सूत्रापर्यंत ज्या संज्ञा सांगितल्या आहेत त्यांपैकीं अनेक संज्ञा एकाला प्राप्त झाल्या असतां त्यांतील एकच संज्ञा करावी.

एका संज्ञा भवतीति ॥ ननु च यस्यापि परंकार्यत्वं तेनापि परग्रहणं कर्तव्यम् । परार्थं मम भविष्यति। विप्रतिषेधे चेति। ममापि तर्ह्येकग्रहणं परार्थं भविष्यति । सरूपाणामेकशेष एकविभक्तौ [१.२.६४] इति । संज्ञाधिकारश्चायम्। तत्र किमन्यच्छक्यं विज्ञातुमन्यदतः संज्ञायाः । तत्रैतावद्वाच्यम् । आ कडारादेका । किम् । एका संज्ञा भवतीति ॥

**अङ्गसंज्ञया भपदसंज्ञयोरसमावेशः ॥३**

अङ्गसंज्ञया भपदसंज्ञयोः समावेशो न प्राप्नोति । सार्पिष्कः बार्हिष्कः याजुष्कः धानुष्कः । बाभ्रव्यः माण्डव्य इति । अनवकाशे भपदसंज्ञे अङ्गसंज्ञां बाधेयाताम् । परवचने हि नियमानुपपत्तेरुभयसंज्ञाभावः ॥ यस्य पुनः परंकार्यत्वं नियमानुपपत्तेस्तस्योभयोः संज्ञयोर्भावः सिद्धः। कथम् । पूर्वे तस्य भपदसंज्ञे पराङ्गसंज्ञा । कथम् । एवं स वक्ष्यति । यस्मात्प्रत्ययविधिस्तदादि सुप्तिङन्तं पदम् । नः क्ये । सिति च। स्वादिष्वसर्वनामस्थाने। यचि भम् । तस्यान्ते प्रत्ययेऽङ्गमिति । तत्रारम्भसामर्थ्याच्च भपदसंज्ञे परंकार्यत्वाच्चाङ्गसंज्ञा भविष्यति ॥ ननु च यस्या-

---

पण जो 'प्राक्कडारात्परं कार्यं' असा पाठ घेतो त्यानेंही सूत्रामध्यें 'परं' हा शब्द ठेवलाच पाहिजे.

पर हा शब्द जरी मला ठेवावा लागला तरी तो 'विप्रतिषेधे च' या पुढील सूत्रांत उपयोगीं पडेल.

मला देखील 'एका' शब्द ठेवावा लागला तरी तो 'सरूपाणामेकशेष एकविभक्तौ' या सूत्रांत उपयोगीं पडेल. शिवाय हें संज्ञेचें प्रकरण चालू झालें आहे तेव्हां येथें संज्ञेवांचून दुसरें काय मनांत येणार आहे ? म्हणून संज्ञाशब्द प्रत्यक्ष घातला नाहीं तरी चालेल. 'आ कडारादेका' एवढेंच सूत्र करावें.

एका म्हणजे काय ? एक संज्ञा होते असें सहजच समजण्यांत येईल.

(वा.३) एकाला एक संज्ञा होते असें गृहीत धरलें असतां अङ्गसंज्ञेबरोबर भसंज्ञा आणि पदसंज्ञा यांचा समावेश होणार नाहीं; जसें— सार्पिष्कः, बार्हिष्कः, याजुष्कः, धानुष्कः, बाभ्रव्यः, माण्डव्यः. येथें अङ्गसंज्ञेचा भसंज्ञा आणि पदसंज्ञा ह्या अनवकाश असल्यामुळें बाध करतील. 'परवचने हि नियमानुपपत्तेरुभयसंज्ञाभावः' आणि ज्याच्या मतीं 'प्राक्कडारात्परं कार्यम्' असा पाठ आहे त्याच्या मतीं एकच संज्ञा करावयाची असा नियम नसल्यामुळें दोन्ही संज्ञांचें एका ठिकाणीं अस्तित्व सिद्ध होतें.

तें कसें ?

त्याच्या मतीं भसंज्ञा आणि पदसंज्ञा या पूर्वं व अङ्गसंज्ञा पर असें करून साधेल.

तें कसें ?

तो सूत्रपाठ असा करील की 'यस्मात्प्रत्ययविधिस्तदादि सुप्तिङन्तं पदम्', 'नः क्ये' 'सिति च', 'स्वादिष्वसर्वनामस्थाने', 'यचि भम्' असें म्हणून नंतर 'प्रत्ययेऽङ्गम्' असा पाठ केला म्हणजे तेथें विधान केल्याचे जोरावर भसंज्ञा व पदसंज्ञा होऊन 'पर कार्यं करावें' असें सांगितलें असल्यामुळें अङ्गसंज्ञाही होईल.

---

२. 'परं कार्यम्' असा पाठ घेतला असतां पुढील सूत्रांत परशब्द घालावयास नको, हें लाघव आहे.

३. ह्या सूत्राच्या पुढें एकशेषप्रकरण घालावें. तेथें येथून एका हें पद अनुवृत्त होईल व त्याचा लिंग फिरवून एकः असा शेषपदाशीं संबंध करतां येईल. तेव्हां तेथील एकशब्द घालावयास नको, हें लाघव आहे.

४. अंगसंज्ञेचा बाध झाला तर अंगाला सांगितलेली आदिवृद्धि (७।२।११७) होणार नाहीं.

प्येकसंज्ञाधिकारस्तस्याप्यङ्गसंज्ञापूर्विके भपदसंज्ञे । कथम् । अनुवृत्तिः क्रियते । पर्यायः प्रसज्येत । एका संज्ञेति वचनान्नास्ति यौगपद्येन संभवः ॥

**कर्मधारयत्वे तत्पुरुषग्रहणम् ॥४॥**

कर्मधारयत्वे तत्पुरुषग्रहणं कर्तव्यम् । तत्पुरुषः समानाधिकरणः कर्मधारयः [१.२.४२] इति । एकसंज्ञाधिकार इति चोदितम् । अक्रियमाणे ह्यनवकाशा कर्मधारयसंज्ञा तत्पुरुषसंज्ञां बाधेत । परवचने हि नियमानुपपत्तेरुभयसंज्ञाभावः ॥ यस्य पुनः परंकार्यत्वं नियमानुपपत्तेस्तस्योभयोः संज्ञयोर्भावः सिद्धः । कथम् । पूर्वा तस्य कर्मधारयसंज्ञा परा तत्पुरुषसंज्ञा । कथम् । एवं स वक्ष्यति । पूर्वकालैकसर्वजरत्पुराणनवकेवलाः समानाधिकरणेन कर्मधारय इति । एवं सर्वं कर्मधारयप्रकरणमनुक्रम्य तस्यान्ते श्रितादिस्तत्पुरुष इति । तत्रारम्भसामर्थ्याच्च कर्मधारयसंज्ञा परंकार्यत्वाच्च तत्पुरुषसंज्ञा भविष्यति ॥ ननु च यस्याप्येकसंज्ञाधिकारस्तस्यापि तत्पुरुषसंज्ञापूर्विका कर्मधारयसंज्ञा । कथम् । अनुवृत्तिः क्रियते । पर्यायः प्रसज्येत । एका संज्ञेति वचना-

---

पण ज्याच्या मतीं एका संज्ञा असा पाठ आहे त्याच्याही मतीं भसंज्ञा आणि पदसंज्ञा ह्या अङ्गसंज्ञा सांगून नंतर त्याला सांगितल्या असल्यामुळें त्या अङ्गसंज्ञेचा बाध करणार नाहींत.

तें कसें ?

भसंज्ञा आणि पदसंज्ञा सांगणाऱ्या सूत्रामध्यें 'अङ्गम्' या पदाची अनुवृत्ति केली म्हणजे झालें.

अनुवृत्ति केली तरी त्या जोरावर अङ्गसंज्ञा व भपदसंज्ञा आळीपाळीनें होतील. कारण एकच संज्ञा करावी असा नियम केला असल्यामुळें भपदसंज्ञांबरोबर अङ्गसंज्ञेचा समावेश होण्याचा संभव नाहीं.

(वा.४) कर्मधारयसमासाला तत्पुरुष म्हणतां आलें पाहिजे म्हणून 'तत्पुरुषः समानाधिकरणः कर्मधारयः' (१।२।४२) असा तत्पुरुष शब्द ठेवावा लागेल. कारण एकच संज्ञा होते असा तर अधिकारच चालू केला आहे. तेव्हां जर हा तत्पुरुष शब्द ठेवला नाहीं तर अनवकाश असलेली कर्मधारयसंज्ञा तत्पुरुषसंज्ञेचा बाध करील. 'परवचने हि नियमानुपपत्तेरुभयसंज्ञाभावः'. आतां ज्याच्या मतीं 'प्राक्कडारात्परं कार्यम्' असा पाठ आहे त्याच्या मतीं एकच संज्ञा करावयाची असा नियम नसल्यामुळें दोन्ही संज्ञांचें एका ठिकाणीं अस्तित्व सिद्ध होतें.

तें कसें ?

त्याच्या मतीं कर्मधारयसंज्ञा पूर्व आणि तत्पुरुषसंज्ञा पर असें करून साधेल.

तें कसें ?

तो सूत्रपाठ असा करील— 'पूर्वकालैकसर्वजरत्पुराणनवकेवलाः समानाधिकरणेन कर्मधारयः' असें म्हणून सर्व कर्मधारयाचें प्रकरण सांगून त्याच्या शेवटीं श्रितादिक शब्दांबरोबर तत्पुरुष समास सांगण्यांत येईल. असा पाठ केला म्हणजे तेथें विधान केल्याचे जोरावर कर्मधारयसंज्ञा होईल, आणि 'परकार्य करावें' असें सांगितलें असल्यामुळें तत्पुरुषसंज्ञाही होईल.

पण ज्याच्या मतीं एका संज्ञा असा पाठ आहे त्याच्याही मतीं तत्पुरुषसंज्ञा सांगून नंतर त्याला कर्मधारयसंज्ञा सांगितली असल्यामुळें तत्पुरुषसंज्ञेचा बाध होणार नाहीं.

तें कसें ?

कर्मधारयसंज्ञा सांगणाऱ्या सूत्रामध्यें 'तत्पुरुषः' या पदाची अनुवृत्ति केली म्हणजे झालें.

न्नास्ति यौगपद्येन संभवः ॥

तत्पुरुषत्वे द्विगुचग्रहणम् ॥५॥

तत्पुरुषत्वे द्विगुचग्रहणं कर्तव्यम्। तत्पुरुषः [२.१.२२] द्विगुश्च [२३] इति चकारः कर्तव्यः। अक्रियमाणे हि चकारेऽनवकाशा द्विगुसंज्ञा तत्पुरुषसंज्ञां बाधेत। परवचने हि नियमानुपपत्तेरुभयसंज्ञाभावः॥ यस्य पुनः परंकार्यत्वं नियमानुपपत्तेस्तस्योभयोः संज्ञयोर्भावः सिद्धः। कथम्। पूर्वा तस्य द्विगुसंज्ञा परा तत्पुरुषसंज्ञा। कथम्। एवं स वक्ष्यति। तद्धितार्थोत्तरपदसमाहारे च [२.१.५१] संख्यापूर्वो द्विगुः [५२] इति। एवं सर्वं द्विगुप्रकरणमनुक्रम्य तस्यान्ते श्रितादिस्तत्पुरुष इति। तत्रारम्भसामर्थ्याच्च द्विगुसंज्ञा परंकार्यत्वाच्च तत्पुरुषसंज्ञा भविष्यति॥ ननु च यस्याप्येकसंज्ञाधिकारस्तस्यापि तत्पुरुषसंज्ञापूर्विका द्विगुसंज्ञा। कथम्। अनुवृत्तिः क्रियते। पर्यायः प्रसज्येत। एका संज्ञेति वचनान्नास्ति यौगपद्येन संभवः॥

गतिदिवःकर्महेतुमत्सु चग्रहणम् ॥६॥

गतिदिवःकर्महेतुमत्सु चग्रहणं कर्तव्यम्॥ उपसर्गाः क्रियायोगे [१.४.५९]

---

अनुवृत्ति केली तरी त्या जोरावर तत्पुरुष आणि कर्मधारय ह्या संज्ञा आळीपाळीनें होतील. कारण एकच संज्ञा करावी असा नियम केला असल्यामुळें तत्पुरुष व कर्मधारय या दोन संज्ञांचा समावेश होण्याचा संभव नाहीं.

(वा.५) द्विगु समासाला तत्पुरुष म्हणतां आलें पाहिजे म्हणून 'तत्पुरुषः द्विगुश्च' (२।१।२२।२३) येथें चशब्द ठेवावा लागेल. जर हा चशब्द ठेवला नाहीं तर अनवकाश असलेली द्विगुसंज्ञा तत्पुरुषसंज्ञेचा बाध करील. परवचने हि नियमानुपपत्तेरुभयसंज्ञाभावः. आतां ज्याच्या मतीं 'प्राक्कडारात्परं कार्यम्' असा पाठ आहे त्याच्या मतीं 'एकच संज्ञा करावयाची' असा नियम नसल्यामुळें दोन्ही संज्ञांचें एका ठिकाणीं अस्तित्व सिद्ध होतें.

तें कसें ?

त्याच्या मतीं द्विगुसंज्ञा पूर्व आणि तत्पुरुषसंज्ञा पर असें करून साधेल.

तें कसें ?

तो सूत्रपाठ असा करील— 'तद्धितार्थोत्तरपदसमाहारे च', 'संख्यापूर्वो द्विगुः' असें सर्व द्विगुप्रकरण सांगून त्याच्या शेवटीं श्रितादिकांबरोबर तत्पुरुष समास सांगण्यांत येईल. असा पाठ केला म्हणजे तेथें विधान केल्याचे जोरावर संख्यापूर्व समासाला द्विगुसंज्ञा होईल आणि 'परकार्य करावें' असें सांगितलें असल्यामुळें तत्पुरुषसंज्ञाही होईल.

पण ज्याच्या मतीं एका संज्ञा असा पाठ आहे त्याच्याही मतीं तत्पुरुषसंज्ञा सांगून नंतर त्याला द्विगुसंज्ञा सांगितली असल्यामुळें तत्पुरुषसंज्ञेचा बाध होणार नाहीं.

तें कसें ?

'संख्यापूर्वो द्विगुः' या द्विगुसंज्ञा सांगणाऱ्या सूत्रामध्यें तत्पुरुषपदाची अनुवृत्ति केली म्हणजे झालें.

पण अनुवृत्ति केली तरी त्या जोरावर तत्पुरुष आणि द्विगु ह्या संज्ञा पर्यायानें होतील. कारण एकच संज्ञा करावयाची असा नियम केला असल्यामुळें दोन संज्ञांचा समावेश होण्याचा संभव नाहीं.

(वा.६) 'एकच संज्ञा करावी' असा नियम मानणाऱ्याच्या मतीं 'गतिश्च' (१।४।६०) 'दिवः कर्म च' (१।४।४३), 'हेतुश्च' (१।४।५४) या तिन्ही ठिकाणीं संज्ञांचा समावेश होण्यासाठीं चशब्दाची जरूर आहे. 'उपसर्गाः क्रियायोगे' (१।४।५९), 'गतिश्च' (१।४।६०) येथें चशब्द आवश्यक आहे. चशब्द न

गतिश्च [६०] इति चकारः कर्तव्यः। अक्रियमाणे हि चकारेऽनवकाशोपसर्गसंज्ञा गतिसंज्ञां बाधेत। परवचने हि नियमानुपपत्तेरुभयसंज्ञाभावः॥ यस्य पुनः परंकार्यत्वं नियमानुपपत्तेस्तस्योभयोः संज्ञयोर्भावः सिद्धः। कथम्। पूर्वा तस्योपसर्गसंज्ञा परा गतिसंज्ञा। तत्रारम्भसामर्थ्याच्चोपसर्गसंज्ञा परंकार्यत्वाच्च गतिसंज्ञा भविष्यति॥ ननु च यस्याप्येकसंज्ञाधिकारस्तस्याप्युपसर्गसंज्ञापूर्विका गतिसंज्ञा। कथम्। अनुवृत्तिः क्रियते। पर्यायः प्रसज्येत। एका संज्ञेति वचनान्नास्ति यौगपद्येन संभवः॥ गतिसंज्ञाप्यनवकाशा सा वचनाद्भविष्यति। सावकाशा गतिसंज्ञा। कोऽवकाशः। ऊर्यादीन्यवकाशः। प्रादीनां या गतिसंज्ञा सानवकाशा। गति॥ दिवः कर्म। साधकतमं करणम् [१.४.४२] दिवः कर्म च [४३] इति चकारः कर्तव्यः। अक्रियमाणे हि चकारेऽनवकाशा कर्मसंज्ञा करणसंज्ञां बाधेत। परवचने हि नियमानुपपत्तेरुभयसंज्ञाभावः॥ यस्य पुनः परंकार्यत्वं नियमानुपपत्तेस्तस्योभयोः संज्ञयोर्भावः सिद्धः। कथम्। पूर्वा तस्य कर्मसंज्ञा परा करणसंज्ञा। कथम्। एवं स वक्ष्यति।

---

ठेवला तर निरवकाश असलेली अशी उपसर्गसंज्ञा गतिसंज्ञेचा बाध करील. परवचने हि नियमानुपपत्तेरुभयसंज्ञाभावः. ज्याच्या मतीं 'प्राक्कडारात्परं कार्यम्' असा पाठ आहे त्याच्या मतीं संज्ञा एकच करावयाची असा नियम नसल्यामुळें दोन्ही संज्ञांचें एका ठिकाणीं अस्तित्व सिद्ध होतें.

तें कसें ?

त्याच्या मतीं उपसर्गसंज्ञा पूर्व आणि गतिसंज्ञा पर असल्यामुळें साधेल. विधान केल्याचे जोरावर उपसर्गसंज्ञा होईल, आणि 'परकार्य करावें' असें सांगितलें असल्यामुळें गतिसंज्ञाही होईल.

पण ज्याच्या मतीं एका संज्ञा असा पाठ आहे त्याच्याही मतीं उपसर्गसंज्ञा सांगून नंतर त्याला गतिसंज्ञा सांगितली असल्यामुळें गतिसंज्ञेचा बाध होणार नाहीं.

तें कसें ?

'उपसर्गाः क्रियायोगे' या पूर्वसूत्रांतून उपसर्गसंज्ञेची अनुवृत्ति 'गतिः' या सूत्रामध्यें केली म्हणजे झालें.

पण अनुवृत्ति केली तरी त्या जोरावर गति आणि उपसर्ग ह्या संज्ञा पाळीपाळीनें होतील. कारण एकच संज्ञा करावयाची असा नियम केला असल्यामुळें या दोन संज्ञांचा समावेश होण्याचा संभव नाहीं.

पण येथें उपसर्गसंज्ञेप्रमाणें गतिसंज्ञाही अनवकाशच असल्यामुळें त्या जोरावरच होईल.

गतिसंज्ञा ही सावकाश आहे.

तो अवकाश कोणता ?

ऊर्यादि शब्द.

पण प्र, परा इत्यादिकांना जी गतिसंज्ञा सांगितली ती अनवकाशच आहे.

एकच संज्ञा होते असा नियम मानणाऱ्याच्या मतीं 'साधकतमं करणम्'(१।४।४२) 'दिवः कर्म च' (१।४।४३) येथें दिव्‌धातूच्या साधकतम कारकाला कर्म आणि करणसंज्ञांचा समावेश होण्यासाठीं चशब्द ठेवला पाहिजे. न ठेवला तर अनवकाश असलेली अशी 'दिवः कर्म च' यानें सांगितलेली जी कर्मसंज्ञा ती करणसंज्ञेचा बाध करील. 'परवचने हि नियमानुपपत्तेरुभयसंज्ञाभावः' ज्याच्या मतीं 'प्राक्कडारात्परं कार्यम्' असा पाठ आहे, त्याच्या मतीं 'संज्ञा एकच करावी' असा नियम नसल्यामुळें दोन्ही संज्ञांचें एका ठिकाणीं अस्तित्व सिद्ध होतें.

तें कसें ?

त्याच्या मतीं कर्मसंज्ञा पूर्व व करणसंज्ञा

दिवः साधकतमं कर्म । ततः करणम् । करणसंज्ञं च भवति साधकतमम् । दिव इति निवृत्तम् । तत्रारम्भसामर्थ्याच्च कर्मसंज्ञा परंकार्यत्वाच्च करणसंज्ञा भविष्यति ॥ ननु च यस्याप्येकसंज्ञाधिकारस्तस्यापि करणसंज्ञापूर्विका कर्मसंज्ञा । कथम् । अनुवृत्तिः क्रियते । पर्यायः प्रसज्येत । एका संज्ञेति वचनान्नास्ति यौगपद्येन संभवः । दिवः कर्म ॥ हेतुमत् । स्वतन्त्रः कर्ता [१.४.५४] तत्प्रयोजको हेतुश्च [५५] इति चकारः कर्तव्यः । अक्रियमाणे हि चकारेऽनवकाशा हेतुसंज्ञा कर्तृसंज्ञां बाधेत । परवचने हि नियमानुपपत्तेरुभयसंज्ञाभावः ॥ यस्य पुनः परंकार्यत्वं नियमानुपपत्तेस्तस्योभयोः संज्ञयोर्भाव सिद्धः । कथम् । पूर्वा तस्य हेतुसंज्ञा परा कर्तृसंज्ञा । कथम् । एवं स वक्ष्यति । स्वतन्त्रः प्रयोजको हेतुरिति । ततः कर्ता । कर्तृसंज्ञश्च भवति स्वतन्त्रः । प्रयोजक इति निवृत्तम् । तत्रारम्भसामर्थ्याच्च हेतुसंज्ञा परंकार्यत्वाच्च कर्तृसंज्ञा भविष्यति ॥ ननु च यस्याप्येकसंज्ञाधिकारस्तस्यापि कर्तृ-

---

पर असें करून साधेल.

तें कसें ?

तो असा सूत्रपाठ करील— 'दिवः साधकतमं कर्म' असें सूत्र करून त्याच्यापुढें 'करणम्' असा तो सूत्रपाठ करील. 'करणम्' या सूत्रामध्यें फक्त साधकतमं या पदाचीच अनुवृत्ति येते. 'दिवः' या पदाची अनुवृत्ति येत नाहीं. तेव्हां साधकतम कारकाला करण-संज्ञा होते असा त्याचा अर्थ होतो. तेथें विधान केल्याच्या जोरावर दिव्धातूच्या साधकतम कारकाला कर्मसंज्ञा होईल आणि 'परकार्य करावें' असें विधान असल्यामुळें करणसंज्ञाही होईल.

पण ज्याच्या मतीं एका संज्ञा असा पाठ आहे त्याच्याही मतीं करणसंज्ञा सांगून नंतर त्याला कर्मसंज्ञा सांगितली आहे.

ती कशी ?

'दिवः कर्म' येथें करण या शब्दाची अनुवृत्ति केली म्हणजे झालें. पण अनुवृत्ति केली तरी तिच्या जोरावर कर्म आणि करण ह्या संज्ञांचा पर्याय होईल. कारण एकच संज्ञा करावी असा नियम असल्यामुळें या दोन संज्ञांचा समावेश होण्याचा संभव नाहीं.

'स्वतन्त्रः कर्ता' (१।४।७४), 'तत्प्रयोजको हेतुश्च' (१।४।७५) येथें चशब्द आवश्यक आहे. चशब्द न ठेवला तर कर्त्याच्या प्रयोजकाला सांगितलेली हेतुसंज्ञा ही अनवकाश असल्यामुळें कर्तृसंज्ञेचा बाध करील. परवचने हि नियमानुपपत्तेरुभयसंज्ञाभावः. ज्याच्या मतीं 'प्राक्कडारात्परं कार्यम्' असा पाठ आहे त्याच्या मतीं 'संज्ञा एकच करावी' असा नियम नसल्यामुळें दोन्ही संज्ञांचें एका ठिकाणीं अस्तित्व सिद्ध होतें.

तें कसें ?

त्याच्या मतीं हेतुसंज्ञा पूर्व आणि कर्तृसंज्ञा पर असल्यामुळें साधेल.

तें कसें ?

तो असा सूत्रपाठ करील— 'स्वतन्त्रः प्रयोजको हेतुः' असें सूत्र करून त्याच्यापुढें 'कर्ता' असें दुसरें सूत्र करावें. त्या सूत्रामध्यें फक्त 'स्वतन्त्रः' या पदाचीच अनुवृत्ति आहे. प्रयोजकः या पदाची अनुवृत्ति नाहीं. तेव्हां क्रिया करणारा म्हणून धरलेला अर्थ कर्तृसंज्ञक होतो, असा 'कर्ता' या सूत्राचा अर्थ. तेथें विधान केल्याचे जोरावर हेतुसंज्ञा होईल. आणि 'परकार्य करावें' असें सांगितलें असल्यामुळें कर्तृसंज्ञाही होईल.

पण ज्याच्या मतीं एका संज्ञा असा पाठ आहे त्याच्याही मतीं कर्तृसंज्ञा सांगून नंतर त्याला हेतुसंज्ञा सांगितली असल्यामुळें कर्तृ-

संज्ञापूर्विका हेतुसंज्ञा । कथम् । अनुवृत्तिः क्रियते । पर्यायः प्रसज्येत । एका संज्ञेति वचनान्नास्ति यौगपद्येन संभवः ॥

गुरुलघुसंज्ञे नदीघिसंज्ञे ॥ ७ ॥

गुरुलघुसंज्ञे नदीघिसंज्ञे बाधेयाताम् । गार्गीबन्धुः वात्सीबन्धुः । वैन्त्रम् विविनय्य । परवचने हि नियमानुपपत्तेरुभयसंज्ञाभावः ॥ यस्य पुनः परंकार्यत्वं नियमानुपपत्तेस्तस्योभयोः संज्ञयोर्भावः सिद्धः । कथम् । पूर्वे तस्य नदीघिसंज्ञे परे गुरुलघुसंज्ञे । तत्रारम्भसामर्थ्याच्च नदीघिसंज्ञे परंकार्यत्वाच्च गुरुलघुसंज्ञे भविष्यतः ॥ ननु च यस्याप्येकसंज्ञाधिकारस्तस्यापि नदीघिसंज्ञापूर्विके गुरुलघुसंज्ञे । कथम् । अनुवृत्तिः क्रियते । पर्यायः प्रसज्येत । एका संज्ञेति वचनान्नास्ति यौगपद्येन संभवः ॥

परस्मैपदसंज्ञां पुरुषसंज्ञा ॥ ८ ॥

परस्मैपदसंज्ञां पुरुषसंज्ञा बाधेत । पर-

---

संज्ञेचा बाध होणार नाहीं.

तो कसा ?

'तत्प्रयोजको' या सूत्रामध्यें कर्ता या पदाची अनुवृत्ति केली म्हणजे झालें.

पण अनुवृत्ति केली तरी तिच्या जोरावर कर्ता व हेतु या संज्ञांचा पर्याय होईल. कारण एकच संज्ञा करावी असा नियम असल्यामुळें दोन संज्ञांचा समावेश होण्याचा संभव नाहीं.

(वा.७) संज्ञा एकच करावी असा नियम मानणाऱ्याच्या मतीं नदीसंज्ञा गुरुसंज्ञेचा बाध करील व घिसंज्ञा लघुसंज्ञेचा बाध करील; उदा०-गार्गीबन्धुः, वात्सीबन्धुः, वैन्त्रं, विविनय्य. परवचने हि नियमानुपपत्तेरुभयसंज्ञाभावः. ज्याच्या मतीं 'प्राक्कडारात्परं कार्यम्' असा पाठ आहे त्याच्या मतीं एकच संज्ञा करावी असा नियम नसल्यामुळें दोन्ही संज्ञांचें एका ठिकाणीं अस्तित्व सिद्ध होतें.

तें कसें ?

नदी व घि या संज्ञा पूर्व आहेत आणि गुरु व लघु या संज्ञा पर आहेत. तेथें विधान केल्याचे जोरावर नदी व घि या संज्ञा होतील आणि 'परकार्य करावें' असें सांगितलें असल्यामुळें गुरु व लघु या संज्ञाही होतील.

पण ज्याच्या मतीं एका संज्ञा असा पाठ आहे त्याच्याही मतीं नदीसंज्ञा सांगून नंतर त्याला गुरुसंज्ञा सांगितली आहे. तशीच घिसंज्ञा सांगून नंतर त्याला लघुसंज्ञा सांगितली आहे. असें असल्यामुळें बाध होणार नाहीं.

तें कसें ?

'दीर्घं च' या सूत्रामध्यें नदीशब्दाची अनुवृत्ति करावी. आणि 'ह्रस्वं लघु' या सूत्रामध्यें घिसंज्ञेची अनुवृत्ति करावी म्हणजे झालें.

पण अनुवृत्ति केली तरी तिच्या जोरावर नदी आणि गुरु या संज्ञांचा पर्याय होईल. तसेंच घि आणि लघु या संज्ञांचा पर्याय होईल. कारण संज्ञा एकच करावी असा नियम असल्यामुळें समावेश होण्याचा संभव नाहीं.

(वा.८) 'एकच संज्ञा करावी' असा नियम मानणाऱ्याच्या मतीं पुरुषसंज्ञा (१।४।१०१), परस्मैपदसंज्ञेचा (१।४।९९) बाध करील.

---

५. गार्गी व वात्सी या पूर्वपदांतील दीर्घ ईकाराला नदी-संज्ञेमुळें अन्तोदात्त (६।२।१०९) होतो, आणि गुरुसंज्ञेमुळें प्लुत (८।२।८६) होतो. वैन्त्रं येथें वि आणि नृ या दोन शब्दांचा द्वंद्वसमास केला असतां इकाराला घिसंज्ञेमुळें विशब्दाला पूर्वनिपात (२।२।३२) होतो. आणि लघुसंज्ञेमुळें त्या विनृशब्दाहून तस्य भावः या अर्थीं अण्प्रत्यय (५।१।१३३) होतो. विविनय्य येथें त्या विनृशब्दाहून 'प्रातिपदिकाद्धात्वर्थे' (गणसूत्र) यानें णिच्प्रत्यय, क्त्वाप्रत्यय (३।४।२१), वि या उपसर्गाशीं समास, नंतर ल्यप्प्रत्यय (७।१।३७) केला आहे. घिसंज्ञेमुळें येथें पूर्वनिपात झालाच आहे, आणि लघुसंज्ञेमुळें अयादेश (६।४।५६) झाला आहे.

वचने हि नियमानुपपत्तेरुभयसंज्ञाभावः ॥ यस्य पुनः परंकार्यत्वं नियमानुपपत्तेस्तस्योभयोः संज्ञयोर्भावः सिद्धः । कथम् । पूर्वा तस्य पुरुषसंज्ञा परा परस्मैपदसंज्ञा । कथम् । एवं स वक्ष्यति । तिङस्त्रीणि त्रीणि प्रथममध्यमोत्तमा इति । एवं सर्वं पुरुषनियममनुक्रम्य तस्यान्ते लः परस्मैपदमिति । तत्रारम्भसामर्थ्याच्च पुरुषसंज्ञा परंकार्यत्वाच्च परस्मैपदसंज्ञा भविष्यति ॥ ननु च यस्याप्येकसंज्ञाधिकारस्तस्यापि परस्मैपदसंज्ञापूर्विका पुरुषसंज्ञा । कथम् । अनुवृत्तिः क्रियते । पर्यायः प्रसज्येत । एका संज्ञेति वचनान्नास्ति यौगपद्येन संभवः ॥ परस्मैपदसंज्ञाप्यनवकाशा सा वचनाद्भविष्यति । सावकाशा परस्मैपदसंज्ञा । कोऽवकाशः । शतृक्वसू अवकाशः ॥

## परवचने सिति पदं भम् ॥ ९ ॥

परवचने सिति पदं भसंज्ञमपि प्राप्नोति । अयं ते योनिर्ऋत्वियः । प्रजां विन्दाम ऋत्वियाम् । आरम्भसामर्थ्याच्च पदसंज्ञा परंकार्यत्वाच्च भसंज्ञा प्राप्नोति ॥

---

परवचने हि नियमानुपपत्तेरुभयसंज्ञाभावः. ज्याच्या मतीं 'प्राक्कडारात्परं कार्यम्' असा पाठ आहे त्याच्या मतीं 'एकच संज्ञा करावी' असा नियम नसल्यामुळें दोन्ही संज्ञांचें एका ठिकाणीं अस्तित्व सिद्ध होतें.

तें कसें ?

पुरुषसंज्ञा पूर्व व परस्मैपदसंज्ञा पर असें करून भागेल.

तें कसें ?

असा सूत्रपाठ करतां येईल की 'तिङस्त्रीणि' (१।४।१०१), याला आरंभ करून 'शेषे प्रथमः' (१।४।१०८) या सूत्रापर्यंत सर्व पुरुषनियमप्रकरण संपवून त्याच्या शेवटीं 'लः परस्मैपदम्' हें सूत्र पठन करील. तेथें विधान केल्याचे जोरावर पुरुषसंज्ञा होईल आणि 'परकार्य करावें' असें सांगितलें असल्यामुळें परस्मैपदसंज्ञाही होईल.

पण ज्याच्या मतीं एका संज्ञा असा पाठ आहे त्याच्याही मतीं परस्मैपदसंज्ञा सांगून नंतर त्याला पुरुषसंज्ञा सांगितली असल्यामुळें बाध होणार नाहीं.

तें कसें ?

तिङस्त्रीणि त्रीणि' येथें परस्मैपदशब्दाची अनुवृत्ति केली म्हणजे झालें.

पण अनुवृत्ति केली तरी तिच्या जोरावर पुरुष आणि परस्मैपद या संज्ञांचा पर्याय होईल. कारण 'संज्ञा एकच करावी' असा नियम असल्यामुळें समावेश होण्याचा संभव नाहीं.

परस्मैपदसंज्ञा ही अनवकाश असल्यामुळें विधानाचे जोरावर तीही होईल.

परस्मैपदसंज्ञा सावकाश आहे.

तो अवकाश कोणता ?

शतृ आणि क्वसु हे प्रत्यय हा अवकाश होय.

(वा.९) परं कार्यम् असा पाठ घेतला तर सकारेत्संज्ञक प्रत्यय पुढें असतां ज्याला पदसंज्ञा झाली त्याला भसंज्ञाही प्राप्त होते; जसें– 'अयं ते योनिर्ऋत्वियः', 'प्रजां विन्दाम ऋत्वियः' येथें विधान केल्याचे जोरावर 'सिति च' (१।४।१६) यानें ऋतु शब्दाला पदसंज्ञा होईल, आणि 'परकार्य करावें' असें

---

६. आतांपर्यंत एका संज्ञा या पाठावर दोष दाखविले. आतां येथून परं कार्यम् या पाठावर दोष दाखवीत आहेत.

७. ऋतुशब्दाहून घस्प्रत्यय (५।१।१०६), घकाराचे स्थानीं इयादेश (७।१।२), 'सिति च' यानें पदसंज्ञा (१।४।१६), यण्. 'संज्ञा एकच करावी' असा नियम मानणाऱ्याच्या मतीं 'सिति च' यानें अनवकाश असल्यामुळें भसंज्ञेचा बाध होतो. म्हणून गुण (६।४।१४६) होत नाहीं.

**गतिबुद्ध्यादीनां ण्यन्तानां कर्म कर्तृसंज्ञम् ॥ १० ॥**

गतिबुध्द्यादीनां ण्यन्तानां कर्म कर्तृसंज्ञमपि प्राप्नोति । आरम्भसामर्थ्याच्च कर्मसंज्ञा परंकार्यत्वाच्च कर्तृसंज्ञा प्राप्नोति ॥ नैष दोषः । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति न कर्मसंज्ञायां कर्तृसंज्ञा भवतीति यदयं हृक्रोरन्यतरस्याम् [१.४.५३] इत्यन्यतरस्यांग्रहणं करोति ॥

**शेषवचनं च घिसंज्ञानिवृत्त्यर्थम् ॥११**

शेषग्रहणं च कर्तव्यम् । शेषो घ्यसखि [१.४.७] इति । किं प्रयोजनम् । घिसंज्ञानिवृत्त्यर्थम् । नदीसंज्ञायां घिसंज्ञा मा भूदिति । शकट्यै पद्धत्यै बुद्ध्यै धेन्वै । इतरथा हि परंकार्यत्वाच्च घिसंज्ञारम्भसामर्थ्याच्च ङिति ह्रस्वश्च [१.४.६] इति नदीसंज्ञा ॥

**न वासंभवात् ॥ १२ ॥**

न वा कर्तव्यम् । नदीसंज्ञायां घिसंज्ञा कस्मान्न भवति । असंभवात् । कोऽसावसंभवः ।

**ह्रस्वलक्षणा हि नदीसंज्ञा घिसंज्ञायां च गुणः ॥ १३ ॥**

ह्रस्वलक्षणा हि नदीसंज्ञा घिसंज्ञायां च गुणेन भवितव्यम् ।

**तत्र वचनप्रामाण्यान्नदीसंज्ञायां घिसंज्ञाभावः ॥ १४ ॥**

तत्र वचनप्रामाण्यान्नदीसंज्ञायां घिसंज्ञा न भविष्यति । किं कारणम् । आश्रयाभावात् ।

---

सांगितलें असल्यामुळें 'यचि भम्' (१।४।१८) यानें भसंज्ञाही होईल.

(वा.१०) तसेंच 'परं कार्यम्' असा पाठ घेतला तर णिप्रत्ययान्त असे जे गति, बुद्धि वगैरे अर्थांचे धातु त्यांच्या कर्माला कर्तृसंज्ञा होऊं लागेल. 'गतिबुद्धि.' (१।४।५२) यानें कर्मसंज्ञेचें विधान केलें आहे त्याचे जोरावर 'चैत्रो मैत्रं ग्रामं गमयति' येथें मैत्राला कर्मसंज्ञा होते. तेथेंच त्याला 'परकार्य करावें' असें सांगितलें असल्यामुळें कर्तृसंज्ञाही (१।४।५४) होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण ज्यापेक्षां हा आचार्य पाणिनि कर्मसंज्ञा विकल्पानें होण्यासाठीं 'हृक्रोरन्यतर०' (१।४।५३) या सूत्रामध्यें 'अन्यतरस्याम्' हा शब्द योजीत आहे त्यापेक्षां तो असें सुचवीत आहे की 'कर्मसंज्ञा झालेल्याला कर्तृसंज्ञा होत नाहीं.'

(वा.११) 'परं कार्यम्' असा पाठ घेतला तर 'शेषो घ्यसखि' (१।४।७) येथें शेष शब्द ठेविला पाहिजे.

काय उपयोग ?

शकट्यै, पद्धत्यै, बुद्ध्यै, धेन्वै येथें नदीसंज्ञा होते तेव्हां घिसंज्ञा होऊं नये. शेषशब्द न ठेविला तर वरील उदाहरणांमध्यें 'परकार्य करावें' असें सांगितलें असल्यामुळें घिसंज्ञा होईल, आणि विधान केल्याचे जोरावर 'ङिति ह्रस्वश्च' (१।४।६) यानें नदीसंज्ञाही होईल.

(वा.१२) 'शेषो घ्यसखि' या सूत्रामध्यें शेषशब्द ठेवावयास नको.

नदीसंज्ञेच्या विषयांत घिसंज्ञा कां बरें होत नाहीं ?

संभव नाहीं म्हणून.

कसा बरें संभव नाहीं ?

(वा.१३) नदीसंज्ञा ही ह्रस्वावर अवलंबून होणारी आहे. तेव्हां अगोदरच घिसंज्ञा होऊन गुण (७।३।१११) होणार आहे.

(वा.१४) तेव्हां ह्रस्वाला जें नदीसंज्ञेचें विधान केलें आहे त्याचे जोरावर अगोदर नदीसंज्ञा झाली असतां घिसंज्ञा होणारच नाहीं.

कां बरें ?

नदीसंज्ञा होऊन यण् झाला म्हणजे घिसंज्ञेचा आश्रय जो इकार त्याचाच अभाव

**आश्रयाभावान्नदीसंज्ञायां घिसंज्ञानिवृत्तिरिति चेद्यणादेशाभावः ॥ १५**

आश्रयाभावान्नदीसंज्ञायां घिसंज्ञानिवृत्तिरिति चेदेवमुच्यते । यणादेशोऽपि न प्राप्नोति ॥ नैष दोषः ।

**नद्याश्रयत्वाद्यणादेशस्य ह्रस्वस्य नदीसंज्ञाभावः ॥ १६ ॥**

नद्याश्रयो यणादेशः । यदा नदीसंज्ञया घिसंज्ञा बाधिता तत उत्तरकालं यणादेशेन भवितव्यम् । नद्याश्रयत्वाद्यणादेशस्य ह्रस्वस्य नदीसंज्ञा भविष्यति ॥

**बहुव्रीह्यर्थं तु ॥ १७ ॥**

बहुव्रीहिप्रतिषेधार्थं तु शेषग्रहणं कर्तव्यम् । शेषो बहुव्रीहिः [२.२.२३] इति ॥ किं प्रयोजनम् ।

**प्रयोजनमव्ययीभावोपमानद्विगुकृल्लोपेषु ॥ १८ ॥**

अव्ययीभावे । उन्मत्तगङ्गम् लोहितगङ्गम् । उपमाने । शस्त्रीश्यामा कुमुदश्येनी । द्विगु । पञ्चगवम् दशगवम् । कृल्लोपे ।

---

होत आहे.

(वा.१५) नदीसंज्ञा केली असतां घिसंज्ञेच्या आश्रयाचा अभाव होत असल्यामुळें घिसंज्ञेची निवृत्ति होते असें म्हणशील तर त्या इकाराला यणादेशही होणार नाहीं.

हा दोष येत नाहीं.

(वा.१६) यणादेश हा नदीसंज्ञेवर येथें अवलंबून आहे. कारण जेव्हां नदीसंज्ञा ही घिसंज्ञेचा बाध करील तेव्हांच यणादेशाचा अपवादगुण (७।३।१११) बाजूला सरत असल्यामुळें यणादेश होणार आहे. एकंदरींत यणादेश हा नदीसंज्ञेवर अवलंबून असल्यामुळें ह्स्वाला नदीसंज्ञा होईल.

(वा.१७) परं कार्यम् असा पाठ घेतला असतां घिसंज्ञा सांगणाऱ्या सूत्रामध्यें शेषशब्द काढून टाकतां आला तरी पण बहुव्रीहि सांगणाऱ्या 'शेषो बहुव्रीहिः' (२।२।२३) या सूत्रामध्यें शेषशब्द अव्ययीभाव वगैरेंना बहुव्रीहिसंज्ञा न होण्याकरितां ठेवलाच पाहिजे.

त्याचा काय उपयोग ?

(वा.१८) अव्ययीभाव समास, उपमान समास, द्विगु समास आणि कृल्लोप इतक्या ठिकाणीं शेषशब्दामुळें बहुव्रीहिसंज्ञा होत नाहीं. त्यांपकीं अव्ययीभावाला बहुव्रीहिसंज्ञा न झाल्याचें फळः— उन्मत्तगङ्गम्[९], लोहितगङ्गम्. उपमानसमासाला बहुव्रीहिसंज्ञा न झाल्याचें फळः— शस्त्रीश्यामा, कुमुदश्येनी. द्विगुसमासाला बहुव्रीहिसंज्ञा न झाल्याचें फळः— पञ्चगवम्, दशगवम्. कृल्लोप झाला असतां बहुव्रीहिसंज्ञा न झाल्याचें फळः— निष्कौशाम्बिः,

---

८. ज्या विधीमुळें ज्याला वैयर्थ्य येतें त्यानें त्याचा बाध करावयाचा; पण ज्या विधीला जो निमित्तच आहे त्या विधीचा त्यानें बाध केला जात नाहीं. घिसंज्ञा केली तर गुण झाल्यानें नदीसंज्ञेच्या निमित्तभूत ह्रस्वाचा नाश झाल्यामुळें ह्रस्वाला नदीसंज्ञा करणें व्यर्थ होतें म्हणून नदीसंज्ञेकडून घिसंज्ञेचा बाध होणें हें योग्यच आहे. पण ज्या विधीला नदीसंज्ञा कारणच आहे त्याचा बाध होत नाहीं. तेव्हां यणादेशाला नदीसंज्ञा कारणच असल्यामुळें ती यणादेशाचा बाध करूं शकत नाहीं.

९. उन्मत्त आहे गंगा ज्या देशामध्यें असा देश हा अन्य पदार्थ प्रतीत होत असल्यामुळें बहुव्रीहिसंज्ञा (२।२।४) प्राप्त झाली, परंतु तेथें अव्ययीभाव (२।१।२१) सांगितला असल्यामुळें शेषपदानें त्याचें ग्रहण होत नाहीं. तसेंच शस्त्रीश्यामा येथें श्याम वर्णाच्या शस्त्रीप्रमाणें श्याम वर्णाची असा उपमेय हा अन्य पदार्थ प्रतीत होतो. परंतु तेथें तत्पुरुष (२।१।५५) सांगितला असल्यामुळें शेषपदानें त्याचें ग्रहण होत नाहीं, तसेंच पञ्चगवम् येथें पांच गायींचा समाहार असा समाहार हा अन्य पदार्थ प्रतीत होतो. परंतु तेथें द्विगु (२।१।५२) सांगितला असल्यामुळें शेषपदानें त्याचें ग्रहण होत नाहीं. निष्कौशाम्बिः येथें क्रान्त हा अन्य पदार्थ प्रतीत होतो. परंतु तेथें तत्पुरुष (२।२।१८) सांगितला असल्यामुळें शेषपदानें त्याचें ग्रहण होत नाहीं. बहुव्रीहिसंज्ञा न झाल्यामुळें कप्प्रत्यय (५।४।१५५) आणि पूर्वपदप्रकृति-

निष्कौशाम्बिः निर्वाराणसिः ॥

**तत्र शेषवचनाद्दोषः संख्यासमानाधिकरणनञ्समासेषु बहुव्रीहिप्रतिषेधः ॥ १९ ॥**

तत्र शेषवचनाद्दोषो भवति । संख्यासमानाधिकरणनञ्समासेषु बहुव्रीहेः प्रतिषेधः प्राप्नोति । संख्या । द्वीरावतीको देशः । त्रीरावतीको देशः । समानाधिकरण । वीरपुरुषको ग्रामः । नञ्समासे । अब्राह्मणको देशः । अवृषलको देशः ॥

**क्तलोपे च शेषवचनात्प्रादिभिर्न बहुव्रीहिः ॥ २० ॥**

क्तलोपे च शेषवचनात्प्रादिभिर्बहुव्रीहिर्न प्राप्नोति । प्रपतितपर्णः प्रपर्णकः । प्रपतितपलाशः प्रपलाशक इति ॥ अथैकसंज्ञाधिकारे कथं सिध्यति । एकसंज्ञाधिकारे विप्रतिषेधाद्बहुव्रीहिः । एकसंज्ञाधिकारे विप्रतिषेधाद्बहुव्रीहिर्भविष्यति ॥

**एकसंज्ञाधिकारे विप्रतिषेधाद्बहुव्रीहिरिति चेत् क्तार्थे प्रतिषेधः ॥ २१ ॥**

एकसंज्ञाधिकारे विप्रतिषेधाद्बहुव्रीहिरिति चेत् क्तार्थे प्रतिषेधो वक्तव्यः । निष्कौशाम्बिः निर्वाराणसिः॥ तत्पुरुषोऽत्र बाधको भविष्यति ।

---

निर्वाराणसिः.

(वा.१९) 'शेषो[१०] बहुव्रीहिः' येथें शेषशब्द घातला असतां संख्यापूर्वपदक नदीवाचकांचा समास, समानाधिकरणांचा समास आणि नञसमास या विषयांत बहुव्रीहिसंज्ञा करतां येणार नाहीं असा दोष येतो; जसें— द्वीरावतीको देशः, त्रीरावतीको[११] देशः; तसें वीरपुरुषको ग्रामः[१२] या समानाधिकरण समासाच्या विषयांत दोष येतो; तसाच अब्राह्मणको[१३] देशः, अवृषलको देशः, या नञ्समासाच्या विषयांतही दोष येतो.

(वा.२०) क्तप्रत्ययान्ताचा लोप झाला असतां तेथें शेषः असें म्हटल्यामुळें प्रादिकांबरोबर बहुव्रीहिसमास होणार नाहीं: प्रपतितपर्णः[१४] प्रपर्णकः, प्रपतितपलाशः प्रपलाशकः.

आतां एका संज्ञा असा पाठ घेतला असतां वरील उदाहरणांमध्यें बहुव्रीहिसंज्ञा कशी बरें साधते ?

एकसंज्ञाधिकारे विप्रतिषेधाद् बहुव्रीहिः एका संज्ञा असा पाठ घेतला असतां वरील उदाहरणांमध्यें विरोध उत्पन्न होत असल्यामुळें परत्वास्तव बहुव्रीहिसंज्ञा[१५] होईल.

(वा.२१) एका संज्ञा असा पाठ घेतल्यावेळीं परत्वास्तव बहुव्रीहिसंज्ञा होत असेल तर जेव्हां क्त-प्रत्ययान्ताचा अर्थ हा समासाचा वाच्य आहे असा विवक्षित असेल तेव्हां बहुव्रीहिसंज्ञेचा प्रतिषेध करावा लागेल; जसें— निष्कौशाम्बिः, निर्वाराणसिः.

निष्कौशाम्बिः, निर्वाराणसिः, येथें 'प्रादयः क्तार्थे' (२।२।१८ वा.४) यानें मुद्दाम सांगि-

---

स्वर (६।२।१) होत नाहींत.

१०. पूर्वी शेषशब्द घातला नसता तर येणारे दोष दाखविले. आतां शेषशब्द घातल्यामुळें येणारे दोष दाखवीत आहेत.

११. हा विषय 'नदीभिश्च' (२।१।२०) याचा असल्यामुळें शेषपदानें याचें ग्रहण होणार नाहीं.

१२. हा विषय 'विशेषणं विशेष्येण०' (२।१।५७) याचा असल्यामुळें शेषग्रहणानें याचें ग्रहण होणार नाहीं.

१३. हा विषय 'नञ्' (२।२।६) याचा असल्यामुळें शेषशब्दानें याचें ग्रहण होणार नाहीं.

१४. हा विषय 'कुगति०' (२।२।१८) याचा असल्यामुळें शेषशब्दानें ह्याचें ग्रहण होणार नाहीं.

१५. एका संज्ञा असा पाठ घेणाऱ्याचे मतीं शेषो बहुव्रीहिः येथें शेषशब्द घालावयास नको. कारण उन्मत्तगङ्गम्, शङ्खीश्यामा, पञ्चगवम्, निष्कौशाम्बिः, या उदाहरणांमध्यें अनवकाशत्वास्तव अव्ययीभाव वगैरे संज्ञा बहुव्रीहिसंज्ञेचा बाध करतील. द्वीरावतीकः, वीरपुरुषकः, अब्राह्मणकः, या उदाहरणांमध्यें परत्वास्तव बहुव्रीहिसंज्ञा अव्ययीभाव वगैरे संज्ञांचा

**तत्पुरुष इति चेदन्यत्र क्तार्थात्प्रतिषेधः ॥ २२ ॥**

तत्पुरुष इति चेदन्यत्र क्तार्थात्प्रतिषेधो वक्तव्यः । प्रपतितपर्णः प्रपर्णकः । प्रपतितपलाशः प्रपलाशक इति ॥

**सिद्धं तु प्रादीनां क्तार्थे तत्पुरुषवचनात् ॥ २३ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । प्रादीनां क्तार्थे तत्पुरुषो भवतीति वक्तव्यम् ॥

कानि पुनरस्य प्रयोजनानि ।

**प्रयोजनं ह्रस्वसंज्ञा दीर्घप्लुतौ ॥२४॥**

ह्रस्वसंज्ञा दीर्घप्लुतसंज्ञे बाधेते ॥

**तिङ्सार्वधातुकं लिङ्लिटोरार्धधातुकम् ॥ २५ ॥**

तिङः सार्वधातुकसंज्ञां लिङ्लिटोरार्धधातुकसंज्ञा बाधते ॥

**अपत्यं वृद्धं युवा ॥ २६ ॥**

अपत्यं वृद्धं युवसंज्ञा बाधते ॥

**घिं नदी ॥ २७ ॥**

घिसंज्ञां नदीसंज्ञा बाधते ॥

**लघु गुरु ॥ २८ ॥**

लघुसंज्ञां गुरुसंज्ञा बाधते ॥

**पदं भम् ॥ २९ ॥**

पदसंज्ञां भसंज्ञा बाधते ॥

**अपादानमुत्तराणि धनुषा विध्यति कंसपात्र्यां भुङ्क्ते गां दोग्धि धनुर्विध्यतीति ॥ ३० ॥**

अपादानसंज्ञामुत्तराणि कारकाणि

---

तलेली तत्पुरुषसंज्ञा बहुव्रीहिसंज्ञेचा बाध करील.

(वा.२२) अशा रीतीनें तत्पुरुषसंज्ञाच येथें होते असें असेल तर क्रान्त वगैरे क्त-प्रत्ययान्ताच्या अर्थाहून निराळा अन्य पदार्थ वाच्य असतां तेथें तत्पुरुषसंज्ञेचा प्रतिषेध करावा लागेल; जसें— प्रपपतितपर्णः प्रपर्णकः, प्रपतितपलाशः प्रपलाशकः.

(वा.२३) वरील उदाहरणांमध्यें बहुव्रीहि समास साधत आहे.

तो कसा ?

क्त-प्रत्ययान्ताचा जो क्रान्त वगैरे अर्थ तो प्र वगैरेंचा मानला तर तेथें तत्पुरुष होतो, अशा अर्थाचें तें वचन आहे.

पण 'एकच संज्ञा होते' ह्या नियमाचा उपयोग तरी कोठें कोठें होत आहे ?

(वा.२४) ह्रस्व संज्ञेचा दीर्घ संज्ञा व प्लुत-संज्ञा बाध करते हा या नियमाचा उपयोग होय[१६].

(वा.२५) तसेंच तिङाला उद्देशून सांगितलेल्या सार्वधातुक संज्ञेचा (३।४।११३) लिङ् आणि लिट् यांना उद्देशून सांगितलेली आर्धधातुकसंज्ञा (३।४।११५।११६) बाध करते.

(वा.२६) गोत्रसंज्ञेचा (४।१।१६२) युवसंज्ञा (४।१।१६३) बाध करते.

(वा.२७) घिसंज्ञेचा नदीसंज्ञा बाध करते.

(वा.२८) लघुसंज्ञेचा गुरुसंज्ञा बाध करते.

(वा.२९) पदसंज्ञेचा भसंज्ञा बाध करते.

(वा.३०) अपादानसंज्ञेचा करण वगैरे संज्ञा परत्वास्तव बाध करतात.

कोठें बाध करतात ?

धनुषा विध्यति, कंसपात्र्यां भुङ्क्ते, गां दोग्धि, धनुर्विध्यति, येथें. धनुषा विध्यति येथें शरनिर्गमनपूर्वक वेध करणें असा व्यध्धातूचा

---

बाध करील.

१६. ह्या नियम अत्यावश्यक आहे हें दाखविण्याकरितां ह्या अधिकाराच्या (१।४।१) बाहेरही ह्या नियमाचा उपयोग आरंभीं तीन वार्तिकांमध्यें दाखविला आहे. 'ऊकालोऽच्०', (१।२।२७) येथें ह्रस्व, दीर्घ आणि प्लुत अशा तीन संज्ञा सांगणारीं तीन वाक्यें आहेत. त्यांत पहिल्या वाक्यांतील उकार हा अण् असल्यामुळें सवर्णाचा ग्राहक (१।१।६९) आहे. म्हणून दीर्घ व प्लुत याही अचांला ह्रस्वसंज्ञा प्राप्त होते. त्या ह्रस्वसंज्ञेचा दीर्घ व प्लुत या संज्ञांनीं बाध

बाधन्ते । क । धनुषा विध्यति । कंसपाऽयां भुङ्क्ते । गां दोग्धि । धनुर्विध्यति ॥ धनुषा विध्यतीत्यपाययुक्तत्वाच्च ध्रुवमपायेऽपादानम् [१. ४. २४] इत्यपादानसंज्ञा प्राप्नोति साधकतमं करणम् [४२] इति च करणसंज्ञा । करणसंज्ञा परा सा भवति ॥ कंसपात्र्यां भुङ्क्त इत्यत्रापाययुक्तत्वाच्च ध्रुवमपायेऽपादानमित्यपादानसंज्ञा प्राप्नोत्याधारोऽधिकरणम् [४५] इति चाधिकरणसंज्ञा । अधिकरणसंज्ञा परा सा भवति ॥ गां दोग्धीत्यत्रापाययुक्तत्वाच्चापादानसंज्ञा प्राप्नोति कर्तुरीप्सिततमं कर्म [४९] इति च कर्मसंज्ञा । कर्मसंज्ञा परा सा भवति ॥ धनुर्विध्यतीत्यत्रापाययुक्तत्वाच्चापादानसंज्ञा प्राप्नोति स्वतन्त्रः कर्ता [५४] इति च कर्तृसंज्ञा । कर्तृसंज्ञा परा सा भवति ॥

**क्रुधद्रुहोरुपसृष्टयोः कर्म संप्रदानम् ॥ ३१ ॥**

क्रुधद्रुहोरुपसृष्टयोः कर्मसंज्ञा संप्रदानसंज्ञां बाधते ॥

**करणं पराणि स॰ध्वसिश्छिनत्ति॥३२॥**

करणसंज्ञां पराणि कारकाणि बाधन्ते । क । धनुर्विध्यति । असिश्छिनत्तीति ॥

**अधिकरणंकर्म गेहं प्रविशति ॥ ३३ ॥**

अधिकरणसंज्ञां कर्मसंज्ञा बाधते । क । गेहं प्रविशतीति ॥

**अधिकरणं कर्ता स्थाली पचति ॥३४॥**

---

अर्थ आहे. तेव्हां धनुष्य हें शरनिर्गमनक्रियेचा अवधि आहे म्हणून त्याला 'ध्रुवमपायेऽपादानम्' (१।४।२४) यानें अपादानसंज्ञा प्राप्त होते; आणि तें वेधन क्रियेचें साधन आहे म्हणून त्याला 'साधकतमं करणम्' (१।४।४२) यानें करणसंज्ञा प्राप्त होते. त्या दोहोंमध्यें पर असलेली करणसंज्ञा होते. कंसपात्र्यां भुङ्क्ते येथें अन्ननिर्गमनपूर्वक भोजन असा भुज्धातूचा अर्थ विवक्षित आहे. तेव्हां कंसपात्री हें अन्ननिर्गमनक्रियेचा अवधि आहे म्हणून त्याला 'ध्रुवमपायेऽपादानम्' यानें अपादानसंज्ञा प्राप्त होते; आणि भोजनक्रियेचा आधार आहे म्हणून त्याला 'आधारोऽधिकरणम्' (१।४।४५) यानें अधिकरणसंज्ञा प्राप्त होते. त्या दोहोंमध्यें पर असलेली अधिकरणसंज्ञा होते. गां दोग्धि येथें गोपदार्थ हा पयोविभागाचा अवधि आहे म्हणून त्याला अपादानसंज्ञा प्राप्त होते आणि कर्त्याला ईप्सिततम असल्यामुळें 'कर्तुरीप्सिततमं कर्म' (१।४।४९) यानें कर्मसंज्ञा प्राप्त होते. त्यांपैकीं पर असलेली कर्मसंज्ञा होते. धनुर्विध्यति येथें शरनिर्गमनपूर्वक वेध असा व्यध्धात्वर्थ विवक्षित आहे. तेव्हां धनुष्य हें शरनिर्गमनक्रियेचा अवधि आहे म्हणून त्याला अपादानसंज्ञा प्राप्त होते आणि वेधनक्रियेचा आश्रय आहे म्हणून त्याला 'स्वतन्त्रः कर्ता' (१।४।५४) यानें कर्तृसंज्ञा प्राप्त होते. त्यांपैकीं पर असलेली कर्तृसंज्ञा होते.

(वा. ३१) उपसर्गसहित जो क्रुध् किंवा द्रुह् धातु त्यांचा योग असतांना सांगितलेली कर्मसंज्ञा(१।४।३८) संप्रदानसंज्ञेचा (१।४।३२) बाध करते.

(वा. ३२) करणसंज्ञेचा पुढील संज्ञा बाध करतात.

कोठें ?

धनुर्विध्यति, असिश्छिनत्ति येथें.

(वा. ३३) अधिकरणसंज्ञेचा (१।४।४५) कर्मसंज्ञा (१।४।५०) बाध करते.

कोठें ?

गेहं प्रविशति येथें.

(वा. ३४) अधिकरणसंज्ञेचा कर्तृसंज्ञा बाध करते.

---

केला जातो.

१७. धनुष्य हें वेधक्रियेचें आणि असि हें छेदक्रियेचें साधन आहे म्हणून त्याला कारणसंज्ञा (१।४।४२) प्राप्त होते, आणि तेच मुख्य क्रियेचे आश्रय आहेत

अधिकरणसंज्ञां कर्तृसंज्ञा बाधते । क्व । स्थाली पचतीति ॥

**अध्युपसृष्टं कर्म ॥ ३५ ॥**

अध्युपसृष्टं कर्माधिकरणसंज्ञां बाधते ॥

**गत्युपसर्गसंज्ञे कर्मप्रवचनीयसंज्ञा ३६**

गत्युपसर्गसंज्ञे कर्मवचनीयसंज्ञा बाधते ॥

**परस्मैपदमात्मनेपदम् ॥ ३७ ॥**

परस्मैपदसंज्ञामात्मनेपदसंज्ञा बाधते ॥

**समाससंज्ञाश्च ॥ ३८ ॥**

समाससंज्ञाश्च या याः परा अनवकाशाश्च तास्ताः पूर्वाः सावकाशाश्च बाधन्ते ॥

**अर्थवत्प्रातिपदिकम् ॥ ३९ ॥**

अर्थवत्प्रातिपदिकसंज्ञं भवति ॥

**गुणवचनं च ॥ ४० ॥**

गुणवचनसंज्ञं च भवत्यर्थवत् ॥

**समासकृत्तद्धिताव्ययसर्वनामासर्वलिङ्गा जातिः ॥ ४१ ॥**

समास । समाससंज्ञा च वक्तव्या । कृत् । कृत्संज्ञा च वक्तव्या । तद्धित । तद्धितसंज्ञा च वक्तव्या । अव्यय । अव्ययसंज्ञा च वक्तव्या । सर्वनाम । सर्वनामसंज्ञा च वक्तव्या । असर्वलिङ्गा जातिरित्येतच्च वक्तव्यम् ॥

**संख्या ॥ ४२ ॥**

संख्यासंज्ञा च वक्तव्या ॥

**डु च ॥ ४३ ॥**

डुसंज्ञा च वक्तव्या ॥ का पुनर्डुसंज्ञा । षट्संज्ञा ॥

**एकद्रव्योपनिवेशिनी संज्ञा ॥ ४४ ॥**

एकद्रव्योपनिवेशिनी संज्ञेत्येतच्च वक्तव्यम् ॥

किमर्थमिदमुच्यते । यथा न्यास

---

कोठें ?

स्थाली पचति[१८] येथें.

(वा.३४) अधि-उपसर्गानें युक्त अशा शीङ्, स्था वगैरे धातूंच्या आधाराला सांगितलेली कर्मसंज्ञा (१।४।४६) अधिकरणसंज्ञेचा (१।४।४५) बाध करते.

(वा.३६) गति (१।४।६०) आणि उपसर्ग (१।४।५९) या संज्ञांचा कर्मप्रवचनीयसंज्ञा (१।४।८३) बाध करते.

(वा.३७) परस्मैपदसंज्ञेचा (१।४।९९) आत्मनेपदसंज्ञा (१।४।१००) बाध करते.

(वा.३८) अव्ययीभाव, बहुव्रीहि इत्यादिक समाससंज्ञा ज्या पर किंवा अनवकाश आहेत त्या पूर्व किंवा सावकाश अशा समाससंज्ञांचा बाध करतात.[१९]

(वा.३९) अर्थवान् अशा शब्दाला प्रातिपदिकसंज्ञा होते.

(वा.४०) अर्थवान् अशा शब्दाला गुणवचनसंज्ञाही होते.

(वा.४१)समाससंज्ञा, कृत्संज्ञा, तद्धितसंज्ञा, अव्ययसंज्ञा, सर्वनामसंज्ञा आणि जो प्रकार सर्वलिंगी नसून एका व्यक्तीचे ठिकाणीं अमुक म्हणून सांगितला असतां त्याच्या संबंधानें इतर व्यक्तींचे ठिकाणीं आनायासानें कळून येतो त्याला जातिसंज्ञा या संज्ञेचें विधान करावें.

(वा.४२) तसेंच संख्यासंज्ञाही सांगावी.

(वा.४३) डुसंज्ञाही सांगावी.

डुसंज्ञा ती कोणती बरें ?

षट्संज्ञा हीच डुसंज्ञा होय.

(वा.४४) एका द्रव्यावर अवलंबून अस-

---

अशी विवक्षा केली असतां कर्तृसंज्ञा (१।४।५४) प्राप्त होते. त्यांपैकीं परत्वास्तव कर्तृसंज्ञा होते.

१८. स्थाली हा पचनक्रियेचा आधार आहे म्हणून त्याला अधिकरणसंज्ञा (१।४।४५) प्राप्त होते. आणि तोच मुख्य क्रियेचा कर्ता आहे अशी विवक्षा केली असतां कर्तृसंज्ञा (१।४।५४) प्राप्त होते. त्यांपैकीं परत्वास्तव कर्तृसंज्ञा होते.

१९. मागील टीप १५ पहावी.

एव भूयिष्ठाः संज्ञाः क्रियन्ते ॥ सन्ति चैवात्र काश्चिदपूर्वाः संज्ञाः। अपि चैतेनानुपूर्व्येण संनिविष्टानां बाधनं यथा स्यात् । गुणवचनसंज्ञायाश्चैताभिर्बाधनं यथा स्यादिति ॥

**विप्रतिषेधे परं कार्यम् ॥१।४।२॥**

विप्रतिषेध इति कोऽयं शब्दः । विप्रतिपूर्वात्सिधेः कर्मव्यतिहारे घञ् । इतरेतरप्रतिषेधो विप्रतिषेधः । अन्योन्यप्रतिषेधो विप्रतिषेधः ॥ कः पुनर्विप्रतिषेधः ।

**द्वौ प्रसङ्गावन्यार्थावेकस्मिन्स विप्रतिषेधः ॥ १ ॥**

द्वौ प्रसङ्गौ यदान्यार्थौ भवत एकस्मिंश्च युगपत्प्राप्नुतः स विप्रतिषेधः। क्व पुनरन्यार्थौ क्व चैकस्मिन्युगपत्प्राप्नुतः। वृक्षाभ्याम् वृक्षेष्वित्यन्यार्थौ वृक्षेभ्य इत्यत्र युगपत्प्राप्नुतः ॥ किं च स्यात् ।

**एकस्मिन्युगपदसंभवात्पूर्वपरप्राप्तेरुभयप्रसङ्गः ॥ २ ॥**

एकस्मिन्युगपदसंभवात्पूर्वस्याश्च परस्याश्च प्राप्तेरुभयप्रसङ्गः ॥ इदं विप्रतिषिद्धं यदुच्यत एकस्मिन्युगपदसंभवात्पूर्वपर-

---

णाऱ्या प्रकाराला 'संज्ञा' ही संज्ञा होते असेंही विधान करावें.

'गुणवचन' या संज्ञेला आरंभ करून 'संज्ञा' या संज्ञेपर्यंत ज्या संज्ञा सांगण्यांत आल्या त्या सर्व कशाकरितां सांगितल्या आहेत? कारण आचार्यांनें मूळ सूत्रपाठामध्यें ह्यांतील बऱ्याचशा संज्ञा केलेल्याच दिसत आहेत.

पण मूळ सूत्रपाठामध्यें न सांगितलेल्या अशाही कांहीं अपूर्व संज्ञा येथें सांगितल्या आहेत. शिवाय ह्या संज्ञा येथें ज्या क्रमानें सांगितल्या आहेत त्या क्रमाला अनुसरून पुढील संज्ञेनें पूर्वसंज्ञेचा बाध व्हावा हाही येथें ह्या संज्ञा सांगण्याचा हेतु आहे. तसेंच गुणवचनसंज्ञेचा पुढील सर्वच[२०] संज्ञांनीं बाध व्हावा हाही हेतु आहे.

(सू.२) विप्रतिषेध हा शब्द येथें कोणत्या अर्थानें वापरला आहे ?

वि आणि प्रति ह्या दोन उपसर्गांच्या पुढें असलेल्या आणि परस्परविरोध करणें अशा अर्थाच्या सिध्धातूहून भावार्थी घञ्प्रत्यय केला आहे. तेव्हां अन्योन्यविरोध एकमेकांचा विरोध हा विप्रतिषेधशब्दाचा अर्थ होतो.

तो विप्रतिषेध शास्त्रामध्यें कसा समजावा?

(वा.१) जे दोन विधि एकएकटे निरनिराळ्या उदाहरणांमध्यें उपयोगीं पडलेले असून तिसऱ्या एका उदाहरणामध्यें बरोबर प्राप्त होतात तो विप्रतिषेध होय.

असे दोन विधि कोठें बरें निरनिराळ्या उदाहरणांमध्यें उपयोगीं पडलेले असून कोठें बरें एका उदाहरणामध्यें बरोबर प्राप्त झालेले दिसतात ?

वृक्षाभ्यां येथें दीर्घविधि (७।३।१०२) आणि वृक्षेषु येथें एत्त्वविधि (७।३।१०३) उपयोगीं पडत आहे; आणि वृक्षेभ्यः येथें दोन्ही विधि बरोबर प्राप्त होत आहेत.

आतां जर हें सूत्र केलें नाहीं तर काय होईल ?

(वा.२) एका उदाहरणामध्यें बरोबर दोन कार्यें होण्याचा संभव जरी नाहीं तरी पण तीं पूर्व आणि पर अशीं दोन्हीही कार्यें प्राप्त होत असल्यामुळें तीं दोन्ही करण्याचा प्रसंग येईल.

---

२०. तेव्हां अर्थातच समास, कृदन्त, तद्धितान्त, अव्यय, सर्वनाम, जाति, संख्या आणि संज्ञाशब्द यांखेरीज इतर शब्दांना गुणवचन ही संज्ञा शिल्लक राहते.

१. समानबल अशा अनेक शास्त्रांची एका ठिकाणीं युगपत् प्राप्ति येणें हा विरोध असतां त्यांत परशास्त्रानें सांगितलेलें कार्य करावें; उदा. वृक्षेभ्यः येथें वृक्ष-भ्यस् अशी स्थिति असतां दीर्घ (७।३।१०२) आणि एत्त्व (७।३।१०३) यांची प्राप्ति बरोबर येत आहे. त्यांत परकार्य एत्त्वच होतें.

प्राप्तेरुभयप्रसङ्ग इति। कथं ह्येकस्मिंश्च नाम युगपदसंभवः स्यात्पूर्वस्याश्च परस्याश्च प्राप्तेरुभयप्रसङ्गश्च स्यात्। नैतद्विप्रतिषिद्धम्। यदुच्यत एकस्मिन्युगपदसंभवादिति कार्ययोर्युगपदसंभवः शास्त्रयोरुभयप्रसङ्गः ॥

**तृजादिभिस्तुल्यम् ॥ ३ ॥**

तृजादिभिस्तुल्यं पर्यायः प्राप्नोति। तद्यथा। तृजादयः पर्यायेण भवन्ति॥ किं पुनः कारणं तृजादयः पर्यायेण भवन्ति।

**अनवयवप्रसङ्गात्प्रतिपदं विधेश्च ॥४॥**

अनवयवेन प्रसज्यन्ते प्रतिपदं च विधीयन्ते ॥

**अप्रतिपत्तिर्वोभयोस्तुल्यबलत्वात् ॥५**

अप्रतिपत्तिर्वा पुनरुभयोः शास्त्रयोः स्यात्। किं कारणम्। तुल्यबलत्वात्। तुल्यबले ह्युभे शास्त्रे। तद्यथा। द्वयोस्तुल्यबलयोरेकः प्रेष्यो भवति। स तयोः पर्यायेण कार्यं करोति। यदा तमुभौ युगपत्प्रेषयतो नानादिक्षु च कार्ये भवतस्तदा यद्यसावविरोधार्थी भवति तत उभयोर्न करोति। किं पुनः कारणमुभयोर्न करोति। यौगपद्यासंभवात्। नास्ति यौगपद्येन संभवः ॥

---

अहो पण हें तुमचें बोलणें अगदींच विरुद्ध दिसतें की एका उदाहरणामध्यें बरोबर दोन कार्यें होण्याचा संभव नाहीं तरी पण तीं दोन्ही कार्यें प्राप्त होत असल्यामुळें दोन्ही करण्याचा प्रसंग येईल. कारण एका ठिकाणीं उभयतांचा युगपत् असंभव आणि त्याच उभयतांचा प्रसंग हें कसें बरें घडेल ?

वरील म्हणणें परस्परविरुद्ध नाहीं. 'एका ठिकाणीं उभयतांचा युगपत् असंभव' असें जें म्हटलें आहे तें एका ठिकाणीं उभयतां कार्यांचा युगपत् असंभव' या अभिप्रायानें म्हटलें आहे. आणि 'पूर्व व पर या उभयतांचा प्रसंग' असें जें म्हटलें आहे तें उभयतां शास्त्रांचा प्रसंग या अभिप्रायानें म्हटलें आहे.

(वा.३) तृच् वगैरेंप्रमाणें पर्याय होईल. म्हणजे तृच्, ण्वुल् आणि अच् (३।१।१३३। १३४) हे प्रत्यय जसे एका धातूहून पाळीपाळीनें होतात तसें वृक्षेभ्यः येथें दीर्घ आणि एत्व हीं दोन कार्यें पाळीपाळीनें होतील.

पण तृच् वगैरे प्रत्यय पाळीपाळीनें होतात याचें काय बरें कारण ?

(वा.४) मोघम सर्व धातूंना उद्देशून तृच् वगैरे प्रत्ययांचें विधान केलें आहे, आणि तेंही प्रत्येक प्रत्ययाच्या त्या त्या विशेष रूपानें केलें आहे आणि एकदम तर तें करतां येत नाहींत. तेव्हां अर्थात् पाळीपाळीनेंच ते करावे लागतात; त्याप्रमाणें येथें दीर्घ आणि एत्व हीं दोन कार्यें पाळीपाळीनें होतील.

(वा.५) किंवा तशा ठिकाणीं पूर्व आणि पर या दोन्हीं शास्त्रांची अप्रवृत्तिच होईल.

काय कारण ?

पूर्व आणि पर अशीं दोन्हीही शास्त्रें समसमान बलांचीं आहेत; जसें– समानबल अशा दोन मालकांचा एक चाकर आहे तो पाळीपाळीनें त्या उभयतां मालकांचें काम करतो. पण जेव्हां ते उभयतां मालक त्या चाकराला एका वेळीं भिन्न भिन्न दिशेच्या कामावर पाठविण्याचा हुकूम करतात तेव्हां तो चाकर दोघांही मालकांचा विरोध न व्हावा म्हणून उभयतांही मालकांचें काम करीत नाहीं.

पण उभयतांही मालकांचें काम करीत नाहीं याचें काय बरें कारण ?

भिन्न भिन्न दिशेचीं दोन कार्यें एका वेळीं करतां येणें शक्य नाहीं म्हणून. त्याप्रमाणें एका उदाहरणामध्यें प्राप्त झालेल्या विरुद्ध दोन कार्यांपैकीं कोणालाच थारा मिळणार नाहीं.

**तत्र प्रतिपत्त्यर्थं वचनम् ॥६॥**

तत्र प्रतिपत्त्यर्थमिदं वक्तव्यम् ॥

**तव्यदादीनां त्वप्रसिद्धिः ॥ ७ ॥**

तव्यदादीनां तु कार्यस्याप्रसिद्धिः । न हि किंचित्तव्यदादिषु नियमकारि शास्त्रमारभ्यते येन तव्यदादयः स्युः । यश्च भवता हेतुर्व्यपदिष्टोऽप्रतिपत्तिर्वोभयोस्तुल्यबलत्वादिति तुल्यः स तव्यदादिषु ॥ नैष दोषः । अनवकाशास्तव्यदादय उच्यन्ते च ते वचनाद्भविष्यन्ति । यश्च भवता हेतुर्व्यपदिष्टस्तृजादिभिस्तुल्यं पर्यायः प्राप्नोतीति तुल्यः स तव्यदादिषु ॥

एतावदिह सूत्रं विप्रतिषेधे परमिति । पठिष्यति ह्याचार्यः । सकृद्गतौ विप्रतिषेधे यद्बाधितं तद्बाधितमेवेति । पुनश्च पठिष्यति । पुनःप्रसङ्गविज्ञानात्सिद्धमिति । किं पुनरियता सूत्रेणोभयं लभ्यम् । लभ्यमित्याह । कथम् । इह भवता द्वौ हेतू व्यपदिष्टौ । तृजादिभिस्तुल्यं पर्यायः प्राप्नोतीति च । अप्रतिपत्तिर्वोभयोस्तुल्यबलत्वादिति च । तद्यदा तावदेष हेतुस्तृजादिभिस्तुल्यं पर्यायः प्राप्नोतीति तदा विप्रतिषेधे परमित्यनेन किं क्रियते । नियमः । विप्रतिषेधे परमेव भवतीति ।

---

(वा.६) तेव्हां तेथें परशास्त्रप्रवृत्त व्हावें म्हणून प्रकृत सूत्र सांगितलें पाहिजे.

(वा.७) तव्यत् वगैरे प्रत्ययांविषयीं तर अमुक करावें असें कांहींच सिद्ध होत नाहीं. त्या प्रत्ययांविषयीं नियमन करणारें शास्त्र केलेलें दिसत नाहीं की ज्याच्या योगानें तव्यत् वगैरे प्रत्यय होतील. एका उदाहरणामध्यें युगपत् दोन कार्यें प्राप्त झालीं असतां तीं दोन्हीही होत नाहींत याविषयीं जो तूं तुल्यबलत्व हा हेतु दाखविलास तो हेतु तव्यत् वगैरे प्रत्ययांना लागू पडत आहेच.

हा दोष येत नाहीं. कारण तव्यत्, तव्य आणि अनीयर् प्रत्यय अन्यत्र कोठेंही अनवकाशच आहेत आणि ते तर सांगितले आहेत. त्यापेक्षां त्या विधानाचे जोरावरच ते होतील. तेव्हां तृच् वगैरे प्रत्ययांप्रमाणें पर्याय प्राप्त होतो याविषयीं जो हेतु तूं दाखविलास तोच तव्यत् वगैरे प्रत्ययांविषयीं लागू पडत आहे.

आतां येथें 'विप्रतिषेधे परम्' एवढेंच सूत्र केलेलें दिसत आहे, आणि आचार्य तर '[२]सकृद्गतौ विप्रतिषेधे यद्बाधितं तद्बाधितमेव' (६।३।४२ वा.) असें वचन पठन करून पुनरपि '[३]पुनः प्रसङ्गविज्ञानात्सिद्धम्' (७।१।८२ वा.) असेंही पण वचन पठन करणार आहेत. तेव्हां 'विप्रतिषेधे परम्' एवढ्याशा सूत्रावरून ह्या दोन गोष्टी मिळूं शकतात काय ?

होय. मिळूं शकतात असें म्हणतों.

तें कसें ?

येथें तूं दोन हेतु दाखविले आहेस. एका ठिकाणीं युगपत् दोन शास्त्रें प्राप्त असतां त्यांच्या पर्यायाविषयीं तृच् वगैरे प्रत्ययांचा दृष्टान्त हा एक हेतु दाखविला आहे; आणि उभयतांची प्रवृत्ति होत नाहीं याविषयीं त्यांचें तुल्यबलत्व हा हेतु दाखविला आहे. तेथें जेव्हां तृच् वगैरे प्रत्ययांप्रमाणें पर्याय प्राप्त होतो असें गृहीत धरावें तेव्हां 'विप्रतिषेधे परम्' हें सूत्र काय करील ? नियम करील. तो नियम असा की दोन कार्यांमध्यें विरोध

---

२. दोन कार्यांची बरोबर प्राप्ति आली असतां तेथें विप्रतिषेधामुळें जें बाधित झालें तें बाधितच समजावें. म्हणजे बाधक शास्त्र केल्यानंतर मागून जरी त्याची प्राप्ति आली तरी तें होत नाहीं.

३. विप्रतिषेधानें जें बाधित झालें त्या शास्त्राची प्राप्ति जर बाधक शास्त्र केल्यानंतर येत असेल तर तेंही करावें.

तदेतदुपपन्नं भवति सकृद्गतौ विप्रतिषेधे यद्बाधितं तद्बाधितमेवेति । यदा त्वेष हेतुरप्रतिपत्तिरुभयोस्तुल्यबलत्वादिति तदा विप्रतिषेधे परमित्यनेन किं क्रियते । द्वारम् । विप्रतिषेधे परं तावद्भवति तस्मिन्कृते यदि पूर्वमपि प्राप्नोति तदपि भवति । तदेतदुपपन्नं भवति पुनःप्रसङ्गविज्ञानात्सिद्धमिति ॥

विप्रतिषेधे परमित्युक्त्वाङ्गाधिकारे पूर्वमिति वक्तव्यम् । किं कृतं भवति । पूर्वविप्रतिषेधा न पठितव्या भवन्ति । गुणवृद्ध्यौत्त्वतृज्वद्भावेभ्यो नुम्पूर्वविप्रतिषिद्धम् । नुमचिरतृज्वद्भावेभ्यो नुडिति । कथं ये परविप्रतिषेधाः । इत्त्वोत्त्वाभ्यां गुणवृद्धी भवतो विप्रतिषेधेनेति । सूत्रं च भिद्यते ॥ यथान्यासमेवास्तु । कथं ये पूर्वविप्रतिषेधाः । विप्रतिषेधे परमित्येव सिद्धम् । कथम् । परशब्दोऽयं बह्वर्थः । अस्त्येव व्यवस्थायां वर्तते । तद्यथा । पूर्वः पर इति । अस्त्यन्यार्थे वर्तते । परपुत्रः परभार्या । अन्यपुत्रः अन्यभार्येति गम्यते । अस्ति प्राधान्ये वर्तते । तद्यथा । परमियं ब्राह्मण्यस्मिन्कुटुम्बे । प्रधानमिति गम्यते । अस्तीष्टवाची परशब्दः । तद्यथा । परं धाम गत इति । इष्टं धामेति गम्यते । तद्य

---

आला असतां परच कार्य करावें. अर्थात् पूर्वीचें करूं नये. तेव्हां 'सकृतद्गतौ विप्रतिषेधे यद्बाधितं तद्बाधितमेव' हें वचन सिद्ध होतें. आणि जेव्हां तुल्यबलत्व या हेतुवरून उभयतांचीही अप्रवृत्ति प्राप्त होते तेव्हां 'विप्रतिषेधे परम्' हें सूत्र काय करील ? तर वाट काढील. ती अशी की विरोध आला असतां तेथें स्वस्थ न बसतां परकार्य करावें. अशा रीतीनें मार्ग खुला होऊन परशास्त्राची प्रवृत्ति केल्यानंतर जर पूर्वशास्त्राचीही प्राप्ति येईल तर तेंही होणारच. तेव्हां 'पुनः प्रसङ्गविज्ञानात्सिद्धम्' हें वचन सिद्ध होतें.

'विप्रतिषेधे परम्' या सूत्राच्या पुढें 'अङ्गाधिकारे पूर्वम्' असें सूत्र करावें. म्हणजे अङ्गाधिकारामधील दोन शास्त्रांमध्यें विरोध आला असतां तेथें पूर्वशास्त्र करतां येईल.

असें करण्यांत काय केलेंसें होतें ?

अङ्गाधिकारामध्यें पूर्वविप्रतिषेधादाखल जीं वचनें पठित आहेत तीं करावयास नकोत; जसें- 'गुणवृद्ध्यौत्त्वतृज्वद्भावेभ्यो नुम् पूर्वविप्रतिषिद्धम्' 'नुमचिरतृज्भावेभ्यो नुट्' (७।१। ९६ वा. १०।११).

पण अङ्गाधिकारामध्येंच परविप्रतिषेधादाखल जें वचन पठित आहे तें तर करावें लागेलच ना ? जसें— 'इत्त्वोत्त्वाभ्यां गुणवृद्धी भवतो विप्रतिषेधेन' (७।१।१०२ वा.). शिवाय मूळ सूत्रामध्यें बदल होत आहे तो आहेच.

तर मग मूळ सूत्र आहे तसेंच असूं दे.

आहे तसेंच ठेविलें तर अङ्गाधिकारांतील पूर्वविप्रतिषेध कसे बरें साधतील ?

'विप्रतिषेधे परम्' असें म्हणण्यानेंच ते साधतील.

तें कसें ?

पर ह्या शब्दाचे अनेक अर्थ आहेत. ते असेः— अमक्यापेक्षां पूर्व, अमक्यापेक्षां पर असा व्यवस्था हा परशब्दाचा अर्थ आहे. तसाच अन्य हाही परशब्दाचा अर्थआहे; जसें— पराचा मुलगा, पराची भार्या असें म्हटलें असतां अन्याचा मुलगा, अन्याची भार्या, असा अर्थ मनांत येतो. प्राधान्य हाही परशब्दाचा अर्थ आहे; जसें— या कुटुम्बामध्यें ही ब्राह्मणी पर, आहे असें म्हटलें असतां ती त्यांत मुख्य आहे असा अर्थ परशब्दापासून मनांत येतो. तसेंच इष्ट हाही परशब्दाचा अर्थ आहे; जसें— परं धाम गतः येथें इष्टस्थळीं गेला असा अर्थ मनांत येतो. त्यांत इष्ट या अर्थाचा

इष्टवाची परशब्दस्तस्येदं ग्रहणम् । विप्रतिषेधे परं यदिष्टं तद्भवति ॥

अन्तरङ्गं च ॥ ८ ॥

अन्तरङ्गं च बलीयो भवतीति वक्तव्यम् ॥ किं प्रयोजनम् ।

**प्रयोजनं यणेकादेशेत्त्वोत्त्वानि गुणवृद्धिद्विर्वचनाल्लोपस्वरेभ्यः ॥९॥**

गुणाद्यणादेशः । स्योनः स्योना । गुणश्च प्राप्नोति यणादेशश्च । परत्वाद्गुणः स्यात् । यणादेशो भवत्यन्तरङ्गतः ॥ वृद्धेर्यणादेशः । द्यौकामिः स्यौकामिः । वृद्धिश्च प्राप्नोति यणादेशश्च । परत्वाद्वृद्धिः स्यात् । यणादेशो भवत्यन्तरङ्गतः ॥ द्विर्वचनाद्यणादेशः । दुद्यूषति सुस्यूषति । द्विर्वचनं च प्राप्नोति यणादेशश्च । नित्यत्वाद्द्विर्वचनं स्यात् । यणादेशो भवत्यन्तरङ्गतः ॥ अल्लोपस्य च यणादेशस्य च नास्ति संप्रधारणा ॥ स्वराद्यणादेशः । द्यौकामिः स्यौकामिः । स्वरश्च प्राप्नोति यणादेशश्च । परत्वात्स्वरः स्यात् । यणा-

---

वाचक असा जो परशब्द त्याचें प्रकृत सूत्रामध्यें ग्रहण केलें आहे. तेव्हां विप्रतिषेध असतां जें इष्ट असेल तें कार्य करावें असा अर्थ झाल्यामुळें सर्वच पूर्वविप्रतिषेध सिद्ध होतात.

(वा.८) अन्तरङ्गशास्त्र हें बलिष्ठ आहे असें वचन करावें.

त्याचा काय उपयोग ?

(वा.९, यण्, एकादेश, इत्त्व आणि उत्त्व हे चार विधि प्रत्येकीं गुण, वृद्धि, द्वित्व, अल्लोप आणि स्वर या पांच विधींपेक्षां अंतरंगत्वास्तव पूर्वी होतात. त्यांपैकीं यणादेश हा अंतरंग असल्यामुळें गुणापेक्षां पूर्वी होतो याचें उदाहरणः— स्योनः स्योना. सिव्धातूहून 'न' प्रत्यय (३।३।१) व ऊठ् (६।४।१९) केला असतां सि-ऊ-न या स्थितींत नप्रत्ययामुळें लघूपधगुण (७।३।८६) प्राप्त होतो. व ऊकारामुळें इकाराला यण् (६।१।७७) प्राप्त होतो. त्यांत पर असल्यामुळें गुण होईल, परंतु अंतरंग बलिष्ठ असल्यामुळें यणादेश होतो.

यणादेश हा अंतरंग असल्यामुळें वृद्धीपेक्षां पूर्वी झाल्याचें उदाहरणः— द्यौकामिः स्यौकामिः. दिव् आणि काम या शब्दांचा बहुव्रीहि समास, पुढें इञ्प्रत्यय (४।१।९५), उत्त्व (६।१।१३१) केल्यानंतर दि-उ-काम या स्थितींत इञ्प्रत्ययामुळें आदिवृद्धि (७।२।११७) प्राप्त होते, आणि उकारामुळें मागील इकाराला यण् प्राप्त होतो. त्यांत पर असल्यामुळें वृद्धि होईल, पण अंतरंगाला प्राबल्य असल्यामुळें यणादेश होतो.

यणादेश हा अंतरंग असल्यामुळें द्वित्वापेक्षां पूर्वी झाल्याचें उदाहरणः— दुद्यूषति सुस्यूषति. दिव्धातूहून सन्प्रत्यय (३।१।७) व ऊठ् (६।४।१९) केल्यानंतर दि-ऊ-स या स्थितींत ऊकारामुळें मागील इकाराला यण् प्राप्त होतो. आणि सन्प्रत्ययामुळें दिशब्दाला द्वित्व (६।१।९) प्राप्त होतें. तेथें नित्यत्वास्तव पूर्वी द्वित्व होईल, पण अंतरंगत्वास्तव प्रथमतः यणादेश होतो.

अल्लोप आणि यणादेश यांची बरोबर प्राप्ति येण्यासारखें उदाहरणच नाहीं.

यणादेश हा अंतरंग असल्यामुळें स्वरापेक्षां पूर्वी होतो याचें उदाहरणः— द्यौकामिः स्यौकामिः. दि-उ-काम-इ या स्थितींत इञ्प्रत्ययामुळें पहिल्या इकाराला आद्युदात्त स्वर (६।१।१९७) प्राप्त होतो, आणि उकारामुळें मागील इकाराला यण् प्राप्त होतो. त्यांत परत्वास्तव अगोदर आद्युदात्त स्वर होईल, पण अंतरंगत्वास्तव यणादेश पूर्वी होतो.[४]

एकादेश हा अंतरंगत्वास्तव गुणापेक्षां पूर्वी

---

४. यण् झाल्यानंतर मागून आद्युदात्त स्वर होतो तो औकाराला होतो. दोन शास्त्रांपैकीं ज्या शास्त्राला उदाहरणांतील कमी भाग पुरतो तें शास्त्र अंतरंग होय, आणि ज्या शास्त्राला जास्त भाग लागतो

देशो भवत्यन्तरङ्गतः ॥ गुणादेकादेशः । काद्रवेयो मन्त्रमपश्यत् । गुणश्च प्राप्नोत्येकादेशश्च । परत्वाद्गुणः स्यात् । एकादेशो भवत्यन्तरङ्गतः ॥ वृद्धेरेकादेशः । वैक्षमाणिः सौत्थितिः । वृद्धिश्च प्राप्नोत्येकादेशश्च । परत्वाद्वृद्धिः स्यात् । एकादेशो भवत्यन्तरङ्गतः ॥ द्विर्वचनादेकादेशः । ज्ञाया ओदनो ज्ञौदनः । ज्ञोदनमिच्छति ज्ञौदनीयति । ज्ञौदनीयतेः सन् जुज्ञौदनीयिषति । द्विर्वचनं च प्राप्नोत्येकादेशश्च । नित्यत्वाद्द्विर्वचनं स्यात् । एकादेशो भवत्यन्तरङ्गतः ॥ अल्लोपादेकादेशः । शुना शुने । अल्लोपश्च प्राप्नोत्येकादेशश्च । परत्वादल्लोपः स्यात् । एकादेशो भवत्यन्तरङ्गतः ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । नास्त्यत्र विशेषोऽल्लोपेन वा निवृत्तौ सत्यां पूर्वत्वेन वा । अयमस्ति विशेषः । अल्लोपेन निवृत्तौ सत्यामुदात्तनिवृत्तिस्वरः प्रसज्येत । नात्रोदात्तनिवृत्तिस्वरः प्राप्नोति । किं कारणम् । न गोश्व-

---

होतो याचें उदाहरणः— काद्रवेयो मन्त्रमपश्यत्. कद्रुशब्दाहून ऊङ्प्रत्यय (४।१।७२), पुढें ढक्प्रत्यय (४।१।१२०), ढकाराला एयादेश (७।१।२) केल्यानंतर कद्रु-ऊ-एय असे असतां 'ढे लोपोऽकद्र्वाः' यानें उकारलोपाचा निषेध केला. अशा स्थितींत गुण (६।४।१४६) प्राप्त होतो, आणि उकार व ऊकार यांचा सवर्णदीर्घ एकादेश (६।१।१०१) प्राप्त होतो. त्यांत पर असल्यामुळें गुण होईल, पण अंतरंगत्वास्तव पूर्वी यणादेश होतो.

एकादेश हा अंतरंगत्वास्तव वृद्धीपेक्षां पूर्वी झाल्याचें उदाहरणः— वैक्षमाणिः, सौत्थितिः. वि+ईक्षमाण आणि सु+उत्थित याहून इञ्प्रत्यय (४।१।९५) झाला आहे; वि—ईक्षमाण-इ, सु-उत्थित-इ. अशा स्थितींत इञ्प्रत्ययामुळें आदिवृद्धि (७।२।११७) प्राप्त होते, आणि इकार व ईकार यांचा एकादेश (६।१।१०१) प्राप्त होतो. त्यांत परत्वास्तव प्रथमतः वृद्धि होईल, पण अंतरंग असल्यामुळें पूर्वी एकादेश होतो.

एकादेश हा अंतरंगत्वास्तव द्वित्वापेक्षां पूर्वी होतो; याचें उदाहरणः— ज्ञाशब्दाचा ओदनशब्दाशीं षष्ठीतत्पुरुष समास. पुढें इच्छा या अर्थी क्यच्प्रत्यय (३।१।८), त्याच्या पुढें सन्प्रत्यय (३।१।७), ईत्व (७।४।३३), इडागम (७।२।३५) झाला आहे. ज्ञा—ओदनीय-इ-स अशा स्थितींत सन्प्रत्ययामुळें ज्ञाशब्दाला द्वित्व (६।१।९) प्राप्त होतें व आकार आणि ओकार यांचा एकादेश (६।१।१०१) प्राप्त होतो. त्यांत नित्यत्वास्तव पूर्वी द्वित्व होईल, पण अंतरंग असल्यामुळें पूर्वी एकादेश होतो. तेव्हां जुज्ञौदनीयिषति असें रूप होतें.

एकादेश हा अंतरंगत्वास्तव अल्लोपापेक्षां पूर्वी होतो याचें उदाहरणः—शुना शुने. श्वन्-शब्दापुढें तृतीयैकवचन टाप्रत्यय व नकाराला संप्रसारण (६।१।१०८) झालें आहे. शु-अन्-आ अशा स्थितींत अल्लोप (६।४।१३४) प्राप्त होतो व उकार आणि अकार यांचा पूर्वरूप एकादेश (६।४।१३३) प्राप्त होतो. तेथें परत्वास्तव अल्लोप होईल, पण अंतरंग असल्यामुळें पूर्वी एकादेश होतो.

हा अंतरंगत्वाचा उपयोग होऊं शकत नाहीं. कारण लोपानें अकाराची निवृत्ति झाली काय आणि एकादेशानें निवृत्ति झाली काय यांत कांहीं फरक दिसत नाहीं.

फरक आहे. तो असाः— अल्लोपानें निवृत्ति झाली असतां पुढील विभक्तीला उदात्तनिवृत्तिस्वर (६।१।१६१) होऊं लागेल.

येथें उदात्तनिवृत्तिस्वर प्राप्त होऊं शकत नाहीं.

काय कारण ?

'न गोश्वन् साववर्ण०' (६।१।१८२) यानें

---

तें शास्त्र बहिरंग होय.

न्साववर्णे [ ६.१.१८२ ] इति प्रतिषेधात् । नैष उदात्तनिवृत्तिस्वरस्य प्रतिषेधः । कस्य तर्हि । तृतीयादिस्वरस्य । यत्र तर्हि तृतीयादिस्वरो नास्ति । शुनः पश्येति । एवं तर्हि न लाक्षणिकस्य प्रतिषेधं शिष्मः । किं तर्हि । येन केनचिल्लक्षणेन प्राप्तस्य विभक्तिस्वरस्य प्रतिषेधः । यत्र तर्हि विभक्तिर्नास्ति । बहुशुनीति । यदि पुनरयमुदात्तनिवृत्तिस्वरस्यापि प्रतिषेधो विज्ञायेत । नैवं शक्यम् । इहापि प्रसज्येत । कुमारीति । एवं तर्ह्याचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति नोदात्तनिवृत्तिस्वरः शुन्यवतरतीति यदयं श्वन्शब्दं गौरादिषु पठति । अन्तोदात्तार्थं यत्नं करोति । सिद्धं हि स्यान्ङीपैव ॥ स्वरादेकादेशः । सौत्थितिः वैक्षमाणिः । स्वरश्च प्राप्नोत्येकादेशश्च । परत्वात्स्वरः स्यात् । एकादेशो भवत्यन्तरङ्गतः ॥ गुणस्य चे-

त्या स्वराचा निषेध केला आहे.

'न गोश्वन्' हा उदात्तनिवृत्तिस्वराचा प्रतिषेध नव्हे.

तर मग कुणाचा ?

'सावेकाचः'(६।१।१६८)यानें सांगितलेल्या तृतीयादिस्वराचा. शिवाय[5] जेथें तृतीयादिस्वराची प्राप्तिच नसल्यामुळें निषेधाचें नांवच काढतां येत नाहीं, उदा० शुनः पश्य, तेथें अल्लोपानें निवृत्ति झाली असतां उदात्त, निवृत्तिस्वर होण्याची पाळी येणारच.

असें आहे तर 'न गोश्वन्' हा निषेध तृतीयादि स्वरांचाच आहे असें आम्ही म्हणत नाहीं.

तर मग काय म्हणतां ?

कोणत्याही सूत्रानें प्राप्त झालेल्या मोघम[6] विभक्तिस्वराचा निषेध आहे असें म्हणतों.

तर मग जेथें विभक्तिच नाहीं, उदा० बहुशुनी नगरी[7].

आतां जर बहुशुनी इत्यादि उदाहरणांमधील उदात्तनिर्वृत्तिस्वराचाही 'न गोश्वन्' हा निषेध समजण्यांत येईल तर तेथेंही अल्लोप आणि एकादेश या दोहोंमध्यें फरक येणार नाहीं.

पण तसें समजणें शक्य नाहीं. कारण कुमारी[9] येथेंही उदात्तनिवृत्तिस्वराचा निषेध होऊं लागेल.

असें आहे तर श्वन्‌शब्दाच्या ठिकाणीं उदात्तनिवृत्तिस्वर येत नाहीं, असें आचार्यांचा व्यवहारच सुचवीत आहे, ज्यापेक्षां हा आचार्य शुनीशब्द अन्तोदात्त व्हावा यासाठीं गौरादि (४।१।४१) गणामध्यें श्वन्‌शब्दाचा पाठ करीत आहे. नाहीं तर नान्तत्वास्तव ङीप्‌प्रत्यय (४।१।) करून संप्रसारण व अल्लोप केल्यामुळें उदात्तनिवृत्तिस्वरानेंच अन्तोदात्त स्वर साधेल.

एकादेश हा अंतरंगत्वास्तव स्वरापेक्षां पूर्वी झाल्याचें उदा०:—सौत्थितिः, वैक्षमाणिः, सु-उत्थित-इ, आणि वि-ईक्षमाण-इ या स्थितींत आद्युदात्त स्वर (६।१।१९७) प्राप्त होतो. आणि दोन उकारांचा व दोन इकारांचा एकादेशही प्राप्त होतो. तेथें परत्वास्तव आद्युदात्त स्वर होईल, पण अंतरंग असल्यामुळें

५. मूळ भाष्यामध्यें 'यत्र तर्हि' असे शब्द आहेत तेथें तर्हिशब्द चकारार्थी घातला आहे. (वि.)

६. 'न गोश्वन्' येथें 'तृतीयादिः' या पदाची अनुवृत्ति नसून फक्त 'विभक्तिः' याच पदाची अनुवृत्ति आहे. तेव्हां कोणत्याही सूत्रानें कोणत्याहि विभक्तीला प्राप्त झालेल्या स्वराचा हा निषेध आहे. तेव्हां शुनः येथें उदात्तनिवृत्तिस्वराचाही निषेध होईल.

७. येथें अकाराची निवृत्ति एकादेशानें न होतां लोपानें झाली तर उदात्तनिवृत्तिस्वर होऊं लागेल.

८. 'न गोश्वन्' येथें 'विभक्तिः' या पदाचीही अनुवृत्ति नाहीं, असा अभिप्राय आहे.

९. कुमार हें सु पुढें असतांना अवर्णान्त आहे म्हणून 'न गोश्वन्' याची प्राप्ति येते.

स्त्वोत्त्वयोश्च नास्ति संप्रधारणा ॥ वृद्धेरित्त्वोत्त्वे । स्तैर्णिः पौर्तिः । वृद्धिश्च प्राप्नोतीत्त्वोत्त्वे च । परत्वाद्वृद्धिः स्यात् । इत्त्वोत्त्वे भवतोऽन्तरङ्गतः ॥ द्विर्वचनादित्त्वोत्त्वे । आतेस्तीर्यते आपोपूर्यते । द्विर्वचनं च प्राप्नोतीत्त्वोत्त्वे च । नित्यत्वाद्द्विर्वचनं स्यात् । इत्त्वोत्त्वे भवतोऽन्तरङ्गतः ॥ अल्लोपस्य चेत्त्वोत्त्वयोश्च नास्ति संप्रधारणा । स्वरे नास्ति विशेषः ॥

**इण्ङ्शीनामाद्गुणः सवर्णदीर्घत्वात् ॥ १० ॥**

इण्ङ्शीनामाद्गुणः सवर्णदीर्घत्वात्प्रयोजनम् । अयज इन्द्रम् अवप इन्द्रम् । वृक्ष इन्द्रम् प्लक्ष इन्द्रम् । य इन्द्रम् त इन्द्रम् । आद्गुणश्च प्राप्नोति सवर्णदीर्घत्वं च । परत्वात्सवर्णदीर्घत्वं स्यात् । आद्गुणो भवत्यन्तरङ्गतः ॥

**न वा सवर्णदीर्घत्वस्यानवकाशत्वात् ॥ ११ ॥**

न वैतदन्तरङ्गेणापि सिध्यति । किं

---

एकादेश होतो.

गुण आणि इत्त्व उत्त्व यांची बरोबर प्राप्ति येण्यासारखें उदाहरणच नाहीं.

इत्त्व किंवा उत्त्व हें अंतरंगत्वास्तव वृद्धीपेक्षां पूर्वी होतें याचें उदाहरणः—स्तैर्णिः, पौर्णिः. स्तॄ आणि पॄ या धातूंहून क्तप्रत्यय (३।२।१०२) व पुढें इञ्प्रत्यय (४।१।९५) झाला आहे. स्तॄ- त- इ व पॄ-त-इ या स्थितींत इञ्प्रत्ययामुळें आदिवृद्धि (७।१।११७) प्राप्त होते, आणि क्तप्रत्ययामुळें क्रमानें इत्त्व (७।१।१००) आणि उत्त्व (७।२।१०२) प्राप्त होतात. तेथें परत्वास्तव आदिवृद्धि प्रथम होईल, पण अंतरंग असल्यामुळें इत्त्व आणि उत्त्व प्रथमतः होतात.

इत्त्व किंवा उत्त्व हें अंतरंगत्वास्तव द्वित्वापेक्षां पूर्वी होतें याचें उदाहरणः—आतेस्तीर्यते, आपोपूर्यते. आ—उपसर्गापुढील स्तॄ आणि पॄ या धातूंहून यङ्प्रत्यय (३।१।२२) झाला आहे. आस्तॄ-य व आपॄ-य या स्थितींत यङ्प्रत्ययामुळें द्वित्व (६।१।९) प्राप्त होतें, आणि यङ्प्रत्ययामुळें इत्त्व किंवा उत्त्व हेंही प्राप्त होतें. तेथें नित्यत्वास्तव पूर्वी द्वित्व होईल, पण अंतरंग असल्यामुळें इत्त्व किंवा उत्त्व पूर्वी होतें.

अल्लोप आणि इत्त्व किंवा उत्त्व यांची बरोबर प्राप्ति येण्यासारखें उदाहरण नाहीं. तसेंच इत्त्व किंवा उत्त्व यांच्या अगोदर स्वर केला काय आणि तें झाल्यानंतर मग झाला काय यांत कांहीं फरकच होत नाहीं.

(वा.१०) आत्मनेपद उत्तमपुरुषैकवचन इट् (३।४।७८), सप्तम्येकवचन ङि (४।१।२) आणि शी (७।१।१७–१९) यांचे स्थानीं होणारा गुण (६।१।८७) हा सवर्णदीर्घा—(६।१।०१)पेक्षां अंतरंगत्वास्तव पूर्वी होतो. हा 'अन्तरङ्गं च' (वा.८) या वचनाचा उपयोग होय; जसें— अयज-इ-इन्द्रम्, वृक्ष-इ-इन्द्रम्, सर्वे-ई-इन्द्रम्. येथें इकाराचा मागील अकाराबरोबर एकादेशगुण प्राप्त होतो आणि त्याच इकाराचा पुढील इकाराबरोबर सवर्णदीर्घ प्राप्त होतो. तेथें परत्वास्तव सवर्णदीर्घ पूर्वी होईल, पण अंतरंग असल्यामुळें गुण पूर्वी होतो.

(वा.११) 'अन्तरङ्गं च' हें वचन घेतलें तरी देखील हें उदाहरण साधत नाहीं.

---

१०. यज्धातूचें लङ्प्रत्ययाचें उत्तमपुरुषीं एकवचनीं अयते असें क्रियापद होतें. वृक्षे हें वृक्षशब्दाचें सप्तमीचें एकवचन आहे. सर्वे हें सर्वशब्दाचें प्रथमाबहुवचन आहे. या तिन्ही ठिकाणीं प्रत्ययाच्या इकाराशीं मागील अकाराचा एकादेश गुण झाला आहे. त्याच वेळीं पुढें लावलेल्या इन्द्रशब्दाच्या इकाराबरोबर सवर्णदीर्घ प्राप्त होत आहे.

कारणम् । सवर्णदीर्घत्वस्यानवकाशत्वात् । अनवकाशं सवर्णदीर्घत्वमाद्गुणं बाधेत ॥ नैतदन्तरङ्गेऽस्त्यनवकाशं परमिति । इहापि स्योनः स्योनेति शक्यं वक्तुं न वा परत्वाद्गुणस्येति ॥

ऊङापोरेकादेश ईत्वलोपाभ्याम् ॥ १२ ॥

ऊङापोरेकादेश ईत्वलोपाभ्यां भवत्यन्तरङ्गतः प्रयोजनम् ॥ ईत्वादेकादेशः । खट्वीयति मालीयति । ईत्वं च प्राप्नोत्येकादेशश्च । परत्वादीत्वं स्यात् । एकादेशो भवत्यन्तरङ्गतः ॥ लोपादेकादेशः । कामण्डलेयः भाद्रबाहेयः । लोपश्च प्राप्नोत्येकादेशश्च । परत्वाल्लोपः स्यात् । एकादेशो भवत्यन्तरङ्गतः ॥ अथ किमर्थमीत्वलोपाभ्यामित्युच्यते न लोपेत्वाभ्यामित्येवोच्येत । संख्यातानुदेशो मा भूदिति । आपोऽप्येकादेशो लोपे प्रयो-

---

काय कारण ?

सवर्णदीर्घ हा अनवकाश[११] आहे म्हणून. तेव्हां अनवकाश असलेला सवर्णदीर्घ 'आद्गुणः' याचा बाध करील.

अन्तरङ्गाचा[१२] अनवकाश किंवा पर अशाकडून बाध होत नसतो. नाहीं तर स्योनः स्योना येथेंही असें बोलतां येईल की 'अन्तरङ्गं च' या वचनानें सिद्धि होणार नाहीं. कारण लघूपधगुण हा यणादेशापेक्षां पर आहे.

(वा.१२) ऊङ् आणि आप् यांचा एकादेश अंतरंगत्वास्तव ईत्व व लोप यांपेक्षां प्रथमतः होतो हाही 'अन्तरङ्गं च' या वचनाचा उपयोग आहे. एकादेश हा अंतरंगत्वास्तव ईत्वापेक्षां पूर्वी होतो याचें उदाहरणः– खट्वीयति मालीयति. खट्वशब्दाहून टाप्प्रत्यय (४।१।४) त्याच्या पुढें क्यच्प्रत्यय (३।१।८) झाला आहे. खट्व-आ-य या स्थितींत क्यच्प्रत्ययामुळें आकाराला ईत्व (७।४।३३) प्राप्त होतें आणि अकार व आकार यांचा एकादेश सवर्णदीर्घ प्राप्त होतो. तेथें परत्वास्तव ईत्व अगोदर होऊं लागेल, पण अंतरंग असल्यामुळें एकादेश पूर्वी होतो.

एकादेश हा अन्तरङ्गत्वास्तव लोपापेक्षां पूर्वी होतो याचें उदाहरणः— कामण्डलेयः, भाद्रबाहेयः. कमण्डलु आणि भद्रबाहु या शब्दांहून ऊङ्प्रत्यय (४।१।७१।६७), त्याच्या पुढें ढक्प्रत्यय (४।१।२०) व एय्आदेश (७।१।२) झाला आहे. कमण्डलु-ऊ-एय या स्थितींत ढे लोपोऽकद्र्वाः' (७।४।४७) यानें ऊकाराचा लोप प्राप्त होतो आणि उकार व ऊकार यांचा एकादेश सवर्णदीर्घ प्राप्त होतो. त्यांत परत्वास्तव लोप होईल, पण अंतरंगत्वास्तव एकादेश पूर्वी होतो.

आतां 'ऊङापोरेका' या वार्तिकामध्यें 'ईत्वलोपाभ्याम्' अशा क्रमानेंच कां बरें उच्चारलें आहे ? तसें न उच्चारतां लोपेत्वाभ्याम् असें उच्चारावें.

यथासंख्यानें अन्वय न व्हावा यासाठीं 'ईत्वलोपाभ्याम्' असा निर्देश केला[१३] आहे.

आप्प्रत्ययाचाही एकादेश लोपापेक्षां अंत-

---

११. दैत्य+अरिः अशा अकाराच्या उदाहरणामध्यें आद्गुणः याची प्राप्ति आहे. आणि श्री+ईशः अशा इकार वगैरेंच्या उदाहरणांमध्यें 'इको यणचि' याची प्राप्ति आहे. म्हणून सवर्णदीर्घ हा अनवकाश असल्यामुळें त्या दोघांचाही बाधक आहे.

१२. दैत्य+अरिः इत्यादि उदाहरणांमध्यें प्राप्त झालेला गुण आणि श्री+ईशः इत्यादि ठिकाणीं प्राप्त झालेला यण् सवर्णदीर्घापेक्षां अंतरंग नाहीं, म्हणून त्याचा अनवकाश अशा सवर्णदीर्घानें बाध झाला तो बरोबरच आहे.

१३. ईत्वलोपाभ्याम् या निर्देशाच्या वेळीं यथासंख्यानें अन्वय संभवत नाहीं. कारण ऊङ्चा एकादेश ईत्वापेक्षां अंतरंगत्वास्तव होतो असें उदाहरणच मिळत नाहीं.

जयति। चौडिः बालाकिः ॥

**आत्त्वनपुंसकोपसर्जनह्रस्वत्वान्ययवायावेकादेशतुग्विधिभ्यः ॥ १३ ॥**

आत्त्वनपुंसकोपसर्जनह्रस्वत्वान्ययवायावेकादेशतुग्विधिभ्यो भवन्त्यन्तरङ्गतः ॥ वेञ् वानीयम्। शो शानीयम्। ग्लै ग्लानीयम्। म्लै म्लानीयम्। ग्लाच्छत्रम् म्लाच्छत्रम्। आत्त्वं च प्राप्नोत्येते च विधयः। परत्वादेते विधयः स्युः। आत्त्वं भवत्यन्तरङ्गतः॥ नपुंसकोपसर्जनह्रस्वत्वं च प्रयोजनम्। अतिर्यत्र अतिन्वत्र। अतिरिच्छत्त्रम् अतिनुच्छत्त्रम्। आराशस्त्रीदम् धानाशष्कुलीदम्। निष्कौशाम्बीदम् निर्वाराणसीदम्। निष्कौशाम्बिच्छत्त्रम् निर्वाराणासिच्छत्त्रम्। नपुंसकोपसर्जनह्रस्वत्वं च प्राप्नोत्येते च विधयः। परत्वादेते विधयः स्युः। नपुंकोपसर्जनह्रस्वत्वं भवत्यन्तरङ्गतः॥

**तुग्यणेकादेशगुणवृद्ध्यौत्त्वदीर्घत्वेत्वमुमेत्त्वरीविधिभ्यः ॥ १४ ॥**

यणेकादेशगुणवृद्धयौत्त्वदीर्घत्वेत्वमुमेत्त्वरीविधिभ्यस्तुग्भवत्यन्तरङ्गतः ॥ यणा-

---

रंगत्वास्तव पूर्वी होतो याला उदाहरण आहे; जसें– चौडिः,[१४] बालाकिः.

(वा.१३) अय् अव्, आय् आव्, एकादेश आणि तुग्विधि यांपेक्षां अंतरंगत्वास्तव आत्त्व, नपुंसकह्रस्व आणि उपसर्जनह्रस्व हे विधि पूर्वी होतात. हाही 'अन्तरङ्गं च' या वचनाचा उपयोग आहे; जसें– 'वेञ् वानीयम्, शो-शानीयम्, ग्लै-ग्लानीयम्, म्लै-म्लानीयम्, ग्लाछत्रं, म्लाछत्रम्. वे–अनीय शो–अनीय या स्थितींत 'आदेश उपदेशे' (६।१।४५) यानें एजन्त धातूला आत्त्व प्राप्त होतें, व अय् अव् आणि आय् (६।१।७८) हेही विधि प्राप्त होतात. तसेंच ग्लै, म्लै या धातूंहून क्विप् (३।२।७६) करून पुढें त्याचा छत्रशब्दाबरोबर षष्ठीतत्पुरुष केला असतां तेथें आत्त्व प्राप्त होते आणि तुग्विधिही (६।१।७६) प्राप्त होतो. त्यांत परत्वास्तव अय् अव् इत्यादिक विधि होतील, पण अंतरंग असल्यामुळें आत्त्व पूर्वी होतें. नपुंसकह्रस्व (१।२।४७) आणि उपसर्जनह्रस्व (१।२।४८) हेही अंतरंगत्वास्तव पूर्वी होतात; जसें–[१५] 'अतिर्यत्र, अतिन्वत्र, अतिरिच्छत्रम्, अतिनुच्छत्रम्, आराशस्त्रीदम्, धानाशष्कुलीदम्, निष्कौशाम्बीदम्, निर्वाराणसीदम्, निष्कौशाम्बिच्छत्रम्, निर्वाराणसिच्छत्रम्, येथें आय् आव् हे एकादेश आणि तुक् हे विधि प्राप्तहोतात, व तेच विधि परत्वास्तव होतील; पण अंतरंगत्वास्तव नपुंसकह्रस्व व उपसर्जनह्रस्व होतो.

(वा.१४) यण्, एकादेश, गुण, वृद्धि, औत्त्व, दीर्घ, ईत्व, मुम्, एत्त्व आणि री, या विधींपेक्षां अंतरंगत्वास्तव तुक् पूर्वी होतो हाही 'अन्तरङ्गं च' या वचनाचा उपयोग आहे. अग्निचित्[१६]दत्र, सोमसुदत्र, येथें परत्वास्तव यणा-

---

१४. चूडशब्दाहून टाप्प्रत्यय, पुढें इञ्प्रत्यय (४।१।९५) झाला आहे. 'चूड-आ-इ अशा स्थितींत लोप (६।४।१४८) आणि एकादेश (६।१।१०१) प्राप्त होतो. तेथें परत्वास्तव लोप अगोदर होईल, पण अंतरंगत्वास्तव एकादेश अगोदर होतो.

१५. अतिशब्दाचा रै आणि नौ या शब्दांबरोबर द्वितीयातत्पुरुष (२।२।१८ वा. ४) करून पुढें अत्रशब्द किंवा छत्रशब्द जोडला आहे. तसेंच आरा व शस्त्री आणि धाना व शष्कुली यांचा समाहारद्वंद्व (२।२।२९) करून पुढें इदंशब्द जोडला आहे. तसेंच निर्‌शब्दाचा कौशाम्बी आणि वाराणसी या शब्दांबरोबर पंचमीतत्पुरुष (२।२।१८ वा.४) करून पुढें इदंशब्द आणि छत्रशब्द जोडला आहे.

१६. अग्निशब्द उपपद असतांना चिधातूहून क्विप्प्रत्यय (३।२।९१) केला आहे. पुढें अत्रशब्द जोडल्यामुळें यण् प्राप्त होतो. सोमसुत् येथें सु-धातूहून क्विप्प्रत्यय (३।२।९०) केला आहे.

देशात् । अग्निचिदत्र सोमसुदत्र ॥ एकादेशात् । अग्निचिदिदम् सोमसुदुदकम् ॥ गुणात् । अग्निचिते सोमसुते ॥ वृद्धेः । प्र ऋच्छकः प्राच्छर्कः ॥ औत्त्वात् । अग्निचिति सोमसुति ॥ दीर्घत्वात् । जगद्भ्याम् जनगद्भ्याम् ॥ ईत्वात् । जगत्यति जनगत्यति ॥ मुमः । अग्निचिन्मन्यः सोमसुन्मन्यः ॥ एत्वात् । जगद्भ्यः जनगद्भ्यः ॥ रीविधेः । सुकृत्यति पापकृत्यति ॥

अनङानङ्भ्यां चेति वक्तव्यम् । सुकृत् । सुकृद्दुष्कृतौ ॥

तुक्च प्राप्नोत्येते च विधयः । परत्वादेते विधयः स्युः । तुग्भवत्यन्तरङ्गतः ॥

**इयङादेशो गुणात् ॥ १९ ॥**

इयङादेशो गुणाद्भवत्यन्तरङ्गतः प्रयोजनम् । धियति रियति । इयङादेशश्च प्राप्नोति गुणश्च । परत्वाद्गुणः स्यात् । इयङादेशो भवत्यन्तरङ्गतः ॥

उवङादेशश्चेति वक्तव्यम् । प्रादुद्रुवत्

---

देश होईल, पण अंतरंगत्वास्तव तुगागम (६।१।७१) होतो.

अग्निचिदिदम्, सोमसुदुदकम् येथें परत्वास्तव सवर्ण दीर्घ होईल, परंतु अन्तरङ्गत्वास्तव तुगागम होतो.

अग्निचिते, सोमसुते येथें परत्वास्तव गुण (७।३।१११) होईल, पण अंतरंगत्वास्तव पूर्वी तुक् होतो.

प्र ऋच्छकः प्राच्छर्कः येथें परत्वास्तव वृद्धि (६।१।९१) होईल, पण अंतरंगत्वास्तव तुक् (६।१।७३) पूर्वी होतो.

अग्निचिति, सोमसुति येथें परत्वास्तव औत्त्व (७।३।११९) होईल, पण अंतरंगत्वास्तव तुक् पूर्वी होतो.

जगद्भ्यां[17], जनगद्भ्यां येथें परत्वास्तव दीर्घ (७।३।१०२) होईल, पण अंतरंगत्वास्तव तुक् पूर्वी होतो.

जगत्यति, जनगत्यति येथें परत्वास्तव ईत्व (७।४।३३) होईल, पण अंतरंगत्वास्तव तुक् पूर्वी होतो.

अग्निचिन्मन्यः, सोमसुन्मन्यः येथें परत्वास्तव मुमागम (६।३।६७) होईल, पण अंतरंगत्वास्तव तुक् पूर्वी होतो.

जगद्भ्यः, जनगद्भ्यः येथें परत्वास्तव एत्व (६।३।१०३) होईल, पण अंतरंगत्वास्तव पूर्वी तुक् होतो.

सुकृत्यति[18], पापकृत्यति येथें परत्वास्तव रीआदेश (७।४।२७) होईल, पण अंतरंगत्वास्तव तुगागम पूर्वी होतो.

अनङ् आणि आनङ् या आदेशांपेक्षां तुक् पूर्वी होतो असें म्हणावें. सुकृत्:– पदसंस्कारपक्षीं सुकृ–स् (प्रथमैकवचन) या स्थितींत तुक् प्राप्त होतो आणि अनङ् (७।१।९४) प्राप्त होतो. तेथें परत्वास्तव अनङादेश होईल, पण अंतरंगत्वास्तव तुक् पूर्वी होतो.

सुकृद्दुष्कृतौ येथें परत्वास्तव आनङ् (६।३।२५) होईल, पण अंतरंगत्वास्तव तुक् पूर्वी होतो.

(वा.१९) इयङादेश हा अंतरंगत्वास्तव गुणापेक्षां पूर्वी होतो हाही 'अन्तरङ्गं च' या वचनाचा उपयोग आहे धियति[19], रियति.

उवङादेशही अंतरंगत्वास्तव गुणापेक्षां

---

१७. गम्धातूहून क्विप्प्रत्यय व द्वित्व (३।२।१७८ वा.३) आणि मकाराचा लोप (६।४।४०) झाला आहे. जनगद्भ्याम् येथें जनशब्द उपपद असतांना गम्धातूहून क्विप्प्रत्यय (३।२।७६) झाला आहे.

१८. सु आणि पाप या शब्दांपुढील कृधातूहून क्विप्प्रत्यय (३।२।८९) आणि पुढें क्यच्प्रत्यय (३।१।८) झाला आहे.

१९. धि आणि रि या धातूंहून लट् (३।२।१२३), तिप् (३।४।७८) आणि श (३।१।७७) हे प्रत्यय झाले आहेत. धि-अ-ति या स्थितींत इयङ् (६।४।७७) आणि गुण (७।३।८६) प्राप्त होतात.

प्रासुस्रुवत् ॥

**श्वेः संप्रसारणपूर्वत्वं यणादेशात् ॥ १६ ॥**

श्वेः संप्रसारणपूर्वत्वं यणादेशाद्भवत्यन्तरङ्गतः प्रयोजनम् । शुशुवतुः शुशुवुः । पूर्वत्वं च प्राप्नोति यणादेशश्च । परत्वाद्यणादेशः स्यात् । पूर्वत्वं भवत्यन्तरङ्गतः ॥

**ह्व आकारलोपात् ॥ १७ ॥**

ह्व आकारलोपात्पूर्वत्वं भवत्यन्तरङ्गतः प्रयोजनम् । जुहुवतुः जुहुवुः । पूर्वत्वं च प्राप्नोत्याकारलोपश्च । परत्वादाकारलोपः स्यात् । पूर्वत्वं भवत्यन्तरङ्गतः ॥

**स्वरो लोपात् ॥ १८ ॥**

स्वरो लोपाद्भवत्यन्तरङ्गतः प्रयोजनम् । औपगवी सौदामनी । स्वरश्च प्राप्नोति लोपश्च । परत्वाल्लोपः स्यात् । स्वरो भवत्यन्तरङ्गतः ॥

**प्रत्ययविधिरेकादेशात् ॥ १९ ॥**

प्रत्ययविधिरेकादेशाद्भवत्यन्तरङ्गतः प्रयोजनम् । अग्निरिन्द्रः । वायुरुदकम् । प्रत्ययविधिश्च प्राप्नोत्येकादेशश्च । परत्वादेकादेशः स्यात् । प्रत्ययविधिर्भवत्यन्तरङ्गतः ॥

यणादेशाच्चेति वक्तव्यम् । अग्निरत्र । वायुरत्र ॥

---

पूर्वी होतोः प्रौदुद्रुवत्[२०], प्रासुस्रुवत्.

(वा.१६) श्विधातूपासून साधलेल्या उदाहरणांमध्यें 'संप्रसारणाच्च' (६।१।१०८) यानें सांगितलेलें पूर्वरूप यणादेशापेक्षां अंतरंगत्वास्तव पूर्वी होतें: शुशुवतुः शुशुवुः. शु[२१]-इ-अतुस् या स्थितींत उकार व इकार यांचे स्थानीं पूर्वरूप आणि इकाराला 'एरनेकाचः०' (६।४।८२) यानें यण् प्राप्त होतो. तेथें परत्वास्तव यणादेश होईल, पण अंतरंगत्वास्तव पूर्वरूप पूर्वी होतें.

(वा.१७) ह्वा-धातूंतील आकाराच्या लोपापेक्षां अंतरंगत्वास्तव पूर्वरूप पूर्वी होतें: जुहुवतुः जुहुवुः. हु-आ-अतुस्[२२] या स्थितींत उकार व आकार यांचे स्थानीं पूर्वरूप आणि अतुस्-प्रत्ययामुळें मागील आकाराचा लोप (६।४।६४) प्राप्त होतो. तेथें परत्वास्तव आकारलोप होईल, पण अंतरंगत्वास्तव पूर्वरूप अगोदर होतें.

(१८) लोपापेक्षां अंतरंगत्वास्तव पूर्वी स्वर होतोः औपगवी, सौदामनी. येथें अण्प्रत्ययाला[२३] आद्युदात्तस्वर (३।१।३) आणि त्याचा लोप (६।४।१४८) प्राप्त होतो. त्यांमध्यें परत्वास्तव लोप होईल, पण अंतरंगत्वास्तव स्वर पूर्वी होतो.

(वा.१९) प्रत्ययविधि हा एकादेशापेक्षां अंतरंगत्वास्तव पूर्वी होतोः अग्निरिन्द्रः, वायुरुदकम्. येथें अग्नि आणि उदक या शब्दांपुढें सुप्रत्यय (४।१।२) प्राप्त होतो व पुढील इन्द्र आणि उदक या शब्दांतील इकार व उकार यांच्याबरोबर एकादेश प्राप्त होतो. त्यांत परत्वास्तव एकादेश होईल, पण अंतरंगत्वास्तव प्रत्यय पूर्वी होतो.

यणादेशापेक्षांही अंतरंगत्वास्तव प्रत्यय

---

२०. द्रु आणि स्रु या धातूंहून लुङ् (३।२।११०), तिप् (३।४।७८), इकाराचा लोप (३।४।१००), च्लि (३।१।४३), चङ् (३।१।४८), द्वित्व (६।१।११), अडागम (६।४।७१) झाला आहे. प्र-अदुद्रु-अत् या स्थितींत उवङ् (६।४।७७) आणि गुण (७।३।८६) प्राप्त होतात.

२१. श्विधातूहून लिट् (३।२।११५), तस् (३।४।७८), अतुस् (३।४।८२) व संप्रसारण (६।१।३०) होऊन ही स्थिति झाली आहे.

२२. ह्वेञ्धातूला आत्व (६।१।४५), लिट्, तस्, अतुस् व संप्रसारण (६।१।१५) झालें आहे.

२३. उपगुशब्दाहून अण्प्रत्यय (४।१।९२) आणि सुदामन्शब्दाहून अण्प्रत्यय (४।३।११२) करून त्यापुढें ङीप् (४।१।१५) केला आहे.

## लादेशो वर्णविधेः ॥ २० ॥

लादेशो वर्णविधेर्भवत्यन्तरङ्गतः प्रयोजनम् । पचत्वत्र । पठत्वत्र । लादेशश्च प्राप्नोति यणादेशश्च । परत्वाद्यणादेशः स्यात् । लादेशो भवत्यन्तरङ्गतः ॥

## तत्पुरुषान्तोदात्तत्वं पूर्वपदप्रकृतिस्वरात् ॥ २१ ॥

तत्पुरुषान्तोदात्तत्वं पूर्वपदप्रकृतिस्वराद्भवत्यन्तरङ्गतः प्रयोजनम् । पूर्वशालाप्रियः अपरशालाप्रियः । तत्पुरुषान्तोदात्तत्वं च प्राप्नोति पूर्वपदप्रकृतिस्वरत्वं च । परत्वात्पूर्वपदप्रकृतिस्वरत्वं स्यात् । तत्पुरुषान्तोदात्तत्वं भवत्यन्तरङ्गतः ॥

एतान्यस्याः परिभाषायाः प्रयोजनानि यदर्थमेषा परिभाषा कर्तव्या ॥ यदि सन्ति प्रयोजनानीत्येषा परिभाषा क्रियते ननु चेयमपि कर्तव्यासिद्धं बहिरङ्गलक्षणमन्तरङ्गलक्षण इति । किं प्रयोजनम् । पचावेदम् । पचामेदम् । असिद्धत्वाद्बहिरङ्गलक्षणस्य गुणस्यान्तरङ्गलक्षणमैत्वं मा भूदिति । उभे तर्हि कर्तव्ये । नेत्याह । अनयैव सिद्धम् । इहापि स्योनः स्योनेत्यसिद्धत्वाद्बहिरङ्गलक्षणस्य गुणस्यान्तरङ्गलक्षणो यणादेशो भविष्यति ॥ यद्यसिद्धं बहिरङ्गलक्षणमन्तरङ्गलक्षण इत्युच्यतेऽक्षद्यूः हिरण्यद्यूः असिद्धत्वाद्बहिरङ्ग-

---

पूर्वी होतोः अग्निरत्र, वायुरत्र.

(वा. २०) वर्णविधीपेक्षां अंतरंगत्वास्तव लादेश पूर्वी होतो : पचत्वत्र पठत्वत्र. येथें लादेश म्हणजे लोट्प्रत्ययाचे स्थानीं झालेल्या तिप्रत्ययांतील इकाराला उकार (३।४।८६) प्राप्त होतो आणि त्यालाच यण् प्राप्त होतो. त्यांत परत्वास्तव यण् होईल, पण अंतरंगत्वास्तव लादेश पूर्वी होतो.

(२१) पूर्वपदप्रकृतिस्वरापेक्षां अंतरंगत्वास्तव तत्पुरुषान्तोदात्तस्वर होतोः पूर्वशालाप्रियः, अपरशालाप्रियः— पूर्वा शाला प्रिया यस्य या त्रिपदबहुव्रीहिसमासामुळें 'बहुव्रीहौ प्रकृत्या' (६।२।१) यानें पूर्वपदाला प्रकृतिस्वर प्राप्त होतो आणि 'पूर्वशाला' या अवान्तर तत्पुरुषाला (२।१।५१) अन्तोदात्तस्वर (६।१।२२३) प्राप्त होतो. तेथें परत्वास्तव पूर्वपदप्रकृतिस्वर होईल, पण अंतरंगत्वास्तव तत्पुरुषसमासप्रयुक्त अंतोदात्त स्वर होतो.

'अन्तरङ्गं बलीयः' या परिभाषेचीं हीं सर्व प्रयोजनें आहेतच, की ज्यांसाठीं ही परिभाषा केलीच पाहिजे.

उपयोग आहे म्हणून जर 'अन्तरङ्गं बलीयः' ही परिभाषा करावी लागत आहे तर 'असिद्धं बहिरङ्गलक्षणमन्तरङ्गलक्षणे' म्हणजे अंतरंगशास्त्र कर्तव्य असतांना बहिरंगशास्त्र असिद्ध होतें, हीही परिभाषा केली पाहिजे.

काय उपयोग ?

पचावेदम् पचामेदम्[२४] येथें बहिरंग अशा गुणाला अंतरंग असें ऐत्व न झालें पाहिजे.

तर मग ह्या दोन्ही परिभाषा केल्या पाहिजेत असें दिसतें.

'अन्तरङ्गं बलीयः' ही परिभाषा करावयास नको. 'असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे' या परिभाषेनेंच सर्वत्र निर्वाह होत आहे. असें पहा की स्योनः स्योना येथेंही बहिरंग लघूपधगुण असिद्ध असल्यामुळें अंतरंग यणादेशच होईल.

पण जर 'असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे' असें म्हटलें तर अक्षद्यूः[२५], हिरण्यद्यूः, येथें बहिरंग ऊठ्

---

२४. पचाव-इदम् या दोन पदांचा संधि (६।१।८७) गुण झाला आहे तो दोन पदांवर अवलंबून असल्यामुळें बहिरंग आहे. आणि तो झाल्यानंतर त्या एकाराला प्राप्त होणारें ऐत्व (३।४।९३) हें एकाच पदावर अवलंबून असल्यामुळें अंतरंग आहे.

२५. अक्ष व हिरण्य हे शब्द उपपद असतांना दिव् धातूहून क्विप्प्रत्यय (३।२।७६) दिव् धातूच्या वकाराला ऊठ् (६।४।१९) आदेश झाला आहे. तो

लक्षणस्योठोऽन्तरङ्गलक्षणो यणादेशो न प्राप्नोति। नैष दोषः। असिद्धं बहिरङ्गलक्षणमन्तरङ्गलक्षण इत्युक्त्वा ततो वक्ष्यामि नाजानन्तर्ये बहिष्ट्वप्रक्लृप्तिरिति। सा तर्ह्येषा परिभाषा कर्तव्या। न कर्तव्या। आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति भवत्येषा परिभाषेति यदयं षत्वतुकोरसिद्धः[६.१.८६]इत्याह। इयं तर्हि परिभाषा कर्तव्यासिद्धं बहिरङ्गलक्षणमन्तरङ्गलक्षण इति। एषा च न कर्तव्या। आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति भवत्येषा परिभाषेति यदयं वाह ऊठ् [६.४.१३२] इत्यूठं शास्ति॥

**तस्य दोषः पूर्वपदोत्तरपदयोर्वृद्धिस्वरावेकादेशात्॥ २२॥**

तस्यैतस्य लक्षणस्य दोषः पूर्वोत्तरपदयोर्वृद्धिस्वरावेकादेशादन्तरङ्गतोऽभिनिर्वृत्तान्न प्राप्नुतः। पूर्वैषुकामशमः अपरैषुकामशमः। गुडोदकम् तिलोदकम्।

---

असिद्ध असल्यामुळें अंतरंग यणादेश होणार नाहीं.

हा दोष येत नाहीं. कारण 'असिद्धं बहिरङ्गलक्षणमन्तरङ्गलक्षणे' असें सांगून त्यानंतर 'नाजानन्तर्ये बहिष्ट्वप्रक्लृप्तिः' म्हणजे अचाचें आनन्तर्य ज्यामध्यें आहे असें अंतरंग कर्तव्य असतांना पूर्वी झालेलें बहिरंगशास्त्र असिद्ध समजूं नये असें सांगण्यांत येईल[२६].

तर मग 'नाजानन्तर्ये'० इत्यादि वचन केलें पाहिजे.

तसें वचन करावयास नको. कारण ज्यापेक्षां हा आचार्य 'षत्वतुकोरसिद्धः' (६।१।८६) येथें षत्व आणि तुक् कर्तव्य असतां एकादेशशास्त्र असिद्ध समजावें असें सांगत आहे त्यापेक्षां नाजानन्तर्यपरिभाषेचें अस्तित्व सुचवीत[२७] आहे.

'अन्तरङ्ग कर्तव्य असतां बहिरंग असिद्ध' ही परिभाषा तर केली पाहिजेच ना ?

तीही करावयास नको. कारण आचार्यांचा व्यवहार त्या परिभाषेचें अस्तित्व सुचवीत आहे[२८], ज्यापेक्षां हा आचार्य 'वाह ऊठ्' (६।४।१३२) या सूत्रानें ऊठ् या आदेशाचें विधान करीत आहे.

(वा.२२)'असिद्धं बहिरङ्गम्'० ही परिभाषा स्वीकारली असतां दोष येतो की पूर्वैषुकामशमः अपरैषुकामशमः, गुडोदकम् तिलोदकम्, म्हणावयास नको. पण ज्यापेक्षा पाणिनीनें तसें सांगितलें आहे त्यापेक्षां त्या परिभाषेचा येथें निषेध आहे असें त्यावरून सूचित होतें.

---

ऊकार अच् पुढें असल्यामुळें मागील इकाराला यण् (६।१।७७) होतो. तो अंतरंग असल्यामुळें त्याच्या दृष्टीनें ऊठ् बहिरंग असिद्ध मानला तर 'अच् पुढें आहे' असें समजतां येत नाहीं, म्हणून यण् होणार नाहीं.

२६. इको यणचि या अंतरंगशास्त्रामध्यें अचाचें आनंतर्य असल्यामुळें तेथें 'असिद्धं बहिरंग०' ही परिभाषा येत नाहीं. आणि त्यामुळें यण् होण्याला अडचण होणार नाहीं.

२७. अधिउपसर्गपूर्वक इण्धातूहून क्त्वाप्रत्यय (३।४।२१), त्याचे स्थानीं ल्यबादेश (७।१।३७) व दोन इकारांचा संधि एकादेश सवर्णदीर्घ झाला आहे. नंतर ह्रस्व नसल्यामुळें तुक् (६।१।७१) होणार नाहीं, म्हणून तुक् कर्तव्य असतां एकादेशशास्त्र असिद्ध होतें असें म्हटलें आहे. जर हें काम 'असिद्धं बहिरंग०' या परिभाषेनेंच साधेल तर तसें

२८. विश्वउपपदपूर्वक वह्धातूहून ण्विप्रत्यय (३।२।६४), वृद्धि (७।२।११६), पुढें शस्प्रत्यय (४।१।२), वाह् यांतील वकाराला संप्रसारणसंज्ञक ऊठ् (६।४।१३२), पूर्वरूप (६।१।१०८) व वृद्धि (६।१।८९) होऊन विश्वौहः हें रूप सिद्ध होतें. 'वाह ऊठ्' या सूत्रामध्यें ऊठ् न सांगतां नुसतें संप्रसारणच जर सांगितलें तर त्या संप्रसारण म्हणून झालेल्या ह्रस्व उकाराला लघूपधगुण (७।३।८६), नंतर वृद्धि (६।१।८८) होऊन रूप साधेल. परंतु 'असिद्धं बहिरंग०' या परिभाषेनें संप्रसारण असिद्ध असल्यामुळें लघूपधगुण होणार नाहीं म्हणून ऊठ् सांगितला आहे. तेव्हां ज्या अर्थीं तो ऊठ् सांगत आहे त्या अर्थीं या परिभाषेचें अस्तित्व सुचवीत आहे.

उदकेऽकेवले [ ६.२.९६ ] इति पूर्वोत्तरपदयोर्व्यपवर्गाभावान्न स्यात् ॥ नैष दोषः । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति पूर्वोत्तरपदयोस्तावत्कार्यं भवति नैकादेश इति यदयं नेन्द्रस्य परस्य [ ७.३.२२ ] इति प्रतिषेधं शास्ति । कथं कृत्वा ज्ञापकम् । इन्द्रे द्वावचौ । तत्रैको यस्येति च [ ६.४.१४८ ] इति लोपेन ह्रियतेऽपर एकादेशेन । ततोऽनच्क इन्द्रः संपन्नः । तत्र कः प्रसङ्गो वृद्धेः । पश्यति त्वाचार्यः पूर्वपदोत्तरपदयोस्तावत्कार्यं भवति नैकादेश इति ततो नेन्द्रस्य परस्येति प्रतिषेधं शास्ति ॥

## यणादेशादियुवौ ॥ २३ ॥

यणादेशादियुवावन्तरङ्गतोऽभिनिर्वृत्तान्न प्राप्नुतः । वैयाकरणः सौवश्व इति । लक्षणं हि भवति य्वोर्वृद्धिप्रसङ्ग इयुवौ भवत इति ॥ नैष दोषः । अनवकाशावियुवौ । अचीत्युच्यते ॥ किं पुनः कारणमचीत्युच्यते । इह मा भूताम् । ऐति-

---

येथें पूर्वपद आणि उत्तरपद यांच्या संबंधानें जे वृद्धि (७।३।१४) आणि स्वर (६।२।९६) होत असतात ते अंतरंगत्वास्तव प्रथमतः एकादेश झाला तर होणार नाहींत. 'उदकेऽकेवले' (६।२।९६) यानें उदकशब्द उत्तरपद पुढें असतांना पूर्वपदाला अंतोदात्त सांगितला आहे. परंतु पूर्वपद आणि उत्तरपद या दोहोंमध्यें एकादेश होऊन संधि झाल्यानंतर तो होणार नाहीं. कारण संधि झाल्यानंतर अमुक पूर्वपद व त्याच्यापुढें अमुक उत्तरपद असें सांगतां येत नाहीं.'

हा दोष येत नाहीं. कारण पूर्वपद आणि उत्तरपद या उभयतांवर अवलंबून असलेलें कार्य तें प्रथमतः होतें, एकादेश प्रथमतः होत नाहीं, असें आचार्यांचा व्यवहार सुचवीत आहे, ज्यापेक्षां हा आचार्य सौमेन्द्रः येथें उत्तरपद असलेल्या इन्द्रशब्दाला वृद्धीचा (७।३।२१) निषेध (७।३।२२) करीत आहे.

वृद्धीचा निषेध कसा बरें ज्ञापक होतो ?

सौमेन्द्रः[२९] या उदाहरणामध्यें उत्तरपद जो इन्द्रशब्द त्यामध्यें अच् दोन आहेत. त्यांपैकीं एक म्ह. अकार 'यस्येति च' (६।४।१४८) या लोपानें घालविला, आणि दुसरा म्ह. इकार एकादेशानें (६।१।८७) घालविला. त्यामुळें इन्द्रशब्द अचानें रहितच झाला. मग त्याला वृद्धि कशी प्राप्त होईल बरें ? असें असतां ज्या अर्थी आचार्य 'नेन्द्रस्य परस्य' असा वृद्धीचा निषेध करीत आहे त्यावरून असें समजतों की 'पूर्वपद आणि उत्तरपद या उभयतांवर अवलंबून असलेलें कार्य प्रथमतः होतें, एकादेश होत नाहीं.

(वा.२३) अंतरंगत्वास्तव प्रथमतः यणादेश झाल्यामुळें इय् आणि उव् हे आदेश होणार नाहींत; जसें– वैयाकरणः, सौवश्वः. अच् पुढें असतांना त्याच्या मागील इकार आणि उकार यांना आदिवृद्धि (७।२।१७) करण्याची वेळ आली असतां क्रमानें इय् आणि उव् आदेश होतात असें सूत्र[३०] आहे.

हा दोष येत नाहीं. कारण 'अच् पुढें असतांना' असें त्या सूत्रांत म्हटलें आहे. तेव्हां इय्, उव् यांच्या सर्व उदाहरणांमध्यें यण् प्राप्त होत आहे. म्हणून ते निरवकाश होत असल्यामुळें यणाचा बाध करतील.

पण त्या सूत्रामध्यें अच् पुढें असतांना

---

२९. सोम आणि इन्द्र या शब्दांचा द्वंद्व समास करून पुढें अण्प्रत्यय (४।२।४४) केला आहे.

३०. हें सूत्र इतर व्याकरणांमध्यें आहे. वैयाकरणः येथें वि, आ या उपसर्गांचा करणशब्दाबरोबर गतिसमास (२।२।१८) करून पुढें अण्प्रत्यय (४।२।५९) केल्यामुळें वि या इकाराला आदिवृद्धि (७।२।११७) प्राप्त होत आहे. तिच्यापूर्वी इय् आदेश करून नंतर वृद्धि होते.

कायनः औपगव इति । स्तामत्रेयुवौ लोपो व्योर्वलि [६.१.६६] इति लोपो भविष्यति । यत्र तर्हि लोपो नास्ति । प्रैयमेधः प्रैयंगव इति ॥

## उसि पररूपाच्च ॥ २४ ॥

उसि पररूपाच्चान्तरङ्गतोऽभिनिर्वृत्तादियादेशो न प्राप्नोति । पचेयुः यजेयुः ॥ नैष दोषः । नैवं विज्ञायते या इत्येतस्येय्भवतीति । कथं तर्हि । यास् इत्येतस्येय् भवतीति ॥

## लुग्लोपयणयवायावेकादेशेभ्यः ॥ २५ ॥

लोपयणयवायावेकादेशेभ्यो लुग्बलीयानिति वक्तव्यम् ॥ लोपात् । गोमान्प्रियोऽस्य गोमत्प्रियः । यवमत्प्रियः । गोमानिवाचरति गोमत्यते । यवमत्यते ॥ यणादेशात् । ग्रामण्यः कुलं ग्रामणिकुलम् ॥ सेनान्यः कुलं सेनानिकुलम् ॥ अ-

---

असें म्हणण्याचें काय बरें कारण असावें ?

ऐतिकायनः, औपगवः[31] येथें इकार, उकार यांचे स्थानीं इय्, उव् आदेश न व्हावेत म्हणून तसें म्हटलें आहे.

पण ऐतिकायनः, औपगवः येथें इकार व उकार यांचें स्थानीं इय्, उव् आदेश झाले तरी कांहीं हरकत दिसत नाहीं. कारण 'लोपो व्योः०' (६।१।६६) यानें त्या यकारवकारांचा लोप होईल.

तर मग जेथें यकारवकारांचा लोप होण्याचा संभव नाहीं तेथें इय्, उव् आदेश न व्हावेत यासाठीं तसें म्हटलें पाहिजे; जसें— प्रैयमेधः, प्रैयङ्गवः[32].

(वा.२४) पचेयुः,[33] यजेयुः येथें अंतरंगत्वास्तव 'उस्यपदान्तात्' (६।१।९६) यानें पररूप झाल्यामुळें 'अतो येयः' (७।२।८०) यानें इयादेश होणार नाहीं.

हा दोष येत नाहीं. कारण 'या शब्दाचे स्थानीं इयादेश होतो' असा 'अतो येयः' याचा अर्थ आम्ही समजत नाहीं.

तर मग कसा समजतां ?

यास्[34] याचे स्थानीं इयादेश होतो असा समजतों.

(वा.२५) लोप, यण्, अय्, अव्, आय्, आव् आणि एकादेश यांपेक्षां लुक् हा बलिष्ठ आहे असें सांगावें. लुक् बलिष्ठ असल्यामुळें लोपापेक्षां पूर्वी होतो याचें उदाहरणः— गोमान् प्रियो यस्य गोमत्प्रियः[35], यवमत्प्रियः.

ग्रामण्यः[36] कुलं ग्रामणिकुलम्, सेनान्यः कुलं सेनानिकुलम्, येथें यणापेक्षां लुक् पूर्वी होतो.

---

३१. इतिकशब्दाहून फक्प्रत्यय (४।१।९९) आणि उपगुशब्दाहून अण्प्रत्यय (४।१।९२) हे झाले आहेत.

३२. प्रियमेध व प्रियङ्गु या शब्दांहून अण्प्रत्यय (४।३।१२०) केला आहे.

३३. पच्धातूहून लिङ् (३।३।१६), झिआदेश (३।४।७८), त्याला जुस् (३।४।१०८), शप् (३।१।६८), यासुट् (३।४।१०३), त्याच्या सकाराचा लोप (७।२।७९) झाल्यानंतर पच-या-उस् या स्थितींत पररूप आणि इय्आदेश प्राप्त होतात.

३४. तेव्हां सकाराचा लोप न करतां यास् यालाच इय्आदेश होत असल्यामुळें पररूपाची येथें प्राप्तिच येत नाहीं.

३५. गोमत्+सु, प्रिय+सु, येथें समास करून प्रातिपदिकसंज्ञा (१।२।४६) केल्यानंतर लुक् (२।४।७१) प्राप्त होणार आणि समास करण्यापूर्वींच सुप्रत्ययाचा लोप (६।१।६८) प्राप्त होतो. तो अंतरंगत्वास्तव अगोदर झाला तर प्रत्ययलक्षणानें (१।१।६२) नुम् (७।१।७०) व दीर्घ (६।४।१४) होऊं लागतील. तसेंच गोमत्यते येथें गोमत्+सु यापुढें (३।१।८) प्रत्यय करून धातुसंज्ञा (३।१।३२) झाल्यानंतर लुक् प्राप्त होणार आहे.

३६. ग्रामणीशब्दाहून ङस्प्रत्यय केल्याबरोबर यणादेश (६।४।८२) होऊं लागेल. कारण लुकाची प्राप्ति त्या वेळीं येत नाहीं. कुलशब्दावरोबर समास झाल्यानंतर त्याची प्राप्ति येणार आहे.

यवायावेकादेशेभ्यः । गवे हितं गोहितम् । रायः कुलं रैकुलम् । नावः कुलं नौकुलम् । वृकाद्भयं वृकभयम् ॥ लुक्च प्राप्नोत्येते च विधयः । परत्वादेते विधयः स्युः । लुग्बलीयानिति वक्तव्यं लुग्यथा स्यात् ॥

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये प्रथमस्याध्यायस्य चतुर्थे पादे प्रथममाह्निकम् ॥

---

अय्, अव्, आय्, आव् आणि एकादेश या विधींपेक्षां लुक् पूर्वी होतो यांचें उदाहरणः— गवे हितं गोहितम्, रायः कुलं रैकुलम्, नावः कुलं नौकुलम्, वृकाद्भयं वृकभयम्. येथें लुक् प्राप्त होतो आणि हे विधि प्राप्त होतात. त्यांत पर असल्यामुळें लुकाला मागें सारून हे विधि होऊं लागतील म्हणून लुक् पूर्वी होण्यासाठीं लुकाला बलिष्ठत्व सांगितलें पाहिजे.

याप्रमाणें भगवान् पतंजलिऋषींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्यांतील पहिल्या अध्यायाच्या चौथ्या पादांतील पहिलें आन्हिक समाप्त झालें.

## यू स्त्र्याख्यौ नदी ॥ १।४।३॥

यू इति किमर्थम् । खट्वा माला । किं च स्यात् । खट्वाबन्धुः मालाबन्धुः । नदी बन्धुनि [६.२.१०९] इत्येष स्वरः प्रसज्येत । इह च बहुखट्वक इति नद्यृतश्च [५.४.१५३] इति नित्यः कप्प्रसज्येत ॥ नैष दोषः । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति नापो नदीसंज्ञा भवतीति यदयं ङेराम्नद्याम्नीभ्यः [७.३.११६] इति पृथगाब्ग्रहणं करोति ॥ इह तर्हि मात्रे मातुरित्याण्नद्याः [११२] इत्याट् प्रसज्येत ॥

किं पुनरिदं दीर्घयोर्ग्रहणमाहोस्विद्ध्रस्वयोः । किं चातः । यदि दीर्घयोर्ग्रहणं यू इति निर्देशो नोपपद्यते । दीर्घाद्धि पूर्वसवर्णः प्रतिषिध्यते ॥ उत्तरत्र च विशेषणं न प्रकल्पेत यू ह्रस्वाविति । यदि यू न ह्रस्वौ । अथ ह्रस्वौ न यू । यू ह्रस्वौ चेति विप्रतिषिद्धम् ॥ अथ ह्रस्वयोर्हे शकटे अत्रापि प्रसज्येत । नैष दोषः । अवश्यमत्र विभाषा नदीसंज्ञैषि-

(सू.३) येथें यू हा शब्द घातला आहे तो कशासाठीं ?

खट्वा, माला या नित्य स्त्रीलिंगी आबन्त शब्दाला नदीसंज्ञा न व्हावी म्हणून घातला आहे.

नदीसंज्ञा झाली तर काय दोष येईल ?

खट्वाबन्धुः, मालाबन्धुः येथें 'नदी बन्धुनि' (६।२।१०९) यानें सांगितलेला पूर्वपदान्तोदात्तस्वर होऊं लागेल, आणि बहुखट्वकः येथें 'नद्यृतश्च' (५।४।१५३) यानें सांगितलेला समासान्त कप् प्रत्यय नित्य होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण ज्यापेक्षां हा आचार्य 'ङेराम्नद्याम्नीभ्यः' (७।३।११६) या सूत्रामध्यें नदीशब्दापेक्षां निराळा आप्-शब्द घालीत आहे त्यापेक्षां आबन्तशब्दाला नदीसंज्ञा होत नाहीं असें तो सुचवीत आहे.

तर मग मात्रे मातुः येथें मातृ शब्दाला नदीसंज्ञा झाली असतां 'आण्नद्याः' (७।३।११२) या सूत्रानें ङित्प्रत्ययाला आडागम होऊं लागेल यासाठीं यू हा शब्द घातला आहे.

पण काय, 'यू' या पदानें दीर्घ ईकार व ऊकार यांचें ग्रहण समजावयाचें किंवा ह्रस्व इकार व उकार यांचें ग्रहण समजावयाचें ?

या दोन तऱ्हांमध्यें काय फरक आहे ?

जर 'यू' या पदानें दीर्घ ईकार व ऊकार यांचें ग्रहण समजलें तर 'यू' हा निर्देश जुळून येत नाहीं. त्याच्या ऐवजीं 'य्वौ' असा निर्देश केला पाहिजे. कारण दीर्घाच्या पुढें इच्प्रत्याहारांतील वर्ण आला असतां तेथें पूर्वसवर्णदीर्घाचा निषेध (६।१।१०५) केला आहे. शिवाय 'यू' हें जर दीर्घ ईकार व ऊकार यांचें ग्रहण असेल तर पुढील सूत्रामध्यें (१।४।६) 'ह्रस्व' असें जें विशेषण दिलें आहे तेंही त्या दीर्घांना लागू पडणार नाहीं. कारण दीर्घ ईकार व ऊकार यांना ह्रस्व म्हणतां येत नाहीं, आणि ह्रस्व इकार व उकार यांना दीर्घ म्हणतां येत नाहीं. तेव्हां ईकार व ऊकार आणि ते ह्रस्व हें परस्परविरुद्ध आहे.

आतां 'यू'पदानें ह्रस्व इकार व ह्रस्व उकार यांचें ग्रहण केलें आहे असें गृहीत धरलें तर 'हे शकटे' येथेंही नदीसंज्ञा होऊं लागेल.

१. नित्य स्त्रीलिंगी असा जो दीर्घ ईकारान्त आणि दीर्घ ऊकारान्त शब्द त्याला नदीसंज्ञा होते; उदा० लक्ष्मी, यवागू वगैरे. दीर्घ ई आणि दीर्घ ऊ या दोन वर्णांचा द्वंद्व करून पुढें प्रथमाद्विवचन यू असें केलें आहे. 'वा छंदसि'(६।१।१०६) यानें पूर्वसवर्णदीर्घ झाला आहे.

२. 'संबोधनविषये शकटिशब्दस्य वा नदीसंज्ञा वक्तव्या' असें वचन गृहीत धरलें पाहिजे. यू या शब्दानें दीर्घ घेतलें तर एकदां नदीसंज्ञा होण्यासाठीं तें वचन पाहिजे, आणि ह्रस्व घेतलें तर एकदां नदीसंज्ञा न होण्याकरितां तें वचन पाहिजे.

तव्या । उभयं हीष्यते । हे शकटि हे शकट इति ॥ इह तर्हि शकटिबन्धुरिति नदी बन्धुनीत्येष स्वरः प्रसज्येत । इह च बहुशकटिरिति नद्यृतश्चेति नित्यः कप्प्रसज्येत ॥ नैष दोषः । ङिति ह्रस्वश्च [१.४.६] इत्ययं नियमार्थो भविष्यति । ङित्येव यू ह्रस्वौ नदीसंज्ञौ भवतो नान्यत्रेति ॥ कैमर्थक्यान्नियमो भवति । विधेयं नास्तीति कृत्वा । इह चास्ति विधेयम् । किम् । नित्या नदीसंज्ञा प्राप्ता सा विभाषा विधेया । तत्रापूर्वो विधिरस्तु नियमोऽस्त्वित्यपूर्व एव विधिर्भविष्यति न नियमः ॥ अथायं नित्यो योगः स्यात्प्रकल्पेत नियमः । बाढं प्रकल्पेत । नित्यस्तर्हि भविष्यति । तत्कथम् । योगविभागः करिष्यते । इदमस्ति । यू स्त्र्याख्यौ नदी । नेयङुवङ्स्थानावस्त्री [४] । वामि [५] । ततो ङिति । ङिति चेयङुवङ्स्थानौ यू वास्त्री नदीसंज्ञौ न भवतः । ततो ह्रस्वौ । ह्रस्वौ च यू स्त्र्याख्यौ ङिति नदीसंज्ञौ भवतः । इयङुवङ्स्थानौ वा नेति च निवृत्तम् ॥ यद्येवं शकटये

हा दोष येत नाहीं. कारण संबोधनामध्यें शकटिशब्दाला विकल्पानें नदीसंज्ञा होते असें अवश्य गृहीत धरलें पाहिजे. कारण 'हे शकटि' व 'हे शकटे' अशीं दोन्ही रूपें इष्ट आहेत.

तर मग शकटिबन्धुः येथें 'नदी बन्धुनि' (६।२।१०९) यानें पूर्वपदाला अन्तोदात्त स्वर होऊं लागेल. तसेंच बहुशकटिः येथें 'नद्यृतश्च' (५।४।१५३) यानें समासान्त कप्प्रत्यय नित्य होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण ङित्प्रत्यय पुढें असेल तरच ह्रस्व इकार व उकार यांना नदीसंज्ञा होते, अन्यत्र होत नाहीं, असा 'ङिति ह्रस्वश्च' (१।४।६) यानें नियम करण्यांत येईल.

पण शास्त्र व्यर्थ झालें तर तेथें नियम होत असतो. कारण तेथें त्या शास्त्राला विधेय असें कांहींच मिळत नाहीं. आणि 'ङिति ह्रस्वश्च' येथें तर विधेय आहे.

तें विधेय काय बरें आहे ?

ह्रस्व इकार व उकार यांना नदीसंज्ञा नित्य प्राप्त आहे, तिचा विकल्प करावयाचा आहे. तेव्हां 'ङिति ह्रस्वश्च' हा अपूर्वविधि समजावा किंवा नियमविधि समजावा, असा विचार उत्पन्न झाला असतां अपूर्वविधिच समजला जाईल, नियम समजण्यांत येणार नाहीं.

आतां जर 'ङिति ह्रस्वश्च' हें सूत्र नित्य असेल तर मात्र नियम होऊं शकेल.

असें असेल तर खुशाल नियम माना. हें सूत्र नित्यच मानतां येईल.

तें कसें ?

योगविभाग केला म्हणजे तें साधेल. 'यू स्त्र्याख्यौ नदी' असें सूत्र आहे. त्याचे पुढें 'नेयङुवङ्स्थानावस्त्री', 'वाऽऽमि', त्याचे पुढें 'ङिति': ङित्प्रत्यय पुढें असतां इयङ् किंवा उवङ् होण्यास लायक असे जे स्त्रीशब्दाखेरीज ईकारान्त किंवा ऊकारान्त नित्यस्त्रीलिंगी शब्द ते विकल्पानें नदीसंज्ञक होत नाहींत. त्याचे पुढें 'ह्रस्वौ': नित्यस्त्रीलिंगी असे जे ह्रस्व इकारान्त किंवा ह्रस्व उकारान्त शब्द ते ङित्प्रत्यय पुढें असतांनाच नदीसंज्ञक होतात. येथें 'इयङुवङ्स्थानौ' वा, आणि न, या पदांची अनुवृत्ति करूं नये.

'ह्रस्वौ' हें सूत्र नित्य नदीसंज्ञा सांगणारें आहे असें मानलें तर नियम होईल, पण शकटये येथें नित्य नदीसंज्ञा होईल, आणि घिसंज्ञा मुळींच होणार नाहीं; त्यामुळें गुण (७।३।१११) होणार नाहीं.

३. यू स्त्र्याख्यौ येथें ह्रस्वाचें ग्रहण केलें आहे त्या पक्षीं शकटिबन्धुः, बहुशकटिः, येथें जो दोष आला होता तो नियमानें दूर होतो.

अत्र गुणो न प्राप्नोति । द्वितीयो योगविभागः करिष्यते शेषग्रहणं न करिष्यते । कथम् । इदमस्ति । यू स्त्र्याख्यौ नदी । नेयङुवङ्स्थानावस्त्री । वामि । ततो ङिति । ङिति चेयङुवङ्स्थानौ यू वास्त्री नदीसंज्ञौ न भवतः । ततो ह्रस्वौ । ह्रस्वौ च यू स्त्र्याख्यौ ङिति नदीसंज्ञौ भवतः । इयङुवङ्स्थानौ वा नेति च निवृत्तम् । ततो घि । घिसंज्ञौ च भवतः स्त्र्याख्यौ यू ह्रस्वौ ङिति । ततोऽसखि । सखिवर्जितौ च यू ह्रस्वौ घिसंज्ञौ भवतः । स्त्र्याख्यौ ङितीति च निवृत्तम् ॥ यदि तर्हि शेषग्रहणं न क्रियते नार्थ एकेनापि योगविभागेन । अविशेषेण नदीसंज्ञोत्सर्गः । तस्या ह्रस्वयोर्घिसंज्ञा बाधिका । तस्यां नित्यायां प्राप्तायामियं ङिति विभाषारभ्यते ॥ अथवा पुनरस्तु दीर्घयोः । ननु चोक्तं निर्देशो नोपपद्यत इति दीर्घाद्धि पूर्वसवर्णः प्रतिषिध्यत इति । वा छन्दसि [६.१.१०६] इत्येवं भविष्यति । छन्दसीत्युच्यते न चेदं छन्दः । छन्दोवत्सूत्राणि भवन्तीति ॥ यदप्युच्यत उत्तरत्र विशे-

---

दुसरा योगविभाग करण्यांत येईल. 'शेषो घ्य०' येथील शेषशब्द मुळींच नको.

तो कसा ?

'यू स्त्र्याख्यौ नदी, नेयङुवङ्स्थानावस्त्री, वाऽऽमि', असा सूत्रपाठक्रम आहे. त्याचे पुढें 'ङिति' हें सूत्र. त्याचा अर्थः– इयङ्, उवङ् होण्यास लायक असा जो स्त्रीशब्दाशिवाय दीर्घईकारान्त किंवा ऊकारान्त शब्द त्याला नदीसंज्ञा विकल्पानें होत नाहीं. त्याचे पुढें 'ह्रस्वौ' हें सूत्रः नित्यस्त्रीलिंगी असे जे ह्रस्वइकारान्त किंवा ह्रस्वउकारान्त शब्द त्यांना ङित्प्रत्यय पुढें असतांना नदीसंज्ञा होते. येथें इयङुवङ्स्थानौ, वा आणि न या पदांची अनुवृत्ति नाहीं. त्याचे पुढें 'घि' हें सूत्रः नित्यस्त्रीलिंगी ह्रस्वइकारान्त किंवा ह्रस्वउकारान्त शब्दाला घिसंज्ञा होते; ङित्प्रत्यय पुढें असतां असा त्याचा अर्थ. त्याचे पुढें 'असखि' हें सूत्र; त्याचा अर्थः– सखिशब्द खेरीज करून ह्रस्वइकारान्त किंवा ह्रस्वउकारान्त शब्दाला घिसंज्ञा होते. येथें स्त्र्याख्यौ आणि ङिति या पदांची अनुवृत्ति नाहीं.

आतां जर घिसंज्ञाविधायक सूत्रांतील शेषशब्द काढून टाकण्यांत येत आहे तर 'ङिति' किंवा 'घि' यांपैकीं एकही योगविभाग करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. ह्रस्व इकार, उकार यांना आणि दीर्घ ईकार, ऊकार यांना नदीसंज्ञेचें विधान करावें. त्या नदीसंज्ञेची ह्रस्व इकार, उकार यांविषयीं घिसंज्ञा परत्वास्तव बाधक होईल. ती घिसंज्ञा नित्यप्राप्त असतां 'ङिति ह्रस्वश्च' ही विभाषा आरंभिली जात आहे.

अथवा 'यू' या पदानें दीर्घ ईकार आणि दीर्घ ऊकार यांचाच निर्देश केला आहे असेंच असूं दे.

पण दीर्घ ईकार व ऊकार यांचा निर्देश गृहीत धरला तर 'यू' हा निर्देश जुळून येत नाहीं. कारण दीर्घाच्या पुढें इच् आला असतां तेथें पूर्वसवर्ण दीर्घाचा निषेध केला आहे असा दोष पूर्वी दाखविला आहे ना ?

हा दोष येत नाहीं. 'वा छन्दसि' (६।१।१०६) या सूत्रानें पूर्वसवर्ण दीर्घ होईल.

पण तेथें 'छन्दसि' म्ह. वेदामध्यें असें म्हटलें आहे, आणि हें सूत्र तर छन्द नव्हे.

सूत्रें हीं वेदासारखींच समजलीं जातात.

---

४. तेव्हां ह्रस्वइकारान्त शकटिशब्दासारख्या शब्दांना नदी आणि घि या दोन्ही संज्ञा सांगितल्या असल्यामुळें त्या पाळीपाळीनें होतील.

५. यू या पदानें ह्रस्व इकार व उकार यांचें ग्रहण केलें आहे. त्यांनीं 'अणुदित्०' (१।१।६९) सूत्राच्या जोरावर दीर्घ ईकार व दीर्घ ऊकार यांचेंही ग्रहण होईल. तेव्हां ह्रस्व आणि दीर्घ अशा दोन्ही प्रकारच्या इकार, उकार यांना नदीसंज्ञा सिद्ध होते.

षणं न प्रकल्पेत यू ह्रस्वाविति यदि यू न ह्रस्वौ अथ ह्रस्वौ न यू यू ह्रस्वाविति विप्रतिषिद्धमिति। नैतद्विप्रतिषिद्धम्। आहायं यू ह्रस्वाविति। यदि यू न ह्रस्वौ। अथ ह्रस्वौ न यू। त एवं विज्ञास्यामः। य्वोर्यौ ह्रस्वाविति। कौ च य्योर्ह्रस्वौ। सवर्णौ॥

अथ स्त्र्याख्याविति कोऽयं शब्दः। स्त्रियमाचक्षाते स्त्र्याख्यौ। यद्येवं स्त्र्याख्यायाविति प्राप्नोति। अनुपसर्गे हि को विधीयते। न तर्हीदानीमिदं भवति

यस्मिन्दश सहस्राणि पुत्रे जाते गवां ददौ।
ब्राह्मणेभ्यः प्रियाख्येभ्यः सोऽयमुञ्छेन जीवति॥

छन्दोवत्कवयः कुर्वन्ति। न ह्येषेष्टिः॥ एवं तर्हि कर्मसाधनो भविष्यति। स्त्रियामाख्यायेते स्त्र्याख्यौ। यदि कर्मसाधनः

---

आणखीही जें म्हटलें आहे— 'यू' हा दीर्घ ईकार व ऊकार यांचा निर्देश आहे असें म्हटलें तर उत्तरसूत्रामध्यें त्या 'यू'शब्दाला ह्रस्वौ हें विशेषण लागू पडणार नाहीं. जर ते ईकार व ऊकार आहेत तर ते ह्रस्व नव्हेत, आणि जे ह्रस्व आहेत ते ईकार ऊकार नव्हेत. यू आणि ह्रस्वौ हे दोन अर्थ परस्परविरुद्ध आहेत.

ते विरुद्ध नाहींत. कारण हा आचार्य यू असा दीर्घांचा निर्देश करून पुढें ह्रस्वौ असें म्हणत आहे. आणि जे ई, ऊ ते तर ह्रस्व नव्हेत, व जे ह्रस्व ते ई, ऊ नव्हेत अशी तर अडचण येते; याकरितां आम्ही त्याचा अर्थ असा समजूं की ईकार आणि ऊकार यांचे ह्रस्व.

ईकार व ऊकार यांचे ह्रस्व म्हणजे कोण?

तर त्यांचे सवर्ण अर्थात् ह्रस्व इकार, उकार हे होत.

आतां स्त्र्याख्यौ ह्या शब्दाचा काय अर्थ आहे?

स्त्रियमाचक्षाते 'स्त्र्याख्यौ'[६] म्हणजे स्त्रीत्व-विशिष्ट अर्थाला प्रतिपादन करणारे असा त्याचा अर्थ आहे.

असें आहे तर 'स्त्र्याख्यायौ' असें रूप होईल. कारण उपसर्ग मागें नसतां आदन्त-धातूहून 'आतोऽनुपसर्गे कः' (३।२।३) यानें कप्रत्यय[७] सांगितला आहे.

तर मग आतां 'यस्मिन्दश०'[८] या श्लोकांतील 'प्रियाख्य' हा प्रयोग होत नाहीं काय?

तसा प्रयोग होतो, कारण वेदांतील प्रयोगा-प्रमाणें भाषेमध्येंही कवि तसा प्रयोग करीत असतात. पण त्यावरून तसा प्रयोग इष्ट आहे असें मात्र ठरत नाहीं.

तर मग स्त्र्याख्यौ हा शब्द कर्मसाधन आहे असें समजूं. म्हणजे स्त्री या अर्थी जे सांगितले ते स्त्र्याख्य[९] होत.

असा जर स्त्र्याख्यशब्द कर्मसाधन घेतला तर स्त्रीलिंगी कृत्प्रत्ययान्त शब्दाला आणि स्त्री-लिंगी क्विप्प्रत्ययान्त धातूला नदीसंज्ञा होणार

---

६. स्त्रीशब्द उपपद आणि आङ्उपसर्ग यांच्या-पुढील ख्याधातूहून कप्रत्यय— नंतर आकाराचा लोप (६।४।६४) झाला आहे.

७. आङ्उपसर्ग मागें असल्यामुळें कप्रत्यय करतां येत नाहीं. तेव्हां अण्प्रत्ययच (३।२।१) केला पाहिजे. त्या अण्प्रत्ययामुळें युक् (७।३।३३) होऊन स्त्र्याख्याय असा शब्द तयार होईल.

८. जो मुलगा जन्माला आला असतां प्रियकथन करणाऱ्या ब्राह्मणांना दहा हजार गोप्रदानें दिलीं तो मुलगा हल्लीं उञ्छवृत्तीनें म्हणजे शेतांतील पीक निघाल्यानंतर अवशिष्ट राहिलेले धान्यकण वेंचून त्यांवर उदरनिर्वाह करीत आहे.

९. आङ्उपसर्गपूर्वक ख्याधातूहून कर्मार्थी क-प्रत्यय (३।३।५८, वा.४) करून त्या आख्यशब्दा-बरोबर सप्तम्यन्त स्त्रीशब्दाचा समास (२।१।३३, वा. २) केला आहे. ङीप्, ऊङ् वगैरे स्त्रीप्रत्यय स्त्र्याख्य होत.

कृत्स्त्रिया धातुस्त्रियाश्च न सिध्यति । तन्त्र्यै लक्ष्म्यै श्रियै भ्रुवै ॥ एवं तर्हि बहुव्रीहिर्भविष्यति । स्त्रियामाख्यानयोः स्त्र्याख्यौ । एवमपि कृत्स्त्रिया धातुस्त्रियाश्च न सिध्यति । तन्त्र्यै लक्ष्म्यै श्रियै भ्रुवै ॥ एवं तर्हि विज्भविष्यति ॥ अथवा पुनरस्तु क एव । स्त्रियमाचक्षाते स्त्र्याख्याविति । ननु चोक्तं स्त्र्याख्यायाविति प्राप्नोति अनुपसर्गे हि को विधीयत इति । मूलविभुजादिपाठात्को भविष्यति । एवं च कृत्वा सोऽप्यदोषो भवति यदुक्तं

यस्मिन्दश सहस्राणि पुत्रे जाते गवां ददौ ।
ब्राह्मणेभ्यः प्रियाख्येभ्यः सोऽयमुञ्छेन जीवतीति ॥

अथाख्याग्रहणं किमर्थम् ।

**नदीसंज्ञायामाख्याग्रहणं स्त्रीविषयार्थम् ॥ १ ॥**

नदीसंज्ञायामाख्याग्रहणं क्रियते स्त्रीविषयार्थम् । स्त्रीविषयावेव यौ नित्यं तयोरेव नदीसंज्ञा यथा स्यात् । इह मा भूत् । ग्रामण्ये सेनान्ये स्त्रिया इति ॥

---

नाहीं; जसें– त[10]न्त्र्यै, लक्ष्म्यै, श्रियै, भ्रुवै.

असें आहे तर 'स्त्रियामाख्या अनयोः' असा हा बहुव्रीहि समजण्यांत येईल. म्हणजे 'स्त्री या अर्थी ज्यांची ख्याति आहे असे' हा अर्थ स्त्र्याख्य शब्दाचा होईल.

बहुव्रीहि घेतला तरीसुद्धां स्त्रीलिंगी कृत्प्रत्ययान्त शब्दाला आणि स्त्रीलिंगी क्विप्प्रत्ययान्त धातूला नदीसंज्ञा साधत नाहीं; जसें– तन्त्र्यै, लक्ष्म्यै, श्रियै, भ्रुवै.

असें आहे तर 'स्त्र्याख्यौ' यांत 'स्त्र्या[11]ख्या' असा आकारान्त शब्द आहे, आणि त्यामध्यें ख्याधातूहून विच्प्रत्यय केला असें आहे समजावें.

अथवा 'स्त्र्याख्यौ' येथें स्त्रियमाचक्षाते स्त्र्याख्यौ असा पूर्वी दाखविलेला कप्रत्ययच असूं दे.

पण तशा अर्थी 'स्त्र्याख्यायौ' असें रूप होईल. कारण उपसर्ग मागें नसेल तरच कप्रत्यय होणार अहे असें पूर्वी म्हटलें आहे ना?

मूलविभुजादिगणामध्यें या स्त्र्याख्यशब्दाचा पाठ असल्यामुळें तेथें कप्रत्यय होईल, आणि असें मानलें म्हणजे 'यस्मिन् दश०' या श्लोकांतील प्रियाख्यशब्द सिद्ध होत असल्यामुळें तेथें दोष येणार नाहीं.

आतां असा हा [12]आख्याशब्द कशाकरितां बरें घातला आहे?

(वा.१) नदीसंज्ञाविधायक सूत्रामध्यें आ[13]ख्याशब्द घातला तो नेहमीं स्त्रीलिंगी असा जो दीर्घ ईकार किंवा ऊकार त्यांनाच नदीसंज्ञा व्हावी, आणि केव्हां तरी स्त्रीलिंगी असणाऱ्या 'ग्रामण्यै सेनान्यै स्त्रियै' येथील ग्रामणी, सेनानी, या शब्दांना नदीसंज्ञा न व्हावी याकरितां

---

१०. तन्त्री आणि लक्ष्मी या शब्दांतील ईकार उणादि प्रत्ययाचा (उणा. ३।१३८,१४०) आहे. श्रीशब्दांतील ईकार आणि भ्रूशब्दांतील ऊकार धातूचा(३।२।१७८,वा.२) आहे, स्त्रीप्रत्ययाचा नव्हे.

११. पूर्वी स्त्र्याख्य असा शब्द कप्रत्यय करून घेतला होता त्याप्रमाणेंच या स्त्र्याख्याशब्दाचा अर्थ समजावा.

१२. विच्प्रत्यय केला तेव्हां आख्या असा शब्द होतो. कप्रत्ययानें आख्यशब्द होतो तोही येथें ध्यावा.

१३. 'यू स्त्रिया नदी' एवढेंच सूत्र आख्याशब्द घातल्यावांचून केलें असतां स्त्रीलिंगी अर्थ गम्यमान असतांना दीर्घ ईकार व ऊकार यांना नदीसंज्ञा होते असा अर्थ होत असतां ज्या अर्थी आख्याशब्द घालून स्त्र्याख्य ही उपपदसमास-(२।२।१९)रूपी वृत्ति आचार्यांनें केली आहे त्या अर्थी त्याचे मनांत वृत्तीच्या जोरावर,कांहींतरी अधिक अर्थ दाखवावा असें दिसतें. तेव्हां जसें विद्यैव धनं विद्याधनम् येथें वृत्तीच्या जोरावर पूर्वपदामध्यें अवधारण हा अर्थ येतो तसा येथेंही 'स्त्रीलिंगी अर्थालाच प्रतिपादन करणारे' असा अर्थ येतो.

**प्रथमलिङ्गग्रहणं च ॥ २ ॥**

प्रथमलिङ्गग्रहणं च कर्तव्यम् । प्रथमलिङ्गे यौ स्त्र्याख्याविति वक्तव्यम् ॥ किं प्रयोजनम् ।

**प्रयोजनं क्विब्लुप्समासाः ॥ ३ ॥**

क्विप् । कुमार्यै ब्राह्मणाय । लुप् । खरकुट्यै ब्राह्मणाय । समास । अतितन्त्र्यै ब्राह्मणाय । अतिलक्ष्म्यै ब्राह्मणाय ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । अवयवस्त्रीविषयत्वात्सिद्धम् । अवयवोऽत्र स्त्रीविषयस्तदाश्रया नदीसंज्ञा भविष्यति ।

**अवयवस्त्रीविषयत्वात्सिद्धमिति चेदियङुवङ्स्थानप्रतिषेधे यण्स्थानप्रतिषेधप्रसङ्गोऽवयवस्येयङुवङ्स्थानत्वात् ॥ ४ ॥**

अवयवस्त्रीविषयत्वात्सिद्धमिति चेदियङुवङ्स्थानप्रतिषेधे यण्स्थानयोरपि य्वोः प्रतिषेधः प्रसज्येत । आध्यै प्रध्यै

---

घातला आहे.

(वा.२) जो शब्द वृत्तींत सांपडण्याचे पूर्वी नित्यस्त्रीलिंगी असतो तो वृत्ति केल्यानंतर लिंगान्तरानें युक्त अशा अर्थाचें प्रतिपादन करीत असला तरी त्याचें येथें ग्रहण होतें असें वचन करावें.

याचा काय उपयोग ?

(वा.३) क्विप्, लुप् आणि समास या तीन ठिकाणीं त्याचा उपयोग होतो.

क्विपाचें उदाहरण– कुमार्यै ब्राह्मणाय.[१४]

लुपाचें उदाहरण– खरकुट्यै ब्राह्मणाय.

समासाचें उदाहरण– अतितन्त्र्यै ब्राह्मणाय, अतिलक्ष्म्यै ब्राह्मणाय.

तर मग तसें वचन केलें पाहिजे.

तसें वचन करावयास नको. कारण 'अवयवस्त्रीविषयत्वात्सिद्धम्': वरील उदाहरणांमध्यें वृत्तींतील मूळचा शब्द नित्यस्त्रीलिंगी आहे, त्या नित्यस्त्रीत्वावर अवलंबून मूळ शब्दाला नदीसंज्ञा आहेच.[१५]

(वा.४) वृत्तीचा अवयव असा मूळचा शब्द नित्यस्त्रीलिंगी असल्यामुळें नदीसंज्ञा सिद्धच आहे असें म्हणणें असेल तर इयङुवङ्स्थानिभूत नित्यस्त्रीलिंगी दीर्घ ईकार किंवा दीर्घ ऊकार यांना नदीसंज्ञेच्या निषेधाचा प्रसंग आला असतां तेथें यण्स्थानिभूत अशाही नित्यस्त्रीलिंगी दीर्घ ईकार, ऊकार यांना नदीसंज्ञेचा निषेध होऊं लागेल; जसें– आध्यै,[१६] प्रध्यै.

---

१४. कुमारी हा शब्द मूळचा नित्यस्त्रीलिंगी आहे. त्या कुमारीशब्दाहून कुमारीप्रमाणें आचरण करणारा या अर्थी आचारक्विप् (३।१।११ वा.४), पुढें कृत्प्रत्यय क्विप् (३।२।७६) झाला आहे.हा क्विप्-प्रत्ययान्त कुमारीशब्द नित्यस्त्रीलिंगी जरी नाहीं तरी वृत्तीच्या पूर्वी नित्यस्त्रीलिंगी होता म्हणून वृत्ति केल्यानंतरही त्याला नदीसंज्ञा होते. तसेंच खरकुट्यै येथें खरकुटी हा शब्द मूळचा नित्यस्त्रीलिंगी आहे. त्या खरकुटीशब्दाहून त्या खरकुटीची प्रतिकृति या अर्थी कन्प्रत्यय (५।३।९७) व त्याचा लुप् (५।३।९८) झाला आहे. तसेंच अतितन्त्र्यै, अतिलक्ष्म्यै, येथें तन्त्री व लक्ष्मी हे शब्द मूळचे नित्यस्त्रीलिंगी आहेत. त्यांचा 'त्यांना अतिक्रमण करणारा' अशा अर्थी अतिशब्दाबरोबर समास (२।२।१८,वा.४) झाला आहे.

१५.कुमारी वगैरे शब्दांना वृत्तीच्या पूर्वीच नदीसंज्ञा होत आहे. ती नदीसंज्ञा वृत्ति केल्यानंतर अधिक अर्थ आला तरी कायम असणारच.

१६. आ म्हणजे ईषत् आहे धी म्हणजे बुद्धि ज्याची, तसेंच प्रकृष्ट आहे बुद्धि ज्याची, असा आधी व प्रधी या शब्दांचा अर्थ आहे.येथें धीशब्दाला नदीसंज्ञा नाहीं. कारण धियौ धियः असा त्याला इयङ् (६।४।७७) होत असल्यामुळें नदीसंज्ञेचा निषेध (१।४।४) आहे. आधी प्रधी हे अनेकाच् शब्द जरी आध्यै प्रध्यै अशा यणाचे (६।४।८२) स्थानी आहेत, इयङाचे नाहींत, तरी आंतील धीशब्द इयङाचा स्थानी आहेच. तेव्हां मूळच्या शब्दाची नदीसंज्ञा घेऊन हें काम सहज भागेल, असें म्हणतां येत नाहीं.

ब्राह्मण्यै । किं कारणम् । अवयवस्येयङुवङ्स्थानत्वात् । अवयवोऽत्रेयङुवङ्स्थानः ॥

**सिद्धं त्वङ्गरूपग्रहणाद्यस्याङ्गस्येयुवौ तत्प्रतिषेधात् ॥ ५ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । अङ्गरूपं गृह्यते । यस्याङ्गस्येयुवौ भवतस्तस्येदं ग्रहणं न चैतस्याङ्गस्येयुवौ भवतः ॥

**ह्रस्वेयुव्स्थानप्रवृत्तौ च स्त्रीवचने ॥ ६ ॥**

ह्रस्वौ चेयुव्स्थानौ च प्रवृत्तौ च प्राक्च प्रवृत्तेः स्त्रीवचनावेव नदीसंज्ञौ भवत इति वक्तव्यम् । शकटयै अतिशकटयै ब्राह्मण्यै । क मा भूत् । शकटये अतिशकटये ब्राह्मणाय । धेन्वै अतिधेन्वै ब्राह्मण्यै । क मा भूत् । धेनवे अतिधेनवे ब्राह्मणाय । श्रियै अतिश्रियै ब्राह्मण्यै । क मा भूत् । श्रिये अतिश्रिये ब्राह्मणाय । भ्रुवै अतिभ्रुवै ब्राह्मण्यै । क मा भूत् । भ्रुवे अतिभ्रुवे ब्राह्मणाय ॥

अपर आह । ह्रस्वौ चेयुव्स्थानौ च प्रवृत्तावपि स्त्रीवचनावेव नदीसंज्ञौ भवत इति वक्तव्यम् । शकटयै अतिशकटयै

---

काय कारण ?

वृत्तींतील अवयव जो धीशब्द त्यांतील ईकार हा इयङाचा स्थानी आहे म्हणून.

(वा.५) हें सिद्ध होत आहे.

ते कसें ?

'नेयङुवङ्स्थानावस्त्री' या सूत्रामध्यें इयङुवङ् या शब्दावरून अंगांचा[17] आक्षेप होतो. त्यामुळें ज्या ठिकाणीं अङ्गाला इयङ् किंवा उवङ् होत असतो त्या ठिकाणींच नदीसंज्ञेचा निषेध होतो. आध्यै येथें अंगसंज्ञा ही समुदायाला आहे पण त्या अंगाला इयङ् मुळींच होत नाहीं, म्हणून निषेध येणार नाहीं.

(वा.६) ह्रस्व इकार किंवा उकार आणि इयङ्-उवङाचा स्थानी असा दीर्घ ईकार किंवा ऊकार हे वृत्ति करण्यापूर्वी आणि वृत्ति केल्यानंतर स्त्रीलिंगी असतील तरच ते नदीसंज्ञक होतात असें वचन करावें; जसें— शकटयै[18] अतिशकटयै ब्राह्मण्यै. ह्या वचनावरून कोठें बरें नदीसंज्ञा होत नाहीं ? शकटये, अतिशकटये ब्राह्मणाय. धेन्वै अतिधेन्वै ब्राह्मण्यै येथें नदीसंज्ञा होते. नदीसंज्ञा कोठें बरें होत नाहीं ? धेनवे, अतिधेनवे ब्राह्मणाय. तसेंच श्रियै अतिश्रियै ब्राह्मण्यै येथें नदीसंज्ञा होते आणि श्रिये अतिश्रिये ब्राह्मणाय येथें नदीसंज्ञा होत नाहीं. तसेंच भ्रुवै अतिभ्रुवै ब्राह्मण्यै येथें नदीसंज्ञा होते आणि भ्रुवे अतिभ्रुवे ब्राह्मणाय येथें होत नाहीं.

येथें अन्य कोणी एक वैयाकरण म्हणतो— ह्रस्वे युव्स्थानप्रवृत्तौ स्त्री वचने : ह्रस्व इकार किंवा उकार आणि इयङ् उवङ् यांचा स्थानी असा जो दीर्घ ईकार किंवा ऊकार हे वृत्ति केल्यानंतरही स्त्रीलिंगीच असतील तरच ते नदीसंज्ञक होतात, असें वचन करावें.

याचा काय उपयोग ?

शकट्यै अतिशकट्यै ब्राह्मण्यै येथेंच नदीसंज्ञा व्हावी आणि शकटये अतिशकटये ब्राह्मणाय येथें होऊं नये. तसेंच धेन्वै अतिधेन्वै ब्राह्मण्यै येथेंच नदीसंज्ञा व्हावी आणि

---

१७. इयङ् उवङ् सांगणारें सूत्र (६।४।७७) अङ्गस्य या अधिकारांत आहे.

१८. शकटिशब्दाहून प्रतिकृति या अर्थी कन्प्रत्यय (५।३।९७), नंतर त्याचा लुप् (५।३।९८) झाला आहे. असेंच पुढें शकटये ब्राह्मणाय येथें समजावें. पुढेंही धेन्वै ब्राह्मण्यै आणि धेनवे ब्राह्मणाय येथें धेनुशब्दाहून कन्प्रत्यय व त्याचा लुप् झाला आहे. श्रियै ब्राह्मण्यै, श्रिये ब्राह्मणाय, भ्रुवै ब्राह्मण्यै, भ्रुवे ब्राह्मणाय, येथें श्री आणि भ्रू या शब्दांहून आचारार्थी क्विप् (३।१।११ वा.४), नंतर कृत्प्रत्यय क्विप् (३।२।७६) केला आहे.

ब्राह्मण्यै । क मा भूत् । शकटये अतिशकटये ब्राह्मणाय । धेन्वै अतिधेन्वै ब्राह्मण्यै । क मा भूत् । धेनवे अतिधेनवे ब्राह्मणाय । श्रियै अतिश्रियै ब्राह्मण्यै । क मा भूत् । श्रिये अतिश्रिये ब्राह्मणाय । भ्रुवै अतिभ्रुवै ब्राह्मण्यै । क मा भूत् । भ्रुवे अतिभ्रुवे ब्राह्मणाय ॥

किमर्थं पुनरिदमुच्यते । प्रथमलिङ्गग्रहणं चोदितम् । तद्द्वेष्यं विजानीयात्सर्वमेतद्विकल्पत इति । तदाचार्यः सुहृद्भूत्वान्वाचष्टे ह्रस्वौ चेयुव्स्थानौ च प्रवृत्तौ च प्राक्च प्रवृत्तेः स्त्रीवचनावेवेति ॥

**[नेयङुवङ्स्थानावस्त्री ॥ १ । ४ । ४ ॥**

**वामि ॥ १ । ४ । ५ ॥**

**ङिति ह्रस्वश्च ॥ १ । ४ । ६ ॥**

**शेषो घ्यसखि ॥ १ । ४ । ७ ॥**

**पतिः समास एव ॥ १ । ४ । ८ ॥]**

**षष्ठीयुक्तश्छन्दसि वा ॥ १ । ४ । ९ ॥**

योगविभागः कर्तव्यः । षष्ठीयुक्तश्छन्दसि । षष्ठीयुक्तः पतिशब्दश्छन्दसि घिसंज्ञो भवति । ततो वा । वा छन्दसि सर्वे विधयो भवन्ति । सुपां व्यत्ययः । तिङां व्यत्ययः । वर्णव्यत्ययः । लिङ्ग-

---

धेनवे अतिधेनवे ब्राह्मणाय येथें होऊं नये. तसेंच श्रियै अतिश्रियै ब्राह्मण्यै येथेंच नदीसंज्ञा व्हावी आणि श्रिये अतिश्रिये ब्राह्मणाय येथें होऊं नये. तसेंच भ्रुवै अतिभ्रुवै ब्राह्मण्यै येथेंच नदीसंज्ञा व्हावी आणि भ्रुवे अतिभ्रुवे ब्राह्मणाय येथें होऊं नये.

आतां 'ह्रस्वेयुवूस्थान' हें वचन कशासाठीं बरें करावें लागत आहे ? 'प्रथमलिङ्गग्रहणं च' (वा.२) हें वचन केलें खरें, पण त्यापासून अनिष्टही होत आहे असें समजतें. कारण त्या वचनावरून अतिश्रियै ब्राह्मण्यै, अतिश्रिये ब्राह्मणाय, इत्यादि सर्व ठिकाणीं तशीच कल्पना होऊन नदीसंज्ञेचा विकल्प होऊं लागेल; म्हणून हा आचार्य मित्राप्रमाणें कळकळीनें सांगतो की ह्रस्व-इवर्णोवर्णान्तशब्द किंवा दीर्घ-ईवर्णोवर्णान्तशब्द वृत्तीच्या पूर्वीं आणि वृत्तीच्या नंतर स्त्रीलिंगीच असतां ते नदीसंज्ञक होतात.

(सू.९) या सूत्राचा विभाग करावा. तो असा– 'षष्ठीयुक्तश्छन्दसि': षष्ठ्यन्तानें युक्त झालेला पतिशब्द घिसंज्ञक होतो, असा त्याचा अर्थ. त्याच्या पुढें 'वा' हें निराळें सूत्र. वेदामध्यें सर्व विधि विकल्पानें होतात, असा त्याचा अर्थ होय. त्यामुळें सुप्प्रत्ययाचा व्यत्यय[२],

---

१.(४) स्त्रीशब्दाशिवाय ज्या अंगामध्यें क्वचित्स्थलीं इयङ् किंवा उवङ् यांची स्थिति दृष्टीस पडते अशा नित्यस्त्रीलिंगी दीर्घईकारान्त किंवा दीर्घऊकारान्त अंगाला नदीसंज्ञा होत नाहीं; उदा– हे श्रीः, हे भ्रूः.

(५) इयङ् उवङ् यांचा स्थानी म्हणून पाहिलेला असा जो स्त्रीशब्दाशिवाय नित्य स्त्रीलिंगी दीर्घ ईकारान्त आणि दीर्घ ऊकारान्त शब्द त्याला आम्प्रत्यय पुढें असतांना नदीसंज्ञा विकल्पानें होते; उदा०– श्रीणां श्रियाम् , भ्रूणां भ्रुवाम्.

(६) इयङ् उवङ् यांचा स्थानी म्हणून दृष्ट असा जो स्त्रीशब्दाशिवाय नित्य स्त्रीलिंगी दीर्घईकारान्त किंवा ऊकारान्त शब्द आणि स्त्रीलिंगी असा जो ह्रस्वइकारान्त किंवा ह्रस्वउकारान्त शब्द त्याला ङकारेत्संज्ञक प्रत्यय पुढें असतांना विकल्पानें नदीसंज्ञा होते:उदा०– श्रियै श्रिये, भ्रुवै भ्रुवे, रुच्यै रुचये, धेन्वै धेनवे.

(७) नदीसंज्ञा न झालेला असा सखिशब्दाशिवाय ऱ्हस्वइवर्णान्त किंवा ऱ्हस्वउवर्णान्त शब्द त्याला घिसंज्ञा होते; उदा०—हरये.

(८) पतिशब्दाला घिसंज्ञा करणें झाल्यास समासांतच करावी; एरवीं करूं नये; उदा० – भूपतये.

१. समासांत न सांपडलेल्या पण षष्ठ्यन्तार्थाबरोबर अन्वय पावलेल्या अशा पतिशब्दाला वेदामध्यें विकल्पानें घिसंज्ञा होते; उदा०— 'कुलुञ्चानां पतये नमः' किंवा 'पत्ये नमः'.

२. व्यत्यय म्हणजे रीतसर ज्या ठिकाणीं जो असावा तेथें त्याच्या ऐवजीं दुसरा दृष्टीस पडणें.

व्यत्ययः । कालव्यत्ययः । पुरुषव्यत्ययः । आत्मनेपदव्यत्ययः । परस्मैपदव्यत्ययः ॥ सुपां व्यत्ययः । युक्ता मातासीद्धुरि दक्षिणायाः । दक्षिणायामिति प्राप्ते ॥ तिङां व्यत्ययः । चषालं ये अश्वयूपाय तक्षति । तक्षन्तीति प्राप्ते ॥ वर्णव्यत्ययः । त्रिष्टुभौजः शुभितमुग्रवीरम् । सुहितमिति प्राप्ते ॥ लिङ्गव्यत्ययः । मधोर्गृह्णाति । मधोस्तृप्ता इवासते । मधुन इति प्राप्ते ॥ कालव्यत्ययः । श्वोऽग्नीनाधास्यमानेन । श्वः सोमेन यक्ष्यमाणेन । श्व आधाता श्वो यष्टेति प्राप्ते ॥ पुरुषव्यत्ययः । अधा स वीरैर्दशभिर्वियूयाः । वियूयादिति प्राप्ते ॥ आत्मनेपदव्यत्ययः । ब्रह्मचारिणमिच्छते । इच्छतीति प्राप्ते ॥ परस्मैपदव्यत्ययः । प्रतीपमन्य ऊर्मिर्युध्यति । अन्वीपमन्य ऊर्मिर्युध्यति । युध्यत इति प्राप्ते ॥

**[ह्रस्वं लघु ॥ १ । ४ । १० ॥**

**संयोगे गुरु ॥ १ । ४ । ११ ॥**

**दीर्घं च ॥ १ । ४ । १२ ॥]**

**यस्मात्प्रत्ययविधिस्तदादि प्रत्ययेऽङ्गम् ॥ १ । ४ । १३ ॥**

यस्मादिति व्यपदेशाय ॥ अथ प्र-

---

तिङ्प्रत्ययाचा व्यत्यय, वर्णाचा व्यत्यय, लिङ्गाचा व्यत्यय, कालाचा व्यत्यय, पुरुषाचा व्यत्यय, आत्मनेपदप्रत्ययाचा व्यत्यय, परस्मैपदपदाचा व्यत्यय सिद्ध होतो. सुप्प्रत्याच्या व्यत्ययाचें उदाहरण– युक्ता माताऽऽसीद्धुरि दक्षिणायाः. येथें दक्षिणाशब्दाच्या पुढें सप्तमीप्रत्यय प्राप्त असतां त्याच्या ऐवजीं षष्ठीप्रत्यय घातला आहे. चषालं ये अश्वयूपाय तक्षति येथें तक्षधातूच्या पुढें बहुवचनप्रत्यय प्राप्त असतां त्याच्या ऐवजीं एकवचनप्रत्यय केला आहे, हा तिङाचा व्यत्यय होय. त्रिष्टुभौजः शुभितमुग्रवीरम् येथें सुहित असें प्राप्त असतां शुभित असें वापरलें आहे, हा वर्णव्यत्यय होय. मधोर्गृह्णाति, मधोस्तृप्ता इवाऽऽसते, येथें मधुशब्द नपुंसकलिंगी असल्यामुळें मधुनः असें प्राप्त असतां त्याच्या ऐवजीं मधोः असा पुंलिंगी शब्द घातला आहे, हा लिंगव्यत्यय होय. श्वोऽग्नीनाधास्यमानेन, श्वः सोमेन यक्ष्यमाणेन, येथें आधान आणि याग अनद्यतन भविष्यकाळीं होणार असल्यामुळें धा व यज् या धातूंच्या पुढें लुट्प्रत्यय प्राप्त असतां त्याच्या ऐवजीं लट्प्रत्यय घातला आहे. हा कालव्यत्यय होय. अधा स वीरैर्दशभिर्वियूयाः येथें विउपसर्गाच्या पुढील यूधातूच्या पुढें लिङाचे स्थानीं प्रथमपुरुष प्राप्त असतां त्याच्या ऐवजीं मध्यमपुरुष घातला आहे, हा पुरुषव्यत्यय होय. ब्रह्मचारिणमिच्छते येथें इच्छार्थक इष्धातूच्या पुढें परस्मैपद प्राप्त असतां त्याच्या ऐवजीं आत्मनेपद घातलें आहे, हा आत्मनेपदव्यत्यय होय. प्रतीपमन्य ऊर्मिर्युध्यति येथें युध्धातूच्या पुढें अनुदात्तेत्त्वास्तव आत्मनेपद प्राप्त असतां त्याच्या ऐवजीं परस्मैपद घातलें आहे, हा परस्मैपदव्यत्यय होय.

(सू.१३) अङ्गसंज्ञेचें जें तदादि हें उद्देश्य त्यांतील तत्पदानें कोण घ्यावें हें कळण्यासाठीं यस्मात् हा शब्द घातला आहे.

आतां ‘प्रत्ययविधिः’ येथें जो प्रत्ययशब्द घातला आहे तो कशासाठीं ? विधिशब्दाच्या मागें प्रत्ययशब्द घातल्यावांचून ‘यस्माद्वि-

---

१. (१०) ऱ्हस्वाला लघुसंज्ञा होते.

(११) संयोगाच्या मागील ऱ्हस्व स्वराला गुरुसंज्ञा होते.

(१२) दीर्घ स्वराला गुरुसंज्ञा होते.

१. जो प्रत्यय ज्या प्रकृतीच्या पुढें शास्त्रानें करावयास सांगितला आहे, ती प्रकृति आरंभीं असलेल्या समुदायाला तो प्रत्यय पुढें असतांना अंगसंज्ञा होते; उदा०–भवामि. येथें भूधातूच्या पुढें लट्प्रत्यय

त्ययग्रहणं किमर्थम्। यस्माद्विधिस्तदादि प्रत्ययेऽङ्गमितीयत्युच्यमाने स्त्री इयती स्त्रीयतीत्यत्रापि प्रसज्येत। प्रत्ययग्रहणे पुनः क्रियमाणे न दोषो भवति॥ अथ विधिग्रहणं किमर्थम्। यस्मात्प्रत्ययस्तदादि प्रत्ययेऽङ्गमितीयत्युच्यमाने दधि अधुना मधु अधुना अत्रापि प्रसज्येत। विधिग्रहणे पुनः क्रियमाणे न दोषो भवति॥ तदेतत्प्रत्ययग्रहणेन विधिग्रहणेन च समुदितेन क्रियते संनियोगः। यस्माद्यः प्रत्ययो विधीयते तदादि तस्मिन्नङ्गसंज्ञं भवतीति॥ अथ तदादिग्रहणं किमर्थम्।

**अङ्गसंज्ञायां तदादिवचनं स्यादिनुमर्थम्॥ १॥**

अङ्गसंज्ञायां तदादिग्रहणं क्रियते स्याद्यर्थं नुमर्थं च॥ स्याद्यर्थं तावत्।

धिस्तदादि प्रत्ययेऽङ्गम्' एवढेंच सूत्र केलें तर स्त्री इयती येथील स्त्रीशब्दाला अङ्गसंज्ञा होऊं लागेल; आणि विधिशब्दाच्या मागें प्रत्यय शब्द घातला असतां हा दोष येत नाहीं.

आतां 'प्रत्ययविधिः' येथें विधिशब्द घातला तो कशासाठीं ?

विधिशब्द घातल्यावांचून 'यस्मात्प्रत्ययस्तदादि प्रत्ययेऽङ्गम्' एवढेंच सूत्र केलें तर दधि अधुना, मधु अधुना, येथें दधि व मधु या शब्दांला अङ्गसंज्ञा होऊं लागेल; आणि विधिशब्द घातला म्हणजे मात्र हा दोष येत नाहीं. कारण विधिशब्द आणि प्रत्ययशब्द या उभयतांच्या संनियोगानें ज्या प्रकृतीच्या पुढें जो प्रत्यय करावयास शास्त्रानें सांगितलें ती प्रकृति आरंभीं असलेल्या त्या प्रत्ययापर्यंतच्या समुदायाला तो प्रत्यय पुढें असतां अङ्गसंज्ञा होते असा अर्थ होतो.

आतां येथें तदादि असा जो शब्द घातला आहे तो कशासाठीं ?

(वा.१) अङ्गसंज्ञाविधायक सूत्रामध्यें तदादि हा शब्द घातला तो स्य, शप्, वगैरे विकरणविशिष्टाला आणि नुमागमविशिष्टाला अङ्गसंज्ञा व्हावी यासाठीं घातला आहे. स्य, शप्, वगैरे विकरणविशिष्टाला अङ्गसंज्ञा झाल्याचें उदाहरणः— करिष्यावः करिष्यामः. नुमागमविशिष्टाला अङ्गसंज्ञा झाल्याचें उदा-

---

करण्यास शास्त्रानें (३।२।१२३) सांगितलें आहे. म्हणून भू आरंभीं असलेल्या त्या लट्प्रत्ययाच्या मागील भू, अ या समुदायाला अंगसंज्ञा होते, म्हणून दीर्घ (७।३।१०१) झाला आहे.

२. इदम्शब्दाहून वतुप्प्रत्यय, त्यांतील वकाराला घकार (५।२।४०), त्याला इयादेश (७।१।२), इदम्शब्दाला ईश्आदेश (६।३।९०), त्याचा लोप (६।४।१४८) आणि ङीप् (४।१।६) केला असतां इयती असें रूप होतें. प्रत्ययशब्द नसला तर ज्याचें पुढें शास्त्रानें कशाचें तरी विधान केलें आहे तदादि समुदायाला प्रत्यय पुढें असतांना अंगसंज्ञा होते असा अर्थ होईल, आणि स्त्रीशब्दाला येथें अंगसंज्ञा होऊं लागेल. कारण स्त्रीशब्दापुढें प्रथमा एकवचन, सुप्रत्यय, त्याचा लोप याचें शास्त्रानें विधान केलें आहे आणि इयत् हा प्रत्यय पुढें आहे.

३. प्रत्ययशब्द घातला असतां जो प्रत्यय ज्या शब्दाच्या पुढें करावयास सांगितला त्याच प्रत्ययामुळें त्याला अंगसंज्ञा करावयाची, असें प्रत्यासत्तिन्यायानें ठरतें. स्त्री इयती येथें इयत्प्रत्यय स्त्रीशब्दाच्या पुढें करावयास सांगितला नसल्यामुळें इयत्प्रत्ययामुळें स्त्रीशब्दाला अंगसंज्ञा होत नाहीं. सुप्रत्ययामुळें स्त्रीशब्दाला अंगसंज्ञा होईल परंतु त्यामुळें कांहींच दोष येत नाहीं.

४. विधिशब्द नसेल तर ज्या शब्दाच्या पुढें जो प्रत्यय आहे तदादि समुदायाला तो प्रत्यय पुढें असतांना अंगसंज्ञा होते असा अर्थ होईल आणि दधि अधुना येथें अंगसंज्ञा होऊं लागेल. इदम्शब्दाहून अधुनाप्रत्यय (५।३।१६), इश्आदेश (५।३।३), त्याचा लोप(६।४।१४८) होऊन फक्त प्रत्यय शिल्लक राहिला आहे.

५. कृधातूहून लट्प्रत्यय (३।३।१३), त्याच्या स्थानीं वस्, मस् आदेश (३।४।७८), स्यविकरण (३।१।३३), त्याला इडागम (७।२।७०) आणि धातूला गुण (७।३।८४) करून करिस्य+वस् किंवा मस्

करिष्यावः करिष्यामः ॥ नुमर्थम् । कुण्डानि वनानि ॥

## मित्सुटोरुपसंख्यानम् ॥ २ ॥

मित्वतः सुड्वतश्चोपसंख्यानं कर्तव्यम् ॥ मित्वतः । भिनत्ति छिनत्ति । अभिनत् अच्छिनत् ॥ सुड्वतः । संचस्करतुः संचस्करुः ॥ किं पुनः कारणं न सिध्यति । सुटो बहिरङ्गत्वात् । बहिरङ्गः सुट् । अन्तरङ्गो गुणः । असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे । वक्ष्यत्येतत् । संयोगादेर्गुणविधाने संयोगोपधग्रहणं कृञर्थम् । यदि संयोगोपधग्रहणं क्रियते नार्थः संयोगादिग्रहणेन । इहापि सस्वरतुः सस्वरुरिति संयोगोपधस्येत्येव सिद्धम् । भवेदेवमर्थेन

---

हरणः०— कुण्डानि, वनानि.[६]

(वा.२) मकारेत्संज्ञक आगम आणि सुडागम केला असतां तद्विशिष्टाला अङ्गसंज्ञा होते असें वचन करावें. मिदागमविशिष्टाला अङ्गसंज्ञा झाल्याचें उदाहरणः— भिनत्ति[७] छिनत्ति, अभिनत् अच्छिनत्. सुडागमविशिष्टाला अङ्गसंज्ञा झाल्याचें उदाहरणः— संचस्करतुः संचस्करुः.[८]

पण संचस्करतुः हें उदाहरण कां बरें सिद्ध होणार नाहीं ?

एक अडचण अशी की सुडागम बहिरंग आहे आणि गुण अन्तरंग आहे. तेव्हां 'असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे' या परिभाषेनें सुडागम असिद्ध असल्यामुळें गुण होणार नाहीं.

पण याचें उत्तर वार्तिककारांनीं तेथें दिलेंच आहे तें हें की संयोगादि अशा ऋकारान्ताला हा जो गुण सांगितला आहे तेथें संचस्करतुः इत्यादि कृधातूच्या उदाहरणांमध्यें गुण होण्यासाठीं संयोगोपध[९] ह्रस्व ऋकारान्ताला गुणाचें विधान करावें.

जर 'ऋतश्च संयोगादेर्गुणः' येथें संयोगोपध अशा ह्रस्व ऋकारान्ताला गुण सांगितला तर संयोगादेः हा शब्द ठेवण्यांत कांहीं उपयोग दिसत नाहीं. कारण सस्वरतुः सस्वरुः येथेंही संयोगोपध असल्यामुळेंच काम भागेल.[१०]

सस्वरतुः इत्यादि उदाहरणांकरितां संयोगादि शब्द ठेवला पाहिजे असें नाहीं. पण संचस्करतुः संचस्करुः हींच उदाहरणें साधणार[११]

---

असें असतां येथें कृधातूच्या पुढें वस्मस्प्रत्यय करावयास सांगितलें असल्यामुळें कृधातु आरंभीं असलेल्या करिस्य या समुदायाला अंगसंज्ञा झाल्यामुळें 'अतो दीर्घो' (७।३।१०१) यानें दीर्घ होतो.

६. कुण्डशब्दाच्या पुढें जस्प्रत्यय (४।१।२), त्याचे स्थानीं 'शि'आदेश (७।१।२०), नुमागम (७।१।७२). कुण्डन्+इ असें असतां येथें कुण्ड ही प्रकृति आरंभीं असलेल्या कुण्डन् या समुदायाला अंगसंज्ञा होते म्हणून दीर्घ (६।४।८) होतो.

७. भिद्धातूहून लङ् (३।२।१११), त्याचे स्थानीं तिप् (३।४।७८) आणि श्नम् (३।१।७८) झाला आहे. त्या श्नम्विशिष्ट भिनद् याला अंगसंज्ञा झाल्यामुळें त्याला अडागम (६।४।७१) होतो.

८. सम्उपसर्गपूर्वक कृधातूहून लिट्(६।४।११५) याचे स्थानीं तस् (३।४।७८), त्याला अतुस् (३।४।८२), द्वित्व (६।१।८), नंतर सुडागम (६।१।१३७). संचस्कृ-अतुस् असें असतां येथें सुडागमविशिष्टाला अंगसंज्ञा झाल्यामुळें 'ऋतश्च०' (७।४।१०) यानें गुण होतो.

९. जर तेथें 'असिद्धं बहिरङ्गम्' या परिभाषेनें गुण होणार नाहीं, तर त्याकरितां मुद्दाम केलेलें संयोगोपधग्रहण व्यर्थ होईल. तेव्हां त्याच्या जोरावर तेथें ती परिभाषा प्रवृत्त होत नाहीं.

१०. व चक्रतुः चक्रुः येथें संयोगादि नसल्यामुळें गुण होत नाहीं. तो आतां संयोगोपध नसल्यामुळें होणार नाही.

११. संयोगादि शब्द ठेवला नाहीं तर सस्वरतुः अशाच ठिकाणीं गुण व्हावा व चक्रतुः अशा ठिकाणीं होऊं नये असा संयोगोपध शब्दाचा उपयोग होत असल्यामुळें त्याच्या जोरावर जी अंतरंगपरिभाषा दूर होते ती होणार नाहीं.

नार्थः । इदं तु न सिध्यति संचस्करतुः संचस्करुः ॥ किं पुनः कारणं न सिध्यति । इह तस्य वा ग्रहणं भवति तदादेर्वा न चेदं तत्रापि तदादि ।

## सिद्धं तु तदाद्यादिवचनात् ॥ ३ ॥

सिद्धमेतत् । कथम् । तदाद्याद्यङ्गसंज्ञं भवतीति वक्तव्यम् । किमिदं तदाद्यादीति । तस्यादिस्तदादिः । तदादिरादिर्यस्य तदिदं तदाद्यादीति ॥ स तर्हि तथा निर्देशः कर्तव्यः । न कर्तव्यः । उत्तरपदलोपोऽत्र द्रष्टव्यः । तद्यथा । उष्ट्रमुखमिव मुखमस्योष्ट्रमुखः । खरमुखः । एवं तदाद्यादि तदादीति ॥

## तदेकदेशविज्ञानाद्वा सिद्धम् ॥ ४ ॥

तदेकदेशविज्ञानाद्वा सिद्धमेतत् । तदेकदेशभूतं तद्ग्रहणेन गृह्यते । तद्यथा । गङ्गा यमुना देवदत्तेति । अनेका नदी गङ्गां यमुनां च प्रविष्टा गङ्गायमुनाग्रहणेन गृह्यते । तथा देवदत्तास्थो गर्भो देवदत्ताग्रहणेन गृह्यते ॥ विषम उपन्यासः । इह

---

नाहींत. मग आतां तशा रीतीनें संचस्करतुः संचस्करुः हीं उदाहरणें कां बरें सिद्ध होणार नाहींत ? ह्या प्रकृत सूत्रांतील तदादिशब्दानें काय अडचण येत आहे की ज्याकरितां सुडागमविशिष्टाला अङ्गसंज्ञा येथें मुद्दाम सांगावी लागत आहे ?

ज्या प्रकृतीपुढें प्रत्यय करावयास शास्त्रानें सांगितलें आहे त्या प्रकृतीला किंवा ती प्रकृति आरंभीं असलेल्या समुदायाला अङ्गसंज्ञा प्रकृत सूत्रानें सांगितली आहे; आणि येथें तर सुडागमविशिष्ट स्कृ ही लिट्प्रत्ययाची प्रकृति नव्हे व ती प्रकृति आरंभीं असलेला समुदायही नव्हे.

(वा.३) हें सर्व साधत आहे.

तें कसें ?

या सूत्रांत तदादि शब्दाच्या ऐवजीं तदाद्यादि असा शब्द घालावा म्हणजे झालें.

तदाद्यादि हा समास कसा सोडवावयाचा ?

तस्य आदिः तदादिः. तदादिः आदिर्यस्य तत् तदाद्यादि.[12]

तर मग 'तदाद्यादि' हा शब्द घातला पाहिजे.

तो शब्द घालावयास नको. कारण येथें उत्तरपदाचा लोप झाला आहे असें समजावें; जसें– उष्ट्राच्या मुखाप्रमाणें आहे मुख ज्याचें त्याला उष्ट्रमुख[13] असेंच म्हणतात. तसें त्याचा आदिवर्ण आहे आद्यावयव ज्याचा त्याला तदादि असें म्हणतां येईल.

(वा.४) अथवा मित् आणि सुट् हे ज्याला सांगितले आहेत त्याचे अवयवच[14] ते आहेत असें समजल्यानें मिद्विशिष्टाला किंवा सुड्विशिष्टाला अंगसंज्ञा साधत आहे. कारण जो ज्याचा अवयव त्याचें नांव त्या अवयवसहिताला लागू केलें जातें; जसें– गङ्गा, यमुना, देवदत्ता. गंगेमध्यें किंवा यमुनेमध्यें प्रविष्ट झालेल्या अनेक नद्या गंगा आणि यमुना ह्या

---

१२. भिनत्ति येथें भिद् ह्या मूळ प्रकृतीचा आदि भकार तो भकार भिनद् या समुदायाचा आद्यावयव आहे. तसेंच संचस्करतुः येथें कृ ह्या मूळ प्रकृतीचा आदि ककार आहे. तो ककार चस्कृ या समुदायाचा आद्यावयव आहे. चकार हा ककाराचा स्थानीच (७।४।६२) झाला असल्यामुळें ककाराप्रमाणें चकारही कृ याचा आदि समजला जातो. तेव्हां भिनद् आणि चस्कृ या समुदायाला अंगसंज्ञा होण्याला कांहीं हरकत नाहीं.

१३. उष्ट्रमुख असा तत्पुरुषसमास केल्यानंतर त्याचा मुखशब्दाबरोबर बहुव्रीहिसमास केल्यानंतर त्या तत्पुरुषसमासांतील उत्तरपद जो मुखशब्द त्याचा लोप होतो. त्याप्रमाणें येथेंही तदादि हा तत्पुरुषसमास केल्यानंतर त्याचा आदिशब्दाबरोबर बहुव्रीहि झाला असतां त्या तत्पुरुषांतील उत्तरपद जो आदिशब्द त्याचा लोप झाला आहे.

१४. मिदचो०(१।१।४७), आद्यन्तौ(१।१।४६), हीं सूत्रें पहा.

केचिच्छब्दा अक्तपरिमाणानामर्थानां वाचका भवन्ति य एते संख्याशब्दाः परिमाणशब्दाश्च । पञ्च सप्तेत्येकेनाप्यपाये न भवन्ति । द्रोणः खार्याढकमिति नैवाधिके भवन्ति न च न्यूने । केचिद्यावदेव तद्भवति तावदेवाहुर्य एते जातिशब्दा गुणशब्दाश्च । तैलं घृतमिति खार्यामपि भवन्ति द्रोणेऽपि । शुक्लो नीलः कृष्ण इति हिमवत्यपि भवति वटकणिकामात्रेऽपि द्रव्ये । अङ्गसंज्ञा चाप्यक्तपरिमाणानां क्रियते सा केनाधिकस्य स्यात् ॥ एवं तर्ह्याचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति तदेकदेशभूतं तद्ग्रहणेन गृह्यत इति यदयं नेदमदसोरकोः [७.१.११] इति सककारयोः प्रतिषेधं शास्ति । कथं कृत्वा ज्ञापकम् । इदमदसोः कार्यमुच्यमानं कः प्रसङ्गो यत्सककारयोः स्यात् । पश्यति त्वाचार्यस्तदेकदेशभूतं तद्ग्रहणेन गृह्यत इति ततः सककारयोः प्रतिषेधं शास्ति ॥

अथ द्वितीयं प्रत्ययग्रहणं किमर्थम् ।

---

शब्दांनीं घेतल्या जातात. तसेंच देवदत्ता नांवाच्या स्त्रीच्या उदरांत प्रविष्ट झालेला जो गर्भ त्यासकटच तिला देवदत्ता म्हणतात.

हा दृष्टान्त बरोबर नाहीं. कारण लोकांमध्यें कांहीं शब्दांचे अर्थ ठराविक परिमाणाचेच असतात; त्यांमध्यें कमीजास्तपणा बिलकूल खपत नाहीं. ते शब्द म्हणजे संख्याशब्द व परिमाणशब्द होत. पांच, सात वगैरे संख्याशब्द एक कमी झाला तरी तेवढ्यानें उपयोगांत आणतां येत नाहींत. तसेंच द्रोण[15], आढक, खारी वगैरे परिमाणवाचक शब्द होत. धान्यामध्यें थोडा कमीजास्तपणा झाला की तेवढ्यानें हे शब्द उपयोगांत आणतां येत नाहींत. कांहीं एक शब्द असे आहेत की वस्तु केवढीही असो त्या अर्थी ते शब्द उपयोगांत आणतां येतात. ते शब्द म्हणजे जातिशब्द आणि गुणशब्द होत. तेल पावशेर असो किंवा पीपभर असो त्याला तैल हा शब्द लागू पडतो. तसेंच शुक्ल, नील, कृष्ण हे शब्द होत. पांढऱ्या रंगाचा पदार्थ हिमाचल असो किंवा वडाच्या बियाप्रमाणें लहान असो त्याला शुक्ल शब्द लागू पडतो. येथें अङ्गसंज्ञा ही ठराविक स्वरूपाच्या शब्दाला सांगितली[16] आहे. ती त्या स्वरूपामध्यें वाढ झाली असतां कशी बरें होईल ?

असें आहे तर ज्याच्यामध्यें जो प्रविष्ट झाला त्याच्या नांवानें तो घेतला जातो अशाविषयीं आचार्यांची कृतिच ज्ञापक आहे. ज्यापेक्षां हा आचार्य 'नेदमदसोरकोः' (७।१।११) या सूत्रामध्यें अकोः असें म्हणतो.

कसें बरें हें ज्ञापक जमतें ?

इदम् आणि अदस् या शब्दांच्या पुढील भिस्प्रत्ययाचे स्थानीं होणाऱ्या ऐस्आदेशाचा (७।१।९) निषेध त्या सूत्रानें सांगितला आहे. तेव्हां त्या शब्दांच्या संबंधानें सांगितलेला निषेध ककारविशिष्ट अशा इदकम् आणि अदकस् या शब्दांना कसा बरें लागू पडेल? कारण इदकम् आणि अदकस् ह्या शब्दांना इदम् आणि अदस् असें म्हणतांच येत नाहीं. तेव्हां अकोः हें विशेषण देण्याची गरजच नाहीं. त्यावरून आचार्य असें समजतो की जो ज्याच्यामध्यें प्रविष्ट झाला तो त्याच्या नांवानें घेतला जातो. आणि असें समजतो म्हणूनच त्या निषेधांत इदकम् आणि अदकस् हे शब्द वगळण्याकरितां अकोः असें म्हणतो.

आतां येथें दुसऱ्यांदा प्रत्यय हा शब्द

---

१५. द्रोण म्हणजे आठ पायल्या. खारी म्हणजे बत्तीस पायल्या. आढक म्हणजे एक पायली.

१६. ह्या सूत्रामध्यें तदादि या तच्छब्दानें प्रत्ययाची प्रकृति घेतली आहे. भिनत्ति, संचस्करतुः, येथें तिङ्प्रत्ययाची प्रकृति धातु आहे (३।४।७८) आणि धातु ही संज्ञा तर भू, एध अशीं ठराविक स्वरूपें उच्चारून (१।३।१) सांगितली आहे.

**प्रत्ययग्रहणं पदादावप्रसङ्गार्थम् ॥५॥**

प्रत्ययग्रहणं क्रियते पदादावङ्गसंज्ञा मा भूदिति । किं च स्यात् । स्त्र्यर्थम् श्र्यर्थम् भ्र्वर्थम् । अङ्गस्येतीयङुवङौ स्याताम् ॥

**परिमाणार्थं च ॥६॥**

परिमाणार्थं च द्वितीयं प्रत्ययग्रहणं क्रियते। यस्मात्प्रत्ययविधिस्तदाद्यङ्गमितीयत्युच्यमाने दाशतयस्याप्यङ्गसंज्ञा प्रसज्येत ॥

तत्तर्हि कर्तव्यम् । न कर्तव्यम् । केनेदानीमङ्गकार्यं भविष्यति । प्रत्यय इति प्रकृत्याङ्गकार्यमध्येष्ये । यदि प्रत्यय इति प्रकृत्याङ्गकार्यमधीषे प्राकरोत् उपैहिष्ट उपसर्गात्पूर्वावडाटौ प्राप्नुतः ।

**सिद्धं तु प्रत्ययग्रहणे यस्मात्स तदादितदन्तविज्ञानात् ॥ ७ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । प्रत्ययग्रहणे यस्मात्स प्रत्ययो विहितस्तदादेस्तदन्तस्य च ग्रहणं भवतीत्येषा परिभाषा कर्तव्या ॥

---

कशाकरितां घातला आहे ?

(वा.५) पद, धातु, वगैरे पुढ असतां त्याच्या मागील शब्दाला अङ्गसंज्ञा न व्हावी यासाठीं प्रत्यये हा शब्द घातला आहे.

तशा ठिकाणीं अंगसंज्ञा झाली तर काय दोष येईल ?

स्त्र्यर्थम्[17], श्र्यर्थम्, भ्र्वर्थम् येथें अंगाला सांगितलेले इयङ्, उवङ्, हे आदेश (६।४।७७) होऊं लागतील.

(वा.६) अंगसंज्ञा केवढ्या समुदायाला करावी ती इयत्ता ठरविणें हाही त्या दुसऱ्या प्रत्ययशब्दाचा उपयोग आहे. जर 'यस्मात्प्रत्ययविधिस्तदाद्यङ्गम्' म्हणजे ज्या प्रकृतीहून प्रत्यय केला आहे ती प्रकृति आरंभीं असलेल्या समुदायाला अङ्गसंज्ञा होते, एवढेंच म्हटलें तर ती प्रकृति आरंभीं असलेल्या अशा सबंध दहा मंडलांच्या समुदायाला अंगसंज्ञा[18] होईल.

तर मग आहे तसें हें सबंध सूत्र ठेवलें पाहिजे.

सूत्र ठेवावयास नको.

तर मग आतां हीं अंगाला सांगितलेलीं कार्यें कशानें बरें होतील ?

अङ्गस्य याचे जागीं 'प्रत्यये' असें सूत्र करून त्या अधिकारामध्यें तीं कार्यें पठित करावींत.

जर 'प्रत्यये' असा अधिकार करून अङ्गकार्यांचें पठन करशील तर प्राकरोत्, उपैहिष्ट, येथें उपसर्गाच्या मागें अट् (६।४।७१) व आट्[19] (६।४।७२) होऊं लागतील.

(वा.७) वरील उदाहरणांमध्यें धातूंच्या मागेंच अट् आणि आट् होतील.

ते कसे ?

'प्रत्ययग्रहणे यस्मात्स विहितस्तदादेस्तदन्तस्य ग्रहणम्' म्हणजे प्रत्ययाचें ग्रहण केलें असतां तेथें तो प्रत्यय ज्या प्रकृतीहून केला असेल ती प्रकृति ज्या समुदायाच्या आरंभीं असेल आणि तो प्रत्यय शेवटीं असेल अशा समुदायाचें ग्रहण होतें, अशी परिभाषा करावी म्हणजे झालें.

---

१७. स्त्री, श्री, भ्रू या शब्दांहून चतुर्थीप्रत्यय करून नंतर त्यांचा अर्थशब्दाबरोबर तत्पुरुष (२।१।३६, वा.४) आणि चतुर्थीप्रत्ययाचा लुक् (२।४।७१) झाला आहे.

१८. तेव्हां देवदत्त ओदनमपाक्षीत् येथें देवदत्तशब्दाच्या पुढें सुप्रत्ययाचें विधान केलें असल्यामुळें तो देवदत्तशब्द आरंभीं असलेल्या त्या सर्व वाक्याला अंगसंज्ञा होईल. त्यामुळें अंगाला होणारा अडागम (६।४।७१) त्या वाक्याच्या पूर्वीं होऊं लागेल.

१९. प्रत्यय पुढें असतांना मागील अंगालाच अट् होतो असा नियम नसल्यामुळें प्रक्र एवढ्या भागालाही अडागम होऊं लागेल.

कः पुनरत्र विशेष एषा परिभाषा क्रियेत प्रत्ययग्रहणं वा । अवश्यमेषा परिभाषा कर्तव्या । बहून्येतस्याः परिभाषायाः प्रयोजनानि ।

**प्रयोजनं धातुप्रातिपदिकप्रत्ययसमासतद्धितविधिस्वराः ॥ ८ ॥**

धातु । देवदत्तश्चिकीर्षति । संघातस्य धातुसंज्ञा प्राप्नोति ॥ प्रातिपदिक । देवदत्तो गार्ग्यः । संघातस्य प्रातिपदिकसंज्ञा प्राप्नोति ॥ प्रत्यय । महान्तं पुत्रमिच्छति । संघातात्प्रत्ययोत्पत्तिः प्राप्नोति ॥ समास । ऋद्धस्य राज्ञः पुरुषः । संघातस्य समाससंज्ञा प्राप्नोति ॥ तद्धितविधि । देवदत्तो गार्ग्यायणः । संघातात्तद्धितोत्पत्तिः प्राप्नोति ॥ स्वर । देवदत्तो गार्ग्यः । संघातस्य ञ्नित्यादिर्नित्यम् [६.१.१९७] इत्याद्युदात्तत्वं प्राप्नोति ॥ प्रत्ययग्रहणे यस्मात्स तदादेस्तदन्तस्य ग्रहणं भवतीति न दोषो भवति ॥ सा तर्ह्येषा परिभाषा कर्तव्या । न कर्तव्या । एवं वक्ष्यामि । यस्मात्प्रत्ययविधिस्तदादि प्रत्यये गृह्यमाणे गृह्यते । ततोऽङ्गम् । अङ्गसंज्ञं च भवति यस्मा-

---

मग ही परिभाषा केली काय आणि प्रत्यय पुढें असतांना अङ्गसंज्ञा सांगणारें हें सूत्र केलें काय यांत काय बरें फरक आहे?

परिभाषा ही तर अवश्य केलीच पाहिजे. कारण या परिभाषेनें सिद्ध होणारीं अशीं पुष्कळच उदाहरणें आहेत.

(वा.८) ही परिभाषा नसेल तर देवदत्तश्चिकीर्षति येथें देवदत्तश्चिकीर्ष[२०] या समुदायाला धातुसंज्ञा (३।१।३२) प्राप्त होते ती चिकीर्ष यालाच होते. तसेंच देवदत्तो गार्ग्यः येथें देवदत्तो गार्ग्य या समुदायाला तद्धितप्रत्ययान्त म्हणून प्रातिपदिकसंज्ञा (१।२।४६) प्राप्त होते ती गार्ग्य यालाच होते. तसेंच महान्तं पुत्रम् इच्छति येथें महान्तं पुत्रम् हा समुदाय सुबन्त आहे असें समजून त्याहून क्यच्प्रत्यय प्राप्त होतो. तो (३।१।८) फक्त पुत्रम् याहूनच होतो. तसेंच ऋद्धस्य राज्ञः पुरुषः येथें 'ऋद्धस्य राज्ञः' हा समुदाय षष्ठीप्रत्ययान्त आहे असें समजून त्याचा पुरुषशब्दाबरोबर समास (२।२।८) प्राप्त होतो. तसेंच देवदत्तो गार्ग्यः येथें 'देवदत्तो गार्ग्य' हा समुदाय यञ्प्रत्ययान्त आहे असें[२१] समजून त्याहून फक् हा तद्धितप्रत्यय (४।१।१०१) प्राप्त होतो. तसेंच तेथें देवदत्तो गार्ग्य हा समुदाय ञित्प्रत्ययान्त आहे असें समजून त्याच्या आदीला म्हणजे एकाराला 'ञ्नित्यादिर्नित्यम्' (६।१।१९७) यानें उदात्त स्वर प्राप्त होतो. परंतु 'प्रत्ययग्रहणे यस्मात्स विहितस्तदादेर्ग्रहणं भवति' या परिभाषेनें दोष येत नाहीं.

तर मग ह्या प्रत्ययग्रहणपरिभाषेचें वचनरूपानें पठन केलें पाहिजे.

तसें करावयास नको.

कारण 'यस्मात्प्रत्ययविधिस्तदादि प्रत्यये' एवढेंच सूत्र निराळें करावें. तेथें गृह्यमाणे गृह्यते या दोन पदांचा अध्याहार करावा. तेव्हां प्रत्ययाचें ग्रहण केलें असेल तेथें तो प्रत्यय ज्या प्रकृतीहून केला असेल ती प्रकृति आरंभीं असलेल्या समुदायाचें ग्रहण होतें असा त्याचा अर्थ होतो. त्याचे पुढें 'अङ्गम्' असें दुसरें सूत्र होय. ज्याहून प्रत्यय केला आहे ती प्रकृति आरंभीं असलेल्या समुदायाला तो प्रत्यय पुढें असतांना अङ्गसंज्ञा होते असा

---

२०. कृधातूहून सन्प्रत्यय (३।१।७) केला आहे. त्या सन्प्रत्ययाची प्रकृति कृ ही आहे. त्या प्रकृतीच्या मागील जो देवदत्तशब्द तो त्या सन्प्रत्ययामुळें होणाऱ्या धातुसंज्ञेमध्यें शिरत नाहीं.

२१. गर्गशब्दाहून यञ् हा तद्धित प्रत्यय (४।१।१०५) झाला आहे. तेव्हां गर्ग एवढीच त्याची प्रकृति आहे.

त्प्रत्ययविधिस्तदादि प्रत्यये ॥

यदि प्रत्ययग्रहणे यस्मात्स तदादेर्ग्रहणं भवतीत्युच्यते अवतप्तेनकुलस्थितं त एतत् उदकेविशीर्णं त एतत् सगतिकेन सनकुलेन च समासो न प्राप्नोति । एवं तर्हि प्रत्ययग्रहणे यस्मात्स तदादेर्ग्रहणं भवतीत्युक्त्वा ततो वक्ष्यामि

**कृद्ग्रहणे गतिकारकपूर्वस्यापि ॥९॥**

कृद्ग्रहणे गतिकारकपूर्वस्यापि ग्रहणं भवतीत्येषा परिभाषा कर्तव्या ॥ कान्येतस्याः परिभाषायाः प्रयोजनानि ।

**प्रयोजनं समासतद्धितविधिस्वराः॥१०**

समास । अवतप्तेनकुलस्थितं त एतत् । उदकेविशीर्णं त एतत् । सगतिकेन सनकुलेन च समासः सिद्धो भवति । समास ॥ तद्धितविधि । सांकूटिनम् व्यावक्रोशी । संघातात्तद्धितोत्पत्तिः सिद्धा भवति । तद्धितविधि॥ स्वर । दूरात् आगतः दूरादागत इति । अन्तस्थाथघञ्क्ताजबित्रकाणाम् [६.२.१४३;१४४] इत्येष स्वरः सिद्धो

त्याचा अर्थ होय.

जर 'प्रत्ययाचें ग्रहण केलें असेल तेथें तो प्रत्यय ज्या प्रकृतीहून केला ती प्रकृति आरंभीं असलेल्या समुदायाचें ग्रहण होतें' ही परिभाषा घेतली तर 'अवतप्तेनकुलस्थितं त एतत्', 'उदकेविशीर्णं त एतत्', येथें नकुलशब्दविशिष्ट आणि गतिसंज्ञकविशिष्ट अशा नकुलस्थित आणि विशीर्ण या क्तप्रत्ययान्त समुदायाबरोबर अवतप्ते आणि उदके या सप्तम्यन्ताचा समास होणार नाहीं.

असें आहे तर 'प्रत्ययग्रहणे यस्मात्स तदादेर्ग्रहणं भवति' ही परिभाषा सांगून तिच्यापुढें (वा.९) असें सांगण्यांत येईलः कृत्प्रत्ययाचें ग्रहण केलें असतां तेथें त्या कृत्प्रत्ययानें तो कृत्प्रत्यय ज्या धातूहून केला त्या धातूच्या मागें गति किंवा कारक हे समासांतील पूर्वपद असेल तर तत्सहित समुदायाला कृत्प्रत्ययान्त असें समजावें. म्हणजे गतिकारक सहितालाही आरंभ करून तो प्रत्यय संपेपर्यंतच्या समुदायाचें ग्रहण करावें असें सांगेन. म्हणजे 'कृद्ग्रहणे गतिकारकपूर्वस्यापि ग्रहणम्' अशी परिभाषा करण्यांत यावी.

या परिभाषेचीं उदाहरणें कोणतीं ?

(वा.१०) अवतप्तेनकुलस्थितं[२२] त एतत्, उदकेविशीर्णं त एतत्. येथें नकुलशब्दविशिष्ट आणि गतिसंज्ञकविशब्दविशिष्ट अशा नकुलस्थित आणि विशीर्ण या क्तप्रत्ययान्त समुदायाबरोबर अवतप्ते आणि उदके या सप्तम्यन्ताचा समास झाला आहे. सांकूटिनम्[२३] व्यावक्रोशी येथें गतिविशिष्ट समुदायाहून तद्धितप्रत्ययाची उत्पत्ति सिद्ध होते. दूरात् आगतः दूरादागतः या पंचमी तत्पुरुष समासामध्यें गतिविशिष्ट आगत या क्तप्रत्य-

२२. येथें सप्तमीतत्पुरुष (२।१।४७) आणि सप्तमीचा अलुक् (६।३।१४) झाला आहे.

२३. सम् या उपसर्गापुढील कूटधातूहून इनुण् हा कृत्प्रत्यय (३।३।४४) झाला आहे. नंतर सम् याचा कूटिन् या कृत्प्रत्ययान्त उत्तरपदाबरोबरच गतिकारकोपपदानां कृद्भिः सह समासवचनम् (४।१।४८, वा.४) या परिभाषेनें समास झाला आहे. सम् हें समासांतील पूर्वपद झाल्यामुळें कृद्ग्रहणे ही परिभाषा प्रवृत्त होते; म्हणून सम् या गतिसहित संकूटिन् एवढा समुदाय इनुण्प्रत्ययान्त समजल्यामुळें त्याहून अण् हा तद्धितप्रत्यय (५।४।१५) होतो, आणि आदिवृद्धि (७।२।११७) सम् यांतील अकाराला होते. व्यावक्रोशी येथें वि, अव, या दोन उपसर्गांपुढील क्रुशधातूहून णच् हा कृत्प्रत्यय (३।३।४३) झाला आहे. तेथेंही वि आणि अव यांचा क्रोश या कृत्प्रत्ययान्ताबरोबरच समास होतो, म्हणून कृद्ग्रहण हा परिभाषेनें व्यव या गतीसहित व्यवक्रोश एवढा समुदाय णच्प्रत्ययान्त समजल्यामुळें त्याहून अञ् या तद्धितप्रत्यय (५।४।१४) होतो. आणि आदिवृद्धि व्यव यांतील पहिल्या अकाराला होते.

भवति ॥ कृद्ग्रहणे गतिकारकपूर्वस्यापि ग्रहणं भवतीति न दोषो भवति ॥ सा तर्ह्येषा परिभाषा कर्तव्या । न कर्तव्या । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति भवत्येषा परिभाषेति यदयं गतिरनन्तरः [६.२.४९] इत्यनन्तरग्रहणं करोति ॥

## सुप्तिङन्तं पदम् ॥ १।४।१४ ॥

अन्तग्रहणं किमर्थं न सुप्तिङ् पदमित्येवोच्येत । केनेदानीं तदन्तानां भविष्यति । तदन्तविधिना ॥ अत उत्तरं पठति ।

## पदसंज्ञायामन्तवचनमन्यत्र संज्ञाविधौ प्रत्ययग्रहणे तदन्तविधिप्रतिषेधार्थम् ॥ १ ॥

पदसंज्ञायामन्तग्रहणं क्रियते ज्ञापकार्थम् । किं ज्ञाप्यम् । एतज्ज्ञापयत्याचार्योऽन्यत्र संज्ञाविधौ प्रत्ययग्रहणे तदन्तविधिर्न भवतीति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । तरप्तमपौ घः [१.१.२२] तरप्तमबन्तस्य घसंज्ञा न भवति । क्व च स्यात् । कुमारी गौरितरा । घादिषु नद्या ह्रस्वो भवतीति ह्रस्वत्वं प्रसज्येत ॥

---

यान्त उत्तरपदाला 'अन्तः' (६।२।१४३) या अधिकारांतील 'थाथघञ्०' (६।२।१४४) या सूत्रानें अन्तोदात्त स्वर सिद्ध होतो. 'कृद्ग्रहणे गतिकारकपूर्वस्यापि ग्रहणम्' ही परिभाषा आहे म्हणून हें सर्व साधत आहे.

तर मग तशा परिभाषेचे वचनरूपानें पठन केलें पाहिजे.

तसें करावयास नको. कारण हा आचार्य 'गतिरनन्तरः' (६।२।४९) या सूत्रामध्यें अनन्तरग्रहण करतो ही आचार्यांची कृतिच या परिभाषेला ज्ञापक[२४] आहे.

(सू.१४) येथें अन्त हा शब्द घातला आहे तो कशासाठीं ? तो शब्द घालावयास नको. 'सुप्तिङ् पदम्' असेंच सूत्र करण्यांत यावें.

तर मग आतां सुबन्त किंवा तिङन्त-या समुदायाला पदसंज्ञा कशी बरें होईल ?

सुप् किंवा तिङ् हें प्रत्ययग्रहण असल्यामुळें प्रत्ययग्रहणपरिभाषेनें तदन्तविधि होऊन सुबन्त, तिङन्त, असा अर्थ होईल.

यानंतर वार्तिककार म्हणतात—

(वा.१) पदसंज्ञाविधायक सूत्रामध्यें ज्ञापकाकरितां अन्तशब्द घातला आहे.

या ज्ञापकानें काय सुचवावयाचें ?

या सूत्रावांचून इतर ठिकाणीं संज्ञासूत्रामध्यें प्रत्ययग्रहण केलें असतां तेथें तदन्तविधि होत नाहीं.

हें सुचविल्याचा काय उपयोग ?

'तरप्तमपौ घः' (१।१।२२) यानें सांगितलेली घसंज्ञा तरबन्त किंवा तमबन्त समुदायाला होत नाहीं.

तशा समुदायाला घसंज्ञा झाली तर काय होईल ?

---

२४. क्तप्रत्ययान्त उत्तरपद पुढें असतांना त्याच्या मागील अगदीं जवळचा गतिसंज्ञक शब्द प्रकृतिस्वरानें कायम राहतो, असा त्या सूत्राचा अर्थ आहे. तेथें अभ्युद्धृतम् येथें व्यवहित अशा अभिशब्दाला प्रकृतिस्वर न व्हावा यासाठीं अनन्तरशब्द घातला आहे. पण जर कृद्ग्रहणपरिभाषा नसेल तर अभ्युद्धृतम् येथें उद्धृत या समुदायाला क्तप्रत्ययान्त असें समजतां येणारच नाहीं. तर धृत यालाच क्तप्रत्ययान्तत्व आहे. तेव्हां तें क्तान्त उत्तरपद पुढें असतांना त्याच्या मागील व्यवहित अशा गतिसंज्ञक अभिशब्दाला हा प्रकृतिस्वर प्राप्त होऊं शकत नाहीं. तेव्हां व्यवहित अशा गतिसंज्ञक शब्दाला प्रकृतिस्वर न व्हावा याकरितां घातलेला अनन्तरशब्द अगदीं व्यर्थच होतो. तेव्हां अर्थातच ही परिभाषा आचार्यांचे मनांत आहे असें सिद्ध होतें.

१. सुप् (४।१।२) किंवा तिङ् (३।४।७८) हे प्रत्यय ज्या प्रकृतीहून केले असतील ती प्रकृति आरंभीं असलेला आणि तो प्रत्यय शेवटीं असलेला असा समुदाय पदसंज्ञक होतो.

यद्येतज्ज्ञाप्यते सनाद्यन्ता धातवः [३.१.३२] इत्यन्तग्रहणं कर्तव्यम् । कृत्तद्धितसमासाश्च [१.२.४६] इत्यन्तग्रहणं कर्तव्यम् । इदं तृतीयं ज्ञापकार्थम् ॥ द्वे तावत्क्रियेते न्यास एव । यदप्युच्यते कृत्तद्धितसमासाश्चेत्यन्तग्रहणं कर्तव्यमिति । न कर्तव्यम् । अर्थवदिति वर्तते कृत्तद्धितान्तं चैवार्थवन्न केवलाः कृतस्तद्धिता वा ॥

**नः क्ये ॥ १ । ४ । १५ ॥**

किमर्थमिदमुच्यते न सुबन्तं पदमित्येव सिद्धम् । नियमार्थोऽयमारम्भः । नान्तमेव क्ये पदसंज्ञं भवति नान्यत् । क मा भूत् । वाच्यति सुच्यति ॥

**[सिति च ॥ १ । ४ । १६ ॥]**

**स्वादिष्वसर्वनामस्थाने ॥१।४।१७**

असर्वनामस्थान इत्युच्यते तत्र ते राजा तक्षा असर्वनामस्थान इति पदसंज्ञायाः

---

कुमारी गौरितरा येथें घसंज्ञक शब्द पुढें असतांना नदीसंज्ञक शब्दाला सांगितलेला ह्रस्व कुमारीशब्दाला होऊं लागेल.

जर हें ज्ञापक घेतलें तर 'सनाद्यन्ता धातवः' (३।१।३२) या धातुसंज्ञाविधायक सूत्रामध्यें अन्त शब्द घातला पाहिजे. तसेंच 'कृत्तद्धित' (१।२।४६) या प्रातिपदिकसंज्ञाविधायक सूत्रामध्येंही अन्तशब्द घातला पाहिजे, आणि तिसरा अन्तशब्द प्रकृत सूत्रामध्यें ज्ञापनासाठीं घातला पाहिजे.

त्यांपैकीं दोन ठिकाणीं म्हणजे 'सनाद्यन्ताः' व 'सुतिङन्तम्' येथें मूळसूत्रांत अन्तशब्द घातलाच आहे. आता 'कृत्तद्धित०' येथें अन्तशब्द घातला पाहिजे असें जें म्हटलें आहे तो तेथें अन्तशब्द घालावयास नको. 'कृत्तद्धित०' या सूत्रामध्यें पूर्वसूत्रांतून अर्थवत् या पदाची अनुवृत्ति आहे, आणि अर्थवत्त्व हें कृदन्त किंवा तद्धितान्त शब्दालाच आहे. केवळ कृत्प्रत्ययाला किंवा केवळ तद्धितप्रत्ययाला नाहीं. तेव्हां त्याचे जोरावर 'कृत्तद्धित०' येथें तदन्तविधि होईल.

(सू. १५) हें सूत्र कशासाठीं केलें आहे? तें करावयास नको. कारण 'सुप्तिङन्तम्' यानेंच या सूत्राच्या उदाहरणांमध्यें पदसंज्ञा होत आहे.

क्यप्रत्यय पुढें असतां सुबन्ताला पदसंज्ञा करणें झाल्यास नकारान्तालाच करावी, तद्भिन्नाला करूं नये, असा नियम करण्यासाठीं हें सूत्र आरंभिलें आहे.

पण कोठें बरें पदसंज्ञा न झाली पाहिजे?

वाच्यति, सुच्यति.

(सू. १७) येथें 'असर्वनामस्थाने' असें म्हटलें आहे. तेव्हां राजा, तक्षा, येथें सर्वनामस्थानप्रत्यय पुढें असल्यामुळें पदसंज्ञेचा निषेध होऊं लागेल.

'नाप्रतिषेधात्': प्राप्त झालेल्या पदसंज्ञेचा 'असर्वनामस्थाने' हा निषेध असें समजूं नये.

तर मग त्याचा काय अर्थ आहे?

---

२. लोकांमध्यें ज्या शब्दापासून जो अर्थ भासतो तो पाहून त्या धोरणानें त्या शब्दांतील प्रकृतीचा आणि प्रत्ययाचा निरनिराळा अर्थ पाणिनीनें कल्पिला आहे, खरा नव्हे. म्हणून केवळ प्रत्ययाला अर्थ नाहीं असें येथें म्हटलें आहे.

१. क्यच् किंवा क्यङ् या प्रत्ययाच्या मागील सुबन्ताला पदसंज्ञा करणें झाल्यास नकारान्तालाच करावी; उदा०— राजीयति; इतराला होत नाहीं; उदा०— वाच्यति; येथें पदसंज्ञा झाली तर कुत्व (८।२।३०) होऊं लागेल.

१. सकारेत्संज्ञक प्रत्यय पुढें असतांना मागील शब्दाला पदसंज्ञा होते; उदा०— भवदीयः. येथें छस्प्रत्यय (४।२।११५) झाला आहे.

१. सुप्रत्ययाला (४।१।२) आरंभ करून कप्प्रत्यया(५।४।१५१)पर्यंतच्या प्रत्ययांपैकीं सर्वनामस्थान(१।१।४२।४३)भिन्न प्रत्यय पुढें असतांना मागील शब्दाला पदसंज्ञा होते; उदा०— राजभ्याम्,

प्रतिषेधः प्रसज्येत ॥ नाप्रतिषेधात् । नायं प्रसज्यप्रतिषेधः सर्वनामस्थाने नेति । किं तर्हि । पर्युदासोऽयं यदन्यत्सर्वनामस्थानादिति । सर्वनामस्थानेऽव्यापारः । यदि केनचित्प्राप्नोति तेन भविष्यति । पूर्वेण च प्राप्नोति ॥ अप्राप्तेर्वा । अथवानन्तरा या प्राप्तिः सा प्रतिषिध्यते । कुत एतत् । अनन्तरस्य विधिर्वा भवति प्रतिषेधो वेति । पूर्वा प्राप्तिरप्रतिषिद्धा तया भविष्यति । ननु चेयं प्राप्तिः पूर्वां प्राप्तिं बाधते नोत्सहते प्रतिषिद्धा सती बाधितुम् ॥ अथवा योगविभागः करिष्यते । स्वादिषु पूर्वं पदसंज्ञं भवति । ततः सर्वनामस्थानेऽयचि । पूर्वं पदसंज्ञं भवति । ततो भम् । भसंज्ञं च भवति यजादावसर्वनामस्थान इति ॥ यदि तर्हि सावपि पदं भवत्येचः प्लुतविकारे पदान्तग्रहणं चोदितम् इह मा भूत् भद्रं करोषि गौरिति तस्मिन्क्रियमाणेऽपि प्राप्नोति । वाक्यपदयोरन्त्यस्येत्येवं तत् ॥

पर्युदास हा त्याचा अर्थ आहे. म्हणजे सर्वनामस्थानप्रत्ययाशिवाय इतर प्रत्यय हे या सूत्रानें सांगितलेल्या पदसंज्ञेचें निमित्त आहेत इतकाच अर्थ असर्वनामस्थाने हा शब्द दाखवितो. तेव्हां सर्वनामस्थानप्रत्यय पुढें असतां या सूत्राचा व्यापार मुळींच नाहीं. आतां जर तेथें दुसऱ्या एखाद्या सूत्राची प्रवृत्ति होत असेल तर त्यानें पदसंज्ञा होईल. 'सुप्तिङन्तम्' या पूर्वसूत्रानें पदसंज्ञा प्राप्त होत आहेच.

'अप्राप्तेर्वा': अथवा जवळच्या म्हणजे याच सूत्रानें प्राप्त झालेली जी पदसंज्ञा तिचा 'असर्वनामस्थाने' हा निषेध केला जातो.

हें कशावरून ?

'विधि किंवा निषेध करावयाचा तो जवळ असलेल्याच करावा' अशी परिभाषा आहे. तेव्हां 'सुप्तिङन्तम्' या पूर्वसूत्रानें प्राप्त होणाऱ्या पदसंज्ञेचा हा निषेध नाहीं म्हणून त्यानें येथें पदसंज्ञा होईल.

पण 'स्वादिषु' ही पदसंज्ञा 'सुप्तिङन्तम्' या पदसंज्ञेचा बाध करते ना ?

आपण निषिद्ध झाल्यामुळें त्या पदसंज्ञेचा बाध करण्याला ती धजत नाहीं.

'योगविभागाद्वा': अथवा सूत्राचा विभाग करण्यानें हें सिद्ध होईल. तो विभाग असाः— 'स्वादिषु' एवढेंच एक सूत्र करावें. स्वादिप्रत्यय पुढें असतांना मागील शब्दाला पदसंज्ञा होते असा त्याचा अर्थ होय. त्याचे पुढें 'सर्वनामस्थानेऽयचि' एवढें दुसरें सूत्र करावें. सर्वनामस्थानप्रत्यय पुढें असतांना मागील शब्दाला जर पदसंज्ञा होईल तर यकारादि आणि अजादि भिन्न सर्वनामस्थानप्रत्यय पुढें असतांच होईल असें नियमार्थ[३] हें सूत्र आहे. त्याचे पुढें 'भम्' हें तिसरें सूत्र करावें. सर्वनामस्थानभिन्न असा यकारादि किंवा अजादि प्रत्यय पुढें असतांना मागील शब्दाला 'भ' अशी संज्ञा होते असा त्याचा अर्थ होय.

अशा रीतीनें जर सुप्रत्ययाच्या मागील शब्दाला पदसंज्ञा होत असेल तर 'एचः प्लुतविकारे पदान्तग्रहणम्' (८।२।७, वा. १०२) म्हणजे तो एच् पदाच्या शेवटीं असावा असें जें म्हटलें आहे तें आतां जमत नाहीं. कारण त्यामुळें भद्रं करोषि गौः येथें गोशब्दांतील एच् पदाच्या शेवटीं नसल्यामुळें त्याला प्लुतविकार होत नाहीं. परंतु आतां तो एच् पदाच्या शेवटीं असल्यामुळें त्याला प्लुत विकार होणारच.

२. न या अव्ययाचा समास जरी सर्वनामस्थानशब्दाबरोबर झाला आहे तरी त्याचा संबंध यचि याच्याशीं आहे हें दाखविण्याकरितां मध्यें हें सूत्र 'सर्वनामस्थानेऽयचि' असें अर्थतः दाखविलें आहे.

३. या नियमानें सुप्प्रत्यय पुढें असतांना मागील शब्दाला पदसंज्ञा कायम ठेविली आहे.

भुवद्वद्भ्यः धारयद्वद्भ्यः एतयोः पदसंज्ञा वक्तव्या । भुवद्वद्भ्यः धारयद्वद्भ्यः ॥

**यचि भम् ॥१।४।१८॥**

**भसंज्ञायामुत्तरपदलोपे षषः प्रतिषेधः १**

भसंज्ञायामुत्तरपदलोपे षषः प्रतिषेधो वक्तव्यः । अनुकम्पितः षडङ्गुलिः षडिकः ॥

**सिद्धमचः स्थानिवत्त्वात् ॥ २ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । अचः स्थानिवद्भावाद्भसंज्ञा न भविष्यति ॥ इहापि तर्हि प्राप्नोति । वागाशीर्दत्तो वाचिक इति । वक्ष्यत्येतत् । सिद्धमेकाक्षरपूर्वपदानामुत्तरपदलोपवचनादिति । इहापि तर्हि प्राप्नोति । षडङ्गुलिः षडिक इति । वक्ष्यत्येतत् । षषष्ठाजादिवचनात्सिद्धमिति ॥

**नभोऽङ्गिरोमनुषां वत्युपसंख्यानम् ॥३**

नभोऽङ्गिरोमनुषां वत्युपसंख्यानं कर्तव्यम् । नभस्वत् अङ्गिरस्वत् मनुष्वत् ॥

**वृषण्वस्वश्वयोः ॥ ४ ॥**

वृषणित्येतस्य वस्वश्वयोर्भसंज्ञा वक्त-

---

तो प्लुतविकार पदाच्या आणि वाक्याच्या शेवटीं असलेल्या एचालाच होत असतो.

भुवत् आणि धारयत् या दोन शब्दांना मतुप्प्रत्यय पुढें असतां पदसंज्ञा होते असें वचन करावें; उदा० भुवद्वद्भ्यः, धारयद्वद्भ्यः.

(सू.१८, वा.१) उत्तरपदाचा लोप झाला असतां षष्शब्दाला भसंज्ञा करूं नये असें वचन करावें; जसें— अनुकम्पितः षडङ्गुलिः षडिकः[२].

(वा.२) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

अकारलोपाला 'अचः परस्मिन्'(१।१।५७) यानें स्थानिवद्भाव होत आहे म्हणून[३].

असें आहे तर वागाशीर्दत्तः वाचिकः येथेंही तसेंच होईल[४].

एकाक्षरी पूर्वपद असेल तर तेथें सबंध उत्तरपदाचा लोप करावा (५।३।८४, वा.४) असें वचन पुढें सांगणार आहे.

तर मग अनुकम्पितः षडंगुलिः षडिकः येथेंही तसेंच होईल.

षष्शब्द पूर्वपद असतां तेथें 'ठाजादा॰ वूर्ध्वम्' (५।३।८३) यानें दुसऱ्या अकाराच्या पुढील भागाचा एकदम लोप केला म्हणजे षडिकः हें उदाहरण सिद्ध होतें, असें पुढें (५।३।८४, वा.५) सांगणार आहे.

(वा.३) नभस्, अङ्गिरस् आणि मनुस् या शब्दांना वतिप्रत्यय पुढें असतांना भसंज्ञा होते असें वचन करावें; जसें— नभस्वत्[५], अङ्गिरस्वत्, मनुष्वत्.

(वा.४) वसु किंवा अश्वशब्द पुढें असतांना वृषन्शब्दाला भसंज्ञा होते असें वचन

---

४. गौः येथें औकार पदाच्या शेवटीं आहे तरी पण वाक्याच्या शेवटीं नाहीं; कारण पुढें विसर्ग आहे.

५. भसंज्ञेचा (१।४।१९) बाध करण्याकरितां हें वचन आहे.

१. स्वादि प्रत्ययांपैकीं सर्वनामस्थानसंज्ञाभिन्न असा यकारादि किंवा अजादि प्रत्यय पुढें असतांना मागील शब्दाला भसंज्ञा होते; उदा०— राज्ञः.

२. षष् आणि अङ्गुलि या दोन शब्दांचा बहुव्रीहि, पुढें ठच्प्रत्यय (५।३।७८), इकआदेश (७।३।५०), अङ्गुलि या उत्तरपदाचा लोप (५।३। ८४, वा.४) झाला आहे. षष्+इक या स्थितींत प्रकृत सूत्रानें भसंज्ञा झाली तर जश्त्व होणार नाहीं.

३. षष्+अङ्गुलि येथें अङ्गुलि या उत्तरपदाचा एकदम लोप न करतां त्यांतील अकाराच्या पुढील भागाचा लोप (५।३।८३) करून नंतर त्या अकाराचा लोप (६।४।१४८) केला म्हणजे त्या अकाराच्या लोपाला स्थानिवद्भाव करतां येतो. तेव्हां त्या अकारानें व्यवधान येत असल्यामुळें षष् याला भसंज्ञेची प्राप्ति येत नाहीं. तेव्हां षष् याला पदसंज्ञा (१।४।१४) कायम असल्यामुळें जश्त्व (८।२।३९) होतें.

४. भसंज्ञेनें बाध होत नसल्यामुळें पदसंज्ञा कायम राहून कुत्व (८।२।३०) व जश्त्व होईल.

५. येथें भसंज्ञेनें पदसंज्ञेचा बाध झाल्यामुळें रुत्व (८।२।६६) होत नाहीं.

व्या। वृषण्वसुः। वृषणश्वस्य यच्छिरः। वृषणश्वस्य मेने॥

## तसौ मत्वर्थे॥ १।४।१९॥

अर्थग्रहणं किमर्थं न तसौ मतावित्येवोच्येत। तसौ मतावितीयत्युच्यमान इहैव स्यात् पयस्वान् यशस्वान्। इह न स्यात् पयस्वी यशस्वी। अर्थग्रहणे पुनः क्रियमाणे मतुपि च सिद्धं भवति यश्चान्यस्तेन समानार्थस्तस्मिंश्च॥ यद्यर्थग्रहणं क्रियते पयस्वान् यशस्वान् अत्र न प्राप्नोति। किं कारणम्। न हि मतुब्मत्वर्थे वर्तते। मतुबपि मत्वर्थे वर्तते। तद्यथा। देवदत्तशालायां ब्राह्मणा आनीयन्तामित्युक्ते यदि देवदत्तोऽपि ब्राह्मणो भवति सोऽप्यानीयते॥

## अयस्मयादीनि च्छन्दसि॥ १।४।२०॥

उभयसंज्ञान्यपीति वक्तव्यम्। स सुष्टुभा स ऋकता गणेन॥

## बहुषु बहुवचनम्॥ १।४।२१॥

बहुषु बहुवचनमित्युच्यते। केषु बहुषु। अर्थेषु। यद्येवं वृक्षः प्लक्षः अत्रापि प्राप्नोति। बहवस्तेऽर्था मूलं स्कन्धः फलं पलाशमिति॥ एवं तर्ह्येकवचनं द्विवचनं

---

करावें; जसें— वृषण्वसुः, वृषणश्वस्य यच्छिरः, वृषणश्वस्य मेने.

(सू.१९) येथें अर्थशब्द घातला आहे तो कशासाठीं? अर्थशब्द घालावयास नको. तसौ मतौ असेंच सूत्र करावें.

तसौ मतौ एवढेंच सूत्र केलें तर पयस्वान्, यशस्वान्, येथेंच म्हणजे मतुप्प्रत्यय पुढें असतांनाच भसंज्ञा होईल, आणि पयस्वी, यशस्वी, येथें म्हणजे विन्प्रत्यय पुढें असतांना भसंज्ञा होणार नाहीं; आणि अर्थशब्द घातला असतां मतुप्प्रत्यय पुढें असतां व मतुपाहून अन्य पण मतुपाचा अर्थ दाखविणारा प्रत्यय पुढें असतांही भसंज्ञा साधते.

पण जर अर्थशब्द घातला तर पयस्वान् येथेंच भसंज्ञा होणार नाहीं.

काय कारण?

मतुप्प्रत्ययालाच मतुप्प्रत्ययाच्या अर्थीं हा आहे असें म्हणतां येत नाहीं.

मतुप्प्रत्ययही मतुप्प्रत्ययाच्या अर्थीं आहे असें म्हणतां येतें; जसें:—देवदत्ताच्या शाळेमध्यें ब्राह्मणास घेऊन यावें असें सांगितलें असतां जर देवदत्त नांवाचा मनुष्यही ब्राह्मणच असेल तर तोही आणिला जातो, तसेंच हें होय.

(सू.२०) अयस्मय इत्यादि शब्दांना भ आणि पद या दोन्ही संज्ञा कारणपरत्वें होतात असें म्हणावें; जसें— स सुष्टुभा स ऋक्वता[2] गणेन.

(सू.२१) बहुत या अर्थी बहुवचनप्रत्यय होतो असें येथें सांगितलें आहे. पण ते बहुत कोण?

अर्थ होत.

असें आहे तर वृक्षः, प्लक्षः, येथेंही बहुवचन प्राप्त होत आहे. कारण वृक्ष म्हटला म्हणजे त्यामध्यें मूळ, स्कंध, फळ, पर्ण वगैरे बहुत अर्थ आहेत.

असें आहे तर एकवचन, द्विवचन आणि

---

६. येथें पदसंज्ञा झाली असती तर नकाराचा लोप (८।२।७) झाला असता.

१. मतुप्प्रत्ययाच्या अर्थीं केलेला प्रत्यय पुढें असतांना मागील तकारान्त किंवा सकारान्त शब्दाला भसंज्ञा होते; उदा०- विद्युत्वान्, आयुष्मान्.

१. अयस्मय, ऋक्वत् इत्यादि शब्द वेदामध्यें जसे उच्चारले आहेत तसेच ते शुद्ध आहेत असें समजावें; उदा०— अयस्मयं वर्म, ऋक्वता गणेन.

२. येथें ऋच्शब्दाला पदसंज्ञेमुळें कुत्व होतें, जश्त्व मात्र होत नाहीं; कारण त्या वेळीं भसंज्ञेनें पदसंज्ञेचा बाध होतो.

१. प्रकृतीच्या अर्थावरील बहुत्वसंख्या दाखवायाची असेल तर तेथें बहुवचनप्रत्यय घालावा; उदा०— वृक्षाः, प्लक्षाः.

बहुवचनमिति शब्दसंज्ञा एताः। येष्वर्थेषु स्वादयो विधीयन्ते तेषु बहुषु। केषु चार्थेषु स्वादयो विधीयन्ते। कर्मादिषु। न वै कर्मादयो विभक्त्यर्थाः। के तर्हि। एकत्वादयः। एकत्वादिष्वपि वै विभक्त्यर्थेष्ववश्यं कर्मादयो निमित्तत्वेनोपादेयाः। कर्मण एकत्वे कर्मणो द्वित्वे कर्मणो बहुत्व इति॥ स तर्हि तथा निर्देशः कर्तव्यो न ह्यन्तरेण भावप्रत्ययं गुणप्रधानो भवति निर्देशः। इह चेत्येके मन्यन्ते तदेके मन्यन्त इति परत्वादेकवचनं प्राप्नोति॥ बहुषु बहुवचनमित्येष योगः परः करिष्यते॥ सूत्रविपर्यासः कृतो भवति। इह च बहुरोदनः बहुः सूप इति परत्वाद्बहुवचनं प्राप्नोति॥ नैष दोषः। यत्तावदुच्यते न ह्यन्तरेण भावप्रत्ययं गुणप्रधानो भवति निर्देश इति तन्न। अन्तरेणापि भावप्रत्ययं गुणप्रधानो भवति निर्देशः। कथम्। इह कदाचिद्गुणो गुणिविशेषको भवति। तद्यथा। पटः शुक्ल इति। कदाचिच्च गुणिना गुणो व्यपदिश्यते। पटस्य शुक्ल इति। तद्यदा तावद्गुणो

---

बहुवचन हीं एक प्रकारच्या शब्दांचीं नांवें आहेत. ते शब्द म्हणजे स्वादिप्रत्यय ज्या अर्थीं घालावयास सांगितले आहेत ते अर्थ बहुत आहेत असें कळवावयाचें असतां बहुवचनप्रत्यय घालावा.

ते स्वादिप्रत्यय कोणत्या अर्थीं घालावयास सांगितले आहेत?

कर्म, करण, वगैरे अर्थीं घालावयास सांगितले आहेत.

पण कर्म, करण, वगैरे हे विभक्तींचे अर्थ नव्हेत.

तर मग विभक्तींचे अर्थ कोणते?

एकत्व वगैरे हे विभक्तींचे अर्थ आहेत.

एकत्व वगैरे हे विभक्तींचे अर्थ आहेत हें खरें, पण तें एकत्व वगैरे कोणाचें हें समजण्याकरितां त्या एकत्वादिकांचे आधार म्हणून कर्मादिक अर्थ अवश्य गृहीत धरले पाहिजेत. म्हणजे कर्माचें एकत्व, कर्माचें द्वित्व आणि कर्माचें बहुत्व या अर्थीं ते ते प्रत्यय होतील.

तर मग सूत्रामध्यें तसें म्हणजे एकत्व, द्वित्व, बहुत्व, असें म्हटलें पाहिजे. कारण त्व वगैरे भावप्रत्यय केल्यांवाचून साध्या शब्दापासून गुणाची मुख्यत्वानें प्रतीति होणार नाहीं. शिवाय 'इति एके मन्यन्ते', 'तद् एके मन्यन्ते' या प्रयोगांतील एकशब्दाहून 'द्व्येकयोः' या पुढील सूत्रानें परत्वास्तव एकवचन प्रसक्त होत आहे.

तर मग हा दोष टाळण्यासाठीं 'द्व्येकयोः' या सूत्राच्या पुढें 'बहुषु बहुवचनम्' ह्या सूत्राचें पठन करण्यांत येईल.

पण तसें करण्यांत सूत्राचा विपर्यास होतो ना? शिवाय तसें केलें तर बहुरोदनः, बहुः सूपः, येथें बहुशब्दाच्या पुढें परत्वास्तव बहुवचन होऊं लागेल.[2]

हा दोष येत नाहीं. आतां त्व वगैरे भावप्रत्यय केल्यांवाचून साध्या शब्दापासून गुणाची मुख्यत्वानें प्रतीति होणार नाहीं असें जें म्हटलें आहे तें बरोबर नाहीं. त्व वगैरे भावप्रत्यय केल्यावांचूनही साध्या शब्दापासून गुणाची मुख्यत्वानें प्रतीति होत असते.

तें कसें?

असें पहा की कांहीं प्रयोगांमध्यें गुणवाचक शब्द हा गुणीवरील कांहीं विशेष दाखविणारा असतो, उदा०— शुक्लः पटः; आणि कांहीं प्रयोगांमध्यें गुण हा गुणीकडून दाखविण्यांत येतो, उदा०— पटस्य शुक्लः. त्यांत जेव्हां गुणवाचक शब्द हा गुणीवरील कांहीं विशेष

---

२. येथें बहुशब्दाचा अर्थ वैपुल्य आहे. पुष्कळ भात, पुष्कळ वरण असा अर्थ आहे.

गुणिविशेषको भवति पटः शुक्ल इति तदा सामानाधिकरण्यं गुणगुणिनोः । तदा नान्तरेण भावप्रत्ययं गुणप्रधानो भवति निर्देशः । यदा तु गुणिना गुणो व्यपदिश्यते पटस्य शुक्ल इति स्वप्रधानस्तदा गुणो भवति । तदा द्रव्ये षष्ठी । तदान्तरेण भावप्रत्ययं गुणप्रधानो भवति निर्देशः ॥ न चेह वयमेकत्वादिभिः कर्मादीन्विशेषयिष्यामः । किं तर्हि । कर्मादिभिरेकत्वादीन्विशेषयिष्यामः । कथम् । एकस्मिन्नेकवचनम् । कस्यैकस्मिन् । कर्मणः । द्वयोर्द्विवचनम् । कयोर्द्वयोः । कर्मणोः । बहुषु बहुवचनम् । केषां बहुषु । कर्मणामिति ॥ कथं बहुषु बहुवचनमिति । एतदेव ज्ञापयत्याचार्यो नानाधिकरणवाची यो बहुशब्दस्तस्येदं ग्रहणं न वैपुल्यवाचिन इति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । यदुक्तं बहुरोदनः बहुः सूप इति परत्वाद्बहुवचनं प्राप्नोतीति स दोषो न भवति ॥ यदप्युच्यत इत्येके मन्यन्ते तदेके मन्यन्त इति परत्वादेकवचनं प्राप्नोतीति नैष दोषः । एकशब्दोऽयं बह्वर्थः । अस्त्येव संख्यावाची । तद्यथा । एको द्वौ बहव इति । अस्त्यसहायवाची । तद्यथा । एकाग्नयः एकहलानि एकाकिभिः क्षुद्रकैर्जितमिति । अस्त्यन्यार्थे वर्तते । तद्यथा । सधमादो द्युम्न एकास्ताः । अन्या इत्यर्थः । तद्योऽन्यार्थे वर्तते तस्यैष प्रयोगः ॥

दाखविणारा असतो, उदा०—शुक्लः पटः, तेव्हां गुण आणि गुणी यांचें सामानाधिकरण्य असतें. तशा ठिकाणीं भावप्रत्यय नसल्यामुळें गुणाची मुख्यत्वानें प्रतीति होत नाहीं. आणि जेव्हां गुण हा गुणीकडून दाखविण्यांत येतो, जसें—पटस्य शुक्लः, तेव्हां गुण हा स्वतः मुख्यत्वानें भासतो. त्या ठिकाणीं गुणिवाचक शब्दापुढें षष्ठीप्रत्यय घालावा लागतो. अशा प्रयोगामध्यें भाव केल्यांवाचूनही गुणाची मुख्यत्वानें प्रतीति होते. आतां 'व्द्येकयोः' येथें आम्ही शुक्लः पटः याप्रमाणें एक, द्वि, हें कर्म, करण, वगैरेंचा विशेष दाखविणारें असें त्याचें विशेषण करीत नाहीं.

तर काय करतां ?

पटस्य शुक्लः याप्रमाणें कर्म, करण, हेंच एक, द्वि, यांचें विशेषण करीत आहों.

तें कसें ?

एकत्व या अर्थी एकवचन होतें. तें एकत्व कोणाचें ? कर्माचें. द्वित्व या अर्थी द्विवचन होतें. तें द्वित्व कोणाचें ? कर्माचें. बहुत्व या अर्थी बहुवचन होतें. तें बहुत्व कोणाचें ? कर्माचें.

तर मग 'बहुषु[३] बहुवचनम्' असें कसें म्हटलें ?

यावरूनच आचार्य असें सुचवीत आहे की बहुत द्रव्यांचा वाचक असा जो बहुशब्द त्याचें 'बहुषु' येथें ग्रहण केलें आहे. वैपुल्य अर्थाला दाखविणाऱ्या बहुशब्दाचें येथें ग्रहण होत नाहीं.

असें सुचविल्याचें काय प्रयोजन ?

बहुरोदनः, बहुः सूपः, येथें परत्वास्तव बहुवचन प्राप्त होतें असा जो दोष दाखविला तो दोष येत नाहीं.

आणखीही जें म्हटलें आहे की इत्येके मन्यन्ते, तदेके मन्यन्ते, या प्रयोगांमध्यें परत्वास्तव एकवचन प्रसक्त होतें, तोही दोष नाहीं. कारण एकशब्द हा बहुत अर्थांचा दर्शक आहे. त्यांत एक संख्यावाचक आहे; जसें—एक, दोन, तीन. असहाय या अर्थाचा एकशब्द आहे; जसें— एकाग्नयः, एकहलानि, एकाकिभिः क्षुद्रकैर्जितम्. अन्य या अर्थाचा ही एकशब्द आहे; जसें:— सधमादो द्युम्न

३. बहुशब्द बहुत्वसंख्येचा दर्शक आहे तर ती संख्या एक असल्यामुळें बहुशब्दाहून एकवचन झालें पाहिजे.

४. बहुत्वसंख्येचा वाचक अशा बहुशब्दाहून आश्रयाचें बहुत्व घेऊन बहुवचन करतां येतें.

किमर्थं पुनरिदमुच्यते ।

**सुप्तिङामविशेषविधानाद्दृष्टविप्रयोगत्वाच्च नियमार्थं वचनम् ॥ १ ॥**

सुपोऽविशेषेण प्रातिपदिकमात्राद्विधीयन्ते । तिङोऽविशेषेण धातुमात्राद्विधीयन्ते । तत्रैतत्स्याद्यद्यप्यविशेषेण विधीयन्ते नैव विप्रयोगो लक्ष्यत इति । दृष्टविप्रयोगत्वाच्च । दृश्यते खल्वपि विप्रयोगः । तद्यथा । अक्षीणि मे दर्शनीयानि । पादा मे सुकुमारा इति । सुप्तिङोरविशेषविधानाद्दृष्टविप्रयोगत्वाच्च व्यतिकरः प्राप्नोति । इष्यते चाव्यतिकरः स्यादिति तच्चान्तरेण यत्नं न सिध्यतीति नियमार्थं वचनम् । एवमर्थमिदमुच्यते ॥ अथैतस्मिन्नियमार्थे सति किं पुनरयं प्रत्ययनियमः । एकस्मिन्नेवैकवचनं द्वयोरेव द्विवचनं बहुष्वेव बहुवचनमिति । आहोस्विदर्थनियमः । एकस्मिन्नेकवचनमेव द्वयोर्द्विवचनमेव बहुषु बहुवचनमेवेति । कश्चात्र विशेषः ।

**तत्र प्रत्ययनियमेऽव्ययानां पदसंज्ञाभावोऽसुबन्तत्वात् ॥ २ ॥**

तत्र प्रत्ययनियमेऽव्ययानां पदसंज्ञा न प्राप्नोति । उच्चैः नीचैरिति । किं कारणम् । असुबन्तत्वात् ॥

**अर्थनियमे सिद्धम् ॥ ३ ॥**

---

एकास्ताः. येथें एकाः याचा अन्याः असा अर्थ आहे. हा जो अन्यार्थक एकशब्द त्याचाच इत्येके तदेके हा प्रयोग समजावा.

आतां 'बहुषु बहुवचनम्' हें सूत्रच मुळीं कशाकरितां बरें केलें आहे ?

(वा.१) सुप्प्रत्यय हे इतर कांहीं निमित्त न धरतां फक्त प्रातिपदिकांहून करावयास सांगितले आहेत (४।१।२). तसेंच तिङ्ही इतर निमित्त न धरतां फक्त धातूंहून करावयास सांगितले आहेत (३।४।७८). तेव्हां ते व्यवस्थितपणानें होण्यासाठीं हें सूत्र केलें आहे. आतां जरी ते प्रत्यय मोघमच करावयास सांगितले आहेत तरी पण लोकांमध्यें वस्तुस्थितीच्या विरुद्ध प्रयोग दृष्टीस पडत नसते तर तें काम आपोआपच झालें असतें. पण तसें नाहीं. कारण वस्तुस्थितीच्या विरुद्धही प्रयोग लोकामध्यें दृष्टीस पडतात; जसें— अक्षीणि मे दर्शनीयानि; पादा मे सुकुमाराः. एकंदरींत सुप् आणि तिङ् हे प्रत्यय मोघम सांगितले असल्यामुळें आणि वस्तुस्थितीच्या विरुद्ध प्रयोगही लोकांत दिसत असल्यामुळे त्या प्रत्ययांचा घोटाळा होईल. आणि घोटाळा न होणें तर इष्ट आहे. ही गोष्ट कांहीं तरी विशेष यत्न केल्यांवाचून सिद्ध होणें शक्य नाहीं. म्हणून नियम करण्यासाठीं हें सूत्र केलें आहे.

आतां हें सूत्र तसेंच पुढील सूत्र नियमार्थ ठरलें असतां एकाबद्दलच एकवचन, दोघांबद्दलच द्विवचन आणि बहुतांबद्दलच बहुवचन घालावें, इतर ठिकाणीं तो प्रत्यय घालूं नये, असा हा काय प्रत्ययनियम समजावयाचा अथवा एकाबद्दल एकवचनच, दोघांबद्दल द्विवचनच आणि बहुतांबद्दल बहुवचनच घालावें, इतर प्रत्यय त्या अर्थी घालूं नये, असा अर्थनियम समजावयाचा ?

या दोहोंमध्यें फरक काय होतो ?

(वा.२) त्या दोहोंमध्यें प्रत्ययनियम गृहीत धरला तर उच्चैः, नीचैः, या अव्ययांना पदसंज्ञा होऊं शकत नाहीं.

काय कारण ?

तेथें कोणतीच संज्ञा नसल्यामुळें अव्ययांहून सुप् करतां येत नाहीं म्हणून.

---

५. डोळे व पाय हे दोनच असून तद्विरुद्ध अक्षीणि व पादाः असें बहुवचन घातलें आहे.

६. सुप्प्रत्यय नाहीं म्हणून पदसंज्ञा (१।४।१४) होणार नाहीं.

अर्थनियमे सिद्धं भवति । अस्त्वर्थनियमः ॥ अथवा पुनरस्तु प्रत्ययनियमः । ननु चोक्तं तत्र प्रत्ययनियमेऽव्ययानां पदसंज्ञाभावोऽसुबन्तत्वादिति । नैष दोषः।

**सुपां कर्मादयोऽप्यर्थाः संख्या चैव तथा तिङाम् ।**

सुपां संख्या चैवार्थः कर्मादयश्च । तथा तिङाम् ॥

**प्रसिद्धो नियमस्तत्र**

प्रसिद्धस्तत्र नियमः ॥

**नियमः प्रकृतेषु वा ॥**

अथवा प्रकृतानर्थानपेक्ष्य नियमः । के च प्रकृताः । एकत्वादयः । एकस्मिन्नेवैकवचनं न द्वयोर्न बहुषु । द्वयोरेव द्विवचनं नैकस्मिन्न बहुषु । बहुष्वेव बहुवचनं न द्वयोर्नैकस्मिन्निति ॥ अथवाचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयत्युत्पद्यन्तेऽव्ययेभ्यः स्वादय इति यदयमव्ययादाप्सुपः [२.४.८२] इत्यव्ययाल्लुकं शास्ति ॥

**[१द्व्येकयोर्द्विवचनैकवचने ॥ १।४।२२ ॥]**

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये प्रथमस्याध्यायस्य चतुर्थे पादे द्वितीयमाह्निकम् ॥

---

(वा.३) ७अर्थनियम गृहीत धरला म्हणजे मात्र अव्ययांना पदसंज्ञा सिद्ध होते.

तर मग अर्थनियमच असूं दे.

अथवा येथें प्रत्ययनियमपक्षही असूं दे.

पण प्रत्ययनियमपक्ष गृहीत धरला तर उच्चैः, नीचैः, इत्यादि अव्ययांहून सुप् करतां येत नसल्यामुळें पदसंज्ञा होणार नाहीं असा दोष दाखविला आहे ना ?

हा दोष येत नाहीं.

सुप्प्रत्ययांचे कर्म वगैरेही अर्थ आहेत आणि संख्याही अर्थ आहे. तसेंच तिङ्प्रत्ययांचेही कर्म वगैरे अर्थ आहेत आणि संख्याही अर्थ आहे.

तेव्हां अर्थाविषयींचा नियम म्हणजे अर्थनियम प्रसिद्ध आहेच.

८अथवा प्रकृत अर्थांना धरूनच नियम समजावा.

ते प्रकृत अर्थ कोणते ?

एकत्व, द्वित्व, वगैरे हे होत. तेव्हां एकाबद्दलच एकवचन घालावें, दोन किंवा बहुत याबद्दल एकवचन घालूं नये; दोघांबद्दलच द्विवचन घालावें, एक किंवा बहुत याबद्दल द्विवचन घालूं नये; तसेंच बहुतांबद्दलच बहुवचन घालावें, दोन किंवा एक याबद्दल बहुवचन घालूं नये, असें ठरतें.

अथवा हा आचार्य 'अव्ययादाप्सुपः' (२।४।८२) या सूत्रानें अव्ययापुढील सुपांचा लुक् करावा म्हणून जें सांगतो ही आचार्यांची कृति अव्ययाहून सुप्प्रत्यय उत्पन्न होतात असें सुचविते.

याप्रमाणें भगवान पतंजलिऋषींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्याच्या पहिल्या अध्यायांतील चौथ्या पादांतील दुसरें आन्हिक समाप्त झालें.

---

७. या पक्षीं संख्या असेल तेथें त्या संख्येच्या विरुद्ध प्रत्यय करतां येत नाहीं. परंतु संख्या मुळींच नसेल तेथें सामान्यसूत्रानें सुप्प्रत्यय करण्यास कांहीं हरकत येत नाहीं.

८. प्रत्ययनियमपक्ष घेतला तरी दोष नाहीं; कारण एकत्व या अर्थीच एकवचन करावें म्हणजे इतर अर्थी करूं नये. तेव्हां निरर्थक एकवचन करण्याची नियमानें व्यावृत्ति होत नाहीं. तसें एकवचन म्हणजे सुप्रत्यय सामान्यसूत्रानें (४।१।२) अव्ययाहून करतां येईल.

१. प्रकृत्यर्थावरील द्वित्वसंख्या दाखवावयाची असेल तर तेथें द्विवचन होतें, आणि एकत्वसंख्या दाखवावयाची असेल तर तेथें एकवचन होतें; उदा०– घटः, घटौ.

## कारके ॥ १ । ४ । २३ ॥

किमिदं कारक इति । संज्ञानिर्देशः । किं वक्तव्यमेतत् । न हि । कथमनुच्यमानं गंस्यते । इह हि व्याकरणे ये वैते लोके प्रतीतपदार्थकाः शब्दास्तैर्निर्देशाः क्रियन्ते पशुरपत्यं देवतेति या वैताः कृत्रिमाष्टिघुघभसंज्ञास्ताभिः । न चायं लोके ध्रुवादीनां प्रतीतपदार्थकः शब्दो न खल्वपि कृत्रिमा संज्ञान्यत्राविधानात् । संज्ञाधिकारश्चायं तत्र किमन्यच्छक्यं विज्ञातुमन्यदतः संज्ञायाः ॥

**कारक इति संज्ञानिर्देशश्चेत्संज्ञिनोऽपि निर्देशः ॥ १ ॥**

कारक इति संज्ञानिर्देशश्चेत्संज्ञिनोऽपि निर्देशः कर्तव्यः । साधकं निर्वर्तकं कारकसंज्ञं भवतीति वक्तव्यम् ॥

**इतरथा ह्यनिष्टप्रसङ्गो ग्रामस्य समीपादागच्छतीत्यकारकस्य ॥ २ ॥**

इतरथा ह्यनिष्टं प्रसज्येत । अकारकस्याप्यपादानसंज्ञा प्रसज्येत । क । ग्रामस्य समीपादागच्छतीति ॥ नैष दोषः । नात्र ग्रामोऽपाययुक्तः । किं तर्हि । समी-

(सू.२३) कारके हें काय बरें आहे ?

कारके हा संज्ञानिर्देश आहे.

मग येथें संज्ञा असें म्हटलें पाहिजे काय?

तसें म्हणावयास नको.

तर मग ही संज्ञा आहे असें कसें बरें समजेल ?

लोकांमध्यें जे प्रसिद्धार्थक शब्द आहेत ते ह्या व्याकरणामध्यें त्याच अर्थानें उच्चारण्याची आचार्यांची वहिवाट आहे किंवा ज्या ह्या टि (१।१।६४), घु (१।१।२०), घ (१।१।२२), भ (१।४।१८) वगैरे कृत्रिम संज्ञा सांगितल्या आहेत ते ते संज्ञाशब्द त्या त्या अर्थानें उच्चारिले जातात तसें येथें पहावें तर कारक हा शब्द ध्रुवे[2] वगैरेंचा वाचक असा लोकांमध्यें प्रसिद्धार्थक नाहीं, व कारक ही कृत्रिमसंज्ञाही नव्हे; कारण दुसरीकडे कोठेंही सांगितली नाहीं. तेव्हां येथें संज्ञाविधिच मानला पाहिजे. शिवाय हें संज्ञाप्रकरण चालू आहे तेव्हां अर्थातच येथेंही संज्ञाविधीशिवाय दुसरें काय बरें समजणें शक्य आहे ?

(वा.१) कारक ही संज्ञा येथें सांगावयाची असेल तर ती संज्ञा ज्याला सांगावयाची त्याचाही निर्देश येथें केला पाहिजे. तो असा:— 'साधकं कारकम्': जें क्रियेचें साधक म्हणजे निर्वर्तक अर्थात् क्रियान्वयी असें जें ध्रुव वगैरे तें कारकसंज्ञक होतें असें म्हणावें.

(वा.२) जर तसें म्हटलें[3] नाहीं तर क्रियेला साधक अशा रूपानें विवक्षित नसलेल्यालाही अपादानसंज्ञा होऊं लागेल.

ती कोठें ?

ग्रामस्य[4] समीपात् आगच्छति येथें.

हा दोष नाहीं, कारण येथें ग्राम हा वियोगाचा अवधि म्हणून विवक्षित नाहीं.

तर तसा कोण आहे ?

समीप पदार्थ हा तसा आहे. जेव्हां ग्राम हा वियोगाचा अवधि म्हणून विवक्षित असतो

१. 'कारक' ही संज्ञा सांगणारें हें अधिकारसूत्र आहे. पुढील सूत्रामध्यें कारकसंज्ञेचें विधान केलें आहे. कारके ही सप्तमी प्रथमेच्या ऐवजीं समजावी.

२. कारके हा संज्ञाविधि न मानतां जर प्रसिद्धार्थक पदाचा हा निर्देश आहे असें मानलें तर पुढील सूत्रांत अनुवृत्ति होऊन त्यांतील ध्रुव वगैरे उद्देश्याशीं याचा संबंध जोडला पाहिजे, तो जोडतां येत नाहीं असें येथें दाखविलें आहे. ज्या वस्तूपासून दुसऱ्या वस्तूचा विभाग होतो त्या वस्तूला ध्रुव म्हणतात.

३. संज्ञीचा निर्देश येथें नसल्यामुळें पुढील सूत्रांमध्यें ह्या संज्ञाशब्दाची अनुवृत्ति होऊन अपादान वगैरे संज्ञांचें जें उद्देश्य तेंच ह्या कारकसंज्ञेचें उद्देश्य होईल आणि ध्रुव वगैरेंनाच कारकसंज्ञा होईल.

४. येथें ग्राम हा समीप पदार्थाचें विशेषण असल्यामुळें त्याचा क्रियान्वय नाहीं. त्यावरून त्याला आगमनक्रियासाधकत्व विवक्षित नाहीं असें दिसतें.

पम्। यदा च ग्रामोऽपाययुक्तो भवति भवति तदापादानसंज्ञा। तद्यथा। ग्रामादागच्छतीति ॥

**कर्मसंज्ञाप्रसङ्गोऽकथितस्य ब्राह्मणस्य पुत्रं पन्थानं पृच्छतीति ॥ ३ ॥**

कर्मसंज्ञा च प्राप्नोत्यकथितस्य। क। ब्राह्मणस्य पुत्रं पन्थानं पृच्छतीति ॥ नैष दोषः। अयमकथितशब्दोऽस्त्येवासंकीर्तिते वर्तते। तद्यथा। कश्चित्कंचित्संचक्ष्याह। असावत्राकथितः। असंकीर्तित इति गम्यते। अस्त्यप्राधान्ये वर्तते। तद्यथा। अकथितोऽसौ ग्रामे अकथितोऽसौ नगर इत्युच्यते यो यत्राप्रधानो भवति ॥ तद्यदाप्राधान्येऽकथितशब्दो वर्तते तदैष दोषः कर्मसंज्ञाप्रसङ्गोऽकथितस्य ब्राह्मणस्य पुत्रं पन्थानं पृच्छतीति ॥

**अपादानं च वृक्षस्य पर्णं पततीति ॥ ४**

अपादानसंज्ञा च प्राप्नोति। क। वृक्षस्य पर्णं पतति। कुड्यस्य पिण्डः पततीति ॥

**न वापायस्याविवक्षितत्वात् ॥ ५ ॥**

न वैष दोषः। किं कारणम्। अपायस्याविवक्षितत्वात्। नात्रापायो विवक्षितः। किं तर्हि। संबन्धः। यदा चापायो विवक्षितो भवति भवति तदापादानसंज्ञा।

---

तेव्हां त्या ग्रामाला अपादानसंज्ञा होतेच; जसें– ग्रामादागच्छति.

(वा.३) तसेंच अकथिताला कर्मसंज्ञा (१।४।५०) होऊं लागेल.

ती कोठें ?

ब्राह्मणस्य पुत्रं पन्थानं पृच्छति येथें.

हा दोष येत नाहीं. कारण हा अकथित शब्द असंकीर्तित या अर्थाचा आहे; जसें– एखाद्या कुलासंबंधानें माहिती देणारा कोणी एक विवेचक मनुष्य त्या कुलांतील मनुष्यांच्या संबंधानें माहिती देतां देतां त्या कुलांतील एकाला मुद्दाम वगळून पुढें म्हणतो की हा येथें अकथित आहे, म्हणजे त्याच्या संबंधानें हा कांहीं बोलला नाहीं, तरी पण तो त्या कुलांतलाच आहे असें लोक समजतातच.

आतां अकथित हा शब्द 'अप्रधान' या अर्थालाही दाखवितो; जसें– अकथितोऽसौ ग्रामे, अकथितोऽसौ नगरे, असें म्हटलें असतां या वाक्यापासून या गांवामध्यें हा अप्रधान आहे असा अर्थ मनांत येतो. तेव्हां 'अकथितं च' ह्या सूत्रांतील अकथित हा शब्द जेव्हां अप्रधान या अर्थाचा गृहीत धरावा तेव्हां ब्राह्मणस्य पुत्रं पन्थानं पृच्छति या वाक्यामध्यें अप्रधान अशा ब्राह्मणाला कर्मसंज्ञा होईल असा दोष येणार आहे.

(वा.४) तसेंच क्रियेचें साधक अशा रूपानें विवक्षित नसलेल्याला अपादानसंज्ञा होऊं लागेल.

ती कोठें ?

वृक्षस्य पर्णं पतति, कुड्यस्य पिण्डः पतति, येथें.

(वा.५) हा वरील दोष येत नाहीं.

काय कारण ?

वृक्ष आणि पर्ण या उभयतांचा विभाग येथें विवक्षित नाहीं.

तर मग काय विवक्षित आहे ?

वृक्ष आणि पर्ण या उभयतांचा संबंध येथें दाखवावयाचा आहे. जेव्हां त्या उभयतांचा संबंध दाखवावयाचा असतो तेव्हां अपादानसंज्ञा होतेच, जसें– वृक्षात्पर्णं पतति; व तेव्हां

---

५. त्याप्रमाणें पाणिनीनें कारकप्रकरण चालू करून त्यांतील अपादान, संप्रदान, वगैरेंची माहिती देऊन पुढें अकथिताला कर्मसंज्ञा सांगितली आहे. तेव्हां तें अपादान वगैरेंनीं अकथित खरें, पण कारक असलें पाहिजे असें त्यावरून सहजच सिद्ध होतें. तेव्हां ब्राह्मणस्य पुत्रं पन्थानं पृच्छति येथें ब्राह्मणस्य हें कारक नसल्यामुळें अकथितपदानें त्याचा संग्रह होत नाहीं. तेव्हां तो दोष येत नाहीं.

तद्यथा। वृक्षात्पर्णं पततीति। संबन्धस्तु तदा न विवक्षितो भवति। न ज्ञायते कङ्कस्य वा कुररस्य वेति ॥

अयं तर्हि दोषः कर्मसंज्ञाप्रसङ्गश्चाकथितस्य ब्राह्मणस्य पुत्रं पन्थानं पृच्छतीति। नैष दोषः। कारक इति महती संज्ञा क्रियते। संज्ञा च नाम यतो न लघीयः। कुत एतत्। लघ्वर्थं हि संज्ञाकरणम्। तत्र महत्याः संज्ञायाः करण एतत्प्रयोजनमन्वर्थसंज्ञा यथा विज्ञायेत। करोतीति कारकमिति।

**अन्वर्थमिति चेदकर्तरि कर्तृशब्दानुपपत्तिः ॥ ६ ॥**

अन्वर्थमिति चेदकर्तरि कर्तृशब्दो नोपपद्यते। करणं कारकम्। अधिकरणं कारकमिति ॥

**सिद्धं तु प्रतिकारकं क्रियाभेदात्पचादीनां करणाधिकरणयोः कर्तृभावः ॥ ७ ॥**

सिद्धः करणाधिकरणयोः कर्तृभावः। कुतः। प्रतिकारकं क्रियाभेदात्पचादीनाम्। पचादीनां हि प्रतिकारकं क्रिया भिद्यते। किमिदं प्रतिकारकमिति। कारकं कारकं प्रति प्रतिकारकम् ॥ कोऽसौ प्रतिकारकं क्रियाभेदः पचादीनाम्।

**अधिश्रयणोदकासेचनतण्डुलावपनैधोपकर्षणक्रियाः प्रधानस्य कर्तुः पाकः ॥ ८ ॥**

---

त्या उभयतांचा संबंध दाखवायाचा नसतो, म्हणजे तें पर्ण कंकवृक्षाचें आहे किंवा कुरर वृक्षाचें आहे हें दाखवावयाचें नसतें.

तर मग ब्राह्मणस्य पुत्रं पन्थानं पृच्छति येथें अकथित म्हणजे अप्रधान अशा ब्राह्मणाला 'अकथितं च' यानें कर्मसंज्ञा होऊं लागेल, हा दोष तर येत आहेच ना ?

हाही दोष येत नाहीं. कारण कारक ही महासंज्ञा केली आहे, आणि संज्ञा म्हणून जी करावयाची ती तर इतकी लहान पाहिजे की जिच्यापेक्षां दुसरी लहान सांपडणार नाहीं.

हें कशावरून ?

पुष्कळसे अर्थ एका लहानशा शब्दाखालीं यावेत या हेतूनेंच संज्ञा करावयाची असते. असें असतां येथें कारक अशी जी मोठी संज्ञा केली आहे त्याचा असा उद्देश दिसतो की कारक ही संज्ञा करोति इति कारकम् अशी अन्वर्थ समजली जावी.[६]

(वा.६) कारक ही अन्वर्थसंज्ञा आहे असें म्हटलें तर कर्तरि ण्वुल्प्रत्यय करून बनविलेला, क्रिया करणारा अशा अर्थाचा, कारक हा शब्द फक्त कर्त्यालाच लागू पडेल. तेव्हां कर्त्याशिवाय इतरांना म्हणजे करण, अधिकरण, वगैरेंना कारक ही संज्ञा होणार नाहीं.

(वा.७) करण किंवा अधिकरण यांना कारक म्हणतां येतें.

तें कसें ?

पच् वगैरे धातूंच्या वाच्य क्रिया ह्या प्रतिकारक निरनिराळ्या आहेत.

प्रतिकारकम् असें म्हटलें आहे त्याचा अर्थ काय ?

कारकं कारकं प्रति प्रतिकारकम्. म्हणजे प्रत्येक कारकाच्या, असा प्रतिकारक याचा अर्थ होतो.

पचि वगैरे क्रिया ह्या प्रत्येक कारकाच्या निरनिराळ्या कोणत्या ?

(वा.८) चुलीवर भांडें ठेवणें, त्यांत पाणी घालणें, तांदूळ वैरणें, लाकडें लावणें, वगैरे क्रिया करणाऱ्यालाच 'देवदत्तः पचति'— हा देवदत्त पाक करीत आहे, असें म्हणतात. तेव्हां

---

६. तेव्हां ब्राह्मणस्य पुत्रं येथें ब्राह्मण हा अकथित म्हणजे अप्रधान जरी असला तरी त्याला पृच्छति या क्रियेचें साधकत्व विवक्षित नसल्यामुळें कारकसंज्ञा होणार नाहीं, आणि म्हणूनच कर्मसंज्ञाही होणार नाहीं.

अधिश्रयणोदकासेचनतण्डुलावपनैधोपकर्षणादिक्रियाः कुर्वन्नेव देवदत्तः पचतीत्युच्यते। तत्र तदा पचिर्वर्तते। एष प्रधानकर्तुः पाकः। एतत्प्रधानकर्तुः कर्तृत्वम् ॥

**द्रोणं पचत्याढकं पचतीति संभवनक्रिया धारणक्रिया चाधिकरणस्य पाकः ॥ ९ ॥**

द्रोणं पचत्याढकं पचतीति संभवनक्रियां धारणक्रियां च कुर्वती स्थाली पचतीत्युच्यते। तत्र तदा पचिर्वर्तते। एषोऽधिकरणस्य पाकः। एतदधिकरणस्य कर्तृत्वम् ॥

**एधाः पक्ष्यन्त्या विक्लित्तेर्ज्वलिष्यन्तीति ज्वलनक्रिया करणस्य पाकः ॥ १० ॥**

एधाः पक्ष्यन्त्या विक्लित्तेर्ज्वलिष्यन्तीति ज्वलनक्रियां कुर्वन्ति काष्ठानि पचन्तीत्युच्यन्ते। तत्र तदा पचिर्वर्तते। एष करणस्य पाकः। एतत्करणस्य कर्तृत्वम् ॥

**उद्यमननिपातनानि कर्तुश्छिदिक्रिया ॥ ११ ॥**

उद्यमननिपातनानि कुर्वन्देवदत्तश्छिनत्तीत्युच्यते। तत्र तदा छिदिर्वर्तते। एष प्रधानकर्तुश्छेदः। एतत्प्रधानकर्तुः कर्तृत्वम् ॥

**यत्तत्र तृणेन तत्परशोश्छेदनम् ॥ १२ ॥**

यत्तत्समान उद्यमने निपातने च परशुना छिद्यते न तृणेन तत्परशोश्छेदनम् ॥ अवश्यं चैतदेवं विज्ञेयम्।

**इतरथा ह्यसितृणयोश्छेदनेऽविशेषः स्यात् ॥ १३ ॥**

यो हि मन्यत उद्यमननिपातनादेवैतद्भवति च्छिनत्तीत्यसितृणयोश्छेदने न

---

पच्धातु देवदत्तावरील अधिश्रयण वगैरे क्रिया दाखवितो. ही सर्व मुख्य कर्त्याची पचिक्रिया होय, म्ह. मुख्य कर्त्याचें कर्तृत्व तें हेंच होय.

(वा.९) द्रोण किंवा आढक ह्या परिमाणाचें धान्य आपल्यामध्यें सांठवून घेऊन शिजेपर्यंत त्याला धारण करणाऱ्या स्थालीला पाहून 'स्थाली पचति' म्ह. हें भांडें पायलीभर धान्य शिजवतें, असें म्हणतात. तेव्हां पच्धातु स्थालीवरील सांठवणें, धारण करणें, ह्या क्रियेला दाखवितो. ही अधिकरणाची पचिक्रिया होय. अधिकरणाचें कर्तृत्व तें हेंच होय.

(वा.१०) शिजेपर्यंत आपोआप सरळ जळणारीं लाकडें पाहून 'एधाः पक्ष्यन्ति' म्ह. हीं लाकडेंच भात शिजवितील, असें म्हणतात. तेव्हां पच्धातु त्या काष्ठांवरील उत्तम प्रकारें जळणें ही क्रिया दाखवितो. ही करणावरील पचिक्रिया होय. करणाचें कर्तृत्व तें हेंच होय.

(वा.११) कुऱ्हाड उचलून खालीं लाकडांवर घाव घालणें ही क्रिया करणाऱ्या देवदत्ताला 'देवदत्तश्छिनत्ति' म्ह. देवदत्त लाकडें फोडतो, असें म्हणतात. तेव्हां तो छिद्धातु देवदत्तावरील कुऱ्हाड उचलणें वगैरे क्रिया दाखवितो. ही मुख्य कर्त्याची छिदिक्रिया होय. हेंच मुख्य कर्त्याचें कर्तृत्व होय.

(वा.१२) वर उचलून खालीं घाव घालणें ही क्रिया सारखीच असतांना कुऱ्हाडीनें मात्र तोडलें जातें, गवताच्या काडीनें तोडलें जात नाहीं, असा जो कांहीं कुऱ्हाडीमध्यें विशेष आहे तीच कुऱ्हाडीची छिदिक्रिया होय, आणि असें अवश्य स्वीकारलेंच पाहिजे.

(वा.१३) जो असें समजतो की वर उचलून खालीं घाव घालणें ह्या क्रियेमुळें तोडलें जातें त्याच्या दृष्टीनें तोडतांना तरवार काय आणि गवत काय यांमध्यें कांहीं विशेषच राहणार नाहीं. तेव्हां जें तरवारीनें तोडलें जातें तें गवतानेंही तोडलें गेलें पाहिजे.

तस्य विशेषः स्यात् । यदसिना छिद्यते तृणेनापि तच्छिद्येत ॥

**अपादानादीनां त्वप्रसिद्धिः ॥ १४ ॥**

अपादानादीनां कर्तृत्वस्याप्रसिद्धिः । यथा हि भवता करणाधिकरणयोः कर्तृत्वं निदर्शितं न तथापादानादीनां कर्तृत्वं निदर्श्यते ॥

**न वा स्वतन्त्रपरतन्त्रत्वात्तयोः पर्यायेण वचनं वचनाश्रया च संज्ञा ॥ १५**

न वैष दोषः । किं कारणम् । स्वतन्त्रपरतन्त्रत्वात् । सर्वत्रैवात्र स्वातन्त्र्यं पारतन्त्र्यं च विवक्षितम् । तयोः पर्यायेण वचनम् । तयोः स्वातन्त्र्यपारतन्त्र्ययोः पर्यायेण वचनं भविष्यति । वचनाश्रया च संज्ञा भविष्यति । तद्यथा । बलाहकाद्विद्योतते । बलाहके विद्योतते । बलाहको विद्योतत इति ॥ किं तर्ह्युच्यतेऽपादानादीनां त्वप्रसिद्धिरिति । एवं तर्हि न ब्रूमोऽपादानादीनां कर्तृत्वस्याप्रसिद्धिरिति । पर्याप्तं करणाधिकरणयोः कर्तृत्वं निदर्शितमपादानादीनां कर्तृत्वनिदर्शनाय । पर्याप्तो ह्येकः पुलाकः स्थाल्या निदर्शनाय । किं तर्हि । संज्ञाया अप्रसिद्धिः । यावता सर्वत्रैवात्र स्वातन्त्र्यं विद्यते पारतन्त्र्यं च तत्र परत्वात्कर्तृसंज्ञैव प्राप्नोति ॥ अत्रापि न वा स्वतन्त्र-

---

(वा.१४) अपादान वगैरेंना मात्र क्रियेचें कर्तृत्व नसतें. ज्याप्रमाणें काष्ठानि पचन्ति, स्थाली पचति, असें करण वगैरेंना कर्तृत्व दाखविलें त्याप्रमाणें अपादान वगैरेंना दाखविलें नाहीं.

(वा.१५) हा दोष येत नाहीं.

काय कारण ?

स्वतन्त्रपरतन्त्रत्वात्, म्हणजे सर्वच कारकांवरील क्रिया स्वातन्त्र्यानें दाखविणें किंवा पारतन्त्र्यानें दाखविणें हें वक्त्याच्या मर्जीवर अवलंबून असतें. तेव्हां तयोः पर्यायेण वचनम् म्हणजे वक्ता हा आपल्या इच्छेनुसार पर्यायानें स्वातन्त्र्यानें किंवा पारतन्त्र्यानें क्रियेचें प्रतिपादन करील, आणि जसें प्रतिपादन करील त्या मानानें कर्ता ही संज्ञा होईल किंवा इतर संज्ञा होतील; जसें— बलाहकाद्विद्योतते विद्युत्, बलाहके विद्योतते, बलाहको विद्योतते. आतां अशा रीतीनें अपादानाला कर्तृत्व प्रसिद्ध असतां अपादान वगैरेंना मात्र कर्तृत्व नसतें असें जें म्हटलें तें कसें ?

तर मग अपादान वगैरेंना क्रियेचें कर्तृत्व नसतें असें आम्ही म्हणत नाहीं. करण आणि अधिकरण यांना जें कर्तृत्व दाखविलें तेंच अपादानादिकानांही कर्तृत्व असतें असें दाखविण्याविषयीं भरपूर प्रमाण आहे. भांड्यांतील सर्व भात कितपत शिजला हें पाहण्याला एक शीत पुरेंसें होतें तसेंच हें होय.

तर मग तुमचें काय म्हणणें आहे ?

अपादान वगैरेंना त्या त्या संज्ञा सिद्ध होणार नाहींत असें म्हणणें आहे. अपादान, संप्रदान, यांनाच काय पण कर्त्याशिवाय सर्वच कारकांना स्वातन्त्र्यही आहे आणि पारतन्त्र्यही आहे. तेव्हां अपादान वगैरे इतर सर्वच संज्ञांचा बाध करून परत्वास्तव कर्तृसंज्ञाच होऊं लागेल.

---

७. बलाहक म्हणजे मेघ. त्यांतून बाहेर पडून वीज चमकते असा या वाक्याचा अर्थ आहे. येथें बाहेर पडून चमकणें या अर्थाला द्युत्धातु दाखवितो. त्या बाहेर पडण्याला अवधि म्हणून बलाहक निर्दिष्ट केला आहे; म्हणून त्याला अपादानसंज्ञा केली व पञ्चमी केली आहे. ठाणें देऊन चमकणें या अर्थी द्युत्धातु घेतला तर त्या ठाणें देण्याचें ठिकाण म्हणून बलाहकाला अधिकरणसंज्ञा होते आणि सप्तमी होते. 'बलाहको विद्योतते' येथें बलाहक कर्ताच आहे. येथें बलाहक आणि वीज यांचें ऐक्य गृहीत धरलें आहे व चमकणें हा द्युत्धातूचा अर्थ आहे.

परतन्त्रत्वात्तयोः पर्यायेण वचनं वचनाश्रया च संज्ञेत्येव ॥

यथा पुनरिदं भवता स्थाल्याः स्वातन्त्र्यं निदर्शितं संभवनक्रियां धारणक्रियां च कुर्वती स्थाली स्वतन्त्रेति क्वेदानीं परतन्त्रा स्यात् । यत्तत्प्रक्षालनं परिवर्तनं वा । न वा एवमर्थं स्थाल्युपादीयते प्रक्षालनं परिवर्तनं च करिष्यामीति । किं तर्हि । संभवनक्रियां धारणक्रियां च करिष्यतीति । तत्र चासौ स्वतन्त्रा । क्वेदानीं परतन्त्रा ॥ एवं तर्हि स्थालीस्थे यत्ने कथ्यमाने स्थाली स्वतन्त्रा कर्तृस्थे यत्ने कथ्यमाने परतन्त्रा ॥ ननु च भोः कर्तृस्थेऽपि वै यत्ने कथ्यमाने स्थाली संभवनक्रियां धारणक्रियां च करोति । तत्रासौ स्वतन्त्रा । क्वेदानीं परतन्त्रा ॥ एवं तर्हि प्रधानेन समवाये स्थाली परतन्त्रा व्यवाये स्वतन्त्रा । तद्यथा । अमात्यादीनां राज्ञा सह समवाये पारतन्त्र्यं व्यवाये स्वातन्त्र्यम् । किं पुनः प्रधानम् । कर्ता । कथं पुनर्ज्ञायते कर्ता प्रधानमिति । यत्सर्वेषु साधनेषु संनिहितेषु कर्ता प्रवर्तयिता भवति ॥ ननु च भोः प्रधानेनापि वै समवाये स्थाल्या

---

येथेंही तेंच उत्तर आहे. म्हणजे सर्वच कारकांवरील क्रिया स्वातन्त्र्यानें किंवा पारतन्त्र्यानें दाखविणें हें वक्त्याच्या मर्जीवर अवलंबून असतें. तेव्हां वक्ता हा आपल्या इच्छेनुसार पर्यायानें स्वातन्त्र्यानें किंवा पारतन्त्र्यानें क्रियेचें प्रतिपादन करील, आणि जसें प्रतिपादन करील त्या मानानें कर्तृसंज्ञा किंवा इतर संज्ञा होतील.

पण जसें द्रोणभर धान्य शिजेपर्यंत आपल्यामध्यें सांठवून धारण करणें ही क्रिया करण्याविषयीं स्थाली स्वतन्त्र आहे म्हणून तिला 'स्थाली पचति' असें कर्तृत्व दाखविलें तसें कोणती क्रिया बरें तिला पारतन्त्र्य दाखवूं शकेल ?

घासणें किंवा बदलणें या क्रियेविषयीं ती स्थाली परतन्त्र्य आहे.

पण त्या क्रियेच्या उद्देशानें कांहीं तिला कोणी जवळ घेत नाहीं, तर तिच्यांत शेर किंवा पायली तांदूळ व्यवस्थित रीतीनें शिजतील या उद्देशानें ती घेतली जाते आणि त्या क्रियेच्या मानानें पाहिलें तर ती स्वतन्त्रच आहे.

तर मग आतां आम्ही असें म्हणतों की स्थालीवरील क्रिया पच्धातूनें दाखवावयाची असेल तर स्थाली स्वतंत्र आहे. आणि कर्त्यावरील क्रिया पच्धातूनें दाखवावयाची असेल तर स्थाली ही परतन्त्र आहे.

अरे पण, कर्त्यावरील क्रिया पच्धातूनें दाखविली गेली तरी देखील स्थाली ही धान्य आपल्यांत सामवून व्यवस्थित रीतीनें शिजविणें ही क्रिया करीत आहेच, आणि त्या क्रियेविषयीं तर ती स्वतन्त्र आहे. तेव्हां आतां ती परतन्त्र कोठें बरें असूं शकेल ?

तर मग आम्ही असें म्हणतों की मुख्य कर्ता जवळ आहे असें दाखवावयाचें असेल तर ती परतन्त्र होय, आणि तसें नसेल तर ती स्वतन्त्र होय; जसें– राजाचें सांनिध्य असतां अमात्य वगैरे अधिकारी लोकांना पारतन्त्र्य असतें, आणि राजाचें सांनिध्य नसतां तेच अधिकारी लोक राजकार्याविषयीं स्वतन्त्र असतात.

आतां ह्या कारकांमध्यें मुख्य असें कोणाला बरें समजावें ?

कर्ता मुख्य समजावा.

पण कर्ता मुख्य आहे हें कसें बरें समजावें ?

करण, कर्म, वगैरे सर्व साधनें जय्यत तयार असतांनाही त्या साधनांचा प्रवर्तक कर्ताच होतो म्हणून कर्ता मुख्य होय.

अरे पण,प्रधानाचें सांनिध्य असतांना देखील

अनेनार्थोऽधिकरणं कारकमिति । न हि कारकमित्यनेनाधिकरणत्वमुक्तमधिकरणमिति वा कारकत्वम् । उभौ चान्योऽन्यविशेषकौ भवतः । कथम् । एकद्रव्यसमवायित्वात् । तद्यथा । गार्ग्यो देवदत्त इति । न हि गार्ग्य इत्यनेन देवदत्तत्वमुक्तं देवदत्त इत्यनेन वा गार्ग्यत्वम् । उभौ चान्योऽन्यविशेषकौ भवत एकद्रव्यसमवायित्वात् ॥ एवं तर्हि सामान्यभूता क्रिया वर्तते तस्या निर्वर्तकं कारकम् ॥ अथवा यावद्ब्रूयात्क्रियायामिति तावत्कारक इति । एवं च कृत्वा निर्देश उपपन्नो भवति कारक इति । इतरथा हि कारकेष्विति ब्रूयात् ॥

---

स्थालीला अधिकरण असें आणि कारक असें म्हणतां आलें पाहिजे. तेव्हां जर प्रधानाचें सांनिध्य असतांना स्थालीला स्वातन्त्र्य नसल्यामुळें कर्ता असें म्हणतां येत नाहीं तर त्याच अर्थाची कारक ही अन्वर्थ संज्ञाही स्थालीला करतां येणार नाहीं, आणि कारक व अधिकरण या दोन्ही संज्ञा एकदम तर झाल्याच पाहिजेत; कारण कारकशब्दानें 'अधिकरण' हा अर्थ दाखविला जात नाहीं, तसाच अधिकरणशब्दानें कारक हा अर्थ दाखविला जात नाहीं. अधिकरण आणि कारक हे दोन शब्द परस्परांचा विशेष दाखविणारे आहेत.

तें कसें ?

एकाच पदार्थाचे ठिकाणीं उभयतांचा समावेश होत आहे म्हणून; जसें— 'देवदत्तो गार्ग्यः' येथें गार्ग्यशब्दानें तो देवदत्त नांवाचा आहे हें दाखविलें जात नाहीं, तसेंच देवदत्तशब्दानें गर्गाचें गोत्रापत्य हा अर्थ दाखविला जात नाहीं. तरी पण ते दोघे एकमेकांचा विशेष दाखविणारे होतातच. कारण त्यांचा एकाच पदार्थाचे ठिकाणीं समावेश होत आहे. तसाच येथें अधिकरण आणि कारक या संज्ञांचा समावेश होत असतो. तेव्हां 'देवदत्तः स्थाल्यां पचति' येथें मुख्य कर्ता देवदत्त संनिध असल्यामुळें स्थाली या अधिकरणाला पचनक्रियेमध्यें स्वातन्त्र्य नाहीं. त्यामुळें कारक ही अन्वर्थसंज्ञा होणार नाहीं.

हा दोष येत नाहीं. कारण काष्ठ, स्थाली, वगैरेंच्या ज्या विशेष क्रिया त्यांचें जें विक्लित्तीला उत्पन्न करणें हें सामान्य रूप त्यामध्यें स्वातन्त्र्य सर्व कारकांना सदोदित असतेंच. तेव्हां कारकसंज्ञा होण्याला कांहीं हरकत नाहीं.

अथवा 'क्रियायाम्' हा शब्द जेवढ्या अर्थाला दाखवितो तेवढ्याच अर्थाला कारके हा शब्द दाखवीत आहे. म्हणूनच 'कारके' येथें सप्तम्येकवचनानें केलेला निर्देश जुळून येतो. नाहीं तर 'कारकेषु' असा बहुवचनानें निर्देश आचार्यांनीं केला असता.

---

८. एकंदरींत स्थालीला सामान्यक्रियेमध्यें स्वातन्त्र्य असल्यामुळें कारकसंज्ञा होते. तंडुलधारणरूपी विशेषक्रियेमध्यें स्वातन्त्र्य विवक्षित असेल तर कर्तृसंज्ञा होते. विशेषक्रियेमध्यें पारतन्त्र्य विवक्षित असेल तर अधिकरणसंज्ञा होते. सामान्यक्रियेमध्यें स्वातन्त्र्य विवक्षित नसेल तर कारक ही संज्ञा होत नाहीं व त्यामुळें इतर संज्ञाही कोणतीच त्या वेळीं होत नाहीं.

९. या पक्षीं कारक हा संज्ञानिर्देश नव्हे. 'क्रियाविषय असतांना' अशा अर्थाचा हा शब्द आहे. या अर्थींच पुढें अनुवृत्त होत आहे. कारकशब्दाचा विग्रह 'करोतीति कारकम्' असाच आहे. क्रिया ही कर्ता, कर्म, वगैरे व्यवहार करते, म्हणून त्या क्रियेला कारक म्हणतांना तो विग्रह जुळतो.

१०. संज्ञापक्ष घेतला तर क्रियाजनकाची कारक ही संज्ञा होय. त्या कारकामध्यें ध्रुवाला अपादान म्हणावें, अशा रीतीनें पुढील सूत्रामध्यें अन्वय करावा लागेल. त्याला कारकेषु हाच निर्देश योग्य होणार आहे.

**ध्रुवमपायेऽपादानम् ॥१।४।२४॥**

ध्रुवमिति किमर्थम् । ग्रामादागच्छति शकटेन । नैतदस्ति । करणसंज्ञात्र बाधिका भविष्यति ॥ इदं तर्हि । ग्रामादागच्छन्कंसपात्र्यां पाणिनौदनं भुङ्क्त इति । अत्राप्यधिकरणसंज्ञा बाधिका भविष्यति ॥ इदं तर्हि । वृक्षस्य पर्णं पतति । कुड्यस्य पिण्डः पततीति ॥

**जुगुप्साविरामप्रमादार्थानामुपसंख्यानम् ॥ १ ॥**

जुगुप्साविरामप्रमादार्थानामुपसंख्यानं कर्तव्यम् ॥ जुगुप्सा । अधर्माज्जुगुप्सते । अधर्माद्बीभत्सते ॥ विराम । धर्माद्विरमति । धर्मान्निवर्तते ॥ प्रमाद । धर्मात्प्रमाद्यति । धर्मान्मुह्यति ॥

इह चोपसंख्यानं कर्तव्यम् । सांकाश्यकेभ्यः पाटलिपुत्रका अभिरूपतरा इति ॥

तत्तर्हीदं वक्तव्यम् । न वक्तव्यम् । इह तावदधर्माज्जुगुप्सते अधर्माद्बीभत्सत इति य एष मनुष्यः प्रेक्षापूर्वकारी भवति स पश्यति दुःखोऽधर्मो नानेन कृत्यमस्तीति । स बुद्ध्या संप्राप्य निवर्तते । तत्र ध्रुवमपायेऽपादानमित्येव

---

(सू.२४) येथें ध्रुवशब्द घातला आहे तो कशासाठीं ?

'ग्रामात् आगच्छति शकटेन' येथें शकटपदार्थाला अपादानसंज्ञा होऊं नये याकरितां ध्रुवशब्द घातला आहे.

हा उपयोग होत नाहीं. कारण शकटाला परत्वास्तव अपादानसंज्ञेचा बाध करून करणसंज्ञा होईल.

तर मग ग्रामादागच्छन् कंसपात्र्यां पाणिनौदनं भुङ्क्ते, म्हणजे गांवाहून येतां येतां हातानें कंसपात्रींतून भात खातो, या वाक्यांतील कंसपात्रीला अपादानसंज्ञा न व्हावी हा ध्रुवशब्दाचा उपयोग समजावा. येथेंही कंसपात्रीची अधिकरणसंज्ञा ही अपादानसंज्ञेचा बाध करील. असें आहे तर 'वृक्षस्य पर्णं पतति, कुड्यस्य पिण्डः पतति' येथें वृक्ष आणि कुड्य यांना अपादानसंज्ञा न व्हावी यासाठीं ध्रुवशब्द घातला आहे असें समजावें.

(वा.१) जुगुप्सा, विराम आणि प्रमाद या क्रियांना दाखविणाऱ्या धातूंचा प्रयोग असतांना त्या क्रियेच्या साधकाला अपादानसंज्ञा होते असें सांगावें; उदा०— अधर्माज्जुगुप्सते,[2] अधर्माद्बीभत्सते, धर्माद्विरमति, धर्मान्निवर्तते, धर्मात्प्रमाद्यति, धर्मान्मुह्यति.

तसेंच 'सांकाश्यकेभ्यः पाटलिपुत्रका अभिरूपतराः' येथेंही अपादानसंज्ञा होते असें सांगावें.

तर मग हें बरेंचसें सांगतलें पाहिजे.

सांगावयास नको. अधर्माज्जुगुप्सते, अधर्माद्बीभत्सते, येथें जो मनुष्य विचारशील आहे तो असें समजतो की अधर्म हा दुःखप्रद असल्यामुळें त्यापासून कांहीं एक फायदा होणार नाहीं. अशा रीतीनें मनामध्यें प्रथमतः अधर्माच्या संबंधानें कल्पना येऊन नंतर तो अधर्मापासून वियुक्त होतो. तेव्हां अर्थातच येथें अधर्म या पदार्थाला ध्रुव असें म्हणतां येत

---

१. कोणत्याही क्रियेमुळें एखाद्या वस्तूचा ज्या स्थिर पदार्थापासून वियोग दाखवावयाचा असतो त्या पदार्थाला ध्रुव म्हणतात. त्या ध्रुव पदार्थाला त्या क्रियेचें साधकत्व विवक्षित असेल तर त्याला कारक ही संज्ञा होते आणि अपादानसंज्ञा होते. 'कारक ही संज्ञा' हा पक्ष घेतला नाहीं त्या वेळीं 'कारकसंज्ञा होते' हें वगळावें. त्या वेळीं 'क्रियेचें साधकत्व विवक्षित असेल तर' हा कारके याचा अर्थ होय. संज्ञापक्षीं तो अर्थ अन्वर्थसंज्ञेच्या जोरावर निघतो.

२. अधर्मापासून आपलें रक्षण व्हावें अशी इच्छा करतो, अधर्म आपल्याला चिकटूं नये अशी इच्छा करतो, धर्मापासून विराम पावतो, निवृत्त होतो, गैरसावध असतो, मोहित असतो.

सिद्धम् ॥ इह च धर्माद्विरमति धर्मान्निवर्तत इति धर्मात्प्रमाद्यति धर्मान्मुह्यतीति य एष मनुष्यः संभिन्नबुद्धिर्भवति स पश्यति नेदं किंचिद्धर्मो नाम नैनं करिष्यामीति । स बुद्ध्या संप्राप्य निवर्तते । तत्र ध्रुवमपायेऽपादानमित्येव सिद्धम् ॥ इह च सांकाश्यकेभ्यः पाटलिपुत्रका अभिरूपतरा इति यस्तैः साम्यं गतवान्भवति स एतत्प्रयुङ्क्ते ॥

**गतियुक्तेष्वपादानसंज्ञा नोपपद्यतेऽध्रुवत्वात् ॥ २ ॥**

गतियुक्तेष्वपादानसंज्ञा नोपपद्यते । अश्वात्त्रस्तात्पतितः। रथात्प्रवीतात्पतितः। सार्थाद्गच्छतो हीन इति । किं कारणम् । अध्रुवत्वात् ॥

**न वाध्रौव्यस्याविवक्षितत्वात् ॥ ३ ॥**

न वैष दोषः । किं कारणम् । अध्रौव्यस्याविवक्षितत्वात् । नात्राध्रौव्यं विवक्षितम् । किं तर्हि । ध्रौव्यम् । इह तावदश्वात्त्रस्तात्पतित इति यत्तदश्वेऽश्वत्वमाशुगामित्वं तद्ध्रुवं तच्च विवक्षितम् । रथात्प्रवीतात्पतित इति यत्तद्रथे रथत्वं रमन्तेऽस्मिन्रथ इति तद्ध्रुवं तच्च विवक्षितम् । सार्थाद्गच्छतो हीन इति यत्तत्सार्थे सार्थत्वं सहार्थीभावस्तद्ध्रुवं तच्च विवक्षितम् ॥ यद्यपि तावदत्रैतच्छक्यते

---

असल्यामुळें 'ध्रुवमपाये' यानेंच अपादानसंज्ञा सिद्ध होत आहे.

धर्माद्विरमति, धर्मान्निवर्तते, धर्मात्प्रमाद्यति, धर्मान्मुह्यति, येथेंही ज्या मनुष्याला धर्म कोणता, अधर्म कोणता, हें बरोबर कळत नाहीं तो एखाद्या ठिकाणीं वस्तुतः धर्म असूनही 'हा कांहीं धर्म नव्हे, मी हा करणार नाहीं' असें समजतो. अर्थात् तेथें तो मनानें धर्माशीं संयुक्त होऊन नंतर त्यापासून निवृत्त होतो. तेव्हां तेथेंही 'ध्रुवपमाये' यानेंच अपादानसंज्ञा साधत आहे. सांकाश्यकेभ्यः पाटलिपुत्रका अभिरूपतराः येथेंही ज्या मनुष्यानें गुणसाम्यामुळें सांकाश्यकांबरोबर पाटलिपुत्रकांचें साम्य गृहीत धरलें आहे तोच मनुष्य येथें अधिक देखणेपणामुळेंच सांकाश्यकांपासून पाटलिपुत्रकांना पृथक् करून दाखवीत आहे. तेव्हां येथेंही पूर्वीप्रमाणेंच अपादानसंज्ञा साधत आहे.

(वा.२) ज्या पदार्थापासून एखाद्या वस्तूचा वियोग दाखवावयाचा असतो त्या पदार्थामध्यें गति असेल तर त्याला अपादानसंज्ञा होणार नाहीं; जसें— रथात्[३] प्रवीतात् पतितः, अश्वात्त्रस्तात् पतित्ः, सार्थाद्गच्छतो हीनः.

येथें अपादानसंज्ञा न होण्याचें काय कारण?

रथ, अश्व आणि सार्थ हे ध्रुव नव्हेत. कारण त्यांच्यामध्यें गति असल्यामुळें स्थिरपणा नाहीं.

(वा.३) हा दोष येत नाहीं.

काय कारण ?

येथें अस्थैर्य हें विवक्षित नाहीं.

तर काय विवक्षित आहे ?

स्थैर्य विवक्षित आहे; जसें— अश्वात्त्रस्तात्पतितः. येथें अश्नोतीत्यश्वः या व्युत्पत्तीवरून आशुगामित्व म्ह. शीघ्रगामित्व असा तो धर्म दाखविला जातो. त्यावरून अश्वशब्दाचें प्रवृत्तिनिमित्त अश्वत्व असें जें ठरलें आहे त्या रूपानें तो स्थिरच आहे, आणि तेंच विवक्षित आहे. तसेंच रथात् प्रवीतात् पतितः येथें रमन्तेऽस्मिन्निति रथः या रथशब्दाच्या व्युत्पत्तीवरून रमणाधारत्व हा जो धर्म दाखविला जातो त्यावरून जें रथशब्दाचें प्रवृत्तिनिमित्त रथत्व ठरलें आहे त्या रूपानें तो रथ स्थिरच आहे, आणि तेंच विवक्षित आहे. तसेंच सार्थात् गच्छतो हीनः येथें त्या सार्थाचें ठिकाणीं जें कांहीं सार्थत्व म्हणजे एकजुटीनें

---

३. चालू झालेल्या रथांतून पडला, घाबरलेल्या घोड्यावरून पडला, हिंडणाऱ्या टोळींतून मागें राहिला.

वक्तुं ये त्वेतेऽत्यन्तगतियुक्तास्तत्र कथम्। धावतः पतितः। त्वरमाणात्पतित इति। अत्रापि न बाध्रौव्यस्याविवक्षितत्वादित्येव सिद्धम्॥ कथं पुनः सतो नामाविवक्षा स्यात्। सतोऽप्यविवक्षा भवति। तद्यथा। अलोमिकैडका। अनुदरा कन्येति। असतश्च विवक्षा भवति। समुद्रः कुण्डिका। विन्ध्यो वर्धितकमिति॥

**भीत्रार्थानां भयहेतुः॥१।४।२५॥**

अयं योगः शक्योऽवक्तुम्। कथं वृकेभ्यो बिभेति दस्युभ्यो बिभेति चौरेभ्यस्त्रायते दस्युभ्यस्त्रायत इति। इह तावद् वृकेभ्यो बिभेति दस्युभ्यो बिभेतीति य एष मनुष्यः प्रेक्षापूर्वकारी भवति स पश्यति यदि मां वृकाः पश्यन्ति ध्रुवो मे मृत्युरिति। स बुद्धया संप्राप्य निवर्तते। तत्र ध्रुवमपायेऽपादानम् [१.४.२४] इत्येव सिद्धम्॥ इह चौरेभ्यस्त्रायते दस्युभ्यस्त्रायत इति य एष मनुष्यः प्रेक्षापूर्वकारी सुहृद्भवति स पश्यति यदीमं चौराः पश्यन्ति ध्रुवमस्य वधबन्धनपरिक्लेशा इति। स बुद्धया संप्राप्य निवर्तयति।

---

वागणें हा धर्म आहे त्या रूपानें तो स्थिरच आहे, आणि तोच विवक्षित आहे.

आतां जरी अश्व वगैरे शब्दांमध्यें असें बोलतां आलें तरी धावतः पतितः, त्वरमाणात् पतितः येथें धावतः त्वरमाणात् हे शब्द कायमच्या गतीलाच दाखवितात तेथें त्या शब्दांपासून त्यांचें स्थिरत्वरूप काय बरें मनांत येतें?

येथेंही अस्थैर्य हें विवक्षित नाहीं हेंच उत्तर समजावें.

पण विद्यमान म्हणजे येथें शब्दानें दाखविलेल्या अर्थाची अविवक्षा कशी बरें करतां येईल?

विद्यमान अशाही अर्थाची अविवक्षा करतां येते; जसें— अलोमिका एडका, अनुदरा कन्या. तसेंच अविद्यमान अशा पदार्थाची विवक्षाही पण करतां येते; जसें— समुद्रः कुण्डिका, विन्ध्यो वर्धितकम्.

(सू.२५) हें सूत्र करावयास नको.

तर मग वृकेभ्यो बिभेति, दस्युभ्यो बिभेति, चोरेभ्यस्त्रायते, दस्युभ्यस्त्रायते, येथें वृक वगैरेंना अपादानसंज्ञा कशी बरें होईल?

जो मनुष्य विचारशील आहे तो असें समजतो की जर मजवर लांडग्याची नजर जाईल तर खरोखर माझा मृत्यु होईल. म्हणून तो मनानें लांडग्याशीं संबंध पावून तेथून निवृत्त होतो. तेव्हां तेथें 'ध्रुवमपाये' यानेंच अपादानसंज्ञा होईल. चोरेभ्यस्त्रायते, दस्युभ्यस्त्रायते, येथेंही एखादा विचारशील मित्र असा विचार करतो की जर या मनुष्याला चोर पाहतील तर खरोखर याला मारहाण करतील. अशा रीतीनें तो त्या मनुष्याला मनानें चोराशीं संगत करून अनर्थ टाळण्याकरितां चोरापासून त्याला

---

४. एडका म्हणजे मेंढीला जरी केश आहेत तरी ते अत्यंत सूक्ष्म असल्यामुळें त्यांची अविवक्षा करून अलोमिका असें म्हटलें आहे. तसेंच एखाद्या कन्येचें उदर अति लहान असल्यामुळें त्याची अविवक्षा करून तिला अनुदरा असें म्हटलें आहे. तसें येथें अस्थैर्य हें शब्दानें दाखविलें असूनही त्याची अविवक्षा करतां येते. तसेंच येथें स्थैर्य हें शब्दानें दाखविलें नसूनही त्याची विवक्षा करतां येते. कारण अविद्यमानाचीही विवक्षा होते. कुंडिका ही समुद्र नव्हे तरी तिला समुद्र म्हटलें आहे. तसेंच वर्धितक म्हणजे भाताचें डिखूळ तें विंध्य पर्वत नव्हे तरी त्याला विंध्यपर्वत म्हणतां येतें.

१. भयार्थक धातु आणि रक्षणार्थक धातु यांचा प्रयोग असतां तेथें भयाचा आणि रक्षणाचा जो हेतु तो अपादानसंज्ञक होतो; उदा०— चौराद्बिभेति, चौरात् त्रायते.

तत्र ध्रुवमपायेऽपादानमित्येव सिद्धम् ॥

**पराजेरसोढः ॥ १।४।२६ ॥**

अयमपि योगः शक्योऽवक्तुम् । कथम् अध्ययनात्पराजयत इति । य एष मनुष्यः प्रेक्षापूर्वकारी भवति स पश्यति दुःखमध्ययनं दुर्धरं च गुरवश्च दुरुपचारा इति । स बुद्ध्या संप्राप्य निवर्तते । तत्र ध्रुवमपायेऽपादानम् [१.४.२४] इत्येव सिद्धम् ॥

**वारणार्थानामीप्सितः ॥१।४।२७॥**

किमुदाहरणम् । माषेभ्यो गा वारयति । भवेद्यस्य माषा न गावस्तस्य माषा ईप्सिताः स्युः । यस्य तु खलु गावो न माषाः कथं तस्य माषा ईप्सिताः स्युः । तस्यापि माषा एवेप्सिताः । आतश्चेप्सिता यदेभ्यो गा वारयति ॥ इह कूपादन्धं वारयतीति कूपेऽपादानसंज्ञा न प्राप्नोति । न हि तस्य कूप ईप्सितः । कस्तर्हि । अन्धः । तस्यापि कूप एवेप्सितः । पश्यत्ययमन्धः कूपं मा प्रापदिति । अथवा यथैवास्यान्यत्रापश्यत ईप्सैवं कूपेऽपि ॥ इह अग्नेर्माणवकं वारयतीति माणवकेऽपादानसंज्ञा प्राप्नोति । कर्मसंज्ञात्र बाधिका भविष्यति । अग्नावपि

---

दूर करतो. तेव्हां तेथेंही 'ध्रुवमपाये' यानेंच अपादानसंज्ञा सिद्ध होत आहे.

(सू.२६) हेंही सूत्र करावयास नको.

तर मग अध्ययनात्पराजयते येथें अध्ययनाला अपादानसंज्ञा कशी बरें होईल ?

एखादा मनुष्य असा विचार करतो की अध्ययन हें अत्यंत कष्टप्रद आहे. आणि त्याची मनांत धारणा होणें हेंही कठीण आहे. शिवाय गुरूची मनधरणी करणें तर बहुत मुष्किलीचें आहे. म्हणून तो मनानें अध्ययनाशीं संबद्ध होऊन मग त्यापासून निवृत्त होतो. तेव्हां अध्ययनाला 'ध्रुवमपाये' यानेंच अपादानसंज्ञा साधत आहे.

(सू.२७) या सूत्राचें उदाहरण काय ?

माषेभ्यो गा वारयति हें उदाहरण होय.

ज्याच्या गायी स्वतःच्या नसून माष हे स्वतःचे असतील त्याला माष हे ईप्सित असूं शकतील. पण ज्याच्या गायी स्वतःच्या आहेत आणि माष हे स्वतःचे नव्हेत त्याला माष कसे बरें ईप्सित असूं शकतील ?

माष हे ज्याचे स्वतःचे नव्हेत त्यालाही ते माषच ईप्सित आहेत. कारण ज्यापेक्षां तो माषांचा नाश न व्हावा म्हणून गायींचें निवारण करीत आहे.

तर आतां कूपादन्धं वारयति येथें कूपाला अपादानसंज्ञा प्राप्त होऊं शकत नाहीं. कारण वारण करणाऱ्याला कूप हा ईप्सित नाहीं.

तर कोण त्याला ईप्सित आहे ?

अन्ध हा ईप्सित आहे.

येथें वारण करणाऱ्याला वारणक्रियेच्या दृष्टीनें कूपच ईप्सित आहे. कारण ह्या आंधळ्यानें विहिरीकडे जाऊं नये असेंच त्याच्या मनांत आहे. अथवा ज्याला पुढे कांहींच दिसत नाहीं अशा आंधळ्याला गमनक्रियेच्या दृष्टीनें इतर पुढील पदार्थ ईप्सित असतो तसा कूपही त्याला त्या दृष्टीनें ईप्सितच होत आहे.

आतां अग्नेर्माणवकं वारयति येथें माणवकाला अपादानसंज्ञा प्राप्त होत आहे.

माणवकाला अपादान आणि कर्म अशा दोन संज्ञा प्राप्त झाल्या असतां त्यांत पर असल्यामुळें कर्मसंज्ञा अपादानसंज्ञेचा बाध करील.

तर अग्नीच्याही अपादानसंज्ञेचा कर्मसंज्ञा

---

१. परा उपसर्गाच्या पुढें जिधातूचा प्रयोग केला असतां तेथें असह्य होणारा जो अर्थ त्याला अपादानसंज्ञा होते; उदा०— अध्ययनात्पराजयते.

१. वारणार्थक धातूंचा प्रयोग केला असतां तेथें ईप्सित पदार्थाला अपादानसंज्ञा होते; उदा०— यवेभ्यो गां वारयति.

तर्हि बाधिका स्यात् । तस्माद्वक्तव्यं कर्मणो यदीप्सितमिति । ईप्सितेप्सितमिति वा ।

**वारणार्थेषु कर्मग्रहणानर्थक्यं कर्तुरीप्सिततमं कर्मेति वचनात् ॥ १ ॥**

वारणार्थेषु कर्मग्रहणमनर्थकम् । किं कारणम् । कर्तुरीप्सिततमं कर्म [१.४.४९] इति वचनात् । कर्तुरीप्सिततमं कर्मेत्येव सिद्धम् ॥

अयमपि योगः शक्योऽवक्तुम् । कथं माषेभ्यो गा वारयतीति । पश्यत्ययं यदीमा गावस्तत्र गच्छन्ति ध्रुवं सस्यविनाशः सस्यविनाशेऽधर्मश्चैव राजभयं च । स बुद्ध्या संप्राप्य निवर्तयति । तत्र ध्रुवमपायेऽपादानम् [१.४.२४] इत्येव सिद्धम् ॥

**अन्तर्धौ येनादर्शनमिच्छति ॥ १ । ४ । २८ ॥**

अयमपि योगः शक्योऽवक्तुम् । कथम् उपाध्यायादन्तर्धत्त इति । पश्यत्ययं यदि मामुपाध्यायः पश्यति ध्रुवं प्रेषणमुपालम्भो वेति । स बुद्ध्या संप्राप्य निवर्तते । तत्र ध्रुवमपायेऽपादानम् [१.४.२४] इत्येव सिद्धम् ॥

---

बाध करील. तेव्हां वारणार्थक धातूंचा प्रयोग असतां तेथें कर्माला जें ईप्सित किंवा ईप्सिताला जें ईप्सित त्याला अपादानसंज्ञा होते असें येथें म्हटलें पाहिजे.

(वा.१) 'वारणार्थानाम्' या सूत्रामध्यें कर्मशब्द घालणें निरर्थक आहे.

काय कारण ?

'कर्तुरीप्सितमं कर्म' यानेंच माणवकाला अपादानसंज्ञेचा बाध करून कर्मसंज्ञा सिद्ध होते आहे.

आतां 'वारणार्थानाम्' हेंही सूत्र न केलें तरी चालेल.

पण 'माषेभ्यो गा वारयति' येथें माषांना अपादानसंज्ञा कशी बरें होईल ?

हा मनुष्य असा विचार करतो की जर गायी उडदाच्या पिकांत जातील तर खरोखर त्यांचा नाश करतील, आणि तसा पिकाचा नाश झाला असतां त्यापासून पातक लागेल व राजदंडही होईल. अर्थात् तो मनुष्य मनानें त्या गायींना पिकाशीं संबद्ध करून त्यापासून निवृत्त करतो. तेव्हां 'ध्रुवमपाये' यानेंच अपादानसंज्ञा साधत आहे.

(सू.२८) हेंही सूत्र करावयास नको.

तर मग उपाध्यायादन्तर्धत्ते येथें उपाध्यायाला अपादानसंज्ञा कशी बरें होईल ?

हा मनुष्य असा विचार करतो की जर उपाध्यायांची दृष्टि मजवर जाईल तर खरोखर मला तें काम सांगतील किंवा अभ्यास करीत नाहींस म्हणून रागें भरतील. अशा रीतीनें तो मनुष्य मनानें उपाध्यायाशीं संबद्ध होऊन त्यापासून निवृत्त होतो. तेव्हां येथें 'ध्रुवमपाये' यानेंच अपादानसंज्ञा साधत आहे.

---

२. वारणार्थानामीप्सितः या प्रकृत सूत्रामध्यें ईप्सितः असा साधा शब्द उच्चारला आहे त्यामुळें साध्या ईप्सिताला म्हणजे अग्नीला आणि अत्यन्त ईप्सिताला म्हणजे माणवकाला अपादानसंज्ञा प्राप्त होते. 'कर्तुरीप्सिततमं कर्म' येथें ईप्सिततमशब्द उच्चारला असल्यामुळें फक्त माणवकालाच कर्मसंज्ञा प्राप्त होते; तेथें अपादानसंज्ञेचा ती बाध करते. तेव्हां माणवकाला अपादानसंज्ञा न होण्यासाठीं 'कर्माला जें ईप्सित' किंवा 'ईप्सिताला जें ईप्सित' असें जें म्हटलें आहे तें म्हणावयास नको.

१. व्यवधानामुळें दडून बसला असतां आपल्याला ज्यानें पाहूं नये असें तो मानीत असेल त्याला अपादानसंज्ञा होते; उदा०— मातुर्निलीयते कृष्णः.

**आख्यातोपयोगे ॥ १ । ४ । २९ ॥**

उपयोग इति किमर्थम् । नटस्य शृणोति । ग्रन्थिकस्य शृणोति॥ उपयोग इत्युच्यमानेऽप्यत्र प्राप्नोति । एषोऽपि ह्युपयोगः । आतश्चोपयोगो यदारम्भका रङ्गं गच्छन्ति नटस्य श्रोष्यामो ग्रन्थिकस्य श्रोष्याम इति ॥ एवं तर्ह्युपयोग इत्युच्यते सर्वश्चोपयोगस्तत्र प्रकर्षगतिर्विज्ञास्यते । साधीयो य उपयोग इति । कश्च साधीयः । यो ग्रन्थार्थयोः ॥ अथवोपयोगः को भवितुमर्हति । यो नियमपूर्वकः । तद्यथा । उपयुक्ता माणवका इत्युच्यन्ते य एते नियमपूर्वकमधीतवन्तो भवन्ति ॥

किं पुनराख्यातानुपयोगे कारकमाहोस्विदकारकम् । कश्चात्र विशेषः ।

**आख्यातानुपयोगे कारकमिति चेदकथितत्वात्कर्मसंज्ञाप्रसङ्गः ॥ १ ॥**

आख्यातानुपयोगे कारकमिति चेदकथितत्वात्कर्मसंज्ञा प्राप्नोति ॥ अस्तु तर्ह्यकारकम् ।

**अकारकमिति चेदुपयोगवचनानर्थक्यम् ॥ २ ॥**

यद्यकारकमुपयोगवचनमनर्थकम् ॥ अस्तु तर्हि कारकम् । ननु चोक्तमाख्या-

---

(सू. २९) येथें उपयोगे हा शब्द घातला तो कशासाठीं ?

नटस्य शृणोति, ग्रन्थिकस्य शृणोति, येथें नट किंवा ग्रन्थिक याला अपादानसंज्ञा न व्हावी म्हणून.

उपयोगे हा शब्द घातला तरी देखील वरील उदाहरणांमध्यें अपादानसंज्ञा प्राप्त होते. कारण श्रवण करणें हाही एक प्रकारचा उपयोग म्हणजे व्यापारच आहे. शिवाय नटाचें गाणें किंवा ग्रन्थिकाचें प्रवचन ऐकावयाला सांपडेल असें मनांत धरून मोठ्या उत्सुकतेनें लोक रंगभूमीकडे जातात. तेव्हां हा उपयोग नव्हे असें कसें होईल ?

आतां 'उपयोगे' असें तर येथें म्हटलें आहे, आणि व्यापार तर सर्वत्र कांहीं तरी असणारच. असें असतां येथें ज्यापेक्षां उपयोगशब्द घातला त्यापेक्षां तो व्यापार कांहीं विशेष प्रकारचा म्हणजे चांगला व्यापार असला पाहिजे असें आम्ही समजतों.

चांगला व्यापार म्हणजे कोणता ?

ग्रंथ पाठ करणें आणि त्याचा अर्थ समजून घेणें हा चांगला व्यापार होय. अथवा नियमपूर्वक शिकणें हा चांगला व्यापार होय. कारण जीं मुलें नियमपूर्वक शिकतात तेथें त्यांच्या संबंधानें 'उपयुक्ता माणवकाः' असें लोक म्हणतात.

पण काय ज्या ठिकाणीं चांगला व्यापार नसेल त्या ठिकाणीं त्या नट वगैरेंना कारक म्हणावें किंवा नाहीं ?

यांत काय बरें फरक होणार आहे ?

(वा. १) चांगला व्यापार नसेल त्या ठिकाणीं त्या वक्त्याला कारक म्हटलें तर तो अकथित असल्यामुळें त्याला 'अकथितं च' (१।४।५१) यानें कर्मसंज्ञा होऊं लागेल,

तर मग तशा ठिकाणीं त्या वक्त्याला कारक म्हणू नये.

(वा. २) कारक म्हटलें नाहीं तर कारक नसल्यामुळेंच त्या नट वगैरेंना अपादानसंज्ञा होणार नाहीं. तेव्हां त्याकरितां जो उपयोगशब्द घातला तो व्यर्थ होईल.

तर मग तशा ठिकाणीं त्या नट वगैरेंची कारकरूपानें विवक्षा आहे असेंच असूं दे.

पण नियमरहित असें विद्येचें श्रवण असतां तेथें त्या विद्येचा वक्ता कारकसंज्ञक आहे

---

१. नियमानें विद्या शिकतो हें दाखवावयाचें असेल तर तेथें वक्त्याला अपादानसंज्ञा होते; उदा०—उपाध्यायादधीते.

तानुपयोगे कारकमिति चेदकथितत्वात्कर्मसंज्ञाप्रसङ्ग इति । नैष दोषः । परिगणनं तत्र क्रियते । दुहियाचिरुधिप्रच्छिभिक्षिचिञामिति ॥

अयमपि योगः शक्योऽवक्तुम् । कथम् उपाध्यायादधीत इति । अपक्रामति तस्मात्तदध्ययनम् । यद्यपक्रामति किं नात्यन्तायापक्रामति । संततत्वात् ॥ अथवा ज्योतिर्वज्ज्ञानानि भवन्ति ॥

**जनिकर्तुः प्रकृतिः ॥ १ । ४ । ३० ॥**

अयमपि योगः शक्योऽवक्तुम् । कथं गोमयाद्वृश्चिको जायते । गोलोमाविलोमभ्यो दूर्वा जायन्त इति । अपक्रामन्ति तास्तेभ्यः । यद्यपक्रामन्ति किं नात्यन्तायापक्रामन्ति । संततत्वात् ॥ अथवान्याश्चान्याश्च प्रादुर्भवन्ति ॥

**भुवः प्रभवः ॥ १ । ४ । ३१ ॥**

अयमपि योगः शक्यो ऽवक्तुम् । कथं

---

असें गृहीत धरलें तर त्या नटाला अपादानादि विशेषांची सर्वथा अप्रसक्ति ह्या रूपाचें अकथितत्व असल्यामुळें (कारक म्हटलें तर) त्याला 'अकथितं च' यानें कर्मसंज्ञा होऊं लागेल असा दोष दाखविला आहे ना ?

हा दोष येत नाहीं. कारण तेथें दुह्, याच्, रुध्, प्रच्छ्, भिक्ष्, आणि चिञ् एवढेच धातु परिगणित आहेत.

आतां 'आख्यातोपयोगे' हेंही सूत्र करावयास नको.

तर मग उपाध्यायादधीते येथें उपाध्यायाला अपादानसंज्ञा कशी बरें होईल ?

उपाध्यायापासून तें अध्ययन त्याच्या तोंडावाटे बाहेर निघत आहे. तेव्हां 'ध्रुवमपाये' यानेंच अपादानसंज्ञा साधत आहे.

जर तें अध्ययन बाहेर पडत आहे तर तें कायमचेंच कां बाहेर पडत नाहीं ? पुनः आंत कसें असतें ?

अध्ययन हें प्रवाहरूपानें सारखें चालू आहे.[2] अथवा दिव्याचा ज्योतीप्रमाणें वक्त्याचीं ज्ञानेंही अनेक[3] आहेत.

(सू. ३०) हेंही सूत्र करावयास नको.

तर मग गोमयाद्वृश्चिको जायते, गोलोमाविलोमभ्यो दूर्वा जायते येथें गोमय, गोलोम व अविलोम यांना अपादानसंज्ञा कशी बरें होईल ?

ते पदार्थ तेथून बाहेर पडतात म्हणून 'ध्रुवमपाये' यानेंच तेथें अपादानसंज्ञा होईल.

जर ते पदार्थ तेथून बाहेर पडतात तर कायमचेच कां बाहेर पडत नाहींत ? पुनः तेथें कसे दिसतात ?

बाहेर पडणें ही क्रिया एकसारखी चालूच असते. एखादे वेळीं त्यांतील स्थूल भाग बाहेर पडला म्हणजे त्या वेळीं अमुक पदार्थ उत्पन्न झाला असें आपण म्हणतों किंवा निरनिराळ्याच दूर्वा वगैरे वस्तु उत्पन्न होतात.

(सू. ३१) हेंही सूत्र करावयास नको.

तर मग हिमवतो गङ्गा प्रभवति येथें हिमा-

---

२. जें अध्ययन ध्वनीच्या रूपानें बाहेर पडलें तें पडलेंच; तें पुनः आंत शिरत नाहींच. वक्त्याला जें विषयाचें ज्ञान असतें त्याला अनुसरून त्याच्या तोंडांतून अनेक वेळां निघणारे शब्द एकसारखे असले तरी भिन्नभिन्नच असतात.

३. तेव्हां केवळ शब्दच अनेक आहेत असें नव्हे, तर त्या शब्दप्रयोगांचीं कारणीभूत झालेलीं जीं ज्ञानें तींही अनेक आहेत.

१. उत्पन्न होणाऱ्या वस्तूचें जें मूल कारण त्याला अपादानसंज्ञा होते; उदा० — ब्रह्मणः प्रजाः प्रजायन्ते.

२. शेणांतून विंचू उत्पन्न होतात. गोलोम आणि अविलोम यांपासून दूर्वा उत्पन्न होतात. गोलोम म्ह. गाय, बैल यांचे अंगावरील लव, आणि अविलोम म्हणजे शेळया, मेंढ्या यांचे अंगावरील लव.

१. भूधातूच्या कर्त्याचें प्रथम प्रकट होण्याच ज ठिकाण त्याला अपादानसंज्ञा होते; उदा० — हिमवतो गङ्गा प्रभवति. हिमालयाचे ठिकाणीं गंगा प्रथमतः प्रकट होते.

हिमवतो गङ्गा प्रभवतीति । अपक्रामन्ति तास्तस्मादापः । यद्यपक्रामन्ति किं नात्यन्तायापक्रामन्ति । संततत्वात् ॥ अथवान्याश्चान्याश्च प्रादुर्भवन्ति ॥

## कर्मणा यमभिप्रैति स संप्रदानम् ॥ १ । ४ । ३२ ॥

कर्मग्रहणं किमर्थम् । यमभिप्रैति स संप्रदानमितीयत्युच्यमाने कर्मण एव संप्रदानसंज्ञा प्रसज्येत । कर्मग्रहणे पुनः क्रियमाणे न दोषो भवति । कर्म निमित्तत्वेनाश्रीयते ॥ अथ यंसग्रहणं किमर्थम् । कर्मणाभिप्रैति संप्रदानमितीयत्युच्यमानेऽभिप्रयत एव संप्रदानसंज्ञा प्रसज्येत । यंसग्रहणे पुनः क्रियमाणे न दोषो भवति । यंसग्रहणादभिप्रयतः संप्रदानसंज्ञा निर्भज्यते ॥ अथाभिप्रग्रहणं किमर्थम् । कर्मणा यमेति स संप्रदानमितीयत्युच्यमाने यमेव संप्रत्येति तत्रैव स्यात् । उपाध्यायाय गां ददातीति । इह न स्यात् । उपाध्यायाय गामदात् । उपाध्यायाय गां दास्यतीति । अभिप्रग्रहणे पुनः क्रियमाणे न दोषो भवति । अभिराभिमुख्ये वर्तते प्रशब्द आदिकर्मणि । तेन यं चाभिप्रैति यं चाभिप्रैष्यति यं चाभिप्रागादाभिमुख्यमात्रे सर्वत्र

---

लयाला अपादानसंज्ञा कशी बरें होईल ?

गङ्गेचें जल त्या हिमालयापासून बाहेर पडतें. तेव्हां 'ध्रुवमपाये' यानेंच अपादानसंज्ञा होईल.

जर तें गंगेचें जल हिमालयापासून बाहेर पडत आहे तर तें कायमचेंच कां बाहेर निघत नाहीं ? पुनः तेथें कसें दिसतें ?

तें जल एकसारखें बाहेर निघत आहे. किंवा प्रथमतः बाहेर निघालेल्या जलापेक्षां दुसरें निराळेंच जल उत्पन्न होऊन बाहेर येतें.

(सू.३२) येथें 'कर्मणा' हा शब्द घातला आहे तो कशासाठीं ?

'यमभिप्रैति स संप्रदानम्' एवढेंच म्हटलें तर तर कर्मालाच संप्रदानसंज्ञा प्रसक्त होईल. आणि 'कर्मणा' हा शब्द घातला असतां पूर्वोक्त दोष येत नाहीं, कारण कर्म हें संज्ञेला निमित्त म्हणून गृहीत धरलें आहे.

आतां 'यं' आणि 'सः' हे शब्द घातले ते कशासाठीं ?

'कर्मणाऽभिप्रैति संप्रदानम्' एवढेंच म्हटलें तर संबंध करणाऱ्यालाच संप्रदानसंज्ञा होऊं लागेल. आणि यं, सः, हे शब्द घातले म्हणजे मात्र हा दोष येत नाहीं. कारण 'ज्याच्याशीं संबंध दाखवावयाचा तो' असें म्हटलें असतां संबंध करणारा आपोआपच सुटतो.

आतां अभिप्रैति येथें अभि, प्र हे शब्द घातले ते कशासाठीं ?

'कर्मणा यमेति स संप्रदानम्' एवढेंच म्हटलें तर दानक्रियेच्या कर्माशीं ज्याचा हल्लीं संबंध घडत आहे त्यालाच संप्रदानसंज्ञा होईल; जसें– उपाध्यायाय गां ददाति; आणि उपाध्यायाय गामदात्, उपाध्यायाय गां दास्यति, येथें संप्रदानसंज्ञा होणार नाहीं. अभि, प्र, हे शब्द घातले असतां हा वरील दोष येत नाहीं, कारण अभि हा शब्द आभिमुख्य या अर्थाचा दर्शक आहे व प्रशब्द क्रियेचा प्रारंभ या अर्थाला दाखवितो. तेव्हां दानक्रियेच्या प्रारंभीं कर्माशीं संबंध करण्याविषयीं जो अभिमुख म्हणजे मनानें उद्दिष्ट असतो त्याला संप्रदानसंज्ञा होते असा अर्थ होतो. तो उद्देश भूत, भविष्य व वर्तमान या तिन्ही काळांच्या दानक्रियेमध्यें कायम आहेच.

---

१. दानक्रियेच्या कर्माशीं ज्याचा संबंध दाखवावयाचा असेल अशा क्रियासाधक पदार्थाला कारकसंज्ञा होते आणि संप्रदानसंज्ञा होते; उदा०– विप्राय गां ददाति.

सिद्धं भवति॥

क्रियाग्रहणमपि कर्तव्यम्। इहापि यथा स्यात्। श्राद्धाय निगर्हते। युद्धाय संनह्यते। पत्ये शेत इति॥ तर्त्तर्हि वक्तव्यम्। न वक्तव्यम्। कथम्। क्रियां हि लोके कर्मेत्युपचरन्ति। कां क्रियां करिष्यसि। किं कर्म करिष्यसीति। एवमपि कर्तव्यम्। कृत्रिमाकृत्रिमयोः कृत्रिमे संप्रत्ययो भवति॥ क्रियापि कृत्रिमं कर्म। न सिध्यति। कर्तुरीप्सिततमं कर्म [१.४.४९] इत्युच्यते कथं च नाम क्रियया क्रियेप्सिततमा स्यात्। क्रियापि क्रिययेप्सिततमा भवति। कया क्रियया। संदर्शनक्रियया वा प्रार्थयतिक्रियया वाध्यवस्यतिक्रियया वा। इह य एष मनुष्यः प्रेक्षापूर्वकारी भवति स बुद्ध्या तावत्कंचिदर्थं संपश्यति संदृष्टे प्रार्थना प्रार्थनायामध्यवसायोऽध्यवसाय आरम्भ आरम्भे निर्वृत्तिर्निर्वृत्तौ फलावाप्तिः। एवं क्रियापि कृत्रिमं कर्म॥

---

म्हणून त्या सर्व ठिकाणीं संप्रदानसंज्ञा साधते.

क्रियेच्या द्वारानें याच्याशीं संबंध व्हावा अशा रूपानें जो उद्दिष्ट असतो त्याला संप्रदानसंज्ञा होते असें वचन करावें, कारण श्राद्धाय निगर्हते, युद्धाय संनह्यते, पत्ये शेते, येथेंही संप्रदानसंज्ञा झाली पाहिजे.

तर मग तें क्रियाग्रहण केलें पाहिजे.

क्रियाग्रहण करावयास नको.

कां बरें करावयास नको ?

लोकांमध्यें क्रियेला कर्म म्हणण्याची वहिवाट आहे; जसें— कोणती क्रिया करशील असें विचारावयाचें असतां तेथें कोणतें कर्म करशील असें वाक्य योजतात.

तरी देखील सूत्रामध्यें क्रियाशब्द घातला पाहिजे, कारण कृत्रिम आणि अकृत्रिम या दोन अर्थांपैकीं कृत्रिम अर्थाचेंच ग्रहण होतें अशी परिभाषा आहे.

क्रियाही कृत्रिम कर्म आहे.

क्रियेला कृत्रिम कर्म म्हणतां येणार नाहीं. कारण कर्त्यानें क्रियेच्या द्वारानें संबद्ध होण्याविषयीं इच्छिलेली जी वस्तु तिला कर्मसंज्ञा त्या सूत्रानें सांगितली आहे, आणि क्रियाच कशी बरें क्रियेच्या द्वारानें संबद्ध होण्याविषयीं इच्छिली जाईल ?

क्रिया देखील दुसऱ्या क्रियेच्या द्वारानें संबद्ध होण्याविषयीं इच्छिली जाते.

अशी दुसरी क्रिया कोणती ?

संदर्शनक्रिया, प्रार्थनाक्रिया व अध्यवसानक्रिया, ही ती होय. जो मनुष्य विचारशील आहे तो आपल्या मनानें आरंभीं एखाद्या गोष्टीचा विचार करतो. ही संदर्शनक्रिया होय. विचार केल्यानंतर त्याविषयीं त्याला इच्छा उत्पन्न होते. इच्छा झाल्यानंतर त्या गोष्टीचा निश्चय करतो. निश्चय झाल्यानंतर तशी क्रिया करण्यास प्रारंभ करतो. प्रारंभ झाल्यानंतर ती क्रिया शेवटाला नेतो, आणि त्यानंतर फलप्राप्ति होते. अशा रीतीनें क्रियादेखील कृत्रिम कर्म होऊं शकते.

---

२. श्राद्धाला उद्देशून निन्दा करतो. युद्धाला उद्देशून तयार होतो. पतीला उद्देशून शयन करते.

३. तेव्हां सूत्रांतील कर्मणा या शब्दानेंच क्रियाही घेतां येईल.

४. तेव्हां या प्रकृत सूत्रांतील कर्मणा या शब्दानें 'कर्तुरीप्सिततमं कर्म' (१।४।४९) या सूत्रानें कर्मसंज्ञा झालेल्यांचेंच ग्रहण होईल, क्रियेचें ग्रहण होणार नाहीं.

५. श्राद्धाय निगर्हते इत्यादि ठिकाणीं निंदा करणें, तयार होणें, शयन करणें, इत्यादि क्रिया ह्या विचार करणें इत्यादि क्रियांच्या द्वारानें संबद्ध होण्याविषयीं इच्छिल्या जातात. तेव्हां त्या निंदा करणें वगैरे क्रियांना कर्मसंज्ञा होण्यास हरकत नाहीं. विचार करणें वगैरे क्रिया ह्या प्रत्यक्ष शब्दानें दाखविल्या नसल्या तरी हरकत नाहीं, त्या गम्यमान आहेत असें धरतां येतें.

एवमपि कर्मणः करणसंज्ञा वक्तव्या संप्रदानस्य च कर्मसंज्ञा । पशुना रुद्रं यजते । पशुं रुद्राय ददातीत्यर्थः । अग्नौ किल पशुः प्रक्षिप्यते तद्रुद्रायोपह्रियत इति ॥

[रुच्यर्थानां प्रीयमाणः ॥ १।४।३३ ॥

श्लाघह्नुङ्स्थाशपां ज्ञीप्स्यमानः ॥ १ । ४ । ३४ ॥

धारेरुत्तमर्णः ॥ १ । ४ । ३५ ॥

स्पृहेरीप्सितः ॥ १ । ४ । ३६ ॥]

क्रुधद्रुहेर्ष्यासूयार्थानां यं प्रति कोपः ॥ १ । ४ । ३७ ॥

किमेत एकार्था आहोस्विन्नानार्थाः । किं चातः । यद्येकार्थाः किमर्थं पृथङ्निर्दिश्यन्ते । अथ नानार्थाः कथं कुपिना शक्यन्ते विशेषयितुम् ॥ एवं तर्हि नानार्थाः कुपौ त्वेषां सामान्यमस्ति । न ह्यकुपितः क्रुध्यति न वाकुपितो द्रुह्यति न वाकुपित ईर्ष्यति न वाकुपितोऽसूयति ॥

[क्रुधद्रुहोरुपसृष्टयोः कर्म ॥ १ । ४ । ३८ ॥

राधीक्ष्योर्यस्य विप्रश्नः ॥ १।४।३९ ॥

असें आहे तरी देखील 'कर्माला करणसंज्ञा आणि संप्रदानाला कर्मसंज्ञा होते' असें वचन करावें; जसें– पशुना रुद्रं यजते– रुद्रदेवतेला पशु देतो, असा याचा अर्थ आहे. कारण रुद्रदेवतेला द्यावयाचा अशा उद्देशानें अग्नीमध्येंच पशूचा प्रक्षेप केला जातो.

(सू. ३७) काय क्रुध, द्रुह, ईर्ष्य आणि असूय एकार्थक आहेत किंवा भिन्नार्थक आहेत ?

या विचारण्यांत काय मुद्दा आहे ?

जर हे एकार्थक असतील तर त्या चौघांचा पार्थक्यानें निर्देश केला तो व्यर्थ होतो. आतां जर भिन्नार्थक असतील तर तर 'यं प्रति कोपः' हे चारी ठिकाणीं लागत नाहींत.

असें आहे तर क्रुधादिक चार हे भिन्नार्थक आहेत. पण कोप मात्र चारी ठिकाणीं साधारणच असतो. कारण ज्याला कोप नाहीं त्याला क्रोध येणारच नाहीं. तसेंच ज्याला कोप नाहीं तो द्रोह करणारच नाहीं. त्याला परोत्कर्षाचें असहन होणार नाहीं. आणि तो दुसऱ्याचे दोषही बाहेर काढणार नाहीं.

१ (३३) आवडणें या अर्थाच्या धातूचा प्रयोग असतां ज्याला आवडत असेल त्याला कारकसंज्ञा होते आणि संप्रदानसंज्ञा होते; उदा०– हरये रोचते भक्तिः.

(३४) श्लाघ्, ह्नुङ्, स्था आणि शप् या धातूंचा प्रयोग असतांना ज्याला जाणवावयाचें असेल त्याला कारकसंज्ञा होते आणि संप्रदानसंज्ञा होते; उदा०– कृष्णाय श्लाघते-ह्नुते-तिष्ठते-शपते.

(३५) धारि या णिजन्त धातूचा प्रयोग असतांना ज्याचें कर्ज देणें असतें त्याला कारकसंज्ञा होते आणि संप्रदानसंज्ञा होते; उदा०– भक्ताय धारयति मोक्षं हरिः.

(३६) स्पृहिधातूचा प्रयोग असतांना ईप्सित अशा अर्थाला कारकसंज्ञा होते आणि संप्रदानसंज्ञा होते; उदा०– पुष्पेभ्यः स्पृहयति.

(३७) क्रोध, अपकार, असहन आणि असूया या अर्थांच्या धातूंचा प्रयोग असतांना त्या क्रोध वगैरेंच्या मुळाशीं असलेला कोप ज्यावर झाला असेल त्याला कारकसंज्ञा होते आणि संप्रदानसंज्ञा होते; उदा०– हरये क्रुध्यति-द्रुह्यति-ईर्ष्यति-असूयति. एखाद्याविषयीं उत्पन्न झालेला राग जोंपर्यंत मनांतल्या मनांतच आहे तोंपर्यंत त्याला कोप म्हणतात. त्याचा परिणाम पुढें चार तऱ्हेनें होतोः डोळे लाल होणें, मारामारी, शिव्यागाळी याला क्रोध म्हणतात, २ अपकार म्हणजे दुसऱ्याची नुकसानी करणें, ३ असहन म्हणजे दुसऱ्याचा उत्कर्ष सहन न होणें, ४ असूया म्हणजे दुसऱ्याचे दोष बाहेर काढणें.

(३८) उपसर्गविशिष्ट अशा क्रोधार्थक आणि द्रोहार्थक धातूचा प्रयोग असतांना कोप ज्यावर झाला असेल त्याला कारकसंज्ञा होते आणि कर्मसंज्ञा होते; उदा०– देवदत्तमभिक्रुध्यति-क्रूरमभिद्रुह्यति.

(३९) राध् किंवा ईक्ष् या धातूंचा प्रयोग असतांना नशिबांत काय आहे तें ज्याच्या संबंधानें पाहावयाचें असेल त्याला कारकसंज्ञा होते आणि संप्रदानसंज्ञा होते; उदा०– कृष्णाय राध्यति किंवा ईक्षते.

**प्रत्याङ्भ्यां श्रुवः पूर्वस्य कर्ता ॥ १ । ४ । ४० ॥**

**अनुप्रतिगृणश्च ॥ १ । ४ । ४१ ॥]**

**साधकतमं करणम् ॥ १ । ४ । ४२ ॥**

तमग्रहणं किमर्थं न साधकं करणमित्येवोच्येत। साधकं करणमितीयत्युच्यमाने सर्वेषां कारकाणां करणसंज्ञा प्रसज्येत। सर्वाणि हि कारकाणि साधकानि। तमग्रहणे पुनः क्रियमाणे न दोषो भवति ॥ नैतदस्ति प्रयोजनम्। पूर्वास्तावत्संज्ञा अपवादत्वाद्बाधिका भविष्यन्ति पराः परत्वाच्चानवकाशत्वाच्च ॥ इह तर्हि धनुषा विध्यति अपाययुक्तत्वाच्चापादानसंज्ञा साधकत्वाच्च करणसंज्ञा प्राप्नोति। तमग्रहणे पुनः क्रियमाणे न दोषो भवति ॥ एवं तर्हि लोकत एतत्सिद्धम्। तद्यथा। लोकेऽभिरूपायोदकमानेयमभिरूपाय कन्या देयेति न चानभिरूपे प्रवृत्तिरस्ति

---

(सू.४२) साधकतमं येथें तमप्रत्यय घातला आहे तो कशासाठीं? तो घालावयास नको. 'साधकं करणम्' एवढेंच सूत्र करावें.

'साधकं करणम्' एवढेंच सूत्र केलें असतां सर्वच कारकांना करणसंज्ञा होऊं लागेल. कारण कर्ता वगैरे सहाही कारकें क्रियेची साधक असतातच. तमप्रत्यय घातला म्हणजे मात्र हा दोष येत नाहीं.[२]

तमप्रत्यय घातल्याचें हें प्रयोजन होत नाहीं, कारण 'साधकाला करणसंज्ञा होते' एवढेंच म्हटलें तरी करणसंज्ञेपेक्षां पूर्वपठित अपादान व संप्रदान या संज्ञा अनवकाशत्वास्तव करणसंज्ञेचा बाध करतील आणि परपठित अधिकरण, कर्म व कर्ता या संज्ञा परत्वास्तव आणि अनवकाशत्वास्तव बाध करतील.

तर मग 'धनुषा विध्यति' येथें शराचा धनुष्यापासून वियोग होत असल्यामुळें अपादानसंज्ञा प्राप्त होते, आणि साधक असल्यामुळें करणसंज्ञा प्राप्त होते. तेथेंही अनवकाशत्वास्तव अपादानसंज्ञा करणसंज्ञेचा बाध करील. आणि तमग्रहण केलें असतां उलट अपादानसंज्ञेचीच करणसंज्ञा परत्वास्तव बाधक होते म्हणून दोष येत नाहीं.

असें आहे तर मग लोकव्यवहारावरूनच ही गोष्ट साधत आहे. तें असें— लोकांमध्यें 'अभिरूपायोदकमानेयमभिरूपाय कन्या देया'[३] असें म्हणतात. जो अभिरूप नव्हे अशा वराविषयीं कन्यादानाची प्रवृत्ति स्वभावतःच नसते. तेव्हां 'अभिरूपाय कन्या देया' या वाक्यांतील अभिरूपाय या पदाचा 'अभि-

---

(४०) प्रति किंवा आङ् या उपसर्गापुढें श्रुधातूचा प्रयोग असतांना ज्याला कांहीं कबूल केलें असेल त्या कारकाला संप्रदानसंज्ञा होते; उदा०— विप्राय गां प्रतिशृणोति, आशृणोतिः देवदत्त हा तुला गाय देतो असें कबूल करतो.

(४१) अनु किंवा प्रति या उपसर्गापुढें गृधातूचा प्रयोग असतांना ज्याला प्रोत्साहन देत असेल अशा कारकाला संप्रदानसंज्ञा होते; उदा०— होत्रेऽनुगृणाति, होत्रे प्रतिगृणातिः शंसन करणाऱ्या होत्याची तारीफ करून उत्तरोत्तर शंसनाविषयीं त्याला प्रोत्साहन देतो.

१. क्रियेचें अत्यन्त साधक अशा रूपानें विवक्षित जें कारक त्याला करणसंज्ञा होते; उदा०— बाणेन बालिनं रामो हन्ति. सूत्रामध्यें साधक शब्दापुढें तमप्रत्यय उच्चारला आहे त्याचा अत्यंत हा अर्थ आहे.

२. क्रियेचें अत्यन्त साधक अशा रूपानें विवक्षा करणें हें प्रयोग करणाऱ्याच्या मर्जीवर आहे.

३. अभिरूप म्हणजे कुलशीलसंपन्न. येथें तसा मनुष्य पाहून कन्यादान करावयाचें आहे, त्याकरितां उदक वगैरे सामग्री जुळवून ठेवा आणि तसा चांगला मनुष्य पाहून त्याला कन्या द्या.

तत्राभिरूपतमायेति गम्यते । एवमिहापि साधकं करणमित्युच्यते सर्वाणि च कारकाणि साधकानि न चासाधके प्रवृत्तिरस्ति तत्र साधकतममिति विज्ञास्यते ॥ एवं तर्हि सिद्धे सति यत्तमग्रहणं करोति तज्ज्ञापयत्याचार्यः कारकसंज्ञायां तरतमयोगो न भवतीति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । अपादानमाचार्यः किं न्याय्यं मन्यते यत्र संप्राप्य निवृत्तिः । तेनेहैव स्यात् ग्रामादागच्छति नगरादागच्छतीति । सांकाश्यकेभ्यः पाटलिपुत्रका अभिरूपतरा इत्यत्र न स्यात् । कारकसंज्ञायां तरतमयोगो न भवतीत्यत्रापि सिद्धं भवति ॥ तथाधारमाचार्यः किं न्याय्यं मन्यते यत्र कृत्स्न आधारात्मा व्याप्तो भवति । तेनेहैव स्यात् तिलेषु तैलम् दध्नि सर्पिरिति । गङ्गायां गावः कूपे गर्गकुलमित्यत्र न स्यात् । कारकसंज्ञायां तरतमयोगो न भवतीत्यत्रापि सिद्धं भवति ॥

[दिवः कर्म च ॥ १ । ४ । ४३ ॥

परिक्रयणे संप्रदानमन्यतरस्याम् ॥ १ । ४ । ४४ ॥

आधारोऽधिकरणम् ॥ १।४।४५ ॥

अधिशीङ्स्थासां कर्म ॥१।४।४६॥

रूपतमाय' असा अर्थ समजला जातो. त्याप्रमाणें येथेंही 'साधकं करणम्' असें म्हटलें जात आहे. आणि सर्वच कारकें क्रियासाधक आहेत. तेव्हां अर्थातच जें साधक असें विवक्षित नसेल तेथें करणसंज्ञेची प्रवृत्ति होणारच नाहीं. म्हणून सूत्रांतील साधक हा शब्द साधकतम या अर्थाचा समजण्यांत येईल.

अशा रीतीनें सहज सिद्ध होत असतांही जो येथें सूत्रकारांनीं मुद्दाम तमप्रत्यय घालण्याचा प्रयत्न केला आहे त्यावरून असें सूचित होत आहे की या कारकप्रकरणामध्यें विशेष प्रयत्न केल्यावांचून तरतमभाव गृहीत धरावयाचा नाहीं.

असें सुचविण्याचें काय प्रयोजन ?

'ध्रुवमपायेऽपादानम्' असें सूत्र करणारा आचार्य ज्या वस्तूशीं एखाद्या पदार्थाचा पूर्वी संयोग असून नंतर वियोग होतो त्या वस्तूला मुख्य अपादान असें समजतो. त्यामुळें ग्रामादागच्छति येथेंच ग्रामाला अपादानसंज्ञा होईल, आणि 'सांकाश्यकेभ्यः पाटलिपुत्रका अभिरूपतराः' या वाक्यामध्यें सांकाश्यकांना अपादानसंज्ञा होणार नाहीं. आणि या कारकप्रकरणामध्यें तरतमभाव विचारांत घ्यावयाचा नाहीं असें गृहीत धरलें असतां सांकाश्यकांना बौद्धसंयोगवियोग धरूनही अपादानसंज्ञा सिद्ध होते.

तसेंच 'आधारोऽधिकरणम्' असें सूत्र करणारा आचार्य जी वस्तु त्यांत असलेल्या पदार्थानें सगळी व्यापली जाते त्या वस्तूला मुख्य आधार असें समजतो. त्यामुळें 'तिलेषु तैलम्', 'दधनि सर्पिः' येथेंच अधिकरणसंज्ञा होईल. आणि 'गङ्गायां गावः', 'कूपे गर्गकुलम्' येथें अधिकरणसंज्ञा होणार नाहीं. कारकप्रकरणामध्यें तरतमभाव विचारांत घ्यावयाचा नाहीं

१ (४३) दिव्धातूचा प्रयोग असतांना क्रियेचें अत्यन्त साधक अशा रूपानें विवक्षित जें कारक त्याला कर्म आणि करण अशा दोन्ही संज्ञा होतात; उदा०— अक्षान् दीव्यति, अक्षैर्दीव्यति.

(४४) परिक्रयण म्हणजे वेतन देऊन ठराविक कालापर्यंत आपला नोकर करून घेणें. त्या क्रियेचें अत्यंत साधक अशा रूपानें विवक्षित जें कारक त्याला संप्रदानसंज्ञा विकल्पानें होते; उदा०— शतेन शताय वा परिक्रीतः.

(४५) क्रियेच्या कर्त्याचा किंवा कर्माचा जो आधार त्या कारकाला अधिकरणसंज्ञा होते; उदा०— कटे आस्ते, स्थाल्यां पचति, मोक्षे इच्छाऽस्ति.

(४६) अधि या उपसर्गापुढें शीङ्, स्था किंवा आस् या धातूंचा प्रयोग असतांना क्रियेच्या कर्त्याचा जो

**अभिनिविशश्च ॥ १ । ४ । ४७॥]**

**उपान्वध्याङ्वसः ॥१ । ४ । ४८॥**

**वसेरश्यर्थस्य प्रतिषेधः ॥ १ ॥**

वसेरश्यर्थस्य प्रतिषेधो वक्तव्यः । ग्राम उपवसतीति ॥ स तर्हि वक्तव्यः । न वक्तव्यः । नात्रोपपूर्वस्य वसेर्ग्रामोऽधिकरणम् । कस्य तर्हि । अनुपसर्गस्य । ग्रामेऽसौ वसंस्त्रिरात्रमुपवसतीति ॥

**कर्तुरीप्सिततमं कर्म ॥१।४।४९॥**

तमग्रहणं किमर्थम् । कर्तुरीप्सितं कर्मेतीयत्युच्यमान इह अग्नेर्माणवकं वारयतीति माणवकेऽपादानसंज्ञा प्रसज्येत ।

---

असें मानलें म्हणजे गंगा ही वस्तु गाईंनीं सर्व व्यापिली नसली तरी तिला अधिकरणसंज्ञा सिद्ध होते.

(सू.४८, वा.१) भोजननिवृत्ति हा अर्थ गम्यमान असेल तर तेथें प्रकृत सूत्रानें कर्मसंज्ञा होत नाहीं असें वचन करावें; जसें— ग्रामे उपवसति.

तर मग तसा निषेध सांगितला पाहिजे.

निषेध सांगावयास नको. कारण वरील उदाहरणामध्यें उपपूर्वक वस्धातूपासून मनांत येणाऱ्या अशा भोजननिवृत्ति या अर्थाचें अधिकरण ग्राम हा पदार्थ नव्हे.

तर कशाचें अधिकरण ग्राम आहे ?

उपसर्गरहित अशा वस्धातूपासून मनांत येणाऱ्या वसतिक्रियेचें अधिकरण ग्राम आहे. तेव्हां ग्रामामध्यें वास करणारा असा होत्साता त्रिरात्र उपवास करतो असा उदाहरणवाक्याचा अर्थ होतो.[२]

(सू.४९) ईप्सिततमं येथें तमप्प्रत्यय उच्चारला आहे तो कशासाठीं ?

'कर्तुरीप्सितं कर्म' एवढेंच म्हटलें तर 'अग्नेर्माणवकं वारयति' येथें माणवकाला अपादानसंज्ञा होऊं लागेल.[२]

हा दोष येत नाहीं. कारण माणवकाला

---

आधार त्या कारकाला कर्मसंज्ञा होते; उदा०— अधिशेते, अधितिष्ठति, अध्यास्ते वा वैकुण्ठं हरिः.

(४७) अभिनि या उपसर्गसंघातापुढें विश्धातूचा प्रयोग असतांना क्रियेच्या कर्त्याचा जो आधार त्या कारकाला कर्मसंज्ञा होते; उदा०— अभिनिविशते सन्मार्गम्.

१. उप, अनु, अधि किंवा आङ् या उपसर्गांपुढें वस्धातूचा प्रयोग असतांना क्रियेच्या कर्त्याचा जो आधार त्या कारकाला कर्मसंज्ञा होते; उदा०— उपवसति, अनुवसति, अधिवसति, आवसति वा वैकुण्ठं हरिः.

२. देवदत्ताच्या राहण्याचें ठिकाण निश्चित कळल्यानंतर अमुक कालापर्यंत त्यानें भोजननिवृत्ति स्वीकारली आहे असें कळविण्यासाठीं हें वाक्य योजलें आहे. तेव्हां प्रथमतः मनांत येणाऱ्या वासक्रियेमुळें ग्रामाला अधिकरणसंज्ञा झाली आहे व मागून मनांत येणाऱ्या उपवासक्रियेला अधिकरण म्हणून कालाचीच अपेक्षा आहे. अर्थात् भोजननिवृत्ति या अर्थाच्या उपपूर्वक वस्धातूचें अधिकरण ग्राम हा होऊं शकत नाहीं. म्हणून त्याला 'उपान्वध्याङ्' यानें कर्मसंज्ञा प्राप्तच होत नसल्यामुळें कर्मसंज्ञा निषेध करण्याची आवश्यकता नाहीं.

१. कर्त्यानें आपण केलेल्या क्रियेच्या फलाचा संबंध अमक्याशीं व्हावा असा मनांत धरलेला आणि क्रियेचा साधक असा जो पदार्थ त्याला कर्मसंज्ञा होते; उदा०— ग्रामं गच्छति, तण्डुलं पचति.

२. क्रियेचें फल ज्या वस्तूवर घडतें त्या वस्तूला ईप्सित म्हणतात. वारणक्रियेचा वियोग हें फल अग्नि आणि माणवक ह्या दोहोंमध्यें आहे म्हणून त्या दोघांनाही ईप्सित म्हणतां येत असल्यामुळें अपादानसंज्ञा प्राप्त होते. त्यांत माणवक हा अत्यंत ईप्सित आहे, अग्नि हा तसा नाहीं, म्हणून त्याला कर्मसंज्ञा प्राप्त होत नाहीं. फक्त माणवकालाच कर्मसंज्ञा प्राप्त होते व ती तेथें अपादानसंज्ञेचा परत्वास्तव बाध करते, अशी वस्तुस्थिति आहे. आतां जर येथें तमप्प्रत्यय उच्चारला नाहीं तर दोघांनाही कर्मसंज्ञा प्राप्त होत असल्यामुळें त्या कर्मसंज्ञेचा निरवकाशत्वास्तव अपादानसंज्ञा ही दोन्ही ठिकाणीं बाध करील.

नैष दोषः । कर्मसंज्ञा तत्र बाधिका भविष्यति । अग्नावपि तर्हि बाधिका स्यात् । इह पुनस्तमग्रहणे क्रियमाणे तदुपपन्नं भवति यदुक्तं वारणार्थेषु कर्मग्रहणानर्थक्यं कर्तुरीप्सिततमं कर्मेति वचनादिति ॥

इहोच्यत ओदनं पचतीति । यद्योदनः पच्येत द्रव्यान्तरमभिनिर्वर्तेत । नैष दोषः । तादर्थ्यात्ताच्छब्द्यं भविष्यति । ओदनार्थास्तण्डुला ओदन इति ॥ अथेह कथं भवितव्यम् । तण्डुलानोदनं पचतीति । आहोस्वित्तण्डुलानामोदनं पचतीति । उभयथापि भवितव्यम् । कथम् । इह हि तण्डुलानोदनं पचतीति द्व्यर्थः पचिः । तण्डुलान्पचन्नोदनं निर्वर्तयतीति ॥ इहेदानीं तण्डुलानामोदनं पचतीति द्व्यर्थश्चैव पचिर्विकारयोगे च षष्ठी । तण्डुलविकारमोदनं निर्वर्तयतीति ॥

इह कश्चित्कंचिदामन्त्रयते सिद्धं भुज्यतामिति । स आमन्त्र्यमाण आह । प्रभूतं भुक्तमस्माभिरिति । आमन्त्रयमाण आह । दधि खलु भविष्यति पयः खलु भविष्यति । आमन्त्र्यमाण आह । दध्ना खलु भुञ्जीय पयसा खलु भुञ्जीयेति । अत्र कर्मसंज्ञा प्राप्नोति । तद्धि तस्येप्सिततमं

---

प्राप्त झालेली कर्मसंज्ञा अपादानसंज्ञेचा बाध करील.

तर मग अग्नीलाही प्राप्त झालेली कर्मसंज्ञा अपादानसंज्ञेचा बाध करील, आणि प्रकृत सूत्रामध्यें तमप्प्रत्यय घातला म्हणजे मात्र सर्व हें 'वारणार्थेषु कर्मग्रहणानर्थक्यं कर्तुरीप्सिततमं कर्मेति वचनात्' (१।४।२७, वा. १) असें पूर्वी सांगितल्याप्रमाणें बरोबर जुळून येतें.

आतां येथें आम्ही असें विचारतों की ओदनं पचति हा प्रयोग कसा करतां येतो ? कारण ओदन म्हणजे शिजून तयार झालेला भात. तो जर शिजविला तर निराळाच कांहीं तरी पदार्थ उत्पन्न होईल.

हा दोष येत नाहीं. कारण ज्या वस्तूकरितां जो पदार्थ उपयोगीं पडतो त्या पदार्थाला त्या वस्तूचा शब्द लावितां येतो. तेव्हां भाताकरतां उपयोगीं पडणाऱ्या तांदुळांनाच येथें भात हा शब्द लावला आहे.

आतां जेव्हां तंडुल आणि ओदन या दोन्ही शब्दांचा प्रयोग असतो तेथें 'तण्डुलान् ओदनं पचति' असा प्रयोग करावा किंवा 'तण्डुलानामोदनं पचति' असा प्रयोग करावा ?

दोन्ही तऱ्हेचा प्रयोग करावा.

तो कसा ?

जेव्हां तण्डुलान् ओदनं पचति असा प्रयोग करावयाचा तेव्हां शिजविणें आणि उत्पन्न करणें असे पच्धातूचे दोन अर्थ गृहीत धरावयाचे. तेव्हां तंडुलांना शिजवीत भात उत्पन्न करतो असा त्या वाक्यापासून अर्थ मनांत येतो. आतां जेव्हां 'तण्डुलानामोदनं पचति' असा प्रयोग करावयाचा तेव्हां वरीलप्रमाणेंच पच्धातूचे दोन अर्थ आहेत. तण्डुलपदापुढील षष्ठी प्रकृतिविकारभाव या अर्थाची आहे. तेव्हां तांदुळाचा विकार असा भात शिजवून तयार करतो असा त्या वाक्यापासून अर्थ मनांत येतो.

कोणी एक म्हणजे देवदत्त कोणा एकाला म्ह. यज्ञदत्ताला उद्देशून म्हणतो की अन्न तयार आहे, भोजन करावें. त्यावर यज्ञदत्त म्हणतो की आम्हीं आकण्ठ भोजन केलें आहे. त्यावर पुनः देवदत्त म्हणतो की या भोजनामध्यें दहिदूध मिळेल. त्यावर पुनः यज्ञदत्त म्हणतो की दध्ना भुञ्जीय, पयसा भुञ्जीय, म्हणजे दहि, दूध, आहेत तर त्यांच्याशीं मी भोजन करीन. या संवादावरून असें ठरतें की त्या यज्ञदत्ताला दूध, दहि, हें ईप्सिततम आहे. तेव्हां दध्ना भुञ्जीय, पयसा भुञ्जीय, या वाक्यांमध्यें दधि, पय, यांना प्रकृत सूत्रानें

भवति ॥ तस्याप्योदन एवेप्सिततमो न तु गुणेष्वस्यानुरोधः । तद्यथा । भुञ्जीयाहमोदनं यदि मृदूविशदः स्यादिति । एवमिहापि दधिगुणमोदनं भुञ्जीय पयोगुणमोदनं भुञ्जीयेति ॥

**ईप्सितस्य कर्मसंज्ञायां निर्वृत्तस्य कारकत्वे कर्मसंज्ञाप्रसङ्गः क्रियेप्सितत्वात् ॥ १ ॥**

ईप्सितस्य कर्मसंज्ञायां निर्वृत्तस्य कारकत्वे कर्मसंज्ञा न प्राप्नोति । गुडं भक्षयतीति । किं कारणम् । क्रियेप्सितत्वात् । क्रिया तस्येप्सिता ॥

**न वोभयेप्सितत्वात् ॥ २ ॥**

न वैष दोषः । किं कारणम् । उभयेप्सितत्वात् । उभयं हि तस्येप्सितम् । आतश्चोभयं यस्य हि गुडभक्षणे बुद्धिः प्रसक्ता भवति नासौ लोष्टं भक्षयित्वा कृती भवति ॥ यद्यपि तावदत्रैतच्छक्यते वक्तुं ये त्वेते राजकर्मिणो मनुष्यास्तेषां कश्चित्कंचिदाह । कटं कुर्विति । स आह । नाहं कटं करिष्यामि घटो मयाहृत इति । तस्य क्रियामात्रमीप्सितम् ॥ यद्यपि तस्य क्रियामात्रमीप्सितं यस्त्वसौ प्रेषयति तस्योभयमीप्सितमिति ॥

---

कर्मसंज्ञा प्राप्त होत आहे.[3]

त्यालाही दूधभात व दहिभात हाच ईप्सिततम आहे; त्याला केवळ उपकारक असें जें दूध किंवा दहि त्याविषयीं त्याचा मुख्य अभिलाष नाहीं; जसें– मोकळा आणि मऊ असा भात असल्यास मी जेवीन, येथें केवळ मोकळेपणावर किंवा केवळ मऊपणावर त्याची भिस्त नाहीं. त्याप्रमाणें प्रकृत स्थलींही दूधभात व दहिभात मी खाईन असें म्हणतो, तेव्हां त्याला मुख्यत्वानें भातच ईप्सिततम आहे असें दिसतें.

(वा.१) ईप्सित अशा पदार्थाला कर्मसंज्ञा सांगितली असल्यामुळें पूर्वसिद्ध असलेला पदार्थ दुसऱ्या क्रियेचें साधन असूनही त्याला कर्मसंज्ञा होणार नाहीं; जसें– गुडं भक्षयति.

काय कारण ?

भक्षणक्रिया ही कर्त्याला ईप्सित आहे, गुडपदार्थ तर पूर्वसिद्धच आहे.

(वा.२) हा दोष येत नाहीं.

काय कारण ?

कर्त्याला गुड आणि भक्षणक्रिया हीं दोन्ही ईप्सित आहेत. शिवाय दोन्ही ईप्सित आहेत असें म्हणण्याचें विशेष कारण हें की ज्याला गुडभक्षणाविषयीं इच्छा उत्पन्न झाली त्याचें तें काम मातीचें डिखूळ खाऊन कांहीं भागणार नाहीं.

जरी 'गुडं भक्षयति' इत्यादि ठिकाणीं दोन्ही ईप्सित आहेत असें म्हणतां आलें तरी जे हे राजाचे नोकर आहेत त्यांपैकीं एक एखाद्या गड्याला म्हणतो की चटई तयार कर, त्यावर तो गडी म्हणतो की मला आतांच चटई करतां येणार नाहीं, कारण घट करण्याचें काम मीं हातात घेतलें आहे. यावरून कांहीं तरी क्रिया करणें हेंच त्या गड्याला ईप्सित आहे.

आतां जरी त्या गड्याला केवळ क्रियाच ईप्सित आहे तरी जो कोणी मालक त्या नोकराला गड्याकडे पाठवितो त्याला ती क्रिया आणि पदार्थ हीं दोन्ही ईप्सित आहेत.

---

३. ईप्सित हा शब्द अभिप्रेत (इष्ट) या अर्थी रूढ असलेला तो 'कर्तुरीप्सिततमम्' या सूत्रामध्यें घेतला आहे असा शंकाकाराचा आशय आहे.

४. भक्षणक्रिया घडण्याला भक्ष्याची जरूर असल्यामुळें गुडपदार्थाचें उपादान केलें आहे. गुडपदार्थ सिद्ध होण्यासाठीं भक्षणक्रियेचा स्वीकार केलेला नाहीं; म्हणून भक्षणक्रिया ईप्सित आहे; गुड ईप्सित नाहीं.

५. तेव्हां घट वगैरे पदार्थ ईप्सित आहेत असें म्हणतां येत नसल्यामुळें त्यांना कर्मसंज्ञा होणार नाहीं.

**तथायुक्तं चानीप्सितम् ॥१।४।५०**

किमुदाहरणम् । विषं भक्षयतीति । नैतदस्ति । पूर्वेणाप्येतत्सिध्यति । न सिध्यति । कर्तुरीप्सिततमं कर्म [१.४.४९] इत्युच्यते कस्य च नाम विषभक्षणमीप्सितं स्यात् । विषभक्षणमपि कस्यचिदीप्सितं भवति । कथम् । इह य एष मनुष्यो दुःखार्तो भवति सोऽन्यानि दुःखान्यनुनिशम्य विषभक्षणमेव ज्यायो मन्यते । आतश्चेप्सितं यत्तद्भक्षयति ॥ यत्तर्ह्यन्यत्करिष्यामीत्यन्यत्करोति तदुदाहरणम् । किं पुनस्तत् । ग्रामान्तरमयं गच्छंश्चौरान्पश्यत्यहिं लङ्घयति कण्टकान्मृद्नाति ॥

इहेप्सितस्यापि कर्मसंज्ञारभ्यतेऽनीप्सितस्यापि । यदिदानीं नैवेप्सितं नाप्यनीप्सितं तत्र कथं भवितव्यम् । ग्रामान्तरमयं गच्छन्वृक्षमूलान्युपसर्पति कुड्यमूलान्युपसर्पतीति । अत्रापि सिद्धम् । कथम् । अनीप्सितमिति नायं प्रसज्यप्रतिषेध ईप्सितं नेति । किं तर्हि । पर्युदासोऽयं यदन्यदीप्सितात्तदनीप्सितमिति । अन्यच्चैतदीप्सिताद्यन्नैवेप्सितं नाप्यनीप्सितमिति ॥

---

(सू. ५०) या सूत्राचें उदाहरण काय ?

विषं भक्षयति.

हें प्रकृत सूत्राचें उदाहरण होत नाहीं. कारण 'कर्तुरीप्सिततमम्' या पूर्वसूत्रानेंच येथें कर्मसंज्ञा साधत आहे.

येथें पूर्वसूत्रानें कर्मसंज्ञा साधत नाहीं. कारण ईप्सिताला म्हणजे कर्त्यानें आपल्या क्रियेच्या फलाच्या द्वारानें संबंध होण्याविषयीं इच्छिलेला जो पदार्थ त्याला कर्मसंज्ञा सांगितली आहे, आणि विषाचें भक्षण कोणाला बरें ईप्सित असणार आहे ?

विषभक्षण हेंही एखाद्याला ईप्सित असूं शकते. या जगामध्यें जो मनुष्य अत्यंत पीडित झाला आहे तो विद्यमान दुःखापेक्षां बलवत्तर अशीं पुढें येणारीं दुःखें ऐकून तीं टाळण्यासाठीं विषभक्षणच श्रेष्ठ समजतो. शिवाय ज्यापेक्षां तो तें विषभक्षण करीत आहे त्यापेक्षां त्याला तें ईप्सित आहेच.

तर मग अमुक एक क्रिया करावयाची असा मनांत उद्देश असून त्याहून निराळी क्रिया करतो तें या सूत्राचें उदाहरण होय.[1]

असें तें उदाहरण कोणचें ?

ग्रामान्तराला उद्देशून निघालेला मनुष्य वाटेंत चोरांना पाहतो, सर्पाला ओलांडतो आणि कांटे तुडवितो.[2]

येथें ईप्सिततम अशा पदार्थालाही कर्मसंज्ञा सांगितली आहे आणि अनीप्सित अशा पदार्थालाही कर्मसंज्ञा सांगितली आहे. परंतु जें ईप्सितही नव्हे आणि अनीप्सितही नव्हे त्याला कर्मसंज्ञा कशी बरें होईल ? जसें– ग्रामान्तरमयं गच्छन्, वृक्षमूलान्युपसर्पति, कुड्यमूलान्युपसर्पति– ग्रामान्तराला उद्देशून निघालेला मनुष्य वृक्षमूलांच्या शेजारून आणि कुड्यमूलाजवळून गमन करतो.

येथेंही वृक्षमूल आणि कुड्यमूल यांना कर्मसंज्ञा साधते.

ती कशी ?

अनीप्सित ह्या शब्दामध्यें ज्याच्यापासून इच्छा परावृत्त होते अशा अर्थाचा प्रसज्यप्रतिषेध नाहीं. तर काय ? ईप्सिताहून अन्य अशा अर्थाचा पर्युदास आहे. आणि जें ईप्सितही नव्हे व अनीप्सितही नव्हे तें ईप्सिताहून

---

१. कर्त्यानें केलेल्या क्रियेच्या फलाचा संबंध ज्याच्याशीं घडतो अशा अनीप्सित कारकाला कर्मसंज्ञा होते; उदा०– ग्रामं गच्छंस्तृणं स्पृशति.

२. चोर, साप, कांटे, वगैरे पदार्थ हे कर्त्याला अनीप्सित आहेत; तेव्हां ईप्सित नसल्यामुळें त्यांना पूर्वसूत्रानें कर्मसंज्ञा सिद्ध होत नाहीं.

**अकथितं च ॥ १।४।५१ ॥**

केनाकथितम् । अपादानादिभिर्विशेषकथाभिः ॥ किमुदाहरणम् ।

**दुहियाचिरुधिप्रच्छिभिक्षिचिञामुपयोगनिमित्तमपूर्वविधौ ।**

**ब्रुविशासिगुणेन च यत्सचते तदकीर्तितमाचरितं कविना ॥**

दुहि । गां दोग्धि पयः ॥ नैतदस्ति । कथितात्र पूर्वापादानसंज्ञा । दुहि ॥ याचि । इदं तर्हि । पौरवं गां याचत इति ॥ नैतदस्ति । कथितात्रापि पूर्वापादानसंज्ञा ॥ न याचनादेवापायो भवति । याचितोऽसौ यदि ददाति ततोऽपायेन युज्यते । याचि ॥ रुधि । अन्ववरुणद्धि गां व्रजम् ॥ नैतदस्ति । कथितात्र पूर्वाधिकरणसंज्ञा । रुधि ॥ प्रच्छि । माणवकं पन्थानं पृच्छति ॥ नैतदस्ति । कथितात्र पूर्वापादानसंज्ञा ॥ न प्रश्नादेवापायो

---

अन्यच आहे, सबब त्यालाही कर्मसंज्ञा प्रकृत सूत्रानेंच साधते.

(सू.५१) अकथित असें म्हटलें आहे तेथें तें कशानें अकथित असावें ?

अपादान, संप्रदान आणि अधिकरण या कारकविशेषांनीं अकथित असावें.

याचें उदाहरण काय ?

दुह्, याच्, रुध्, प्रच्छ्, भिक्ष् आणि चिञ् या धातूंच्या उपयोगाचें म्हणजे उपयोगीं पडणाऱ्या अशा पय वगैरे मुख्य कर्माचें जें गो वगैरे निमित्त त्याला, तसेंच ब्रू आणि शास् या धातूंच्या मुख्य कर्माशीं संबद्ध पदार्थाला पूर्वींच्या म्हणजे अपादान वगैरे इतर संज्ञा नसतील तेव्हां मेधावी आचार्यांनीं अकथित असें म्हटलें आहे.

दुह्धातूचें उदाहरण— गां दोग्धि पयः.

हें प्रकृत सूत्राचें उदाहरण होऊं शकत नाहीं. कारण गोपदार्थाला 'ध्रुवमपाये' या पूर्वसूत्रानें अपादानसंज्ञा सांगितली आहे.

तर मग याच्धातूचें उदाहरण घेऊं. पौरवं गां याचते.

हेंही प्रकृत सूत्राचें उदाहरण होऊं शकत नाहीं. कारण येथें पौरवाला 'ध्रुवमपाये' या पूर्वसूत्रानें अपादानसंज्ञा प्राप्त होत आहे.

केवळ याचना करण्यानें पौरवापासून गायीचा विभाग होऊं शकत नाहीं, तर याचना केली असतां तो दाता जर गाय देईल तरच त्या गायीचा विभाग होईल.

रुध्धातूचें उदाहरण— अन्ववरुणद्धि गां व्रजम्— गोठ्यामध्यें गायीला अडवून ठेवतो.

हें प्रकृत सूत्राचें उदाहरण होऊं शकत नाहीं. कारण येथें व्रजपदार्थाला 'आधारोऽधिकरणम्' या पूर्वसूत्रानें अधिकरणसंज्ञा प्राप्त होत आहे.

प्रच्छ्धातूचें उदाहरण— माणवकं पन्थानं पृच्छति— माणवकाला मार्ग विचारतो.

हें प्रकृत सूत्राचें उदाहरण होऊं शकत नाहीं. कारण येथें माणवकपदार्थाला 'ध्रुवमपाये' या पूर्वसूत्रानें अपादानसंज्ञा प्राप्त होत आहे.

---

१. अपादान, संप्रदान आणि अधिकरण या विशेषशक्तींनीं रहित जें कारक त्याला कर्मसंज्ञा होते; उदा०— गां पयो दोग्धि. येथें गो या पदार्थाला अपादानसंज्ञा प्रसक्त असतां त्या अपादानत्वाची अविवक्षा करून त्याला कर्मसंज्ञा केली आहे.

२. गाईपासून दुधाचा विभाग धार काढतांना होतो तेव्हां गायीला अपादानसंज्ञा (१।४।२४) प्राप्त होते; आणि येथें 'अपूर्वविधौ' असें म्हटलें असल्यामुळें पूर्वसंज्ञेची प्राप्ति नसली तर त्याला अकथित म्हणतां येतें; सबब गां दोग्धि हे 'अकथितं च' या सूत्राचें उदाहरण होऊं शकत नाहीं, असा शंकाकाराचा आशय आहे. वस्तुतः येथें अपादानत्वाची अविवक्षा करून प्रकृत सूत्रानें कर्मसंज्ञा करतां येते.

३. तेव्हां येथें अपादानसंज्ञेची प्राप्ति नसल्यामुळें याला अकथित म्हणतां येतें.

भवति। पृष्टोऽसौ यदाचष्टे ततोऽपायेन युज्यते। प्रच्छि॥ भिक्षि। पौरवं गां भिक्षते॥ नैतदस्ति। कथितात्र पूर्वापादानसंज्ञा॥ न भिक्षणादेवापायो भवति। भिक्षितोऽसौ यदि ददाति ततोऽपायेन युज्यते। भिक्षि॥ चिञ्। वृक्षमवचिनोति फलानि॥ नैतदस्ति। कथितात्र पूर्वापादानसंज्ञा॥ ब्रुविशासिगुणेन च यत्सचते तदकीर्तितमाचरितं कविना। ब्रुविशासिगुणेन च यत्सचते संबध्यते तच्चोदाहरणम्। किं पुनस्तत्। पुत्रं ब्रूते धर्मम्। पुत्रमनुशास्ति धर्ममिति॥ नैतदस्ति। कथितात्र पूर्वा संप्रदानसंज्ञा॥ तस्मात्त्रीण्येवोदाहरणानि। पौरवं गां याचते। माणवकं पन्थानं पृच्छति। पौरवं गां भिक्षत इति॥

अथ ये धातूनां द्विकर्मकास्तेषां किं कथिते लादयो भवन्त्याहोस्विदकथिते। कथिते लादयः॥ कथिते लादिभिरभिहिते गुणकर्मणि का कर्तव्या।

**कथिते लादयश्चेत्स्युः षष्ठीं कुर्यात्तदा गुणे।**

---

केवळ प्रश्न केल्यानें माणवकापासून मार्गाचा बुद्धिकृत वियोग होत नाहीं, तर प्रश्न केला असता जर तो मनुष्य मार्ग समजावून देईल तरच माणवकापासून मार्गाचा वियोग होईल.

भिक्ष्धातूचें उदाहरणः—पौरवं गां भिक्षते, पौरवाला गाय मागतो.

प्रकृत सूत्राचें हें उदाहरण होऊं शकत नाहीं; कारण पौरवाला 'ध्रुवमपाये' या पूर्वसूत्रानें अपादानसंज्ञा प्राप्त होत आहे.

केवळ भिक्षा मागण्यानें पौरवापासून गायीचा वियोग होऊं शकत नाहीं, तर तो गाय देईल तरच पौरवापासून गायीचा वियोग होईल.

चिञ्धातूचें उदाहरणः— वृक्षमवचिनोति फलानि, वृक्षाचीं फळें वेंचतो.

हें प्रकृत सूत्राचें उदाहरण होऊं शकत नाहीं. कारण येथें वृक्षाला 'ध्रुवमपाये' या पूर्वसूत्रानें अपादानसंज्ञा प्राप्त होत आहे.

ब्रूधातु किंवा शास्धातु यांच्या कर्माशीं जें संबद्ध झालें आहे तेंही प्रकृत सूत्राचें उदाहरण होय.

तें उदाहरण कोणतें?

पुत्रं ब्रूते धर्मम्, पुत्रमनुशास्ति धर्मम्, पुत्राला धर्म सांगतो.

हें प्रकृत सूत्राचें उदाहरण होऊं शकत नाहीं. कारण येथें पुत्राला 'कर्मणा यमभिप्रैति' या पूर्वसूत्रानें संप्रदानसंज्ञा प्राप्त होत आहे. म्हणून पौरवं गां याचते, माणवकं पन्थानं पृच्छति आणि पौरवं गां भिक्षते, हीं तीनच प्रकृत सूत्राचीं मुख्य उदाहरणें होत[४].

आतां द्विकर्मक म्हणून जे धातु ठरले गेले त्या धातूंहून कर्मणि लकार वगैरे प्रत्यय कर्तव्य असले तर ते कथित म्ह. मुख्य कर्म या अर्थी करावेत किंवा अकथित म्ह. गौण कर्म या अर्थी करावेत?

त्या धातूंहून मुख्य कर्म या अर्थी लादि प्रत्यय करावेत.

मुख्य कर्म लादि प्रत्ययांकडून उक्त झालें असतां गुणकर्मवाचक शब्दांपुढें कोणती विभक्ति करावयाची?

मुख्य कर्मार्थी लादि प्रत्यय केले तर गुणकर्मवाचक शब्दांपुढें षष्ठी विभक्ति करावी; जसें—दुह्यते गोः पयः, याच्यते पौरवस्य कम्बलः.

---

४. ह्या तिघांशिवाय दुह् वगैरे इतर धातूंच्या प्रयोगांमध्यें जरी गो वगैरेंना अपादान वगैरे संज्ञा प्राप्त होतात तरी तेथें जर त्या अपादान वगैरे विशेष कारकांची अविवक्षा केली तर तेथेंही अकथित म्हणतां येतें. तेव्हां तींही ह्या प्रकृत सूत्राचीं उदाहरणें होतात.

कथिते लादयश्चेत्स्युः षष्ठी गुणकर्मणि तदा कर्तव्या । दुह्यते गोः पयः । याच्यते पौरवस्य कम्बल इति ॥ कथम् ।

**अकारकं ह्यकथितत्वात्**

अकारकं ह्येतद्भवति । किं कारणम् । अकथितत्वात् ॥

**कारकं चेत्तु नाकथा ।**

अथ कारकं नाकथितम् ॥ अथ कारके सति का कर्तव्या ।

**कारकं चेद्विजानीयाद्यां यां मन्येत सा भवेत् ॥**

कारकं चेद्विजानीयाद्या या प्राप्नोति सा सा कर्तव्या । दुह्यते गोः पयः । याच्यते पौरवात्कम्बल इति ॥

**कथितेऽभिहिते त्वविधिस्त्वमतिर्गुणकर्मणि लादिविधिः सपरे ।**

कथिते लादिभिरभिहिते त्वविधिरेष भवति । किमिदं त्वविधिरिति । तव विधिस्त्वविधिः । त्वमतिः । किमिदं त्वमतिरिति । तव मतिस्त्वमतिः । नैवमन्ये मन्यन्ते ॥ कथं तर्ह्यन्ये मन्यन्ते । गुणकर्मणि लादिविधिः सपरे । गुणकर्मणि लादिविधयो भवन्ति सह परेण योगेन । गतिबुद्धिप्रत्यवसानार्थशब्दकर्माकर्मकाणामणिकर्ता स णौ [१.४.५२] इति ॥

**ध्रुवचेष्टितयुक्तिषु चाप्यगुणे तदनल्पमतेर्वचनं स्मरत ॥**

ध्रुवयुक्तिषु चेष्टितयुक्तिषु चाप्यगुणे कर्मणि लादयो भवन्ति । एतदनल्पमतेराचार्यस्य वचनं स्मर्यताम् ॥

---

ती कशी ?

गुणकर्म हें कारक नाहीं.

काय कारण ?

तें अकथित आहे.

जर तें कारक असेल तर अकथित असूं शकणार नाहीं. तेव्हां ज्यापेक्षां अकथित आहे त्यापेक्षां कारक नाहीं.

आतां गुणकर्माला कारकत्व विवक्षित असेल तर कोणती विभक्ति करावी ?

गुणकर्माला कारकत्व विवक्षित असेल तर जें जें कारक विवक्षित असेल त्याला अनुसरून ती ती विभक्ति करावी; जसें— दुह्यते गोः पयः, याच्यते पौरवात्कम्बलः.

प्रधानकर्म लकार वगैरे प्रत्ययांकडून उक्त झालें असतां गुणकर्मवाचक शब्दांपुढें इतर विभक्ति म्हणजे षष्ठी, चतुर्थी किंवा पञ्चमी करावी, असें तुझें मत आहे. त्वविधिः याचा काय अर्थ ?

तव[५] विधिः, त्वविधिः.

त्वमतिः याचा काय अर्थ ?

तव मतिः त्वमतिः.

पण अन्य वैयाकरण तुझ्या मताप्रमाणें समजत नाहींत.

तर कसें समजतात ?

अप्रधान कर्म या अर्थीं लादिक प्रत्यय होतात. तोच न्याय पुढील सूत्रांत लागू आहे. म्हणजे 'गतिबुद्धिप्रत्यवसान' या सूत्रानें द्विकर्मक झालेल्या ठिकाणींही अप्रधान कर्मार्थी लादि प्रत्यय होतात.

ध्रुवयुक्ति म्ह. अकर्मक आणि चेष्टितयुक्ति म्ह. गत्यर्थक अशा धातूंचा प्रयोग केला असेल तेथें प्रधान कर्म या अर्थीं लादिक होतात[६], असें प्रौढबुद्धि आचार्यांचें वचन आहे तें ध्यानांत आणा.

---

५. त्वविधिः, त्वमतिः, या दोन्ही ठिकाणीं अन्य या अर्थाचा त्वशब्द आहे, युष्मच्छब्द नव्हे. अन्य म्हणून येथें युष्मच्छब्दार्थच गृहीत धरला आहे म्हणून तव विधिः, तव मतिः असा युष्मच्छब्दानें विग्रह दाखविला आहे.

६. अकर्मक धातूचें देशकाल हे कर्म होतात, अकर्मक आणि गत्यर्थक धातूंहून णिच्प्रत्यय केला म्हणजे ते पुढील 'गतिबुद्धि०' या सूत्रानें द्विकर्मक होतात.

अपर आह ।

**प्रधानकर्मण्याख्येये लादीनाहुर्द्विकर्मणाम् ।**

प्रधानकर्मण्यभिधेये द्विकर्मणां धातूनां कर्मणि लादयो भवन्तीति वक्तव्यम् । अजां नयति ग्रामम् । अजा नीयते ग्रामम् । अजा नीता ग्राममिति ॥

**अप्रधाने दुहादीनाम्**

अप्रधाने दुहादीनां कर्मणि लादयो भवन्तीति वक्तव्यम् । दुह्यते गौः पयः ॥

**ण्यन्ते कर्तुश्च कर्मणः ॥**

लादयो भवन्तीति वक्तव्यम् । गम्यते देवदत्तो ग्रामं यज्ञदत्तेन ॥

के पुनर्धातूनां द्विकर्मकाः ।

**नीवह्योर्हरतेश्चापि गत्यर्थानां तथैव च। द्विकर्मकेषु ग्रहणं द्रष्टव्यमिति निश्चयः॥**

अजां नयति ग्रामम् । भारं वहति ग्रामम् । भारं हरति ग्रामम् । गत्यर्थानाम् । गमयति देवदत्तं ग्रामम् । यापयति देवदत्तं ग्रामम् ॥

**सिद्धं वाप्यन्यकर्मणः ।**

सिद्धं वा पुनरेतद्भवति । कुतः । अन्यकर्मणः । अन्यस्यात्राजा कर्मान्यस्य ग्रामः । अजामसौ गृहीत्वा ग्रामं नयति ॥

**अन्यकर्मेति चेद्ब्रूयाल्लादीनामविधिर्भवेत् ॥**

अन्यकर्मेति चेद्ब्रूयाल्लादीनामविधिरयं भवेत् । अजा नीयते ग्राममिति । परसाधन उत्पद्यमानेन लेनाजाया अभिधानं न प्राप्नोति ॥

**कालभावाध्वगन्तव्याः कर्मसंज्ञा ह्यकर्मणाम् ।**

कालभावाध्वगन्तव्या अकर्मकाणां धातूनां कर्मसंज्ञा भवन्तीति वक्तव्यम् । काल ।

---

अन्य कोणी एक वैयाकरण म्हणतो—

द्विकर्मक धातूंचा कर्मणि प्रयोगामध्यें मुख्य कर्म या अर्थी लादिक प्रत्यय होतात, असें विधान करावें; जसें— अजां नयति ग्रामम्, अजा नीयते ग्रामम्, अजा नीता ग्रामम्.

दुह्, याच्, इत्यादि धातूंच्या कर्मणि प्रयोगामध्यें गौण कर्म या अर्थी लादिक प्रत्यय होतात, असें विधान करावें; जसें—गौर्दुह्यते पयः.

णिजन्त धातूच्या कर्मणि प्रयोगामध्यें ज्या अण्यन्तावस्थेंतील कर्त्याला कर्मसंज्ञा झाली असेल त्या अर्थी लादिक प्रत्यय होतात, असें विधान करावें; जसें— गम्यते यज्ञदत्तो ग्रामं देवदत्तेन.

आतां धातूंमध्यें द्विकर्मक असे धातु कोणते ?

नी, वह्, हृ आणि गत्यर्थक धातु हे द्विकर्मकामध्यें गृहीत धरले आहेत असें समजावें; जसें— अजां नयति ग्रामम्, भारं वहति ग्रामम्, भारं हरति ग्रामम्. गत्यर्थक धातूचें उदाहरणः— गमयति देवदत्तं ग्रामम्, यापयति देवदत्तं ग्रामम्.

अथवा हीं उदाहरणें सिद्ध होत आहेत.

तीं कशीं ?

अजा हें एका क्रियेचें कर्म आहे आणि ग्राम हें दुसऱ्या क्रियेचें कर्म होत आहे. अजेला घेऊन गांवाला जातो असा 'अजां नयति ग्रामम्' याचा अर्थ आहे.

ग्रहण करणें या निराळयाच क्रियेमुळें अजा हें कर्म आहे असें म्हणणें असेल तर अजा नीयते ग्रामम् येथें नीधातूच्या कर्मणि प्रयोगामध्यें अजा या कर्मार्थी लकारादि प्रत्यय होऊं शकत नाहींत, म्हणून अजापदार्थाला अन्य क्रियेमुळें कर्मत्व स्वीकारणें इष्ट नाहीं.

अकर्मक धातूच्या प्रयोगामध्यें काल, भाव आणि गन्तव्यमार्ग, यांना कर्मसंज्ञा होते असें म्हणावें; उदा०— मासमास्ते, मासं स्वपिति.

मासमास्ते। मासं स्वपिति॥ भाव। गोदोहमास्ते। गोदोहं स्वपिति॥ अध्वगन्तव्य। क्रोशमास्ते। क्रोशं स्वपिति॥ देशश्चाकर्मणां कर्मसंज्ञो भवतीति वक्तव्यम्। कुरून्स्वपिति। पञ्चालान्स्वपिति॥

विपरीतं तु यत्कर्म तत्कल्म कवयो विदुः॥

किमिदं कल्मेति। अपरिसमाप्तं कर्म कल्म। न वा अस्मिन्सर्वाणि कर्मकार्याणि क्रियन्ते। किं तर्हि। द्वितीयैव॥

यस्मिंस्तु कर्मण्युपजायतेऽन्यद्धात्वर्थयोगापि च यत्र षष्ठी।

तत्कर्म कल्मेति च कल्म नोक्तं धातोर्हि वृत्तिर्न रलत्वतोऽस्ति॥

एतेन कर्मसंज्ञा सर्वा सिद्धा भवत्यकथितेन।

तत्रेप्सितस्य किं स्यात्प्रयोजनं कर्मसंज्ञायाः॥

यत्तु कथितं पुरस्तादीप्सितयुक्तं च तस्य सिद्ध्यर्थम्।

ईप्सितमेव तु यत्स्यात्तस्य भविष्यत्यकथितेन॥

---

भावप्रत्ययान्ताचें उदाहरणः— गोदोहमास्ते, गोदोहं स्वपिति. गन्तव्यमार्गाचें उदाहरणः— क्रोशमास्ते, क्रोशं स्वपिति.

अकर्मक धातूच्या प्रयोगामध्यें देशालाही कर्मसंज्ञा होते असें म्हणावें; उदा०— कुरून् स्वपिति, पञ्चालान् स्वपिति.

विपरीत[७] जें कर्म त्याला पूर्वीचे मेधावी लोक कल्म असें म्हणत होते.

कल्म हें काय आहे ?

ज्या कर्मामध्यें कर्मपणा पूर्णपणानें नाहीं त्या कर्माला कल्म म्हणतात. शिवाय त्या ठिकाणीं कर्मामुळें होणारीं सर्व कार्यें केलीं जात नाहींत; फक्त द्वितीयाच केली जाते.

गो वगैरे जे पदार्थ कर्म असे गृहीत धरले असतां तेथें अन्य कांहीं मुख्य कर्म पय वगैरे प्रादुर्भूत होतें व तें जें धात्वर्थाचें मुख्य फल पय वगैरे, त्याच्यावर ज्या कर्मांचा संबंध केला असतां त्या कर्मांच्या पुढें षष्ठी विभक्ति करतां येते त्या कर्माला कल्म असें म्हणतात. या शास्त्रामध्यें मात्र पाणिनिआचार्यांनें कर्माला कल्म अशी दुसरी संज्ञा केली नाहीं. कारण कर्मशब्दांतील कृधातूच्या रेफाला लत्व केल्यानें तो धातु निराळा अर्थ दाखवूं शकत नाहीं.

ईप्सिततम आणि अनीप्सित यांना जी कर्मसंज्ञा पूर्वीच्या दोन सूत्रांनीं सांगितली आहे ती सर्व 'अकथितं च' या प्रकृत सूत्रानें साधत आहे. असें असतां त्या दोघांना कर्मसंज्ञा सांगून अर्थात् त्याशिवाय म्हणजे केवळ ईप्सिताला अकथित असेल तेथें कर्मसंज्ञा जी ह्या प्रकृत सूत्रानें सांगितली आहे तिचा उपयोग काय ?

जें पूर्वी सांगितलें आहे आणि जें ईप्सित पदार्थानें युक्त म्हणजे ईप्सिततम आहे त्याला कर्मसंज्ञा होण्याकरितां 'कर्तुरीप्सिततमम्' हें सूत्र केलें पाहिजे. आतां जें केवळ ईप्सित आहे म्हणजे ईप्सिततम नव्हे तशा अकथित पदार्थाला ह्या प्रकृत सूत्रानें कर्मसंज्ञा होईल.

आतां येथें कसा प्रयोग व्हावा, नेताऽश्वस्य स्रुघ्नम् असा व्हावा किंवा नेताऽश्वस्य स्रुघ्नस्य,

---

७. गो वगैरे जें खरें कर्म नव्हे त्याचा फक्त पय वगैरे कर्माशीं संबंध असतो असे जें अकथित म्हणजे गौण कर्म तें विपरीत कर्म होय.

८. या अपरिसमाप्तकर्मार्थी लादिकांचें विधान नाहीं; कारण 'द्विकर्मक धातूंच्या प्रधानकर्मार्थी लादिक होतात' असें पूर्वी ज्यानें सांगितलें आहे तोच हा वादी होय. परंतु दुहादिक धातूंच्या अप्रधानकर्मार्थी लादिकांचें विधान सांगितलें असल्यामुळें हा पक्ष बरोबर नाहीं.

९. यवेभ्यो गां वारयति येथें गो हें ईप्सिततम आहे आणि तें 'वारणार्थानां०' या सूत्रामध्यें ईप्सितपदानें कथित आहे; कारण ईप्सिततमाला ईप्सित असें म्हणतां येतें. तेव्हां 'अकथितं च' या प्रकृत सूत्रानें त्याला कर्मसंज्ञा होणार नाहीं.

अथेह कथं भवितव्यम् । नेताश्वस्य स्रुघ्नमिति । आहोस्विन्नेताश्वस्य स्रुघ्नस्येति । उभयथा गोणिकापुत्रः ॥

## गतिबुद्धिप्रत्यवसानार्थशब्दकर्माकर्मकाणामणिकर्ता स णौ ॥ १ । ४ । ५२ ॥

शब्दकर्मेति कथमिदं विज्ञायते । शब्दो येषां क्रियेति । आहोस्विच्छब्दो येषां कर्मेति । कश्चात्र विशेषः ।

### शब्दकर्मनिर्देशे शब्दक्रियाणामिति चेद्ध्वयत्यादीनां प्रतिषेधः ॥ १ ॥

शब्दकर्मनिर्देशे शब्दक्रियाणामिति चेद्ध्वयत्यादीनां प्रतिषेधो वक्तव्यः । के पुनर्ह्वयत्यादयः । ह्वयति क्रन्दति शब्दायते ॥ ह्वयति देवदत्तः । ह्वाययति देवदत्तेन ॥ क्रन्दति देवदत्तः । क्रन्दयति देवदत्तेन ॥ शब्दायते देवदत्तः । शब्दाययति देवदत्तेनेति ॥

### शृणोत्यादीनां चोपसंख्यानमशब्दक्रियत्वात् ॥ २ ॥

शृणोत्यादीनां चोपसंख्यानं कर्तव्यम् । के पुनः शृणोत्यादयः । शृणोति विजानाति उपलभते ॥ शृणोति देवदत्तः । श्रावयति देवदत्तम् ॥ विजानाति देवदत्तः । विज्ञापयति देवदत्तम् ॥ उपलभते देवदत्तः । उपलम्भयति देवदत्तम् ॥ किं पुनः कारणं न सिध्यति । अशब्दक्रियत्वात् ॥

अस्तु तर्हि शब्दो येषां कर्मेति ।

### शब्दकर्मण इति चेज्जल्पतिप्रभृतीनामुपसंख्यानम् ॥ ३ ॥

---

असा व्हावा ?

दोन्ही प्रकारचा प्रयोग व्हावा, असें गोणिकेचा पुत्र म्हणतो.

(सू.५२) शब्दकर्मक धातु म्हणजे कसे समजावेत ? शब्द करणें ही क्रिया ज्या धातूंचा अर्थ आहे असे धातु, किंवा ज्या धातूंचें कर्म शब्द आहे असे धातु ?

या दोहोंमध्यें काय बरें फरक आहे ?

(वा.१) शब्द करणें ही क्रिया ज्या धातूंचा अर्थ आहे असे धातु 'शब्दकर्म' असें समजले जातात असें मानलें तर ह्वे वगैरे धातूंच्या अण्यन्त अवस्थेंतील कर्त्याला ण्यन्त अवस्थेमध्यें कर्मसंज्ञा होत नाहीं असें म्हटलें पाहिजे.

ते ह्वयत्यादिक धातु कोणते ?

ह्वयति, क्रन्दति आणि शब्दायते हे होत; जसें– ह्वयति देवदत्तः, ह्वाययति देवदत्तेन; क्रन्दति देवदत्तः, क्रन्दयति देवदत्तेन; शब्दायते देवदत्तः, शब्दाययति देवदत्तेन.

(वा.२) तसेंच शृणोति वगैरे धातूंच्या अण्यन्त अवस्थेंतील कर्त्याला ण्यन्त अवस्थेमध्यें कर्मसंज्ञा होते असें वचन केलें पाहिजे.

शृणोति वगैरे धातु ते कोणते ?

शृणोति, विजानाति आणि उपलभते हे होत; जसें– शृणोति देवदत्तः, श्रावयति देवदत्तम्; विजानाति देवदत्तः, विज्ञापयति देवदत्तम्; उपलभते देवदत्तः, उपलम्भयति देवदत्तम्.

पण येथें श्रु वगैरे धातूंच्या अण्यन्त अवस्थेंतील कर्त्याला ण्यन्त अवस्थेमध्यें कर्मसंज्ञा कां बरें होऊं शकत नाहीं ?

शब्द करणें हा त्या धातूंचा अर्थ नाहीं म्हणून.

तर मग शब्द हे ज्या धातूंचें कर्म आहे असे धातु हे शब्दकर्म असे समजावेत.

(वा.३) शब्द आहे कर्म ज्यांचें अशा धातूंच्या अण्यन्त अवस्थेंतील कर्त्याला ण्यन्त

---

१०. येथें भाष्यकारांनीं आपलें स्वतःचें मत 'गोणिकेचा पुत्र' या नांवानें निर्दिष्ट केलें आहे.

१. गत्यर्थक, ज्ञानार्थक, भक्षणार्थक, शब्दकर्मक आणि अकर्मक, या धातूंच्या अण्यन्त अवस्थेंतील कर्त्याला ण्यन्त अवस्थेमध्यें कर्मसंज्ञा होते; उदा०– शत्रवः स्वर्गं गच्छन्ति, श्रीहरिः शत्रून् स्वर्गं गमयति.

शब्दकर्मण इति चेज्जल्पतिप्रभृतीनामुपसंख्यानं कर्तव्यम् । के पुनर्जल्पतिप्रभृतयः । जल्पति विलपति आभाषते ॥ जल्पति देवदत्तः । जल्पयति देवदत्तम् ॥ विलपति देवदत्तः । विलापयति देवदत्तम् ॥ आभाषते देवदत्तः । आभाषयति देवदत्तम् ॥

**दृशेः सर्वत्र ॥ ४ ॥**

दृशेः सर्वत्रोपसंख्यानं कर्तव्यम् । पश्यति रूपतर्कः कार्षापणम् । दर्शयति रूपतर्कं कार्षापणम् ॥

**अदिखादिनीवहीनां प्रतिषेधः ॥ ५ ॥**

अदिखादिनीवहीनां प्रतिषेधो वक्तव्यः ॥ अत्ति देवदत्तः । आदयते देवदत्तेन ॥ अपर आह । सर्वमेव प्रत्यवसानकार्यमदेर्न भवतीति वक्तव्यं परस्मैपदमपि । इदमेकमिष्यते क्तोऽधिकरणे च ध्रौव्यगतिप्रत्यवसानार्थेभ्यः [३.४.७६]। इदमेषां जग्धम् ॥ खादि । खादति देवदत्तः । खादयति देवदत्तेन ॥ नी । नयति देवदत्तः । नाययति देवदत्तेन ॥

**वहेरनियन्तृकर्तृकस्य ॥ ६ ॥**

वहेरनियन्तृकर्तृकस्येति वक्तव्यम् । वहति भारं देवदत्तः । वाहयति भारं देवदत्तेन ॥ अनियन्तृकर्तृकस्येति किमर्थम् । वहन्ति यवान्बलीवर्दाः । वाहयन्ति बलीवर्दान्यवान् ॥

**भक्षेरहिंसार्थस्य ॥ ७ ॥**

---

अवस्थेमध्यें कर्मसंज्ञा होते असा अर्थ गृहीत धरला तर जल्पति वगैरे धातूंच्या अण्यन्तावस्थेंतील कर्त्याला ण्यन्तावस्थेंमध्यें कर्मसंज्ञा होण्यासाठीं वचन केलें पाहिजे.

जल्पति वगैरे धातु ते कोणते ?

जल्पति, विलपति आणि आभाषते हे होत; जसें— जल्पति देवदत्तः, जल्पयति देवदत्तम्; विलपति देवदत्तः, विलापयति देवदत्तम्; आभाषते देवदत्तः, आभाषयति देवदत्तम्.

(वा.४) 'शब्दकर्म' या शब्दानें कसेही धातु घेतले तरी दृश् धातूच्या अण्यन्त अवस्थेंतील कर्त्याला ण्यन्त अवस्थेमध्यें कर्मसंज्ञा होते असें वचन केलें पाहिजे; जसें— पश्यति रूपतर्कःकार्षापणम्,दर्शयतिरूपतर्कं कार्षापणम्.

(वा.५) अद, खाद, नी आणि वह या धातूंच्या अण्यन्तावस्थेंतील कर्त्याला ण्यन्त अवस्थेमध्यें कर्मसंज्ञा होत नाहीं असें म्हणावें; जसें— अत्ति देवदत्तः, आदयते देवदत्तेन.

ह्या अद्धातूसंबंधानें अन्य कोणी एक वैयाकरण असें म्हणतो की भक्षण या अर्थावर अवलंबून असलेलें कोणतेंही कार्य अद्धातूला होत नाहीं असें म्हणावें. त्यामुळें 'निगरणचलना०' (१।३।८७) या सूत्रानें सांगितलेलें परस्मैपद सुद्धां होत नाहीं. फक्त 'क्तोऽधिकरणे च ध्रौव्य०' (३।४।७६) यानें सांगितलेलें कार्य मात्र अद्धातूला होतें असें इष्ट आहे; जसें— इदमेषां जग्धम्.

खाद्धातूचें उदाहरण— खादति देवदत्तः, खादयति देवदत्तेन; नी— नयति देवदत्तः, नाययति देवदत्तेन.

(वा.६) पशुप्रेरक हा वहधातूचा कर्ता नसेल तेथें वहधातूच्या अण्यन्त अवस्थेंतील कर्त्याला ण्यन्त अवस्थेमध्यें कर्मसंज्ञा होत नाहीं हा निषेध लागू होतो असें म्हणावें; जसें— वहति भारं देवदत्तः, वाहयति भारं देवदत्तेन.

येथें 'पशुप्रेरक कर्ता नसेल तर' असें जें म्हटलें आहे तें कशासाठीं ?

वहन्ति बलीवर्दा यवान्; वाहयति बलीवर्दान् यवान्.

(वा.७) हिंसा या अर्थाला न दाखविणाऱ्या

---

२. सोनें वगैरे पदार्थांचें रूप पाहून त्यावरून तो पदार्थ किती योग्यतेचा आहे तें तर्क करणारा सोनार वगैरे.

भक्षेरहिंसार्थस्येति वक्तव्यम् । भक्षयति पिण्डीं देवदत्तः । भक्षयति पिण्डीं देवदत्तेन ॥ अहिंसार्थस्येति किमर्थम् । भक्षयन्ति यवान्बलीवर्दाः । भक्षयन्ति बलीवर्दान्यवान् ॥

**अकर्मकग्रहणे कालकर्मकाणामुपसंख्यानम् ॥ ८ ॥**

अकर्मकग्रहणे कालकर्मकाणामुपसंख्यानं कर्तव्यम् ॥ मासमास्ते देवदत्तः । मासमासयति देवदत्तम् ॥ मासं शेते देवदत्तः । मासं शाययति देवदत्तम् ॥

**सिद्धं तु कालकर्मणामकर्मकवद्वचनात् ॥ ९ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । कालकर्मका अकर्मकवद्भवन्तीति वक्तव्यम् ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । अकर्मकाणामित्युच्यते न च केचित्कदाचित्कालभावाध्वभिरकर्मकाः । त एवं विज्ञास्यामः । क्वचिद्येऽकर्मका इति ॥ अथवा येन कर्मणा सकर्मकाश्चाकर्मकाश्च भवन्ति तेनाकर्मकाणां न चैतेन कर्मणा कश्चिदप्यकर्मकः ॥ अथवा यत्कर्म भवति

भक्ष्धातूच्या अण्यन्त अवस्थेंतील कर्त्याला ण्यन्त अवस्थेमध्यें कर्मसंज्ञा होत नाहीं असें म्हणावें; जसें– भक्षयति पिण्डीं देवदत्तः, भक्षयति पिण्डीं देवदत्तेन.

येथें 'हिंसा या अर्थाला न दाखविणारा' असें जें म्हटलें आहे तें कशासाठीं ?

भक्षयन्ति यवान् बलीवर्दाः, भक्षयति[3] बलीवर्दान्यवान्.

(वा.८) प्रकृत सूत्रामध्यें अकर्मक असें जें म्हटलें आहे तेथें त्याचे जवळ 'कालकर्म' हा शब्द घालावा; जसें– मासमास्ते देवदत्तः, मासमासयति देवदत्तम्, मासं शेते देवदत्तः, मासं शाययति देवदत्तम्.

(वा.९) कालकर्मामुळें सकर्मक झालेल्या धातूंच्या अण्यन्त अवस्थेंतील कर्त्याला ण्यन्त अवस्थेमध्यें कर्मसंज्ञा सिद्ध होत आहे.

ती कशी ?

कालकर्मामुळें सकर्मक बनलेले धातु अकर्मक धातूंसारखे समजले जातात म्हणून.

तर मग तसें वचन केलें पाहिजे.

तसें वचन करावयास नको. कारण 'गतिबुद्धि०' या सूत्रानें अकर्मक धातूंच्या अण्यन्तावस्थेंतील कर्त्याला ण्यन्तावस्थेमध्यें कर्मसंज्ञा सांगितली आहे; परंतु अकर्मक म्हणून प्रसिद्ध असलेले धातु काल, भाव आणि अध्वा, या कर्मांमुळें सर्वच ते सकर्मक बनतात. तेव्हां अकर्मक म्हणून धातुच शिल्लक राहत नाहींत, आणि सूत्रामध्ये तर 'अकर्मक' असा शब्द घातला आहे; त्यावरून आम्ही असें ठरवितों की काल, भाव आणि अध्वा, यांवांचून निराळें द्रव्यरूपी कर्म ज्यांना संभवत नाहीं ते धातु अकर्मक पदानें घ्यावयाचे.

अथवा[4] जें कर्म संभवत असल्यामुळें धातूला सकर्मक म्हणतां येतें व संभवत नसल्यामुळें अकर्मक म्हणतां येतें त्या कर्माच्या अभावामुळें जे अकर्मक धातु ते अकर्मक पदानें घ्यावयाचे. काल वगैरे कर्म संभवत नसल्यामुळें अमुक धातु अकर्मक आहे असें कोणत्याही धातूला म्हणतां येत नाहीं.

अथवा हीच गोष्ट अशा रीतीनें बोलून दाखवावी की जें कर्म ठेवतां येतें किंवा न न ठेवतां येतें तसल्या कर्माच्या अभावामुळें

३. शेतांतील यव खातांना हिंसा होते; कारण ते सजीव प्राणी आहेत.

४. तांदूळ, ग्राम, हीं कर्में संभवल्यामुळें पच्, गम् हे धातु सकर्मक समजले जातात आणि तीं कर्में अस्, भू, यांना संभवत नसल्यामुळें ते धातु अकर्मक समजले जातात. तीं तांदूळ, ग्राम वगैरे कर्में अस्, भू, इत्यादिक धातूंना नाहींत म्हणूनच ते अकर्मक होत.

न च भवति तेनाकर्मकाणां न चैतत्कर्म क्वचिदपि न भवति ॥

## हृक्रोरन्यतरस्याम् ॥ १।४।५३॥

### हृक्रोर्वावचनेऽभिवादिदृशोरात्मनेपद उपसंख्यानम् ॥ १ ॥

हृक्रोर्वावचनेऽभिवादिदृशोरात्मनेपद उपसंख्यानं कर्तव्यम् ॥ अभिवदति गुरुं देवदत्तः । अभिवादयते गुरुं देवदत्तम् । अभिवादयते गुरुं देवदत्तेन ॥ पश्यन्ति भृत्या राजानम् । दर्शयते भृत्यान्राजा । दर्शयते भृत्यै राजा ॥ कथं चात्रात्मनेपदम् । एकस्य णेरणौ [१.३.६७] इति । अपरस्य णिचश्च [१.३.७४] इति ॥

## स्वतन्त्रः कर्ता ॥ १।४।५४ ॥

किं यस्य स्वं तन्त्रं स स्वतन्त्रः । किं चातः । तन्तुवाये प्राप्नोति ॥ नैष दोषः । अयं तन्त्रशब्दोऽस्त्येव विताने वर्तते । तद्यथा । आस्तीर्णं तन्त्रम् । प्रोतं तन्त्रम् । वितान इति गम्यते । अस्ति प्राधान्ये वर्तते । तद्यथा । स्वतन्त्रोऽसौ ब्राह्मण इत्युच्यते स्वप्रधान इति गम्यते । तद्यः प्राधान्ये वर्तते तन्त्रशब्दस्तस्येदं ग्रहणम् ॥

---

अकर्मक म्हटले जाणारे धातु अकर्मक पदानें घ्यावयाचे. काल वगैरे कर्म हें ठेवतां येणें किंवा न ठेवतां येणें अशांतलें नव्हे. कारण काल वगैरे कर्म कोणत्याही धातूला लावतां येत नाहीं असें नाहीं.

(सू.५३ वा.१) हृ आणि कृधातु यांच्या अण्यन्त अवस्थेंतील कर्त्याला ण्यन्त अवस्थेमध्यें कर्मसंज्ञा विकल्पानें सांगितली तेथें अभि-उपसर्गाच्या पुढील ण्यन्त वद्धातु आणि दृश्धातु यांच्या अण्यन्तावस्थेंतील कर्त्याला ण्यन्त अवस्थेमध्यें कर्मसंज्ञा विकल्पानें होते, आत्मनेपद पुढें असतां, असें वचन करावें, जसें– अभिवदति गुरुं देवदत्तः, अभिवादयते गुरुं देवदत्तेन, अभिवादयते गुरु देवदत्तम्, पश्यन्ति भृत्या राजानम्, दर्शयते भृत्यै राजा, दर्शयते भृत्यान् राजा.

अभिवादयते आणि दर्शयते या उदाहरणांमध्यें आत्मनेपद कसें बरें केलें आहे?

दर्शयते या उदाहरणामध्यें 'णेरणौ' (१।३।६७) या सूत्रानें आत्मनेपद केलें आहे आणि अभिवादयते या उदाहरणामध्यें 'णिचश्च' (१।३।७४) या सूत्रानें आत्मनेपद केलें आहे.

(सू.५४) स्वतन्त्रः या शब्दाचा अर्थ स्वं तन्त्रं यस्य सः असा आहे काय?

तसा घेतला तर काय होईल?

स्वतन्त्र हा शब्द कोष्टी या अर्थी प्रसिद्ध असल्यामुळें त्यालाच फक्त कर्तृसंज्ञा होईल.

हा दोष येत नाहीं. कारण तन्त्र या शब्दाचा वितान हा अर्थ आहे, जसें– आस्तीर्णं तन्त्रं, प्रोतं तन्त्रम्, येथें तन्त्रशब्दापासून वितान हा अर्थ मनांत येतो. प्राधान्य या अर्थीही तन्त्रशब्द आहे; जसें– स्वतन्त्रोऽसौ ब्राह्मणः असें म्हटलें असतां या वाक्यांतील तन्त्रशब्दापासून प्रधान हा अर्थ मनांत येतो. तेव्हां जो प्राधान्य या अर्थाचा तन्त्र-

---

१. हृ आणि कृ या धातूंच्या अण्यन्त अवस्थेंतील कर्त्याला ण्यन्त अवस्थेमध्यें विकल्पानें कर्मसंज्ञा होते; उदा०– हारयति कारयति वा भृत्यं भृत्येन वा कटम्.

१. क्रिया करण्याविषयीं मुख्यत्वानें विवक्षित अशा कारकाला कर्तृसंज्ञा होते; उदा०– देवदत्तः पचति.

२. आडवे उभे पसरलेले जे तन्तु त्यांना तन्त्र म्हणतात. त्यावरून कोष्ट्याला स्वतन्त्र हें नांव पडलें आहे. विणण्याकरितां तसे तन्तु नेहमीं त्याच्याजवळ असतात. स्वतन्त्र हा शब्द कोष्टी या अर्थी योगरूढ आहे.

३. छत, चांदवा वगैरे.

**स्वतन्त्रस्य कर्तृसंज्ञायां हेतुमत्युपसंख्यानमस्वतन्त्रत्वात् ॥ १ ॥**

स्वतन्त्रस्य कर्तृसंज्ञायां हेतुमत्युपसंख्यानं कर्तव्यम् । पाचयत्योदनं देवदत्तो यज्ञदत्तेनेति । किं पुनः कारणं न सिध्यति । अस्वतन्त्रत्वात् ॥

**न वा स्वातन्त्र्यादितरथा ह्यकुर्वत्यपि कारयतीति स्यात् ॥ २ ॥**

न वा कर्तव्यम् । किं कारणम् । स्वातन्त्र्यात् । स्वतन्त्रोऽसौ भवति । इतरथा ह्यकुर्वत्यपि कारयतीति स्यात् । यो हि मन्यते नासौ स्वतन्त्रोऽकुर्वत्यपि तस्य कारयतीत्येतत्स्यात् ॥

**नाकुर्वतीति चेत्स्वतन्त्रः ॥ ३ ॥**

न चेदकुर्वति तस्मिन्कारयतीत्येतद्भवति स्वतन्त्रोऽसौ भवति ॥ शक्यं तावदनेनोपसंख्यानं कुर्वता वक्तुं कुर्वन्स्वतन्त्रोऽकुर्वन्नेति । साधीयो ज्ञापकं भवति । प्रेषिते च किलायं क्रियां चाक्रियां च दृष्ट्वाध्यवस्यति कुर्वन्स्वतन्त्रोऽकुर्वन्नेति यदि च प्रेषितो ऽसौ न करोति स्वतन्त्रो ऽसौ भवतीति ॥

**तत्प्रयोजको हेतुश्च ॥ १।४।५५ ॥**

**प्रैषेऽस्वतन्त्रप्रयोजकत्वाद्धेतुसंज्ञाप्रसिद्धिः ॥ १ ॥**

प्रैषेऽस्वतन्त्रप्रयोजकत्वाद्धेतुसंज्ञाया अप्रसिद्धिः । स्वतन्त्रप्रयोजको हेतुसंज्ञो भवतीत्युच्यते न चासौ स्वतन्त्रं प्रयो-

---

शब्द आहे तो येथें उच्चारला आहे.

(वा.१) स्वतन्त्राला कर्तृसंज्ञा होते असें म्हटलें तर प्रयोजकाच्या सांनिध्यामुळें परतन्त्र अशा प्रयोज्य कर्त्याला कर्तृसंज्ञा होते असें वचन केलें पाहिजे; जसें— पाचयत्योदनं देवदत्तो यज्ञदत्तेन.

पण कां बरें येथें प्रयोज्य कर्ता अशा यज्ञदत्ताला कर्तृसंज्ञा प्राप्त होऊं शकत नाहीं ?

प्रयोज्य कर्ता हा प्रयोजक कर्ता जो देवदत्त त्याच्या अधीन असल्यामुळें परतन्त्र आहे म्हणून.

(वा.२) तसें वचन करावयास नको.

काय कारण ?

प्रयोज्य कर्ता हा जी क्रिया करतो त्या कामीं त्याला स्वातन्त्र्य आहेच[४]. नाहीं तर प्रयोज्यानें कांहीं केलें नाहीं तरी ह्या वचनानें कर्तृसंज्ञा होऊन कारयति असा प्रयोग होऊं लागेल.

(वा.३) तेव्हां ज्या अर्थी प्रयोज्य कर्ता कांहीं करीत नसला तर त्या ठिकाणीं कर्तृसंज्ञा होत नाहीं, व कारयति असा प्रयोग होत नाहीं, त्या अर्थी त्या वचनामध्यें 'तो स्वतन्त्र असला पाहिजे' असें गृहीत धरलें पाहिजे.

प्रयोज्याला कर्तृसंज्ञेकरितां वचन करणाऱ्याला 'क्रिया करणारा तो स्वतन्त्र आणि न करणारा तो स्वतन्त्र नव्हे' असें म्हणतां येणें शक्य आहे.

याविषयीं बळकट अनुमान मिळतें तें असें की ज्याला 'अमुक कर' असें प्रयोजकानें सांगितलें असेल तेथें त्यानें ती क्रिया केली किंवा न केली हें पाहून तो प्रयोजक आपल्या मनांत ठरवितो की क्रिया करणारा तो स्वतन्त्र आणि न करणारा तो स्वतन्त्र नव्हे. शिवाय एखादे वेळीं हा चाकर मालकानें प्रेरणा केली असतांही तें काम करीत नाहीं, असें जर दृष्टीस पडतें तर त्याला मुख्य स्वातन्त्र्यसुद्धां आहे असें म्हणतां येतें.

(सू.५५, वा.१) प्रेरणा केली असेल त्या ठिकाणीं प्रयोजक हा अस्वतन्त्रालाच प्रेरणा करीत असल्यामुळें हेतुसंज्ञा सिद्ध होत नाहीं; कारण येथें कर्त्याच्या[१] म्हणजे स्वतन्त्राच्या प्रयो-

---

४. हें स्वातन्त्र्य जरी गौण आहे तरी तेंही येथें सूत्रकारांनीं घेतलें आहे असें समजावें.

१. कर्त्याचा जो प्रेरक त्याला हेतुसंज्ञा आणि कर्तृसंज्ञा होते; उदा०—कुर्वन्तं प्रेरयति कारयति देवदत्तः.

जयति ॥ स्वतन्त्रत्वात्सिद्धम् । सिद्धमेतत् । कथम् । स्वतन्त्रत्वात् । स्वतन्त्रमसौ प्रयोजयति ।

**स्वतन्त्रत्वात्सिद्धमिति चेत्स्वतन्त्रपरतन्त्रत्वं विप्रतिषिद्धम् ॥ २ ॥**

यदि स्वतन्त्रो न प्रयोज्योऽथ प्रयोज्यो न स्वतन्त्रः प्रयोज्यः स्वतन्त्रश्चेति विप्रतिषिद्धम् ॥

**उक्तं वा ॥ ३ ॥**

किमुक्तम् । एकं तावदुक्तं न वा स्वातन्त्र्यादितरथा ह्यकुर्वत्यपि कारयतीति स्यादिति।अपरमुक्तं न वा सामान्यकृतत्वाद्धेतुतो ह्यविशिष्टं स्वतन्त्रप्रयोजकत्वादप्रयोजक इति चेन्मुक्तसंशयेन तुल्यमिति॥

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये प्रथमस्याध्यायस्य चतुर्थे पादे तृतीयमाह्निकम् ॥

---

जकाला हेतुसंज्ञा सांगितली आहे, आणि प्रयोजक हा तर स्वतन्त्राला प्रेरणा करूं शकत नाहीं.

स्वतन्त्र असल्यामुळें हें सिद्ध होतें. प्रयोजक हा स्वतन्त्रालाही प्रेरणा करूं शकतो असें म्हणाल तर

(वा.२) जर हा स्वतन्त्र असेल तर त्याला प्रयोजकाकडून प्रेरणा केली जाणार नाहीं. आतां जर प्रेरणा केली जात असेल तर अर्थातच तो स्वतन्त्र नव्हे असा होईल. दुसऱ्याकडून प्रेरणा केली जात आहे आणि स्वतन्त्र आहे या दोन गोष्टी परस्परविरुद्ध आहेत.

(वा.३) हें मागें सांगितलेंच आहे.

काय सांगितलें आहे ?

असें सांगितलें आहे की प्रयोज्याला कर्तृसंज्ञेदाखल वचन करावयास नको.

काय कारण ?

प्रयोज्य हा जी क्रिया करतो त्या कामीं त्याला स्वातन्त्र्य आहेच. नाहीं तर प्रयोज्यानें कांहीं केलें नाहीं तरी त्याला ह्या वचनानें कर्तृसंज्ञा होईल (१।४।५४, वा.२). तेव्हां प्रयोज्य आणि स्वतन्त्र या दोहोंमध्यें विरोध आहे आहे असें समजूं नये. दुसरेंही पण वार्तिककारांनीं (३।१।२६, वा.११।१२) असें सांगितलें आहे की

न वा सामान्यकृतत्वाद्धेतुतो ह्यविशिष्टम्, स्वतन्त्रप्रयोजकत्वादप्रयोजक इति चेन्मुक्तसंशयेन तुल्यम्.

आदित्यमुद्गमयति[२] इत्यादि ठिकाणीं णिच्प्रत्यय होण्यासाठीं वचन करावयास नको; 'हेतुमति च' या सामान्य सूत्रानेंच तशा ठिकाणीं णिच्प्रत्यय करतां येतो; कारण मुख्य असा समजला जाणारा[३] जो हेतु त्यापेक्षां यांत कांहीं फरक नाहीं. आतां आदित्य वगैरे हे स्वतन्त्र असल्यामुळें त्यांच्या प्रयोजकाला प्रयोजक म्हणतां येत नाहीं असें तुझें म्हणणें असेल तर तुझ्या मतीं जें निःसंशय उदाहरण असेल त्यासारखेंच हें आहे. कारण तेथेंही स्थिति अशीच आहे.

याप्रमाणें भगवान पतंजलिऋषीनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्यांतील पहिल्या अध्यायाच्या चौथ्या पादांतील तिसरें आन्हिक समाप्त झालें.

---

२. अरुणोदयानन्तर निर्गतोऽपि देवदत्तः क्रोशचतुष्टयेनादित्यमुद्गमयति म्हणजे हा देवदत्त इतका लवकर चालणारा आहे की झुंझुर्का निघाला तरी हा चार कोसांनंतर सूर्याला उगविवतो, म्हणजे इतक्या थोड्या वेळांत चार कोस जमीन चालतो.

३. भृत्यं गमयति स्वामी, येथें मालक हा चाकराचा प्रयोजक आहे हें निःसंशय सर्वसंमत आहे. येथेंही वस्तुतः विचार केला असतां मालकानें सांगितलें तरी चाकर हा आपला स्वतःचा कांहीं तरी स्वार्थ पाहूनच तें काम करीत असतो. जेथें कांहीं स्वार्थ दिसत नाहीं तेथें तें काम मालकानें सांगितलें तरी तो मुळींच करीत नाहीं. तेव्हां जसा तो मालकाच्या सांगण्यावरच केवळ अवलंबून नाहीं तसा सूर्यही देवदत्ताच्या चार कोस जाण्यावर अवलंबून नाहीं. तात्पर्य, सर्वच ठिकाणीं प्रयोज्य हा आपल्या कर्तव्यांत स्वतन्त्रच असतो.

प्राग्रीश्वरान्निपाताः ॥१।४।५६॥

किमर्थं रेफाधिक ईश्वरशब्दो गृह्यते । रीश्वराद्वीश्वरान्मा भूत्

रीश्वरादित्युच्यते वीश्वरान्मा भूत् । शकि णमुल्कमुलावीश्वरे तोसुन्कसुनौ [३.४.१२;१३] इति ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयत्यनन्तरो य ईश्वरशब्दस्तस्य ग्रहणमिति यदयं कृन्मेजन्तः [१.१.३९] इति कृतो मान्तस्यैजन्तस्य चाव्ययसंज्ञां शास्ति ॥

कृन्मेजन्तः परोऽपि सः ।

परोऽप्येतस्मात्कृन्मान्त एजन्तश्चास्ति तदर्थमेतत्स्यात् ॥ यत्तर्ह्यव्ययीभावस्याव्ययसंज्ञां शास्ति तज्ज्ञापयत्याचार्योऽनन्तरो य ईश्वरशब्दस्तस्य ग्रहणमिति ॥

समासेष्वव्ययीभावः

समासस्यैतज्ज्ञापकं स्यात् । अव्ययीभाव एव समासोऽव्ययसंज्ञो भवति नान्य इति ॥ एवं तर्हि लोकत एतत्सिद्धम् । तद्यथा । लोक आ वनान्तादो-

---

(सू.५६) 'अधिरीश्वरे' या सूत्रांतील ईश्वरशब्द रेफासहित येथें अवधि म्हणून धरला आहे, तेथें रेफासहित धरण्याचें काय प्रयोजन ?

रीश्वरशब्द येथें अवधि म्हणून धरला आहे त्याचें कारण 'शकि णमुल्कमुलावीश्वरे तोसुन् कसुनौ' (३।४।१२।१३) येथील वीश्वरशब्द अवधि म्हणून न समजला जावा.

हें प्रयोजन नाहीं. कारण ज्यापेक्षां हा आचार्य 'कृन्मेजन्तः' (१।१।३९) या सूत्रानें मकारान्त आणि एजन्त अशा कृत्संज्ञक प्रत्ययांना अव्ययसंज्ञेचें विधान करीत आहे त्यापेक्षां तो असें सुचवीत आहे की जवळचाच ईश्वर शब्द येथें अवधि म्हणून गृहीत धरला आहे.

त्याही ईश्वरशब्दाच्या पुढें असलेले तवैकेन् इत्यादि एजन्त कृत्प्रत्यय आणि खमुञ्, णमुल् वगैरे मकारान्त कृप्रत्यय आहेत त्यांना अव्ययसंज्ञेच्या विधानासाठीं 'कृन्मेजन्तः' हें सूत्र चरितार्थ आहे, म्हणून व्यर्थ होत नाहीं.

तर मग हा आचार्य ज्यापेक्षां 'अव्ययीभावश्च' (१।१।४१) या सूत्रानें अव्ययीभावसमासाला अव्ययसंज्ञा सांगत आहे त्यापेक्षां तो असें सुचवीत आहे की 'अधिरीश्वरे' येथीलच ईश्वरशब्द येथें अवधि म्हणून गृहीत धरला आहे.

व्याप्तिन्यायानें 'ईश्वरे तोसुन्' येथील ईश्वरशब्द अवधि म्हणून धरला असतां अव्ययीभावादि सर्व समासांना निपातसंज्ञेच्या द्वारानें अव्ययसंज्ञा प्राप्त होते; तेव्हां 'समासामध्यें फक्त अव्ययीभावालाच अव्ययसंज्ञा होते, इतर समासाला होत नाहीं, असा नियम 'अव्ययीभावश्च' ह्या सूत्रानें केला जाईल. तेव्हां तें व्यर्थ होऊं शकत नाहीं.

असें आहे तर जवळचाच ईश्वरशब्द अवधि म्हणून गृहीत धरावयाचा ही गोष्ट लोकव्यव-

---

१. येथून 'अधिरीश्वरे' (१।४।९७) या सूत्रापर्यन्त प्रत्येक सूत्रामध्यें निपाताः हें पद अनुवृत्त होतें.

२. जर येथें अवधि म्हणून गृहीत धरलेला ईश्वरशब्द 'ईश्वरे तो सुन्' या सूत्रांतील घेतला तर णमुल्, तुमुन् हे मकारान्त कृत्प्रत्यय आणि 'से' वगैरे एजन्त कृत्प्रत्यय हे निपाताधिकारामध्यें सांपडत असल्यामुळें त्यांना निपातसंज्ञा होऊन 'स्वरादिनिपातम्' (१।१।३७) या सूत्रानें अव्ययसंज्ञा होईल आणि 'कृन्मेजन्तः' हें सूत्र व्यर्थ होईल.

३. जर येथें अवधि म्हणून गृहीत धरलेला ईश्वर शब्द 'ईश्वरे तोसुन्' या सूत्रांतील घेतला तर अव्ययीभावसंज्ञा सांगणारीं सूत्रें निपाताधिकारामध्यें सांपडत असल्यामुळें अव्ययीभावांना निपातसंज्ञा होऊन स्वरादि निपातम् या सूत्रानें अव्ययसंज्ञा होईल, आणि 'अव्ययीभावश्च' हें सूत्र व्यर्थ होईल,

दकान्तात्प्रियं पान्थमनुव्रजेदिति य एव प्रथमो वनान्त उदकान्तश्च ततोऽनुव्रजति ॥

लौकिकं चातिवर्तते ॥

द्वितीयं च तृतीयं च वनान्तमुदकान्तं वानुव्रजति ॥ तस्माद्रेफाधिक ईश्वरशब्दो ग्रहीतव्यः ॥

अथ प्राग्वचनं किमर्थम् ।

**प्राग्वचनं संज्ञानिवृत्त्यर्थम् ॥ १ ॥**

प्राग्वचनं क्रियते निपातसंज्ञाया अनिवृत्तिर्यथा स्यात्। अक्रियमाणे हि प्राग्वचनेऽनवकाशा गत्युपसर्गकर्मप्रवचनीयसंज्ञा निपातसंज्ञां बाधेरन् । ता मा बाधिषतेति प्राग्वचनं क्रियते ॥ अथ क्रियमाणेऽपि प्राग्वचने यावतानवकाशा एताः संज्ञाः कस्मादेव न बाधन्ते । क्रियमाणे हि प्राग्वचने सत्यां निपातसंज्ञायामेता अवयवसंज्ञा आरभ्यन्ते तत्र वचनात्समावेशो भवति ॥

**चादयोऽसत्त्वे[1] ॥१।४।५७॥**

अयं सत्त्वशब्दोऽस्त्येव द्रव्यपदार्थकः । तद्यथा । सत्त्वमयं ब्राह्मणः ।

---

हारावरूनच सिद्ध होत आहे; जसें— लोकांमध्यें इष्ट व मान्य असा पाहुणा ग्रामान्तराला जावयास निघाला असतां त्याला अरण्यापर्यंत किंवा उदकापर्यंत पोचवावयास जावें असें सांगितलें असतां तेथें प्रथमतःच जें अरण्य किंवा जो उदकप्रदेश प्राप्त होतो त्यापर्यंतच पोचवावयास जातात असा लोकन्याय आहे.

पण या लोकन्यायाचें लोकच उल्लंघन करतांना दृष्टीस पडतात. स्नेहातिशय असेल तेथें द्वितीय किंवा तृतीय जें अरण्य किंवा उदकान्त तेथपर्यंतही पोचवावयास लोक जातात. त्याप्रमाणें येथेंही दुसऱ्या म्हणजे 'ईश्वरे तोसुन्' येथील ईश्वरशब्दापर्यंतही लोक मजल मारतील म्हणून येथें रेफसहित असा ईश्वरशब्द उच्चारला आहे.

येथें आतां प्राक् हा शब्द घातला आहे तो कशासाठीं ?

(वा.१) निपातसंज्ञेची निवृत्ति न व्हावी म्हणून प्राक् हा शब्द घातला आहे. तो न घातला तर अनवकाश असल्यामुळें गति, उपसर्ग आणि निपात या संज्ञा निपातसंज्ञेचा बाध करतील. त्यांनीं निपातसंज्ञेचा बाध न करावा यासाठीं प्राक् हा शब्द घातला आहे.

आतां प्राक् हा शब्द घातला तरी देखील अनवकाश अशा गति वगैरे संज्ञा काय कारणानें बरें निपातसंज्ञेचा बाध करणार नाहींत ?

प्राक्शब्द घातला असतां पूर्वी निपातसंज्ञा करून नंतर त्या त्या शब्दस्वरूपांना त्या त्या गति वगैरे संज्ञा सांगितल्या असल्यामुळें त्या विधानाचे जोरावर गति वगैरे संज्ञांबरोबर निपातसंज्ञेचा समावेश होईल.

(सू.५७) सत्त्व हा शब्द द्रव्य या अर्थाला दाखविणारा आहे,[2] जसें— सत्त्वमयं ब्राह्मणः, सत्त्वमियं ब्राह्मणी. क्रिया याही अर्थाला सत्त्व-

---

४. एकंदरींत अधिरीश्वरे हा प्रथम ईश्वरशब्दच येथें अवधि म्हणून घ्यावा अशाविषयीं कांहीं प्रमाण मिळत नाहीं.

५. गति वगैरे संज्ञा सांगणाऱ्या सूत्रांमध्यें या प्रकृत सूत्रांतून निपातशब्दाबरोबर प्राक्शब्दाचीही अनुवृत्ति करावयाची. त्यामुळें ते ते शब्द प्रथमतः निपातसंज्ञक होतात आणि नंतर त्यांना गति वगैरे संज्ञा होतात, असा त्या त्या सूत्रांचा अर्थ होतो.

१. लिंग आणि संख्या ज्याला लागतात त्याला द्रव्य म्हणतात. सत्त्व म्हणजे द्रव्य होय. त्याशिवाय निराळ्या अर्थाचें प्रतिपादन करणारे असे जे च,वा, ह, अह वगैरे शब्द त्यांना निपातसंज्ञा होते.

२. सीदन्ति अस्मिन् जात्यादयः या व्युत्पत्तीवरून जाति, गुण, क्रिया, लिंग, संख्या, यांच्या आधारभूत पदार्थाला सत्त्वशब्द हा दाखवितो.

सत्त्वमियं ब्राह्मणीति । अस्ति क्रियापदार्थकः । सद्भावः सत्त्वमिति । कस्येदं ग्रहणम् । द्रव्यपदार्थकस्य । कुत एतत् । एवं हि कृत्वा विधिश्च सिद्धो भवति प्रतिषेधश्च ॥ किं पुनरयं पर्युदासः । यदन्यत्सत्त्ववचनादिति । आहोस्वित्प्रसज्यायं प्रतिषेधः । सत्त्ववचने नेति । किं चातः । यदि पर्युदासो विप्र इत्यत्रापि प्राप्नोति । क्रियाद्रव्यवचनोऽयं संघातो द्रव्यादन्यश्च विधिनाश्रीयते । अस्ति च प्रादिभिः सामान्यमिति कृत्वा तदन्तविधिना निपातसंज्ञा प्राप्नोति ॥ अथ प्रसज्यप्रतिषेधो न दोषो भवति ॥ यथा न दोषस्तथास्तु ॥

## प्रादय उपसर्गाः क्रियायोगे[१] ॥

---

शब्द दाखवितोः सतः भावः सत्त्वम् म्ह. सत्ता. तेव्हां यांपैकीं कोणच्या अर्थाच्या सत्त्वशब्दाचें येथें ग्रहण केलें आहे ?

द्रव्य या अर्थाला दाखविणाऱ्या अशा सत्त्वशब्दाचें येथें ग्रहण केलें आहे.

हें कशावरून ?

द्रव्य या अर्थाचा सत्त्वशब्द गृहीत धरला असतां निपातसंज्ञेचा विधि आणि निषेध हे इष्ट स्थलीं सिद्ध होतात[३].

पण काय हो, येथें सत्त्वाहून अन्य अर्थाचा वाचक अशा अर्थाचा 'असत्त्वे' हा पर्युदास समजावयाचा किंवा सत्त्ववाचक अशा 'च' वगैरेंना निपातसंज्ञा होत नाहीं, अशा अर्थाचा प्रसज्यप्रतिषेध समजावयाचा ?

यांत फरक काय बरें होतो ?

जर पर्युदास गृहीत धरला तर 'विप्रः' येथें निपातसंज्ञा होऊं लागेल. कारण 'प्र[४]' हा प्रकृतिप्रत्ययसमुदाय क्रिया आणि द्रव्य या उभयतांचा वाचक आहे. निपातसंज्ञा होण्याला तर फक्त द्रव्याहून कांहीं तरी निराळ्या अर्थाची जरूरी आहे. आणि प्रादिगणामध्यें आरंभीं जो प्रशब्द उच्चारला आहे तीच आनुपूर्वी येथें दिसत आहे. तेव्हां तदन्तविधीच्या[५] जोरावर येथें निपातसंज्ञा प्राप्त होत आहे. आतां जर द्रव्यार्थक चादिकांना निपात संज्ञा होत नाहीं अशा अर्थाचा 'असत्त्वे' हा प्रसज्यप्रतिषेध गृहीत धरला तर हा पूर्वोक्त दोष येत नाहीं.

तर मग ज्या रीतीनें दोष येणार नाहीं तीच रीत असूं दे.

---

३. च, वा, इत्यादि अद्रव्यार्थक शब्दांना निपातसंज्ञा सिद्ध होते व द्रव्यार्थक पशु वगैरे शब्दांना निपातसंज्ञेची व्यावृत्तिही सिद्ध होते. जर क्रियार्थक सत्त्व शब्द गृहीत धरला तर 'असत्त्वे' हा प्रतिषेध व्यर्थ होईल. कारण चादिकांमध्यें क्रियापदार्थक असा एकही शब्द पठित नाहीं.

४. विशेषेण प्रातीति विप्रः म्हणजे विशेषतः श्रौतकर्माचें पूरण करणारा. येथें वि या उपसर्गाच्या पुढें प्राधातूहून कप्रत्यय (३।१।१३६) व आकाराचा लोप (६।४।६४) झाला आहे. धातूपैकीं फक्त दोन व्यंजनें आणि प्रत्ययांपैकीं अकार मिळून 'प्र' हा समुदाय कृद्वृत्तीच्या जोरावर पूरण करणें ही क्रिया आणि तिचा कर्ता मिळून दोन अर्थांला दाखवितो. आतां कर्ता या द्रव्याचा वाचक जरी प्रशब्द आहे तरी पर्युदासपक्षीं 'द्रव्य अर्थ नसावा' असें म्हणतां येत नाहीं; फक्त द्रव्याहून अन्य अर्थ असावा, तेथें तो अन्य अर्थ असून आणखी त्याला द्रव्य हा अर्थ असला तरी हरकत नाहीं. यामुळें पर्युदासपक्षीं दोष येत आहे.

५. आतां जर येथें विशेष्य नसल्यामुळें तदन्तविधि (१।१।७२) होत नाहीं असें म्हणाल तर अव्ययसंज्ञा सांगणाऱ्या सूत्रामध्यें तदन्तविधि असल्यामुळें त्या जोरावर 'प्र' याला निपातसंज्ञा होऊं लागेल; कारण त्या निपातसंज्ञेमुळें विप्र याला अव्ययसंज्ञा होऊन त्याच्या पुढील सुप्प्रत्ययाचा लुक् (२।४।८२) होऊं लागेल. असें 'प्र' याला निपातसंज्ञा करण्याचें फल मिळणार आहे.

१. निपातसंज्ञा झालेल्या प्रादिगणांतील शब्दांना क्रियायोग असतां उपसर्गसंज्ञा होते, उदा०—प्रणयति. येथें 'उपसर्गादसमासे' (८।४।१४) या सूत्रानें णत्व होतें.

## १ । ४ । ५८-५९ ॥

### प्रादय इति योगविभागः ॥ १ ॥

प्रादय इति योगविभागः कर्तव्यः । प्रादयोऽसत्त्ववचना निपातसंज्ञा भवन्ति । तत उपसर्गाः क्रियायोग इति ॥ किमर्थो योगविभागः ।

### निपातसंज्ञार्थः ॥ २ ॥

निपातसंज्ञा यथा स्यात् ॥

### एकयोगे हि निपातसंज्ञाभावः ॥ ३ ॥

एकयोगे हि सति निपातसंज्ञाया अभावः स्यात् । यस्मिन्नेव विशेषे गत्युपसर्गकर्मप्रवचनीयसंज्ञास्तस्मिन्नेव विशेषे निपातसंज्ञा स्यात् ॥

### मरुच्छब्दस्योपसंख्यानम् ॥ ४ ॥

मरुच्छब्दस्योपसंख्यानं कर्तव्यम् । मरुद्दत्तो मरुत्तः । अच उपसर्गात्तः [७.४.४७.] इति तत्वं यथा स्यात् ॥

### श्रच्छब्दस्योपसंख्यानम् ॥ ५ ॥

श्रच्छब्दस्योपसंख्यानं कर्तव्यम् । श्रद्धा ॥

## गतिश्च ॥ १ । ४ । ६० ॥

### कारिकाशब्दस्य ॥ १ ॥

कारिकाशब्दस्योपसंख्यानं कर्तव्यम् । कारिकाकृत्य ॥

### पुनश्चनसौ छन्दसि ॥ २ ॥

पुनश्चनसौ छन्दसि गतिसंज्ञौ भवत इति वक्तव्यम् । पुनरुत्स्यूतं वासो देयम् । पुनर्निष्कृतो रथः । उशिग्दूतश्चनोहितः ॥

### गत्युपसर्गसंज्ञाः क्रियायोगे यत्क्रियायुक्तास्तं प्रतीति वचनम् ॥ ३ ॥

गत्युपसर्गसंज्ञाः क्रियायोगे यत्क्रिया-

---

(सू.५८-५९, वा.१) येथें 'प्रादयः' असें पृथक् सूत्र करावें. द्रव्यार्थक नव्हेत असे जे प्रादिगणांतील शब्द त्यांना निपातसंज्ञा होते; त्यानंतर 'उपसर्गाः क्रियायोगे' असें दुसरें सूत्र करावें.

हा योगविभाग कशासाठीं केला जात आहे ?

(वा. २) प्रादिकांना निपातसंज्ञा व्हावी म्हणून.

(वा.३) दोन्ही मिळून एक सूत्र केलें तर क्रियायोग नसल्यावेळीं प्रादिकांना निपातसंज्ञा होणार नाहीं, तर जे जे विशेषनिमित्त धरून गति, उपसर्ग आणि कर्मप्रवचनीय या संज्ञा सांगितल्या आहेत त्या ठिकाणींच फक्त निपातसंज्ञा होईल.

(वा.४) मरुत् या शब्दाला उपसर्गसंज्ञा होते असें म्हणावें. मरुद्दत्तो मरुत्तः येथें 'अच उपसर्गात्तः' (७।४।४७) या सूत्रानें मरुत्शब्दापुढील दाधातूच्या अचाला तकारादेश व्हावा म्हणून.[२]

(वा.५) श्रत् या शब्दाला उपसर्गसंज्ञा[३] होते असें म्हणावें, जसें– श्रद्धा.

(सू.६०, वा.१) कारिका या शब्दाला[१] गतिसंज्ञा होते असें म्हणावें, जसें–कारिकाकृत्य.[२]

(वा.२) पुनर् आणि चनस् या शब्दांना गतिसंज्ञा होते असें म्हणावें, जसें– पुनरुत्स्यूतं[३] वासो देयम्, पुनर्निष्कृतो रथः, उशिग्दूतश्चनोहितः.

(वा.३) क्रियायोग असतांना सांगितलेली गतिसंज्ञा आणि उपसर्गसंज्ञा ही ज्या क्रियेशीं

---

२. उपसर्गसंज्ञाविधानाचे जोरावर मरुत्शब्द अजन्त नसतांही तकारादेश प्रवृत्त होतो.

३. येथें श्रत्शब्दाला उपसर्गसंज्ञा झाली म्हणूनच धाधातूहून अङ्प्रत्यय (३।३।१०६) झाला आहे.

१. पूर्वीच्या सूत्रानें ज्यांना उपसर्गसंज्ञा सांगितली त्यांना आणखी गतिसंज्ञाही होते.

२. येथें कारिकाशब्दाला गतिसंज्ञा झाल्यामुळें त्याचा क्त्वा याच्याशीं समास (२।२।१८) होऊन ल्यप्प्रत्यय (७।१।३७) झाला आहे.

३. या तिन्ही उदाहरणांमध्यें गतिसंज्ञेमुळें समास झाला. चनस् याला निपातसंज्ञेमुळें आद्युदात्त (फि. सू. ४।१२) झाला व गतिसंज्ञेमुळें तोच

युक्तास्तं प्रति गत्युपसर्गसंज्ञा भवन्तीति वक्तव्यम् ॥ किं प्रयोजनम् ।

**प्रयोजनं घञ्षत्वणत्वे ॥ ४ ॥**

घञ् । प्रवृद्धो भावः प्रभावः । अनुपसर्गे इति प्रतिषेधो मा भूत् ॥ षत्वम् । विगताः सेचका अस्माद्ग्रामाद्विसेचको ग्रामः । उपसर्गादिति षत्वं मा भूत् ॥ णत्वम् । प्रगता नायका अस्माद्ग्रामात्प्रनायको ग्रामः । उपसर्गादिति णत्वं मा भूत् ॥

**वृद्धिविधौ च धातुग्रहणानर्थक्यम् ॥५**

वृद्धिविधौ च धातुग्रहणमनर्थकम् । उपसर्गादृति धातौ [६.१.९१] इति । तत्र धातुग्रहणस्यैतत्प्रयोजनमिह मा भूत् प्रर्षभं वनमिति । क्रियमाणे चापि धातुग्रहणे प्रर्च्छेक इत्यत्र प्राप्नोति । यत्क्रियायुक्तास्तं प्रतीति वचनान्न भवति ॥

वद्विधिनस्भावाबीत्त्वस्वाङ्गादिस्वरणत्वेषु दोषो भवति ॥ वद्विधि । यदुद्वतो निवतो यासि बप्सत् । वद्विधि ॥ नस्भाव । प्रणसं मुखम् । उन्नसं मुखम् । नस्भाव ॥ अबीत्त्व । प्रेपम् परेपम् । अबीत्त्व ॥ स्वाङ्गादिस्वर । प्रस्फिक् प्रोदरः । स्वाङ्गादिस्वर ॥ णत्व । प्र णः शूद्रः प्र ण आचार्यः प्र णो राजा प्र णो वृत्रहा ॥ उपसर्गादित्येते विधयो न प्राप्नुवन्ति ॥

---

योग असेल त्याच क्रियेमुळें ती संज्ञा आहे असें समजावें.

याचा काय उपयोग ?

(वा.४) घञ्प्रत्ययासंबंधानें याचा उपयोग होतो, तसेंच षत्वणत्वासंबंधानेंही याचा उपयोग होतो; जसें— प्रवृद्धो भावः प्रभावः; येथें प्र हा उपसर्ग भवनक्रियेचा नसल्यामुळें भूधातूहून घञ्प्रत्यय कर्तव्य असतांना 'अनुपसर्गे' (३।४।२४) हा निषेध होत नाहीं. तसेंच विगताः सेचका अस्मात् विसेचको ग्रामः येथें वि हा उपसर्ग सेचनक्रियेचा नसल्यामुळें 'उपसर्गात्सुनोति॰' (८।३।६५) यानें सिच्धातूच्या सकाराला षत्व होत नाहीं. तसेंच प्रगता नायका अस्मात् ग्रामात् प्रनायको ग्रामः येथें प्र हा उपसर्ग नयनक्रियेचा नसल्यामुळें 'उपसर्गादसमासेऽपि' (८।४।१४) यानें णत्व होत नाहीं.

(वा.५) 'तसेंच 'उपसर्गादृति धातौ' (६।१।९१) या वृद्धिविधायक सूत्रामध्यें धातुशब्द घातला तो निष्फळ होत आहे. तेथें धातुशब्द घालण्याचा उपयोग प्रगता ऋषभा अस्मात् प्रर्षभं वनम् येथें वृद्धि न व्हावी. शिवाय धातुशब्द घातला असतांही प्रगता ऋच्छका अस्मात् प्रर्छको ग्रामः येथें ऋकारादि धातु पुढें असल्यामुळें वृद्धि प्राप्त होते; ती ज्या क्रियेशीं योग असेल त्याच क्रियेचे ते उपसर्ग समजले जातात, या नियमामुळें होत नाहीं.

आतां हा नियम मानिला असतां वत्प्रत्यय, नस्आदेश, अप्शब्दाला ईत्व, स्वाङ्गादि स्वर आणि णत्व इतक्या ठिकाणीं दोष येतो. तो असाः— यदुद्वतो निवतो यासि बप्सन् येथें उत्, नि यांहून वत्प्रत्यय, प्रणसं मुखम्, उन्नसं मुखम्, येथें नासिकाशब्दाला नस्आदेश, प्रेपं परेपं येथें अप्शब्दाला ईत्व, प्रस्फिक्, प्रोदरः, येथें स्वाङ्गादि स्वर, आणि प्र णः शूद्रः प्र ण आचार्यः प्र णो राजा, प्र णो वृत्रहा येथें णत्व, हे विधि उपसर्गाच्या निमित्तानें सांगितले आहेत ते होणार नाहींत.

---

प्रकृतिस्वर (६।२।४९) कायम राहिला.

४. हा उपयोग धातुग्रहणाचा आतां होत नाहीं; कारण प्र हा ऋषभ यांचा उपसर्ग नसल्यामुळें वृद्धि होणारच नाहीं.

५. कारण 'उपसर्गाच्छन्दसि धात्वर्थे' (५।१।११८), उपसर्गाच्च (५।४।११९), द्व्यन्तरुपसर्गेभ्योऽप ईत् (६।३।९७), उपसर्गात्स्वाङ्गं ध्रुवमपर्शु (६।२।१७७) आणि उपसर्गाद्बहुलम् (८।४।२८)

**वद्विधिनस्भावाबीत्त्वस्वाङ्गादिस्वरणत्वेषु वचनप्रामाण्यात्सिद्धम् ॥६॥**

अनवकाशा एते विधयस्ते वचनप्रामाण्याद्भविष्यन्ति ॥

**सुदुरोः प्रतिषेधो नुम्विधितत्वषत्वणत्वेषु ॥ ७ ॥**

सुदुरोः प्रतिषेधो नुम्विधितत्वषत्वणत्वेषु वक्तव्यः ॥ नुम्विधि । सुलभम् दुर्लभम् । उपसर्गादिति नुम्मा भूदिति । न सुदुर्भ्यां केवलाभ्याम् [७.१.६८] इत्येतन्न वक्तव्यं भवति ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । क्रियत एतन्न्यास एव ॥ तत्वम् । सुदत्तम् । अच उपसर्गात्तः [७.४.४७] इति तत्वं मा भूदिति ॥ षत्वम् । सुसिक्तं घटशतेन । सुस्तुतं श्लोकशतेन । उपसर्गादिति षत्वं मा भूदिति । सुः पूजायाम् [१.४.९४] इत्येतन्न वक्तव्यं भवति ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । क्रियत एतन्न्यास एव ॥ णत्वम् । दुर्नयम् दुर्नीतमिति । उपसर्गादिति णत्वं मा भूदिति ॥

---

(वा.६) वत्प्रत्यय, नस्आदेश, अप्शब्दाला ईत्त्व, स्वाङ्गादि स्वर आणि णत्व हे विधि अनवकाश होत असल्यामुळें त्यांच्या जोरावर तीं कार्यें तेथें होतील. तेथें त्यांना पूर्वी सांगितल्याप्रमाणें उपसर्गसंज्ञा नसली तरी चालेल.

(वा.७) नुमागम, तकारादेश, षत्व आणि णत्व हे विधि कर्तव्य असतांना सु आणि दुर् या उभयतांना उपसर्गसंज्ञा होत नाहीं असें म्हणावें. नुम्विधीचें उदाहरणः सुलभं दुर्लभम्. येथें 'उपर्गात्खल्घञोः' (७।१।६७) यानें नुमागम न झाला पाहिजे. तेव्हां अर्थातच 'न सुदुर्भ्यां केवलाभ्याम्' (७।१।६८) हें सूत्र करावयास नको.

हें प्रयोजन होत नाहीं, कारण 'न सुदुर्भ्याम्' या सूत्रामध्येंच ती व्यवस्था केली आहे.

तकारादेशाचें उदाहरणः– सुदत्तम्. येथें सुशब्दाला उपसर्गसंज्ञेचा निषेध केल्यामुळें 'अच उपसर्गात्तः' (७।४।४७) यानें तकारादेश होत नाहीं.

षत्वाचें उदाहरणः— सुसिक्तं घटशतेन, सुस्तुतं श्लोकशतेन. येथें सुशब्दाला उपसर्गसंज्ञेचा निषेध केल्यामुळें 'उपसर्गात्सुनोति०' (८।३।६५) यानें षत्व होत नाहीं. अर्थात् सुः पूजायाम्' हें सूत्र करावयास नको.

हें प्रयोजन होऊं शकत नाहीं, कारण 'सुः पूजायाम्' या सूत्रामध्येंच व्यवस्था केली आहे.

णत्वाचें उदाहरण– दुर्नयं, दुर्नीतम्. येथें दुर्शब्दाला उपसर्गसंज्ञेचा निषेध केल्यामुळें 'उपसर्गादसमासे' (८।४।१४) यानें णत्व होत

---

ह्या सूत्रांमध्यें उपसर्गांमुळें ज्याला कार्य सांगितलें आहे त्यांत क्रियावाचक कोणी दृष्टीस पडत नाहीं, म्हणून तेथें प्र वगैरे हे उपसर्ग समजले जाणार नाहींत.

६. सु आणि दुर् यांना उपसर्गसंज्ञेचा निषेध करून 'न सुदुर्भ्याम्' हें सूत्र केलें नाहीं तर अतिसुलम्भं येथें नुम् होणार नाहीं, आणि सूत्र ठेवलें तर उपसर्गान्तरानें रहित अशा उपसर्गापुढील लभ्धातूला नुमागमाचा निषेध असल्यामुळें अतिसुलम्भं येथें नुमागम होतो. म्हणून सूत्र ठेवून वार्तिकाचेंच प्रत्याख्यान करणें उचित होय.

७. सुशब्दपूर्वक दाधातूच्या पुढें क्तप्रत्यय 'दो दद्घोः' (७।४।४६) यानें दाधातूला दद् आदेश.

८. त्या सूत्रानें सांगितलेल्या कर्मप्रवचनीयसंज्ञेनें उपसर्गसंज्ञेचा बाध होतो.

९. वार्तिकानें उपसर्गसंज्ञेचा निषेध केला तर तो पूजा हा अर्थ नसेल त्या ठिकाणींही प्रवृत्त होईल, आणि 'सुषिक्तं किं तव' या निन्दाद्योतक वाक्यामध्येंही उपसर्गसंज्ञेचा निषेध होऊन षत्व होणार नाहीं; तेव्हां सूत्र करणेंच बरें.

१०. येथें नीधातूहून अच्प्रत्यय (३।३।५६) आणि क्तप्रत्यय (३।३।११४) झाला आहे.

**ऊर्यादिच्विडाचश्च ॥१।४।६१॥**

कृभ्वस्तियोग इति वक्तव्यम् । इहैव यथा स्यात् । ऊरीकृत्य । ऊरीभूय । इह मा भूत् । ऊरी पक्त्वा ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । क्रियायोग इत्यनुवर्तते न चान्यया क्रिययोर्यादिच्विडाचां योगोऽस्ति।

**अनुकरणं चानितिपरम् ॥१।४।६२**

कथमिदं विज्ञायते । इतेः परमितिपरम् न इतिपरमानितिपरमिति । आहोस्विदितिः परो यस्मात्तदिदमितिपरम् न इतिपरमनितिपरमिति ॥ किं चातः । यदि विज्ञायत इतेः परमितिपरम् न इतिपरमनितिपरमिति खाडिति कृत्वा निरष्ठीवदित्यत्र प्राप्नोति । अथ विज्ञायत इतिः परो यस्मात्तदिदमितिपरम् न इतिपरमनितिपरमिति श्रौषड्वौषडिति कृत्वा निरष्ठीवदित्यत्र प्राप्नोति ॥ अस्तु तावदितिः परो यस्मात्तदिदमितिपरम् न इतिपरमनितिपरमिति । ननु चोक्तं श्रौषड्वौषडिति कृत्वा निरष्ठीवदित्यत्र प्राप्नोतीति । नैष

---

नाहीं.

(सू.६१) कृभ्वस्तियोगे असें म्हणावें म्हणजे कृ, भू आणि अस् या धातूंचा योग असतांनाच हें सूत्र प्रवृत्त होईल. कारण ऊरीकृत्य, ऊरीभूय येथेंच म्हणजे कृ, भू यांचा योग असतांना गतिसंज्ञा झाली पाहिजे, आणि ऊरी पक्त्वा येथें गतिसंज्ञा न झाली पाहिजे.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण क्रियायोगे हें पद अनुवृत्त होत आहे, आणि ऊर्यादिक शब्दांना व च्विप्रत्ययान्त आणि डाच्प्रत्ययान्त शब्दांना कृभ्वस्ति यांहून अन्य क्रियेशीं योग तर दिसतच नाहीं.

(सू.६२) इतेः परम् इतिपरम्, न इतिपरम् अनितिपरम् असा समास सोडवावयाचा किंवा इतिः परो यस्मात्तत् इतिपरम्, न इतिपरम् अनितिपरम् असा सोडवावयाचा ?

या दोन अर्थांमध्यें फरक काय ?

जर इतेः परम् इतिपरम्, न इतिपरम् अनितिपरम् असा समास सोडविला तर खाडिति कृत्वा निरष्ठीवत् येथें इतिशब्दाच्या मागील खाट् या अनुकरणाला गतिसंज्ञा होऊं लागेल. आतां जर इतिः परो यस्मात्तदितिपरम् न इतिपरम् अनितिपरम् असा समास सोडविला गेला तर 'श्रौषड्वौषडिति कृत्वा निरष्ठीवत्' येथें श्रौषट्शब्दाला गतिसंज्ञा होऊं लागेल.

तर मग इतिः परो यस्मात्तत् इतिपरम् न इतिपरम् अनितिपरम् असेंच असूं दे. पण 'श्रौषड्वौषडिति कृत्वा निरष्ठीवत्' येथें श्रौषट्शब्दाला गतिसंज्ञा होऊं लागेल असा दोष दाखविला आहे ना ?

हा दोष येत नाहीं. याला येथें अगोदर असें विचारावें की 'उपोद्धरति' येथें 'ते प्राग्धातोः' या नियमानुसार अनेक गतिसंज्ञकांचा प्रयोग

---

१. ऊर्यादिगणपठित शब्द, च्विप्रत्ययान्त शब्द, आणि डाच्प्रत्ययान्त शब्द यांना क्रियायोग असतांना निपातसंज्ञा होते व गतिसंज्ञाही होते.

२. च्वि आणि डाच् हे प्रत्यय तर कृभ्वस्तियोग असतांनाच विहित आहेत आणि ऊर्यादि शब्दांचाही स्वभावतः कृभ्वस्तियोग असतांच प्रयोग केला जातो. ऊरी पक्त्वा हें उदाहरण कल्पित आहे; प्रयोगांत आलेलें नव्हे.

१. ज्याच्यापुढें इतिशब्द नाहीं अशा अनुकरणशब्दाला क्रियायोग असतांना निपातसंज्ञा होते व गतिसंज्ञाही होते.

२. गतिसंज्ञा झाली असतां गतिसमास (२।२।१८) होईल व 'ते प्राग्धातोः' (१।४।८०) या नियमाला अनुसरून धातूच्या अव्यवहित मागें गतिसंज्ञकाचा प्रयोग करावयाचा असल्यामुळें खाडिति कृत्वा असें वाक्यच होणार नाहीं. शिवाय इति खाट्कृत्य येथें इतिशब्दाच्या पुढील अनुकरणाला गतिसंज्ञेचा निषेध होऊं लागेल.

३. कारण इतिशब्द हा वौषट् याच्यापुढें आहे, श्रौषट् याच्यापुढें नाहीं.

दोषः । इदं तावदयं प्रष्टव्यः । अथेह ते प्राग्धातोः [१.४.८०] इति कथं गतिमात्रस्य पूर्वप्रयोगो भवति । उपोद्धरतीति । गत्याकृतिः प्रतिनिर्दिश्यते । इहापि तर्ह्यनुकरणाकृतिर्निर्दिश्यते ॥

किमर्थमिदमुच्यते ।

**अनुकरणस्येतिकरणपरत्वप्रतिषेधोऽनिष्टशब्दनिवृत्त्यर्थः ॥ १ ॥**

अनुकरणस्येतिकरणपरत्वप्रतिषेध उच्यते । किं प्रयोजनम् । अनिष्टशब्दनिवृत्त्यर्थः । अनिष्टशब्दता मा भूदिति । इदं विचारयिष्यति तेप्राग्धातुवचनं प्रयोगनियमार्थं वा स्यात्संज्ञानियमार्थं वेति । तद्यदा प्रयोगनियमार्थं तदानिष्टशब्दनिवृत्त्यर्थमिदं वक्तव्यम् । यदा हि संज्ञानियमार्थं तदा न दोषो भवति ॥

## आदरानादरयोः सदसती ॥१।४।६३॥

इदमतिबहु क्रियत आदरे अनादरे सत् असदिति । आदरे सदित्येव सिद्धम् ।

---

धातूच्या मागें कसा बरें करतां येतो ?

आतां तो जर असें म्हणेल की 'ते प्राग्धातोः', येथें गतिशब्दानें गतित्वं या जातीचा निर्देश केला आहे, तर मग येथेंही अनुकरणशब्दानें अनुकरणत्वजातीचा निर्देश केला आहे असें समजतां येईल.

आतां येथें अनितिपरम् असें म्हणून जी अनुकरणाला गतिसंज्ञा सांगितली आहे ती कशासाठीं ?

(वा.१) येथें अनुकरणाला इतिशब्द पुढें असतांना गतिसंज्ञेचा प्रतिषेध केला आहे.

त्याचा काय उपयोग ?

भलताच प्रयोग न व्हावा हा त्याचा उपयोग आहे. पुढें असा विचार करण्यांत येणार आहे की ते प्राग्धातोः (१।४।८०) या सूत्रानें 'गतिसंज्ञक शब्दांचा आणि उपसर्गसंज्ञक शब्दांचा धातूच्या पूर्वींच प्रयोग करावा' असा प्रयोगनियम केला आहे किंवा गतिसंज्ञक शब्द आणि उपसर्गसंज्ञक शब्द हे धातूच्या पूर्वी उच्चारले असतील तरच त्यांना त्या संज्ञा होतात असा संज्ञानियम केला आहे. त्यांत जेव्हां प्रयोगनियमार्थ तें सूत्र केलें असें गृहीत धरलें जाईल तेव्हां भलता प्रयोग न व्हावा म्हणून येथें अनितिपरम् असें म्हटलें पाहिजे. आतां संज्ञानियमार्थ तें सूत्र केलें आहे असें गृहीत धरलें तर येथें मुळींच दोष येत नाहीं.

(सू.६३) आदरे अनादरे, सत् असत्, असें सूत्र करण्यांत अतिशयच गौरव केलें आहे. 'आदरे सत्' एवढेंच सूत्र केलें तरी सर्व निर्वाह होत आहे.

---

४. कारण धातूच्या अव्यवहित मागें एकाच गतिसंज्ञ्चा प्रयोग संभवतो.

५. गतित्वजातीचा प्रयोग धातूच्या पूर्वीं करावा असा अर्थ होतो. परंतु जातीचें उच्चारणच संभवत नाहीं म्हणून त्या जातीच्या आश्रयाचें उच्चारण धातूच्या पूर्वीं करावें असें सूत्राचें तात्पर्य मानिलें जातें. आतां गतिसंज्ञक शब्द अनेक असतील तेथें ते अनेक शब्द एकाच गतित्वजातीचे आश्रय असल्यामुळें ते अनेक शब्द धातूच्या मागें उच्चारले जातात.

६. खाडिति कृत्वा निरष्ठीवत् येथें इतिशब्दाच्या मागील खाट् या अनुकरणाला गतिसंज्ञा झाली तर 'गतिसंज्ञकाचा प्रयोग धातूच्या मागेंच करावा' (१।४।८०) असा त्याच्या प्रयोगाचा नियम असल्यामुळें खाट् हें अनुकरण कृधातूच्या मागें म्ह. इतिशब्दाच्या पुढें जाऊन त्याचा कृत्वा या शब्दाबरोबर समास (२।२।१८) होऊन ल्यप्आदेश (७।१।३७) होऊन 'इति खाट्कृत्य निरष्ठीवत्' असा भलताच प्रयोग होईल.

१. आदर हा अर्थ गम्यमान असतांना सत्-शब्दाला आणि अनादर हा अर्थ गम्यमान असतांना असत्शब्दाला निपातसंज्ञा होऊन गतिसंज्ञा होते; उदा०– सत्कृत्य असत्कृत्य गतः ।

कथमसत्कृत्येति । तदन्तविधिना भविष्यति । केनेदानीमनादरे भविष्यति । नञादरप्रतिषेधं विज्ञास्यामः । नादरेऽनादर इति ॥ नैवं शक्यम् । आदरप्रसङ्ग एव हि स्यादनादरप्रसङ्गे न स्यात् । अनादरग्रहणे पुनः क्रियमाणे बहुव्रीहिरयं विज्ञायते । अविद्यमानादरेऽनादर इति । तस्मादनादरग्रहणं कर्तव्यमसतस्तु तदन्तविधिना सिद्धम् ॥

[१भूषणेऽलम् ॥१।४।६४॥]

**२अन्तरपरिग्रहे ॥ १ । ४ । ६५ ॥**

**अन्तःशब्दस्याङ्किविधिसमासणत्वेषूपसंख्यानम् ॥ १ ॥**

अन्तःशब्दस्याङ्किविधिसमासणत्वेषूपसंख्यानं कर्तव्यम् । अङ् । अन्तर्धा ॥ किविधिः । अन्तर्धिः ॥ समासः । अन्तर्हत्य ॥ णत्वम् । अन्तर्हण्याद्गोभ्यो गाः ॥

**[३कणेमनसी श्रद्धाप्रतीघाते ॥ १ । ४ । ६६ ॥**

**पुरोऽव्ययम् ॥ १ । ४ । ६७ ॥**

**अस्तं च ॥ १ । ४ । ६८ ॥**

**अच्छगत्यर्थवदेषु ॥ १ । ४ । ६९ ॥**

---

पण तसें केलें तर असत्कृत्य येथें गतिसंज्ञा कशी बरें होईल ?

सत्शब्दान्त असा तदन्तविध केला म्हणजे असत्शब्दाला गतिसंज्ञा होईल.

पण असत्कृत्य येथें अनादर या अर्थाची प्रतीति कशी बरें होईल ?

असत् येथील नञानें सत्शब्दार्थ आदराचा प्रतिषेध दाखविला म्हणजे अर्थातच तेथें अनादर या अर्थाची प्रतीति असत्शब्दापासून होईल. सूत्रांतील अनादरे याचा अर्थ न आदरे अनादरे, म्हणजे आदराचा निषेध गम्यमान असतांना, असाच आहे.

पण असा अनादरशब्दाचा अर्थ घेणें शक्य नाहीं. कारण तसा अर्थ घेतला तर जेथें आदराची प्रसक्ति आहे तेथेंच असत्कृत्य असा प्रयोग होईल आणि जेथें आदराचा प्रसंगच नाहीं तशा ठिकाणीं असत्कृत्य असा प्रयोग होणार नाहीं. आतां अनादरे हा शब्द सूत्रांत घातला म्हणजे 'अविद्यमानः आदरो यत्र' अशा अर्थाचा अनादरे हा बहुव्रीहि समजण्यांत येईल. तेव्हां आदराची प्रसक्ति असो अथवा नसो, आदराचा अभाव असला म्हणजे तेथें असत्शब्दाला गतिसंज्ञा होईल. म्हणून अनादर हा शब्द सूत्रामध्यें मुद्दाम घातला आहे. बाकी असच्छब्दाला तदन्तविधीनें गतिसंज्ञा होईल.

(सू.६५, वा.१) अङ्, कि, समास आणि णत्व हे विधि कर्तव्य असतांना अन्तर्शब्दाला गतिसंज्ञा होते आणि उपसर्गसंज्ञा होते असें म्हणावें; जसें— अन्तर्धान येथें अङ्प्रत्यय (३।३।१०६) झाला आहे; अन्तर्धिः येथें किप्रत्यय (३।३।९२) झाला आहे; अन्तर्हत्य येथें समास (२।२।१८) झाला आहे; अन्तर्हण्यात् गोभ्यो गाः येथें णत्व (८।४।२२) झालें

---

१. भूषणार्थक जो अलम्शब्द त्याला निपातसंज्ञा होऊन गतिसंज्ञा होते; उदा०— अलंकृत्य.

२. परिग्रहाहून अन्य अर्थ गम्यमान असतांना अन्तर्शब्दाला निपातसंज्ञा होऊन गतिसंज्ञा होते; उदा०— अन्तर्हत्य. निपातसंज्ञा ही पुढें प्रत्येक सूत्रांत चालू आहेच असें समजावें.

३. (६६) अभिलाषातिशयनिवृत्ति या अर्थाला दाखविणारा जो कणेशब्द आणि मनस् शब्द यांना गतिसंज्ञा होते; उदा०— कणेहत्य, मनोहत्य, पयः पिबति: अभिलाषनिवृत्ति होतोपर्यंत दूध पितो. गतिसमास (२।२।१८) झाल्यामुळें ल्यबादेश (७।१।३७) झाला आहे.

(६७) पुरस् या अव्ययाला गतिसंज्ञा होते; उदा०— पुरस्कृत्य.

(६८) अस्तम् हें मकारान्त अव्यय आहे, त्याला गतिसंज्ञा होते; उदा०— अस्तं गत्य.

(६९) अच्छ या अव्ययाला गत्यर्थक धातु आणि वद्धातु यांचा योग असतांना गतिसंज्ञा होते; उदा०—

**अदोऽनुपदेशे ॥ १ । ४ । ७० ॥**

**तिरोऽन्तर्धौ ॥ १ । ४ । ७१ ॥**

**विभाषा कृञि ॥ १ । ४ । ७२ ॥**

**उपाजेऽन्वाजे ॥ १ । ४ । ७३ ॥]**

**साक्षात्प्रभृतीनि च ॥ १।४।७४ ॥**

**साक्षात्प्रभृतिषु च्व्यर्थवचनम् ॥ १ ॥**

साक्षात्प्रभृतिषु च्व्यर्थग्रहणं कर्तव्यम्। असाक्षात्साक्षात्कृत्वा साक्षात्कृत्य । यदा हि साक्षादेव किंचित्क्रियते तदा मा भूदिति ॥

**मकारान्तत्वं च गतिसंज्ञासंनियुक्तम् ॥ २ ॥**

मकारान्तत्वं च गतिसंज्ञासंनियोगेन वक्तव्यम् । लवणंकृत्य ॥

**तत्र च्विप्रतिषेधः ॥ ३ ॥**

तत्र च्व्यन्तस्य प्रतिषेधो वक्तव्यः । लवणीकृत्य ॥

**न वा पूर्वेण कृतत्वात् ॥ ४ ॥**

न वा वक्तव्यम् । किं कारणम् । पूर्वेण कृतत्वात् । अस्त्वनेन विभाषा पूर्वेण नित्यो भविष्यति ॥ इदं तर्हि प्रयोजनम् । मकारान्तत्वं च गतिसंज्ञासंनियुक्तमित्युक्तं तच्च्व्यन्तस्य मा भूदिति । एतदपि नास्ति प्रयोजनम् । लवणशब्दस्यायं विभाषा लवणंशब्द आदेशः क्रियते । यदि च लवणीशब्दस्यापि विभाषा

---

आहे.

(सू.७४, वा.१) च्विप्रत्ययाचा अर्थ अभूततद्भाव म्ह. वस्तुतः तसें नसून केवळ तशी कल्पना करणें हा अर्थ गम्यमान असेल तरच ह्या सूत्रानें गतिसंज्ञा होते असें म्हणावें; जसें— न साक्षात् असाक्षात्, असाक्षात् साक्षात्कृत्वासाक्षात्कृत्य. आतां जेव्हां एखादी गोष्ट खरोखरींच प्रत्यक्ष केली जाते तेव्हां गतिसंज्ञा होत नाहीं.

(वा.२) गतिसंज्ञेच्या बरोबरच साक्षात्प्रभृति गणांतील कांहीं शब्दांच्या शेवटीं मकार येतो असें म्हणावें; जसें— लवणंकृत्य.

(वा.३) अभूततद्भाव या अर्थी प्रत्यक्ष च्विप्रत्ययच (५।४।५०) जेथें केला असेल तेथें हें गतिसंज्ञा सांगणारें सूत्र प्रवृत्त होत नाहीं असें म्हणावें; जसें— लवणीकृत्य.[२]

(वा.४) अथवा हें वचन करावयास नको. काय कारण ?

प्रकृत सूत्रानें गतिसंज्ञेचा विकल्प झाला तरी होऊं दे. त्याच्या अभावपक्षीं पूर्वीच्या सूत्रानें नित्य गतिसंज्ञा होईलच.

तर मग 'तत्र च्विप्रतिषेधः' या वार्तिकाचा असा उपयोग समजावा की ह्या गणांतील कांहीं शब्दांच्या शेवटीं जो गतिसंज्ञेच्या बरोबर मकार येतो तो प्रत्यक्ष च्विप्रत्यय केला असतांना येत नाहीं.

हाही त्या निषेधाचा उपयोग होत नाहीं. कारण मकार शेवटीं येतो म्हणजे लवणशब्दाचे स्थानीं 'लवणम्' असा मकारान्त

---

अच्छगत्य, अच्छोद्य.

(७०) परोपदेशाशिवाय इतर वाक्यांमध्यें अदस्शब्दाला गतिसंज्ञा होते; उदा०— अदःकृत्य, अदःकृतम्.

(७१) व्यवधान या अर्थाला दाखविणाऱ्या तिरस्शब्दाला गतिसंज्ञा होते; उदा०— तिरोभूय.

(७२) व्यवधान या अर्थाला दाखविणाऱ्या तिरस्शब्दाला कृधातूचा योग असतांना विकल्पानें गतिसंज्ञा होते; उदा०— तिरस्कृत्य, तिरः कृत्वा.

(७३) उपाजे आणि अन्वाजे ह्या निपातांना कृधातूचा योग असतांना विकल्पानें गतिसंज्ञा होते; उदा०— उपाजेकृत्य, अन्वाजेकृत्य. उपाजे आणि अन्वाजे हे दोन निपात दुर्बलाला बल देणें या अर्थी आहेत.

१. साक्षात्प्रभृति गणांतील शब्दांना कृ-धातूचा योग असतांना आणि अभूततद्भाव हा अर्थ गम्यमान असतांना विकल्पानें गतिसंज्ञा होते; उदा०— असाक्षात् साक्षात् कृत्वा साक्षात्कृत्य.

२. येथें 'ऊर्यादिच्विडाचश्च' (१।४।६१) यानें नित्य गतिसंज्ञा होते.

लवणंशब्द आदेशो भवति न किंचिद्दुष्यति । त्रैशब्द्यं चेह साध्यम् । तच्चैवं सति सिद्धं भवतीति ॥

**[ अनत्याधान उरसिमनसी ॥ १ । ४ । ७५ ॥**

**मध्ये पदेनिवचने च ॥१।४।७६॥**

**नित्यं हस्ते पाणावुपयमने ॥ १ । ४ । ७७ ॥**

**प्राध्वं बन्धने ॥ १ । ४ । ७८ ॥**

**जीविकोपनिषदावौपम्ये ॥ १ । ४ । ७९ ॥ ]**

**ते प्राग्धातोः ॥ १ । ४ । ८० ॥**

किमिदं प्राग्धातुवचनं प्रयोगनियमार्थम् । एते प्रागेव धातोः प्रयोक्तव्याः । आहोस्वित्संज्ञानियमार्थम् । एते प्राक्चाप्राक्च प्रयोक्तव्याः प्राक्प्रयुज्यमानानां गतिसंज्ञा भवतीति । कश्चात्र विशेषः ।

**प्राग्धातुवचनं प्रयोगनियमार्थमिति चेदनुकरणस्येतिकरणपरप्रतिषेधोऽनिष्टशब्दनिवृत्त्यर्थः ॥ १ ॥**

प्राग्धातुवचनं प्रयोगनियमार्थमिति चेदनुकरणस्येतिकरणपरप्रतिषेधो वक्तव्यः । किं प्रयोजनम् । अनिष्टशब्दनिवृत्त्यर्थः । अनिष्टशब्दता मा भूदिति ॥

---

आदेश केला जातो, असा अर्थ होय. तेव्हां जरी लवणीशब्दाचे ठिकाणींही विकल्पानें 'लवणम्' असा आदेश झाला तरी कांहीं एक विघडत नाहीं. कारण लवणंकृत्वा लवणंकृत्य आणि लवणीकृत्य अशीं तीन शब्दस्वरूपें आपल्याला साधावयाचीं आहेत. तीं तीन रूपें 'लवणम्' आदेश केल्यानें साधत आहेतच.

(सू.८०) काय ? गति आणि उपसर्ग यांचा धातूच्या पूर्वींच प्रयोग करावा असा प्रयोगाचा नियम करण्याकरतां हें सूत्र केलें आहे किंवा संज्ञेचा नियम करण्याकरितां केलें आहे ? म्हणजे त्यांचा प्रयोग धातूच्यामागें असो किंवा पुढें असो, पण ते जेव्हां धातूच्या मागें असतील तेव्हांच त्यांना गति आणि उपसर्ग या संज्ञा होतात ?

या दोन नियमांमध्यें काय फरक ?

(वा.१) प्रयोगाचा नियम करण्याकरितां हें सूत्र केलें असेल तर अनुकरणाला जो इतिशब्द पुढें असतांना गतिसंज्ञेचा निषेध केला आहे (१।४।६२) तो करावयास पाहिजे.

त्याचा काय उपयोग ?

अनिष्टशब्दनिवृत्त्यर्थः, म्ह. भलता प्रयोग न व्हावा हा त्याचा उपयोग आहे.

---

१. (७५) अत्याधान म्ह. संयोग. त्याशिवाय इतर अर्थ गम्यमान असतांना उरसि आणि मनसि ह्या दोन शब्दांना कृधातूच्या योगीं विकल्पानें गतिसंज्ञा होते; उदा०– उरसिकृत्य उरसि कृत्वा, मनसिकृत्य मनसि कृत्वा. अङ्गीकार करून व निश्चय करून असा या उदाहरणांचा अर्थ आहे.

(७६) अत्याधानभिन्न अर्थ गम्यमान असतांना मध्ये, पदे आणि निवचने ह्या तीन शब्दांना कृधातूच्या योगीं विकल्पानें गतिसंज्ञा होते; उदा०– मध्येकृत्य मध्ये कृत्वा, पदेकृत्य पदेकृत्वा, निवचनेकृत्य निवचने कृत्वा.

(७७) उपयमन म्ह. विवाह किंवा मोघम स्वीकार ह्या अर्थ गम्यमान असतांना हस्ते आणि पाणौ ह्या दोन शब्दांना कृधातूच्या योगीं नित्य गतिसंज्ञा होते; उदा०– हस्तेकृत्य, पाणौकृत्य.

(७८) बंधनमूलक आनुकूल्य हा अर्थ गम्यमान असतांना प्राध्वम् या शब्दाला कृधातूच्या योगीं नित्य गतिसंज्ञा होते; उदा०– प्राध्वंकृत्य. बंधनानें अनुकूल करून असा याचा अर्थ आहे.

(७९) जीविका आणि उपनिषत् हे दोन शब्द कृधातूच्या योगीं दृष्टान्तादाखल योजले असतां त्यांना गतिसंज्ञा होते; उदा०– जीविकामिव कृत्वा जीविकाकृत्य, उपनिषदमिव कृत्वा उपनिषत्कृत्य.

१. गति आणि उपसर्ग हे धातूच्या मागेंच योजावेत; उदा०– प्रकरोति.

२. मागें (१।४।६२ टीप ६) पहाणें.

**छन्दसि परव्यवहितवचनं च ॥ २ ॥**

छन्दसि परेऽपि व्यवहिताश्च [१.४.८१;८२] इति वक्तव्यम् ॥

**संज्ञानियमे सिद्धम् ॥ ३ ॥**

संज्ञानियमे सिद्धमेतद्भवति । अस्तु तर्हि संज्ञानियमः ॥

**उभयोरनर्थकं वचनमनिष्टादर्शनात् ॥ ४ ॥**

उभयोरपि पक्षयोर्वचनमनर्थकम् । किं कारणम् । अनिष्टादर्शनात् । न हि कश्चित्प्रपचतीति प्रयोक्तव्ये पचतिप्रेति प्रयुङ्क्ते । यदि चानिष्टं दृश्येत ततो यत्नार्हं स्यात् ॥

**उपसर्जनसंनिपाते तु पूर्वपरव्यवस्थार्थम् ॥ ५ ॥**

उपसर्जनसंनिपाते तु पूर्वपरव्यवस्थार्थमेतद्वक्तव्यम् । ऋषभं कूलमुद्रुजम् । ऋषभं कूलमुद्वहम् । अत्र गतेः प्राग्धातोः प्रयोगो यथा स्यात् ॥ यद्युपसर्जनसंनिपाते पूर्वपरव्यवस्थार्थमिदमुच्यते सुकटंकराणि वीरणानीत्यत्र गतेः प्राग्धातोः प्रयोगः प्राप्नोति । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति नात्र गतेः प्राक्प्रयोगो भवतीति यदयमीषद्दुःसुषु कृच्छ्राकृच्छ्रार्थेषु खल् [३.३.

(वा.२) शिवाय वेदामध्यें गति आणि उपसर्ग यांचा धातूच्या पुढेंही आणि व्यवहित असाही प्रयोग होतो, हें कळविण्यासाठीं 'छन्दसि परेऽपि', 'व्यवहिताश्च' हें पुढील सूत्रद्वय केलें पाहिजे.

(वा.३) संज्ञेचा नियम करण्याकरितां हें सूत्र केलें आहे असें गृहीत धरलें तर हें सर्व आपोआपच सिद्ध होत आहे.

तर मग संज्ञानियम हाच पक्ष असूं दे.

(वा.४) प्रयोगनियम आणि संज्ञानियम या दोन्हीही पक्षीं 'ते प्राग्धातोः' हें वचन अनर्थक होत आहे.

काय कारण ?

लोकांमध्यें अनिष्ट प्रयोग दिसून येत नाहीं.[३] म्हणजे प्रपचति असा प्रयोग करण्याच्या ऐवजीं पचतिप्र असा प्रयोग कोणीही करीत नाहीं. जर विपरीत प्रयोग आढळून येईल तर त्या विपरीत प्रयोगाच्या निवृत्तीसाठीं यत्न करणें योग्य होईल.

(वा.५) एका ठिकाणी उपसर्जनसंज्ञक अशा अनेक शब्दांचा प्रयोग प्राप्त झाला असतां त्या उपसर्जनांपैकीं गति आणि उपसर्ग यांचा धातूच्या अव्यवहित मागेंच प्रयोग करावा अशा नियमाकरितां हें सूत्र केलें पाहिजे; जसें— ऋषभं कूलमुद्रुजम्,[४] ऋषभं कूलमुद्वहम्. येथें उद् या गतिसंज्ञकाचा धातूच्या अव्यवहित मागेंच प्रयोग व्हावा; नाहीं तर कदाचित् कूलशब्दही धातूच्या मागें येईल.

जर अनेक उपसर्जनांमध्यें धातूच्या जवळ गति किंवा उपसर्ग आणि त्याच्या मागें इतर उपपद अशी व्यवस्था होण्यासाठीं हें सूत्र केलें असेल तर 'सुकटंकराणि वीरणानि' येथें खल्-प्रत्यय (३।३।१२७) केल्यानंतर गतिसंज्ञक सुचा धातूच्या अव्यवहित मागें प्रयोग करावा लागेल. ज्यापेक्षां हा आचार्य 'ईषद्दुःसुषु कृच्छ्राकृच्छ्रार्थेषु०' (३।३।१२६) येथें खल्प्रत्ययाला इत्संज्ञक खकार जोडतो त्यापेक्षां खल्प्रत्यय केला असेल तेथें गतिसंज्ञकाचा

---

३. येथें भाष्यकारांनीं अनभिधानाचे जोरावर सूत्राचें प्रत्याख्यान केलें आहे.

४. येथें कूल हें कर्म आणि उद्उपसर्ग हीं दोन उपपदें असतां रुज् आणि वह् ह्या धातूंहून खश्प्रत्यय होतो असा 'उदिकूले' (३।२।३१) या सूत्राचा अर्थ गृहीत धरला आहे. या दोन उपपदांचा रुज आणि वह या शब्दांबरोबर उपपदसमास (२।२।१९) होतो. तेथें उद् आणि कूल या दोन्ही उपपदांना उपसर्जनसंज्ञा (१।२।४३) असल्यामुळें त्या दोघांचाही पूर्वनिपात (२।२।३०) प्राप्त झाला आहे.

१२६] इति खकारमनुबन्धं करोति। कथं कृत्वा ज्ञापकम्। खित्करण एतत्प्रयोजनं खितीति मुम्यथा स्यादिति। यदि चात्र गतेः प्राक्प्रयोगः स्यात्खित्करणमनर्थकं स्यात्। अस्त्वत्र मुम्। अनव्ययस्येति प्रतिषेधो भविष्यति। पश्यति त्वाचार्यो नात्र गतेः प्राग्धातोः प्रयोगो भवतीति ततः खकारमनुबन्धं करोति॥ नैतदस्ति ज्ञापकम्। यद्यप्यत्र गतेः प्राक्प्रयोगः स्यात्स्यादेवात्र मुमागमः। कथम्। कृद्ग्रहणे गतिकारकपूर्वस्यापि ग्रहणं भवतीति। तस्मान्नार्थ एवमर्थेन प्राग्धातुवचनेन॥ कथम् ऋषभं कूलमुद्रुजम् ऋषभं कूलमुद्वहम्। नैष दोषः। नैष उदिरुपपदम्। किं तर्हि। विशेषणम्। उदि कूले रुजिवहोः [३.२.३१] उत्पूर्वाभ्यां रुजिवहिभ्यां कूल उपपद इति॥

**[छन्दसि परेऽपि ॥१।४।८१॥**

**व्यवहिताश्च ॥१।४।८२॥]**

**कर्मप्रवचनीयाः ॥१।४।८३॥**

किमर्थं महती संज्ञा क्रियते। अन्वर्थसंज्ञा यथा विज्ञायते। कर्म प्रोक्तवन्तः

---

धातूंच्या अव्यवहित मागें प्रयोग करूं नये असें सुचवितो.

हें कसें बरें ज्ञापक जमतें ?

खल्प्रत्ययाला जो इत्संज्ञक खकार जोडला आहे त्याचा उपयोग उपपदाला मुम्आगम व्हावा हा आहे. पण जर धातूच्या जवळ गतिशब्दाचाच प्रयोग होईल तर इत्संज्ञक खकाराचा कांहींच उपयोग होणार नाहीं; कारण मुमागमाची प्राप्ति आली तर येऊं दे, 'अनव्ययस्य'यानें त्याचा निषेध होईल. तेव्हां अर्थातच या खल्प्रत्ययाच्या प्रयोगामध्यें गतिसंज्ञकाचा धातूच्या अव्यवहित मागें प्रयोग होत नाहीं, असें आचार्य समजतो, आणि म्हणूनच खल्प्रत्ययाला इत्संज्ञक खकार जोडतो.

हें ज्ञापक होऊं शकत नाहीं. जरी या खल्प्रत्ययाच्या प्रयोगामध्यें गतिसंज्ञकाचा धातूच्या मागें प्रयोग झाला तरी देखील मुमागम होईलच.

तो कसा ?

जेथें कृत्प्रत्ययाचें ग्रहण केलें तेथें 'त्या कृत्प्रत्ययानें धातूच्या मागील गति किंवा कारक यासहित कृदन्ताचें ग्रहण करावें' या परिभाषेनें 'सुकर' हें खित्प्रत्ययान्त गृहीत धरलें जाऊन त्याच्यामागील कट या अजन्तपूर्वपदाला मुम्आगम होईल. तेव्हां 'ते प्राग्धातोः' हें प्रकृत सूत्र उपसर्जनांच्या प्रयोगनियमार्थं केलें तर सुकटंकराणि हा प्रयोग साधणार नाहीं. म्हणून तशा प्रयोगनियमासाठीं 'ते प्राग्धातोः' हें सूत्र करण्यांत फायदा नाहीं.

पण जर तशाकरितां हें सूत्र केलें नाहीं ऋषभं कूलमुद्रुजम्, ऋषभं कूलमुद्वहम्. या प्रयोगांची वाट काय ?

हा दोष येत नाहीं. कारण उत्शब्द हा उपपद म्हणून सूत्रांत घातला नाहीं, तर रुज् आणि वह् या धातूंचें विशेषण म्हणून घातला आहे. तेव्हां कूलशब्द उपपद असतांना उद्शब्दापुढील रुज् आणि वह् या धातूंहून खश्प्रत्यय होतो असा 'उदि कूले रुजिवहोः' (३।२।३१) या सूत्राचा अर्थ होतो.

(सू.८३) 'कर्मप्रवचनीय' ही सात अक्षरांची एवढी मोठी संज्ञा कशासाठीं केली आहे ?

कर्मप्रवचनीय ही अन्वर्थसंज्ञा आहे हें

---

१. वैदिक प्रयोगमध्यें गति आणि उपसर्ग या शब्दांचा धातूच्या पुढेंही प्रयोग होतो; उदा०— हन्ति नि मुष्टिना, निघ्नन्ति मुष्टिना.

१. वैदिक प्रयोगामध्यें गति व उपसर्ग आणि धातु यांच्यामध्यें व्यवधनही असतें; उदा०— आ मन्द्रैरिन्द्र हरिभिर्याहि.

१. हें अधिकारसूत्र आहे. येथून 'अधिरीश्वरे' या सूत्रापर्यंत असलेल्या सूत्रांनीं कर्मप्रवचनीयसंज्ञा सांगितली आहे. निपातसंज्ञा चालू आहेच. कर्मप्रवचनीयसंज्ञा झाल्यामुळें त्यांच्याशीं योग असतांना

कर्मप्रवचनीया इति ॥ के पुनः कर्म प्रोक्तवन्तः । ये संप्रति क्रियां नाहुः । के च संप्रति क्रियां नाहुः । येऽप्रयुज्यमानस्य क्रियामाहुस्ते कर्मप्रवचनीयाः ॥

## अनुर्लक्षणे ॥ १ । ४ । ८४ ॥

किमर्थमिदमुच्यते । कर्मप्रवचनीयसंज्ञा यथा स्याद्गत्युपसर्गसंज्ञे मा भूतामिति । किं च स्यात् । शाकल्यस्य संहितामनु प्रावर्षत् । गतिर्गतौ [८.१.७०] इति निघातः प्रसज्येत ॥ यद्येवं वेरपि कर्मप्रवचनीयसंज्ञा वक्तव्या । वेरपि निघातो नेष्यते । प्रादेशं प्रादश विपरिलिखति । अस्त्यत्र विशेषः । नात्र वेर्लिखिं प्रति क्रियायोगः । किं तर्हि । अप्रयुज्यमानम् । प्रादेशं प्रादेशं विमाय परिलिखतीति ॥ यद्येवमनोरपि कर्मप्रवचनीयसंज्ञया नार्थः । अनोरपि हि न वृषिं प्रति क्रियायोगः । किं तर्हि । अप्रयुज्यमानम् । शाकल्येन सुकृतां संहितामनुनिशम्य देवः प्रावर्षत् ॥ इदं तर्हि प्रयोजनं द्वितीया यथा स्यात् । कर्मप्रवचनीययुक्ते द्वितीया [२.३.८] इति ॥ अत उत्तरं पठति ।

---

सुचविण्यासाठीं महासंज्ञा केली आहे. कर्म प्रोक्तवन्तः म्हणजे जे शब्द क्रियेवरील विशेष दाखवूं शकले ते शब्द कर्मप्रवचनीय होत.

क्रियेवरील विशेष दाखवूं शकले असे शब्द ते कोणते ?

जे शब्द हल्लीं क्रियेवरील विशेष दाखवूं शकत नाहींत ते.

असे कोणते बरें शब्द आहेत की जे हल्लीं क्रियेवरील विशेष दाखवूं शकत नाहींत ?

जे प्रकृत प्रयोगामध्यें क्रियावाचक धातूचा प्रयोग नसतांही त्या क्रियेचा संबंध दाखवितात ते कर्मप्रवचनीय होत.

(सू.८४) हें सूत्र कशासाठीं केलें आहे ?

अनुशब्दाला कर्मप्रवचनीय संज्ञा व्हावी आणि गति आणि उपसर्ग या संज्ञा होऊं नयेत यासाठीं केलें आहे.

जर अनुशब्दाला गतिसंज्ञा झाली तर काय बिघडेल ?

'शाकल्यस्य संहितामनु प्रावर्षत्' येथें अनुशब्दाला 'गतिर्गतौ' (८।१।७०) या सूत्रानें अनुदात्त होऊं लागेल.[3]

असें आहे तर विशब्दालाही कर्मप्रवचनीय संज्ञा सांगितली पाहिजे. कारण 'प्रादेशं विपरिलिखति' येथील विशब्दालाही अनुदात्त इष्ट नाहीं.

पण येथें विशेष आहे. विपरिलिखति येथें विशब्दाला लेखनक्रियेचा योग नाहीं, तर प्रादेशं विमाय परिलिखति असा अर्थ मनांत येत असल्यामुळें अप्रयुज्यमान अशा विमानक्रियेचा योग विशब्दाला आहे.[3]

असें आहे तर अनुशब्दालाही कर्मप्रवचनीयसंज्ञा सांगण्यांत कांहीं अर्थ नाहीं. कारण अनुशब्दाचाही वर्षणक्रियेशीं योग नाहीं.

तर मग कोणाशीं योग आहे ?

संहिता ऐकल्यानंतर वर्षण केलें असा अर्थ मनांत येत असल्यामुळें अप्रयुज्यमान अशा ऐकणें या क्रियेशीं योग आहे.

तर मग 'कर्मप्रवचनीययुक्ते द्वितीया' (२।३।८) यानें द्वितीया करणें हा अनुशब्दाला कर्मप्रवचनीय संज्ञा सांगण्याचा उपयोग समजावा.

याच्या उत्तरादाखल पुढील वचन लिहीत

---

द्वितीया (२।३।३८) होते.

१. लक्ष्यलक्षणभावसंबंधाला दाखविणारा जो अनुशब्द त्याला कर्मप्रवचनीयसंज्ञा होते; उदा०—जपमनुप्रावर्षत्.

२. निपातत्वास्तव आद्युदात्तस्वर (फिट्सूत्र ४।१३) अनुशब्दाला इष्ट आहे.

३. दोन्ही गतिशब्दांचा एकाच क्रियेशीं योग असेल तरच 'गतिर्गतौ' यानें अनुदात्त होत असतो.

**अनुर्लक्षणेवचनानर्थक्यं सामान्यकृतत्वात् ॥ १ ॥**

अनुर्लक्षणेवचनानर्थक्यम् । किं कारणम् । सामान्यकृतत्वात् । सामान्येनैवात्र कर्मप्रवचनीयसंज्ञा भविष्यति लक्षणेत्थंभूताख्यानभागवीप्सासु प्रतिपर्यनवः [१.४.९०] इति ॥

**हेत्वर्थं तु वचनम् ॥ २ ॥**

हेत्वर्थमिदं वक्तव्यम् । हेतुः शाकल्यस्य संहिता वर्षस्य न लक्षणम् । किं वक्तव्यमेतत् । न हि । कथमनुच्यमानं गंस्यते । लक्षणं हि नाम स भवति येन पुनः पुनर्लक्ष्यते न यः सकृदपि निमित्तत्वाय कल्पते । सकृच्चासौ शाकल्येन सुकृतां संहितामनुनिशम्य देवः प्रावर्षत् ॥ स तर्हि तथा निर्देशः कर्तव्योऽनुर्हेताविति ॥ अथेदानीं लक्षणेन हेतुरपि व्याप्तो नार्थोऽनेन । लक्षणेन हेतुरपि व्याप्तः । न ह्यवश्यं तदेव लक्षणं भवति येन पुनः पुनर्लक्ष्यते । किं तर्हि । यत्सकृदपि निमित्तत्वाय कल्पते तदपि लक्षणं भवति । तद्यथा । अपि भवान्कमण्डलुपाणिं छात्रमद्राक्षीदिति । सकृदसौ कमण्डलुपाणिश्छात्रो दृष्टस्तस्य तदेव लक्षणं भवति ॥ तदेव तर्हि प्रयोजनं द्वितीया यथा स्यात् कर्मप्रवचनीययुक्ते द्वितीयेति ।

---

आहे.

(वा.१) 'अनुर्लक्षणे' हें अनुशब्दाला कर्मप्रवचनीयसंज्ञेसाठीं केलेलें सूत्र निरुपयोगी होत आहे.

काय कारण ?

'लक्षणेत्थं भूताख्यान०' (१।४।९०) या सामान्य सूत्रानेंच लक्षण हा अर्थ गम्यमान असतांना अनुशब्दाला कर्मप्रवचनीयसंज्ञा होत आहे म्हणून.

(वा.२) कार्यकारणभाव असेल तेथें अनुशब्दाला कर्मप्रवचनीयसंज्ञेसाठीं 'अनुर्लक्षणे' हें सूत्र केलें पाहिजे. प्रकृत उदाहरणामध्यें शाकल्यसंहिता ही वर्षणाचें कारण आहे, लक्षण नव्हे.

कारणाला लक्षण म्हणूं नये अशाबद्दल वचन केलें पाहिजे कीं काय ?

वचन करावयास नको. त्यावांचून कसा हा शोध लागेल ?

ज्या खुणेवरून जी गोष्ट वारंवार कळते त्या खुणेला लक्षण असें म्हटलें जातें. जी खूण ज्या गोष्टीला एकदांच दाखवूं शकते त्यास लक्षण असें नांव देण्यांत येत नाहीं; आणि येथें देवानें तर एकवारच शाकल्यसंहितेचें श्रवण करून वृष्टि केली आहे[४].

तर मग 'अनुर्हेतौ' असें सूत्र केलें पाहिजे.

आतां जर कारणालाही लक्षण म्हणतां येत असेल तर मात्र 'अनुर्लक्षणे' या सूत्राचा कांहीं उपयोग दिसत नाहीं. आणि विचार केला असतां कारणालाही लक्षण असें म्हटलें पाहिजे. कारण ज्या साधनावरून जी गोष्ट वारंवार पाहिली जाते त्यालाच लक्षण म्हणावें असा कांहीं नियम नाहीं. तर जें साधन एखादे वेळींही एखादी गोष्ट कळविण्याविषयीं कारणीभूत होतें त्यालाही लक्षण म्हणतां येतें; जसें– हातामध्यें पूर्वी कमंडलु घेतलेल्या शिष्याला तूं आज पाहिलेंस काय असें विचारण्यांत येतें. वस्तुतः तशा शिष्याला त्यानें एकदांच पाहिलें होतें. तरी देखील त्या शिष्याची ओळख पटविण्याच्या कामीं 'कमंडलु हातांत घेणें' हें त्याचें लक्षण होतें.

तर मग कर्मप्रवचनीयाचा योग असतांना 'कर्मप्रवचनीययुक्ते द्वितीया' या सूत्रानें द्वितीया

---

४. तेव्हां शाकल्यसंहिता ही वर्षणाचें लक्षण नसल्यामुळें 'लक्षणेत्थं०' या सामान्यसूत्रानें कर्मप्रवचनीयसंज्ञा सिद्ध होत नाहीं.

५. तेव्हां 'लक्षणेत्थंभूता०' या सामान्यसूत्रानेंच

एतदपि नास्ति प्रयोजनम्। सिद्धात्र द्वितीया कर्मप्रवचनीययुक्त इत्येव। न सिध्यति। परत्वाद्धेत्वाश्रया तृतीया प्राप्नोति ॥

[तृतीयार्थे ॥ १ । ४ । ८५ ॥

हीने ॥ १ । ४ । ८६ ॥

उपोऽधिके च ॥ १ । ४ । ८७ ॥

अपपरी वर्जने ॥ १ । ४ । ८८ ॥]

आङ्मर्यादावचने ॥ १ । ४ । ८९ ॥

आङ्मर्यादाभिविध्योरिति वक्तव्यम्। इहापि यथा स्यात्। आकुमारं यशः पाणिनेरिति ॥ तत्तर्हि वक्तव्यम्। न वक्तव्यम्। मर्यादावचन इत्येव सिद्धम्। एषास्य यशसो मर्यादा ॥

लक्षणेत्थंभूताख्यानभागवीप्सासु प्रतिपर्यनवः ॥ १ । ४ । ९० ॥

कस्य लक्षणादयोऽर्था निर्दिश्यन्ते।

---

होते ह्याच अनुशब्दाला कर्मप्रवचनीयसंज्ञा सांगण्याचा उपयोग समजावा.

हाही उपयोग नाहीं. कारण 'लक्षणेत्थंभूता' या सामान्यसूत्रानें अनुशब्दाला कर्मप्रवचनीयसंज्ञा होत असल्यामुळें 'कर्मप्रवचनीययुक्ते' यानेंच तेथें द्वितीया साधत आहे.

तेथें द्वितीया साधतां येत नाहीं. कारण संहितामनु प्रावर्षत् या उदाहरणामध्यें संहिताशब्दापुढें प्राप्त झालेल्या द्वितीयेचा परत्वास्तव बाध करून 'हेतौ' (२।३।२३) या सूत्रानें तृतीया प्राप्त होत आहे. त्या तृतीयेचा बाध होऊन द्वितीयाच व्हावी यासाठीं 'अनुर्लक्षणे' या सूत्रानें पुनः कर्मप्रवचनीयसंज्ञा सांगितली आहे.

(सू.८९) मर्यादा किंवा अभिविधि हे अर्थ गम्यमान असतांना आङ् या शब्दाला कर्मप्रवचनीयसंज्ञा होते असें म्हणावें. कारण 'आकुमारं यशः पाणिनेः' येथें अभिविधिअर्थ असतांनाही कर्मप्रवचनीयसंज्ञा झाली पाहिजे.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. सूत्रामध्यें जे 'मर्यादावचने' असें म्हटलें आहे त्यावरूनच हें सिद्ध होतें. कुमार ही पाणिनीच्या यशाची मर्यादा म्हणजे अवधि आहे.[2]

(सू.९०) लक्षण, इत्थंभूताख्यान वगैरे अर्थ येथें कोणाचे म्हणून निर्दिष्ट केले आहेत?

---

अनुशब्दाला कर्मप्रवचनीयसंज्ञा होत असल्यामुळें 'अनुर्लक्षणे' या प्रकृत सूत्राचा काय उपयोग हा प्रश्न कायम राहतो.

१. (८५) तृतीयाविभक्तीचा अर्थ गम्यमान असतांना अनुशब्दाला कर्मप्रवचनीयसंज्ञा होते; उदा०—नदीमन्ववसिता सेना, येथें साहित्यतृतीयार्थ गम्यमान होता.

(८६) कमीपणा गम्यमान असतांना अनुशब्दाला कर्मप्रवचनीयसंज्ञा होते, उदा०—अनु हरिं सुराः. इतर देवांचा हरीपेक्षां कमीपणा येथें गम्यमान होतो.

(८७) अधिकपणा किंवा कमीपणा गम्यमान असतांना उपशब्दाला कर्मप्रवचनीयसंज्ञा होते; उदा०—उप हरिं सुराः. उप खार्यां द्रोणः. हें अधिकपणाचें उदाहरण होय. खारीपेक्षां द्रोण अधिक आहे असा अर्थ आहे. येथें सप्तमी (२।३।९) झाली आहे.

(८८) वर्जन हा अर्थ गम्यमान असतांना अप आणि परि या शब्दांना कर्मप्रवचनीयसंज्ञा होते; उदा०—अप हरेः परि हरेः संसारः.

१. मर्यादा किंवा अभिविधि हा अर्थ गम्यमान असतांना आङ् या शब्दाला कर्मप्रवचनीयसंज्ञा होते; उदा०— आ मुक्तेः संसारः, आ सकलाद्ब्रह्म. येथें कर्मप्रवचनीयसंज्ञेमुळें पंचमी (२।३।१०) झाली आहे.

२. एखाद्या गांवाची हद्द ओढ्यापर्यंत आहे अशा रीतीनें ओढा हा अवधि म्हणून दाखविला जातो तेथें त्या अवधीच्या मर्यादा आणि अभिविधि अशा दोन तऱ्हा संभवतात. पैकीं तो अवधि त्या हद्दींत न धरणें ही मर्यादा आणि धरणें हा अभिविधि होय. सूत्रांतील मर्यादा हा शब्द अवधि या अर्थाचा येथें आहे.

१. लक्षण, इत्थंभूताख्यान, भाग आणि वीप्सा हे अर्थ गम्यमान असतांना प्रति, परि आणि अनु ह्या शब्दांना कर्मप्रवचनीयसंज्ञा होते; उदा०— वृक्षं प्रति परि अनु वा विद्योतते विद्युत्. येथें वृक्षावरून

वृक्षादीनाम् ॥ किमर्थं पुनरिदमुच्यते । कर्मप्रवचनीयसंज्ञा यथा स्याद्गत्युपसर्गसंज्ञे मा भूतामिति । नैतदस्ति प्रयोजनम् । यत्क्रियायुक्तास्तं प्रति गत्युपसर्गसंज्ञे भवतो न च वृक्षादीन्प्रति क्रियायोगः ॥ इदं तर्हि प्रयोजनं द्वितीया यथा स्यात् कर्मप्रवचनीययुक्ते द्वितीया [२.३.८] इति । वृक्षं प्रति विद्योतते । वृक्षमनु विद्योतत इति ॥

**[अभिरभागे ॥ १ । ४ । ९१ ॥**

**प्रतिः प्रतिनिधिप्रतिदानयोः ॥ १ । ४ । ९२ ॥]**

## अधिपरी अनर्थकौ ॥१।४।९३॥

किमर्थमधिपर्योरनर्थकयोः कर्मप्रवचनीयसंज्ञोच्यते । कर्मप्रवचनीयसंज्ञा यथा स्याद्गत्युपसर्गसंज्ञे मा भूतामिति । नैतदस्ति प्रयोजनम् । यत्क्रियायुक्तौ तं प्रति गत्युपसर्गसंज्ञौ भवतोऽनर्थकौ चेमौ ॥ इदं तर्हि प्रयोजनं पञ्चमी यथा स्यात् । पञ्चम्यपाङ्परिभिः [२.३.१०] इति । कुतः पर्यागम्यत इति ॥ सिद्धात्र पञ्चम्यपादान इत्येव । आत-

---

वृक्षं प्रति विद्योतते इत्यादि उदाहरणांतील वृक्ष वगैरे शब्दांच्या पुढील विभक्तींचे.

आतां कशासाठीं हें सूत्र केलें आहे ?

प्रति वगैरे शब्दांना कर्मप्रवचनीयसंज्ञाच व्हावी आणि गति किंवा उपसर्ग ही संज्ञा न[2] व्हावी यासाठीं हें सूत्र केलें आहे.

हें प्रयोजन बरोबर दिसत नाहीं. कारण प्र, परा वगैरेंचा ज्या क्रियेशीं योग आहे त्या क्रियेच्या दृष्टीनेंच ते गति किंवा उपसर्ग समजले जातात. आणि येथें तर प्रति, परि आणि अनु यांचा वृक्ष वगैरेंशीं योग झालेला आहे. हा कांहीं क्रियायोग नव्हे.

तर मग येथें 'कर्मप्रवचनीयुक्ते द्वितीया' यानें द्वितीया करणें हा कर्मप्रवचनीयसंज्ञा करण्याचा उपयोग समजावा; जसें— वृक्षं प्रति विद्योतते, वृक्षमनु विद्योतते.

(सू.९३) अनर्थक अशा अधि आणि परि या शब्दांना कर्मप्रवचनीयसंज्ञा कशासाठीं सांगितली आहे ?

अधि आणि परि या शब्दांना कर्मप्रवचनीयसंज्ञा व्हावी, गतिसंज्ञा आणि उपसर्गसंज्ञा न व्हावी, यासाठीं सांगितली आहे.

हें प्रयोजन बरोबर दिसत नाहीं. कारण प्र, परा वगैरेंचा ज्या क्रियेशीं योग असेल त्या क्रियेच्या दृष्टीनेंच त्यांना गति आणि उपसर्ग या संज्ञा होत असतात. आणि प्रकृत अधि-परि हे शब्द तर अनर्थकच आहेत.

तर मग 'पञ्चम्यपाङ्परिभिः' (२।३।१०) यानें पञ्चमी होणें हा येथें कर्मप्रवचनीयसंज्ञा सांगण्याचा उपयोग समजावा; जसें— कुतः

---

विजेचें चमकणें ओळखिलें जातें म्हणून वृक्ष हें त्याचें लक्षण होय. भक्तो विष्णुं प्रति पर्यनु वा. हा विष्णूचा भक्त आहे. इत्थंभूताख्यान म्हणजे अमुक प्रकारचा आहे असें सांगणें. लक्ष्मीर्हरिं प्रति पर्यनु वा-लक्ष्मी हा हरीचा भाग होय. वृक्षं प्रति पर्यनु वा सिञ्चति. प्रत्येक झाडाला पाणी घालतो. वीप्सा म्हणजे क्रियेचा सर्वांशीं संबंध करणें.

२. कर्मप्रवचनीयसंज्ञा सांगितली म्हणजे अर्थातच तिनें गति आणि उपसर्ग या संज्ञांचा बाध होतो.

१. पूर्वसूत्रातील लक्षण वगैरे चार अर्थांपैकीं भाग ह्या अर्थाशिवाय बाकीचे अर्थ गम्यमान असतांना अभिशब्दाला कर्मप्रवचनीयसंज्ञा होते; उदा०—हरिमभि वर्तते, भक्तो हरिमभि, देवं देवमभि सिञ्चति.

१. मुख्य नसेल तेव्हां त्याच्याऐवजीं त्याच्यासारखा जो दुसरा उपस्थित होतो त्याला प्रतिनिधि म्हणतात. प्रतिदान म्हणजे परतफेड करणें. प्रतिनिधि आणि प्रतिदान हे अर्थ गम्यमान असतांना प्रति-शब्दाला कर्मप्रवचनीयसंज्ञा होते; उदा०— प्रद्युम्नः कृष्णात्प्रति, तिलेभ्यः प्रति यच्छति माषान्. येथें कर्मप्रवचनीयसंज्ञेमुळें पंचमी (२।३।११) झाली आहे.

१. अनर्थक अशा अधि आणि परि या शब्दांना कर्मप्रवचनीयसंज्ञा होते; उदा०— कुतोऽध्यागच्छति.

२. तेव्हां यांना क्रियायोग मुळींच संभवत नाहीं.

श्चापादानपञ्चम्येषा यत्राप्यधिशब्देन योगे पञ्चमी न विधीयते तत्रापि श्रूयते। कुतोऽध्यागम्यत इति ॥ एवं तर्हि सिद्धे सति यदनर्थकयोर्गत्युपसर्गसंज्ञाबाधिकां कर्मप्रवचनीयसंज्ञां शास्ति तज्ज्ञापयत्याचार्योऽनर्थकानामप्येषां भवत्यर्थवत्कृतमिति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । निपातस्यानर्थकस्य प्रातिपदिकत्वं चोदितं तन्न वक्तव्यं भवति ॥ अथवा नैवेमावनर्थकौ । किं तर्ह्यनर्थकावित्युच्यते । अनर्थान्तरवाचिनावनर्थकौ । धातुनोक्तां क्रियामाहतुः । तदविशिष्टं भवति यथा शङ्खे पयः ॥ यद्येवं धातुनोक्तत्वात्तस्यार्थस्योपसर्गप्रयोगो न प्राप्नोत्युक्तार्थानामप्रयोग इति । उक्तार्थानामपि प्रयोगो दृश्यते । तद्यथा । अपूपौ द्वावानय । ब्राह्मणौ द्वावानयेति ॥

[ **सुः पूजायाम्** ॥ १ । ४ । ९४ ॥
**अतिरतिक्रमणे च** ॥ १ । ४ । ९५ ॥]

**अपिः पदार्थसंभावनान्ववसर्ग-**

---

पर्यागम्यते.

कुतः पर्यागम्यते या उदाहरणामध्यें 'अपादाने पञ्चमी' (२।३।२८) यानेंच पंचमी साधत आहे. शिवाय येथें 'अपादाने पंचमी' यानें पंचमी होते असें म्हटलेंच पाहिजे. कारण कर्मप्रवचनीय अशा अधिशब्दाच्या योगीं पंचमीचें विधान नसतांही 'कुतोऽध्यागम्यते' येथें पंचमी दृष्टीस पडत आहे.

अशा रीतीनें सर्व इष्ट सिद्ध होत असतां ज्यापेक्षां हा आचार्य अनर्थक अशा अधि आणि परि या शब्दांना उपसर्गसंज्ञेची बाधक अशी कर्मप्रवचनीयसंज्ञा सांगत आहे त्यापेक्षां तो असें सुचवितो की अर्थवान् अशा शब्दाला सांगितलेलें कार्य अनर्थक अशा यांनाही होतें.

असें ज्ञापक केल्याचा काय उपयोग ?

अनर्थकनिपाताला प्रातिपदिकसंज्ञेदाखल वचन केलें तें (१।२।४५, वा.१२) करावयास नको.

अथवा अधि आणि परि हे शब्द अनर्थक नव्हेतच.

तर मग 'अनर्थकौ' असें विशेषण त्यांना लावलें आहे तें कसें ?

धातूनें दाखविलेल्या क्रियेपेक्षां निराळा अर्थ यांना कांहींच नाहीं. फक्त त्या क्रियेलाच हे दाखवितात. शंखामध्यें दूध ठेवल्यासारखेंच हें होत आहे.

असें आहे तर धातूनेंच ती क्रिया दाखविली असल्यामुळेंच त्या अर्थी पुनः अधि किंवा परि यांचा प्रयोगच होणार नाहीं. कारण जो अर्थ एका शब्दानें दाखविला तो अर्थ दाखविण्यासाठीं पुनः दुसऱ्या शब्दाचा प्रयोग करूं नये असा न्याय आहे.

ज्यांचा अर्थ इतर शब्दानें दाखविला आहे त्यांचाही पुनः प्रयोग केलेला दृष्टीस

---

३. तेव्हां येथें अपादाने पंचमी मानिल्याशिवाय गत्यंतरच नाहीं. त्याप्रमाणें कुतः पर्यागम्यते येथेंही पंचमी सिद्ध होईल.

४. या सुचविल्याप्रमाणें अधि व परि यांना उपसर्गसंज्ञा होऊं लागेल. तिच्या बाधाकरितां कर्मप्रवचनीयसंज्ञा सांगितली पाहिजे असें सिद्ध झालें.

५. जसें दूध शंखांत ठेविलें म्हणून कांहीं जास्त पांढरें होत नाहीं तसें येथें अधि आणि परि ह्यांचा प्रयोग केला म्हणून कांहीं त्यामुळें धातूनें दाखविलेल्या क्रियेमध्यें विशेष कांहींच दिसत नाहीं.

६. अपूपशब्दापुढील द्विवचनानें द्वित्वसंख्या उक्त झाली असतां पुनः तीच संख्या दाखविण्यासाठीं द्विशब्दाचा प्रयोग केला आहे. त्याप्रमाणें आगच्छति यानें आगमनार्थ उक्त झाला असतां पुनः तोच अर्थ दाखविण्यासाठीं अधि आणि परि या शब्दांचा येथें प्रयोग केला आहे असें समजावें.

१. पूजा हा अर्थ गम्यमान असतांना सु या शब्दाला कर्मप्रवचनीयसंज्ञा होते; उदा०— सुसिक्तं भवता.

१. अतिक्रमण किंवा पूजा हे अर्थ गम्यमान

**गर्हासमुच्चयेषु ॥१।४।९६॥**

इह कस्मान्न भवति । सर्पिषोऽपि स्यात् । गोमूत्रस्यापि स्यात् । किं च स्यात् । द्वितीयापि प्रसज्येत कर्मप्रवचनीययुक्ते द्वितीया [२.३.८] इति । नैष दोषः । नेमेऽप्यर्था निर्दिश्यन्ते । किं तर्हि । परपदार्था इमे निर्दिश्यन्ते । एतेष्वर्थेषु यत्पदं वर्तते तत्प्रत्यपिः कर्मप्रवचनीयसंज्ञो भवतीति ॥ अथवा यदत्र कर्मप्रवचनीययुक्तं नादः प्रयुज्यते । किं पुनस्तत् । बिन्दुः । बिन्दोस्तर्हि कस्मान्न भवति । उपपदविभक्तेः कारकविभक्तिर्बलीयसीति प्रथमा भविष्यतीति ॥

**अधिरीश्वरे ॥ १ । ४ । ९७ ॥**

**अधिरीश्वरवचन उक्तम् ॥ १ ॥**

किमुक्तम् । यस्य चेश्वरवचनमिति कर्तृनिर्देशश्चेदवचनात्सिद्धम् । प्रथमानुपपत्तिस्तु । स्ववचनात्सिद्धमिति । अधिः

---

पडतो; जसें—अपूपौ द्वावानय, ब्राह्मणौ द्वावानय.

(सू.९६) सर्पिषोऽपि स्यात्, गोमूत्रस्यापि स्यात्, येथें अपिशब्दाला कर्मप्रवचनीयसंज्ञा कां बरें होत नाहीं ? येथें षत्व न होण्याकरितां कर्मप्रवचनीयसंज्ञा होते असें गृहीत धरलें तर काय बरें बिघडेल ?

'कर्मप्रवचनीययुक्ते०' यानें सर्पिस्शब्दाच्या पुढें द्वितीया होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण हे अर्थ अपिशब्दाचे म्हणून गृहीत धरले नाहींत.

तर काय ?

हे दुसऱ्या पदाचे अर्थ आहेत असेंच येथें गृहीत धरलें आहे. म्हणजे या अर्थीं विद्यमान जें पद त्या पदाच्या संबंधानें अपिशब्दाला कर्मप्रवचनीयसंज्ञा होते. शिवाय सर्पिषोऽपि स्यात् येथें कर्मप्रवचनीयाशीं ज्या पदाचा संबंध आहे त्याचा प्रयोग केलेला नाहीं.

कोणतें बरें असें तें पद ?

बिन्दु हें होय ?

तर मग बिन्दुशब्दापुढें द्वितीया कां बरें होत नाहीं ?

'उपपदविभक्तींपेक्षां कारकविभक्ति बलिष्ठ होय' या वचनामुळें तेथें प्रथमाविभक्तिच होईल.

(सू.९७, वा.१) येथें जें काय सांगावयाचें तें 'यस्य चेश्वरवचनम्' (२।३।९) येथें सांगितलेंच आहे.

तें काय सांगितलें आहे ?

'यस्य चेश्वरवचनमिति कर्तृनिर्देशश्चेदवचनात्सिद्धम्', 'प्रथमानुपपत्तिस्तु', 'स्ववचनात्तु सिद्धम्' (२।३।९, वा.१।२।३). यस्य चेश्वरवचनम् येथें यस्य या शब्दानें कर्त्याचा म्ह. नियमन करणाऱ्या स्वामीचा निर्देश केला आहे असें गृहीत धरलें तर येथें सप्तमी सांगितली

---

असतांना अतिशब्दाला कर्मप्रवचनीयसंज्ञा होते; उदा०— अति देवान् कृष्णः, अति सिक्तं भवता.

१. पदार्थ, संभावना, अन्ववसर्ग, गर्हा आणि समुच्चय हे अर्थ गम्यमान असतांना अपिशब्दाला कर्मप्रवचनीयसंज्ञा होते. ज्या पदाचा प्रयोग नसला तरी जो अर्थ मनांत येतो तो पदार्थ होय. संभावना म्हणजे अत्युक्ति, अन्ववसर्ग म्हणजे कामचाराची मोकळीक देणें.

२. येथें स्यात् हें कर्तरि क्रियापदच अपिशब्दाच्या जोरावर बिन्दुरूपी कर्त्याला दाखवितें. म्हणून या वाक्यामध्यें बिंदुशब्दाचा प्रयोग केला नाहीं तरी चालेल. एकंदरीत येथें अपि या कर्मप्रवचनीयाचा संबंध स्यात् आणि बिन्दु या दोन्ही पदांशीं पोचतो, सर्पिस् या पदाशीं पोचत नाहीं, म्हणून येथें द्वितीया होत नाहीं.

१. स्वामित्व गम्यमान असतांना अधिशब्दाला कर्मप्रवचनीयसंज्ञा होते; उदा०— अधि भुवि रामः, अधि रामे भूः. येथें कर्मप्रवचनीयसंज्ञेमुळें सप्तमी (२।३।९) झाली आहे. अधि भुवि या उदाहरणामध्यें भूवरचें स्वत्व आणि अधि रामे या उदाहरणामध्यें रामावरचें स्वामित्व अधिशब्दानें द्योतित केलें आहे. तसेंच अधि पञ्चालेषु ब्रह्मदत्तः, अधि ब्रह्मदत्ते पञ्चालाः, येथें समजावें. स्वत्व आणि स्वामित्व या दोहोंपैकीं कोणत्याही एकाची शब्दापासून प्रतीति झाली म्हणजे

स्वं प्रति कर्मप्रवचनीयसंज्ञो भवतीति वक्तव्यम् ॥

[ विभाषा कृञि ॥१।४।९८॥]

लः परस्मैपदम् ॥ १।४।९९॥

लादेशे परस्मैपदग्रहणं पुरुषबाधितत्वात् ॥ १ ॥

लादेशे परस्मैपदग्रहणं कर्तव्यम् । किं कारणम् । पुरुषबाधितत्वात् ॥

इह वचने हि संज्ञाबाधनम् ॥ २ ॥

इह हि क्रियमाणेऽनवकाशा पुरुषसंज्ञा परस्मैपदसंज्ञां बाधेत ॥ परस्मैपदसंज्ञाप्यनवकाशा सा वचनाद्भविष्यति । सावकाशा परस्मैपदसंज्ञा । कोऽवकाशः । शतृक्वसू अवकाशः ॥

सिचि वृद्धौ तु परस्मैपदग्रहणं ज्ञापकं पुरुषाबाधकत्वस्य ॥ ३ ॥

यदयं सिचि वृद्धिः परस्मैपदेषु [७.२.१] इति परस्मैपदग्रहणं करोति तज्ज्ञापयत्याचार्यो न पुरुषसंज्ञां परस्मैपदसंज्ञां बाधत इति ॥

---

नाहीं तरी सिद्ध होईल.[2] शिवाय भू, पञ्चाल, या स्ववाचक पदांहून प्रथमा होणार नाहीं.[3] आतां यस्य या शब्दानें स्व—चा निर्देश केला आहे असें गृहीत धरलें तर हें सिद्ध होत आहे असें तेथें सांगितलें आहे. त्या धोरणानें येथें 'अधिः स्वे' असें सूत्र करून अधि याला कर्मप्रवचनीयसंज्ञा स्वत्वामुळें होते असें म्हणावें.

(सू.९९, वा.१) तिप्तस्झि इत्यादीला देशप्रकरणामध्यें परस्मैपदसंज्ञा सांगावी.

काय कारण ?

पुरुषबाधितत्वात् या आकडाराधिकारामध्यें सांगितलेल्या या संज्ञेचा पुरुषसंज्ञा (१।४।१०१) बाध करील.

(वा.२) या प्रकरणामध्यें परस्मैपदसंज्ञा सांगितली असतां अनवकाश अशी पुरुषसंज्ञा त्या परस्मैपदसंज्ञेचा बाध करील.

पण परस्मैपदसंज्ञाही अनवकाश आहे. तेव्हां विधानाचें जोरावर तीही होईल.

परस्मैपदसंज्ञा सावकाश आहे.

तो अवकाश कोणता ?

शतृ आणि क्वसु हा होय.

(वा.३) ज्यापेक्षां हा आचार्य 'सिचि वृद्धिः' (७।२।१) येथें परस्मैपदशब्द घालतो त्यापेक्षां पुरुषसंज्ञा परस्मैपदसंज्ञेचा बाध करीत नाहीं असें सुचवितो.[2]

---

तेथें दुसऱ्याची प्रतीति आपोआपच होते.

२. स्वामी हा स्वकीय वस्तूंचा आधार असल्यामुळें 'सप्तम्यधिकरणे च' (२।३।३६) यानेंच सप्तमी सिद्ध होईल.

३. अधि रामे येथें अधिकरणार्थी सप्तमी न करतां कर्मप्रवचनीयाशीं योग असल्यामुळें केली तर अधिपासून बोधित झालेल्या स्वामित्वाकडे रामाचा अन्वय होऊन रामगतस्वामित्व असा अर्थ होतो. यस्य चेश्वरवचनम् म्ह. ज्या स्वामीचें स्वामित्व दाखविणें आहे असें सप्तमीचें निमित्त असल्यामुळें सप्तमीच्या जोरावर रामे याचा भू-कडे संबंध मनांत येणार नाहीं. तेव्हां तेथें भू-चा संबंध जोडावयाचा म्हणजे भू-शब्दाहून प्रथमा होणार नाहीं, षष्ठी होईल.

४. या पक्षीं अधि रामे भूः हें कर्मप्रवचनीयसंज्ञा होऊन सप्तमी झाल्याचें उदाहरणच नव्हे, तर अधि भुवि रामः हेंच उदाहरण होय. येथें भू-वरील स्वत्व एवढाच अर्थ भुवि या पदापासून मनांत न येतां भू या स्वकीय वस्तूचा मालक असा रामाशीं संबंध जोडण्यापर्यंत अर्थ मनांत येतो, कारण 'यस्य चेश्वरवचनम्' म्ह. ज्या वस्तूचा मालक सांगावयाचा आहे असें सप्तमीचें निमित्तच धरलें आहे.

१. स्वामित्व गम्यमान असतांना आणि कृधातु पुढें असतांना अधिशब्दाला विकल्पानें कर्मप्रवचनीयसंज्ञा होते, उदा०- यदत्र मामधिकरिष्यति.

१. लकाराचे स्थानीं सांगितलेले जे आदेश त्यांना परस्मैपदसंज्ञा होते, उदा०- भवति.

२. जर पुरुषसंज्ञेनें परस्मैपदसंज्ञेचा बाध झाला तर परस्मैपदपरक सिच्प्रत्यय संभवत नसल्यामुळें

[ तङानावात्मनेपदम्[1]
॥ १ । ४ । १०० ]

तिङस्त्रीणि[1] त्रीणि प्रथममध्यमोत्तमाः ॥ १ । ४ । १०१ ॥

प्रथममध्यमोत्तमसंज्ञायामात्मनेपदग्रहणं समसंख्यार्थम् ॥ १ ॥

प्रथममध्यमोत्तमसंज्ञायामात्मनेपदग्रहणं कर्तव्यम् । आत्मनेपदानां च प्रथममध्यमोत्तमसंज्ञा भवन्तीति वक्तव्यम् । किं प्रयोजनम् । समसंख्यार्थम् । संख्यातानुदेशो यथा स्यात् । अक्रियमाणे ह्यात्मनेपदग्रहणे तिस्रः संज्ञाः षट् संज्ञिनः । वैषम्यात्संख्यातानुदेशो न प्राप्नोति ॥ क्रियमाणेऽपि चात्मनेपदग्रहण

आनुपूर्व्यवचनं च ॥ २ ॥

आनुपूर्व्यवचनं च कर्तव्यम् । अक्रियमाणे हि कस्याचिदेव त्रिकस्य प्रथमसंज्ञा स्यात्कस्यचिदेव मध्यमसंज्ञा कस्यचिदेवोत्तमसंज्ञा ॥

न वैकशेषनिर्देशात् ॥ ३ ॥

यत्तावदुच्यत आत्मनेपदग्रहणं कर्तव्यं समसंख्यार्थमिति तन्न कर्तव्यम् । संज्ञा अपि षडेव निर्दिश्यन्ते । कथम् । एकशेषनिर्देशात् । एकशेषनिर्देशोऽयम् ॥

---

(सू.१०१, वा.१) प्रथम, मध्यम आणि उत्तम या संज्ञा सांगणाऱ्या सूत्रामध्यें आत्मनेपदशब्द घालावा म्हणजे आत्मनेपदाच्याही तीन त्रिकांला प्रथम, मध्यम व उत्तम या संज्ञा सांगितल्या[2] जातील.

त्याचा काय उपयोग?

समसंख्यार्थम्. संज्ञा आणि संज्ञी यांची संख्या सारखी झाल्यामुळें त्यांचा क्रमानें अन्वय व्हावा हा उपयोग होय. आत्मनेपदशब्द घातला नाहीं तर संज्ञा तीन आणि संज्ञी जीं तिङाचीं त्रिकें तीं सहा असें होत आहे; तेव्हां संख्येच्या वैषम्यामुळें यथासंख्यान्वय होणार नाहीं.

आत्मनेपदानाम् असा निराळा शब्द घातला असतांही

(वा.२) परस्मैपदाचीं किंवा आत्मनेपदाचीं तीन त्रिकें घ्यावयाचीं तीं 'तिप्तस्झि' या सूत्रांतील पाठक्रमानेंच घ्यावयाचीं अशाबद्दल वचन केलें पाहिजे. जर तसें वचन केलें नाहीं तर त्रीणि त्रीणि या पदांपासून त्या त्रिकांची उपस्थिति होत असल्यामुळें कोणत्या तरी एका त्रिकाला प्रथम व कोणत्या तरी एका त्रिकाला मध्यम आणि कोणत्या तरी एका त्रिकाला उत्तम अशा अव्यवस्थित संज्ञा होतील.

(वा.३) यथासंख्यानें अन्वय होण्यासाठीं 'आत्मनेपदानाम्' हा निराळा शब्द घालावा असें जें म्हटलें आहे त्याप्रमाणें तो शब्द घालावयास नको. कारण प्रथम, मध्यम, इत्यादि संज्ञाही सूत्रामध्यें सहा उच्चारल्या आहेत.

त्या कशा ?

प्रथममध्यमोत्तमाः हें पद येथें एकशेष करून उच्चारलें आहे.

आतां प्रथममध्यमोत्तम या पदाचा एक-

---

त्या वृद्धीला उदाहरण मिळणार नाहीं.

१. त, आताम्, झ, इत्यादि तङ् नांवाचे नऊ प्रत्यय आणि शानच् व कानच् ह्यांना आत्मनेपदसंज्ञा होते; उदा०— एधते.

१. तिङ् नावाच्या अठरा प्रत्ययांपैकीं परस्मैपदसंज्ञक नऊ प्रत्ययांतील जीं तिप्, तस्, झि, इत्यादि तीन त्रिकें त्यांना, आणि आत्मनेपदसंज्ञक नऊ प्रत्ययांतील जीं त, आताम्, झ, इत्यादि तीन त्रिकें यांना क्रमानें प्रथम, मध्यम आणि उत्तम अशा संज्ञा होतात.

२. आत्मनेपदानाम् असा निराळा शब्द घालून निराळा वाक्यार्थ केला असतां एका वाक्यानें परस्मैपदाच्या तीन त्रिकांना तीन संज्ञा, आणि दुसऱ्या वाक्यानें आत्मनेपदाच्या तीन त्रिकांना तीन संज्ञा सांगितल्या असें होईल.

अथैतस्मिन्नेकशेषनिर्देशे सति किमयं कृतैकशेषाणां द्वन्द्वः । प्रथमश्च प्रथमश्च प्रथमौ । मध्यमश्च मध्यमश्च मध्यमौ । उत्तमश्चोत्तमश्चोत्तमौ । प्रथमौ च मध्यमौ चोत्तमौ च प्रथममध्यमोत्तमा इति । आहोस्वित्कृतद्वन्द्वानामेकशेषः । प्रथमश्च मध्यमश्चोत्तमश्च प्रथममध्यमोत्तमाः । प्रथममध्यमोत्तमाश्च प्रथममध्यमोत्तमाश्च प्रथममध्यमोत्तमा इति । किं चातः । यदि कृतैकशेषाणां द्वन्द्वः प्रथममध्यमयोः प्रथमसंज्ञा प्राप्नोत्युत्तमप्रथमयोर्मध्यमसंज्ञा प्राप्नोति मध्यमोत्तमयोरुत्तमसंज्ञा प्राप्नोति । अथ कृतद्वन्द्वानामेकशेषो न दोषो भवति । यथा न दोषस्तथास्तु ॥ किं पुनरत्र न्याय्यम् । उभयमित्याह । उभयं हि दृश्यते । तद्यथा । बहु शक्तिकिटकम् । बहूनि शक्तिकिटकानि । बहु स्थालीपिठरम् । बहूनि स्थालीपिठराणि ॥ यदप्युच्यते क्रियमाणेऽप्यात्मनेपदग्रहण आनुपूर्व्यवचनं कर्तव्यमिति । न कर्तव्यम् ।

---

शेषानें निर्देश केला आहे असें गृहीत धरलें असतां काय प्रथमश्च प्रथमश्च प्रथमौ, मध्यमश्च मध्यमश्च मध्यमौ, उत्तमश्च उत्तमश्च उत्तमौ, प्रथमौ च मध्यमौ च उत्तमौ च प्रथममध्यमोत्तमाः, असा प्रथम वगैरे शब्दांचा प्रथमतः एकशेष करून नंतर त्याचा द्वंद्वसमास केला आहे, अथवा प्रथमश्च मध्यमश्च उत्तमश्च प्रथममध्यमोत्तमाः, प्रथममध्यमोत्तमाश्च प्रथममध्यमोत्तमाश्चः प्रथममध्यमोत्तमाः असा प्रथम वगैरे शब्दांचा प्रथमतः द्वंद्व करून नंतर त्यांचा एकशेष केला आहे ?

या दोहोंमध्यें फरक काय ?

जर एकशेष करून नंतर त्यांचा द्वंद्व केला तर प्रथम आणि मध्यम अशा दोन संज्ञा परस्मैपदांतील ज्या दोन त्रिकांना पाहिजेत त्या दोन्ही त्रिकांना प्रथम अशीच संज्ञा होऊं लागेल. तसेंच परस्मैपदांतील तिसऱ्या त्रिकाला उत्तमसंज्ञा पाहिजे आहे व आत्मनेपदांतील पहिल्या त्रिकाला प्रथमसंज्ञा पाहिजे, पण आतां त्या दोन्ही त्रिकांना मध्यमसंज्ञा होऊं लागेल, तसेंच आत्मनेपदांतील दुसऱ्या आणि तिसऱ्या त्रिकाला मध्यम आणि उत्तम अशा संज्ञा पाहिजेत; तेथें त्या दोन्ही त्रिकांना उत्तमसंज्ञा होऊं लागेल.

आतां द्वंद्व करून नंतर एकशेष केला म्हणजे मात्र हा दोष येणार नाहीं.

ज्या तऱ्हेनें दोष येत नाहीं तीच तऱ्हा असूं दे.[३]

पण या दोन तऱ्हांपैकीं कोणती तऱ्हा रीतसर आहे ?

दोन्ही तऱ्हा रीतसरच आहेत असें म्हणतों कारण लोकांमध्यें दोन्ही प्रकारचे प्रयोग दृष्टीस पडतात; जसें – बहु शक्तिकिटकं; बहूनि शक्तिकिटकानि, बहुस्थालीपिठरं, बहूनि स्थालीपिठराणि. आणखीही जें म्हटलें आहे की आत्मनेपदानाम् असा शब्द सूत्रांत घातला असतांही सूत्रपठितक्रमानेंच त्रिकें घ्यावयाचीं, याबद्दल वचन केलें पाहिजे; तेंही करावयास

---

३. दोष न येण्याकरितां येथें जी एक तऱ्हा घेण्याचें ठरविलें असेल तीच तऱ्हा योग्य असेल तर उत्तमच; जर दोन्ही योग्य असतील तर व्याख्यानानें निर्णय करतां येईल; पण जर का अपेक्षित तऱ्हा अयोग्यच असेल तर मात्र ती येथें घेण्याला प्रमाण पाहिजे, अशा अभिप्रायानें हा प्रश्न येथें उपस्थित झाला आहे.

४. शक्तिश्च शक्तिश्च शक्तिश्च शक्तयः, किटकश्च किटकश्च किटकश्च किटकाः, शक्तयश्च किटकाश्च शक्तिकिटकम्, असा प्रथमतः एकशेष करून नंतर त्यांचा समाहारद्वंद्व केला म्हणजे बहुशक्तिकिटकम् असा प्रयोग होतो; आणि शक्तिश्च किटकश्च अनयोः समाहारः शक्तिकिटकम्, शक्तिकिटकं च शक्तिकिटकं च शक्तिकिटकं च शक्तिकिटकानि, असा द्वंद्व करून नंतर त्यांचा एकशेष केला असतां बहूनि शक्तिकिटकानि असा प्रयोग होतो. दोन्ही प्रयोग व्याकरणशुद्ध आहेत. शक्ति म्हणजे एक प्रकारचें आयुध आणि किटक म्हणजे एक प्रकारचें शस्त्र होय.

लोकत एतत्सिद्धम् । तद्यथा । लोके विहव्यस्य द्वाभ्यां द्वाभ्यामग्निरुपस्थेय इति न चोच्यत आनुपूर्व्येणेत्यानुपूर्व्येण चोपस्थीयत इति ॥

**[तान्येकवचनद्विवचनबहुवचनान्येकशः ॥ १ । ४ । १०२ ॥**

**सुपः ॥ १ । ४ । १०३ ॥]**

**विभक्तिश्च ॥ १ । ४ । १०४ ॥**

त्रीणि त्रीणीत्यनुवर्तत उताहो न । किं चातः । यद्यनुवर्ततेऽष्टन आ विभक्तौ [७.२.८४] इत्यात्वं न प्राप्नोति । अथ निवृत्तं प्रथमयोः पूर्वसवर्णः [६.१.१०२] इत्यत्र प्रत्यययोरेव ग्रहणं प्राप्नोति । यथेच्छसि तथास्तु ॥ अस्तु तावदनुवर्तत इति । ननु चोक्तमष्टन आ विभक्ताविसत्यात्वं न प्राप्नोतीति । वचनाद्भविष्यति ॥ अथवा पुनरस्तु निवृत्तम् । ननु चोक्तं प्रथमयोः पूर्वसवर्ण इत्यत्र प्रत्यययोरेव

---

नको. कारण कोणतीही क्रिया क्रमानें करणें हें लोकव्यवहारावरूनच सिद्ध होत आहे; जसें– विहव्यसूक्ताच्या दोन दोन ऋचांनीं अग्नीचें उपस्थान करावें असें सांगितलें असतां तेथें आपोआपच सूक्तपठित क्रमानें दोन दोन ऋचांनीं अग्नीचें उपस्थान केलें जातें.

(सू.१०४) येथें पूर्वसूत्रांतून त्रीणि त्रीणि या पदांची अनुवृत्ति आहे किंवा नाहीं ?

या दोहोंमध्यें काय बरें फरक होत आहे ?

जर अनुवृत्ति आहे असें गृहीत धरलें तर अष्टाभिः इत्यादि उदाहरणांमध्यें 'अष्टन आ विभक्तौ' (७।२।८४) हें आत्व होणार नाहीं.[2]

आतां जर अनुवृत्ति नाहीं असें गृहीत धरलें तर 'प्रथमयोः पूर्वसवर्णः (६।१।१०२) येथें प्रथमयोः या पदापासून पहिल्या दोनच प्रत्ययांची उपस्थिति होण्याची पाळी ओढवते.[3]

ह्या दोहोंपैकीं जसें तुला वाटेल तसें असूं दे.

त्रीणि त्रीणि या पदांची अनुवृत्ति होते असें का असेना ?

पण अष्टाभिः इत्यादि उदाहरणांमध्यें 'अष्टन आ' हें आत्व होणार नाहीं असें म्हटलें आहे ना ?

ज्या अर्थी विभक्ति पुढें असतांना आत्व सांगितलें आहे त्या अर्थी त्याला उदाहरण मिळण्याकरितां तेथें आत्व होईल.[4]

अथवा अनुवृत्ति नाहीं असें का असेना ?

पण 'प्रथमयोः पूर्वसवर्णः' येथें प्रथमयोः या पदापासून पहिले दोन प्रत्ययच मनांत

---

५. ममाग्ने वर्चो विहवेष्वस्तु (ऋ. १०.१२८) या सूक्ताला विहव्यसूक्त म्हणतात.

१. ज्यांना प्रथम, मध्यम वगैरे संज्ञा प्राप्त झाल्या आहेत अशा तिङाच्या प्रत्येक त्रिकांतील एकेक प्रत्ययाला क्रमानें एकवचन, द्विवचन आणि बहुवचन अशा संज्ञा होतात.

१. सुप्-(४।१।२)प्रत्याहारांतील प्रत्येक त्रिकापैकीं एकेक प्रत्ययाला क्रमानें एकवचन, द्विवचन आणि बहुवचन अशा संज्ञा होतात.

१. सुप् आणि तिङ् ह्या प्रत्ययांना विभक्ति अशी संज्ञा होते.

२. त्रीणि त्रीणि या पदांची अनुवृत्ति गृहीत धरली असतां सुप् आणि तिङ् नांवांच्या प्रत्ययांना तिघातिघांना मिळून विभक्तिसंज्ञा होते असा या सूत्राचा अर्थ होतो. तेव्हां तिघांच्या समुदायाला विभक्तिसंज्ञा ठरल्यानें अष्टन्शब्दाच्या पुढें तिघांचा समुदाय नसल्यामुळें अष्टाभिः इत्यादि उदाहरणांमध्यें आत्व होणार नाहीं.

३. अनुवृत्ति नाहीं असें गृहीत धरलें तर सुप् किंवा तिङ् ह्या प्रत्याहारांतील प्रत्येक प्रत्ययाला विभक्तिसंज्ञा होते. तेव्हां प्रथमयोः या द्विवचनान्त प्रथमशब्दापासून पहिल्या दोनच विभक्ति म्हणजे फक्त पहिले दोन प्रत्यय मनांत येतील.

४. तिघांना मिळून विभक्तिसंज्ञा झाली तरी त्या तिघांचा युगपत्प्रयोग कोठेंही नसल्यामुळें त्या विभक्तिसंज्ञेचा उपयोग त्या तिघांतील प्रत्येक प्रत्ययाला करतां येईल.

ग्रहणं प्राप्नोतीति । नैष दोषः । अचीत्यनुवर्तते न चाजादी प्रथमौ प्रत्ययौ स्तः । ननु चैवं विज्ञायतेऽजादी यौ प्रथमावजादीनां वा यौ प्रथमाविति । यत्तर्हि तस्माच्छसो नः पुंसि [६.१.१०३] इत्यनुक्रान्तं पूर्वसवर्णदीर्घं प्रतिनिर्दिशति तज्ज्ञापयत्याचार्यो विभक्त्योर्ग्रहणमिति ॥ अथवा वचनग्रहणमेव कुर्यात् । औजसोः पूर्वसवर्ण इति ॥

**युष्मद्युपपदे समानाधिकरणे स्थानिन्यपि मध्यमः ॥१।४।१०५**

**[प्रहासे च मन्योपपदे मन्यतेरुत्तम एकवच्च ॥ १ । ४ । १०६ ॥]**

**अस्मद्युत्तमः ॥ १।४।१०७ ॥**

**शेषे प्रथमः ॥१।४।१०८॥**

---

येतील असा दोष दाखविला आहे ना ?

हा दोष येत नाहीं. कारण तेथें (३।१।१०२) अचि या पदाची अनुवृत्ति येत आहे. आणि प्रथमयोः या पदापासून उपस्थित होणारे जे पहिले दोन प्रत्यय ते तर अजादि नाहींत.

पण सु औ जस्, इत्यादि प्रत्ययांपैकीं पहिले जे अजादि दोन प्रत्यय किंवा अजादि प्रत्ययांपैकीं जे पहिले दोन प्रत्यय असा त्याचा अर्थ समजतां येईल.

तर मग आचार्यांनें 'तस्माच्छसो नः पुंसि' (६।१।१०३) येथील तच्छब्दानें पूर्वसूत्रांतील पूर्वसवर्णदीर्घाचा जो परामर्श केला आहे त्यावरून त्यानें सुचविलें आहे की प्रथमयोः या पदानें प्रथमा व द्वितीया अशा दोन विभक्ति येथें घ्यावयाच्या आहेत.

अथवा प्रथमयोः या पदानें अजादि दोन प्रत्यय घ्यावयाचे असें आचार्याच्या मनांत असतें तर त्यानें स्पष्ट प्रतिपत्त्यर्थ 'औजसोः पूर्वसवर्णः' असें त्या दोन वचनांचें सूत्रामध्यें उच्चारणच केलें असतें.

(सू.१०५,१०७,१०८) युष्मदि, अस्मदि

---

५. औ हा प्रत्यय जरी अजादि आहे तरी सुप्रत्यय अजादि नसल्यामुळें अचि हे दोघांना विशेषण संभवत नाहीं, आणि प्रथमयोः या पदानें दोन त्रिकें घेतलीं म्हणजे त्या दोघांना अचि हें विशेषण संभवतें. तेव्हां त्याच्या जोरावर येथें दोन त्रिकें घेतां येतील आणि दोष राहणार नाहीं.

६. तेव्हां प्रथमयोः या पदानें दोन प्रत्यय घेतले तरी अचि याचा त्यांच्याशीं संबंध संभवत असल्यामुळें दोन त्रिकें घेण्यास प्रमाण नाहीं असें सिद्ध होतें.

७. जर प्रथमयोः यानें दोन प्रत्यय घेतले तर त्यांमध्यें शस्प्रत्यय येत नाहीं, म्हणून पूर्व सवर्णदीर्घाच्या पुढें शस्प्रत्ययाचा सकार संभवणार नाहीं, आणि तें सूत्र व्यर्थ होईल.

८. तेव्हां प्रथमयोः या पदानें पहिलीं दोन त्रिकेंच घ्यावयाचीं असा त्याच्या मनांतील अभिप्राय स्पष्टच सिद्ध होतो.

१. (१०५,१०७,१०८) युष्मच्छब्द हा कर्तरिप्रयोगामध्यें कर्ता असेल किंवा कर्मणिप्रयोगामध्यें कर्म असेल तर धातूच्या पुढील लकाराचे स्थानीं मध्यमपुरुष होतो; मग तेथें युष्मच्छब्दाचा प्रत्यक्ष प्रयोग असो किंवा नसो. नसला तर अध्याहृत घेतां येईल. असाच जर अस्मच्छब्द कर्ता किंवा कर्म असेल तर उत्तमपुरुष होतो, आणि जर युष्मद् व अस्मद् यांशिवाय निराळा शब्द कर्ता किंवा कर्म असेल तर प्रथमपुरुष होतो; उदा०— त्वं मां देवदत्तं वा पश्यसि, मया देवदत्तेन वा त्वं दृश्यसे, अहं त्वां देवदत्तं वा पश्यामि, त्वया देवदत्तेन वा अहं दृश्ये, देवदत्तः त्वां मां वा पश्यति, त्वया मया वा देवदत्तो दृश्यते.

१. (१०६) परिहासानें केलेल्या भाषणामध्यें ज्या धातूला मन्यधातु उपपद असेल त्या धातूच्या पुढील लकाराचे स्थानीं उत्तमपुरुष करण्याचा प्रसंग आला असतां मध्यमपुरुष करावा, आणि मन्यधातूच्या पुढील लकाराचे स्थानीं मध्यमपुरुष करण्याचा प्रसंग आला असतां उत्तमपुरुष करावा, पण फक्त तेथें त्या उत्तमपुरुषाचें एकवचनच करावें; उदा०— अहम् ओदनं भोक्ष्यसे इति त्वं मन्ये किंतु भुक्तः सोऽतिथिभिः.

किमर्थमिदमुच्यते ।

**युष्मदस्मच्छेषवचनं नियमार्थम् ॥१॥**

नियमार्थोऽयमारम्भः ॥ अथैतस्मिन्नियमार्थे विज्ञायमाने किमयमुपपदनियमः। युष्मदि मध्यमः एव। अस्मद्युत्तम एव । आहोस्वित्पुरुषनियमः । युष्मद्येव मध्यमः। अस्मद्येवोत्तम इति । किं चातः। यदि पुरुषनियमः शेषग्रहणं कर्तव्यं शेषे प्रथम इति। किं कारणम्। मध्यमोत्तमौ नियतौ युष्मदस्मदी अनियते तत्र प्रथमोऽपि प्राप्नोति। तत्र शेषग्रहणं कर्तव्यं प्रथमनियमार्थम्। शेष एव प्रथमो भवति नान्यत्रेति। अथाप्युपपदनियम एवमपि शेषग्रहणं कर्तव्यं शेषे प्रथम इति। युष्मदस्मदी नियते मध्यमोत्तमावनियतौ तौ शेषेऽपि प्राप्नुतः। तत्र शेषग्रहणं कर्तव्यं शेषनियमार्थम् । शेषे प्रथम एव भवति नान्य इति ॥ उप-

---

आणि शेषे हीं सूत्रें कशासाठीं केलीं आहेत[2]?

(वा. १) युष्मदि, अस्मदि आणि शेषे हीं तीन सूत्रें नियमासाठीं केलीं आहेत. आतां हीं सूत्रें नियमासाठीं केलीं आहेत असें ठरलें असतां असा प्रश्न उद्भवतो की युष्मद्शब्द उपपद असतांना मध्यमपुरुषच करावा आणि अस्मत्शब्द उपपद असतांना उत्तमपुरुषच करावा, असा हा उपपदाचा नियम आहे किंवा युष्मत्शब्दच उपपद असतांना मध्यमपुरुष करावा, आणि अस्मत्शब्दच उपपद असतांना उत्तमपुरुष करावा, असा हा पुरुषाचा नियम आहे ?

या दोहोंमध्यें फरक काय ?

जर युष्मत्शब्दच असतां मध्यमपुरुष होतो आणि अस्मत्शब्दच असतां उत्तमपुरुष होतो, असा पुरुषनियम असेल तर 'शेषे प्रथमः' असा शेषशब्द घालून प्रथम पुरुषाचा नियम करावा लागेल.

काय कारण ?

मध्यम आणि उत्तम हे दोन पुरुष युष्मद् आणि अस्मद् हे शब्द उपपद असतांनाच करावेत असे नियन्त्रित केले आहेत. पण युष्मद् आणि अस्मद् हे उपपद असतांना मध्यम आणि उत्तम पुरुषच करावेत असे ते शब्द नियन्त्रित केले नाहींत, म्हणून तेथें प्रथमपुरुषही येऊं शकतो. तो प्रथमपुरुष युष्मद् अस्मद् यांशिवाय उपपद असेल तरच करावा, नाहीं तर करूं नये, असा नियन्त्रित करण्यासाठीं शेषे प्रथमः असें म्हणावें लागतें.

आतां युष्मत्शब्द उपपद असतांना मध्यमपुरुषच करावा, प्रथम किंवा उत्तम करूं नये, आणि अस्मच्छब्द उपपद असतांना उत्तमच करावा प्रथम किंवा मध्यम करूं नये, असा उपपदनियम गृहीत धरला असतांही 'शेषे प्रथमः' असा शेषशब्द घालून नियम केलाच पाहिजे. कारण या पक्षीं युष्मद् व अस्मद् हे शब्द उपपद असतांना मध्यम व उत्तमच करावेत अशा रीतीनें ते शब्द नियन्त्रित झाले आहेत. पण मध्यम व उत्तमपुरुष हे नियन्त्रित न होतां मोकळेच सुटले आहेत, म्हणून ते युष्मद् व अस्मद् यांशिवाय इतर शब्द उपपद असेल त्या ठिकाणींही होऊं लागतील. त्यांच्या बंदीसाठीं युष्मद् व अस्मद् यांशिवाय इतर शब्द उपपद असतांना प्रथमपुरुषच करावा, मध्यम किंवा उत्तम करूं नये, असा नियम झाला पाहिजे. म्हणून 'शेषे प्रथमः' असें म्हटलें पाहिजे.

आतां उपपदनियमपक्षीं शेषशब्द घाला-

---

२. कारण 'तिप्तस्झि' (३।४।७८)' या सामान्यसूत्रानें युष्मच्छब्द उपपद असतांना मध्यमपुरुष होईलच, तसा अस्मच्छब्द उपपद असतांना उत्तमपुरुष होईलच व इतर उपपद असतांना प्रथमपुरुषही होईलच.

पदनियमे शेषग्रहणं शक्यमकर्तुम् । कथम् । युष्मदस्मदी नियते मध्यमोत्तमावनियतौ तौ शेषेऽपि प्राप्नुतः । ततो वक्ष्यामि प्रथमो भवतीति । तन्नियमार्थं भविष्यति । यत्र प्रथमश्चान्यश्च प्राप्नोति तत्र प्रथम एव भवतीति ॥

**तत्र युष्मदस्मदन्येषु प्रथमप्रतिषेधः शेषत्वात् ॥ २ ॥**

तत्र युष्मदस्मदन्येषु प्रथमस्य प्रतिषेधो वक्तव्यः । त्वं च देवदत्तश्च पचथः । अहं च देवदत्तश्च पचावः । किं कारणम् । शेषत्वात् । शेषे प्रथम इति प्रथमः प्राप्नोति ॥

**सिद्धं तु युष्मदस्मदोः प्रतिषेधात् ॥ ३**

सिद्धमेतत् । कथम् । युष्मदस्मदोः प्रतिषेधात् । शेषे प्रथमो युष्मदस्मदोर्नेति वक्तव्यम् ॥

**युष्मदि मध्यमादस्मद्युत्तमो विप्रतिषेधेन ॥ ४ ॥**

युष्मदि मध्यमादस्मद्युत्तम इत्येतद्भवति विप्रतिषेधेन । युष्मदि मध्यम इत्यस्यावकाशः । त्वं पचसि । अस्मद्युत्तम इत्यस्यावकाशः । अहं पचामि । इहोभयं प्राप्नोति । त्वं चाहं च पचावः । अस्मद्युत्तम इत्येतद्भवति विप्रतिषेधेन ॥ स तर्हि विप्रतिषेधो वक्तव्यः । न वक्तव्यः । त्यदादीनां यद्यत्परं तत्तच्छिष्यत इत्येवमस्मदः शेषो भविष्यति । तत्रास्मद्युत्तम इत्येव सिद्धम् ॥

**अनेकशेषभावार्थं तु ॥ ५ ॥**

अनेकशेषभावार्थं तु स विप्रतिषेधो

---

वयास नको.

तो कसा ?

या वेळीं मध्यम व उत्तमपुरुष यांच्याशीं युष्मद् व अस्मद् हे शब्द नियन्त्रित झाले आहेत, तरी पण ते मध्यम व उत्तमपुरुष हे नियन्त्रित नाहींत. म्हणून ते इतर शब्द उपपद असतांनाही प्राप्त होतात. सबब 'प्रथमः' एवढेंच सूत्र करावें. तें नियमार्थ होईल. तो नियम असा– जेथें प्रथम आणि इतर पुरुष प्राप्त होतील तेथें प्रथमपुरुषच करावा.

(वा.२) उपपदनियम असो किंवा पुरुषनियम असो, दोन्ही पक्षीं युष्मत्शब्द किंवा अस्मत्शब्द आणि त्याच्या जोडीला दुसरा कोणी तरी शब्द असे एका ठिकाणींच दोन शब्द उपपद असतांना तेथें प्रथमपुरुषाच्या निषेधादाखल वचन केलें पाहिजे; जसें–त्वं च देवदत्तश्च पचथः, अहं च देवदत्तश्च पचावः.

काय कारण ?

'शेषे प्रथमः' यानें तेथें प्रथमपुरुष प्राप्त होत आहे.

(वा.३) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

'शेषे प्रथमः', 'युष्मदस्मदोर्न' युष्मद् आणि अस्मद् हे शब्द उपपद असतांना प्रथमपुरुष होत नाहीं असें म्हणावें.

(वा.४) 'युष्मद्युपपदे' यानें सांगितलेल्या मध्यमपुरुषापेक्षां 'अस्मद्युत्तमः' यानें सांगितलेला उत्तमपुरुष विप्रतिषेधानें होतो. 'युष्मद्युपपदे' यानें सांगितलेल्या मध्यमपुरुषाला त्वं पचसि येथें चारितार्थ्य आहे व 'अस्मद्युत्तमः' यानें सांगितलेल्या उत्तमपुरुषाला अहं पचामि येथें चारितार्थ्य आहे, आणि त्वं च अहं च पचावः येथें मध्यम आणि उत्तम असे दोन्ही पुरुष प्राप्त होतात. तेथें विरोध असल्यामुळें मध्यमाचा बाध करून उत्तमपुरुष होतो.

तर मग तसें वचन केलें पाहिजे.

तसें वचन करावयास नको. कारण त्वं च अहं च येथें 'त्यदादीनां मिथः सहोक्तौ यत्परं तच्छिष्यते' या वचनानें अस्मच्छब्दाचा एकशेष होईल. तेव्हां तेथें आपोआपच 'अस्मद्युत्तमः' यानें उत्तमपुरुष साधत आहे.

(वा.५) जेव्हां एकशेष होत नाहीं तेव्हां

वक्तव्यो यदा चैकशेषो न। कदा चैकशेषो न। सहविवक्षायामेकशेषः। यदा न सहविवक्षा तदैकशेषो नास्ति ॥

**न वा युष्मदस्मदोरनेकशेषभावात्तदधिकरणानामप्यनेकशेषभावादविप्रतिषेधः ॥ ६ ॥**

न वार्थो विप्रतिषेधेन। किं कारणम्। युष्मदस्मदोरनेकशेषभावात्तदधिकरणानामपि युष्मदस्मदधिकरणानामप्येकशेषेण न भवितव्यम्। त्वं चाहं च पचसि पचामि चेति ॥

**क्रियापृथक्त्वे च द्रव्यपृथक्त्वदर्शनमनुमानमुत्तरत्रानेकशेषभावस्य ॥ ७ ॥**

क्रियापृथक्त्वे च द्रव्यपृथक्त्वं दृश्यते। तद्यथा। पचसि पचामि च त्वं चाहं चेति। तदनुमानमुत्तरयोरपि क्रिययोरेकशेषो न भवतीति। एवं च कृत्वा सोऽप्यदोषो भवति यदुक्तं तत्र युष्मदस्मदन्येषु प्रथमप्रतिषेधः शेषत्वादिति। तत्रापि ह्येवं भवितव्यम्। त्वं च देवदत्तश्च पचसि पचति च। अहं च देवदत्तश्च पचामि पचति चेति ॥

---

उत्तमपुरुष होण्यासाठीं तो विप्रतिषेध सांगितला पाहिजे; जसें– त्वं च अहं च पचावः.

केव्हां एकशेष होत नाहीं ?

सहविवक्षा[4] असतांना एकशेष होतो. अर्थात् जेव्हां सहविवक्षा नसते तेव्हां एकशेष होत नाहीं.

(वा.६) अथवा तसें विप्रतिषेधवचन करावयास नको.

काय कारण ?

सहविवक्षा नसल्यामुळें जसा युष्मद् व अस्मद् यांचा एकशेष होत नाहीं त्याप्रमाणें युष्मद् आणि अस्मद् या दोघांच्या दोन पचनक्रियांचे वाचक जे पच्धातु त्यांचाही एकशेष होत नाहीं. तेव्हां त्वं च अहं च पचसि पचामि च असा क्रियापदांचाही निरनिराळाच प्रयोग होतो. म्हणून विप्रतिषेधवचनाची जरूर दिसत नाहीं.

(वा.७) ज्या ठिकाणीं क्रिया निरनिराळया असतात तेथें त्या क्रियांचे आश्रयही निरनिराळेच दृष्टीस पडतात; जसें– पचसि च पचामि च त्वं च अहं च[5]. हेंच आरंभीं द्रव्याचा भेद दाखवून त्यानंतर दाखविल्या जाणाऱ्या त्यांच्या क्रियाही निरनिराळयाच दाखविल्या पाहिजेत अशाविषयीं अनुमान होतें. एकंदरींत कर्त्यांचा निर्देश निरनिराळा केला असला की त्यांच्या क्रियांचा निर्देश एकशेषानें न करतां निरनिराळाच करावा लागतो असें ठरल्यामुळें उपपदनियम असो किंवा पुरुषनियम असो दोन्ही पक्षीं युष्मद् किंवा अस्मद् हा शब्द आणि त्याच्या जोडीला दुसरा कोणी तरी शब्द उपपद असतां तेथें प्राप्त होणाऱ्या प्रथमपुरुषाच्या निषेधासाठीं वचन केलें पाहिजे, असें जें म्हटलें तोही दोष येत नाहीं. कारण तेथेंही त्वं च देवदत्तश्च पचसि च पचति च, अहं च देवदत्तश्च पचामि च पचति च, असा क्रियापदांचा पार्थक्यानेंच प्रयोग होणार आहे.

आतां जें म्हटलें आहे की युष्मद् व

---

४. ज्या ठिकाणीं अनेक पदार्थांचा मिळून एकावर अन्वय करण्याची जी विवक्षा तिला सहविवक्षा म्हणतात; उदा०– घटपटावानय. येथें घट आणि पट या दोघांचा मिळून आनयनक्रियेवर कर्म या नात्यानें अन्वय आहे. घटं पटं चानय येथें घट आणि पट या दोघांचा एकाच आनयनक्रियेवर कर्म या नात्यानें अन्वय आहे. तरी तो मिळून झालेला नाहीं, निरनिराळा आहे, म्हणून तेथें सहविवक्षा नाहीं.

५. येथें पचसि आणि पचामि असा दोनदा पच्धातूचा निर्देश करून दोन पचिक्रिया दाखवल्या की तेथें त्याच्यापुढें त्यांच्या कर्त्यांचा निर्देश निरनिराळा दोनदा करावाच लागतो.

यत्तावदुच्यते न वा युष्मदस्मदोरनेकशेषभावात्तदधिकरणानामप्यनेकशेषभावादविप्रतिषेध इति दृश्यते हि युष्मदस्मदोश्चानेकशेषस्तदधिकरणानां चैकशेषः। तद्यथा। त्वं चाहं च वृत्रहन्नुभौ संप्रयुज्यावहा इति ॥

यदप्युच्यते क्रियापृथक्त्वे च द्रव्यपृथक्त्वदर्शनमनुमानमुत्तरत्रानेकशेषभावस्येति क्रियापृथक्त्वे खल्वपि द्रव्यैकशेषो भवतीति दृश्यते। तद्यथा। अक्षा भज्यन्तां भक्ष्यन्तां दीव्यन्तामिति । एवं च कृत्वा सोऽपि दोषो भवति यदुक्तं तत्र युष्मदस्मदन्येषु प्रथमप्रतिषेधः शेषत्वादिति ॥ नैष दोषः। परिहृतमेतत्सिद्धं युष्मदस्मदोः प्रतिषेधादिति ॥ स तर्हि प्रतिषेधो वक्तव्यः। न वक्तव्यः। शेषे प्रथमो विधीयते न हि शेषश्चान्यश्च शेषग्रहणेन गृह्यते। भवेत्प्रथमो न स्यान्मध्यमोत्तमावपि न प्राप्नुतः। किं कारणम्। युष्मदस्मदोरुपपदयोर्मध्यमोत्तमावुच्येते न च युष्म-

---

अस्मद् या शब्दांचा एकशेष केला नसला म्हणजे तेथें त्यांच्या क्रियावाचक पच् वगैरे धातूंचाही एकशेषानें निर्देश करतां येणार नाहीं, म्हणून विप्रतिषेधवचनाची जरूर नाहीं. त्यावर उत्तरः– युष्मद् व अस्मद् या शब्दांचा एकशेष केला नसला तरी तेथें क्रियावाचक धातूंचा एकशेष केलेला दृष्टीस पडतो; जसें– त्वं च अहं च वृत्रहन्नुभौ संप्रयुज्यावहै.

आणखीही जें म्हटलें आहे की क्रियेचा भेदानें निर्देश केला असेल तर तेथें त्या क्रियेच्या कर्त्यांचाही भेदानेंच निर्देश केलेला दृष्टोत्पत्तीस येतो, यावरून कर्त्यांचा भेदानें निर्देश केला असेल तर तेथें क्रियेचाही भेदानेंच निर्देश केला पाहिजे असें अनुमान निघतें. त्यावर उत्तरः–

क्रियेचा भेदानें निर्देश असतांनाही तेथें कर्त्यांचा एकशेषानें निर्देश केलेला दृष्टोत्पत्तीस येतो; जसें– अक्षाः भज्यन्तां भक्षन्तां दीव्यन्ताम्. आणि अशा रीतीनें प्रयोग होत असले म्हणजे युष्मद् व अस्मद् हे शब्द आणि त्यांच्या जोडीला कोणी तरी दुसरा शब्द असें उपपद असतांना तेथें 'शेषे प्रथमः' यानें प्राप्त झालेल्या प्रथमपुरुषाच्या निषेधादाखल वचन केलें पाहिजे असें जें म्हटलें आहे तोही दोष नाहींसा होत नाहीं.

पण हा दोष नाहीं. या दोषाचा परिहार पूर्वी केलाच आहे. 'शेषे प्रथमः' याच्यापुढें 'युष्मदस्मदोर्न' असें सूत्र करून प्रथमपुरुषाचा निषेध केला आहे.

तर मग 'युष्मदस्मदोर्न' असा प्रतिषेध अवश्य केला पाहिजे.

प्रतिषेध करावयास नको. कारण शेष म्ह. युष्मद् व अस्मद् यांहून निराळा शब्द उपपद असतांना प्रथमपुरुषाचें विधान केलें आहे, आणि येथें तर युष्मद् व अस्मद् यांपैकीं एक असून त्याच्या जोडीला निराळा दुसरा असलेला शब्द मिळून समुदाय उपपद आहे. या समुदायाला शेष म्हणतां येत नाहीं.

अशा रीतीनें प्रथमपुरुष होणार नाहीं हें खरें, पण याच रीतीनें मध्यम व उत्तमपुरुषही होणार नाहींत.

काय कारण ?

युष्मद् व अस्मद् हे शब्द उपपद असतांना मध्यम व उत्तम या पुरुषांचें विधान केलें आहे, आणि युष्मद् व अस्मद् यांपैकीं एक व त्याच्या जोडीला दुसरा कोणी तरी शब्द या समुदायाला युष्मद् किंवा अस्मद् असें म्हणतां येत नाहीं.

---

६. तेव्हां त्याप्रमाणें त्वं च अहं च पचावः असा प्रयोग होईल व तेथें मध्यमपुरुष न व्हावा याकरतां प्रतिषेधवचन केलें पाहिजे.

दस्मदी अन्यश्च युष्मदस्मद्ग्रहणेन गृह्यते। यदत्र युष्मच्चास्मच्च तदाश्रयौ मध्यमोत्तमौ भविष्यतः। यथैव तर्हि यदत्र युष्मच्चास्मच्च तदाश्रयौ मध्यमोत्तमौ भवत एवं योऽत्र शेषस्तदाश्रयः प्रथमः प्राप्नोति ॥ एवं तर्हि शेष उपपदे प्रथमो विधीयते। उपोच्चारि पदमुपपदम्। यच्चात्रोपोच्चारि न स शेषो यश्च शेषो न तदुपोच्चारि। भवेत्प्रथमो न स्यान्मध्यमोत्तमावपि न प्राप्नुतः। किं कारणम्। युष्मदस्मदोरुप-पदयोर्मध्यमोत्तमावुच्येते। उपोच्चारि पदमुपपदम्। यच्चात्रोपोच्चारि न ते युष्मदस्मदी ये च युष्मदस्मदी न तदुपोच्चारि ॥ एवं तर्हि शेषेण सामानाधिकरण्ये प्रथमो विधीयते न चात्र शेषेणैव सामानाधिकरण्यम्। भवेत्प्रथमो न स्यान्मध्यमोत्तमावपि न प्राप्नुतः। किं कारणम्। युष्मदस्मद्भ्यां सामानाधिकरण्ये मध्यमोत्तमावुच्येते न चात्र युष्मदस्मद्भ्यामेव सामानाधिकरण्यम् ॥ एवं तर्हि त्यदा-

---

तरी पण त्या समुदायांतील घटक असा जो युष्मद् किंवा अस्मद् हा शब्द त्यावर अवलंबून मध्यम किंवा उत्तम पुरुष करण्यास हरकत दिसत नाहीं.

तर मग ज्याप्रमाणें समुदायांतील घटक असा जो युष्मद् किंवा अस्मद् हा शब्द त्यावर अवलंबून मध्यम किंवा उत्तम पुरुष प्राप्त होतो याप्रमाणें त्याच समुदायांतील घटक असा जो दुसरा कोणी तरी शब्द तो शेष असल्यामुळें त्यावर अवलंबून प्रथमपुरुषही प्राप्त होतो.

तर मग येथें शेष उपपद असतांना प्रथमपुरुषाचें विधान केलें आहे, आणि जवळ उच्चारलेलें जें पद म्हणजे भाग त्याला उपपद म्हणतात. प्रकृत उदाहरणामध्यें 'त्वं च देवदत्तश्च' असें जें जवळ उच्चारलें आहे तो शेष नव्हे व देवदत्तः हा जो शेष आहे तेवढाच भाग कांहीं जवळ उच्चारला नाहीं.

या रीतीनें 'त्वं च देवदत्तश्च पचथः' 'त्वं च अहं च पचावः' येथें प्रथमपुरुष होणार नाहीं, पण तेथेंच मध्यम आणि उत्तम हेही पुरुष प्राप्त होऊं शकत नाहींत.

काय कारण ?

युष्मत्शब्द उपपद असतांना मध्यम व अस्मत्शब्द उपपद असतांना उत्तम या पुरुषांचें विधान केलें आहे, आणि जवळ उच्चारलेलें जें पद म्हणजे भाग त्याला उपपद म्हणतात. प्रकृत उदाहरणांमध्यें 'त्वं च देवदत्तश्च' असें जें जवळ उच्चारलें आहे तो युष्मत्शब्द किंवा अस्मत्शब्द नव्हे आणि जो युष्मत्शब्द किंवा अस्मत्शब्द तेवढाच भाग कांहीं जवळ उच्चारला नाहीं.

तर मग आतां शेषाशीं प्रत्ययाचें सामानाधिकरण्य म्ह. शेष हा कर्तरि-प्रयोगामध्यें कर्ता किंवा कर्मणि-प्रयोगामध्यें कर्म असेल तर तेथें प्रथमपुरुष होतो असें सांगितलें आहे. आणि प्रकृत उदाहरणांमध्यें तर फक्त शेषाशींच सामानाधिकरण्य नाहीं, तर शेष आणि युष्मद्, तसेंच शेष आणि अस्मद्, एवढ्यांशीं सामानाधिकरण्य आहे.

अशा रीतीनें प्रथमपुरुष होणार नाहीं खरा, पण तसाच मध्यमपुरुष व उत्तमपुरुषही होणार नाहीं.

काय कारण ?

युष्मद् व अस्मद् यांच्याशीं प्रत्ययाचें सामानाधिकरण्य असेल तर तेथें क्रमानें मध्यमपुरुष व उत्तमपुरुष होतो असें सांगितलें आहे, आणि प्रकृत उदाहरणांमध्यें तर फक्त युष्मद् किंवा अस्मद् यांच्याशींच सामानाधिकरण्य नाहीं, तर युष्मद् आणि शेष तसेंच अस्मद् आणि शेष एवढ्यांशीं सामानाधिकरण्य आहे.

दीनि सर्वैर्नित्यम् [१.२.७२] इत्येवमत्र युष्मदस्मदोः शेषो भविष्यति । तत्र युष्मदि मध्यमोऽस्मद्युत्तम इत्येव सिद्धम्॥ न सिध्यति । स्थानिन्यपीति प्रथमः प्राप्नोति ॥ त्यदादीनां खल्वपि यद्यत्परं तत्तच्छिष्यत इति यदा भवतः शेषस्तदा प्रथमः प्राप्नोति ॥

युष्मदि मध्यमोऽस्मद्युत्तम इत्वेवोच्यते । ताविह न प्राप्नुतः । परमत्वं पचसि । परमाहं पचामीति । तदन्तविधिना भविष्यति । इहापि तर्हि तदन्तविधिना प्राप्नुतः । अतित्वं पचति । अत्यहं पचतीति । ये चाप्येते समानाधिकरणवृत्तयस्ताद्धितास्तत्र च मध्यमोत्तमौ न प्राप्नुतः । त्वत्तरः पचसि मत्तरः पचामीति । त्वद्रूपः पचसि मद्रूपः पचामीति । त्वत्कल्पः पचसि मत्कल्पः पचामीति ॥ एवं तर्हि युष्मद्वत्यस्मद्वतीत्येवं भविष्यति । इहापि तर्हि प्राप्नुतः । अतित्वं पचति । अत्यहं पचतीति ॥

---

असें आहे तर मग ज्या ठिकाणीं युष्मत्शब्द व त्याच्या जोडीला दुसरा कोणी तरी शब्द असेल, तसेंच अस्मच्छब्द व त्याच्या जोडीला कोणीतरी दुसरा शब्द असेल तेथें 'त्यदादीनि सर्वैर्नित्यम्' (१।२।७२) या सूत्रानें एकशेष होऊन फक्त युष्मच्छब्दच व अस्मत्शब्दच अवशिष्ट राहतील. तेव्हां अर्थातच तेथें 'युष्मद्युपपदे' (१।४।१०५), अस्मद्युत्तमः (१।४।१०७) यानेंच सिद्ध होईल.

तरी देखील सिद्ध होत नाहीं. कारण शेषाशीं सामानाधिकरण्य असल्यामुळें प्रथमपुरुष प्राप्त होत आहे. शेष उपपदाचा प्रयोग नसला तरी चालेल असें तेथें म्हटलें आहे.

शिवाय आणखीही असा दोष येतो की 'त्यदादीनां मिथः सहोक्तौ यत्परं तच्छिष्यते' म्हणजे त्यदादि गणांतील अनेक शब्दांची बरोबरच उक्ति असेल तेथें त्या त्यदादिक गणांमध्यें जो पुढें उच्चारला असेल त्याचा एकशेष होतो या वचनानें जेव्हां भवत्शब्दाचा एकशेष झाला असेल तेव्हां प्रथमपुरुष प्राप्त होतो.

तसेंच युष्मच्छब्द उपपद असतांना मध्यमपुरुष होतो आणि अस्मच्छब्द उपपद असतांना उत्तमपुरुष होतो, एवढेंच फक्त येथें म्हटलें आहे. तेव्हां अर्थातच परमत्वं पचसि, परमाहं पचामि येथें मध्यमपुरुष व उत्तमपुरुष प्राप्त होऊं शकत नाहीं.

आतां येथें उपपदाला युष्मदि व अस्मदि हें विशेषण लाविलें म्हणजे तदन्तविधि होऊन युष्मच्छब्दान्त व अस्मच्छब्दान्त उपपद असतांना असा अर्थ झाल्यामुळें वरील उदाहरणांमध्यें मध्यम व उत्तमपुरुष होतील.

पण तसें केलें तर अतित्वं पचति, अत्यहं पचति, येथेंही तदन्तविधीनें मध्यम व उत्तमपुरुष होऊं लागतील.

शिवाय जे हे सामानाधिकरण्यानें प्रकृत्यर्थाला दाखविणारे तद्धितप्रत्यय होतात त्या ठिकाणीं मध्यमपुरुष व उत्तमपुरुष प्राप्त होऊं शकत नाहींत; जसें—त्वत्तरः[७] पचसि, मत्तरः पचामि; त्वत्कल्पः पचसि, मत्कल्पः पचामि.

असें आहे तर ज्या उपपदामध्यें युष्मत्शब्द आहे असा युष्मदि याचा अर्थ, आणि ज्या उपपदामध्यें अस्मत्शब्द आहे असा अस्मदि याचा अर्थ घेतला म्हणजे वरील उदाहरणांमध्यें मध्यम व उत्तम पुरुष होतील.

तसा अर्थ घेतला तर अतित्वं पचति, अत्यहं पचति, येथें मध्यमपुरुष व उत्तमपुरुष

---

७. अतिशयितः त्वं त्वत्तरः, प्रशस्तः त्वं त्वद्रूपः, ईषदसमाप्तः त्वं त्वत्कल्पः असा विग्रह आहे. येथें तरप् (५।३।५७), रूपप् (५।३।६६) आणि कल्पप् (५।३।६७) असे प्रत्यय झाले आहेत.

८. युष्मदि व अस्मदि यांतील युष्मद् व अस्मद् या शब्दांपुढील मतुप्प्रत्ययाचा सौत्रत्वास्तव लुक् केला आहे.

एवं तर्हि युष्मदि साधनेऽस्मदि साधन इत्येवं भविष्यति। एवं च कृत्वा सोऽप्यदोषो भवति यदुक्तं तत्र युष्मदस्मदन्येषु प्रथमप्रतिषेधः शेषत्वादिति ॥ अथवा प्रथम उत्सर्गः करिष्यते तस्य युष्मदस्मदोरुपपदयोर्मध्यमोत्तमावपवादौ भविष्यतः। तत्र युष्मद्गन्धश्चास्मद्गन्धश्चास्तीति कृत्वा मध्यमोत्तमौ भविष्यतः ॥

अथेह कथं भवितव्यम्। अत्वं त्वं संपद्यते त्वद्भवति मद्भवतीति। आहोस्वित्त्वद्भवसि मद्भवामीति। त्वद्भवति मद्भवतीत्येवं भवितव्यम्। मध्यमोत्तमौ कस्मान्न भवतः। गौणमुख्ययोर्मुख्ये संप्रत्ययो भवति। तद्यथा। गौरनुबन्ध्योऽजोऽग्नीषोमीय इति न वाहीकोऽनुबध्यते। कथं तर्हि वाहीके वृद्ध्यात्त्वे

होऊं लागेल.

तर मग लकाराचा अर्थ जें कारक म्ह. कर्ता किंवा कर्म तेंच जर युष्मच्छब्दाचा अर्थ असेल तर मध्यमपुरुष होतो आणि तें कारक जर अस्मच्छब्दाचा अर्थ असेल तर उत्तमपुरुष होतो असा अर्थ केला म्हणजे काम भागेल.

शिवाय असा अर्थ केला म्हणजे युष्मच्छब्द किंवा अस्मच्छब्द आणि त्याच्या जोडीला इतर देवदत्त वगैरे कोणी तरी शब्द असें उपपद असतांना 'शेषे प्रथमः' यानें प्राप्त झालेल्या प्रथमपुरुषाचा प्रतिषेध केला पाहिजे[९] असें जें पूर्वी म्हटलें आहे तोही दोष येत नाहीं.

अथवा शेषे हा शब्द काढून 'प्रथमः' एवढेंच सामान्य सूत्र करण्यांत येईल. त्या प्रथमपुरुषाचे युष्मच्छब्द व अस्मच्छब्द उपपद असतांना सांगितलेले मध्यमपुरुष व उत्तमपुरुष हे अपवाद होतील. तेव्हां अर्थातच त्वं च देवदत्तश्च इत्यादि मिश्रित उदाहरणांमध्यें लकारवाच्य कारकाला जरासा युष्मद् किंवा अस्मद् याचा वास लागला की

तेथें तेवढ्यानेंच मध्यमपुरुष किंवा उत्तमपुरुष होईल.

आतां अत्वं त्वं संपद्यते इत्यादि च्विप्रत्ययाच्या उदाहरणांमध्यें त्वद्भवति, मद्भवति, असा प्रथमपुरुष व्हावा, अथवा त्वद्भवसि, मद्भवामि, असे मध्यमपुरुष व उत्तमपुरुष व्हावेत[१०] ?

त्वद्भवति मद्भवति असें व्हावें म्ह. अत्वं या प्रकृतीवर दृष्टि ठेवून प्रथमपुरुष करावा.

पण विकृतीवर दृष्टि ठेवून मध्यमपुरुष व उत्तमपुरुष कां बरें होत नाहीं ?

येथें अत्वं हें स्वरूप मुख्य आहे व त्यावर कल्पिलेलें त्वं हें स्वरूप गौण आहे. तेव्हां गौण आणि मुख्य यांमध्यें मुख्याचे ठिकाणींच कार्यसंबन्ध होत असतो; जसें– गौरनुबन्ध्यः म्ह. गोचें अनुबंधन करावें; तसेंच अजोऽग्नीषोमीयः म्ह. अग्नि आणि सोम या देवतांना उद्देशून बोकड द्यावा, असें विधान केलें असतां मुख्य जो बैल किंवा बोकड तोच येथें घेतला जातो. गौण[११] असा एखादा माणूस घेतला जात नाहीं.

९. त्वं च देवदत्तश्च पचथः इत्यादि ठिकाणीं देवदत्तावरील जी कर्तृकारकशक्ति तीच तेथें युष्मच्छब्दार्थावर असल्यामुळें शेषपदानें ती घेतां येत नाहीं. म्हणून तेथें प्रथमपुरुषाची प्राप्ति येत नाहीं.

१०. अभूततद्भाव म्हणजे जी वस्तु मूळची ज्या स्वरूपांत खरोखर नाहीं ती वस्तु त्या स्वरूपांत आहे असें फक्त मानणें. याच अर्थी च्विप्रत्यय (५।४।५०) सांगितला आहे. तेथें मूळस्वरूपाला प्रकृति म्हणतात आणि मानीव स्वरूपाला विकृति म्हणतात. मुळांत त्वंस्वरूपांत नसलेला अत्वंपदार्थ तोच त्वंस्वरूपांत आल्याचें येथें दाखविलें आहे. येथें अत्वं ही प्रकृति, आणि त्वं ही विकृति होय. तेथें अत्वं या प्रकृतीकडे दृष्टि ठेवून प्रथमपुरुष करावा किंवा त्वं या विकृतीकडे दृष्टि देऊन मध्यमपुरुष करावा ?

११. बुद्धिशून्य अशा मूर्ख मनुष्याला लोकांमध्यें 'अरे हा निव्वळ बैल आहे, शुद्ध बोकड आहे' असें म्हणतात.

भवतः । गौस्तिष्ठति । गामानयेति । अर्थाश्रय एतदेवं भवति । यद्धि शब्दाश्रयं शब्दमात्रे तद्भवति । शब्दाश्रये च वृद्ध्यात्वे ॥

**परः संनिकर्षः संहिता॥१।४।१०९**

**परः संनिकर्षः संहिता चेदद्रुतायामसंहितम् ॥१॥**

परः संनिकर्षः संहिता चेदद्रुतायां वृत्तौ संहितासंज्ञा न प्राप्नोति । द्रुतायामेव हि परः संनिकर्षो वर्णानां नाद्रुतायाम् ॥

**तुल्यः संनिकर्षः ॥२॥**

तुल्यः संनिकर्षो वर्णानां द्रुतमध्यमविलम्बितासु वृत्तिषु ॥ किंकृतस्तर्हि विशेषः ।

**वर्णकालभूयस्त्वं तु ॥३॥**

वर्णानां तु कालभूयस्त्वम् । तद्यथा । हस्तिमशकयोस्तुल्यः संनिकर्षः प्राणिभूयस्त्वं तु ॥ यद्येवं

**द्रुतायां तपरकरणे मध्यमविलम्बितयोरुपसंख्यानं कालभेदात् ॥४॥**

द्रुतायां तपरकरणे मध्यमविलम्बित-

---

तर मग तशा माणसाला उद्देशून केलेल्या गौर्वाहीकस्तिष्ठति, गामानय, या प्रयोगांमध्यें गोशब्दाला वृद्धि (७।१।९०) आणि आत्व (६।१।९३) हीं कार्यें कशीं बरें होतात ?

अर्थावर अवलंबून होणारें जें कार्य त्याविषयीं 'मुख्यालाच कार्य करावें, गौणाला करूं नये' हा न्याय लागू होतो. शब्दावर अवलंबून होणारें जें कार्य तें फक्त तसा शब्द दृष्टीस पडला कीं तेथें होतें; आणि वृद्धि[१२] व आत्व हीं कार्यें तर शब्दावर अवलंबून होणारींच आहेत.

(सू.१०९ वा.१) वर्णांचा जो अतिशय-संनिधि त्याला संहितासंज्ञा असेल तर द्रुतवृत्ती-शिवाय अन्य वृत्तींमध्यें उच्चारलेल्या वर्णांच्या संनिधीला संहितासंज्ञा होणार नाहीं. कारण द्रुतवृत्तीमध्येंच वर्णांचा अतिशय संनिधि असतो, इतर वृत्तींमध्यें नसतो.

(वा.२) द्रुत, मध्यम आणि विलंबित या तिन्ही वृत्तींमध्यें[२] वर्णांचा संनिधि सारखाच असतो.

तर मग त्या तीन वृत्तींमध्यें जो फरक दिसतो तो कशामुळें झालेला आहे ?

(वा.३) वर्णांच्या उच्चारणाचा काल हा उत्तरोत्तर अधिक होत असल्यामुळें वृत्तीमध्यें फरक होत आहे[३]. वर्णांचा संनिधि हा तिन्ही वृत्तींमध्यें सारखाच आहे; जसा हत्तीहत्तींचा संनिधि काय किंवा मशकमशकांचा संनिधि काय दोन्ही सारखेच आहेत. फक्त मशकांपेक्षां हत्ती हा प्राणी मोठा आहे.

असें आहे तर—

(वा.४) शास्त्रामध्यें केलेलें तपरकरण हें द्रुतवृत्तीमध्यें केलें असेल तर मध्यम किंवा

---

१२. वृद्धि सांगणाऱ्या शास्त्रामध्यें (७।२।११५) जरी गोशब्दाचें आश्रयण नाहीं तरी वृद्धीकरितां जो णिद्भाव केला जातो तेथें (७।१।९०) गोशब्दाचें आश्रयण केलें आहे. आत्व सांगणाऱ्या सूत्रामध्यें (६।१।९३) 'आ गोतः' असा मूळचा पाठ होता त्यामध्यें गोशब्दाचें आश्रयण केलें आहे.

१. वर्णांचा जो अत्यंत संनिधि त्याला संहिता म्हणावें; उदा०– स्वच्छाया. येथें तुक् (६।१।७३) झाला आहे.

२. वाक्य उच्चारणें तें जलद, मध्यम आणि सावकाश असें तीन प्रकारांनीं उच्चारतां येतें. या तीन प्रकारांनाच द्रुतवृत्ति, मध्यमवृत्ति आणि विलम्बितवृत्ति असें म्हणतात.

३. एखादा शब्द उच्चारण्याला जो वेळ लागतो त्यापैकीं कांहीं वेळ वर्ण उच्चारतांना जातो व कांहीं वेळ वर्णांच्या मध्यें म्हणजे पूर्वीचा वर्ण उच्चारल्यानंतर पुढील वर्ण उच्चारण्याचे पूर्वीं असा जातो. हा मध्यें लागणारा वेळ तिन्ही वृत्तींमध्यें सारखाच असतो. फक्त वर्ण उच्चारतांना जो वेळ जातो त्यांत फरक होतो.

योरुपसंख्यानं कर्तव्यम् ॥ किं कारणम्। कालभेदात्। ये द्रुतायां वृत्तौ वर्णास्त्रिभागाधिकास्ते मध्यमायां ये मध्यमायां वृत्तौ वर्णास्त्रिभागाधिकास्ते विलम्बितायाम् ॥

उक्तं वा ॥५॥

किमुक्तम्। सिद्धं त्ववस्थिता वर्णा वक्तुश्चिराचिरवचनाद्वृत्तयो विशिष्यन्त इति ॥

अथवा शब्दाविरामः संहितेत्येतल्लक्षणं करिष्यते।

**शब्दाविरामे प्रतिवर्णमवसानम् ॥६॥**

शब्दाविरामे प्रतिवर्णमवसानसंज्ञा प्राप्नोति। किमिदं प्रतिवर्णमिति। वर्णं वर्णं प्रति प्रतिवर्णम्। येनैव यत्नेनैको वर्ण उच्चार्यते विच्छिन्ने वर्ण उपसंहृत्य तमन्यमुपादाय द्वितीयः प्रयुज्यते तथा तृतीयस्तथा चतुर्थः ॥ एवं तर्ह्यनवकाशा संहितासंज्ञावसानसंज्ञां बाधिष्यते॥ अथवावसानसंज्ञायां प्रकर्षगतिर्विज्ञास्यते साधीयो यो विराम इति। कश्च साधीयः। यः शब्दार्थयोर्विरामः ॥

अथवा ह्रादाविरामः संहितेत्येतल्लक्षणं करिष्यते।

---

विलंबित वृत्तीनें उच्चारलेल्या प्रयोगामध्यें त्या शास्त्राची प्रवृत्ति होण्याकरितां वचन केलें पाहिजे.

काय कारण ?

वर्णांचा उच्चारणाचा काल कमजास्त होत आहे म्हणून. द्रुतवृत्तींतील वर्णांपेक्षां मध्यमवृत्तींतील त्याच वर्णांच्या उच्चारण्याला एकतृतीयांश वेळ जास्त लागतो. आणि मध्यमवृत्तींतील वर्णांपेक्षांही विलंबित वृत्तींतील त्याच वर्णांच्या उच्चारण्याला एकतृतीयांश वेळ जास्त लागतो.

(वा.५) हें मागें (१।१।७०) सांगितलेंच आहे.

काय सांगितलें आहे ?

तिन्ही वृत्तींमध्यें वर्ण हे एकाच स्वरूपाचे असतात. फक्त वाक्याच्या सावकाश किंवा शीघ्र उच्चारणामुळें वृत्तीमध्यें फरक दिसतो.

अथवा 'शब्दाविरामः संहिता' असें संहितासंज्ञा सांगणारें सूत्र करण्यांत येईल. म्हणजे जोंपर्यंत वक्ता शब्दोच्चारणापासून थांबला नाहीं तोपर्यंत उच्चारलेल्या वर्णांमध्यें संहिता आहे.

(वा.६) शब्दांचा अविराम असल्यामुळें संहितासंज्ञा झाली तरी तेथें प्रत्येक वर्णाच्या शेवटीं अवसानसंज्ञा प्राप्त होत आहे.

प्रतिवर्णम् असें म्हटलें त्याचा काय अर्थ ?

वर्णं वर्णं प्रति, प्रत्येक वर्णासंबंधानें, असा प्रतिवर्ण याचा अर्थ होय. ज्या प्रयत्नानें एक वर्ण उच्चारला जातो तो वर्ण नष्ट झाला असतां तो प्रयत्न संपवून दुसरा प्रयत्न स्वीकारून दुसरा वर्ण उच्चारला जातो. तो वर्ण नष्ट झाला असतां तो यत्न संपवून तिसरा यत्न स्वीकारून तिसरा वर्ण उच्चारला जातो. याप्रमाणें चवथा, पांचवा वर्ण उच्चारला जातो.[६]

असें आहे तर संहितासंज्ञा अनवकाश असल्यामुळें ती अवसानसंज्ञेचा बाध करील.

अथवा अवसानसंज्ञा सांगणाऱ्या सूत्रामध्यें विराम हा प्रकर्षानें युक्त म्हणजे चांगला जो

---

४. मागें १।१।७० टीप २ पहा, भा.१पृ.४४४.

५. तेव्हां मध्यम आणि विलम्बित वृत्तींमध्यें वर्णांचा अत्यंत संनिधि नसला तरी संहितासंज्ञा होईल.

६. तेव्हां निराळा यत्न चालू करावयाचा म्हणजे तेथें मध्यें विराम अवश्य होणारच. म्हणून अवसानसंज्ञा प्राप्त होत आहे.

७. जेथें शब्दाचें उच्चारण थांबतें तेथें शेवटीं अवसानसंज्ञेला चारितार्थ्य आहे.

## ह्रादाविरामे स्पर्शाघोषसंयोगेऽसंनिधानादसंहितम् ॥७॥

ह्रादाविरामे स्पर्शानामघोषाणां संयोगेऽसंनिधानात्संहितासंज्ञा न प्राप्नोति । कुक्कुटः पिप्पका पित्तमिति ॥ किमुच्यते संयोग इति । अथ यत्रैकः पचतीत्येकः पूर्वपरयोर्ह्रादेन प्रच्छाद्यते । तद्यथा । द्वयो रक्तयोर्वस्त्रयोर्मध्ये शुक्लं वस्त्रं तद्गुणमुपलभ्यते । बदरपिटके रिक्तको लोहकंसस्तद्गुण उपलभ्यते ॥

## एकेन तुल्यः संनिधिः ॥८॥

यथैको वर्णो ह्रादेन प्रच्छाद्यत एवमनेकोऽपि ॥

अथवा पौर्वापर्यमकालव्यपेतं संहितेत्येतल्लक्षणं करिष्यते ।

## पौर्वापर्यमकालव्यपेतं संहिता चेत्पूर्वापराभावादसंहितम् ॥९॥

पौर्वापर्यमकालव्यपेतं संहिता चेत्पूर्वापराभावात्संहितासंज्ञा न प्राप्नोति। न हि वर्णानां पौर्वापर्यमस्ति । किं कारणम् ।

---

विराम तो गृहीत धरण्यांत येईल.

चांगला विराम तो कोणता ?

जेथें शब्दाच्या विरामाबरोबर अर्थाचाही विराम होतो तो चांगला विराम होय.

किंवा 'ह्रादाविरामः संहिता' असें हें संहितासंज्ञा सांगणारें सूत्र करण्यांत येईल.

(वा.७) ह्रादाचा विच्छेद झाला नाहीं तोंपर्यंत संहिता असते असें म्हटलें तर अघोष असे जे वर्गातील पहिले दुसरे वर्ण त्यांचा संयोग असेल तेथें घोषाचा विच्छेद होत असल्यामुळें संहितासंज्ञा होणार नाहीं; जसें— कुक्कुटः पिप्पका पित्तम्.

येथें 'अघोषसंयोगे' ह्यांत संयोग हा शब्द मुद्दाम कां बरें घातला आहे ?

जेथें एकटाच अघोष वर्ण आहे, उदा. पचति, येथील एकटा चकार वगैरे, तेथें तो एकटा चकार मागील आणि पुढील अशा दोन्ही वर्णांच्या घोषानें उपरक्त होतो; जसें— तांबड्या लाल अशा दोन वस्त्रांमध्यें असलेलें पांढरें वस्त्र तांबड्या रंगाचें दिसून येतें, तसेंच बोराच्या टोपलींत ठेवलेली रिकामी पोलादी चकचकीत वाटी बोरांनीं भरल्यासारखी दिसते.

(वा.८) ह्या कामीं जसा एक वर्ण तसाच संयोग होय. जर एक वर्ण घोषवर्णाच्या ह्रादानें उपरक्त होतो तर तसाच अनेक वर्णांचा समुदायही उपरक्त होण्यास हरकत नाहीं.

किंवा 'पौर्वापर्यमकालव्यपेतं संहिता' असें हें संहितासंज्ञा सांगणारें सूत्र करण्यांत येईल. म्हणजे वर्णोच्चारणयोग्य कालानें अव्यवहित असें जें वर्णांचें पौर्वापर्य त्याला संहितासंज्ञा होते.

(वा.९) वर्णोच्चारणयोग्य कालानें अव्यवहित असें जें वर्णांचें पौर्वापर्य त्याला संहितासंज्ञा केली तर पौर्वापर्याच्या अभावास्तव संहितासंज्ञा कोठेंच होणार नाहीं. कारण

---

८. ह्राद म्हणजे एक प्रकारचा ध्वनि. यालाच घोष असें म्हणतात. अ, आ इत्यादि स्वर तसेंच वर्गातील तिसरा, चवथा, पांचवा इत्यादिक ज्या वर्णांचा घोषप्रयत्न पूर्वीं (१।१।९) सांगितला आहे त्यांच्या उच्चारणाचे वेळीं हा ध्वनि होत असतो व त्याचा उपराग त्याच्या शेजारच्या वर्णांवरही होतो. यामुळें घोषप्रयत्नाच्या वर्णांमध्यें एखादा अघोषवर्ण असला तरी तेवढ्यानें त्या ह्रादाचा विराम होत नाहीं.

९. कुक्कुट वगैरे शब्दांमध्यें जो दोन ककारांचा संयोग आहे त्यांतील पहिल्या ककारावर पूर्वीच्या घोष उकारामुळें ह्रादाचा जरी उपराग आहे, व दुसऱ्या ककारावर पुढील घोष उकारामुळें ह्रादाचा उपराग आहे तरी त्या दोन ककारांमध्यें त्या ह्रादाचा विच्छेद होत असल्यामुळें तेथें संहितासंज्ञा होणार नाहीं असा दोष येतो.

१०. त्या दोन्ही उपरागांचें मिश्रण असल्यामुळें ह्रादाचा विच्छेद होत नाहीं.

**एकैकवर्णवर्तित्वाद्वाच उच्चरितप्रध्वंसित्वाच्च वर्णानाम् ॥१०॥**

एकैकवर्णवर्तिनी वाक् । न द्वौ युगपदुच्चारयति । गौरिति यावद्गकारे वाग्वर्तते नौकारे न विसर्जनीये यावदौकारे न गकारे न विसर्जनीये यावाद्विसर्जनीये न गकारे नौकारे । उच्चरितप्रध्वंसित्वात् । उच्चरितप्रध्वंसिनः खल्वपि वर्णाः । उच्चरितः प्रध्वस्तः । अथापरः प्रयुज्यते न वर्णो वर्णस्य सहायः ॥ एवं तर्हि

**बुद्धौ कृत्वा सर्वाश्चेष्टाः कर्ता धीरस्तत्वन्नीतिः[११] ।**

**शब्देनार्थान्वाच्यान्दृष्ट्वा बुद्धौ कुर्यात्पौर्वापर्यम् ॥**

बुद्धिविषयमेव शब्दानां पौर्वापर्यम् । इह य एष मनुष्यः प्रेक्षापूर्वकारी भवति स पश्यत्यस्मिन्नर्थेऽयं शब्दः प्रयोक्तव्यो ऽस्मिंस्तावच्छब्देऽयं तावद्वर्णस्ततोऽयं ततोऽयमिति ॥

**विरामोऽवसानम् ॥१।४।११०॥**

इदं विचार्यतेऽभावोऽवसानलक्षणं स्याद्विरामो वेति । कश्चात्र विशेषः ।

**अभावेऽवसानलक्षण उपर्यभाववचनम् ॥१॥**

---

वर्णांचें पौर्वापर्यच संभवत नाहीं.

(वा. १०) वाणी ही एकेक वर्णावर अवलंबून अस्तित्वांत येते; एकदम दोन वर्ण तिच्यांतून बाहेर पडत नाहींत. 'गौः' या पदांतील गकारोच्चारणाकडे जेव्हां वाणी प्रवृत्त होते तेव्हां ती औकाराकडे नाहीं व विसर्गाकडेही नाहीं. जेव्हां औकारोच्चारणाकडे वाणी प्रवृत्त होते तेव्हां गकाराकडे ती नाहीं, व विसर्गाकडेही नाहीं. तसेंच जेव्हां विसर्गोच्चारणाकडे प्रवृत्त होते तेव्हां ती गकाराकडे नाहीं व औकाराकडेही नाहीं. शिवाय वर्ण हे उच्चरितप्रध्वंसी म्हणजे उच्चारल्याबरोबर लगेच नाश पावणें असा त्यांचा स्वभावच आहे. एक वर्ण उच्चारला तो नष्ट झाला, नंतर दुसरा उच्चारला तो नष्ट झाला, नंतर तिसरा वर्ण उच्चारण्यांत येतो. तेव्हां अर्थातच कोणताही वर्ण कोणत्याही वर्णाला सहाय होऊं शकत नाहीं.

असें आहे तर—

व्यापक मनोवृत्तीचा असा बुद्धिमान् पुरुष पुढें होणाऱ्या बाह्य व्यापारांची बुद्धीमध्यें अगोदर कल्पना करून त्या त्या वाच्यार्थांना अनुसरून शब्दांची योजना करीत असतो. तेव्हां त्यानें वर्णांच्या पौर्वापर्याची कल्पना बुद्धीमध्यें करावी. या जगामध्यें जो मनुष्य विचारपूर्वक काम करतो तो, 'या अर्थाला दाखविण्यासाठीं हा शब्द घालावा, आणि या शब्दामध्यें हा वर्ण प्रथम, नंतर हा आणि नंतर हा घालावा' असें अगोदरच पाहत असतो.

(सू. ११०) येथें असा विचार केला जात आहे की 'अभावोऽवसानम्' असें अवसानसंज्ञेचें लक्षण असावें किंवा 'विरामोऽवसानम्' असें असावें ?

या दोन लक्षणांमध्यें काय फरक आहे ?

(वा. १) अभाव हें अवसानाचें लक्षण सांगितलें तर त्या सूत्रामध्यें 'उपर्यभावः' असें म्हणावें; म्हणजे 'वर्णांच्या पुढील जो वर्णांचा

---

११. तत्वती नीतिर्यस्य स तत्वन्नीतिः असा विग्रह आहे. तत्वती म्हणजे विस्तृत. नीति म्हणजे बुद्धि.

१. वर्णांच्या अभावाला अवसानसंज्ञा होते.

२. हें संज्ञासूत्र नव्हे तर लक्षणसूत्र आहे, म्हणजे कोणत्या वर्णाला अवसान म्हणावें तें ओळखण्याचें चिन्ह येथें सूत्रकारांनीं निर्दिष्ट केलें आहे. पूर्वाचार्यांचें सूत्र 'अभावोऽवसानम्' असें आहे. तेंही लक्षणसूत्रच आहे असें गृहीत धरून त्या दोन सूत्रांपैकीं कोणतें बरें हा विचार येथें भाष्यकार करीत आहेत.

अभावेऽवसानलक्षण उपर्यभावग्रहणं कर्तव्यम् । उपरि योऽभाव इति वक्तव्यम् । पुरस्तादपि हि शब्दस्याभावस्तत्र मा भूदिति । किं च स्यात् । रसः रथः । खरवसानयोर्विसर्जनीयः [८.३.१५] इति विसर्जनीयः प्रसज्येत ॥ अस्तु तर्हि विरामः ।

विरामे विरामवचनम् ॥२॥

यस्य विरामो विरामग्रहणं तेन कर्तव्यम् । ननु च यस्याप्यभावस्तेनाप्यभावग्रहणं कर्तव्यम् । परार्थं मम भविष्यति । अभावो लोपः । ततोऽवसानं चेति । ममापि तर्हि विरामग्रहणं परार्थं भविष्यति । विरामो लोपोऽवसानं चेति । उपरि यो विराम इति वक्तव्यम् । पुरस्तादपि शब्दस्य विरामस्तत्र मा भूत् । किं च स्यात् । रसः रथः । खरवसानयोर्विसर्जनीय इति विसर्जनीयः प्रसज्येत । आरम्भपूर्वको मम विरामः ॥

अथवा नेदमवसानलक्षणं विचार्यते । किं तर्हि । संज्ञी । अभावोऽवसानसंज्ञी स्याद्विरामो वेति । कश्चात्र विशेषः ।

अभावेऽवसानसंज्ञिन्युपर्यभाववचनम् ॥३॥

---

अभाव' असें म्हटलें पाहिजे. कारण वर्णांच्या पूर्वींही वर्णांचा अभाव असतो तो अवसानाचें लक्षण समजलें जाऊं नये.

तसें समजलें तर काय बरें बिघडेल ?

रसः, रथः, येथें आरंभीं असलेल्या रेफाला 'खरवसानयोर्विसर्जनीयः' (८।३।१५) यानें विसर्ग करण्याचा प्रसंग येईल.

तर मग विराम हेंच अवसानाचें लक्षण असूं दे.

विराम हें अवसानसंज्ञेचें लक्षण असेल तर विरामः या शब्दाचें सूत्रामध्यें ग्रहण केलें पाहिजे.

पण अभाव हें अवसानसंज्ञेचें लक्षण आहे असें जो म्हणतो त्यानेंही सूत्रामध्यें अभावः या शब्दाचें ग्रहण केलें पाहिजे.

माझ्या मतीं अभावः हा शब्द घालावा लागला तरी तो अन्य सूत्राच्या उपयोगीं पडेल म्हणजे अदर्शनशब्दाच्या ऐवजीं अभावशब्द घालून 'अभावो लोपः' असें लोपसंज्ञेचें सूत्र रचून त्याचे पुढें 'अवसानं च' असें अवसानसंज्ञेचें सूत्र करीन.

तर माझ्याही मतीं विरामः हा शब्द दुसऱ्या सूत्राच्या उपयोगीं पडेल, म्ह. 'विरामो लोपः' असें लोपसंज्ञेचें सूत्र रचून त्याचेपुढें 'अवसानं च' असें सूत्र करीन.

'उपरिविरामवचनम्' म्हणजे वर्णोच्चारणानंतरचा जो विराम असें म्हटलें पाहिजे. शब्दोच्चारणाच्या पूर्वींचा जो विराम तो अवसानसंज्ञेचें लक्षण समजला जाऊं नये.

तसें समजलें तर काय बरें बिघडेल ?

रसः, रथः, येथें शब्दाच्या आरंभीं असलेल्या रेफाला 'खरवसानयोः' (८।३।१५) यानें विसर्ग करण्याचा प्रसंग येईल.

हा दोष येत नाहीं. कारण विराम हा आरंभपूर्वकच असतो.

अथवा अभाव किंवा विराम हें अवसानसंज्ञेचें लक्षण समजून त्याचा विचार येथें करीत नाहीं, तर अवसानसंज्ञेच्या उद्देश्याबद्दलच हा विचार आहे; म्हणजे अवसानसंज्ञा ही अभावाला सांगावी किंवा विरामाला सांगावी ?

या दोहोंमध्यें काय फरक आहे ?

(वा.३) अभाव हा अवसानसंज्ञेचा संज्ञी असें म्हटलें तर 'उपर्यभावः' असा शब्द

---

३. विराम हें अवसानाचें लक्षण सांगितलें तर मात्र उपरिविराम असें म्हणावयास नको. कारण विराम हा आरंभपूर्वकच असतो. विराम म्हणजे थांबणें. उच्चारणक्रियेचा आरंभच जर झाला नाहीं तर तेथें थांबला असें कोणीही म्हणत नाहीं.

अभावेऽवसानसंज्ञिन्युपर्यभावग्रहणं कर्तव्यम् । उपरि योऽभाव इति वक्तव्यम् । पुरस्तादपि हि शब्दस्याभावस्तत्र मा भूदिति । किं च स्यात् । रसः रथः । खरवसानयोर्विसर्जनीय इति विसर्जनीयः प्रसज्येत ॥ अस्तु तर्हि विरामोऽवसानम् ।

**विरामे विरामवचनम् ॥४॥**

यस्य विरामस्तेन विरामग्रहणं कर्तव्यम् । ननु च यस्याप्यभावस्तेनाप्यभावग्रहणं कर्तव्यम् । परार्थं मम भविष्यति । अभावो लोपः । ततोऽवसानं चेति । ममापि तर्हि विरामग्रहणं परार्थं भविष्यति । विरामो लोपोऽवसानं चेति । उपरि यो विराम इति वक्तव्यम् । ननु चोक्तमारम्भपूर्वक इति । नावश्यमयं रमिः प्रवृत्तावेव वर्तते । किं तर्हि । अप्रवृत्तावपि । तद्यथा । उपरतान्यस्मिन्कुले व्रतान्युपरतः स्वाध्याय इति । न च तत्र स्वाध्यायो भूतपूर्वो भवति नापि व्रतानि ॥

**भावाविरामभावित्वाच्छब्दस्यावसानलक्षणं न ॥५॥**

भावाविरामभावित्वाच्छब्दस्यावसानलक्षणं नोपपद्यते । किमिदं भावाविरामभावित्वादिति । भावस्याविरामो भावाविरामः । भावाविरामेण भवतीति भावाविरामभावी । भावाविरामभाविनो

---

सूत्रांत घातला पाहिजे, म्हणजे वर्णोच्चारणानंतरचा अभाव असें म्हटलें पाहिजे. कारण वर्णोच्चारणाचे पूर्वींही वर्णाचा अभाव असतो, त्याला अवसानसंज्ञा होऊं नये.

झाली तर काय बिघडेल ?

रसः, रथः, येथें आरंभीं असलेल्या रेफाला 'खरवसानयोः' यानें विसर्ग होऊं लागेल.

तर मग अवसानसंज्ञेचा संज्ञी विराम असूं दे.

(वा.४) ज्याच्या मतानें विरामाला अवसानसंज्ञा होते त्यानें सूत्रामध्यें 'विरामः' या शब्दाचें ग्रहण केलें पाहिजे.

अहो पण ज्याच्या मतीं अभावाला अवसानसंज्ञा होते त्यानेंही 'अभावः' या शब्दाचें सूत्रामध्यें ग्रहण केलें पाहिजे.

सूत्रामध्यें अभावशब्द घालावा लागला तरी तो मला दुसऱ्या सूत्राच्या उपयोगीं पडेल, म्ह. अदर्शन शब्दाचे ऐवजीं अभावशब्द घालून 'अभावो लोपः' असें लोपसंज्ञेचें सूत्र करून त्याचे पुढें 'अवसानं च' असें अभावाला अवसानसंज्ञा सांगणारें सूत्र करीन.

तर मलाही विराम शब्द दुसऱ्या सूत्राच्या उपयोगीं पडेल, म्हणजे 'विरामलोपः' असें लोपसंज्ञेचें सूत्र रचून त्याचे पुढें 'अवसानं च' असें विरामाला अवसान संज्ञा सांगणारें सूत्र करण्यांत येईल.

आतां वर्णोच्चारणानंतरचा विराम असें म्हटलें पाहिजे.

पण विराम हा आरंभपूर्वकच असतो असें म्हटलें आहे ना ?

प्रवृत्तिपूर्वक निवृत्ति याच अर्थाला नेहमीं रम्‌धातु दाखवितो असा नियम नाहीं.

तर काय ?

प्रवृत्ति न होणें याही अर्थाला रम्‌धातु दाखवितो, जसें— उपरतान्यस्मिन् कुले व्रतानि, उपरतः स्वाध्यायः, 'या कुलामध्यें एकादशी वगैरे व्रतें 'उपरत' आहेत', 'या कुलामध्यें अध्ययन उपरत आहे'. ज्या कुलामध्यें पूर्वीं कधींही अध्ययन झालें नाहीं व व्रताचरणही नाहीं, अशा ठिकाणींही हे प्रयोग होत आहेत.

(वा.५) शब्दाचा उच्चार होतो तेव्हां त्याच्या सत्तेचा विच्छेद होतच नाहीं; म्हणून अवसान हें निमित्त संभवत नाहीं. भावाविरामभावित्वात्.

याचा काय अर्थ ?

त्याचा विग्रह केला म्हणजे सत्तेच्या अवि-

भावो भावाविरामभावित्वम् ॥

अपर आह । भावभावित्वादविराम-भावित्वाच्च शब्दस्यावसानलक्षणं नोपपद्यत इति ॥

**तत्पर इति वा वर्णस्यावसानम् ॥६॥**

विरामपरो वर्णोऽवसानसंज्ञो भवतीति वक्तव्यम् ॥

**वर्णोऽन्त्यो वावसानम् ॥७॥**

अथवा व्यक्तमेव पठितव्यमन्त्यो वर्णोऽवसानसंज्ञो भवतीति ॥ तर्त्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् ।

**संहितावसानयोर्लोकविदितत्वात्सिद्धम् ॥८॥**

संहितावसानमिति लोकविदितावेतावर्थौ । एवं हि कश्चित्कंचिदधीयानमाह । शंनोदेवीयं संहितयाधीष्वेति । स तत्र परमसंनिकर्षमधीते । अपर आह । केनावस्यसीति । स आह । अकारेणेकारेणोकारेणेति । एवमेतौ लोकविदितावर्थौ तयोर्लोकविदितत्वात्सिद्धमिति ॥

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये प्रथमस्याध्यायस्य चतुर्थे पादे चतुर्थमाह्निकम् ॥ पादश्च समाप्तः ॥

॥ प्रथमोऽध्यायः समाप्तः ॥

---

च्छेदानेंच शब्दाचें अस्तित्व असतें असा त्याचा अर्थ होतो[४].

दुसऱ्या एका पंडितानें याचा अर्थ असा केला आहे की– शब्द हा भावभावी आहे आणि अविरामभावी आहे म्हणून अवसान हें निमित्त संभवत नाहीं.

(वा.६) किंवा विराम आहे पुढें ज्याच्या अशा वर्णाला अवसानसंज्ञा होते, असें स्पष्टच सूत्र करावें. म्हणजे अभावाला मानीव पौर्वापर्य गृहीत धरावयास नको.

तर मग तसें सूत्र केलें पाहिजे.

तसें सूत्र करावयास नको.

(वा.८) संहिता म्हणजे काय आणि अवसान म्हणजे काय तें लोकांमध्यें प्रसिद्धच असल्यामुळें हें सिद्ध होत आहे. असें पहा की कोण्या एका वेदाध्ययन करणाऱ्याला दुसरा कोणी एक म्हणतो की– शं नो देवी ही ऋचा संहितेनें पठन कर. तेव्हां तो पठन करणारा मनुष्य त्यांतील अक्षरें, पदें अगदीं जोडून ती ऋचा म्हणतो. तसेंच दुसरा कोणी म्हणतो की– केनावस्यसि म्हणजे कोणत्या वर्णावर अवसान घेतोस म्ह. थांबतोस. तो म्हणतो– अकारावर, इकारावर आणि उकारावर अवसान घेतो. याप्रमाणें संहिता आणि अवसान हे पदार्थ लोकप्रसिद्ध आहेत. तेव्हां लोकव्यवहारावरूनच त्यांचें ज्ञान होतें. म्हणून संहिता आणि अवसान ह्या संज्ञा सांगणारीं हीं दोन्ही सूत्रें करावयास नकोत.

---

४. भावस्याविरामेण भावी म्हणजे सत्तेचें विच्छेदन होतांच उच्चारला जाणारा असा शब्द आहे. तेव्हां तशा त्या शब्दामध्यें रेफाला विसर्ग सांगतांना (८।३।१५) खर् हें निमित्त धरलेलें जसें जुळतें तसें तेथें अवसान हें निमित्त धरलेलें जुळत नाहीं. ज्याप्रमाणें 'अकाहून सवर्ण अच् पुढें असतांना' (६।१।१०१) असें म्हटलें असतां तेथें तो सवर्ण अकाचाच घेतला जातो त्याप्रमाणें येथें अवसान म्हणजे विराम हा रेफाचाच घेतला पाहिजे, आणि तो तर मुळींच संभवत नाहीं; कारण रेफाच्या उच्चारणाचे वेळीं त्याच्या सत्तेचा विराम कधींही होणार नाहीं.

५. भावश्चाविरामश्च भावाविरामौ, भावाविरामाभ्यां भवतीति भावाविरामभावी, असा विग्रह आहे. पूर्वाचार्यांनीं 'अभावोऽवसानम्' असें सूत्र करून वर्णाच्या अभावाला अवसानसंज्ञा केली आहे. पाणिनीनें वर्णाच्या विरामाला अवसानसंज्ञा केली आहे. परंतु कोणत्याही तऱ्हेनें अवसान हें निमित्त संभवत नाहीं. कारण रेफाचा भाव म्हणजे सत्ता असल्यामुळें अभाव नाहीं. तसेंच त्याचा अविराम म्हणजे अस्तित्वाचा अविच्छेद असल्यामुळें त्याचा विराम नाहीं. तेव्हां दोनही तऱ्हेनें अवसानसंज्ञा प्राप्त होत नाहीं.

६. भावाविरामभावित्वामुळें आलेला दोष जाण्याकरितां वर्णालाच अवसानसंज्ञा करावी असा येथून उपाय सुचवीत आहेत.

## द्वितीयोऽध्यायः

**समर्थः पदविधिः ॥२।१।१॥**[1]

विधिरिति कोऽयं शब्दः। विपूर्वाद्धात्रः कर्मसाधन इकारः। विधीयते विधिरिति। किं पुनर्विधीयते। समासो विभक्तिविधानं पराङ्गवद्भावश्च ॥

किं पुनरयमधिकार आहोस्वित्परिभाषा। कः पुनरधिकारपरिभाषयोर्विशेषः। अधिकारः प्रतियोगं तस्यानिर्देशार्थ इति योगे योग उपतिष्ठते। परिभाषा पुनरेकदेशस्था सती सर्वं शास्त्रमभिज्वलयति प्रदीपवत्। तद्यथा। प्रदीपः सुप्रज्वलित एकदेशस्थः सर्वं वेश्माभिज्वलयति। कः पुनरत्र प्रयत्नविशेषः। अधिकारे सति स्वरयितव्यं परिभाषायां पुनः सत्यां सर्वमपेक्ष्यम् ॥ तथेदमपरं द्वैतं भवत्येकार्थीभावो वा

---

येथील विधिशब्द कोणत्या अर्थाचा दर्शक आहे?

वि हा उपसर्ग मागें लावून डुधाञ् धारणपोषणयोः या धातूच्या पुढें कर्म या अर्थी किप्रत्यय (३।३।९२) करून तयार केला असल्यानें ज्याचें विधान केलें जातें तें, म्हणजे कार्य या अर्थाचा दर्शक आहे.

ज्याचें विधान केलें जातें तें कार्य कोणतें?

समास[2], विभक्तिविधान आणि परांगवद्भाव हें होय.

पण काय हा अधिकार समजावा किंवा परिभाषा समजावी?

अधिकार आणि परिभाषा या दोहोंमध्यें फरक काय?

पुढील दरएक सूत्रामध्यें तो शब्द घालण्याचा प्रसंग टाळण्याकरितां आरंभीं एके ठिकाणीं ज्याचा निर्देश करून ठेविला असतो तो अधिकार होय. अर्थात् तो अधिकार पुढील दरएक सूत्रांत उपस्थित होतो. आणि परिभाषा म्हणून जी असते ती तर एका ठिकाणीं बसून विवक्षित असलेल्या सर्व शास्त्रांना उपयोग करूं शकते; जसें— ढळढळीत केलेला दिवा एका जाग्यावर राहून घरांतील सर्व भागांस प्रकाश पुरवितो तसेंच हें होय.

सदरील दोन पक्षांपैकीं कोणत्या पक्षीं प्रयत्न कमी आणि कोणत्या पक्षीं प्रयत्न अधिक होत आहे?

अधिकारपक्ष गृहीत धरला तर स्वरितगुणानें युक्त असा समर्थशब्द सूत्रांत घातला पाहिजे (१।३।११). अर्थात् या पक्षीं पदविधिः हा शब्द सूत्रांत घालावयास नको[3]. आणि ही परिभाषा आहे असें गृहीत धरलें तर जितकीं म्हणून पदाच्या संबंधानें कार्यें सांगितलीं आहेत त्या सर्वांचा संग्रह होण्यासाठीं 'पद-

---

१. पदाला सांगितलेलें जें कार्य तें सामर्थ्यानें युक्त अशाच पदाला करावें. सामर्थ्य म्हणजे काय तें ढेंपु मुळामध्येंच आहे.

२. पदसंज्ञक शब्द कारण धरून सांगितलेलें कार्य तीन तऱ्हेचें दृष्टीस पडतें, तें येथें पदविधिशब्दानें घ्यावयाचें. समाससंज्ञा, कर्मणि द्वितीया, (२।३।२), अन्तरान्तरेण युक्ते (२।३।४) इत्यादि सूत्रांनीं सांगितलेलें विभक्तिविधान आणि 'सुबामन्त्रिते' (२।१।२) या सूत्रानें सांगितलेला परांगवद्भाव, हीं सर्व पदाच्या संबंधानें सांगितलेलीं कार्यें होत.

३. कारण परांगवद्भाव, समास आणि विभक्ति सांगणारीं सूत्रें पुढें आहेत तेथें समर्थपदाची अनुवृत्ति होईल.

सामर्थ्यं स्याद्व्यपेक्षा वेति। तत्रैकार्थीभावे सामर्थ्येऽधिकारे च सति समास एकः संगृहीतो भवति विभक्तिविधानं पराङ्गवद्भावश्चासंगृहीतः। व्यपेक्षायां पुनः सामर्थ्येऽधिकारे च सति विभक्तिविधानं पराङ्गवद्भावश्च संगृहीतः समासस्त्वेकोऽसंगृहीतः। अन्यत्र खल्वपि समर्थग्रहणानि युक्तग्रहणानि च कर्तव्यानि भवन्ति। क्वान्यत्र। इसुसोः सामर्थ्ये [८.३.४४] नचवाहाहैवयुक्ते [८.१.२४] इति। व्यपेक्षायां पुनः सामर्थ्ये परिभाषायां च सत्यां यावान्व्याकरणे पदगन्धोऽस्ति स सर्वः संगृहीतो भवति समासस्त्वेकोऽसंगृहीतः। तत्रैकार्थीभावः सामर्थ्यं परिभाषा चेत्येवं सूत्रमभिन्नतरकं भवति॥ एवमपि क्वचिदकर्तव्यं समर्थग्रहणं क्रियते

---

विधिः' हा शब्द घालून जसें आहे तसेंच सूत्र ठेविलें पाहिजे. तसेंच येथें दुसरा असा एक संशय येतो की एकार्थीभावरूप सामर्थ्य घ्यावयाचें किंवा व्यपेक्षा नांवाचें सामर्थ्य घ्यावयाचें? त्यांत एकार्थीभाव नांवाचें सामर्थ्य गृहीत धरून हा अधिकार आहे असें गृहीत धरलें असतां फक्त एक समासाचा तेवढा संग्रह होतो, आणि विभक्तिविधान व पराङ्गवद्भाव यांचा संग्रह होत नाहीं. आतां व्यपेक्षा नावाचें सामर्थ्य गृहीत धरून हा अधिकार आहे असें गृहीत धरलें तर विभक्तिविधान आणि परांगवद्भाव या उभयतांचा संग्रह होतो; पण एका समासाचा तेवढा संग्रह होत नाहीं. शिवाय अन्य ठिकाणीं समर्थ व युक्त हे शब्द सूत्रामध्यें घालावयास पाहिजेत.

अन्य ठिकाणीं म्हणजे कुठें?

'इसुसोः सामर्थ्ये' (८।३।४४) आणि 'न चवाहाहैव' (८।१।२४) येथें[७]. आतां व्यपेक्षा नांवाचें सामर्थ्य गृहीत धरून ही परिभाषा आहे असें गृहीत धरलें तर या व्याकरणशास्त्रामध्यें जेवढीं म्हणून पदाच्या संबंधानें कार्यें सांगितलीं आहेत त्या सर्वांचा येथें संग्रह होतो. एकट्या समासाचा मात्र तेवढा संग्रह होत नाहीं. त्यांत एकार्थीभाव नांवाचें सामर्थ्य स्वीकारून ही परिभाषा आहे असें स्वीकारलें तर मूळ सूत्रांत बिलकूल बदल होत नाहीं. तरी पण क्वचित् स्थलीं जरूर नसतां समर्थग्रहण केलें जात आहे, आणि क्वचित् स्थलीं

---

४. एकमेकांचा संबंध असणें हें सामर्थ्य होय. तें दोन तऱ्हेचें. एक व्यपेक्षा नांवाचें आणि दुसरें एकार्थीभाव या नांवाचें. त्यांत राज्ञः पुरुषः वगैरे वाक्यांमध्यें जो एकमेकांचा संबंध तें व्यपेक्षा नांवाचें सामर्थ्य होय, आणि तें सामर्थ्य वाक्यामध्येंच असतें. राजपुरुषः वगैरे समासादि वृत्तींमध्यें जो परस्परांचा संबंध, तें एकार्थीभाव नांवाचें सामर्थ्य, व तें समासादि वृत्तीमध्येंच असतें. जरी अनेक अर्थ असले तरी ते मिळून एकच अर्थ आहे असें समजणें याला एकार्थीभाव म्हणतात.

५. एकार्थीभाव नांवाचें सामर्थ्य पूर्वी दाखविलेल्या तीन स्थळांपैकीं समासामध्येंच असल्यामुळें समासविधायक शास्त्रामध्येंच समर्थाधिकार उपस्थित होईल; आणि विभक्तिविधान व परांगवद्भाव येथें तसलें सामर्थ्य संभवत नसल्यामुळें तेथें हा अधिकार उपस्थित होणार नाहीं.

६. व्यपेक्षा नांवाचें सामर्थ्य वाक्यामध्येंच संभवत असल्यामुळें विभक्तिविधान आणि परांगवद्भाव याविषयीं हा अधिकार उपस्थित होईल. समासाविषयीं उपस्थित होणार नाहीं.

७. इसुसोः. आणि नचवा. हींही पदकार्येंच असल्यामुळें तेथें या परिभाषेनेंच काम भागेल, म्हणून तेथें सामर्थ्ये आणि युक्ते हे शब्द घालावयास नकोत.

८. एकार्थीभावसामर्थ्यसहित परिभाषा असा पक्ष घेतला असतां बिलकूल दोष येत नाहीं. तो असा— परांगवद्भावाविषयीं 'तन्निमित्तग्रहणं वा' (२।१।२, वा.२) असें वचन केलें असल्यामुळें तेथें समर्थपरिभाषा न आली तरी हरकत नाहीं. विभक्तिविधानाविषयींही कारकविभक्तींचे ठिकाणीं क्रिया आणि कारक यांचा नित्यसंबंध असतोच. पण तेथें व्यपेक्षा-

क्वचिच्च कर्तव्यं न क्रियते । अकर्तव्यं तावत्क्रियते समर्थानां प्रथमाद्वा [४.१.८२] इति । कर्तव्यं न क्रियते कर्मण्यण् [३.२.१] समर्थादिति । ननु च गम्यते तत्र सामर्थ्यम् । कुम्भकारः नगरकार इति । सत्यं गम्यत उत्पन्ने तु प्रत्यये । स एव तावत्समर्थादुत्पाद्यः ॥

अथ समर्थग्रहणं किमर्थम् । वक्ष्यति द्वितीया श्रितादिभिः समस्यते । कष्टश्रितः नरकाश्रित इति । समर्थग्रहणं किमर्थम् । पश्य देवदत्त कष्टं श्रितो विष्णुमित्रो गुरुकुलम् ॥ तृतीया तत्कृतार्थेन गुणवचनेन [२.१.३०] शङ्कुलाखण्डः किरिकाणः। समर्थग्रहणं किमर्थम् । तिष्ठ त्वं शङ्कुलया खण्डो धावति मुसलेन ॥ चतुर्थी तदर्थार्थबलिहितसुखरक्षितैः [३६] गोहि-

जरूर असतांही समर्थग्रहण करण्यांत आलें नाहीं; जसें– 'समर्थानां प्रथमात्' (४।१।८२) येथें जरूर नसतां समर्थशब्द घातला गेला आहे. आणि 'कर्मण्यण्, (३।२।१) येथें जरूर असतांही समर्थशब्द घालण्यांत आला नाहीं.

पण तेथें समर्थशब्द घातला नाहीं तरी कुम्भकारः, नगरकारः, वगैरे स्थलीं सामर्थ्याची नियमानें प्रतीति होतच आहे.

सामर्थ्याची नियत प्रतीति होत आहे हें खरें पण ती प्रतीति प्रत्यय उत्पन्न झाल्यावर होत आहे. तेव्हां तो प्रत्ययच अगोदर समर्थाहून उत्पन्न झाला पाहिजे. यासाठीं तेथें समर्थशब्द घातला पाहिजे.

आतां हें प्रकृत सूत्र कशाकरितां बरें केलें आहे ?

द्वितीयान्त शब्दाचा श्रित वगैरे शब्दाबरोबर समास होतो असें पुढें (२।१।२४) सांगणार आहें; जसें– कष्टश्रितो, नरकश्रितः वगैरे.

येथें समर्थग्रहणाचा काय उपयोग ?

पश्य[11] देवदत्त कष्टम्, श्रितो विष्णुमित्रो गुरुकुलम्, येथें परस्परांशीं संबंध नसलेल्या कष्ट व श्रित या शब्दांचा समास होत नाहीं.

तसेंच तृतीयान्ताचा तृतीयान्ताच्या अर्थानें केलेला जो गुण तद्वाचक शब्दाबरोबर आणि अर्थशब्दाबरोबर समास (२।१।३०) होतो; जसें– शङ्कुलया खण्डः शङ्कुलाखण्डः, किरिणा काणः किरिकाणः, वगैरे.

येथें समर्थग्रहणाचा काय उपयोग ?

त्वं तिष्ठ शङ्कुलया, खण्डो धावति मुसलेन, या वाक्यांमध्यें परस्परांशीं अन्वित नसलेल्या अशा शङ्कुला आणि खण्डशब्द या उभयतांचा समास होत नाहीं.

चतुर्थ्यन्त शब्दाचा तदर्थ, अर्थ, बलि, हित, सुख आणि रक्षित या शब्दांबरोबर समास (२।१।३६) होतो; जसें– गवे हितं गो-

नांवाचेंच सामर्थ्य नियत असतें. उपपदविभक्तीचे ठिकाणीं कोठें युक्तशब्द, कोठें योगशब्द घातला आहेच. म्हणून विभक्तिविधानाचे ठिकाणीं समर्थपरिभाषा न आली तरी हरकत नाहीं. आणि परिभाषात्व मानल्यामुळें ३।४।५ या अध्यायामध्येंही समर्थपरिभाषा प्रवृत्त होत असल्यानें सुब्धातु, कृत्तद्धित, वगैरे सर्व वृत्तींचाही संग्रह होतो.

९. 'घकालतनेषु' (६।३।१७) या लिंगावरून विभक्त्यन्ताहून तद्धितप्रत्ययाची उत्पत्ति होत असल्यामुळें तद्धितविधि हा पदविधि होतो. तेव्हां प्रकृत परिभाषेनेंच काम भागतें.

१०. 'पञ्चकं प्रातिपदिकार्थः' या पक्षीं प्रातिपदिकानेंच कर्मार्थाचें अभिधान झाल्यामुळें कर्मवाचक प्रातिपदिक उपपद असतां सांगितलेल्या अणप्रत्ययविधानाला पदविधि म्हणतां येत नाहीं. तेव्हां प्रकृत परिभाषेनें काम भागत नाहीं.

११. विष्णुमित्र नांवाच्या मनुष्यानें गुरुकुलाचा आश्रय धरला हे कष्ट पहा असा या वाक्याचा अर्थ. येथें कष्ट या शब्दाचा पश्य या क्रियापदाकडे आणि श्रित शब्दाचा गुरुकुलाकडे संबंध आहे. ही परिभाषा नसेल तर असमर्थ अशाही द्वितीयान्त शब्दाचा श्रितादिकाशीं समास करण्याची पाळी येईल. असेंच 'तृतीयातत्कृतार्थेन' वगैरे स्थलीं पुढेंही समजावें.

तम् अश्वहितम् । समर्थग्रहणं किमर्थम् । सुखं गोभ्यो हितं देवदत्ताय ॥ पञ्चमी भयेन [३७] वृकभयम् दस्युभयम् चोरभयम् । समर्थग्रहणं किमर्थम् । गच्छ त्वं मा वृकेभ्यो भयं देवदत्तस्य यज्ञदत्तात् ॥ षष्ठी सुबन्तेन समस्यते । राजपुरुषः ब्राह्मणकम्बलः । समर्थग्रहणं किमर्थम् । भार्या राज्ञः पुरुषो देवदत्तस्य ॥ सप्तमी शौण्डैः [४०] अक्षशौण्डः स्त्रीशौण्डः । समर्थग्रहणं किमर्थम् । कुशलो देवदत्तोऽक्षेषु शौण्डः पिबति पानागारे ॥

अथ क्रियमाणेऽपि समर्थग्रहण इह कस्मान्न भवति । महत्कष्टं श्रित इति । न वा भवति महाकष्टश्रित इति । भवति यदैतद्वाक्यं भवति महत्कष्टं महाकष्टम् महाकष्टं श्रितो महाकष्टश्रित इति । यदा त्वेतद्वाक्यं भवति महत्कष्टं श्रित इति तदा न भवितव्यं तदा च प्राप्नोति । तदा कस्मान्न भवति । कस्य कस्मान्न भवति किं द्वयोराहोस्विद्बहूनाम् । बहूनां कस्मान्न भवति । सुप्सुपेति वर्तते । ननु

---

हितम् वगैरे.

येथ समर्थग्रहणाचा काय उपयोग ?

सुखं गोभ्यः, हितं देवदत्ताय, या वाक्यांमध्यें एकमेकांशीं अन्वित नसलेल्या अशा गो आणि हित या शब्दांचा समास होत नाहीं.

पञ्चम्यन्त शब्दाचा भयशब्दाबरोबर समास (२।१।३७) होतो; जसें— वृकात् भयं वृकभयम्, दस्युभयं, चोरभयम् वगैरे.

येथें समर्थग्रहणाचा काय उपयोग ?

गच्छ त्वं मा वृकेभ्यः, भयं देवदत्ताद्यज्ञदत्तस्य, येथें परस्परान्वयरहित अशा वृक आणि भय या शब्दांचा समास होत नाहीं.

षष्ठ्यन्त शब्दाचा सुबन्तशब्दाबरोबर समास (२।२।८) होतो; जसें— राजपुरुषः ब्राह्मणकंबलः वगैरे.

येथें समर्थग्रहणाचा काय उपयोग ?

भार्या राज्ञः, पुरुषो देवदत्तस्य, या वाक्यांमध्यें परस्परसंबंध नसलेल्या अशा राज आणि पुरुष या शब्दांचा समास होत नाहीं.

तसेंच सप्तम्यन्ताचा शौण्ड वगैरे शब्दांबरोबर समास (२।१।४०) होतो; जसें अक्षेषु शौण्डः, स्त्रीशौण्डः, वगैरे.

येथें समर्थग्रहणाचा काय उपयोग ?

कुशलो देवदत्तोऽक्षेषु, शौण्डः पिबति पानागारे, या वाक्यांमध्यें परस्पर अन्वयरहित अशा अक्ष आणि शौण्ड या शब्दांचा समास होत नाहीं.

आतां ही समर्थपरिभाषा उपस्थित झाली असतांही महत्कष्टं श्रितः येथें कष्ट आणि श्रित या शब्दांचा कां बरें समास होत नाहीं ?

महाकष्टश्रितः असा समास होत नाहीं काय ?

जेव्हां महच्च तत्कष्टं च महाकष्टं, महाकष्टं श्रितः, असें विग्रहवाक्य विवक्षित धरलें तेव्हां महाकष्टशब्दाचा श्रितशब्दाबरोबर समास होतो, आणि महत् कष्टं श्रितः असें वाक्य ठेविलें म्हणजे महच्छब्दाशीं समास न करतां फक्त त्याचा संबंध असलेल्या अशा कष्टशब्दाचा श्रितशब्दाशीं समास होत नाहीं.

पण तेव्हांही समास प्राप्त होत आहे ना ? तो कां बरें होत नाहीं ?

कोणाचा समास कां बरें होत नाहीं, म्हणजे काय तीन पदांपैकीं दोन पदांचा समास कां बरें होत नाहीं किंवा बहुत पदांचा समास कां बरें होत नाहीं ? तिन्ही पदांचा समास एकदम कां बरें होत नाहीं ?

सुप् व सुपा अशीं पदें अनुवृत्त होत आहेत, म्हणजे एका सुबन्ताचा एका सुबन्ताबरोबर समास होतो. अर्थात् तीन वगैरे बहुत सुबन्तांचा समास होत नाहीं.

अरे पण, शास्त्रें हीं सामान्याला अनुलक्षून

च भो आकृतौ शास्त्राणि प्रवर्तन्ते । तद्यथा । प्रातिपदिकादिति वर्तमानेऽन्यस्माच्चान्यस्माच्च प्रातिपदिकादुत्पत्तिर्भवति । सत्यमेवमेतत् । आकृतिस्तु प्रत्येकं परिसमाप्यते । यावत्येतत्परिसमाप्यते प्रातिपदिकादिति तावत उत्पत्त्या भवितव्यं प्रत्येकं चैतत्परिसमाप्यते न समुदाये । एवमिहापि यावत्येतत्परिसमाप्यते सुप्सुपेति तावतः समासेन भवितव्यं द्वयोश्चैतत्परिसमाप्यते न बहुषु ॥ द्वयोस्तर्हि कस्मान्न भवति । असामर्थ्यात् । कथमसामर्थ्यम् । सापेक्षमसमर्थं भवतीति ॥

यदि सापेक्षमसमर्थं भवतीत्युच्यते राजपुरुषोऽभिरूपः राजपुरुषो दर्शनीयः अत्र वृत्तिर्न प्राप्नोति । नैष दोषः ।

---

प्रवृत्त होत असतात; जसें— प्रतिपदिकाहून असें म्हटलें असतां दरएक प्रातिपदिकाहून प्रत्ययाची उत्पत्ति होते.

हें खरें आहे. कारण सामान्य म्ह. जाति ही दरएक व्यक्तीवर पूर्णत्वानें स्थित असते. तेव्हां जेवढ्या शब्दस्वरूपाला अवलंबून प्रातिपदिक हें नांव वापरलें जातें तेवढ्या शब्दस्वरूपाहून सुपाची उत्पत्ति होते. प्रत्येक शब्दस्वरूपाला प्रातिपदिक हें नांव वापरलें जाते. शब्दस्वरूपांच्या समुदायाला सर्वांना मिळून हें नांव वापरलें जात नाहीं. तसें येथेंही जेवढ्या शब्दस्वरूपाला सुबन्त असें म्हणतां येईल तेवढ्याचा तेवढ्यांशीं समास व्हावा, आणि सुबन्त सुबन्ताबरोबर असें म्हटलें तर दोन सुबन्तशब्दस्वरूपाला अवलंबूनच म्हटलें जातें, बहुत सुबन्तांच्या समुदायाला म्हटलें जात नाहीं. अर्थात् महत् कष्टं श्रितः या वाक्यांत बहुत सुबन्तांचा समास होत नाहीं.[12]

तर मग दोन सुबन्तांचा समास कां बरें होत नाहीं ?

एकार्थीभाव[13] नांवाचें सामर्थ्य नाहीं म्हणून.

तें सामर्थ्य कां बरें नाहीं ?

विशेषणविशेष्यभावसंबंधानें साकांक्ष असलेला शब्द सामर्थ्यहीन[14] असतो.

साकांक्ष असलेला शब्द सामर्थ्यहीन असतो असें म्हटलें तर राजपुरुषोऽभिरूपः या वाक्यांत पुरुषशब्दाचा राजशब्दाबरोबर समास होणार नाहीं. कारण येथें पुरुषशब्द हा अभिरूप या विशेषणामुळें साकांक्ष आहे.

हा दोष येत नाहीं. कारण येथें प्रधान

---

१२. समासविधायक शास्त्रामध्यें एकवचनान्त अशीं सुप् आणि सुपा हीं पदें अनुवृत्त असल्यामुळें एकाच सुबन्ताचा एका सुबन्ताबरोबर समास सांगितला असल्यामुळें महत् आणि कष्ट या दोन सुबन्तांचा मिळून श्रित या तिसऱ्या सुबन्ताबरोबर समास होऊं शकत नाहीं.

१३. एक अर्थ विशेषण आणि दुसरा अर्थ त्याचा विशेष्य अशा रीतीनें परस्परांशीं संबंध पावलेले जे दोन अर्थ ते दोन्ही अर्थ मिळून एकच अर्थ आहे असें मानणें याला एकार्थीभाव म्हणतात. हें एकार्थीभावरूपी सामर्थ्य मानतां आलें तरच त्या ठिकाणीं समास, तद्धित, वगैरे वृत्ति करतां येते.

१४. ज्या एका पदार्थाचा विशेषण किंवा विशेष्य या नात्यानें जो दुसऱ्याशीं संबंध झालेला असतो तो संबंध बाजूला ठेवून नुसत्या त्या पदार्थाचा निराळ्या पदार्थाबरोबर एकार्थीभाव मानतां येत नाहीं. तेव्हां येथें कष्ट याचा विशेष्य या नात्यानें महत् याच्याशीं झालेला जो संबंध तो बाजूला सारून त्या कष्ट याचा श्रित याबरोबर एकार्थीभाव मानतां येत नाहीं. कोणाचाही कोणाशीं विशेषणविशेष्यभावसंबंध झाला म्हणजे तेथें विशेषण हें विशेष्याच्या अधीन असतें. यामुळें त्या विशेषणाचा दुसरीकडे पुनः विशेषण या नात्यानें संबंध होत नाहीं. विशेष्याचा मात्र विशेषणविशिष्टाचा किंवा केवलाचा दुसरीकडे विशेषण या नात्यानें किंवा विशेष्य या नात्यानें संबंध होतो. त्यांतसुद्धां वृत्तीकरितां जर त्या दुसऱ्या अर्थाबरोबर एकार्थीभाव मानणें झालें तर मात्र विशेषणविशिष्टाचाच म्हणजे तें पूर्वीचें विशेषण बगलेंत घेऊन त्यासकटच मानतां येईल. पण त्या बगलेंत घेतल्या जाणाऱ्या विशेषणाबरोबर पूर्वी निराळा एकार्थीभाव मानला

प्रधानमत्र सापेक्षं भवति च प्रधानस्य सापेक्षस्यापि समासः ॥ यत्र तर्ह्यप्रधानं सापेक्षं भवति तत्र ते वृत्तिर्न प्राप्नोति । देवदत्तस्य गुरुकुलम् देवदत्तस्य गुरुपुत्रः देवदत्तस्य दासभार्येति । नैष दोषः । समुदायापेक्षात्र षष्ठी सर्वं गुरुकुलमपेक्षते ॥ यत्र तर्हि न समुदायापेक्षा षष्ठी तत्र वृत्तिर्न प्राप्नोति । किमोदनः शालीनाम् । सक्त्वाढकमापणीयानाम् । कुतो भवान्पाटलिपुत्रक इति । इह चापि देवदत्तस्य गुरुकुलम् देवदत्तस्य गुरुपुत्रः देवदत्तस्य दासभार्येति यद्येषा समुदायापेक्षा षष्ठी स्यान्नैतन्नियोगतो गम्येत देवदत्तस्य यो गुरुस्तस्य यः पुत्र इति । किं तर्हि । अन्यस्यापि गुरुपुत्रो देवदत्तस्य किंचिदित्येषोऽर्थो गम्येत । यतस्तु नियोगतो देवदत्तस्य यो गुरुस्तस्य यः पुत्र इत्येषोऽर्थो गम्यतेऽतो मन्यामहे नैषा समुदायापेक्षा षष्ठीति ॥ अन्यत्र खल्वपि समर्थग्रहणे सापेक्षस्यापि कार्यं भवति ।

---

असलेला असा पुरुष हा साकांक्ष आहे, आणि साकांक्ष असलेल्या अशाही प्रधानाचा तर समास होणारच.

तर मग जेथें अप्रधान (विशेषण) हें साकांक्ष आहे तेथें त्या अप्रधानाची प्रधानाबरोबर वृत्ति प्राप्त होऊं शकत नाहीं; जसें— देवदत्तस्य गुरुकुलम्, देवदत्तस्य गुरुपुत्रः, देवदत्तस्य दासभार्या वगैरे. येथें कुलरूप उत्तरपदार्थाला विशेषण असलेला गुरुशब्द आपल्या विशेषणाविषयीं साकांक्ष असल्यामुळें सामर्थ्यहीन आहे. तेव्हां त्याची कुलशब्दाबरोबर वृत्ति प्राप्त होऊं शकत नाहीं.

हा दोष येत नाहीं. कारण देवदत्तशब्दाच्या पुढें असलेली षष्ठी ही गुरुकुल या समुदायाशीं असलेल्या संबंधाची दर्शक आहे, म्हणजे देवदत्ताचा गुरुकुल एवढ्या समुदायाशीं संबंध दाखवीत आहे. (तेव्हां देवदत्ताचा गुरुकुल या समुदायाशीं प्रत्यक्ष संबंध नाहीं तरी समुदायांतील एक भाग जो गुरु त्याच्याशीं प्रत्यक्ष संबंध असल्यानें त्याच्या द्वारानेंच समुदायाशीं संबंध पोहोचतो. अर्थात् देवदत्ताचा गुरूशीं असलेला संबंध वृत्ति केल्यानें तुटूं शकत नसल्यामुळें गुरुशब्दाची कुलशब्दाबरोबर वृत्ति होण्यास अडचण नाहीं.)

तर मग ज्या ठिकाणीं षष्ठी ही समुदायाशीं असलेल्या संबंधाची दर्शक नसेल तेथें वृत्ति होणार नाहीं; जसें— किमोदनः[15] शालीनाम्, सक्त्वाढकमापणीयानाम्, कुतो भवान् पाटलिपुत्रकः. शिवाय देवदत्तस्य गुरुकुलं, देवदत्तस्य गुरुपुत्रः, देवदत्तस्य दासभार्या, वगैरे स्थलींही जर देवदत्तशब्दाच्या पुढील षष्ठी गुरुकुल वगैरे समुदायाशीं असलेल्या संबंधाची दर्शक असेल तर या वाक्यापासून देवदत्ताचा जो गुरु त्याचा मुलगा असा जो अर्थ नेहमी मनांत येतो तो तसाच मनांत येणार नाहीं, तर दुसऱ्या कुणाच्या तरी गुरूचा मुलगा हा देवदत्ताचा कांहीं तरी एक संबंधी आहे, असाही अर्थ मनांत येईल.

ज्यापेक्षां देवदत्ताचा जो गुरु त्याचा मुलगा असाच नेमका अर्थ मनांत येतो त्यापेक्षां ती षष्ठी गुरुपुत्र वगैरे समुदायाशीं असलेल्या संबंधाची दर्शक नाहीं असें आम्ही सम[16]-

---

असेल तर.

१५. कोणत्या व्रीहीचा भात, म्हणजे रायभोगाचा कीं आंबेमोहोराचा, असा याचा अर्थ आहे. येथें वृत्तीच्या बाहेर असलेल्या शालींशीं किम्‌शब्दाचा संबंध आहे. तसेंच सक्तूंचा आपणीयांशीं संबंध आहे. तसेंच कुतः याचा पाटलिपुत्राशीं संबंध आहे. पाटलिपुत्रांतून कोठून आलांत असा याचा अर्थ आहे. कारण पाटलिपुत्राचे अनेक भाग आहेत. पाटलिपुत्रादागतः पाटलिपुत्रकः, पाटलिपुत्रांतून आलेला या अर्थी पाटलिपुत्रशब्दाहून वुञ्प्रत्यय (४।२।१२३) झाला आहे.

१६. एकंदरींत 'सापेक्षमसमर्थवत्' म्हणजे

क्कान्यत्र । इसुसोः सामर्थ्ये [८.३.४४] ब्राह्मणस्य सर्पिष्करोतीति ॥ तस्मान्नै-तच्छक्यं वक्तुं सापेक्षमसमर्थं भवतीति ॥ वृत्तिस्तर्हि कस्मान्न भवति महत्कष्टं श्रित इति । सविशेषणानां वृत्तिर्न वृत्तस्य वा विशेषणं न प्रयुज्यत इति वक्तव्यम् ॥ यदि सविशेषणानां वृत्तिर्न वृत्तस्य वा विशेषणं न प्रयुज्यत इत्युच्यते देवदत्तस्य गुरुकुलम् देवदत्तस्य गुरुपुत्रः देवदत्तस्य दासभार्येत्यत्र वृत्तिर्न प्राप्नोति । अगुरु-कुलपुत्रादीनामिति वक्तव्यम् ॥

तत्तर्हि वक्तव्यं सविशेषणानां वृत्तिर्न वृत्तस्य वा विशेषणं न प्रयुज्यतेऽगुरु-कुलपुत्रादीनामिति । न वक्तव्यम् । वृत्ति-स्तर्हि कस्मान्न भवति । अगमकत्वात् । इह समानार्थेन वाक्येन भवितव्यं समा-सेन च । यश्चेहार्थो वाक्येन गम्यते मह-त्कष्टं श्रित इति न जातुचित्समासेनासौ गम्यते महत्कष्टश्रित इति । एतस्माद्धेतो-र्ब्रूमोऽगमकत्वादिति न ब्रूमोऽपशब्दः स्यादिति । यत्र गमको भवति भवति तत्र वृत्तिः । तद्यथा । देवदत्तस्य गुरु-

---

जतो. अन्य ठिकाणींही समर्थाला सांगितलेलें कार्य साकांक्षालाही होत असतें.

अन्य ठिकाणीं म्हणजे कुठें ?

इसुसोः सामर्थ्ये (८।३।४४) येथें उदा.— ब्राह्मणस्य सर्पिष्करोति[17] तेव्हां साकांक्ष शब्द सामर्थ्यरहित होतो असें मानणें शक्य नाहीं.

तर मग महत् कष्टं श्रितः येथें वृत्ति (समास) कां बरें होत नाहीं ?

विशेषण लागलेल्या शब्दाची दुसऱ्या शब्दाबरोबर वृत्ति होत नाहीं आणि वृत्तींत सांपडलेल्या विशेषणाला विशेषण लागत नाहीं असें वचन करावें.

जर 'विशेषण लागलेल्या शब्दाची दुसऱ्या शब्दाबरोबर वृत्ति होत नाहीं आणि वृत्ती-मध्यें सांपडलेल्या विशेषणाला विशेषण लागत नाहीं' असें वचन केलें तर देवदत्तस्य गुरु-कुलम्, देवदत्तस्य दासभार्या, येथें वृत्ति होणार नाहीं.

गुरुपुत्र, गुरुकुल, वगैरे नित्यसापेक्ष शब्द खेरीज करून वरील दोन्ही नियम लागू होतात असें वचन करावें.

तर मग विशेषणानें युक्त असलेल्या शब्दाची वृत्ति होत नाहीं, व वृत्तींत सांपड-लेल्या शब्दाला विशेषण लागत नाहीं, आणि हा नियम गुरुपुत्र वगैरे सापेक्ष शब्दांना लागू होत नाहीं, असें वचन केलें पाहिजे.

वचन करावयास नको.

तर महत् कष्टं श्रितः येथें वृत्ति कां बरें होत नाहीं ?

वृत्ति ही अर्थबोधक होत नाहीं म्हणून. म्हणजे विग्रहवाक्य व समास या उभयतांचा अर्थ सारखा असला पाहिजे, आणि प्रकृत स्थलीं तर महत् कष्टं श्रितः या वाक्यापासून जो अर्थ मनांत येतो तो अर्थ महत्कष्टश्रितः या समासापासून केव्हांही मनांत येत नाहीं. यावरून अर्थबोधक होत नसल्यामुळें वृत्ति होत नाहीं असें आम्ही म्हणतों. वृत्ति केली तर तो अपशब्द होईल असें आम्ही म्हणत नाहीं. जेथें वाक्याच्या अर्थाला समास दाखवूं शकतो तेथें वृत्ति होतेच; जसें— देवदत्तस्य

---

साकाङ्क्ष असलेला शब्द सामर्थ्यहीन असतो असें मानणें बरोबर नाहीं असें सिद्ध झालें.

१७. 'सापेक्षमसमर्थवत्' असें स्वतंत्र वचन मानलें तर सर्पिष्करोति या दोघांमधील सामर्थ्याचा निषेध झाल्यामुळें तिष्ठतु सर्पिः, पिबोदकम्, येथील-प्रमाणें षत्व होणार नाहीं.

कुलम् देवदत्तस्य गुरुपुत्रः देवदत्तस्य दासभार्येति ॥ यद्यगमकत्वं हेतुर्नार्थः समर्थग्रहणेन। इहापि भार्या राज्ञः पुरुषो देवदत्तस्येति योऽर्थो वाक्येन गम्यते नासौ जातुचित्समासेन गम्यते भार्या राजपुरुषो देवदत्तस्येति। तस्मान्नार्थः समर्थग्रहणेन ॥

इदं तर्हि प्रयोजनम्। अस्त्यसमर्थसमासो नञ्समासो गमकस्तस्य साधुत्वं मा भूत्। अकिंचित्कुर्वाणम् अमाषंहरमाणम् अगाधादुत्सृष्टमिति ॥ एतदपि नास्ति प्रयोजनम्। अवश्यं कस्यचिन्नञ्समासस्यासमर्थसमासस्य गमकस्य साधुत्वं वक्तव्यम्। असूर्यंपश्यानि मुखानि। अपुनर्गेयाः श्लोकाः। अश्राद्धभोजी अलवणभोजी ब्राह्मणः। सुडनपुंसकस्य [१.१.४३] इत्येतन्नियमार्थं भविष्यति। एतस्यैवासमर्थसमासस्य नञ्समासस्य गमकस्य साधुत्वं भवति नान्यस्येति ॥ तस्मान्नार्थः समर्थग्रहणेन ॥

अथ क्रियमाणेऽपि समर्थग्रहणे समर्थमित्युच्यते। किं समर्थं नाम।

---

गुरु[१८]कुलम्, देवदत्तस्य गुरुपुत्रः, देवदत्तस्य दासभार्या वगैरे.

जर वाक्याचा अर्थ समासानें दाखवूं न शकणें हें वृत्ति न होण्याचें कारण आहे तर समर्थपरिभाषा करण्यांत कांहीं उपयोग नाहीं. कारण भार्या राज्ञः, पुरुषो देवदत्तस्य, या वाक्यांपासून जो अर्थ मनांत येतो तो अर्थ भार्या राजपुरुषो देवदत्तस्य या समासापासून केव्हांही मनांत येत नाहीं. तेव्हां समर्थग्रहण करावयास नको.

तर मग जो हा नञ्समास सामर्थ्यरहित असून वाक्याच्या अर्थाला दाखवूं शकतो तसला समास शुद्ध शब्द म्हणून समजला न जावा हें समर्थग्रहणाचें प्रयोजन समजावें; जसें– अकिंचित्कुर्वाणम्[१९], अमाषं हरमाणम्, अगाधादुत्सृष्टम्.

हेंही समर्थग्रहणाचें प्रयोजन म्हणतां येत नाहीं; कारण असमर्थ आणि वाक्याच्या अर्थाचे बोधक अशा कांहींना म्हणजे असूर्यंपश्यानि मुखानि, अपुनर्गेयाः श्लोकाः, अश्राद्धभोजी ब्राह्मणः, या समासांना साधुशब्दत्व अवश्य सांगावयास [२०]पाहिजे. आतां ही प्रकृत परिभाषा नसली म्हणजे असमर्थ व गमक अशा नञ्समासाला साधुशब्दत्व सहजच प्राप्त होत असल्यामुळें अनपुंसकस्य हा निर्देश नियमार्थ समजला जाईल. तो नियम असाः– सामर्थ्यरहित असून वाक्यसमानार्थक असलेल्या अशा नञ्समासाला साधुत्व मानावयाचें झाल्यास असूर्य वगैरे नञ्समासांनाच मानावें. अर्थात् बाकीचे तसले अकिंचित्कुर्वाणः इत्यादिक अपशब्द होत. तेव्हां समर्थग्रहणाचा उपयोग नाहीं.

आतां समर्थग्रहण जरी केलें तरी तेथें समर्थ म्हणजे काय?

---

१८. गुरु, दास, इत्यादि शब्द नित्यसाकाङ्क्ष आहेत, म्हणजे ते शब्द कानीं पडतांच कोणाचा गुरु, कोणाचा दास, अशी आकांक्षा उत्पन्न होते. त्यामुळें देवदत्त हा शब्द जरी वृत्तीच्या बाहेर आहे तरी त्याचा गुरु असें चट्दिशीं मनांत येतें. तेव्हां 'देवदत्ताच्या गुरूचें कुल' हा जो अर्थ 'देवदत्तस्य गुरोः कुलम्' या वाक्यापासून मनांत येतो तोच 'देवदत्तस्य गुरुकुलम्' यापासूनही मनांत येतो.

१९. कांहीं एक न करणारा असा अर्थ आहे. ह्या उदाहरणामध्यें न याचा समास, किंचित्, माष आणि गाध या शब्दांशीं झाला आहे. परंतु त्याचा अन्वय कुर्वाणम्, हरमाणम्, उत्सृष्टम्, यांचिकडे आहे.

२०. असूर्यंपश्य वगैरे शब्दांना प्रकृत परिभाषेनें साधुत्व येणार नाहीं. तें अनपुंसकस्य (१।१।४३) या निर्देशावरून मानावें लागतें.

**पृथगर्थानामेकार्थीभावः समर्थवचनम् ॥ १ ॥**

पृथगर्थानां पदानामेकार्थीभावः समर्थमित्युच्यते॥ क पुनः पृथगर्थानि कैकार्थानि । वाक्ये पृथगर्थानि । राज्ञः पुरुष इति । समासे पुनरेकार्थानि । राजपुरुष इति ॥ किमुच्यते पृथगर्थानीति यावता राज्ञः पुरुष आनीयतामित्युक्ते राजपुरुष आनीयते राजपुरुष इति च स एव । नापि ब्रूमोऽन्यस्यानयनं भवतीति । कस्तर्ह्येकार्थीभावकृतो विशेषः ।

**सुबलोपो व्यवधानं यथेष्टमन्यतरेणाभिसंबन्धः स्वर**

इति ॥ सुपोऽलोपो भवति वाक्ये । राज्ञः पुरुष इति । समासे पुनर्न भवति । राजपुरुष इति ॥ व्यवधानं च भवति वाक्ये । राज्ञ ऋद्धस्य पुरुष इति । समासे न भवति । राजपुरुष इति ॥ यथेष्टमन्यतरेणाभिसंबन्धो भवति वाक्ये । राज्ञः पुरुषः पुरुषो राज्ञ इति । समासे न भवति । राजपुरुष इति ॥ द्वौ स्वरौ भवतो वाक्ये । राज्ञः पुरुष इति । समासे

---

(वा.१) निरनिराळ्या रूपानें निरनिराळ्या अर्थांना दाखविणारीं जीं अनेक पदें तीं सर्व मिळून त्या अनेक अर्थांना एका रूपानें ज्या शक्तीच्या जोरावर दाखवूं शकतात त्या शक्तीचें नांव एकार्थीभाव होय. त्या एकार्थीभावाला समर्थ असें म्हटलें जातें.

तीं पदें पृथक् पृथक् अर्थाला पृथक् पृथक् रूपानें कोठें दाखवितात, आणि अनेक अर्थांना एका रूपानें कोठें दाखवितात ?

राज्ञः पुरुषः वगैरे वाक्यांमध्यें पृथक् पृथक् अर्थाला पृथक् पृथक् रूपानें दाखवितात, आणि राजपुरुषः इत्यादि समासांमध्यें अनेक अर्थांना एका रूपानें दाखवितात.

हे काय हो तुम्ही भलतेंच म्हणतां की वाक्यामध्यें निराळ्या[२१] अर्थांचीं पदें आहेत म्हणून ? कारण राज्ञः पुरुष आनीयताम् असें म्हटलें असतां राजाची नोकरी करणारा मनुष्य आणिला जातो, आणि राजपुरुषः असें म्हटलें तरी तोच आणिला जातो.

वाक्यामधील पदें वृत्तीपेक्षां निराळा अर्थ दाखवितात असें आम्ही मुळींच म्हणत नाहीं.

तर मग एकार्थीभावामुळें वृत्तीपेक्षां वाक्यामध्यें फरक काय ?

सुपांचा अलुक्, तिसऱ्या पदानें व्यवधान, परस्परांचा यथेच्छ प्रयोग आणि स्वरभेद असा वृत्ति व वाक्य यांमध्यें फरक आहे; जसें– राज्ञः पुरुष या वाक्यामध्यें एकार्थीभाव नसल्यामुळें राजशब्दाच्या पुढील षष्ठीचा लुक् होत नाहीं आणि 'राजपुरुषः' या समासामध्यें तर षष्ठीचा लुक् होतो.

तसेंच वाक्यामध्यें दोन पदांच्यामध्यें तिसऱ्या पदानें व्यवधान असूं शकतें; जसें– राज्ञः ऋद्धस्य पुरुषः वगैरे. आणि राजपुरुषः वगैरे समासांमध्यें तर तिसऱ्या पदानें व्यवधान असूं शकत नाहीं.

वाक्यामध्यें पदांचा मागें पुढें यथेच्छ प्रयोग होतो; जसें– राज्ञः पुरुषः किंवा पुरुषो राज्ञः वगैरे. आणि समासामध्यें तर यथेच्छ प्रयोग होत नाहीं, तर राजपुरुषः असाच प्रयोग होतो.

आणि वाक्यामध्यें दोन स्वर[२२] होतात; जसें– राज्ञः पुरुषः वगैरे, आणि समासामध्यें

---

२१. पृथगर्थ म्हणजे 'एकमेकांपेक्षां निरनिराळ्या अर्थांचीं पदें' असा अर्थ आहे. परंतु येथें शंकाकारानें 'वृत्तीपेक्षां निराळ्या अर्थांचीं पदें' असा पृथगर्थ याचा अर्थ मनांत घेतला आहे.

२२. राज्धातूहून कनिन्प्रत्यय (उणा. १।१५४) करून राजन्शब्द सिद्ध झाला आहे. तसेंच पुधातूहून कुषन्प्रत्यय (उणा. ४।७४) करून पुरुषशब्द सिद्ध झाला आहे. हे दोन्ही प्रत्यय नकारे-

पुनरेक एव। राजपुरुष इति ॥ नैत एकार्थीभावकृता विशेषाः। किं तर्हि। वाचनिकान्येतानि। आह हि भगवान्। सुपो धातुप्रातिपदिकयोः [२.४.७१]। उपसर्जनं पूर्वम् [२.२.३०]। समासस्यान्त उदात्तो भवतीति ॥ इमे तर्ह्येकार्थीभावकृता विशेषाः।

**संख्याविशेषो व्यक्ताभिधानमुपसर्जनविशेषणं चयोग**

इति ॥ संख्याविशेषो भवति वाक्ये। राज्ञः पुरुषः राज्ञोः पुरुषः राज्ञां पुरुष इति। समासे न भवति। राजपुरुष इति ॥ अस्ति कारणं येनैतदेवं भवति। किं कारणम्। योऽसौ विशेषवाची शब्दस्तदसांनिध्यात्। अङ्ग हि भवांस्तमुच्चारयतु गंस्यते स विशेषः ॥ ननु च नैतेनैवं भवितव्यम्। न हि शब्दकृतेन नामार्थेन भवितव्यम्। अर्थकृतेन नाम शब्देन भवितव्यम्। तदेतदेवं दृश्यतामर्थरूपमेवैतदेवंजातीयकं येनात्र विशेषो न गम्यत इति। अवश्यं चैतदेवं विज्ञेयम्। यो हि मन्यते योऽसौ विशेष-

---

तर एकच स्वर होतो; जसें— राजपुरुषः. येथें एकच अन्तोदात्त स्वर (६।१।२२३) झाला आहे.

पण हे वर दाखविलेले फरक एकार्थीभावामुळें झालेले नाहींत, तर वचनामुळेंच झालेले आहेत. असें पहा की भगवान् पाणिनि आचार्य 'सुपो धातुप्रातिपदिकयोः' (२।४।७१): धातु आणि प्रातिपदिक यांच्या अवयवभूत सुपाचा लुक् होतो. 'उपसर्जनं पूर्वम्'(२।२।३०): समासामध्यें उपसर्जनसंज्ञकाचा पूर्वी प्रयोग करावा, आणि 'समासस्य' (६।१।२२३): समासाचा अन्त उदात्त होतो, असें प्रत्यक्षच सांगत आहे.

तर संख्याविशेष, स्पष्ट अर्थबोध, उपसर्जनाला विशेषणाचा संबंध, आणि चशब्दाचा प्रयोग हे एकार्थीभावामुळें वृत्तीपेक्षां वाक्यामध्यें फरक होतात.

वाक्यामध्यें विशेषसंख्येचा बोध होतो; जसें—राज्ञः पुरुषः, राज्ञोः पुरुषः, राज्ञां पुरुषः, या वाक्यांमध्यें एक, दोन व तीन राजांचा पुरुष असा एक, दोन व तीन या विशेषसंख्येचा बोध होतो, आणि राजपुरुषः या समासामध्यें तर राजसंबंधी पुरुष एवढाच बोध होतो; म्हणजे एक, दोन किंवा तीन वगैरे विशेष संख्येचा बोध होत नाहीं.

समासामध्यें विशेषसंख्येचा बोध होत नाहीं याचें कारण निराळेंच आहे.

तें कारण कोणतें बरें ?

कारण हें की जो हा विशेषसंख्येला दाखविणारा शब्द म्हणजे एकवचन, द्विवचन, वगैरे प्रत्यय तो येथें उच्चारण केला जात नाहीं. पहा बरें उच्चारण करून, खात्रीनें त्या संख्याविशेषाचा बोध होईलच.

अहो पण वास्तविक विचार केला असतां हें असें असूं नये. कारण शब्दावर अवलंबून अर्थ असत नाहीं; तर उलट अर्थावर अवलंबून शब्दांचा प्रयोग करावयाचा असतो. तेव्हां वृत्तीमध्यें असाच कांहीं[२३] अर्थ असतो की ज्यामध्यें विशेष संख्या मुळीं नसतेच.

आणि जरूर असें मानलेंच पाहिजे. कारण जो असें समजतो की विशेषवाचक शब्द जवळ नसल्यामुळें समासामध्यें संख्याविशे-

---

१ संज्ञक असल्यामुळें दोन्ही शब्दांना निरनिराळा आद्युदात्त स्वर (६।१।१९७) झाला आहे. पुरुषशब्दामध्यें मधल्या उकाराला स्वरित (८।४।६६) आणि त्याच्यापुढील अकाराला एकश्रुति (१।२।३९) झाली आहे.

२३. हें धोरण मनांत ठेवूनच पाणिनीनें समासामध्यें विभक्तिप्रत्ययाचा लुक् सांगितला आहे.

वाची शब्दस्तदसांनिध्यादत्र विशेषो न गम्यत इतीह तस्य विशेषो गम्येत । अप्सुचरः गोषुचरः वर्षासुज इति ॥ व्यक्ताभिधानं भवति वाक्ये । ब्राह्मणस्य कम्बलस्तिष्ठतीति । समासे पुनरव्यक्तम् । ब्राह्मणकम्बलस्तिष्ठतीति । संदेहो भवति संबुद्धिर्वा स्यात्षष्ठीसमासो वेति ॥ एषोऽप्यविशेषः । भवति हि किंचिद्वाक्येऽव्यक्तं तच्च समासे व्यक्तम् । वाक्ये तावदव्यक्तम् । अर्धं पशोर्देवदत्तस्येति । संदेहो भवति पशुगुणस्य वा देवदत्तस्य यदर्धमथवा योऽसौ संज्ञीभूतः पशुर्नाम तस्य यदर्धमिति । तच्च समासे व्यक्तं भवति । अर्धपशुर्देवदत्तस्येति ॥ उपसर्जनविशेषणं भवति वाक्ये । ऋद्धस्य राज्ञः पुरुष इति । समासे न भवति । राजपुरुष इति ॥ एषोऽप्यविशेषः । समासेऽप्युपसर्जनविशेषणं भवति । तद्यथा । देवदत्तस्य गुरुकुलम् देवदत्तस्य गुरुपुत्रः देवदत्तस्य दासभार्येति ॥ चयोगो भवति वाक्ये । स्वचयोगः स्वामिचयोगश्च । स्वचयोगः । राज्ञो गौश्चाश्वश्च पुरुषश्चेति । समासे न भवति । राज्ञो गवाश्वपुरुषा इति । स्वामिचयोगः । देवदत्तस्य च यज्ञदत्तस्य च विष्णुमित्रस्य च गौरिति । समासे न भवति । देवदत्तयज्ञदत्तविष्णु-

---

षाची प्रतीति होत नाहीं, त्याच्या मतीं अप्सुचरः[२४], गोषुचरः, वर्षासुजः, येथें विशेषसंख्येची प्रतीति होऊं लागेल.

तसेंच वाक्यामध्यें स्पष्टपणें अर्थाचा बोध होतो; जसें— ब्राह्मणस्य कम्बलस्तिष्ठति, या वाक्यापासून ब्राह्मणाच्या मालकीचा कांबळा असा अर्थ निःसंदेह मनांत येतो, आणि समासामध्यें तर तसा स्पष्ट अर्थबोध होत नाहीं; जसें— ब्राह्मणकम्बलस्तिष्ठति. येथें ब्राह्मण हें संबोधन आहे किंवा षष्ठीतत्पुरुषाचें पूर्वपद आहे असा संशय उत्पन्न होतो.

हाही विशेष नाहीं. कारण वाक्यामध्येंही एखादा अर्थ संशयित असतो, आणि तो समासामध्यें स्पष्ट होतो. वाक्यामधील संशयित अर्थाचें उदाहरणः— अर्धं पशोर्देवदत्तस्य. येथें पशुतुल्य अशा देवदत्ताचा अर्धा भाग किंवा प्रसिद्ध पशूचा अर्धा भाग असा संशय येतो, आणि तो अर्थ अर्धपशुर्देवदत्तस्य या समासामध्यें स्पष्ट आहे.

वाक्यामध्यें विशेषणाला विशेषण लावतां येतें; जसें— ऋद्धस्य राज्ञः पुरुषः वगैरे; आणि समासामध्यें तर विशेषणाला विशेषण लावतां येत नाहीं; जसें— राजपुरुषः.

हाही विशेष नाहीं. कारण समासामध्यें देखील विशेषणाला विशेषण लागू पडतें; जसें— देवदत्तस्य गुरुकुलम्, देवदत्तस्य गुरुपुत्रः, देवदत्तस्य दासभार्या वगैरे.

तसेंच भिन्न भिन्न असलेल्या पदार्थांचा किंवा त्या पदार्थांच्या मालकांचा समुच्चय दाखविणाऱ्या चशब्दाचा प्रयोग वाक्यामध्यें होतो; जसें— राज्ञो गौश्चाश्वश्च पुरुषश्च. येथें राजाच्या मालकीचे बैल, घोडा व पुरुष यांचा समुच्चय दाखविणाऱ्या चशब्दाचा त्या त्या शब्दापुढें प्रयोग केला आहे. समासामध्यें हा चशब्दाचा प्रयोग होत नाहीं; जसें— राज्ञो गवाश्वपुरुषाः. तसेंच देवदत्तस्य च, यज्ञदत्तस्य च विष्णुमित्रस्य च गौः. येथें बैलाचे मालक जे देवदत्तादिक त्यांचा समुच्चय दाखविणाऱ्या चशब्दाचा त्या त्या शब्दापुढें प्रयोग केला आहे. समासामध्यें हा चशब्दाचा प्रयोग होत नाहीं; जसें—

---

२४. मासा, कासव, इत्यादिकांना अप्सुचर म्हणतात. कोंबड्याला गोषुचर म्हणतात. पावसाळ्यामध्यें उत्पन्न होणाऱ्या इन्द्रगोप नांवाच्या किड्याला वर्षासुज म्हणतात. तेव्हां संख्याविशेषाचा बोध होणें न होणें हें एकार्थीभावावरच होणारें आहे.

मित्राणां गौरिति ॥

अथैतस्मिन्नेकार्थीभावकृते विशेषे किं स्वाभाविकं शब्दैरर्थाभिधानमाहोस्विद्वाचनिकम्। स्वाभाविकमित्याह। कुत एतत्। अर्थानादेशात्। न ह्यर्था आदिश्यन्ते। कथं पुनरर्थानादिशन्नेवं ब्रूयान्नार्था आदिश्यन्त इति। यदाह भगवान्। अनेकमन्यपदार्थे [२.२.२४] चार्थे द्वन्द्वः [२९] अपत्ये रक्ते निर्वृत्त इति। नैतान्यर्थादेशनानि। स्वभावत एतेषां शब्दानामेतेष्वर्थेष्वभिनिविष्टानां निमित्तत्वेनान्वाख्यानं क्रियते। तद्यथा। कूपे हस्तदक्षिणः पन्थाः। अभ्रे चन्द्रमसं पश्येति। स्वभावतस्तत्रस्थस्य पथश्चन्द्रमसश्च निमित्तत्वेनान्वाख्यानं क्रियते। एवमिहापि चार्थे यः स द्वन्द्वसमासोऽन्यपदार्थे यः स बहुव्रीहिरिति ॥ किं पुनः कारणमर्था नादिश्यन्ते। तच्च लघ्वर्थम्। लघ्वर्थं ह्यर्था नादिश्यन्ते। अवश्यं ह्यनेनार्थानादिशता केनचिच्छब्देन निर्देशः कर्तव्यः स्यात्। तस्य च तावत्केन कृतो येनासौ क्रियते। अथ तस्य केनचित्कृतस्तस्य केन

---

देवदत्तयज्ञदत्तविष्णुमित्राणां गौः, वगैरे.

आतां एकार्थीभावामुळें प्रतीत होणाऱ्या विशेष अर्थांचें जें त्या त्या शब्दांनीं प्रतिपादन केलें जातें तें काय स्वाभाविक आहे किंवा वाचनिक आहे ?

स्वाभाविक आहे असें म्हणतों.

हें कशावरून ?

अर्थाचें विधान केल्याचें दृष्टीस पडत नाहीं म्हणून.

पण अर्थनिर्देश प्रत्यक्ष असतांना अर्थाचें विधान केलें जात नाहीं असें कसें म्हणतां येईल ? कारण 'अनेकमन्यपदार्थे', 'चार्थे द्वंद्वः' अपत्ये, रक्ते, निर्वृत्ते, असें भगवान् पाणिनि आचार्य म्हणत आहेत ना ?

अन्य पदार्थे, चार्थे, वगैरे अर्थांचा उल्लेख येथें विधेय या नात्यानें केलेला नाहीं, तर स्वभावतःच चार्थ वगैरे त्या त्या अर्थाला दाखविणारे द्वंद्व, बहुव्रीहि, वगैरे समास आहेत. त्यामुळें निमित्त म्हणून त्या त्या ठिकाणीं त्या त्या अर्थांचा निर्देश केला आहे; जसें— कूपे हस्तदक्षिणः पन्थाः, अभ्रे चन्द्रमसं पश्य, कुव्याचे शेजारीं उजव्या हाताकडे रस्ता गेला आहे, किंवा ढगामध्यें चन्द्राला पहा. येथें मूळचाच तेथें रस्ता आहे आणि चन्द्र आहे; आणि फक्त तो कोठें आहे तें ओळखण्याची खूण म्हणून कुवा आणि ढग यांचा निर्देश केला आहे. याप्रमाणें येथेंही स्वभावतःच चार्थाला दाखविणारीं जीं अनेक सुबन्तें तीं द्वंद्वसंज्ञक होतात व अन्य पदार्थाला दाखविणारीं जीं अनेक प्रथमान्तें तीं बहुव्रीहिसंज्ञक होतात असें म्हटलें आहे.

अर्थाचा निर्देश असूनही तेथें आचार्यांनीं त्या त्या अर्थाचें विधान केलें नाहीं असें म्हणतां याचें काय बरें कारण ?

लाघवामुळें अर्थाचें विधान केलें नाहीं असें म्हणतों; म्हणजे अर्थाचें विधान केलें तर वाक्यभेदरूपी गौरव[२५]दोष येतो. शिवाय अनवस्थादोषही येतो तो असा. ज्याला अर्थाचें विधान कर्तव्य आहे त्यानें त्या अर्थाचा अवश्य कोणत्या तरी शब्दानेंच उल्लेख केला पाहिजे. येथें चार्थ या शब्दानें अर्थाचा निर्देश केला आहे. म्हणजे च या शब्दाचा जो अर्थ तो रामकृष्णौ इत्यादि अनेक सुबन्तांना आहे. तो चशब्दाचा अर्थ कोणता हें येथें कळलें पाहिजे. तुझ्या मतीं शब्दाला अर्थ स्वाभाविक नसतो तर वाचनिक असतो. तेव्हां चशब्दाला इतरेतरयोग आणि समाहार हे अर्थ आहेत असें अर्थाचें

---

२५. अनेक जीं सुबन्तें तीं चशब्दाच्या अर्थीं मानावीत आणि द्वंद्व ही संज्ञा करावी. अशा रीतीनें दोन वाक्यार्थ करून दोन विधानें मानावीं लागतील.

कृत इत्यनवस्था ॥ असंभवः खल्वप्यर्थादेशनस्य । को हि नाम समर्थो धातुप्रातिपदिकप्रत्ययनिपातानामर्थानादेष्टुम् । न चैतन्मन्तव्यं प्रत्ययार्थे निर्दिष्टे प्रकृत्यर्थो निर्दिष्ट इति । भवति हि गुणाभिधाने गुणिनः संप्रत्ययः । तद्यथा । शुक्लः कृष्ण इति । विषम उपन्यासः । सामान्यशब्दा एत एवं स्युः । सामान्यशब्दाश्च नान्तरेण विशेषं प्रकरणं वा विशेषेष्ववतिष्ठन्ते । यतस्तु खलु नियोगतो वृक्ष इत्युक्ते स्वभावतः कस्मिंश्चिदेव विशेषे वृक्षशब्दो वर्तते-ऽतो मन्यामहे नेमे सामान्यशब्दा इति । न चेत्सामान्यशब्दाः प्रकृतिः प्रकृत्यर्थे वर्तते प्रत्ययः प्रत्ययार्थे वर्तते ॥ अप्रवृत्तिः खल्वप्यर्थादेशनस्य । बहवो हि शब्दा येषामर्था न विज्ञायन्ते । जर्भरी

---

विधान कोठें तरी केलें असलें पाहिजे. तें जेथें केलें असेल तेथें तें कोणत्या तरी शब्दानेंच केलें असलें पाहिजे. तेव्हां तेथेंही असा प्रश्न उद्भवतो की ज्या शब्दानें अर्थनिर्देश केला असेल त्या शब्दाच्या अर्थाचें विधान अन्यत्र कोठें तरी केलें असेल. तात्पर्य, अशी सारखी अपेक्षा चालू राहिल्यानें तिची कोठेंच परिसमाप्ति होणार नाहीं. या अनवस्थादोषामुळें अर्थाचें विधान केलें नाहीं असें म्हणतों.

शिवाय अर्थाचें विधान करणें संभवतच नाहीं. कारण धातु, प्रातिपदिक, प्रत्यय आणि निपात या प्रत्येकांचे अर्थ अनेक आहेत ते सर्व जाणण्याविषयीं कोण बरें समर्थ आहे? धातु, प्रातिपदिक, वगैरे प्रकृतींचा अर्थ आचार्यांनीं सांगितला नाहीं अशी का तुमची समजूत? तशी असेल तर ती चुकीची आहे. कारण प्रत्ययाच्या अर्थाचा उल्लेख केला असतां तेथें प्रकृतीच्या अर्थाचा उल्लेख केला नाहीं असें कसें होईल? असें पहा की शुक्ल, कृष्ण, इत्यादि केवळ गुणाचें अभिधान असतां तेथें गुणाचा आधार अशा घट पट वगैरे गुणीचा आक्षेपानें बोध होणारच[२६].

हा दृष्टान्त बरोबर नाहीं. अशा रीतीनें वृक्ष वगैरे शब्द हे सगळे सामान्य अर्थाला दाखविणारे म्हणजे सामान्य शब्द होतील. बरें, जे शुक्ल वगैरे सामान्यशब्द आहेत ते प्रकरणावांचून किंवा पट वगैरे विशेषार्थबोधक शब्द शेजारीं असल्यावांचून विशेष अर्थाचे दर्शक होत नाहींत. पण ज्यापेक्षां वृक्षशब्द उच्चारला असतां त्यापासून स्वभावतःच कांहीं एक विशेष अर्थ मनांत येतो तेव्हां वृक्ष हा शब्द स्वभावतःच विशेषार्थी आहे. यावरून हे सामान्य शब्द नव्हेत असें आम्ही समजत आहोंत. आतां जर हे सामान्य शब्द नव्हेत तर वृक्ष वगैरे प्रकृति ही त्या त्या विशेष अर्थाची आहे. तसाच प्रत्यय देखील एकत्व, द्वित्व, अपत्य वगैरे त्या त्या अर्थाचे मूळचेच आहेत असें सिद्ध[२७] होतें.

शिवाय अर्थाचें विधान करण्याविषयीं आचार्यांची प्रवृत्ति होणेंही शक्य नाहीं. कारण पुष्कळ शब्द असे आहेत की त्यांचा

---

२६. एकत्व, द्वित्व, हे प्रत्ययाचे अर्थ सांगितले असतां त्यांच्या आधाराचा म्हणजे वृक्ष वगैरेंचा प्रकृतीपासून बोध होणारच.

२७. अर्थाचें विधान समजणाऱ्या तुझ्या मतीं औपगवः येथें उपगुसंबंधीं अपत्य असा अर्थ प्रतीत होतो तो होणार नाहीं. कारण प्रत्ययाच्या अर्थाचा उल्लेख केला आहे तरी प्रकृतीच्या अर्थाचा निर्देश केला नाहीं; व तुझ्या मतीं विधान केल्याशिवाय प्रकृतीला अर्थच येऊं शकत नाहीं. आक्षेपानें बोध होईल तो अपत्याचा जनक असा सामान्यबोध होईल. तेव्हां प्रकृत्यर्थभूत उपगु नांवाच्या मनुष्याचा बोध होणार नाहीं, आणि तो तर होत आहे. यावरून शब्दाला आपला अर्थ दाखविण्याची जी शक्ति आहे ती स्वाभाविक आहे असेंच ठरत आहे.

तुर्फरीतू ॥ अन्तरेण खल्वपि शब्दप्रयोगं बहवोऽर्था गम्यन्तेऽक्षिनिकोचैः प्राणिविहारैश्च ॥ न खल्वपि निर्ज्ञातस्यार्थस्यान्वाख्याने किंचिदपि प्रयोजनमस्ति । यो हि ब्रूयात्पुरस्तादादित्य उदेति पश्चादस्तमेति मधुरो गुडः कटुकं शृङ्गवेरमिति किं तेन कृतं स्यात् ।

**वावचनानर्थक्यं च स्वभावसिद्धत्वात् ॥२॥**

वावचनमनर्थकम् । किं कारणम् । स्वभावसिद्धत्वात् । इह द्वौ पक्षौ वृत्तिपक्षश्चावृत्तिपक्षश्च । स्वभावतश्चैतद्भवति वाक्यं च समासश्च । तत्र स्वाभाविके वृत्तिविषये नित्ये समासे प्राप्ते वावचनेन किमन्यच्छक्यमभिसंबन्द्धुमन्यदतः संज्ञायाः । न च संज्ञाया भावाभावाविष्येते । तस्मान्नार्थो वावचनेन ॥

अथ ये वृत्तिं वर्तयन्ति किं त आहुः । परार्थाभिधानं वृत्तिरित्याहुः । अथ तेषामेवं ब्रुवतां किं जहत्स्वार्था वृत्तिर्भवत्याहो-

---

अर्थ कळत नाहीं; जसें—जर्भरी, तुर्फरीतू, वगैरे.

शिवाय शब्दप्रयोगावांचूनही डोळ्यांच्या व हातांच्या खुणांनीं पुष्कळ अर्थ कळून येतात.[२८]

शिवाय जो अर्थ व्यवहारावरून सहज समजतो त्याचें अन्वाख्यान करण्यामध्यें कांही एक फल नाहीं; जसें— जो असें म्हणेल की सूर्य पूर्वेकडे उगवतो आणि पश्चिमेकडे मावळतो, तसेंच गूळ मधुर आहे व आलें तिखट आहे त्याला हें सांगण्यांत काय बरें मिळेल ?

(वा.२) वावचन म्हणजे महाविभाषाविकार, हें व्यर्थ होत आहे.

काय कारण ?

अर्थाचें प्रतिपादन करणें ही गोष्ट शब्दस्वभावानेंच सिद्ध आहे म्हणून.[२९] लोक एखादे वेळीं वृत्ति झालेल्या शब्दानें बोलतात व एखादे वेळीं वृत्ति न झालेल्या शब्दानें बोलतात; असे दोन पक्ष आहेत. तेव्हां वाक्य आणि समास अशा दोन तऱ्हा प्रयोगामध्यें सहजच होतील. त्यांत वृत्तिपक्ष घेतला असतां तेथें समास नित्यप्राप्त होतो. त्या समाससंज्ञेशींच वाग्रहणाचा संबंध होईल. कारण समासावांचून दुसरें कोणीही तेथें वाग्रहणाचा संबंध करण्याला योग्य नाहीं, आणि त्या समाससंज्ञेचा तर विकल्प होणें मुळींच इष्ट नाहीं. एकंदरींत वावचन करण्यांत अर्थ नाहीं.

आतां वृत्ति ही शास्त्रानें निष्पन्न[३०] होते असें ज्यांचें मत आहे ते काय म्हणतात ?

दुसऱ्या शब्दाच्या अर्थाचें दुसऱ्या शब्दानें जेथें प्रतिपादन केलें जातें ती वृत्ति होय,[३१] असें म्हणतात.

आता अशा तऱ्हेनें वृत्तीचें लक्षण सांगणाऱ्यांच्या मतीं ही काय जहत्स्वार्था वृत्ति होते किंवा अजहत्स्वार्था वृत्ति होते ?

यांत काय फरक ?

जर जहत्स्वार्था वृत्ति गृहीत धरली तर

---

२८. डोळ्याच्या किंवा हाताच्या खुणांवरून जसे अर्थ कळले जातात तेथें अमक्या खुणेचा अमुक अर्थ समजावा असें अर्थाचें विधान नसूनही सर्व व्यवहार होतात तसे येथेंही होतील.

२९. राजपुरुष हा शब्द मूळचाच आहे आणि राजन् व पुरुष असे निरनिराळे दोन्ही शब्द मूळचेच आहेत. तेव्हां लोकांना आपल्या इच्छेप्रमाणें वाटेल तो शब्द घेऊन प्रयोग करतां येईल.

३० राजपुरुष हा शब्द मूळचा नाहीं. राजन् आणि पुरुष या निरनिराळ्या दोन शब्दांचा षष्ठी (२।२।८) या सूत्रानें समास होऊन तयार होतो. तेव्हां तो समास विकल्पानें होण्याकरितां विभाषा अधिकार पाहिजे. नाहीं तर राज्ञः पुरुषः असा वाक्याचा प्रयोग होणार नाहीं.

३१. जसें राजपुरुषः येथें राजपदाचा पुरुषपदाशीं विशेष प्रकारचा संबंध झाल्यामुळें त्या राजपदापासून पुरुषाची उपस्थिति होणें.

स्विदजहत्स्वार्था । किं चातः । यदि जहत्स्वार्था वृत्ती राजपुरुषमानयेत्युक्ते पुरुषमात्रस्यानयनं प्राप्नोत्यौपगवमानयेत्युक्तेऽपत्यमात्रस्य । अथाजहत्स्वार्था वृत्तिरुभयोर्विद्यमानस्वार्थयोर्द्वयोर्द्विवचनमिति द्विवचनं प्राप्नोति ॥ का पुनर्वृत्तिर्न्याय्या । जहत्स्वार्था । युक्तं पुनर्यज्जहत्स्वार्था नाम वृत्तिः स्यात् । बाढं युक्तम् । एवं हि दृश्यते लोके । पुरुषोऽयं परकर्मणि प्रवर्तमानः स्वं कर्म जहाति । तद्यथा । तक्षा राजकर्मणि प्रवर्तमानः स्वं कर्म जहाति । एवं युक्तं यद्राजा पुरुषार्थे वर्तमानः स्वमर्थं जह्यादुपगुश्चापत्यार्थे वर्तमानः स्वमर्थं जह्यात् । ननु चोक्तं राजपुरुषमानयेत्युक्ते पुरुषमात्रस्यानयनं प्राप्नोत्यौपगवमानयेत्युक्तेऽपत्यमात्रस्येति । नैष दोषः । जहदप्यसौ स्वार्थं नात्यन्ताय जहाति । यः परार्थविरोधी स्वार्थस्तं जहाति । तद्यथा । तक्षा राजकर्मणि प्रवर्तमानः स्वं तक्षकर्म जहाति न हिक्कितहसितकण्डूयितानि । न चायमर्थः परार्थविरोधी विशेषणं नाम तस्मान्न हास्यति ॥ अथवान्वयाद्विशेषणं

---

'राजपुरुषाला आण' असें सांगितलें असतां तेथें वाटेल तो पुरुष आणला जाईल[३२]. तसेंच औपगवाला आण' असें म्हटलें असतां तेथें वाटेल तें अपत्य आणिलें जाईल.

आतां अजहत्स्वार्था वृत्ति गृहीत धरली तर राजा आणि पुरुष हे दोन्ही शब्द आपआपल्या अर्थाचा त्याग करीत नसल्यामुळें 'दोन अर्थांविषयीं द्विवचन घालावें' या नियमाला अनुसरून 'राजपुरुष' या समासाच्या पुढें द्विवचन करण्याची पाळी येत आहे.

यांपेकीं कोणती बरें वृत्ति न्याय्य आहे ?

जहत्स्वार्थावृत्ति न्याय्य होय.

पण वृत्ति ही जहत्स्वार्था असणें युक्त आहे काय ?

अलबत, युक्त आहेच. असें पहा की पुरुष हा दुसऱ्याचें काम करण्याविषयीं तत्पर झाला की त्याला आपलें कर्तव्य सोडणें भाग पडतेंच; जसें— सुतार हा सरकारी नोकरींत शिरला की तो आपली सुतारकी सोडतो; तसें राजा हा शब्द पुरुष हा अर्थ दाखविण्याविषयीं प्रवृत्त झाला असतां तो आपला अर्थ सोडीलच. तसेंच उपगु हा शब्दही अपत्य हा अर्थ दाखविण्याविषयीं प्रवृत्त झाला असतां आपला अर्थ सोडीलच.

पण जहत्स्वार्था वृत्ति गृहीत धरली तर 'राजपुरुषाला आण' असें म्हटलें असतां वाटेल त्या पुरुषाला आणतां येईल. तसेंच औपगवाला आण असें म्हटलें असतां वाटेल त्या अपत्याला आणतां येईल असें म्हटलें आहे ना ?

हा दोष येत नाहीं. कारण हा आपल्या अर्थाला सोडतो आहे खरा, तरी पण सर्व बाजूंनीं सोडीत नाहीं, तर ज्या दुसऱ्या अर्थाला दाखवितो त्या दुसऱ्या अर्थाशीं विरोधी असा स्वार्थ तेवढा फक्त सोडतो; जसें— सुतार हा राजकार्य करण्याविषयीं प्रवृत्त झाला असला तरी तो उचकी देणें, हसणें, खाजविणें, वगैरे क्रियांचा परित्याग करीत नाहीं. तसें राजन् या शब्दापासून राजा हा अर्थ विशेषण म्हणून जो मनांत येतो तो परार्थाशीं (विशेष्यभूत पुरुषार्थाशीं) विरोधी नाहीं[३३] म्हणून त्या अर्थाला तो शब्द सोडणार नाहीं.

---

३२. कारण जहत्स्वार्था वृत्तीमध्यें राजन् हा शब्द आपल्या 'राजा' या अर्थाचा त्याग करीत आहे.

३३. कारण वाक्यापासून वृत्ति बनते. आणि ती बनतांनाच राजन् हा शब्द पुरुष या अर्थाचें प्रतिपादन करणार आणि त्याच्याशीं विरोधी असा आपला अर्थ सोडणार. त्या वेळीं म्हणजे वाक्यामध्यें राजा हा पुरुषाचें विशेषणच आहे. तेव्हां राजा हा अर्थ जरी पुरुष या अर्थाशीं विरुद्ध आहे तरी तो विशेषण या

भविष्यति। तद्यथा। घृतघटस्तैलघट इति निषिक्ते घृते तैले वान्वयाद्विशेषणं भवत्ययं घृतघटोऽयं तैलघट इति। विषम उपन्यासः। भवति हि तत्र या च यावती चार्थमात्रा। अङ्ग हि भवानग्नौ निष्टप्य घृतघटं तृणकूर्चेन प्रक्षालयतु न गंस्यते स विशेषः। यथा तर्हि मल्लिकापुटश्चम्पकपुट इति निष्कीर्णास्वपि सुमनःस्वन्वयाद्विशेषणं भवत्ययं मल्लिकापुटोऽयं चम्पकपुट इति॥ अथवा समर्थाधिकारोऽयं वृत्तौ क्रियते। सामर्थ्यं नाम भेदः संसर्गो वा॥ अपर आह। भेदसंसर्गौ वा सामर्थ्यमिति॥ कः पुनर्भेदः संसर्गो वा। इह राज्ञ इत्युक्ते सर्वं स्वं प्रसक्तं पुरुष इत्युक्ते सर्वः स्वामी प्रसक्तः। इहेदानीं राजपुरुष इत्युक्ते राजा पुरुषं निवर्तयत्यन्येभ्यः स्वामिभ्यः पुरुषोऽपि राजानमन्येभ्यः स्वेभ्यः। एवमेतस्मिन्नुभयतो व्यवच्छिन्ने यदि जहाति कामं जहातु न जातुचित्पुरुषमात्रस्यानयनं भविष्यति॥ अथवा

अथवा राजाचा संबंध असल्यामुळें पुरुषाचे ठिकाणीं राजसंबंधरूपी विशेष असू शकेल;[३४] जसें– घागरीमध्यें तूपतेल घालून मागून तें काढून घेतलें तरी त्या तूपतेलाच्या संबंधामुळें ही तुपाची घागर, ही तेलाची घागर, असा विशेषव्यवहार[३५] होतो.

हा दृष्टान्त बरोबर नाहीं. कारण दृष्टान्तांतील त्या घागरीमध्यें जो व जेवढा तुपाचा किंवा तेलाचा अंश आहे तो अंश अग्नीवर ती घागर तापवून गवत वगैरेंनीं घासून काढ म्हणजे ही तुपाची घागर असा विशेष तुझ्या नजरेस येणार नाहीं.

तर मग याविषयीं मल्लिकापुट, चंपकपुट, हा दृष्टान्त घ्यावा. म्हणजे पुड्यांतील सर्व फुलें काढून टाकलीं तरी केवळ गंधाच्या संबंधामुळें हा मोगऱ्याच्या फुलांचा पुडा, हा चाफ्याच्या फुलांचा पुडा असा विशेष प्रकारचा व्यवहार होतो, त्याप्रमाणें येथें समजावें.

अथवा वृत्तीविषयीं हा समर्थाधिकार केला जात आहे. सामर्थ्य म्ह. भेद किंवा संसर्ग होय. दुसरा कोणी असें म्हणतो की– भेद आणि संसर्ग हे दोन्ही मिळून सामर्थ्य होय.

भेद म्हणजे काय व संसर्ग म्हणजे काय?

येथें राज्ञः म्ह. 'राजाचा' एवढेंच म्हटलें असतां राजाचा संबंध असलेले वाडा, नोकर, वगैरे अनेक संबंधी पदार्थ मनांत येतात. तसेंच पुरुषः म्हणजे 'चाकर' एवढेंच म्हटलें असतां चाकर हा परतंत्र असल्यामुळें राजा वगैरे अनेक मालक मनांत येतात. आतां 'राजपुरुषमानय' असें म्हटलें असतां राजा हा शब्द अन्य मालकांपासून पुरुषाची निवृत्ति करतो.[३६] पुरुषशब्दही मालकीच्या दुसऱ्या वस्तूपासून राजाची निवृत्ति करतो.[३७] अशा रीतीनें त्या दोन शब्दांपासून एकमेकांच्या सांनिध्याच्या जोरावर इतरांची व्यावृत्ति झाल्यानंतर[३८] वृत्ति बनविते वेळीं राजा हा आपला

नात्यानें विरुद्ध नाहीं.

३४. वृत्ति बनतेवेळीं राजन्‌शब्द जें पुरुष या अर्थाचें प्रतिपादन करतो म्हणजे राजन्‌शब्दापासून जो पुरुष हा अर्थ प्रतीत होतो तो पुरुषशब्दापासून प्रतीत होणाऱ्या पुरुषापेक्षां कांहीं विशेषरूपानें म्हणजे राजाशीं संबद्ध अशा रूपानें प्रतीत होतो; तेव्हां जहत्स्वार्था वृत्ति असली तरी वाटेल तो पुरुष आणला जाणार नाहीं.

३५. त्यामुळें तुपाची घागर आण असें सांगितलें असतां इतर घागरी न आणतां तीच आणिली जाते.

३६. श्रोत्याच्या मनामध्यें अन्य मालकाच्या पुरुषांची उपस्थिति करून देत नाहीं.

३७. राजाच्या मालकीच्या वाडा, घोडा वगैरे इतर पदार्थांची उपस्थिति श्रोत्याच्या मनामध्यें करून देत नाहीं.

३८. ह्या व्यावृत्तीलाच भेद म्हणतात. संसर्ग म्ह. राजाचा पुरुषाशीं असलेला संबंध. तेव्हां भेद किंवा संसर्ग यांपैकीं कोणतेंही सामर्थ्य वृत्तीमध्यें मानलें तरी राजपुरुष या सामासिक शब्दापासून वाटेल त्या पुरुषाचा बोध होणार नाहीं.

पुनरस्त्वजहत्स्वार्था वृत्तिः। युक्तं पुनर्यद् जहत्स्वार्था नाम वृत्तिः स्यात्। बाढं युक्तम्। एवं हि दृश्यते लोके। भिक्षुकोऽयं द्वितीयां भिक्षामासाद्य पूर्वां न जहाति संचयाय प्रवर्तते। ननु चोक्तमुभयोर्विद्यमानस्वार्थयोर्द्वयोर्द्विवचनमिति द्विवचनं प्राप्नोतीति। कस्याः पुनर्द्विवचनं प्राप्नोति। प्रथमायाः। न प्रथमासमर्थो राजा। षष्ठ्यास्तर्हि प्राप्नोति। न षष्ठीसमर्थः पुरुषः। प्रथमाया एव तर्हि प्राप्नोति। ननु चोक्तं न प्रथमासमर्थो राजेति। अभिहितः सोऽर्थोऽन्तर्भूतः प्रातिपदिकार्थः संपन्नस्तत्र प्रातिपदिकार्थे प्रथमेति प्रथमाया एव द्विवचनं प्राप्नोति।

संघातस्यैकार्थ्यात्सुबभावो वर्णात्

सुबुत्पत्तिः॥ ३॥

अर्थ सोडील तर खुशाल सोडो. राजपुरुषमानय असें म्हटलें असतां तेथें जहत्स्वार्थावृत्तिपक्षीं वाटेल त्या पुरुषाचें आणणें प्रसक्त होतें असा जो दोष दिला होता तो बिलकूल येत नाहीं.

अथवा अजहत्स्वार्थावृत्ति हा पक्षही असो.

पण वृत्ति ही अजहत्स्वार्था असणें योग्य आहे काय?

अलबत योग्य आहेच. असें पहा की भिक्षेकरी हा दुसऱ्यांदा भिक्षा मिळाली असतां पहिली भिक्षा टाकून देत नाहीं, तर तिचा संग्रहच करीत असतो.[39]

पण अजहत्स्वार्थावृत्ति गृहीत धरली तर राजपुरुष या दोन्ही पदांचा अर्थ कायम असल्यामुळें 'दोन अर्थांविषयीं द्विवचन घालावें' या नियमाला अनुसरून 'राजपुरुष' या समासाच्या पुढें द्विवचन घालण्याची पाळी येते असा दोष पूर्वी दिला आहे ना?

समासाच्या पुढें कोणत्या बरें विभक्तीचें द्विवचन प्रसक्त होत आहे?

प्रथमाविभक्तीचें.

राजा हा प्रथमा विभक्ति करण्याला लायक नाहीं.

तर षष्ठीचें द्विवचन प्राप्त होत आहे?

षष्ठीविभक्ति करण्याविषयीं पुरुष हा लायक नाहीं.

तर प्रथमाविभक्तीचेंच द्विवचन प्राप्त होत आहे.

पण प्रथमा विभक्ति करण्यास राजा हा लायक नाहीं असें आतांच सांगितलें आहे ना?

स्वस्वामिभावरूप संबंध हा अर्थ राजशब्दानें[42] उक्त झाला असल्यामुळें तो प्रातिपदिकार्थामध्यें अन्तर्भूत झाला आहे. म्हणून तो प्रातिपदिकाचाच अर्थ होऊन बसला आहे. म्हणून 'प्रातिपदिकार्थीं प्रथमा होते' (२।३।४६) असें सांगितलें असल्यामुळें प्रथमाविभक्तीचेंच द्विवचन प्राप्त होत आहे.

(वा. ३) ज्या संघाताहून विभक्ति करावयाची तो संघात 'राजसंबंधवान् पुरुष' अशा विशेषणविशिष्ट एकाच अर्थाला दाखवीत असल्या-[43]

---

३९. तेव्हां राजपुरुष या वृत्तीमध्यें राजन्शब्दाला पुरुष या दुसऱ्या अर्थाचें प्रतिपादन करण्याचा प्रसंग आला तरी पूर्वीचा अर्थ त्यानें न सोडणें हें बरोबरच आहे.

४०. कारण तेथें प्रातिपदिकार्थापेक्षां अधिक अर्थाचें म्हणजे संबंधाचें भान होत आहे. आणि प्रथमा ही फक्त प्रातिपदिकार्थ विवक्षित असेल तेथेंच सांगितली (२।३।४६) आहे.

४१. कारण पुरुषाचा कोणाशींहि दुसऱ्याशीं विशेषण या नात्यानें येथें संबंध दाखवावयाचा नाहीं. तसा संबंध दाखवावयाचा असेल तरच षष्ठी होत असते. (२।४।५०).

४२. जेव्हां वृत्तीच्या जोरावर राजन् शब्द पुरुष या अर्थाचें प्रतिपादन करतो तेव्हां तो 'राजसंबंधविशिष्ट' अशा रूपानें प्रतिपादन करतो.

४३. वृत्तीच्या जोरावर राजन् शब्द पुरुष या अर्थाचें प्रतिपादन करतो असें समजूं नये, तर वृत्तीच्या जोरावर राजपुरुष हा सबंद शब्द 'राजसंबंधविशिष्ट पुरुष' या अर्थाचें प्रतिपादन करतो. यालाच एकार्थीभावरूपी सामर्थ्य म्हणतात.

संघातस्यैकत्वमर्थस्तेनावयवसंख्यातः सुबुत्पत्तिर्न भविष्यति ॥

परस्परव्यपेक्षां सामर्थ्यमेके ॥ ४ ॥

परस्परव्यपेक्षां सामर्थ्यमेक इच्छन्ति ॥ का पुनः शब्दयोर्व्यपेक्षा। न ब्रूमः शब्दयोरिति। किं तर्हि। अर्थयोः। इह राज्ञः पुरुष इत्युक्ते राजा पुरुषमपेक्षते ममायमिति पुरुषोऽपि राजानमपेक्षतेऽहमस्येति। तयोरभिसंबन्धस्य षष्ठी वाचिका भवति। तथा कष्टं श्रित इति क्रियाकारकयोरभिसंबन्धस्य द्वितीया वाचिका भवति ॥

अथ यद्येवैकार्थीभावः सामर्थ्यमथापि व्यपेक्षा सामर्थ्यं किं गतमेतादियता सूत्रेणाहोस्विदन्यतरस्मिन्पक्षे भूयः सूत्रं कर्तव्यम्। गतमित्याह। कथम्। समोऽयमर्थशब्देन सह समासः। सं चोपसर्गः। उपसर्गाश्च पुनरेवमात्मका यत्र कश्चित्क्रियावाची शब्दः प्रयुज्यते तत्र क्रियाविशेषमाहुः। न चेह कश्चित्क्रियावाची शब्दः प्रयुज्यते येन समः सामर्थ्यं स्यात्। तत्र प्रयोगादेतद्गन्तव्यं नूनमत्र

मुळें राजपुरुष वगैरे अवयवांवरील द्वित्वसंख्येला धरून द्विवचनाची उत्पत्ति होणार नाहीं.

(वा.४) कोणी असें म्हणतात की– एकमेकाला एकमेकाची अपेक्षा असणें हेंच सामर्थ्य होय.

पण शब्दांना अपेक्षा कशी बरें असूं शकेल ?

शब्दांना परस्परांची अपेक्षा असें आम्ही म्हणत नाहीं.

तर काय म्हणत आहां ?

अर्थांना परस्परांची अपेक्षा असते असें आम्ही म्हणतों; जसें– राज्ञः पुरुषः असें म्हटलें असतां राज्ञः यापासून जो राजा हा अर्थ मनांत येतो तो पुरुषाची अपेक्षा असलेला म्हणजे 'माझा हा पुरुष आहे' अशा भावनेचा मनांत येतो. तसाच पुरुष हा देखील राजाची अपेक्षा असलेला म्हणजे 'मी ह्या राजाचा आहें' अशा भावनेचा मनांत येतो. अशा रीतीनें एकमेकाच्या अपेक्षेनें होणारा जो एकमेकाचा संबंध त्याला दाखविणारी[४४] षष्ठीविभक्ति होते; जसें– कष्टं श्रितः येथें क्रिया आणि कारक यांच्या संबंधाला दाखविणारी द्वितीया विभक्ति झाली आहे.

आतां एकार्थीभाव नांवाचें सामर्थ्य असो अथवा व्यपेक्षा नांवाचें सामर्थ्य असो, पण आहे तेवढ्याच सूत्रावरून दोन्ही प्रकारचें सामर्थ्य अवगत होत आहे किंवा एखाद्या पक्षीं शब्द वाढवून सूत्र मोठें करावें लागत आहे ?

मूळ आहे तेवढ्या सूत्रावरूनच दोन्ही तऱ्हेचीं सामर्थ्यें कळून येत आहेत असें म्हणतों.

तें कसें ?

सम्‌शब्दाचा अर्थशब्दाबरोबर समास करून समर्थ हा शब्द बनविला आहे. तेथें सम् हा उपसर्ग आहे. आणि उपसर्गांचा तर स्वभाव असा आहे की ज्या ठिकाणीं एखादा क्रियावाचक शब्द योजला असतो तेथें ते त्या क्रियेवरील विशेष दाखवितात. आणि येथें तर कोणत्याही क्रियावाचक शब्दाचा प्रयोग नाहीं की ज्यामुळें सम्‌शब्दाचा त्या क्रियेशीं संबंध दाखविता येईल. असें असतां ज्या पेक्षां येथें सम्‌शब्दाचा प्रयोग केला आहे

४४. समासामध्यें परस्परांच्या सांनिध्यामुळें उत्पन्न होणाऱ्या आकांक्षेच्या जोरावरच त्यासंबंधाचें भान होतें. वाक्यामध्यें संबंधाला दाखविणारी विभक्ति असते, तात्पर्य, वृत्तीमधील दोन शब्दांपासून दोन अर्थांची जी प्रतीति होते ती निरपेक्ष होत असल्यामुळें द्विवचनाची आपत्ति व्यपेक्षापक्षींहि येत नाहीं असें सिद्ध होतें.

कश्चित्प्रयोगार्हः शब्दो न प्रयुज्यते येन समः सामर्थ्यमिति । तद्यथा । धूमं दृष्ट्वाग्निरत्रेति गम्यते त्रिविष्टब्धकं च दृष्ट्वा परिव्राजक इति । कः पुनरसौ प्रयोगार्हः शब्दः । उच्यते । संगतार्थं समर्थं संसृष्टार्थं समर्थं संप्रेक्षितार्थं समर्थं संबद्धार्थं समर्थमिति ॥ तद्यदा तावदेकार्थीभावः सामर्थ्यं तदैवं विग्रहः करिष्यते संगतार्थः समर्थः संसृष्टार्थः समर्थ इति । तद्यथा । संगतं घृतं संगतं तैलमित्युच्यत एकीभूतमिति गम्यते । संसृष्टोऽग्निरित्युच्यत एकीभूत इति गम्यते ॥ यदा व्यपेक्षा सामर्थ्यं तदैवं विग्रहः करिष्यते संप्रेक्षितार्थः समर्थः संबद्धार्थः समर्थ इति ॥ कः पुनरिह बध्नात्यर्थः । संबद्ध इत्युच्यते यो रज्ज्वायसा वा कीले व्यतिषक्तो भवति । नावश्यं बध्नातिर्व्यतिषङ्ग एव वर्तते । किं तर्हि । अहानावपि वर्तते । तद्यथा । संबद्धाविमौ दम्यावित्युच्येते यावन्योऽन्यं न जहीतः ॥ अथवा भवति

त्यावरून असें खास कळून येत आहे की सम्‌शब्दाचा संबंध होण्यास लायक असा एखादा क्रियावाचक शब्द अवश्य घालावयास पाहिजे असतांही तो येथें घातला नाहीं; जसें— धूर पाहून त्यावरून येथें अग्नि आहे असें कळतें, किंवा संन्याशाचा दंड पाहून हा परिव्राजक आहे असें कळतें.

जो अवश्य घातला पाहिजे होता असा तो शब्द कोणता ?

संगतार्थं समर्थम्ः संसृष्टार्थं समर्थम्, संप्रेक्षितार्थं समर्थम्, संबद्धार्थं समर्थम्. त्यांत जेव्हां एकार्थीभाव नांवाचें सामर्थ्य गृहीत धरलें तेव्हां संगत जो अर्थ तो समर्थ, किंवा संसृष्ट जो अर्थ तो समर्थ, असा समर्थशब्दाचा विग्रह करण्यांत येईल; जसें— संगतं[४६] घृतम्, संगतं तैलम्, असें म्हटलें असतां एका ठिकाणीं केलेलें तूप किंवा तेल असा अर्थ मनांत येतो. किंवा संसृष्टोऽग्निः असें म्हटलें असतां एका ठिकाणीं केलेला अग्नि असा अर्थ मनांत येतो.

आतां जेव्हां व्यपेक्षा नांवाचें सामर्थ्य गृहीत धरलें तेव्हां संप्रेक्षित असा जो अर्थ तो समर्थ, किंवा संबद्ध असा जो अर्थ तो समर्थ, असा समर्थशब्दाचा विग्रह दाखविण्यांत येईल.

येथें सम्‌शब्द मागें असलेल्या बन्ध्‌धातूचा काय अर्थ समजायचा ?

व्यतिषङ्ग हा अर्थ समजावयाचा. म्हणजे एक पदार्थ दुसऱ्याशीं रज्जूनें, लोखंडानें किंवा लाकडाच्या शंकूनें व्यतिषक्त होतो, म्हणजे दृढसंबद्ध होतो.

पण बन्ध् हा धातु नेहेमीं व्यतिषंग एवढाच अर्थ दाखवितो असें नाहीं.

तर दुसरा कोणता बरें अर्थ दाखवितो ?

अहानि, म्हणजे परस्पराला सोडून नसणें, हाही अर्थ दाखवितो; जसें—संबद्धाविमौ दम्यौ जेथें हे दोन अवखळ खोंड नेहेमीं जोडीनें असतात असें म्हटलें जातें तेथें ते दोघे एकमेकांला कधींही सोडून नसतात असा अर्थ

४५. सम् या उपसर्गाच्या पुढें गत, सृष्ट, प्रेक्षित किंवा बद्ध असा शब्द येथें लुप्त झालेला असला पाहिजे. तेव्हां अर्थातच त्या शब्दाच्या अर्थाचा अंतर्भाव करून 'समर्थ' हा शब्द येथें घातला आहे. गत किंवा सृष्ट शब्द घेतला तर संबंधामुळें एकवटलेला असा अर्थ होतो. ह्यावरून एकार्थीभावरूप सामर्थ्य सिद्ध होतें आणि प्रेक्षित किंवा बद्ध हा शब्द घेतला तर संबंधामुळें अडकलेला असा अर्थ होतो. ह्यावरून व्यपेक्षासामर्थ्य सिद्ध होतें.

४६. दोन भांड्यांतलें तूप एका भांड्यांत ओतलें असतां तेथें निरनिराळीं दोन तुपें दिसत नाहींत. हीच कल्पना एकार्थीभावसामर्थ्याची आहे.

४७. दोरीनें बांधून दोन पदार्थ संबद्ध केले असले तरी तेथें ते दोन पदार्थ निरनिराळे स्पष्ट दिसतात. यावरून पृथक् पृथक् अर्थाची उपस्थिति हें व्यपेक्षासामर्थ्य असें स्पष्ट होतें.

४८. तसें येथें वृत्तींतील दोन शब्द अर्थप्रकाशन करण्याच्या कामीं एकमेकांला सोडून असत नाहींत.

चैवंजातीयकेषु बध्नातिर्वर्तते । तद्यथा । अस्ति नो गर्गैः संबन्धः । अस्ति नो वत्सैः सबन्ध इति । संयोग इत्यर्थः ॥ अथैतस्मिन्व्यपेक्षायां सामर्थ्ये योऽसावेकार्थीभावकृतो विशेषः स वक्तव्यः ॥

**तत्र नानाकारकान्निघातयुष्मदस्मदादेशप्रतिषेधः ॥ ५ ॥**

तत्रैतस्मिन्व्यपेक्षायां सामर्थ्ये नानाकारकान्निघातयुष्मदस्मदादेशाः प्राप्नुवन्ति तेषां प्रतिषेधो वक्तव्यः ॥ निघातः । अयं दण्डो हरानेन । अस्ति दण्डस्य हरतेश्च व्यपेक्षेति कृत्वा निघातः प्राप्नोति ॥ युष्मदस्मदादेशाः । ओदनं पच तव भविष्यति । ओदनं पच मम भविष्यति । अस्त्योदनस्य युष्मदस्मदोश्च व्यपेक्षेति कृत्वा वाम्नावादयः प्राप्नुवन्ति तेषां प्रतिषेधो वक्तव्यः ॥ किमुच्यते नानाकारकादिति यदा तेनैवासज्य ह्रियते । नापि ब्रूमोऽन्येनासज्य ह्रियत इति । किं तर्हि । शब्दप्रमाणका वयम् । यच्छब्द

---

मनांत येतो. अथवा परस्पराला सोडून असले तरी त्यांच्या साध्या संबंधाला बन्धधातु दाखवूं शकतो; जसें— आमचा गर्गांशीं संबंध आहे, आमचा वत्सगोत्रीयांशीं संबंध[४९] आहे.

आतां वृत्तीविषयीं व्यपेक्षा नांवाचें सामर्थ्य गृहीत धरलें तर जो हा एकार्थीभावामुळें फरक दिसतो तो वचनानें दूर करावयास[५०] पाहिजे.

(वा.६) त्यांतसुद्धा अगोदर नाना कारकांहून पुढील शब्दाला अनुदात्त स्वर, व युष्मदस्मच्छब्दाचे आदेश प्राप्त होत[५१] आहेत; त्यांच्या निषेधादाखल वचन केलें पाहिजे.

निघाताचें उदाहरण—अयं दण्डो हरानेन. येथें दण्ड या पदार्थाचा हरणक्रियेशीं संबंध असल्यामुळें दंड या शब्दापुढील 'हर' या तिङन्ताला 'तिङ्ङतिङः' (८।१।२८) या सूत्रानें अनुदात्तस्वर प्राप्त होत आहे.

युष्मदस्मच्छब्दांच्या आदेशाचें उदा०— ओदनं पच तव भविष्यति, ओदनं पच मम भविष्यति. येथें ओदन या पदार्थाचा युष्मदस्मच्छब्दार्थाशीं स्वस्वामिभावसंबंध येथेंच दाखविला असल्यामुळें 'ते मयावेकवचनस्य' (८।१।२२) या सूत्रानें 'पच' या क्रियावाचक शब्दापुढील युष्मदस्मच्छब्दाला ते, मे, हे आदेश प्राप्त होतात. तेव्हां अनुदात्त स्वर आणि हे आदेश यांच्या प्रतिषेधादाखल वचन केलें पाहिजे.

नानाकारकात् असें हें काय हो म्हणतां ? येथें तर दंड हें एकच कारक दिसत आहे. दंडानेंच फांदी वांकवून त्यांतील फळ त्यानेंच घेतलें जात आहे.

एकानें वांकवून दुसऱ्यानें घेतलें जातें असें आम्ही म्हणतही नाहीं.

तर मग काय म्हणतां ?

आम्ही शब्दाला प्रमाण समजणारे आहोंत. तेव्हां शब्द जें सांगेल तें आम्हांला मान्य

---

४९. याप्रमाणें वृत्तीमध्यें दोघां अर्थांचा साधा संबंध असेल तर अर्थातच त्यांची भिन्न भिन्न रूपांनीं उपस्थिति होणार. आणि तशी उपस्थिति होत असेल तर त्यांच्याशीं विशेषणाचा संबंध होऊं लागेल, असा दोष येतो.

५०. जर वृत्तीविषयीं एकार्थीभाव नांवाचें सामर्थ्य स्वीकारलें नाहीं तर वाक्यामध्यें ज्याप्रमाणें विशेषणाला विशेषण लागू होतें तसें वृत्तीमध्येंही लागेल. तसेंच निष्कौशाम्बिः येथें निष्क्रान्त हा अर्थ, गोरथः येथें युक्त हा अर्थ, घृतघटः येथें पूर्ण हा अर्थ, असे जे जास्ती अर्थ त्या त्या ठिकाणीं वृत्तीच्या जोरावर भासतात ते भासणार नाहींत. तेव्हां हे दोष जाण्याकरितां वचनें करावीं लागणार आहेत.

५१. अनुदात्त व युष्मद् अस्मद् या शब्दांचे हे आदेश 'पदस्य', 'पदात्' (८।१।१६।१७) या अधिकारांत सांगितले असल्यामुळें पदविधि आहेत. या पदविधींविषयीं व्यपेक्षासामर्थ्यच घेतलें आहे, तरी देखील हे दोष येत आहेत.

आह तदस्माकं प्रमाणम् । शब्दश्चेह सत्तामाह । अयं दण्डः । अस्तीति गम्यते । स दण्डः कर्ता भूत्वान्येन शब्देनाभिसंबध्यमानः करणं संपद्यते । तद्यथा । कश्चित्कंचित्पृच्छति । क्व देवदत्त इति । स तस्मा आचष्टे । असौ वृक्ष इति । कतरस्मिन् । यस्तिष्ठतीति । स वृक्षोऽधिकरणं भूत्वान्येन शब्देनाभिसंबध्यमानः कर्ता संपद्यते ॥

**प्रचये समासप्रतिषेधः ॥ ६ ॥**

प्रचये समासप्रतिषेधो वक्तव्यः । राज्ञो गौश्चाश्वश्च पुरुषश्च राजगवाश्वपुरुषा इति ॥

**समर्थतराणां वा ॥ ७ ॥**

समर्थतराणां वा पदानां समासो भविष्यति । कानि पुनः समर्थतराणि । यानि द्वन्द्वभावीनि । कुत एतत् । एषां ह्याशुतरा वृत्तिः प्राप्नोति । तद्यथा । समर्थतरोऽयं माणवकोऽध्ययनायेत्युच्यत आशुतरग्रन्थ इति गम्यते ॥

---

आहे. आणि शब्द तर येथें सत्ता या अर्थाला बोलत आहे. म्हणजे 'हा दण्ड' असें म्हटलें तेथें दंडाचें अस्तित्व मनांत येतें. तेव्हां तो दंड अस्तिक्रियेचा कर्ता होऊन त्याचा हरण करणें या दुसऱ्या क्रियेशीं संबंध होतांना तो करण बनतो[52]; तें जसें कोणी एक चैत्र नांवाचा मनुष्य मैत्र नांवाच्या मनुष्याला 'देवदत्त कुठें आहे' असें विचारतो; तेव्हां तो मैत्र चैत्राला उत्तर देतो की– हा झाडावर आहे. कोणतें तें झाड ? जें हें झाड पुढें उभें दिसत आहे तें. येथें झाड हें देवदत्ताचें अधिकरण होऊन पुढें त्याचा दुसऱ्याशीं संबंध झाल्यामुळें तें 'आहे' या क्रियेचा कर्ता बनतें. तसेंच हें होय.

(वा.६) एकाचा अनेकांबरोबर संबंध विवक्षित असतां तेथें समासाचा प्रतिषेध करावा; जसें– राज्ञो गौश्चाश्वश्च पुरुषश्च रा[53]जगवाश्वपुरुषाः.

(वा.७) अथवा अशा ठिकाणीं समर्थतर पदांचा समास प्रथमतः होईल.

समर्थतर अशीं पदें कोणतीं ?

जीं पदें द्वंद्वसमास होण्यास लायक आहेत तीं.

हें कशावरून ?

द्वंद्वसमास ही वृत्ति अतिशय शीघ्र[54] उपस्थित होते म्हणून; जसें– समर्थतरोऽयं माणवकोऽध्ययनाय, म्हणजे हा मनुष्य विद्या शिकण्याच्या कामांत अतिशय समर्थ आहे,

---

५२. तेव्हां येथें दंड हा कर्तृकारक असून करणकारक बनला आहे, म्हणून त्याला 'नानाकारक' असें येथें म्हटलें आहे.

५३. येथें राजाचा गो, अश्व आणि पुरुष या तिघांशीं संबंध आहे; तेव्हां तेथें राजशब्दाचा प्रथमतः गोशब्दाबरोबर षष्ठीतत्पुरुष समास केला तर टच् प्रत्यय व ङीप्प्रत्यय होऊन 'राजगवी' असें झाल्यावर त्याचा अश्वपुरुषशब्दांबरोबर द्वंद्व समास झाला असतां राजगव्यश्वपुरुषाः असें रूप होईल, व अश्व आणि पुरुष यांचा राजाशीं संबंध आहे असेंही कळून येणार नाहीं. आतां अगोदर गोशब्दाचा अश्वपुरुषशब्दांबरोबर द्वंद्वसमास करून नंतर राजशब्दाबरोबर तत्पुरुष केला तर अश्व, पुरुष, यांचाही राजाशीं संबंध कळून येईल. आणि गोशब्द तत्पुरुषाच्या शेवटीं पडत नसल्यामुळें टच्प्रत्ययही होणार नाहीं. तेव्हां अवङादेश झाल्यानें राजगवाश्वपुरुषाः असें रूप सिद्ध होतें. तेव्हां अनेकाशीं संबंध विवक्षित असला तर त्यांतील एकट्याशीं समास न होण्याबद्दल निषेधवचन केलें पाहिजे.

५४. द्वंद्वसमास हा प्रथमाविभक्त्यन्त पदांचा होतो आणि प्रथमाविभक्ति ही फक्त प्रातिपदिकाच्या अर्थीं सांगितली असल्यामुळें ती अंतरंग आहे. तत्पुरुषवृत्तीला द्वितीया वगैरे विभक्ति लागतात, आणि त्या विभक्ति प्रातिपदिकार्थाचा दुसऱ्याशीं संबंध दाखवितात म्हणून त्या बहिरंग आहेत.

अपर आह। समर्थतराणां वा पदानां समासो भविष्यति। कानि पुनः समर्थतराणि। यानि द्वन्द्वभावीनि। कुत एतत्। एतानि समानविभक्तीन्यन्यविभक्ती राजा। भवति विशेषः स्वस्मिन्भ्रातरि पितृव्यपुत्रे च ॥

समुदायसामर्थ्याद्वा सिद्धम् ॥ ८ ॥

समुदायसामर्थ्याद्वा पुनः सिद्धमेतत्। समुदायेन राज्ञः सामर्थ्यं भवति नावयवेन ॥

अपर आह। समर्थतराणां वा समुदायसामर्थ्यात्। समर्थतराणां वा पदानां समासो भवति। कुत एतत्। समुदायसामर्थ्यादेव ॥ अस्मिन्पक्षे वेत्येतदसमर्थितं भवति। एतच्च समर्थितम्। कथम्। नैव वा पुनरत्र राज्ञोऽश्वपुरुषावपेक्षमाणस्य गवा सह समासो भवति। किं तर्हि। गो राजानमपेक्षमाणस्याश्वपुरुषाभ्यां सह समासो भवति। प्रधानमत्र तदा गौर्भवति भवति च प्रधानस्य सापे-

---

असें म्हटलें असतां याला ग्रंथ फार जलद कळतात, म्हणजे त्याला ती विद्या लवकर[५५] प्राप्त होते, असा अर्थ लोकामध्यें प्रतीत होतो.

'समर्थतराणां वा' या वार्तिकाचें तात्पर्य दुसरा कोणी एक वैयाकरण असें समजतो की राज्ञो गौश्चाश्वश्च पुरुषश्च या ठिकाणीं समर्थतर पदांचा समास प्रथमतः होईल.

समर्थतर अशीं पदें कोणतीं ?

जीं पदें द्वंद्वसमास होण्यास लायक आहेत तीं.

हें कशावरून ?

गो वगैरे तिन्ही पदांपुढील विभक्ति प्रथमा ही एकच आहे आणि राजपदापुढील विभक्ति त्यापेक्षां वेगळी षष्ठी आहे. आपला सख्खा भाऊ आणि चुलतभाऊ यांमध्यें फरक हा साहजिक असणारच.

(वा.८) किंवा गो वगैरे तिघांशीं मिळून राजाचा संबंध येथें विवक्षित आहे, निरनिराळा एकेकट्याशीं नाहीं. तेव्हां अर्थातच त्या तिघांचा द्वंद्वसमास प्रथमतः होईल.

ह्या वार्तिकांची योजना निराळ्या तऱ्हेनें कोणीं केली आहे. ती अशी की—

समर्थतर म्हणजे द्वंद्व होण्यास लायक अशा पदांचाच समास अगोदर होईल.

हें कशावरून ?

गो वगैरे तिघांशीं मिळूनच राजाचा संबंध येथें विवक्षित आहे म्हणून.

या पक्षीं वरील वचनांतील पक्षान्तरद्योतक वाशब्द[५६] बरोबर जुळत नाहीं.

वाशब्दही बरोबर जुळतो.[५७]

तो कसा ?

राज्ञो गौश्चाश्वश्च पुरुषश्च. येथें अश्व आणि पुरुष यांच्याशींही विशेषण या नात्यानें राजाचा संबंध असल्यामुळें राजशब्दाचा गोशब्दाबरोबर समास होणारच नाहीं.[५८]

तर मग राजाशीं विशेष्य या नात्यानें गोचा संबंध असल्यामुळें गोशब्दाचा अश्व, पुरुष, या शब्दांबरोबर द्वंद्वसमास कसा बरें होतो ?

गो हें राजाचें विशेष्य आहे म्हणजे प्रधान आहे. आणि प्रधान हें सापेक्ष असलें तरी

---

५५. ज्याला आपलें कार्य लवकर साध्य करून घेतां येतें त्याला समर्थतर म्हणतात असें यावरून सिद्ध होतें.

५६. समुदायसामर्थ्याद्वा हा वाशब्द.

५७. राजन्‌शब्दाचा एकट्या गोशब्दाबरोबर तत्पुरुषसमास न होण्याविषयीं एक स्वतंत्र हेतु येथें वाशब्दानें सुचविला आहे. अनुक्ताचा समुच्चय करणें असा येथें वाशब्दाचा अर्थ आहे.

५८. मागील टीप १५ पहा.

क्षस्यापि समासः ॥

**आख्यातं साव्ययकारकविशेषणं वाक्यम् ॥ ९ ॥**

आख्यातं साव्ययं सकारकं सकारकविशेषणं वाक्यसंज्ञं भवतीति वक्तव्यम् ॥ साव्ययम् । उच्चैः पठति । नीचैः पठति ॥ सकारकम् । ओदनं पचति ॥ सकारकविशेषणम् । ओदनं मृदुविशदं पचति ॥ सक्रियाविशेषणं चेति वक्तव्यम् । सुष्ठु पचति । दुष्ठु पचति ॥

अपर आह । आख्यातं सविशेषणमित्येव । सर्वाणि ह्येतानि क्रियाविशेषणानि ॥

**एकतिङ् ॥ १० ॥**

एकतिङ्वाक्यसंज्ञं भवतीति वक्तव्यम् । ब्रूहि ब्रूहि ॥

**समानवाक्ये निघातयुष्मदस्मदादेशाः ॥ ११ ॥**

समानवाक्य इति प्रकृत्य निघातयुष्मदस्मदादेशा वक्तव्याः । किं प्रयोजनम् । नानावाक्ये मा भूवन्निघातादय इति । अयं दण्डो हरानेन । ओदनं पच तव भविष्यति । ओदनं पच मम भविष्यति ॥

**योगे प्रतिषेधश्चादिभिः ॥ १२ ॥**

चादिभिर्योगे प्रतिषेधो वक्तव्यः । ग्रामस्तव च स्वं मम च स्वम् ॥ किमर्थमिदमुच्यते । यथान्यासमेव चादिभिर्योगे प्रतिषेध उच्यते ॥ इदमप्यपूर्वं क्रियते वाक्यसंज्ञा समानवाक्याधिकारश्च । तद्-

---

देखील त्याचा समास होतो.

(वा.९) अव्यय, कारक आणि कारकाचें विशेषण यांसहित क्रियापदाला वाक्य म्हणावें असें वचन करावें.

अव्ययाचें उदा०— उच्चैः पठति, नीचैः पठति.

कारकाचें उदा०— ओदनं पचति.

कारकाच्या विशेषणाचें उदा०— ओदनं मृदुविशदं पचति.

क्रियाविशेषणासहित क्रियापदालाही वाक्य म्हणावें, असें वचन करावें; जसें— सुष्ठु पचति, दुष्ठु पचति.

दुसरा कोणी असें म्हणतो की 'विशेषणासहित क्रियापदाला वाक्य म्हणावें एवढेंच वाक्याचें लक्षण बस्स आहे. कारण अव्यय, कारक, वगैरे सर्व आख्यातांचीं प्रत्यक्ष व परंपरेनें विशेषणेंच होत आहेत.

(वा.१०) ज्या समुदायामध्यें क्रियापद एक आहे आणि इतर पदें त्या क्रियापदाशीं अन्वित आहेत अशा समुदायाला वाक्य म्हणावें असें वचन करावें; जसें— ब्रूहि ब्रूहि देवदत्त.[५९]

(वा.११) एका वाक्यामध्यें असा शब्द घालून निघात आणि युष्मदस्मच्छब्दांचे आदेश सांगावेत.

काय प्रयोजन ?

नाना वाक्यामध्यें निघात वगैरे न व्हावेत म्हणून; जसें— अयं दण्डो हरानेन, ओदनं पच तव भविष्यति, ओदनं पच मम भविष्यति.

(वा.१२) च, वा, ह, वगैरेंचा योग असतां युष्मद् व अस्मद् या शब्दांना वाम्, नौ, वगैरे आदेश होत नाहींत असें वचन करावें; जसें— ग्रामस्तव च स्वं मम च स्वम्.

कशाकरितां बरें हें केलें आहे ?

कारण चादिकांचा योग असतां त्या आदेशांचा प्रतिषेध सूत्रानें (८।१।२४) च सांगितला आहे.

येथेंही वाक्यसंज्ञा आणि 'समानवाक्ये

---

[५९] ब्रूहि ब्रूहि अशीं येथें जरी दोन क्रियापदें दिसतात तरी तीं एकसारखीं असल्यामुळें एकच धरतां येतात.

द्वैध्यं विजानीयात्सर्वमेतद्विकल्पत इति । तदाचार्यः सुहृद्भूत्वान्वाचष्टे चादिभियोंगे यथान्यासमेव भवतीति ।

सा चावश्यं वाक्यसंज्ञा वक्तव्या समानवाक्याधिकारश्च वक्तव्यः ।

**समर्थनिघाते हि समानाधिकरणयुक्तयुक्तेषूपसंख्यानमसमर्थत्वात् ॥१३॥**

समर्थनिघाते हि समानाधिकरणयुक्तयुक्तेषूपसंख्यानं कर्तव्यं स्यात् ॥ समानाधिकरणे । पटवे ते दास्यामि । मृदवे ते दास्यामि । समानाधिकरणे ॥ युक्तयुक्ते । नद्यास्तिष्ठति कूले । वृक्षस्य लम्बते शाखा । शालीनां त ओदनं ददामि । शालीनां म ओदनं ददाति ॥ किं पुनः कारणं न सिध्यति । असमर्थत्वात् ॥

**राजगवीक्षीरे द्विसमासप्रसङ्गो द्विषष्ठीभावात् ॥ १४ ॥**

राजगवीक्षीरे द्विसमासप्रसङ्गः । किं कारणम् । द्विषष्ठीभावात् । द्वे ह्यत्र षष्ठ्यौ । राज्ञो गोः क्षीरमिति ॥ किमुच्यते द्वि-

---

निघातयुष्मदस्मदादेशाः' हें वचन अपूर्व सांगितलें आहे. तेव्हां असें न सांगतां सूत्रकारांनीं जे मोघम आदेश वगैरे सांगितले आहेत ते तसे ग्राह्य नाहींत. तर हें सर्व कोठें करावें आणि कोठें न करावें असा व्यवस्थितविकल्प केला पाहिजे. अशी निराळी व्यवस्था निषेधाच्या संबंधानें मात्र नको आहे. सूत्रकारांनीं जो निषेध केला आहे तो जशाचा तसाच ग्राह्य आहे असें मित्रत्वाच्या नात्यानें सुचविण्याकरितां वार्तिककारांनीं त्या सूत्राचाच पुनः येथें अनुवाद केला आहे.

आतां वाक्यसंज्ञा व समानवाक्ये हा अधिकार अवश्य केला पाहिजे.

(वा.१३) निघात (अनुदात्त स्वर) आणि युष्मद् व अस्मद् या शब्दांचे आदेश (ते, मे, वगैरे) हे समर्थपरिभाषेच्या साहाय्यानें व्यपेक्षासामर्थ्य असतांनाच होतात असें म्हटलें [६१]तरी समानाधिकरणस्थलीं व युक्तयुक्तस्थलीं निघातादिक होण्याबद्दल वचन करावयास पाहिजे. समानाधिकरणाचें उदा०— पटवे ते [६१]दास्यामि, मृदवे ते दास्यामि.

युक्तयुक्ताचें उदा०— [६२]नद्यास्तिष्ठति कूले, वृक्षस्य लम्बते शाखायाम्, शालीनां ते ओदनं ददामि, शालीनां मे ओदनं ददाति.

समानाधिकरण व युक्तयुक्त या स्थलीं निघातादिक कां बरें प्राप्त होऊं शकत नाहींत ?

ज्या पदांच्या पुढील पदाला निघातादिक करावयाचे त्या दोन पदांमध्यें परस्पर व्यपेक्षालक्षणसामर्थ्य नाहीं म्हणून.

(वा.१४) राजाची गाय, त्या गायीचें दूध, असा अर्थ विवक्षित असतां राजगवीक्षीरम् येथें द्विसमासाचा प्रसंग येत आहे.

काय कारण ?

येथें राज्ञः आणि गोः अशीं षष्ठ्यन्त पदें दोन आहेत म्हणून.

येथें द्विसमासप्रसङ्गः असें कसें बरें म्हटलें आहे ? कारण प्रथयान्त सुप् आणि तृतीयान्त सुपा या शब्दांची अनुवृत्ति येथें

---

६०. गच्छति चैत्रः, पश्यति मैत्रः, येथें चैत्राचा पश्यति याच्याशीं संबंध नसल्यामुळें निघात (८।१।२८) होत नाहीं, हें परिभाषेनें साधलें तरी.

६१. पटवे हें ते याचें समानाधिकरण विशेषण आहे. तेव्हां त्या दोन्ही शब्दांचा अर्थ एकच व्यक्ति असल्यामुळें व्यपेक्षासामर्थ्य संभवत नाहीं, व्यपेक्षासामर्थ्य हें दोन पदार्थांमध्यें असतें.

६२. नद्याः याचा कूले याकडे अन्वय आहे, तिष्ठति याकडे नाहीं; तेव्हां व्यपेक्षासामर्थ्य संभवत नाहीं. समानवाक्ये असें म्हटलें म्हणजे मात्र 'पटवे ते' आणि 'नद्यास्तिष्ठति' हीं दोन्ही उदाहरणें साधतात. कूले हें नद्याः यानें युक्त आहे आणि त्या युक्तानें तिष्ठति हें युक्त आहे.

समासप्रसङ्ग इति यावता सुप्सुपेति वर्तते । द्विसमासप्रसङ्ग इति नैवं विज्ञायते द्वयोः सुबन्तयोः समासप्रसङ्गो द्विसमासप्रसङ्ग इति । कथं तर्हि । द्विप्रकारस्य समासस्य प्रसङ्गो द्विसमासप्रसङ्ग इति । राजगोक्षीरमित्यपि प्राप्नोति न चैवं भवितव्यम् । भवितव्यं च यदैतद्वाक्यं भवति गोः क्षीरं गोक्षीरम् राज्ञो गोक्षीरं राजगोक्षीरमिति । यदा त्वेतद्वाक्यं भवति राज्ञो गोः क्षीरमिति तदा न भवितव्यं तदा च प्राप्नोति । तदा कस्मान्न भवति ॥

## सिद्धं तु राजविशिष्टाया गोः क्षीरेण सामर्थ्यात् ॥ १५ ॥

सिद्धमेतत् । कथम् । राजविशिष्टाया गोः क्षीरेण सह समासो भवति न केवलायाः । किं वक्तव्यमेतत् । न हि । कथमनुच्यमानं गंस्यते । यथैवायं गवि यतते न क्षीरमात्रेण संतोषं करोत्येवं राजन्यपि यतते । राज्ञो या गौस्तस्या

---

आहे. तेव्हां एकाच सुबन्ताचा एका सुबन्ताबरोबर समास होतो असें सांगितलें असल्यामुळें दोन षष्ठ्यन्तांचा मिळून एकदम तिसऱ्या सुबन्ताबरोबर समास प्रसक्त होतच नाहीं.

द्विसमासप्रसङ्गः याचा अर्थ द्वयोः सुबन्तयोः समासप्रसङ्गः म्हणजे राज्ञः आणि गोः या दोन षष्ठ्यन्तांचा क्षीरशब्दाबरोबर समास असें आम्ही म्हणत नाहीं.

तर मग कसें म्हणतां ?

द्विप्रकारस्य समासस्य प्रसङ्गः द्विसमासप्रसङ्गः असें म्हणतों. म्हणजे दोन तऱ्हेच्या समासाचा प्रसङ्ग येत असल्यामुळें राजाच्या गायीचें दूध या एकाच अर्थी राजगवीक्षीरम्, आणि राजगोक्षीरम् असाही प्रयोग प्रसक्त होत आहे.[६३]

तर मग राजगोक्षीरम् असा समास होतच नाहीं कीं काय ?

जेव्हां गोः क्षीरं गोक्षीरं राज्ञः गोक्षीरम् असें वाक्य ठेविलें तेव्हां राजगोक्षीरम् असा समास व्हावा,[६४] आणि जेव्हां राजाच्या गायीचें दूध या अर्थाचें राज्ञः गोः क्षीरम् असें वाक्य ठेविलें तेव्हां राजगोक्षीरम् असा समास प्राप्त होत आहे. तो कां बरें होत नाहीं ?

(वा.१५) राजाच्या गायीचें दूध या अर्थी राजगोक्षीरम् असा समास न होणें हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

राजाच्या संबंधानें युक्त असलेल्या अशा गायीचा क्षीराशीं संबंध विवक्षित आहे. तेव्हां राजगवीशब्दाचा क्षीरशब्दाशीं समास होतो, नुसत्या गोशब्दाचा होत नाहीं.

पण केवळ गोशब्दाचा क्षीरशब्दाबरोबर समास करावयाचा नाहीं असें प्रतिषेधवचन करावयाचें कीं काय ?

तसें वचन करावयास नको.

मग तसें सांगितल्याशिवाय हें कसें बरें समजतें ?

ज्याला राजगवीक्षीर पाहिजे असेल तो जसा नुसतें दूध मिळालें तरी तेवढ्यानें संतुष्ट न राहतां गायीचें मिळण्याविषयीं प्रयत्न करतो, त्याप्रमाणें तो गायीचें दूध मिळाल्यानेंही संतुष्ट न राहतां राजाच्या गायीचे मिळाण्याविषयीं यत्न करणारच. या व्यवहाराला अनुसरून त्या संबंधाचा दर्शक असा जो

---

६३. राजाच्या गायीचें दूध असा येथें अर्थ आहे. तेव्हां राजाचा गोशब्दाबरोबर अगोदर समास केला तर राजगवी असा टच्प्रत्यय (५।४।९२) होऊन सामासिक शब्द होईल. नंतर त्याचा क्षीरशब्दाबरोबर समास केला म्हणजे राजगवीक्षीर असा शब्द होईल, आणि गोशब्दाचा क्षीरशब्दाबरोबर अगोदर समास करून नंतर त्याच्याशीं राजशब्दाचा समास केला म्हणजे राजगोक्षीर असा शब्द होईल.

६४. पण त्या वेळीं गाईचें दूध हें राजाचें असा त्याचा अर्थ आहे. गाय राजाची असा त्याचा अर्थ नाहीं.

यत्क्षीरमिति ॥ नैव वा पुनरत्र गो राजानमपेक्षमाणायाः क्षीरेण सह समासः प्राप्नोति । किं कारणम् । असामर्थ्यात् । कथमसामर्थ्यम् । सापेक्षमसमर्थं भवतीति । कथं तर्हि गोः क्षीरमपेक्षमाणाया राज्ञा सह समासो भवति । प्रधानमत्र तदा गौर्भवति भवति च प्रधानस्य सापेक्षस्यापि समासः ॥

अथ किमर्थं पदविधौ समर्थाधिकारः क्रियते ।

**पदविधौ समर्थवचनं वर्णाश्रये शास्त्र आनन्तर्यविज्ञानम् ॥१६॥**

पदविधौ समर्थाधिकारः क्रियते वर्णाश्रये शास्त्र आनन्तर्यमात्रे कार्यं यथा विज्ञायेतेति । तिष्ठतु दध्यशान त्वं शाकेन । तिष्ठतु कुमारी च्छत्त्रं हर देवदत्तेति ॥

**समर्थाधिकारस्य विधेयसामानाधिकरण्यान्निर्देशानर्थक्यम् ॥१७॥**

समर्थाधिकारोऽयं विधेयेन समानाधिकरणः । किं च विधेयम् । समासः । यावद्ब्रूयात्समर्थः समास इति तावत्समर्थः पदविधिरिति । न च राजपुरुष

---

राजशब्दाचा गोशब्दाशीं समास तो करून नंतर त्या राजगवीशब्दाचा क्षीरशब्दाबरोबर समास करावयाचा असें सिद्ध होतें.

अथवा राज्ञः गोः क्षीरम् असें वाक्य ठेविलें असतां तेथें राजाशीं अन्वित असलेल्या गोशब्दाचा क्षीरशब्दाबरोबर समास मुळीं करतांच येत नाहीं.

काय कारण ?

गोशब्दाचें क्षीरशब्दाशीं सामर्थ्य नाहीं म्हणून.

तें सामर्थ्य कां बरें नाहीं ?

विशेषणविशेष्यभावसंबंधानें साकांक्ष असलेला शब्द[६५] सामर्थ्यहीन असतो म्हणून.

तर मग गो हें क्षीराचें विशेषण असल्यामुळें गोशब्दाचा राजशब्दाबरोबर समास[६६] कसा बरें होतो ?

राजशब्दाचा गोशब्दाबरोबर षष्ठीसमास करावयाचा असतां तेथें गोशब्द प्रधान होत आहे, आणि प्रधानशब्द दुसऱ्याविषयीं सापेक्ष असला तरी देखील त्याचा समास होतो.

आतां हा समर्थाधिकार पदविधीविषयींच कशासाठीं बरें केला जात आहे ? पदग्रहण वगळून 'समर्थो विधिः' असेंच सूत्र करावें.

(वा.१६) वर्णावर अवलंबून प्रवृत्त होणाऱ्या शास्त्रानें सांगितलेलें कार्य सामर्थ्य नसलें तरी देखील केवळ त्या त्या वर्णांचें सांनिध्य असतां प्रवृत्त व्हावें याकरितां पदविधीविषयींच समर्थाधिकार केला जात आहे; जसें— तिष्ठतु दध्यशान[६७] त्वं शाकेन, तिष्ठतु कुमारी च्छत्रं हर देवदत्त.

(वा.१७) समर्थः असा केलेला हा अधिकार विधेयाशीं समान अर्थाचा आहे.[६८]

तें विधेय कोणतें ?

समास हें तें विधेय होय. 'समर्थः समासः' या शब्दापासून जेवढा अर्थ मनांत येतो तेवढाच अर्थ 'समर्थः पदविधिः' यापासून[६९] मनांत

---

६५. येथें गो याला राज्ञः हें विशेषण लागलें असल्यामुळें गो हा शब्द साकांक्ष आहे.

६६. जसा गोशब्दाचा राजाशीं संबंध असल्यामुळें क्षीराशीं समास होत नाहीं तसा त्याचा (गोशब्दाचा) क्षीराशीं संबंध असल्यामुळें राजाशीं समास होणार नाहीं.

६७. दधि याचा अशान याकडे अन्वय नसला तरी यण् (६।१।७७) होतो. तसेंच कुमारीचा छत्राकडे अन्वय नसला तरी तुगागम (६।१।७५) होतो.

६८. वस्तुतः येथें समर्थानाम् असा समासाच्या उद्देश्याशीं समान अर्थाचा पाहिजे आहे. समर्थ अशाच सुबन्तांचा समान होतो असा येथें अर्थ झाला पाहिजे.

६९. तात्पर्य पदविधिः या विधेयाचा समास हा अर्थ आहे म्हणून समास हा समर्थ होतो असा प्रकृत सूत्राचा अर्थ होईल, आणि त्या अर्थानें या सूत्राचा कांहींच उपयोग नाहीं.

इत्येतस्यामवस्थायां समर्थाधिकारेण किंचिदपि शक्यं प्रवर्तयितुं निवर्तयितुं वा। समर्थाधिकारस्य विधेयसामानाधिकरण्यान्निर्देशो ऽनर्थकः ॥

सिद्धं तु समर्थानामिति वचनात् ॥ १८ ॥

सिद्धमेतत्। कथम्। समर्थानां पदानां विधिर्भवतीति वक्तव्यम् ॥ एवमपि द्व्येकयोर्न प्राप्नोति ॥

एकशेषनिर्देशाद्वा ॥१९॥

अथवैकशेषनिर्देशोऽयम्। समर्थस्य च समर्थयोश्च समर्थानां च समर्थानामिति ॥ एवमपि षट्प्रभृतीनामेव प्राप्नोति षट्प्रभृतिषु ह्येकशेषः परिसमाप्यते। नैष दोषः। प्रत्येकं वाक्यपरिसमाप्तिर्दृष्टेति द्व्येकयोरपि भविष्यति ॥ एवमपि विविभक्तीनां न प्राप्नोति। समर्थात्समर्थे पदात्पद इति ॥ एवं तर्हि समर्थपदयोरयं विधिशब्देन सर्वविभक्त्यन्तः समासः। समर्थस्य विधिः समर्थविधिः। समर्थयोर्विधिः समर्थविधिः। समर्थानां विधिः समर्थविधिः। समर्थाद्विधिः समर्थविधिः। समर्थे विधिः समर्थविधिः। पदस्य विधिः पदविधिः। पदयोर्विधिः पदविधिः। पदानां विधिः पदविधिः। पदाद्विधिः पदविधिः। पदे विधिः पदविधिः। समर्थ-

---

येतो. तेव्हां राजपुरुषः हा समास झाल्यानंतर 'तो समास समर्थ आहे' या म्हणण्यानें कोणता अर्थ हवा असलेला साधणार आहे किंवा नको असलेला दूर होणार आहे? तात्पर्य, विधेय जो समास त्याच्याशीं समानाधिकरण होत असल्यामुळें समर्थः असा केलेला अधिकार निरर्थक होत आहे.

(वा.१८) असमर्थ पदांच्या समासाचा निषेध सिद्ध होत आहे.

तो कसा?

समर्थानाम् म्हणजे समर्थ असलेल्या पदांचा विधि होतो असें येथें म्हणावें.

तरीही एक किंवा दोन पदांचा जो समास वगैरे विधि तो समर्थ अशा पदांचा होतो असें यावरून प्राप्त होत नाहीं.[७०]

(वा.१९) किंवा समर्थस्य, समर्थयोः आणि समर्थानाम् अशा अनेक समर्थशब्दांचा एकशेष करून समर्थानाम् असें येथें म्हटलें आहे.

तरी पण कमींत कमी सहा पदांचा जो विधि तोच समर्थ अशा पदांचा होतो असें प्राप्त होत आहे. कारण ह्या एकशेषांतील एकत्व, द्वित्व आणि बहुत्व या तीन प्रकारच्या संख्यांची पूर्णता कमींत कमी सहामध्येंच होत आहे.

हा दोष येत नाहीं. कारण समुदायाला उद्देशून सांगितलेलें कार्य त्या समुदायांतील घटक प्रत्येक अवयवाला केल्याचें लोकांमध्यें ब्राह्मणा भोज्यन्ताम् इत्यादि स्थलीं दृष्ट असल्यामुळें एक किंवा दोन पदांचा जो विधि तोही समर्थ अशाच पदांचा होईल.

तरीही पदाच्या पुढील किंवा पदाच्या मागील विभक्त्यन्ताला सांगितलेला विधि हा समर्थ अशा पदाच्या पुढील किंवा समर्थ अशा पदाच्या मागील विभक्त्यन्ताला होतो असें प्राप्त होत नाहीं.

असें आहे तर सर्व विभक्ति ज्याच्यापुढें केली आहे अशा समर्थशब्दाचा आणि तसल्याच पदशब्दाचा विधिशब्दाबरोबर हा समास केला आहे. तो समास पुढीलप्रमाणें सोडवावयाचा आहेः— समर्थस्य विधिः, समर्थयोर्विधिः, समर्थानां विधिः, समर्थाद्विधिः, समर्थे विधिः समर्थविधिः. तसेंच पदस्य विधिः, पदयोर्विधिः, पदानां विधिः, पदाद्विधिः, पदे विधिः पदविधिः. अशा रीतीनें पांच प्रकारच्या समर्थविधिशब्दांचा एकशेष व पांच भाषा उपस्थित होणार आहे.

७०. कारण समर्थानाम् हें बहुवचन असल्यामुळें निदान तीन तरी समर्थ पदें असतील तेथेंच ही परिपूर्णता कमींत कमी सहामध्येंच होत आहे.

विधिश्च समर्थविधिश्च समर्थविधिश्च समर्थविधिश्च समर्थविधिश्च समर्थविधयः । पदविधिश्च पदविधिश्च पदविधिश्च पदविधिश्च पदविधिश्च पदविधयः । समर्थविधयश्च पदविधयश्च समर्थः पदविधिः । पूर्वः समास उत्तरपदलोपी याद्दच्छिकी विभक्तिः ॥

**समानाधिकरणेषूपसंख्यानमसमर्थत्वात् ॥ २० ॥**

समानाधिकरणेषूपसंख्यानं कर्तव्यम् । वीरः पुरुषो वीरपुरुषः । किं पुनः कारणं न सिध्यति । असमर्थत्वात् । कथमसामर्थ्यम् ।

**द्रव्यं पदार्थ इति चेत् ॥ २१ ॥**

यदि द्रव्यं पदार्थो न भवति तदा सामर्थ्यम् । अथ हि गुणः पदार्थो भवति तदा सामर्थ्यम् । अन्यो हि वीरत्वं गुणोऽन्यो हि पुरुषत्वम् ॥ नान्यत्वमस्तीतीयता सामर्थ्यं भवति । अन्यो हि देवदत्तो गोभ्यश्चाश्वेभ्यश्च न च तस्यैतावता सामर्थ्यं भवति । को वा विशेषो यद्गुणे पदार्थे सामर्थ्यं स्याद्द्रव्ये च न स्यात् । एष विशेषः । एकं तयोरधिकरणमन्यश्च वीरत्वं गुणोऽन्यः पुरुषत्वम् ॥ द्रव्य-

---

प्रकारच्या पदविधि शब्दांचा एकशेष केला असतां 'समर्थविधयः पदविधयः' असें होतें. याच अर्थाचें सूत्रकारांनीं येथें 'समर्थः पदविधिः' असें सूत्र उच्चारलें आहे. तें उच्चारतांना पूर्वीचा जो समर्थविधि हा सामासिक शब्द त्यांतील उत्तरपद जो विधिशब्द त्याचा लोप केला आहे, आणि दोन्ही शब्दांला यदृच्छेनें प्रथमेचें एकवचन लावलें आहे.

(वा.२०) भिन्न भिन्न धर्मांमुळें एकाच पदार्थाला दाखविणाऱ्या अशा पदांच्या समासादाखल वचन केलें पाहिजे; जसें– वीरः पुरुषः वीरपुरुषः.

या ठिकाणीं कां बरें समास प्राप्त होत नाहीं ?

सामर्थ्य नाहीं म्हणून.

तें सामर्थ्य कां बरें नाहीं ?

(वा.२१) पदाचा अर्थ द्रव्य आहे म्हणून.[71] म्हणजे व्यक्तिः पदार्थः हा पक्ष गृहीत धरला वीर आणि पुरुष या दोन्ही शब्दांनीं एकच व्यक्ति दाखविली आहे. तेव्हां तेथें दोन पदार्थ नसल्यामुळें कोणाचा कोणावर अन्वय हें सांगतां येत नाहीं; म्हणून तेथें सामर्थ्य असूं शकत नाहीं. आतां व्यक्तीवरील धर्म हा पदाचा अर्थ हा पक्ष गृहीत धरला तर तेथें सामर्थ्य असूं शकतें; कारण वीरत्व हा धर्म निराळा व पुरुषत्व हा धर्म निराळा.

भेद आहे एवढ्यावरून तेथें सामर्थ्य आहे असें म्हणतां येत नाहीं. कारण देवदत्त हा बैलापेक्षां व घोड्यापेक्षां निराळा आहे म्हणून तेवढ्यावरून त्या देवदत्ताचें बैलाशीं व घोड्याशीं सामर्थ्य आहे असें म्हणतां येत नाहीं.

शिवाय धर्म हा पदाचा अर्थ मानिला असतां वीरः पुरुषः येथें सामर्थ्य असूं शकतें आणि त्या धर्मांचा आश्रय वस्तु हा पदाचा अर्थ मानिला तर मात्र सामर्थ्य असूं शकत नाहीं, असा यांत फरक तरी काय आहे ?

फरक असा आहे की आश्रय हा अर्थ मानला म्हणजे तो त्या वीरत्व आणि पुरुषत्व या दोन्ही धर्मांचा आश्रय एकच आहे. पण धर्म हा अर्थ मानला तर ते दोन धर्म निराळे होतात. वीरत्व हा धर्म निराळा आणि पुरुषत्व हा धर्म निराळा.[72]

तर मग पदाचा अर्थ व्यक्ति आहे असें

---

[71] मागील टीप ६१ पहा.

[72] निरनिराळ्या दोघांपैकीं एकाचा दुसऱ्याशीं संबंध असेल तर तेथें सामर्थ्य आहे असें म्हणतां येतें. आतां येथें दोन धर्म निरनिराळे आहेतच. फक्त त्यांचा संबंध आश्रयाच्या द्वारानें आहे अशी कल्पना केली म्हणजे तेथें सामर्थ्य आहे असें म्हणतां येतें.

पदार्थिकस्यापि तर्हि गुणभेदात्सामर्थ्यं भविष्यति । अशक्यो द्रव्यपदार्थिकेन द्रव्यस्य गुणकृत उपकारः प्रतिज्ञातुम् । ननु चाभ्यन्तरोऽसौ भवति । यद्यप्यभ्यन्तरो न तु गम्यते । न हि गुड इत्युक्ते मधुरत्वं गम्यते शृङ्गवेरमिति वा कटुकत्वम् । गुणपदार्थिकेनापि तर्ह्यशक्यो गुणस्य द्रव्यकृत उपकारः प्रतिज्ञातुम् । अथ गुणपदार्थिकः प्रतिजानीते द्रव्यपदार्थिकोऽपि कस्मान्न प्रतिजानीते । एवमनयोः सामर्थ्यं स्याद्वा न वा ॥ क च तावदिदं स्यात्समानाधिकरणेनेति । यत्र सर्वं समानम् । इन्द्रः शक्रः पुरुहूतः पुरंदरः । कन्दुः कोष्ठः कुशूल इति । नैवंजातीयकानां समासेन भवितव्यं प्रत्ययेन वोत्पत्तव्यम् । किं कारणम् । अर्थगत्यर्थः शब्दप्रयोगः अर्थं संप्रत्याययिष्यामीति शब्दः प्रयुज्यते । तत्रैकेनोक्तत्वात्तस्यार्थस्य

मानणाऱ्याच्या मतानेंही आश्रय एक असला तरी देखील धर्म भिन्न भिन्न असल्यामुळें एकाच आश्रयामध्यें भेदाची कल्पना करून सामर्थ्य आहे असें म्हणतां येईल[७३].

आश्रय अर्थ मानणाऱ्याच्या मतीं त्या एकाच आश्रयामध्यें भेदाची कल्पना करण्याच्या कामीं धर्म उपयोगीं पडतील असें म्हणणें शक्य[७४] नाहीं.

पण आश्रयामध्यें धर्म कायमचेच आहेत ना?

जरी कायमचे धर्म असले तरी तेथें ते शब्दापासून मनांत येत नाहींत; जसें– गुड हा शब्द उच्चारला असतां त्यापासून त्याचें माधुर्य मनांत येत नाहीं, किंवा शृङ्गवेर म्हणजे आलें हा शब्द उच्चारला असतां त्यापासून त्याचा तिखटपणा मनांत येत नाहीं.

तर मग धर्म हा पदाचा अर्थ आहे असें मानणाऱ्याच्या मतींही त्या धर्मांचा आश्रयाच्या द्वारानें संबंध आहे असें म्हणतां येणार नाहीं. कारण आश्रयाची शब्दापासून उपस्थिति होत नसल्यामुळें तो त्या धर्मांचा संबंध दाखविण्याच्या कामीं उपयोगीं पडणार नाहीं.

आतां जर धर्म हा पदाचा अर्थ आहे असें म्हणणारा आश्रयाच्या द्वारानें त्या धर्मांचा संबंध दाखवून सामर्थ्य आहे असें म्हणेल तर आश्रय हा पदाचा अर्थ आहे असें म्हणण्याऱ्यानेंही त्या धर्मांमुळें आश्रयामध्यें भेद दाखवून सामर्थ्य आहे असें कां बरें म्हणूं नये?

तर मग आतां वीर आणि पुरुष यांमध्यें सामर्थ्य आहे समजावें कीं नाहीं हा विचार तूर्त बाजूला राहूं द्या. अगोदर हें सांगा की सूत्रकारांनीं जो समानाधिकरणाशीं समास सांगितला आहे (२।१।४९-५७) तो कोठें[७५] बरें होईल?

जेथें धर्म आणि आश्रय हें सर्व एकच आहे अशा ठिकाणीं, म्हणजे इन्द्रः शक्रः पुरुहूतः, कन्दुः कोष्ठः कुसूलः, इत्यादि पर्यायस्थलीं होईल.

अशा प्रकारच्या म्हणजे पर्यायवाचक शब्दांचा समास होत नाहीं आणि त्यापासून अर्थबोधही होत नाहीं.

काय कारण?

विवक्षित असलेला अर्थ दुसऱ्याला कळवून द्यावा या हेतूनें वक्ता शब्दांचा प्रयोग करीत असतो. तेथें एका शब्दानें तो अर्थ कळविला गेल्यानें पुनः तोच अर्थ कळविण्याकरितां शब्दप्रयोग होत नाहीं.

७३. जसें धर्म हा पदांचा अर्थ मानणाऱ्याला त्यांचा संबंध आश्रयामुळें आहे असें म्हणतां येतें, तसें आश्रय हा पदाचा अर्थ मानणाऱ्यालाही एकाच आश्रयाच्या धर्मांमुळें निराळेपणा आहे असें म्हणतां येईल.

७४. कारण वीरपुरुष या पदापासून केवल आश्रयाचीच उपस्थिति होणार आहे. तेव्हां ज्यांची उपस्थितिच नाहीं ते दुसऱ्याच्या उपयोगीं कसे पडतील?

७५. त्या उदाहरणांमध्यें जसें सामर्थ्य गृहीत धरलें असेल तसें येथें सांगतां येईल, असा अभिप्राय आहे.

द्वितीयस्य प्रयोगेण न भवितव्यम् । किं कारणम् । उक्तार्थानामप्रयोग इति । न तर्हीदानीमिदं भवति भृत्यभरणीय इति । नैतौ समानार्थौ । एकोऽत्र शक्यार्थे कृत्योऽपरोऽर्हार्थे । शक्यो भर्तुं भृत्यः । अर्हति भृतिं भरणीयः । भृत्यो भरणीयो भृत्यभरणीय इति ॥ यदि तर्हि यत्र किंचित्समानं कश्चिच्च विशेषस्तत्र भवितव्यमिहापि तर्हि प्राप्नोति । दर्शनीयाया माता दर्शनीयामातेति । अत्रापि किंचित्समानं कश्चिच्च विशेषः । किं पुनस्तत् । सद्भावान्यभावौ ॥ न क्वचित्सद्भावान्यभावौ न स्त उच्यते चेदं समानाधिकरणेनेति तत्र प्रकर्षगतिर्विज्ञास्यते । यत्र साधीयः सामानाधिकरण्यम् । क्व च साधीयः समानाधिकरण्यम् । यत्र सर्वं समानं सद्भावान्यभावौ द्रव्यं च ॥ अथवा समानाधिकरणेनेति तत्समानमाश्रीयते यत्समानं भवति न च भवति न चैतत्समानं क्वचिदपि न भवति ॥ अथवा यावद्ब्रूयात्समानद्रव्येणेति तावत्समानाधिकरणेनेति । द्रव्यं हि लोकेऽधिकरण-

---

काय कारण ?

जो अर्थ एकदा शब्दानें उक्त झाला त्या अर्थाकरितां पुनः शब्दप्रयोग करूं नये असा न्याय आहे म्हणून.

तर मग आतां भृत्यभरणीयः हा पर्यायशब्दांचा समास होत नाहीं कॉय ?

भृत्य आणि भरणीय हे दोन समान अर्थाचे नाहींत. कारण येथें एक कृत्यप्रत्यय शॅक्य या अर्थी (३।३।१७२) केला आहे. आणि दुसरा कृत्यप्रत्यय अर्ह या अर्थी (३।३।१६९) केला आहे; जसें—भर्तुं शक्यो भृत्यः आणि भृतिं अर्हति भरणीयः, भृत्यश्चासौ भरणीयश्च भृत्यभरणीयः.

जर ज्या ठिकाणीं कांहीं अर्थ समान आणि कांही अर्थ भिन्न आहे अशा ठिकाणीं समानाधिकरणसमास होतो तर दर्शनीयायाः माता दर्शनीयामाता येथेंही कर्मधारयसमास होऊं लागेल. कारण येथेंही कांहीं अर्थ समान आहे आणि कांहीं अर्थ विशेष आहे.

कांहीं समान आणि कांहीं विशेष असा अर्थ तो कोणता ?

दोघांची सत्ताही समान आहे. आणि त्या दोघांमध्यें निराळेपणा हा विशेष आहे.

पण असें अस्तित्व आणि निराळेपणा कोठें नाहीं असें नाहीं. असें असतां ज्यापेक्षां 'समानाधिकरणेन' असें म्हटलें आहे त्यापेक्षां त्या सामानाधिकरण्यामध्यें कांही तरी जास्त अर्थ समजला जात आहे म्हणजे जेथें अतिशय सामानाधिकरण्य आहे तेथें समानाधिकरणसमास होतो.

तें अतिशय सामानाधिकरण्य कोठें असतें ?

जेथें सद्भाव, अन्यभाव आणि द्रव्य हीं सर्व समॉन आहेत तेथें.

किंवा समानाधिकरणेन येथील समानशब्दानें असा अर्थ घ्यावयाचा की जो कोठें असतो आणि कोठें नसतो. अस्तित्व हें तसें नाहीं; कारण तें कोठें नाहीं असें होतॅचें नाहीं.

अथवा 'समानद्रव्येण' असें म्हटलें असतां जेवढा कांहीं अर्थ मनांत येतो तितक्या अर्थाचा 'समानाधिकरणेन' हा शब्द येथें

---

७६. तेव्हां या शिष्टप्रयोगाला अपशब्द म्हणावयाचें कीं काय ?

७७. मालक संपन्न असला तर चाकराचें पोषण करणें शक्य होतें; संपन्न नसेल तर अशक्य होय. तसेंच चाकर जर स्वामिनिष्ठ असेल तर तो पोषण करण्यास योग्य होतो; तसा नसेल तर अयोग्य होय.

७८. दर्शनीयायाः माता येथें द्रव्य म्ह. पदार्थ एक नाहीं. दर्शनीय ही मुलगी निराळी आणि तिची आई निराळी. तेव्हां येथें सामानाधिकरण्य नाहीं.

७९. तेव्हां दर्शनीयायाः माता येथें अस्तित्व हें समान घेऊन जें सामानाधिकरण्य दाखविलें तें बरोबर नाहीं.

मित्युपचर्यंते । तद्यथा । एकस्मिन्द्रव्ये व्युदितम् । एकस्मिन्नधिकरणे व्युदितमिति । तथा व्याकरणे विप्रतिषिद्धं चानधिकरणवाचि [२.४.१३] इत्यद्रव्यवाचीति गम्यते ॥ एवमपीदमवश्यं कर्तव्यं समानाधिकरणमसमर्थवद्भवतीति । किं प्रयोजनम् । सर्पिः कालकम् यजुः पीतकमित्येवमर्थम् । यदि समानाधिकरणमसमर्थवद्भवतीत्युच्यते सर्पिष्पीयते यजुष्क्रियत इत्यत्र षत्वं न प्राप्नोति । अधात्वभिहितमित्येवं तत् । एवं च कृत्वा समानाधिकरणेषूपसंख्यानं कर्तव्यम् । वीरः पुरुषो वीरपुरुषः । किं कारणम् । असमर्थत्वात् ॥

## न वा वचनप्रामाण्यात् ॥ २२ ॥

न वा कर्तव्यम् । किं कारणम् । वचनप्रामाण्यात् । वचनप्रामाण्यादत्र समासो भविष्यति । किं वचनप्रामाण्यम् । समानमध्यमध्यमवीराश्चेति ॥

## लुप्ताख्यातेषु च ॥ २३ ॥

लुप्ताख्यातेषु चोपसंख्यानं कर्तव्यम् । निष्कौशाम्बिः निर्वाराणसिः ॥ लुप्ताख्या-

---

घातला आहे. लोकांमध्यें घट पट वगैरे द्रव्याला अधिकरण असें म्हणतात; जसें— एका द्रव्याविषयीं विवाद केला, या अर्थाच्या ऐवजीं एका अधिकरणाविषयीं विवाद केला असें वाक्य योजतात. तसेंच व्याकरणशास्त्रामध्यें ही 'विप्रतिषिद्धं चानधिकरणवाचि' (२।४।१३) येथें 'अद्रव्यवाचि' या अर्थी 'अनधिकरणवाचि' हा शब्द योजला आहे.

तरीही 'समानाधिकरणशब्द सामर्थ्यरहित समजावा' हें वचन अवश्य केलें पाहिजे.

काय प्रयोजन ?

'सर्पिःकालकं' 'यजुःपीतकं' येथें 'इसुसोः सामर्थ्ये' (८।३।४४) यानें षत्व न व्हावें म्हणून.[1]

जर समानाधिकरणशब्द सामर्थ्यरहित समजावा, असें वाचनिक असामर्थ्य सांगितलें जात आहे तर सर्पिष्पीयते यजुष्क्रियते येथें षत्व प्राप्त होत नाहीं.

जेथें धातूहून केलेल्या प्रत्ययानें कर्ता, कर्म, वगैरे अभिहित असतें तेथें सामर्थ्य असतेंच; म्हणजे तेथें वाचनिक असामर्थ्य मानूं नये. एकंदरींत वीरः पुरुषः वीरपुरुषः येथें समास होण्याकरतां 'समानाधिकरणेषूपसंख्यानम्' हें वचन केलें पाहिजे.

काय कारण ?

समानाधिकरणस्थलीं वाचनिक असामर्थ्य सांगितलें आहे म्हणून.

(वा. २२) समानाधिकरणशब्दाबरोबर समास होण्याबद्दल निराळें वचन करावयास नको.

काय कारण ?

समानाधिकरणशब्दाबरोबर समास सांगितल्याचे जोरावर वीरः पुरुषः येथें समास होईल.

तें समास सांगणारें वचन कोणतें ?

'पूर्वापरप्रथमचरमजघन्यसमानमध्यमध्यमवीराश्च' (२।१।५८) हें होय[2].

(वा.२३) क्रियावाचक शब्दाचा लोप झाल्यामुळें जेथें पूर्वोत्तरपदाचें सामर्थ्य नसतें

---

८०. द्रव्य म्हणजे वस्तु. मुलगी आणि तिची आई अशीं येथें द्रव्यें दोन आहेत, म्हणून येथें सामानाधिकरण्य नाहीं असें सिद्ध होतें. तात्पर्य, वीरः पुरुषः येथें द्रव्य समान आहे आणि धर्मामध्यें विशेष आहे; म्हणून सामानाधिकरण्य आहे व सामर्थ्यही आहे. तेव्हां येथें समानाधिकरणसमास होईल. असमर्थत्वात् (वा.२०) हा हेतु बरोबर नाहीं असें सिद्ध झालें.

८१. तेव्हां या विशेषवचनानें वीरः पुरुषः येथें सामर्थ्य नाहीं असें सिद्ध होतें म्हणून तेथें समासाकरितां पूर्वीचें वचन(वा.२०) पाहिजे असें सिद्ध होतें.

८२. ज्या अर्थी या सूत्रानें समानाधिकरण शब्दांचा समास सांगितला आहे त्या अर्थी 'समानाधिकरण शब्द सामर्थ्यरहित समजावा' हें वचन समासाविषयीं प्रवृत्त होत नाहीं असें सिद्ध होतें.

तेषु च । किम् । वचनप्रामाण्यादित्येव । किं वचनप्रामाण्यम् । कुगतिप्रादयः [२.२.१८] इति । अस्त्यन्यदेतस्य वचने प्रयोजनम् । किम् । सुराजा अतिराजेति । न ब्रूमो वृत्तिसूत्रवचनप्रामाण्यादिति । किं तर्हि । वार्त्तिकवचनप्रामाण्यादिति । सिद्धं तु क्वाङ्स्वतिदुर्गतिवचनात्प्रादयः क्तार्थे इति ॥

## तदर्थगतेर्वा ॥ २४ ॥

तदर्थगतेर्वा पुनः सिद्धमेतत् । किमिदं तदर्थगतेरिति । तस्यार्थस्तदर्थः । तदर्थस्य गतिस्तदर्थगतिः । तदर्थगतेरिति । यस्यार्थस्य कौशाम्ब्या सामर्थ्यं स निसोच्यते । अथवा सोऽर्थस्तदर्थः । तदर्थस्य गतिस्तदर्थगतिः । तदर्थगतेरिति । योऽर्थः कौशाम्ब्या समर्थः स निसोच्यते ॥

अथ यत्र बहूनां समासप्रसङ्गः किं तत्र द्वयोर्द्वयोः समासो भवत्याहोस्विदविशेषेण । कश्चात्र विशेषः ।

## समासो द्वयोर्द्वयोश्चेद्द्वन्द्वेऽनेकग्रहणम् ॥ २५ ॥

समासो द्वयोर्द्वयोश्चेद्द्वन्द्वेऽनेकग्रहणं कर्तव्यम् । चार्थे द्वन्द्वः [२.२.२९] अनेकमिति वक्तव्यम् । इहापि यथा

---

तेथेंही समास होण्याबद्दल वचन करावें; जसें— कौशाम्ब्याः निष्क्रान्तः निष्कौशाम्बिः निर्वाराणसिः.

लुप्ताख्यातेषु च 'क्रियावाचक शब्दाचा लोप झाला असतां तेथेंही'.

तेथें काय ?

समासविधायक वचनाचे जोरावर समास होईल हेंच उत्तर समजावें.

तें समासविधायक वचन कोणतें ?

कुगतिप्रादयः (२।२।१८) हें होय.

'कुगतिप्रादयः' या समासविधायक वचनाचें निराळें उदाहरण मिळत आहे.

तें कोणतें ?

सुराजा, अतिराजा, वगैरे.

समासविधायक वचनाचे जोरावर म्हणजे सूत्राचे जोरावर निष्कौशाम्बिः वगैरे उदाहरणांमध्यें वृत्ति होईल असें आम्ही म्हणत नाहीं.

तर काय म्हणतां ?

वार्तिककारानें केलेल्या वचनाचे जोरावर असें म्हणत आहोंत. तें वार्तिक म्हणजे 'सिद्धं तु क्वाङ्स्वतिदुर्गतिवचनात्', 'प्रादयः क्तार्थे' (२।२।१८, वा.३,४) हें होय.

(वा.२४) किंवा तदर्थाची अवगति होत असल्यामुळें निष्कौशाम्बिः वगैरे समास साधत आहेत.

तदर्थगतेः याचा अर्थ काय समजावयाचा ?

तस्य अर्थ तदर्थः, तदर्थस्य गतिः तदर्थगतिः. तस्याः तदर्थगतेः असा हा समास सोडवावा.

त्या लुप्तशब्दाच्या अर्थाचें म्हणजे ज्या अर्थाचें कौशाम्बीशब्दाच्या अर्थाबरोबर सामर्थ्य जुळेल तसला अर्थ निस्‌शब्दानें आक्षिप्त केला जात आहे.

किंवा सोऽर्थस्तदर्थः, तदर्थस्य गतिः तदर्थगतिः, तस्याः तदर्थगतेः, असा हा समास सोडवावा. म्हणजे जो अर्थ कौशाम्बीशब्दार्थाबरोबर समर्थ आहे तो अर्थ निस्‌शब्दानेंच वृत्तीविषयीं साक्षात् प्रतिपादिला जात आहे.

आतां जेथें तीन, चार, इत्यादि बहुत पदांचा समास प्राप्त होतो तेथें काय दोनदोन पदांचाच समास करावयाचा किंवा सर्व पदांचा मिळून एकदमच समास करावयाचा ?

या दोन तऱ्हांत काय फरक होत आहे ?

(वा.२५) दोनदोन पदांचाच समास होतो असें गृहीत धरलें तर द्वंद्वसमासाविषयीं अनेकग्रहण करावें लागेल; म्हणजे प्लक्षन्यग्रोधखदिरपलाशाः येथें चारी पदांचा मिळून एक द्वंद्व समास होण्याकरितां 'चार्थे द्वन्द्वोऽनेकम्'

स्यात् । प्लक्षन्यग्रोधखदिरपलाशा इति ॥ नैष दोषः । अत्रापि द्वयोर्द्वयोः समासो भविष्यति ।

**द्वयोर्द्वयोः समास इति चेन्न बहुषु द्वित्वाभावात् ॥ २६ ॥**

द्वयोर्द्वयोः समास इति चेत्तन्न । किं कारणम् । बहुषु द्वित्वाभावात् । न बहुषु द्वित्वमस्ति ॥ नावश्यमेवं विग्रहः कर्तव्यः प्लक्षश्च न्यग्रोधश्च खदिरश्च पलाशश्चेति । किं तर्हि । एवं विग्रहः करिष्यते । प्लक्षश्च न्यग्रोधश्च प्लक्षन्यग्रोधौ । खदिरश्च पलाशश्च खदिरपलाशौ । प्लक्षन्यग्रोधौ च खदिरपलाशौ च प्लक्षन्यग्रोधखदिरपलाशा इति ॥ होतृपोतृनेष्टोद्गातारस्तर्हि न सिध्यन्ति । होतापोतानेष्टोद्गातार इति प्राप्नोति न चैवं भवितव्यम् । भवितव्यं च यदैवं विग्रहः क्रियते । होता च पोता च होतापोतारौ । नेष्टा चोद्गाता च नेष्टोद्गातारौ । होतापोतारौ च नेष्टोद्गातारौ च होतापोतानेष्टोद्गातारः । होतृपोतृनेष्टोद्गातारस्तु न सिध्यन्ति ॥

**समासान्तप्रतिषेधश्च ॥ २७ ॥**

समासान्तस्य च प्रतिषेधो वक्तव्यः। वाक्त्वक्स्रुग्दृषदमिति । वाक्त्वचस्रुग्दृ-

---

असें सूत्र केलें पाहिजे.

हा दोष येत नाहीं. कारण वरील उदाहरणामध्यें प्लक्ष आणि न्यग्रोध, खदिर आणि पलाश या चार पदांतील दोन दोन पदांचा एकेक द्वंद्व मिळून दोन द्वंद्व केल्यानंतर दोन द्वंद्वांचा मिळून एक तिसरा द्वंद्व समास होईल.

(वा.२६) दोन दोन पदांचा समास होईल असें म्हणणें असेल तर तें बरोबर नाहीं.

काय कारण ?

चार पदार्थांची साहित्यानें विवक्षा असतां तेथें ती दोन पदार्थांची आहे असें म्हणतां येत नाहीं. कारण बहुत्वसंख्या असेल त्या ठिकाणीं द्वित्वसंख्याच असूं शकत नाहीं.[८३]

प्लक्षश्च न्यग्रोधश्च खदिरश्च पलाशश्च असाच विग्रह केला पाहिजे असा कांहीं नियम नाहीं. तेव्हां प्लक्षश्च न्यग्रोधश्च प्लक्षन्यग्रोधौ, खदिरश्च पलाशश्च खदिरपलाशौ, प्लक्षन्यग्रोधौ च खदिरपलाशौ च प्लक्षन्यग्रोधखदिर पलाशाः असा समास सोडविला जाईल.

अशी दोन दोन पदार्थांचीच सहविवक्षा ठेवली तर होतृपोतृनेष्टोद्गातारः हा सामासिक शब्द साधत नाहीं. होतापोतानेष्टोद्गातारः[८५] असाच होऊं लागेल.

तर मग होतापोतानेष्टोद्गातारः असा सामासिक शब्द होतच नाहीं कीं काय ?

जेव्हां होता च पोता च होतापोतारौ, नेष्टा च उद्गाता च नेष्टोद्गातारौ, होतापोतारौ च नेष्टोद्गातारौ च होतापोतानेष्टोद्गातारः असा विग्रह गृहीत धरला असेल तेव्हां तसा सामासिक शब्द तयार होतोच. पण आतां[८६] होतृपोतृनेष्टोद्गातारः असा शब्द मात्र सिद्ध होत नाहीं.

(वा.२७) तसेंच वाक्त्वक्स्रुग्दृषदम् येथें त्वच्शब्दाच्या पुढें समासान्त प्रत्यय (५।४। १०६) प्राप्त होत आहे त्याच्या निषेधादाखल

---

८३. जसें लोकांमध्यें एखाद्याला तीन किंवा चार मुलगे असल्यास त्याला एकपुत्र किंवा द्विपुत्र असें म्हणत नाहींत.

८४. वक्त्याच्या इच्छेप्रमाणें दोन दोन पदार्थांची सहविवक्षा येथें गृहीत धरतां येईल.

८५. चार शब्दांचा एकदम द्वंद्वसमास केला म्हणजे त्यांतील शेवटचें उद्गातृ हें उत्तरपद पुढें आहे म्हणून फक्त नेष्टृशब्दांतील ऋकाराला आनङ् (६।३।२५) होतो. आतां दोघांदोघांचा द्वंद्व केला तर पहिल्या द्वंद्वामध्यें पोतृ हें उत्तरपद पुढें असल्यामुळें होतृशब्दांतील ऋकाराला आनङ् होईल, व दुसऱ्या द्वंद्वामध्यें नेष्टृशब्दांतील ऋकाराला होईल आणि तिसऱ्या द्वंद्वामध्यें होतापोतृ यांतील ऋकाराला होईल.

८६. दोन दोन पदांचाच द्वंद्व होतो असा पक्ष गृहीत धरला असतो.

षदमिति प्राप्नोति ॥ नैष दोषः । अत्रापि परेण परेण सह समासो भविष्यति । स्रुक्च दृषच्च स्रुग्दृषदम् । त्वक्च स्रुग्दृषदं च त्वक्स्रुग्दृषदम् । वाक्च त्वक्स्रुग्दृषदं च वाक्त्वक्स्रुग्दृषदमिति ॥ होतृपोतृनेष्टोद्गातार एवं तर्हि न सिध्यन्ति ॥ इह च सुसूक्ष्मजटकेशेन सुनताजिनवाससा । समन्तशितिरन्ध्रेण द्वयोर्वृत्तौ न सिध्यति ॥

अस्तु तर्ह्यविशेषेण ।

**अविशेषेण बहुव्रीहावनेकपदप्रसङ्गः ॥ २८ ॥**

यद्यविशेषेण बहुव्रीहावनेकपदप्रसङ्गः । तत्र को दोषः ।

**तत्र स्वरसमासान्तपुंवद्भावेषु दोषः ॥ २९ ॥**

तत्र स्वरसमासान्तपुंवद्भावेषु दोषो भवति ॥ स्वर । पूर्वशालाप्रियः अपरशालाप्रियः । स्वर ॥ समासान्त । पञ्चगवप्रियः । समासान्त ॥ पुंवद्भाव । खादिरेतरशम्य्यम् गैरवेतरशम्य्यम् ॥

---

वचन केलें पाहिजे. नाहीं तर वाक्त्वचस्रुग्दृषदम् असें एकच रूप होईल.

हा दोष येत नाहीं. कारण येथेंही पुढील पदाबरोबर समास केला म्हणजे वाक्त्वक्स्रुग्दृषदम् असा शब्द सिद्ध होईल. तो असा— स्रुक् च दृषच्च स्रुग्दृषदम्, त्वक् च स्रुग्दृषदं च त्वक्स्रुग्दृषदम्, वाक् च त्वक्स्रुग्दृषदं च वाक्त्वक्स्रुग्दृषदम्, अशा तऱ्हेनें समास केला असतां त्वक्शब्द द्वंद्वाच्या शेवटीं येत नसल्यामुळें तेथें समासान्त प्राप्त होत नाहीं.

तर मग होतृपोतृनेष्टोद्गातारः असा सामासिक शब्द साधत नाहीं हाच दोष समजा.

शिवाय दोन दोन पदांचाच समास होतो असें म्हटलें तर सुसूक्ष्मजटकेशेन, सुनताजिनवाससा आणि समन्तशितिरन्ध्रेण ह्या ठिकाणीं दोहोंपेक्षां अधिक पदांचा जो बहुव्रीहि होत असतो तो होणार नाहीं.[८७]

तर मग बहुत पदांचाही समास होतो हा पक्ष असो.

(वा.२८) जर दोहोंचाच समास होतो असा नियम मानला नाहीं तर बहुत पदांचा बहुव्रीहि समास होऊं लागेल.

मग तसा झाला तर दोष काय ?

(वा.२९) तसें झाल्यास स्वर, समासान्त आणि पुंवद्भाव यांविषयीं दोष येत आहे. स्वराचें उदा०— पूर्वशालाप्रियः, अपरशाला—प्रियः. समासान्ताचें उदा०— पञ्चगवप्रियः, पञ्चनावप्रियः. पुंवद्भावाचें उदा०— खादिरेत—

---

८७. त्यामुळें सु आणि समन्त यांना जो पूर्वपदप्रकृतिस्वर (६।२।१) होतो तो होणार नाहीं. अतिशय सूक्ष्म आहे जटा व केश ज्याचे, चांगलें कमावलेलें कातडें हें ज्याचें वस्त्र आहे, आणि ज्यामध्यें सर्व पांढरें छिद्र आहे, असा त्या तीन सामासिक पदांचा अर्थ आहे. जटा या अर्थी जट असाही शब्द आहे.

८८. सुप् (२।१।२) आणि सुपा (२।१।४) अशीं दोन्ही पदें पुढें अनुवृत्त होऊन 'एका सुबन्ताचा दुसऱ्या सुबन्ताबरोबर समास होतो' असा अर्थ झाला म्हणजे 'दोनच पदांचा समास' हा पक्ष सिद्ध होतो. आतां सुपा हें पद अनुवृत्त केलें नाहीं तर 'सुबन्तांचा समास होतो' असा अर्थ होतो. समास म्हणजे जुळणें. तें एकाचें संभवत नसल्यामुळें अर्थात् अनेक सुबन्तांचें घ्यावें लागतें. तेव्हां दोन किंवा त्यापेक्षां अधिक अशाही पदांचा समास होतो.

८९. पूर्वा आणि शाला या दोन पदांचा समास (२।१५८) होऊन नंतर त्याचा प्रियशब्दाबरोबर बहुव्रीहि होतो. पूर्वशाला या समासाचा शेवटचा आकार उदात्त. (६।१।२२३) होतो, व तोच स्वर बहुव्रीहीमध्यें पूर्वपदाचा कायम राहतो (६।२।१). एकदम तीन पदांचा बहुव्रीहि झाला तर त्यांतील पूर्व या पूर्वपदाचा आदि उदात्त (फिट् सू. २।६) झालेला बहुव्रीहीमध्यें कायम होईल. तसेंच पञ्चगवप्रियः येथें पञ्चन् आणि गो या दोन पदांचा समास होऊन समासान्त टच्प्रत्यय (५।४।९२) होत असतो तो एकदम तीन पदांचा बहुव्रीहि झाला तर होणार नाहीं. तसेंच खादिरेतरशम्य्यम् येथें इतर आणि शम्या असा

**न वावयवतत्पुरुषत्वात् ॥ ३० ॥**

न वैष दोषः । किं कारणम् । अवयवतत्पुरुषत्वात् । अवयवोऽत्र तत्पुरुषसंज्ञस्तदाश्रयौ समासान्तपुंवद्भावौ भविष्यतः ॥ स्वरः कथम् ।

**तस्यान्तोदात्तत्वं विप्रतिषेधात् ॥३१**

अन्तोदात्तत्वं क्रियतां पूर्वपदप्रकृतिस्वर इत्यन्तोदात्तत्वं भवति विप्रतिषेधेन। नैष युक्तो विप्रतिषेधः । विप्रतिषेधे परमित्युच्यते पूर्वं चान्तोदात्तत्वं परं पूर्वपदप्रकृतिस्वरत्वम् । न परविप्रतिषेधं ब्रूमः । किं तर्हि । अन्तरङ्गविप्रतिषेधम् ॥

**निमित्तिस्वरबलीयस्त्वाद्वा ॥ ३ ॥**

अथवा निमित्तस्वरान्निमित्तिस्वरो बलीयानिति वक्तव्यम् । किं पुनर्निमित्तं को वा निमित्ती । बहुव्रीहिर्निमित्तं तत्पुरुषो निमित्ती ॥ तत्तर्हि वक्तव्यं निमित्तस्वरान्निमित्तिस्वरो बलीयानिति । न वक्तव्यम् ।

**एकशितिपात्स्वरवचनं तु ज्ञापकं निमित्तिस्वरबलीयस्त्वस्य ॥ ३३ ॥**

यदयं युक्तारोह्यादिष्वेकशितिपाच्छब्दं पठति तज्ज्ञापयत्याचार्यो निमित्तस्वरान्निमित्तिस्वरो बलीयानीति । कः पुनर-

---

रशम्यम्, रौरवेतरशम्यम्.

(वा.३०) हा दोष येत नाहीं.

काय कारण ?

पञ्चगवप्रियः येथें त्रिपदबहुव्रीहि केला असतां त्यांतील दोन पदांचा 'तद्धितार्थोत्तर०' (२।१।५१) यानें तत्पुरुष झाल्यानें त्यावर अवलंबून असलेला समासान्त टच्प्रत्यय (५।४।९२) होईल. तसेंच खादिरेतरशम्या येथें इतरशम्या हा तत्पुरुष करून द्विपदबहुव्रीहि केल्यानें पुंवद्भाव होईल.

पूर्वशालाप्रियः येथें इष्ट स्वर कसा ?

(वा.३१) त्रिपदबहुव्रीहि करून त्यांतील पहिल्या दोन पदांचा 'तद्धितार्थो०' यानें तत्पुरुष केला असतां त्याला समासान्तोदात्तस्वर (६।१।२२३) प्राप्त होतो, आणि पूर्व याला बहुव्रीहिप्रयुक्त पूर्वपदप्रकृतिस्वरही (६।२।१) प्राप्त होतो, तेथें विप्रतिषेधानें समासान्तोदात्तस्वर होईल.

हा विप्रतिषेध बरोबर नाहीं. कारण विप्रतिषेध असतां परशास्त्रानें सांगितलेलें कार्य करावें (१।४।२) असें म्हटलें आहे आणि अन्तोदात्तस्वर तर पूर्वी आहे व पूर्वपदप्रकृतिस्वर पुढें आहे. विप्रतिषेधामुळें परत्वास्तव अन्तोदात्तस्वर होतो असें आम्ही म्हणत नाहीं, तर विप्रतिषेधामुळें अंतरगत्वास्तव अन्तोदात्तस्वर होतो असें म्हणत आहोंत.

(वा.३२) अथवा निमित्तामुळें प्राप्त होणाऱ्या स्वरापेक्षां नैमित्तिकामुळें येणारा स्वर बलाढ्य असल्यामुळें हें सिद्ध होईल.

पण येथें निमित्त कोण आणि निमित्ती कोण ?

त्रिपदबहुव्रीहि केल्यानंतर त्यांतील उत्तरपदावर अवलंबून तत्पुरुषसमास होत असल्यामुळें बहुव्रीहि निमित्त आणि तत्पुरुष निमित्ती होय.

तर मग 'निमित्तामुळें येणाऱ्या स्वरापेक्षां निमित्तीमुळें येणारा स्वर बलाढ्य होय' असें वचन केलें पाहिजे

वचन करावयास नको.

(वा.३३) ज्यापेक्षां हा पाणिनि आचार्य पूर्वपदाला आद्युदात्तस्वर होण्याकरतां युक्तारोह्यादि (६।२।८१) गणामध्यें एकशितिपात् या शब्दाचा पाठ करीत आहे त्यापेक्षां निमित्तस्वरापेक्षां निमित्तिस्वर बलाढ्य होय असें

---

दोन पदांचा समास पूर्वी होऊन नंतर त्याच्याबरोबर खादिरीशब्दाचा बहुव्रीहि झाला म्हणजे खादिरीशब्दाला पुंवद्भाव (६।३।३४) होतो. एकदम तीन पदांचा बहुव्रीहि झाला तर उत्तरपद शम्या हे खादिरीशब्दापुढें नसल्यामुळें पुंवद्भाव होणार नाहीं.

हेति युक्तारोह्यादिष्वेकशितिपाच्छब्दं पठितुम् । एवं किल नाम पठ्यत एकः शितिरेकशितिः एकशितिः पादो यस्येति । तच्च न । एवं विग्रहः करिष्यते । एकः शितिरेषु त इम एकशितयः एकशितयः पादा यस्येति । अथाप्येवं विग्रहः क्रियत एकः शितिरेकशितिः एकशितिः पादो यस्येत्येवमपि नार्थः पाठेन । इगन्ते द्विगावित्येष स्वरोऽत्र बाधको भविष्यति ॥

अस्य तर्हि बहुव्रीह्यवयवस्य तत्पुरुषसंज्ञा प्राप्नोति । सुसूक्ष्मजटकेशेन सुनताजिनवाससा समन्ताशितिरन्ध्रेणेति । तत्र को दोषः । तस्यान्तोदात्तत्वं विप्रतिषेधादित्यन्तोदात्तत्वं स्याद्विप्रतिषेधेन ॥ नैष दोषः । नेदं बहुव्रीह्यवयवस्य तत्पुरुषस्य लक्षणमारभ्यते । किं तर्हि । यस्य बहुव्रीह्यवयवस्य तत्पुरुषस्य तल्लक्षणमस्ति तस्यान्तोदात्तत्वं भविष्यति विप्रतिषेधेन । ननु चास्याप्यस्ति । किम् । विशेषणं विशेष्येण बहुलम् [२.१.५७] इति । बहुलवचनान्न भविष्यति ॥

अस्य तर्हि बहुव्रीह्यवयवस्य तत्पुरुष-

---

सुचवीत आहे.

पण युक्तारोह्यादि गणामध्यें एकशितिपात्-शब्दाचा पाठच मुळीं योग्य नाहीं. कारण एकः शितिः एकशितिः, एकशितिः पादो यस्येति एकशितिपात् असा तत्पुरुष करून बहुव्रीहि केला असतां तिशब्दांतील इकाराला पूर्वपदप्रकृतिस्वरानें उदात्त प्राप्त होतो. त्याचा बाध करून एकशब्दांतील एकाराला उदात्तत्व होण्याकरितां तो पाठ केला आहे. पण तें बरोबर नाहीं. कारण एकः शितिर्येषु ते एकशितयः, एकशितयः पादा अस्य एकशितिपात्, असा बहुव्रीहि करून पुनः बहुव्रीहि केला म्हणजे पूर्वपदप्रकृतिस्वरानेंच एकाराला उदात्तत्व साधत आहे. तसेंच तत्पुरुष करून बहुव्रीहि केला असतांही त्या तत्पुरुषाला द्विगुसंज्ञा (२।१।५२) असल्यामुळें 'इगन्तकाल०' (६।२।२९) या पूर्वपदप्रकृतिस्वरानें समासान्तोदात्तत्वाचा बाध होऊन आदीचा एकार उदात्त कायम राहील. तेव्हां युक्तारोह्यादिगणामध्यें एकशितिपात्-शब्दाचा पाठ करण्याचा उपयोग होत नाहीं.

तर सुसूक्ष्मजटकेशेन या बहुव्रीहीच्या अवयवाला 'न वाऽव्ययवतत्पुरुषत्वात्' (वा. ३०) या वचनानें तत्पुरुषसंज्ञा प्राप्त होत आहे. ती झाली असतां काय दोष ?

बहुव्रीहिसमासामुळें प्राप्त झालेला जो सु याला पूर्वपदप्रकृतिस्वर त्यापेक्षां अंतरंग असल्यामुळें सुसूक्ष्म या अवयवतत्पुरुषाला समासान्तोदात्त स्वर होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण 'न वाऽवयतत्पु०' हें वचन त्रिपदबहुव्रीहीमध्यें अवयवतत्पुरुष समास करावा अशा अर्थाचें विधायक नव्हे.

तर काय ?

ज्या बहुव्रीहीच्या अवयव अशा दोन पदांचा इतर शास्त्रानें तत्पुरुषसमास होत असेल त्या तत्पुरुषाला विप्रतिषेधामुळें पूर्वपदप्रकृतिस्वरापेक्षां अंतरंगत्वास्तव अन्तोदात्तस्वर होईल.

पण सुसूक्ष्मजटकेशेन या बहुव्रीहीच्या अवयवालाही तत्पुरुषसंज्ञा सांगणारें निराळें सूत्र आहे ना ?

तें कोणतें ?

विशेषणं विशेष्येण बहुलम् (२।१।५७) हें.

तेथें बहुलम् असें म्हटलें असल्याकारणानें बहुव्रीहीच्या अवयवाला विशेष सूत्र असल्यावांचून तपुत्रुषसंज्ञा होणार नाहीं.

तर मग अधिकषष्टिवर्षः या त्रिपदबहुव्रीहींतील अधिकषष्टि या अवयवाला तत्पुरुष-

---

९०. अधिकशब्दाला संख्यासंज्ञा (१।१।२३, वा. ८) सांगितली असल्यामुळें 'तद्धितार्थो०' (२।१।५१) यानें अधिक आणि षष्टि या दोन पदांचा तत्पुरुषसमास होत आहे.

संज्ञा प्राप्नोति । अधिकषष्टिवर्ष इति । तत्र को दोषः । तस्यान्तोदात्तत्वं विप्रतिषेधादित्यन्तोदात्तत्वं स्याद्विप्रतिषेधेन ॥ नैष दोषः । इगन्ते द्विगावित्येष स्वरो भविष्यति ॥ यस्तर्हि नेगन्तः । अधिकशतवर्ष इति ॥ इह चाप्यधिकषष्टिवर्ष इति समासान्तः प्राप्नोति । डच्प्रकरणे संख्यायास्तत्पुरुषस्योपसंख्यानं निस्त्रिंशाद्यर्थमिति । नैष दोषः । अव्ययादेरित्येवं तत् । किं पुनः कारणमव्ययादेरित्येवं तत् । इह मा भूत् । गोत्रिंशत् गोचत्वारिंशदिति ॥ बहुव्रीहिसंज्ञा तर्हि प्राप्नोति । संख्ययाव्ययासन्नादूराधिकसंख्याः संख्येये [२.२.२५] इति ॥ न संख्यां संख्येये वर्तयिष्यामः । कथम् । एवं विग्रहः करिष्यते अधिका षष्टिर्वर्षाणामस्येति ॥ यथा तर्हि स योगः प्रत्याख्यायते तथा पूर्वेण प्राप्नोति । कथं च

---

संज्ञा प्राप्त होत आहे.

तत्पुरुषसंज्ञा झाली असतां काय दोष ?

'तस्यान्तोदात्तत्वं विप्रतिषेधात्' (वा.३१) या वचनानें विप्रतिषेध असल्यामुळें अन्तोदात्तस्वर होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण समासान्तोदात्तत्वाचा बाध करून 'इगन्तकाल०' (६।२।२९) यानें पूर्वपदप्रकृतिस्वर होईल.

तर जो इगन्त तत्पुरुष नव्हे म्हणजे अधिकशतवर्षः येथें दोष येत आहे. शिवाय अधिकषष्टिवर्षः येथेंही दोष आहेच. तो असा की– 'निस्त्रिंशः वगैरे शब्द सिद्ध होण्याकरितां संख्याशब्द शेवटीं असलेल्या तत्पुरुषाला समासान्त डच्प्रत्ययाचें विधान करावें' (५।४।७३ वा.१) असें सांगितलें असल्यामुळें समासान्त डच्प्रत्यय होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण अव्यय आहे पूर्वपद ज्याचें अशा संख्याशब्दान्त तत्पुरुषाला त्या वार्तिकानें डच्प्रत्यय सांगितला आहे.

अव्यय पूर्वपद आणि संख्या उत्तरपद असेल तरच त्या तत्पुरुषाला तो डच्प्रत्यय होतो असें सांगण्याचें काय बरें कारण ?

गोत्रिंशत्, गोचत्वारिंशत्, येथें डच्प्रत्यय न व्हावा म्हणून.

तर मग आतां अधिकषष्टिवर्षः येथेंच 'तद्धितार्थो०' यानें प्राप्त होणाऱ्या तत्पुरुषसंज्ञेचा परत्वास्तव बाध करून 'संख्ययाव्यया०' (२।२।२५) यानें बहुव्रीहिसंज्ञा[91] प्राप्त होत आहे.

अधिकषष्टिवर्षः येथील षष्टि हा संख्याशब्द संख्येय या अर्थाचा आम्ही घेणार नाहीं.[92]

ते कसें ?

अधिका[93] षष्टिर्वर्षाणामस्य असा हा समास सोडविण्यांत येईल.

तर मग 'संख्ययाव्यया०' (२।२।२५) या सूत्राचें ज्या तऱ्हेनें[94] प्रत्याख्यान केलें आहे त्या तऱ्हेनें 'अनेकमन्य०' (२।२।२४) या पूर्वसूत्रानें अधिकषष्टिवर्षः येथें बहुव्रीहि प्राप्त होत आहे.

त्या सूत्राचें प्रत्याख्यान कशा तऱ्हेनें बरें केलें आहे ?

'संख्योत्तरपदक बहुव्रीहीचें विधान करा-

---

९१. बहुव्रीहि झाला तर समासान्त डच्प्रत्यय (५।४।७३) होऊन 'अधिकषष्टवर्ष' असें भलतेंच रूप होईल.

९२. तेव्हां अर्थातच अधिक आणि षष्टि या दोन पदांचा बहुव्रीहि (२।२।२५) होणारच नाहीं. कारण तेथें संख्येय या अर्थाचा संख्याशब्द पाहिजे असें म्हटलें आहे.

९३. साठ वर्षें असा येथें षष्टि हा शब्द संख्येय या अर्थाचा नाहीं. तर 'वर्षांची साठी' असा केवलसंख्यावाचक आहे.

९४. षष्टि वगैरे शब्द संख्यावाचकच घेतले म्हणजे संख्येय हा अन्य पदार्थ होतो. तेव्हां 'अनेकमन्यपदार्थे' (२।२।२४) या पूर्वसूत्रानेंच बहुव्रीहि सिद्ध होत आहे.

स योगः प्रत्याख्यायते। अशिष्यः संख्योत्तरपदः संख्येयवाभिधायित्वादिति ॥ प्रत्याख्याते तस्मिन्योगे संख्यां संख्येये वर्तयिष्यामः। तत्रैवं विग्रहः करिष्यते अधिका षष्टिर्वर्षाण्यस्येति ॥ सर्वथा वयमधिकषष्टिवर्षान्न मुच्यामहे। कथम्। यावता स च योगः प्रत्याख्यायतेऽयं च विग्रहोऽस्ति अधिका षष्टिर्वर्षाणामस्येति ॥ यत्त तदुक्तमधिकषष्टिवर्षो न सिध्यतीति स सिद्धो भवति। कथम्। यावता स च योगः प्रत्याख्यायतेऽयं च विग्रहोऽस्ति अधिका षष्टिर्वर्षाण्यस्येति ॥ अधिकशतवर्षस्तु न सिध्यति। कर्तव्योऽत्र यत्नः ॥

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये द्वितीयस्याध्यायस्य प्रथमे पादे प्रथममाह्निकम् ॥

---

वयास नको. कारण संख्येय या अन्य पदार्थाचें अभिधान त्या समासानें केलें जात असल्यामुळें 'अनेकमन्य०' (२।२।२४) यानेंच तेथें बहुव्रीहिसंज्ञा होत आहे (२।२।२५, वा.४)' अशा रीतीनें त्या सूत्राचें प्रत्याख्यान केलें असतां येथें संख्याशब्द संख्येय या अर्थाचा घेऊं. तेव्हां असा समास सोडविण्यांत येईल :— अधिका षष्टिर्वर्षाणि अस्य.[९५]

तथापि अधिकषष्टिवर्षः या अनिष्ट रूपापासून आमची सुटका होत नाहीं.

ती कशी ?

त्या सूत्राचें प्रत्याख्यान केलें त्या वेळीं अधिका षष्टिर्येषां वर्षाणां तानि वर्षाणि अस्य असा विग्रह करण्यास मार्ग खुला आहे म्हणून.[९६]

आतां त्रिपदबहुव्रीहि केला असतां अधिकषष्टिवर्षः हा सामासिक शब्द साधत नाहीं असें पूर्वी म्हटलें आहे पण तो मात्र शब्द साधत आहे.

तो कसा ?

ज्या अर्थी 'संख्ययाव्यया०' या सूत्राचें प्रत्याख्यान केलें आहे व त्या वेळीं अधिका षष्टिर्वर्षाणि अस्य असा समास सोडविण्यास मार्ग खुला आहे, त्या अर्थी अधिकषष्टिवर्षः हा शब्द साधत आहे.

अधिकशतवर्षः हा शब्द मात्र साधत नाहीं. हा शब्द साधण्याविषयीं यत्न करावा.[९७]

याप्रमाणें भगवान् पतंजलि ऋषींनीं रचिलेल्या व्याकरण महाभाष्यांतील दुसऱ्या अध्यायाच्या पहिल्या पादांतील पहिलें आन्हिक समाप्त झालें.

---

९५ संख्येय हा संख्याशब्दाचाच अर्थ घेतला तर तो अन्य पदार्थ होत नसल्यामुळें 'अनेकमन्यपदार्थे' हा अधिक आणि षष्टि या दोन पदांचा बहुव्रीहि होत नाहीं. 'संख्ययाव्यया०' हें प्रत्याख्यात केलें असल्यामुळें त्याचीही प्राप्ति नाहीं. तेव्हां समासान्तप्रत्ययाची शंकाच येत नसल्यामुळें अधिकषष्टिवर्ष हा शब्द सिद्ध होतो.

९६. षष्टि हा शब्द संख्येयवाचकच नेहमीं घेतला पाहिजे असा नियम नाहीं. तेव्हां संख्यावाचक घेतला तर 'अनेकमन्यपदार्थे' यानें अधिका आणि षष्टि या दोन शब्दांचा बहुव्रीहि प्राप्त होणारच. आणि त्यामुळें समासान्त डच्प्रत्ययही होणारच.

९७. अधिकं शतं वर्षाणि यस्य असा त्रिपदबहुव्रीहि करून त्यांतील अधिक आणि शत या दोन पदांचा 'तद्धितार्थो०' (२।१।५१) यानें समास झाला असतां त्या समासाचा अंत उदात्त होऊं लागेल. हा दोष जाण्याकरितां यत्न करणें तो युक्तारोह्यादिगणामध्यें (६।२।८१) त्या शब्दाची कल्पना करणें. त्यामुळें आद्युदात्त इष्ट आहे तो साधेल.

## सुबामन्त्रिते पराङ्गवत्स्वरे ॥ २ । १ । २ ॥

सुबिति किमर्थम् । करोष्यटन् । नैतदस्ति । असामर्थ्यादत्र न भविष्यति । कथमसामर्थ्यम् । समानाधिकरणमसमर्थवद्भवतीति ॥ इदं तर्हि । पीडये पीड्यमान ॥ इदं चाप्युदाहरणम् । करोष्यटन् । ननु चोक्तमसामर्थ्यादत्र न भविष्यति कथमसामर्थ्यं समानाधिकरणमसमर्थवद्भवतीति । नैष दोषः । अधात्वभिहितमित्येवं तत् ॥

### आमन्त्रितस्य पराङ्गवद्भावे षष्ठ्यामन्त्रितकारकवचनम् ॥ १ ॥

आमन्त्रितस्य पराङ्गवद्भावे षष्ठ्यन्तमामन्त्रितकारकं च परस्याङ्गवद्भवतीति वक्तव्यम् ॥ षष्ठ्यन्तं तावत् । मद्राणां राजन् । मगधानां राजन् ॥ आमन्त्रितकारकम् । कुण्डेनाटन् । नास्त्यत्र विशेषः

---

(सू.२) येथें सुप् असें जें म्हटलें आहे त्याचा काय उपयोग ?

करोष्यटन् येथें पराङ्गवद्भाव न व्हावा.[2]

हा उपयोग म्हणतां येत नाहीं. कारण प्रकृत स्थलीं सामर्थ्य[3] नसल्यामुळें परांगवद्भाव होणार नाहीं.

तें सामर्थ्य कां बरें नाहीं ?

समानाधिकरणाला सामर्थ्यरहित समजावें असें वाचनिक असामर्थ्य सांगितलें आहे म्हणून.

तर पीडये[5] पीड्यमान येथें तिङन्ताला पराङ्गवद्भाव न होणें हा उपयोग समजावा.

करोष्यटन् हाही उपयोग समजावा.

पण येथें सामर्थ्य नसल्यामुळें पराङ्गवद्भाव होणार नाहीं. तें सामर्थ्य कां बरें नाहीं ? समानाधिकरणाला सामर्थ्यरहित समजावें असें सांगितलें आहे, असें पूर्वी म्हटलें आहे ना ?

हा दोष येत नाहीं. कारण धातूच्या पुढील प्रत्ययानें अभिहित नसलेलें जें समानाधिकरण तें सामर्थ्यरहित समजावें असा त्याचा अर्थ आहे.

(वा.१) आमन्त्रितसंज्ञकशब्द पुढें असतांना त्याच्या मागील ज्या सुबन्ताला पराङ्गवद्भाव करावयाचा असेल तें षष्ठ्यन्त असेल किंवा आमन्त्रितामुळें कारकसंज्ञा पावलेल्या अर्थाचें वाचक असेल तरच त्याला पराङ्गवद्भाव होतो असें म्हणावें. षष्ठ्यन्ताचें उदाहरण— मद्राणां राजन्, मगधानां राजन्. कारकाचें उदाहरण कुण्डेनाटन्.

पण या उदाहरणामध्यें पराङ्गवद्भाव झाला किंवा न झाला तरी कांहीं फरक होत नाहीं.[6]

---

१. सुबन्ताच्या पुढें आमन्त्रितशब्द पुढें असतां त्याच्या मागील जें सुबन्तपद तें स्वर कर्तव्य असतांना त्यापुढें असलेल्या आमन्त्रितापैकींच एक भाग आहे असें समजावें. यालाच पराङ्गवद्भाव म्हणतात; जसें— द्रवत्पाणी शुभस्पती, मद्राणां राजन्.

२. पराङ्गवद्भाव झाला तर करोषि हें क्रियापद अटन् या आमन्त्रितापैकींच एक भाग आहे असें समजल्यामुळें 'आमन्त्रितस्य च' (६।१।१९८) यानें सांगितलेला आद्युदात्त स्वर करोष्यटन् येवढ्याला होऊं लागेल.

३. पराङ्गवद्भाव हा सुबन्ताला सांगितला असल्यामुळें पदविधि आहे, व त्यामुळेंच येथें समर्थपरिभाषा येत आहे.

४. पृ.२५५ पं.५,६ एवमपीदमवश्यं वक्तव्यं समानाधिकरणमसमर्थवत् पहा.

५. येथें पीडा देणारा व पीडा पावणारा हे दोघे निरनिराळ्या शब्दानें दाखविले असल्यानें सामानाधिकरण्य नाहीं, सबब वाचनिक सामर्थ्यनिषेध प्रवृत्त होत नाहीं.

६. कुण्ड हा शब्द 'नब्विषयस्या०' (फिट् सू. २।३) यानें आद्युदात्त आहे, आणि त्याच्या पुढील अटन् या आमन्त्रिताला अनुदात्त (८।१।१९) झाला आहे. आतां पराङ्गवद्भावानें कुण्डेनाटन् एवढ्या समुदायाला 'आमन्त्रितस्य च' (६।१।१९८) यानें आदि उदात्त झाला तरी शेषनिघातानें (६।१।१५८) तसेच स्वर होणार आहेत.

सति पराङ्गवद्भावेऽसति वा । इदं तर्हि । परशुना वृश्चन् ॥

**तन्निमित्तग्रहणं वा ॥ २ ॥**

तन्निमित्तग्रहणं वा कर्तव्यम् । आमन्त्रितनिमित्तं परस्याङ्गवद्भवतीति वक्तव्यम् ॥ तच्चावश्यमन्यतरद्वक्तव्यम् ।

**अवचने हि सुबन्तमात्रप्रसङ्गः ॥ ३ ॥**

अनुच्यमाने ह्येतस्मिन्सुबन्तमात्रस्य पराङ्गवद्भावः प्राप्नोति । अस्यापि प्रसज्येत । क्षत्रेणाग्ने स्वायुः संरभस्व मित्रेणाग्ने मित्रधेये यतस्व ॥ किं पुनरत्र ज्यायः । तन्निमित्तग्रहणमेव ज्यायः । इदमपि सिद्धं भवति । गोषु स्वामिन् । अश्वेषु स्वामिन् । एतद्धि नैव षष्ठ्यन्तं नाप्यामन्त्रितकारकम् ॥

**सुबन्तस्य पराङ्गवद्भावे समानाधिकरणस्योपसंख्यानमनन्तरत्वात् ॥ ४ ॥**

सुबन्तस्य पराङ्गवद्भावे समानाधिकरणस्योपसंख्यानं कर्तव्यम् । तीक्ष्णया सूच्या सीव्यन् । तीक्ष्णेन परशुना वृश्चन् । किं पुनः कारणं न सिध्यति । अनन्तरत्वात् ॥ ननु च परस्य पराङ्गवद्भावे कृते पूर्वस्यापि भविष्यति ।

**स्वरेऽवधारणाच्च ॥ ५ ॥**

स्वरेऽवधारणाच्च न सिध्यति । स्वरेऽवधारणं क्रियते नानन्तर्ये ॥

---

तर मग परशुना वृश्चन् हें कारकाचें उदाहरण समजावें.

(वा.२) किंवा आमन्त्रिताच्या अर्थाचें जें निमित्त तद्वाचक पदाला परांगवद्भाव होतो असें म्हणावें; जसें मद्राणां राजन्.

वरील दोन वचनांपैकीं कोणतें तरी एक वचन अवश्य केलें पाहिजे.

(वा.३) वचन केलें नाहीं तर वाटेल त्या सुबन्ताला पराङ्गवद्भाव करण्याची पाळी येईल. त्यामुळें क्षत्रेणाग्ने स्वायुः संरभस्व, मित्रेणाग्ने मित्रधेये यतस्व, येथेंही क्षत्रेण आणि मित्रेण या पदांना परांगवद्भाव प्रसक्त होत आहे.

पण 'षष्ठ्यामन्त्रित०' आणि तन्निमित्तग्रहणम् या उभयतांमध्यें कोणतें वचन स्वीकारणें श्रेयस्कर आहे ?

तन्निमित्तग्रहणम् हेंच वचन स्वीकारणें जास्त श्रेयस्कर होय. त्यामुळें गोषु स्वामिन्, पशुषु स्वामिन्, येथेंही परांगवद्भाव साधत आहे. गोषु, पशुषु, हें षष्ठ्यन्तही नव्हे किंवा आमन्त्रितार्थामुळें कारकही नव्हे. अर्थात् पूर्व वचनानें सर्वत्र निर्वाह होणार नाहीं.

(वा.४) सुबन्ताला सांगितलेला जो परांगवद्भाव तेथें त्या सुबन्ताशीं समानाधिकरण (समानार्थप्रतिपादक) जें सुबन्त त्यालाही पराङ्गवद्भाव होतो असें सांगावें; जसें— तीक्ष्णया सूच्या सीव्यन्, तीक्ष्णेन परशुना वृश्चन्.

पण सुबन्ताशीं समानाधिकरण सुबन्ताला परांगवद्भावसूत्रानेंच कां बरें साधत नाहीं ?

आमन्त्रित पुढें असतांना असें येथें म्हटलें आहे, आणि तीक्ष्णया याच्यापुढें आमन्त्रित नाहीं; सूच्या या पदानें व्यवधान आहे.

पण सूच्या या पुढील सुबन्ताला पराङ्गवद्भाव केल्यानंतर त्यामुळें सूच्या सीव्यन् हीं दोन पदें मिळून आमन्त्रित होत असल्यामुळें तीक्ष्णया या सुबन्तालाही परांगवद्भाव होईल.

(वा.५) स्वर कर्तव्य असतांनाच परांगवद्भाव होतो असें म्हटलें असल्यामुळें परांगवद्भाव हा स्वराच्या उपयोगीं पडतो. आमन्त्रित हें अव्यवहित पुढें आहे हें ठरविण्याच्या कामीं उपयोगीं पडणार नाहीं.

---

७. 'आङ्परयोः खनिशॄभ्याम्०' (उ.१।३३) या सूत्रानें कुप्रत्यय करून बनलेला परशुशब्द अन्तोदात्त आहे.

८. मद्रदेशाचा राजा असल्यामुळें त्याच्या राजपणाचा मद्रदेश हा निमित्त आहे.

९. येथें तीक्ष्णया आणि सूच्या या दोन्ही पदांना परांगवद्भाव झाल्यामुळें तीक्ष्णया सूच्या सीव्यन् या तीन पदांना मिळून आमन्त्रिताद्युदात्त झाला आहे.

**परमपि च्छन्दसि ॥ ६ ॥**

परमपि च्छन्दसि पूर्वस्याङ्गवद्भवतीति वक्तव्यम् । आ ते पितर्मरुतां सुम्नमेतु । प्रति त्वा दुहितर्दिवः । वृणीष्व दुहितर्दिवः ॥

**अव्ययप्रतिषेधश्च ॥ ७ ॥**

अव्ययानां च प्रतिषेधो वक्तव्यः । उच्चैरधीयान । नीचैरधीयान ॥

**अनव्ययीभावस्य ॥ ८ ॥**

अनव्ययीभावस्येति वक्तव्यम् । इह मा भूत् । उपाग्न्यधीयान । प्रत्यग्न्यधीयान ॥ अथ किमर्थं स्वरेऽवधारणं क्रियते ।

**स्वरेऽवधारणं सुबलोपार्थम् ॥ ९ ॥**

स्वरेऽवधारणं क्रियते सुब्लोपो मा भूदिति । परशुना वृश्चन् ॥

**न वा सुबन्तैकान्तत्वात् ॥ १० ॥**

न वा कर्तव्यम् । किं कारणम् । सुबन्तैकान्तत्वात् । सुबन्तैकान्तः पराङ्गवद्भावो भवति ॥

**प्रातिपदिकैकान्तस्तु सुब्लोपे ॥११॥**

प्रातिपदिकैकान्तस्तु भवति सुब्लोपे कृते ॥ प्रत्ययलक्षणेन सुबन्तैकान्तता स्यात्तस्मात्स्वरेऽवधारणं न कर्तव्यं सुब-

---

(वा.६) वेदामध्यें आमन्त्रिताच्या पुढें आलेल्या सुबन्ताला पूर्वांगवद्भाव होतो असें वचन करावें; जसें–आ[10] ते पितर्मरुताम्, प्रति त्वा दुहितर्दिवः, वृणीष्व दुहितर्दिवः.

(वा.७) अव्ययाला परांगवद्भाव होत नाहीं असें वचन करावें; जसें– उच्चैरधीयान.

(वा.८) अव्ययीभाव नांवाच्या अव्ययाला परांगवद्भावाचा प्रतिषेध होत नाहीं असें वचन करावें; जसें– उपाग्न्यधीयान[11].

स्वर कर्तव्य असतांना असें अवधारण केलें तें कशाकरितां ?

(वा.९) सुपाचा लोप न व्हावा म्हणून स्वर कर्तव्य असतांना असें अवधारण केलें आहे; जसें– परशुना[12] वृश्चन्.

(वा.१०) स्वरविषयक अवधारण करावयास नको. काय कारण ?

आमन्त्रित हें नियमानें सुबन्तच असल्यामुळें त्याच्याशीं सांगितलेल्या परांगवद्भावानें सुबन्तप्रयुक्त कार्याविषयींच विशिष्टाला आमन्त्रित म्हणतां येईल; फार तर सुबन्त म्हणतां येईल, पण प्रातिपदिक असें म्हणतां येणार नाहीं.

(वा.११) आमंत्रिताच्या पुढील सुपाचा लोप झाला असतां प्रादिपदिकच उरलें आहे. तेव्हां त्याच्याशीं होणाऱ्या परांगवद्भावानें परशुना हें प्रातिपदिकाचा अवयव आहे असें म्हणतां येईल.

आमन्त्रितापैकीं पुढील सुपाचा लोप झाला असला तरी प्रत्ययलक्षणशास्त्रानें त्याला सुबन्त समजूनच आमन्त्रितसंज्ञा होत असल्यामुळें आमंत्रिताशीं होणाऱ्या परांगव-

---

१०. पितः या आमन्त्रिताच्या पुढें असलेला मरुताम् या षष्ठयन्त पदाला पूर्वांगवद्भाव झाल्यामुळें पितर्मरुताम् एवढ्याला आमन्त्रितनिघात (८।१।१९) होतो. असेंच दुहितर्दिवः येथें समजावें.

११. उपाग्नि हा अव्ययीभाव जरी अव्यय आहे (१।१।४१) तरी त्याला परांगवद्भाव होतो. त्यामुळें उपाग्न्यधीयान एवढया समुदायाला आमन्त्रिताद्युदात्त (६।१।१९८) होतो.

१२. वृश्चत्शब्दापुढील संबोधनसुप्रत्ययाचा लोप (६।१।६०) होऊन नुसतें प्रातिपदिक उरलें आहे. तें प्रत्ययलक्षणानें (१।१।६२) सुबन्त म्ह. प्रथमान्त समजून त्याला आमन्त्रितसंज्ञा (२।३।४८) होते. तें आमंत्रित पुढें असतांना मागील परशुना या सुबन्ताला परांगवद्भाव झाला तर परशुना वृश्चन् एवढ्याला प्रातिपदिक म्हणतां येईल आणि त्यांतील ना या सुप्प्रत्ययाचा लोप (२।४।७१) होऊं लागेल.

ळोपार्थम् । प्रातिपदिकस्थायाः सुपो लुगुच्यते । तस्मात्स्वरग्रहणेन नार्थः ॥ इदं तर्हि प्रयोजनं षत्वणत्वे मा भूतामिति । कूपे सिञ्चन् । चर्म नमन्निति ॥ एतदपि नास्ति प्रयोजनम् । इह तावत्कूपे सिञ्चन्निति स्वाश्रयं पदादित्वं भविष्यति । चर्म नमन्निति पूर्वपदात्संज्ञायामगः [८.४.३] इत्येतस्मान्नियमान्न भविष्यति । ननु च समास एतद्भवति पूर्वपदमुत्तरपदमिति । नेत्याह । अविशेषेणैतद्भवति । पूर्वं पदं पूर्वपदम् । उत्तरं पदमुत्तरपदमिति ॥

## प्राक्कडारात्समासः[1] ॥ २ । १ । ३ ॥

प्राग्वचनं किमर्थम् ।

**प्राग्वचनं संज्ञानिवृत्त्यर्थम् ॥ १ ॥**

प्राग्वचनं क्रियते समाससंज्ञाया अनिवृत्तिर्यथा स्यात् । अक्रियमाणे हि प्राग्वचनेऽनवकाशा अव्ययीभावादयः संज्ञाः समाससंज्ञां बाधेरन् । ता मा बाधिषतेति प्राग्वचनं क्रियते ॥ अथ क्रियमाणेऽपि प्राग्वचने यावतानवकाशा अव्ययीभावादयः संज्ञाः कस्मादेव न बाधन्ते । क्रियमाणे हि प्राग्वचने सत्यां समाससंज्ञायामेता अवयवसंज्ञा आरभ्य-

---

द्भावानें परशुना या सुबन्ताला सुबन्ताचा अवयव म्हणतां येईल; प्रातिपदिकाचा अवयव म्हणतां येणार नाहीं. तर मग स्वर कर्तव्य असतां असें अवधारण करण्याचें प्रयोजन कूपे सिञ्चन्, चर्म नमन्, येथें क्रमानें षत्व आणि णत्व न होणें हें प्रयोजन समजावें.[13]

हेंही प्रयोजन म्हणतां येत नाहीं. कारण कूपे सिञ्चन् येथें सकाराला मूळचें स्वाभाविक पदादित्व असल्यानें तें घेऊन षत्वनिषेध प्रवृत्त होईल[14]. तसेंच चर्म नमन् येथें परांगवद्भावानें समानपदत्वामुळें णत्व प्राप्त होतें, तरी पण 'पूर्वपदात्संज्ञायाम्' (८।४।३) या नियमानुसार येथें संज्ञा नसल्यामुळें णत्व होणार नाहीं.

पण समासांतीलच पदाला पूर्वपद किंवा उत्तरपद म्हणावयाचें अशी रूढि ठरली असल्यामुळें येथें वाक्यामध्यें 'पूर्वपदात्' या नियमाची प्रवृत्ति होणार नाहीं.

हें म्हणणें बरोबर नाहीं. कारण समास, वाक्य, इत्यादि विशेष मनांत न घेतां जें पूर्वी असून पदसंज्ञक आहे तें पूर्वपद, आणि जें पुढें असून पदसंज्ञक आहे, तें उत्तरपद असा व्यवहार होण्यास काहीं हरकत नाहीं.

(सू.३) येथें प्राक् हा शब्द घातला आहे तो कशाकरितां ?

(वा.१) अव्ययीभावादि इतर संज्ञा प्राप्त असतां तेथें समाससंज्ञेची निवृत्ति न व्हावी म्हणजे त्या संज्ञांबरोबर समाससंज्ञाही व्हावी म्हणून प्राक्शब्द घातला आहे. प्राक्शब्द न घातला तर अनवकाश असलेल्या अव्ययीभावादि संज्ञा समाससंज्ञेचा बाध करतील. तो बाध न व्हावा म्हणून सूत्रामध्यें प्राक् हा शब्द घातला आहे.

प्राक्शब्द घातला तरी, जर अव्ययीभावादिक संज्ञा अनवकाश आहेत तर त्या समाससंज्ञेचा कां बरें बाध करीत नाहींत ?

---

१३. कूपे सिञ्चन् येथें स्वरग्रहण नसेल तर षत्व कर्तव्य असतांना परांगवद्भाव होऊन पदद्वयाला एकपदत्व येईल. तेव्हां अर्थातच सकार हा पदादि नसल्यामुळें 'सात्पदाद्योः' (८।३।१११) हा षत्वनिषेध होणार नाहीं. तसेंच चर्म नमन् येथें परांगवद्भाव झाला असतां पदसमुदायाला समानपदत्व असल्यामुळें णत्व प्रसक्त होईल.

१४. पदादित्व घालविणें हें अशास्त्रीय कार्य असल्यामुळें त्याकरितां परांगवद्भाव प्रवृत्त होत नाहीं.

१. कडाराः कर्मधारये (२।२।३८) या सूत्रापर्यंत प्रत्येक सूत्रामध्यें समासः हें पद चालू आहे असें समजावें.

न्ते तत्र वचनात्समावेशो भविष्यति ॥ समाससंज्ञाप्यनवकाशा सा वचनाद्भविष्यति । सावकाशा समाससंज्ञा । कोऽवकाशः । विस्पष्टादीन्यवकाशः । विस्पष्टं पटुर्विस्पष्टपटुः । नैषोऽस्त्यवकाशः । एषा ह्याचार्यस्य शैली लक्ष्यते येनैवावयवकार्यं भवति तेनैव समुदायकार्यमपि भवति । येनैवात्रावयवकार्यं स्वरस्तेनैव समुदायकार्यमपि समासो भविष्यति । विस्पष्टादीनि गुणवचनेषु [६.२.२४] इति ॥ इदं तर्हि । काकतालीयम् अजाकृपाणीयम् । अत्रापि येनैवावयवकार्यं प्रत्ययोत्पत्तिः क्रियते तेनैव समुदायकार्यं समाससंज्ञा भविष्यति । समासाच्च तद्विषयात् [५.३.१०६] इति ॥ इदं तर्हि । पुनाराजः पुनर्गवः । अत्राप्यवश्यं तत्पु-

---

सूत्रामध्यें प्राक्शब्द घातल्यामुळें प्रथमतः समाससंज्ञा होऊन नंतर मागून अव्ययीभावादिक संज्ञा होतात असा अर्थ होतो. तेव्हां अर्थातच संज्ञांचा समावेश होईल.[२]

पण अव्ययीभावादि संज्ञांप्रमाणें समाससंज्ञाही अनवकाशच आहे ना ?

तेव्हां समाससंज्ञेचें विधान केल्याचें जोरावर तीही होईलच.

समाससंज्ञा ही सावकाश आहे.

तो अवकाश कोणता ?

विस्पष्टादिशब्द अवकाश होय; जसें— विस्पष्टं पटुः विस्पष्टपटुः, व्यक्तं पटुः व्यक्तपटुः,[३] वगैरे.

हा अवकाश नाहीं. कारण पाणिनीची अशी पद्धत दिसते की ज्या लक्षणानें अवयवासंबंधीं कार्य होतें त्याच लक्षणानें समुदायासंबंधींही कार्य होतें. म्हणजे विस्पष्टपटुः इत्यादि स्थलीं पूर्वपदभूत विस्पष्टादि शब्दांना पूर्वपदप्रकृतिस्वर ज्या अर्थी— 'विस्पष्टादीनि गुणवचनेषु' (६।२।२४) या सूत्रानें केला जात आहे त्या अर्थी त्याच सूत्राच्या जोरावर येथें सुबन्तसमुदायाचा समासही होईल.[४]

तर मग काकतालीयम्, अजाकृपाणीयम्, हें समाससंज्ञेचें प्रयोजन समजावें.[५]

हेंही प्रयोजन नाहीं. येथेंही 'समासाच्च तद्विषयात्' (५।३।१०६) ह्या सूत्रानें अवयवकार्य अशा छप्रत्ययाची उत्पत्ति केली जात आहे; त्यानेंच समुदायकार्य म्हणजे समाससंज्ञा होईल.[६]

तर मग पुनाराजः, पुनर्गवः, हें समास-

---

२. प्राक्शब्दाची आवृत्ति करून कडारशब्दापर्यंत प्राक् समासः हीं दोन पदें चालू आहेत असा अर्थ करावा. त्यामुळें प्रथम समाससंज्ञा होते व ती समाससंज्ञा झाल्यावर अव्ययीभावादि संज्ञा होतात असा अर्थ झाल्यामुळें संज्ञांचा समावेश फलित होतो.

३. येथें विस्पष्ट वगैरे पटुत्वाचें विशेषण आहे; पटु याचें नव्हे. तेव्हां सामानाधिकरण्य नसल्यामुळें कर्मधारय (२।१।५७,१।२।४२) होत नाहीं; तर 'सह सुपा' (२।१।४) यानें केवळ समाससंज्ञा प्रवृत्त होते.

४. विस्पष्टादीनि० (६।२।२४) या सूत्रानें गुणवाचक शब्द पुढें असतांना पूर्वपदभूत विस्पष्टादिकांना पूर्वपद प्रकृतिस्वर सांगितला आहे. तेथें विस्पष्टपटुः इत्यादिकांना समाससंज्ञा न झाली तर स्वरविधान अनुपपन्न होईल. त्यावरून विस्पष्टादिकांचा गुणवाचकांबरोबर समास होतो अशी कल्पना त्याच सूत्राच्या जोरावर होईल.

५. येथें वृत्तिविषय काक, ताल, हे शब्द काकावरील व तालावरील क्रियेचे दर्शक आहेत. तेव्हां काकागमनमिव, तालपतनमिव, असा इवार्थी काक, ताल, या शब्दांचा समास करावयाचा; पुढें 'समासाच्च तद्विषयात्' (५।३।१०६) या सूत्रानें इवार्थप्रतिपादक अशा समासाहून इवार्थी छप्रत्यय केल्यानें काकतालीयम् इत्यादि रूपें सिद्ध झालीं आहेत. पण इवार्थी समास कोणत्याही सूत्रानें सांगितलेला नाहीं. तेव्हां 'सह सुपा' यानेंच येथें समास केला पाहिजे.

६. येथेंही इवार्थी केलेल्या समासाहून छप्रत्ययाचें विधान ज्या अर्थी केलें आहे त्या अर्थी इवार्थी समास होतो असें त्याच्याच जोरावर मानतां येईल.

रुषसंज्ञा वक्तव्या तत्पुरुषाश्रयः समासान्तो यथा स्यात् ॥ इदं तर्हि । पुनराधेयम् । अत्राप्यवश्यं गतिसंज्ञा वक्तव्या गतिकारकोपपदात्कृत् [६.२.१३९] इत्येष स्वरो यथा स्यात् ॥ इदं तर्हि । पुनरुत्स्यूतं वासो देयम् । अत्राप्यवश्यं गतिसंज्ञा वक्तव्या गतिर्गतौ [८.१.७०] इति निघातो यथा स्यात् । यदि तन्नास्ति पुनश्चनसौ छन्दसीति । सति तस्मिंस्तेनैव सिद्धम् ॥ एवमप्येका संज्ञेति वचनान्नास्ति यौगपद्येन संभवः । पर्यायः प्रसज्येत । तस्मात्प्राग्वचनं कर्तव्यम् ॥

## सह सुपा ॥ २ । १ । ४ ॥

सहवचनं किमर्थम् ।

**सहवचनं पृथगसमासार्थम् ॥ १ ॥**

सहग्रहणं क्रियते सहभूतयोः समाससंज्ञा यथा स्यादेकैकस्य मा भूदिति । किं च स्यात् । यद्येकैकस्य समाससंज्ञा स्यादिह ऋक्पाद इति समासान्तः प्रसज्येत । इह च राजाश्व इति द्वौ स्वरौ स्याताम् ॥

---

संज्ञेचें प्रयोजन समजावें.

येथेंही तत्पुरुषसंज्ञेची प्राप्ति आहे अशी कल्पना अवश्य केलीच पाहिजे. कारण तत्पुरुषसंज्ञेवर अवलंबून असलेला टच्प्रत्यय व्हावा म्हणून.

तर मग पुनराधेयम् हें प्रयोजन समजावें.

येथेंही पुनःशब्दाला गतिसंज्ञा आहे असें अवश्य सांगितलेंच पाहिजे. कारण 'गतिकारकोपपदात्' (६।२।१३९) हा कृत्स्वर व्हावा म्हणून.

तर मग पुनरुत्स्यूतं वासो देयम् हें प्रयोजन समजावें.

येथेंही 'पुनश्चनसौ छन्दसि' (१।४।६०, वा.२) हें वचन नसेल तर कोणत्याही तऱ्हेनें पुनःशब्दाला गतिसंज्ञा अवश्य केलीच पाहिजे. कारण 'गतिर्गतौ' (८।१।७०) यानें पुनःशब्दाला निघात व्हावा म्हणून. आतां तें वचन असलें तर त्यानेंच येथें गतिसंज्ञा सिद्ध होत आहे.

अशा रीतीनें समाससंज्ञा अनवकाश होत आहे तरी देखील 'आकडारा०' (१।४।१) या नियमामुळें तिचा अव्ययीभावादि संज्ञांबरोबर यौगपद्यानें समावेश संभवत नाहीं. तेव्हां पर्यायानें एकदा समाससंज्ञाच होईल, आणि एकदा अव्ययीभावादि संज्ञाच होतील; म्हणून सूत्रामध्यें प्राक् हा शब्द संज्ञांचा समावेश होण्याकरितां घातलाच पाहिजे.

(सू.४) येथें सह हा शब्द घातला आहे तो कशाकरितां ?

(वा.१) दोघांना मिळूनच समाससंज्ञा व्हावी, प्रत्येकाला निरनिराळी न व्हावी, यासाठीं सहशब्द घातला आहे.

प्रत्येकाला वेगवेगळी समाससंज्ञा झाली तर काय दोष ?

ऋचः पादः ऋक्पादः येथें ऋच्शब्दापुढें 'ऋक्पूर०' (५।४।७४) यानें समासान्त अप्रत्यय प्रसक्त होईल. तसेंच राज्ञोऽश्वो राजाश्वः येथें 'समासस्य' (६।१।२२३) यानें प्रत्येक पदाला अन्तोदात्त होऊं लागेल.

पण सहग्रहण नसलें तरी प्रत्येकाला

---

७. कारण येथें कोणत्याही सूत्रानें तत्पुरुष वगैरे संज्ञा प्राप्त होत नाहींत.

८. ती तत्पुरुषसंज्ञा 'मयूरव्यंसकादयश्च' (२।१।७२) यानें करावी किंवा अव्ययप्रवृद्धादिभिः (२।२।१८ भा.वा.) यानें करावी.

९. तेव्हां कुगतिप्रादयः (२।२।१८) यानें तत्पुरुषसंज्ञा प्राप्त होत असल्यामुळें समाससंज्ञेला अवकाश आहे असें म्हणतां येत नाहीं.

१०. पुनः या शब्दाला गतिसंज्ञा नसली तरी व्यत्ययानें स्वर साधतां येईल. तेव्हां 'पुनश्चनसौ छन्दसि' हें वचन करावयास नको.

१. सुबन्त हें समर्थ सुबन्ताबरोबर समाससंज्ञक होतें; जसें– विस्पष्टपटुः, काकतालीयम्,

कथं च कृत्वैकैकस्य संज्ञा प्राप्नोति। प्रत्येकं वाक्यपरिसमाप्तिर्दृष्टेति। तद्यथा। वृद्धिगुणसंज्ञे प्रत्येकं भवतः। ननु चायमप्यस्ति दृष्टान्तः समुदाये वाक्यपरिसमाप्तिरिति। तद्यथा। गर्गाः शतं दण्डयन्तामिति। अर्थिनश्च राजानो हिरण्येन भवन्ति न च प्रत्येकं दण्डयन्ति। सत्येतस्मिन्दृष्टान्ते यदि तत्र प्रत्येकमित्युच्यत इहापि सहग्रहणं कर्तव्यम्। अथ तत्रान्तरेण प्रत्येकमिति वचनं प्रत्येकं गुणवृद्धिसंज्ञे भवत इहापि नार्थः सहग्रहणेन॥ एवं तर्हि सिद्धे सति यत्सहग्रहणं करोति तस्यैतत्प्रयोजनं योगाङ्गं यथा विज्ञायेत। सति च योगाङ्गे योगविभागः करिष्यते। सह सुप्समस्यते। केन सह। समर्थेन। अनुव्यचलत् अनुप्राविशत्। ततः सुपा। सुपा च सह सुप्समस्यते। अधिकारश्च लक्षणं च। यस्य समासस्यान्यल्लक्षणं नास्तीदं तस्य लक्षणं भविष्यति। पुनरुत्स्यूतं वासो देयम्। पुनर्निष्कृतो रथ इति॥

## इवेन विभक्त्यलोपः पूर्वपदप्रकृतिस्वरत्वं च ॥ २ ॥

इवेन सह समासो विभक्त्यलोपः

समाससंज्ञा कशी बरें प्राप्त होते ?

वाक्यानें सांगितलेल्या कार्याचा संबंध त्याच्या दरएक उद्देश्याला होतो असें दृष्टीस पडतें; जसें– वृद्धिसंज्ञा व गुणसंज्ञा ही उद्देश्यापैकीं प्रत्येक वर्णाला होते.

अहो पण असाही दृष्टान्त आहे– वाक्यानें सांगितलेल्या कार्याचा संबंध उद्देश्य म्हणून धरलेल्या समुदायाला होतो; जसें:--गर्ग नांवाच्या कुलांतील पुरुषांना शंभर रुपये दंड करावा असा हुकूम केला असतां जरी राजे लोक द्रव्यार्थी असतात तरी गर्गकुलांतील प्रत्येकाला शंभर रुपये दंड केला जात नाहीं, तर सगळ्यांना मिळून शंभर रुपये दंड केला जातो. हा दृष्टान्त डोळ्यांपुढें असतां गुणवृद्धिसंज्ञा अ, आ, वगैरे दरएकाला होण्याकरितां जर तेथें प्रत्येकम् असा शब्द घालण्यांत येईल तर येथेंही सहशब्द घालावा. आतां तेथें जर प्रत्येकम् हा शब्द घातल्यावांचूनच प्रत्येकाला गुणवृद्धिसंज्ञा होत आहेत तर येथें सहशब्द घालण्यांत कांहीं अर्थ नाहीं.

अशा रीतीनें सुबन्तसमुदायाला समाससंज्ञा सिद्ध झाली असतां ज्यापेक्षां सहशब्द घातला जात आहे त्याचें हें प्रयोजन आहे की सह हा एवढाच शब्द अष्टाध्यायींतील एक सूत्र आहे, असें समजलें जावें. तसें समजलें असतां योगविभाग करण्यांत येईल. म्हणजे 'सह सुपा' यांतील 'सह' एवढेंच निराळें सूत्र समजलें जाईल. तेथें सुप् या पदाची अनुवृत्ति असल्यामुळें सुबन्त हें दुसऱ्याबरोबर समाससंज्ञक होतें असा अर्थ होतो.

दुसऱ्या कोणाबरोबर ?

समर्थाबरोबरः उदा०– अनुव्यचलत्, अनुप्राविशत्. त्यानंतर सुपा हें दुसरें सूत्र होय. सुबन्ताबरोबर सुबन्त समाससंज्ञक होतें. 'सुपा' हें अधिकारसूत्र आणि विधिसूत्रहि आहे. ज्या समासाला दुसरें कोणतेंही सूत्र लागू पडत नाहीं त्याला हें सूत्र लागू करण्यांत येईल; जसें– पुनरुत्स्यूतं वासः, पुनर्निष्कृतो रथः.

(वा.२) इव या अव्ययाबरोबर सुबन्ताचा

२. येथें पूर्वी वि-शब्दाचा समर्थाबरोबर समास करून मागून अनुशब्दाचाही करावयाचा. समाससंज्ञा झाल्यानें 'न समासे' यानें प्रकृतिभावाचा निषेध झाल्यामुळें यणादेश होतो हें समाससंज्ञेचें फल होय. तसेंच अनुप्राविशत् येथें समासान्तोदात्तस्वर हें फल होय.

३. पुनरुत्स्यूतम् येथें प्रकृत 'सुपा' या योगविभागानें समाससंज्ञा होत असल्यामुळें पुनः-

पूर्वपदप्रकृतिस्वरत्वं च वक्तव्यम् । वाससी इव । कन्ये इव ॥

**अव्ययीभावः ॥ २ । १ । ५ ॥**

किमर्थं महती संज्ञा क्रियते । अन्वर्थसंज्ञा यथा विज्ञायेत । अनव्ययमव्ययं भवतीत्यव्ययीभावः । अव्ययीभावश्च समासोऽव्ययसंज्ञो भवतीत्येतन्न वक्तव्यं भवति ॥

**अव्ययं विभक्तिसमीपसमृद्धिव्यृद्ध्यर्थाभावात्ययासंप्रतिशब्दप्रादुर्भावपश्चाद्यथानुपूर्व्ययौगपद्यसादृश्यसंपत्तिसाकल्यान्तवचनेषु ॥ २ । १ । ६ ॥**

इह कस्मान्न भवति । सुमद्राः सुमगधाः । सपुत्रः सच्छात्त्र इति । समृद्धौ साकल्य इति च प्राप्नोति ॥ नैष दोषः । इह कश्चित्समासः पूर्वपदार्थप्रधानः कश्चिदुत्तरपदार्थप्रधानः कश्चिदन्यपदार्थप्रधानः कश्चिदुभयपदार्थप्रधानः । पूर्वपदार्थप्रधानोऽव्ययीभावः । उत्तरपदार्थप्रधानस्तत्पुरुषः । अन्यपदार्थप्रधानो बहुव्रीहिः। उभयपदार्थप्रधानो द्वन्द्वः। न चात्र

---

समास होतो, समासांतील विभक्तीचा लोप होत नाहीं, आणि पूर्वपदाला मूळचा स्वर कायम राहतो, असें वचन करावें; जसें-- वाससी इव, कन्ये इव.

(सू.५) अव्ययीभाव एवढी मोठी संज्ञा कशाकरितां केली आहे ?

अन्वर्थसंज्ञा (आपल्या अर्थाला साजेल अशी) समजली जावी. म्हणजे जो शब्द अव्यय नसून अव्ययासारखा तो अव्ययीभाव असा या शब्दाचा अर्थ आहे. तेव्हां अशा शब्दालाच अव्ययीभावसंज्ञा व्हावी म्हणून. त्यामुळें अव्ययीभाव समासाला अव्ययसंज्ञा सांगणारें 'अव्ययीभावश्च' (१।१।४१) हें सूत्र करावें लागणार नाहीं.

(सू.६) सुमद्राः, सुमगधाः, सपुत्रः, सच्छात्रः, येथें अव्ययीभाव समास कां बरें होत नाहीं ? समृद्धि व साकल्य या अर्थी अव्ययीभाव प्राप्त होत आहे.

हा दोष येत नाहीं. कारण कांहीं सामासिक शब्द असे असतात की ज्यांमध्यें पूर्वपदाच्या अर्थाला प्राधान्य असतें, कांहींमध्यें उत्तरपदाच्या अर्थाला प्राधान्य असतें, कांहींमध्यें अन्य पदार्थाला प्राधान्य असतें आणि कांहींमध्यें दोन्ही पदार्थांना प्राधान्य असतें. त्यांत पूर्वपदाच्या अर्थाला प्राधान्य असलेला अव्ययीभाव होय. उत्तरपदाच्या अर्थाला प्राधान्य असलेला तत्पुरुष होय. अन्य पदार्थाला प्राधान्य असलेला बहुव्रीहि होय आणि दोन्ही पदार्थांना प्राधान्य असलेला द्वंद्व होय. आतां सुमद्राः वगैरे उदाह-

---

शब्दाला गतिसंज्ञा सांगावयास नको. या समासाला अन्तोदात्तच होणें इष्ट आहे.

४. वासस्शब्द 'वस्तेर्णित्' (उणा. ४।२१७) या सूत्रानें असुन्प्रत्यय केल्यामुळें 'ञ्नित्यादिः' (६।१।१९७) यानें आद्युदात्त आहे. कन्याशब्द 'तिल्यशिक्य०' (फिट्. ४।९) या सूत्रानें अन्तस्वरित आहे. समासामुळें अन्तोदात्त (६।१।२२३) न होतां पूर्वपदाचाच स्वर कायम राहिला आहे.

१. हा अधिकार आहे. येथून पुढें जे समास सांगितले जातील ते अव्ययीभावसंज्ञक समजावेत; जसें-- अधिहरि, अपदिशम्, यथावृद्धम्.

१. विभक्ति, समीप, समृद्धि, व्यृद्धि, अर्थाभाव, अत्यय, असंप्रति, शब्दप्रादुर्भाव, पश्चात्, यथा, आनुपूर्व्य, यौगपद्य, सादृश्य, संपत्ति, साकल्य आणि अन्त या अर्थांना दाखविणारें जें अव्यय तें समर्थसुबन्ताबरोबर समाससंज्ञक होतें व तो समास अव्ययीभावसंज्ञक होतो; जसें-- अधिहरि, निर्मक्षिकम्, सतृणम्, साग्नि.

२. सुमद्राः, सुमगधाः, या सामासिक शब्दांपासून समृद्धि या अर्थाची प्रतीति होत आहे. तसेंच सपुत्रः, सच्छात्रः, या शब्दांपासून साकल्य या अर्थाची प्रतीति होत आहे.

पूर्वपदार्थप्राधान्यं गम्यते ॥ अथवा नेमे समासार्था निर्दिश्यन्ते । किं तर्हि । अव्ययार्था निर्दिश्यन्त इमे । एतेष्वर्थेषु यदव्ययं वर्तते तत्सुबन्तेन सह समस्यत इति॥

यथासादृश्ये[1] ॥ २ । १ । ७ ॥

असादृश्य इति किमर्थम् । यथा देवदत्तस्तथा यज्ञदत्त इति ॥ असादृश्य इत्युच्यते तत्रेदं न सिध्यति । यथाशक्ति यथाबलमिति । किं कारणम् । यथेत्ययं प्रकारवचने थाल् स च सादृश्ये वर्तते ॥ नैष दोषः । अयं यथाशब्दोऽस्त्येवाव्युत्पन्नं प्रातिपदिकं वीप्सावाची । अस्ति प्रकारवचने थाल् । तद्यदव्युत्पन्नं प्रातिपदिकं वीप्सावाचि तस्येदं ग्रहणम् ॥ अथ यः प्रकारवचने थाल् तस्य ग्रहणं कस्मान्न भवति । पूर्वेण प्राप्नोति सादृश्यसंपत्तीति । प्रतिषेधवचनसामर्थ्यान्न भविष्यति ॥

[यावदवधारणे[1] ॥ २ । १ । ८ ॥]

सुप्प्रतिना मात्रार्थे[1] ॥ २ । १ । ९ ॥

---

रणांमध्यें तर पूर्वपदाच्या अर्थाला प्राधान्य दिसत नाहीं. सुमद्राः इत्यादि पूर्वोक्त स्थलीं अव्ययीभावसंज्ञा प्रवृत्त होत नाहीं.

किंवा विभक्ति, समीप, वगैरे हे समासार्थाचे निर्देश नव्हेत; म्हणजे या अर्थीं अव्ययाचा सुबन्ताशीं समास होतो असें समजूं नये.

तर हे कोणाच्या अर्थांचे निर्देश आहेत ?

अव्ययाच्या अर्थांचे हे निर्देश केले जात आहेत. म्हणजे विभक्ति, समीप, वगैरे अर्थीं विद्यमान जें अव्यय तें सुबन्तावरोबर समाससंज्ञक होतें.

(सू.७) येथें असादृश्ये असें म्हटलें आहे तें कशाकरितां ?

यथा देवदत्तस्तथा यज्ञदत्तः येथें सादृश्य या अर्थाला दाखविणाऱ्या यथाशब्दाचा समास न व्हावा म्हणून.

असादृश्ये असें म्हटलें आहे तेव्हां यथाशक्ति, यथाबलम्, हा समास साधत नाहीं.

काय कारण ?

कारण असें की प्रकारवचने थाल् (५।३।२३) या सूत्रानें थाल्प्रत्यय करून यथाशब्द बनविला आहे. तेव्हां तो यथाशब्द सादृश्य या अर्थाला दाखवीत आहे.

हा दोष येत नाहीं. कारण वीप्सा, योग्यता, वगैरे अर्थांना दाखविणारा अव्युत्पन्न असा प्रातिपदिकसंज्ञक एक स्वतंत्र यथाशब्द आहे, व प्रकारार्थीं थाल्प्रत्यय लागून बनलेला असा एक आहे. त्यांपैकीं प्रकृत सूत्रामध्यें जो अव्युत्पन्न वीप्सा वगैरे अर्थांचा यथाशब्द त्याचेंच ग्रहण केलें आहे.

पण प्रकारार्थीं थाल्प्रत्यय लागून बनलेल्या यथाशब्दाचें ह्या सूत्रामध्यें ग्रहण कां बरें होत नाहीं ?

पूर्वसूत्रामध्यें सादृश्य, संपत्ति, या अर्थांना दाखविणाऱ्या अव्ययाचा समास सांगितला असल्यामुळें सादृश्य या अर्थीं यथाशब्दाचा समास पूर्वसूत्रानेंच प्राप्त होत आहे, आणि येथें तर उलट त्या अर्थाचा निषेध केला आहे. तेव्हां थाल्प्रत्यय केलेल्या यथाशब्दाचें येथें ग्रहण करतां येत नाहीं.

(सू.९) सुप् या शब्दाची अनुवृत्ति येत असतां पुनः येथें सुप्शब्द कशाकरितां घातला होतो; जसें– यावन्तः श्लोकास्तावन्तोऽच्युतप्रणामा इति यावच्छ्लोकम्.

---

१. यथा या अव्ययाचा अव्ययीभावसमास करणें झाल्यास सादृश्यव्यतिरिक्त वीप्सा वगैरे अर्थांना दाखविणाऱ्याच यथाशब्दाचा अव्ययीभाव समास होतो; जसें– यथाशक्ति, यथाबलम्.

१. अवधारण या अर्थाला दाखविणाऱ्या यावत् या अव्ययाचा सुबन्ताबरोबर अव्ययीभाव समास होतो; जसें– यावन्तः श्लोकास्तावन्तोऽच्युतप्रणामा इति यावच्छ्लोकम्.

१. मात्रा म्हणजे अल्प या अर्थाला दाखविणाऱ्या प्रति या अव्ययाबरोबर सुबन्ताचा अव्ययीभाव समास होतो; जसें– शाकस्य लेशः शाकप्रति.

सुबिति वर्तमाने पुनः सुब्ग्रहणं किमर्थम् । अव्ययमित्येवं तद्भूत्सूब्मात्रे यथा स्यात् । माषप्रति सूपप्रति ओदनप्रति ॥

**अक्षशलाकासंख्याः[1] परिणा ॥ २ । १ । १० ॥**

**अक्षादयस्तृतीयान्ताः पूर्वोक्तस्य यथा न तत् ।**

अक्षादयस्तृतीयान्ताः परिणा सह समस्यन्त इति वक्तव्यम् । पूर्वोक्तस्य यथा न तत् । अयथाजातीयके द्योत्ये । अक्षेणेदं न तथा वृत्तं यथा पूर्वमिति । अक्षपरि शलाकापरि ॥

**एकत्वेऽक्षशलाकयोः**

अक्षशलाकयोश्चैकवचनान्तयोरिति वक्तव्यम् । इह मा भूत् । अक्षाभ्यां वृत्तम् अक्षैर्वृत्तम् ॥

**कितवव्यवहारे च ॥ १ ॥**

कितवव्यवहार इति वक्तव्यम् । इह मा भूत् । अक्षेणेदं न तथा वृत्तं शकटेन यथा पूर्वमिति ॥

**अक्षादयस्तृतीयान्ताः पूर्वोक्तस्य यथा न तत् ।**

**कितवव्यवहारे च एकत्वेऽक्षशलाकयोः ॥ १ ॥**

**विभाषापपरिबहिरञ्चवः पञ्चम्या ॥ २ । १ । ११-१२ ॥**

योगविभागः कर्तव्यः । विभाषेत्ययमधिकारः । ततोऽपपरिबहिरञ्चवः पञ्चम्येति ॥ पञ्चमीग्रहणं शक्यम-

---

आहे ?

अनुवृत्त होणारा सुप्शब्द अव्ययाबरोबर अन्वित झाला असल्यामुळें अव्ययसंज्ञक जे सुबन्त या अर्थाला दाखविणारा तो सुप्शब्द झाला आहे, आणि येथें तर मोघम सुबन्त या अर्थाचा सुप्शब्द पाहिजे; जसें– माषप्रति, सूपप्रति, ओदनप्रति.

(सू.१०) ज्यांच्यापुढें तृतीयाविभक्ति केली आहे अशा अक्षादिशब्दांचा परिशब्दाबरोबर समास होतो. पूर्वी घडलेल्या जयाच्या वेळीं अक्षादिकांची जी स्थिति होती तिच्या उलट पराजयाच्या वेळेची स्थिति परिशब्द दाखवीत असेल तर असें वचन करावें; जसें– अक्षेणेदं तथा न वृत्तं यथा पूर्वम् इति अक्षपरि[2]; शलाकापरि.

ज्यांच्यापुढें तृतीयेचें एकवचन केलें आहे अशाच अक्ष व शलाका या शब्दांचा परिशब्दाबरोबर अव्ययीभाव समास होतो असें वचन करावें. कारण अक्षाभ्यां वृत्तम् अक्षैर्वृत्तम् येथें अव्ययीभाव न झाला पाहिजे.

द्यूतकारांचा व्यवहार दाखविणें असेल तरच हा अव्ययीभाव समास होतो असें वचन करावें. अक्षेणेदं न तथा वृत्तं शकटेन यथा पूर्वम् येथें समास न व्हावा म्हणून.

(सू.११-१२) विभाषा[1] येवढेंच एक निराळें सूत्र करावें व तें अधिकारसूत्र समजावें. त्याचे पुढें 'अपपरिबहिरञ्चवः पञ्चम्या' असें दुसरें सूत्र होय.

येथें पंचम्या हा शब्द घातला नाहीं तरी चालेल.

---

१. अक्ष, शलाका आणि संख्यावाचक या शब्दांचा परि या अव्ययाबरोबर अव्ययीभावसमास होतो; जसें– अक्षेण विपरीतं वृत्तम् अक्षपरि, शलाकापरि, एकपरि.

२. पूर्वीच्यापेक्षां हल्लींच्या डावांत एक फासा उलटा पडल्यामुळें डाव बुडाला असा याचा अर्थ आहे.

१. विभाषा हा अधिकार आहे. येथून पुढें सांगितले जाणारे समास वैकल्पिक समजावेत.

१. अप, परि, बहिस् आणि अञ्चु हे सुबन्त शब्द पञ्चम्यन्ताबरोबर विकल्पानें अव्ययीभावसंज्ञक होतात; जसें– अपत्रिगर्तं वृष्टो देवः, अपत्रिगर्तेभ्यः, वगैरे.

कर्तुम् । कथम् । सुबन्तेनेति वर्तत एतैश्च कर्मप्रवचनीयैर्योगे पञ्चमी विधीयते । तत्रान्तरेणापि पञ्चमीग्रहणं पञ्चम्यन्तेनैव समासो भविष्यति ॥ इदं तर्हि प्रयोजनम् । बहिःशब्देन योगे पञ्चमी न विधीयते तत्रापि यथा स्यात् । बहिर्ग्रामम् बहिर्ग्रामात् ॥ अथ क्रियमाणेऽपि पञ्चमीग्रहणे यावता बहिः-शब्देन योगे पञ्चमी न विधीयते कथमेवैतत्सिध्यति । पञ्चमीग्रहणसामर्थ्यात् ॥

**आङ्मर्यादाभिविध्योः ॥२।१।१३॥**[1]

मर्यादाभिविधिग्रहणं शक्यमकर्तुम् । कथम् । पञ्चम्यन्तेनेति वर्तत आङ्‌च कर्मप्रवचनीययुक्ते पञ्चमी विधीयत एतयोश्चैवार्थयोराङ्कर्मप्रवचनीयसंज्ञो भवति नान्यत्र ॥

**[लक्षणेनाभिप्रती आभिमुख्ये ॥ २ । १ । १४ ॥**[1]

**अनुर्यत्समया ॥ २ । १ । १५ ॥]**[1]

**यस्य चायामः ॥ २ । १ । १६ ॥**[1]

किमुदाहरणम् । अनुगङ्गं हास्तिनपुरम् । अनुगङ्गं वाराणसी । अनुशोणं

---

कसा बरें ?

सुबन्तेन या शब्दाची अनुवृत्ति चालू आहे, आणि कर्मप्रवचनीयसंज्ञक अप वगैरे शब्दांचा योग असतां पंचमीचें विधान केलें आहे (२।३।१०,२९); तेव्हां पंचमीशब्द सूत्रांत घातल्यावांचूनही पंचम्यन्ताबरोबरच अप, परि, वगैरेंचा समास होईल.

तर मग पञ्चम्या हा शब्द सूत्रांत घालण्याचें कारण असें की बहिस्‌शब्दाचा योग असतां पंचमीचें विधान केलेलें नाहीं. तेव्हां तेथेंही पंचम्यन्ताबरोबरच समास व्हावा; जसें– बहिर्ग्रामं, बहिर्ग्रामात्.

पण पञ्चम्या हा शब्द सूत्रामध्यें घातला तरी देखील जर बहिस्‌शब्दाचा योग असतां पंचमी सांगितलीच नाहीं तर कसा बरें बहिस्‌शब्दाचा पंचम्यन्ताशीं समास घडून येतो ? पंचम्यन्ताबरोबर बहिस्‌शब्दाचा समास सांगणें अनुपपन्न होत असल्यामुळें त्याच्याच जोरावर बहिस्‌शब्दाचा योग असतांना पंचमी होते.

(सू.१३) येथें मर्यादाभिविध्योः असें म्हटलें नाहीं तरी चालेल.

तें कसें ?

पञ्चम्या हें पद येथें अनुवृत्त आहे व कर्मप्रवचनीयसंज्ञक आङ्‌शब्दाचा योग असतांना 'पञ्चम्यपाङ्०' (२।३।१०) यानें पंचमी विहित आहे; आणि मर्यादा व अभिविधि याच अर्थी आङ्‌शब्द कर्मप्रवचनीयसंज्ञक होतो, एतद्भिन्न अर्थी होत नाहीं.

(सू.१६) या सूत्राचें उदाहरण काय ?

अनुगङ्गं हास्तिनपुरम्, अनुगङ्गं वाराणसी, अनुशोणं पाटलिपुत्रम्.

---

[1] १. मर्यादा किंवा अभिविधि या अर्थाला दाखविणाऱ्या आङ् या अव्ययाचा पञ्चम्यन्ताबरोबर विकल्पानें अव्ययीभावसमास होतो; जसें– आमुक्ति आमुक्तेः संसारः, आबालम् आबालेभ्यः.

[1] १. आभिमुख्य या अर्थाला दाखविणाऱ्या अभि आणि प्रति या अव्ययांचा सुबन्ताबरोबर विकल्पानें अव्ययीभावसमास होतो. ज्याचें आभिमुख्य दाखवावयाचें असेल तो त्या सुबन्ताचा अर्थ असला पाहिजे; जसें– अभ्यग्नि, अग्निमभि, प्रत्यग्नि, अग्निं प्रति, शलभाः पतन्ति.

[1] १. ज्या पदार्थाचें सामीप्य अनु या शब्दानें दाखविलें असेल त्या अर्थाच्या सुबन्ताबरोबर त्या अनु या अव्ययाचा विकल्पानें अव्ययीभाव समास होतो; जसें– अनुवनमशनिर्गतः.

[1] १. ज्याचें दैर्घ्य अनु या शब्दानें दाखविलें असेल त्या अर्थाच्या सुबन्ताबरोबर त्या अनु या अव्ययाचा विकल्पानें अव्ययीभाव समास होतो; जसें– अनुगङ्गं वाराणसी; गङ्गाया अनु. गंगेच्या लांबीइतकी वाराणसीक्षेत्राची लांबी आहे असा याचा अर्थ आहे.

पाटलिपुत्रम् ॥ यस्य चायाम इत्युच्यते गङ्गा चाप्यायता वाराणस्यप्यायता तत्र कुत एतद्गङ्गया सह समासो भविष्यति न पुनर्वाराणस्येति । एवं तर्हि लक्षणेनेति वर्तते गङ्गा चैव हि लक्षणं न वाराणसी ॥ अथवा यस्य चायाम इत्युच्यते गङ्गा चाप्यायता वाराणस्यप्यायता तत्र प्रकर्षगतिर्विज्ञास्यते साधीयो यस्यायाम इति । साधीयश्च गङ्गाया न वाराणस्याः ॥

## तिष्ठद्गुप्रभृतीनि च ॥ २ । १ । १७ ॥

किमर्थश्चकारः । एवकारार्थः । तिष्ठद्गुप्रभृतीन्येव । क मा भूत् । परमं तिष्ठद्गु ॥

### तिष्ठद्गु कालविशेषे ॥ १ ॥

तिष्ठद्गु कालविशेष इति वक्तव्यम् । तिष्ठन्ति गावोऽस्मिन्काले तिष्ठद्गु । वहद्गु ॥

### खलेयवादीनि प्रथमान्तान्यन्यपदार्थे ॥ २ ॥

खलेयवादीनि प्रथमान्तान्यन्यपदार्थे

---

ज्याचें दैर्घ्य दाखविलें जातें असें म्हटलें आहे, त्यांत गंगाही दीर्घ आहे, आणि वाराणसीही दीर्घ आहे. तेव्हां गंगाशब्दाबरोबर समास होईल आणि वाराणसीशब्दाबरोबर मात्र होणार नाहीं हें कशावरून ?

असें आहे तर लक्षणेन या शब्दाची येथें अनुवृत्ति येत आहे; व दैर्घ्यविशिष्ट गंगा आणि वाराणसी या उभयतांमध्यें गंगा हीच लक्षण आहे; वाराणसी ही लक्षण नाहीं.

अथवा ज्याचें दैर्घ्य दाखविलें जातें असें म्हटलें आहे, त्यांत गंगाही दीर्घ आहे व वाराणसीही दीर्घ आहे. तेथें प्रकर्षगति समजली जाईल. म्हणजे सर्वलोकप्रसिद्ध आहे दैर्घ्य ज्याचें त्या अर्थाच्या शब्दाबरोबर समास होतो तें दैर्घ्य गंगेचेंच सर्व लोक प्रसिद्ध आहे; वाराणसीचें नाहीं.

(सू.१७) सूत्रामध्यें चशब्द घातला त्याचा अर्थ काय समजावयाचा ?

एवकाराचा जो अर्थ तो येथील चकाराचा अर्थ होय. म्हणजे तिष्ठद्गु वगैरे हेच शब्द सामासिक तयार होतात.

या शब्दाबरोबर दुसरे कोणते शब्द तयार होत नाहींत ?

परमं तिष्ठद्गु येथें तिष्ठद्गु या शब्दाबरोबर परम वगैरे शब्दांचा समास होत नाहीं.

(वा. १) विशेष प्रकारचा काल या अर्थी तिष्ठद्गु, वहद्गु, वगैरे अव्ययीभाव समास होतात, असें वचन करावें; जसें– तिष्ठन्ति गावोऽस्मिन् काले स तिष्ठद्गु, वहद्गु.

(वा.२) खलेयव, खलेबुस, वगैरे शब्द अन्यपदार्थी अव्ययीभावसंज्ञक होतात, व त्यांच्यापुढें प्रथमाविभक्तिच होते, असें वचन

---

२. गंगेच्या दैर्घ्यावरून वाराणसीचें दैर्घ्य ओळखलें जातें असें अनु हें अव्यय दाखवितें. तेव्हां दोघांच्याही दैर्घ्यांचा अनु हा द्योतक आहे असें मानतां येतें.

३. ज्याच्या दैर्घ्यावरून दुसऱ्याचें दैर्घ्य ओळखतें तें लक्षण होय, व त्याच्याशींच समास होतो.

४. वाराणसीच्या दैर्घ्यावरून गंगेचें दैर्घ्य ओळखावयाचें अशी विवक्षा असेल तर वाराणसीलाच लक्षण म्हणतां येईल व समासही होईल.

१. तिष्ठद्गु, आयतीगवम्, वगैरे सर्व शब्दस्वरूपांचें निपातन केलें आहे, म्हणजे या शब्दांमध्यें जें एखादें कार्य दुसऱ्या कोणत्याही सूत्रानें प्राप्त होत नसेल तें निपातनानें केलें आहे. तिष्ठद्गु वगैरे शब्द अव्ययीभावसंज्ञक होतात; जसें– तिष्ठद्गु, आयतीगवम्, खलेबुसम्, वगैरे.

२. ज्या वेळेला गायी उभ्या असतात अशी वेळ. अर्थात् धार काढण्याची वेळ.

समस्यन्ते । खलेयवम् खलेबुसम् लूनयवम् लूयमानयवम् पूनयवम् पूयमानयवम् ॥

**पारे मध्ये षष्ठ्या वा॥ २।१।१८॥**

वावचनं किमर्थम् । विभाषा समासो यथा स्यात्समासेन मुक्ते वाक्यमपि यथा स्यात् । पारं गङ्गाया इति । नैतदस्ति प्रयोजनम् । प्रकृता महाविभाषा तया वाक्यमपि भविष्यति ॥ इदं तर्हि प्रयोजनमव्ययीभावेन मुक्ते षष्ठीसमासो यथा स्यात् । गङ्गापारमिति । एतदपि नास्ति प्रयोजनम् अयमपि विभाषा षष्ठीसमासोऽपि तावुभौ वचनाद्भविष्यतः ॥ अत उत्तरं पठति ।

**पारे मध्ये षष्ठ्या वावचनम् ॥ १ ॥**

पारे मध्ये षष्ठ्या वेति वक्तव्यम् ॥

**अवचने हि षष्ठीसमासाभावो यथैकदेशिप्रधाने ॥ २ ॥**

अक्रियमाणे हि वावचने षष्ठीसमासस्याभावः स्याद्यथैकदेशिप्रधाने । तद्यथा । एकदेशिसमासेन मुक्ते षष्ठीसमासो न भवति । किं पुनः कारणमेकदेशिसमासेन मुक्ते षष्ठीसमासो न भवति । समासतद्धितानां वृत्तिर्विभाषा वृत्तिविषये नित्योऽपवादः । इह पुनर्वावचने क्रियमाण एकया वृत्तिर्विभाषापरया वृत्तिविषये विभाषापवादः ॥

**एकारान्तनिपातनं च ॥ ३ ॥**

एकारान्तनिपातनं च कर्तव्यम् ।

---

करावें; जसें— खले यवा यस्य तत्खलेयवम्, खलेबुसम्, लूनयवम्, पूनयवम्, पूयमानयवम्.

(सू.१८) येथें वाशब्द घातला आहे तो कशाकरितां ?

विकल्पानें समास व्हावा व जेव्हां समास नाहीं तेव्हां वाक्यही रहावें म्हणून सूत्रामध्यें वाशब्द घातला आहे; जसें— पारं गङ्गायाः.

हें प्रयोजन येत नाहीं. कारण महाविभाषाधिकार चालू असल्यामुळें वाक्यही होईल.

तर मग वाशब्दाचें हें प्रयोजन समजावें कीं अव्ययीभाव समास केला नाहीं त्या वेळीं षष्ठीतत्पुरुष व्हावा; जसें— गङ्गापारम्.

हेंही प्रयोजन नाहीं. कारण अव्ययीभावही वैकल्पिक आहे आणि षष्ठीतत्पुरुषही वैकल्पिक आहे; तेव्हां ते दोन्ही समास होऊन वाक्यही होईल.

यानंतर वार्तिककार म्हणतात—

(वा.१) 'पारे मध्ये षष्ठ्या' या सूत्रामध्यें वाशब्द घातला पाहिजे.

(वा.२) न घातला तर षष्ठीतत्पुरुष होणार नाहीं; जसें— पूर्वकायः इत्यादि एकदेशिसमास (२।२।१) केला नाहीं त्या वेळीं तेथें षष्ठीतत्पुरुष होत नाहीं.

पण एकदेशिसमास केला नाहीं त्या वेळीं तेथें षष्ठीसमास होत नाहीं, याचें काय बरें कारण ?

समाससंज्ञा किंवा तद्धितप्रत्यय करतांना अवश्य लागणारी जी एकार्थीभावरूप वृत्ति तिचा विकल्प महाविभाषेनें केला आहे, आणि येथील वाशब्दानें वृत्ति करावयाची त्या वेळींच अव्ययीभाव हा उत्सर्गाचा म्ह. षष्ठीतत्पुरुषाचा विकल्पानें बाधक होतो.

(वा.३) पार व मध्य या शब्दांना एकारान्त आदेशाचें निपातनही करावें; जसें— पारेगङ्गम्,

---

१. ज्या शेतांत खळ्यावरच यव अजून आहेत, फक्त भूस उरलें आहे, यव काढून नेले आहेत, यव विनष्ट झाले आहेत व विनाश पावत आहेत असा क्रमानें अर्थ आहे.

१. पार व मध्य या शब्दांचा षष्ठ्यन्ताबरोबर विकल्पानें अव्ययीभाव समास होतो आणि त्याबरोबरच पार व मध्य या शब्दांना एकार अन्तादेश होतो; जसें— पारेगङ्गम्, मध्येगङ्गम्.

पारेगङ्गमिति । न कर्तव्यम् । सप्तम्या अलुका सिद्धम् । भवेत्सिद्धं यदा सप्तमी यदा त्वन्या विभक्तयस्तदा न सिध्यति ॥

**[संख्या वंश्येन ॥ २ । १ । १९ ॥]**

**नदीभिश्च ॥ २ । १ । २० ॥**

**नदीभिः संख्यासमासेऽन्यपदार्थे प्रतिषेधः ॥ १ ॥**

नदीभिः संख्यासमासेऽन्यपदार्थे प्रतिषेधो वक्तव्यः । द्वीरावतीको देशः । त्रीरावतीको देशः । नदीभिः संख्येति प्राप्नोति ॥ न वक्तव्यः । इह कश्चित्समासः पूर्वपदार्थप्रधानः कश्चिदुत्तरपदार्थप्रधानः कश्चिदन्यपदार्थप्रधानः कश्चिदुभयपदार्थप्रधानः । पूर्वपदार्थप्रधानोऽव्ययीभावः । उत्तरपदार्थप्रधानस्तत्पुरुषः । अन्यपदार्थप्रधानो बहुव्रीहिः । उभयपदार्थप्रधानो द्वन्द्वः । न चात्र पूर्वपदार्थप्राधान्यं गम्यते ॥ ननु च यद्येनोच्यते स तस्यार्थो भवति । अत्र च वयमेताभ्यां पदाभ्यामेतमर्थमुच्यमानं पश्यामः ॥ एतदेव न जानीमो यद्येनोच्यते स तस्यार्थ इति ।

---

मध्येगङ्गम्.

एकारान्तादेशाचें निपातन करावयास नको. कारण 'तत्पुरुषे०' (६।३।१४) येथील बहुलग्रहणानें सप्तमीचा अलुक् केला असतां पारेगङ्गम् वगैरे उदाहरणें साधत आहेत.

पण जेव्हां पार किंवा मध्य या शब्दांच्या पुढें सप्तमी करून समास केला असेल तेव्हां अलुक् केल्यानें काम भागेल. पण जेव्हां सप्तमीवांचून अन्य विभक्ति केली असेल तेव्हां पारेगङ्गम् इत्यादि रूप साधत नाहीं म्हणून एकारान्तादेशाचें निपातन केलें पाहिजे.

(सू.२०, वा.१) संख्याशब्दाचा नदीवाचकाबरोबर अन्यपदार्थी अव्ययीभाव समास होत नाहीं, असा प्रतिषेध करावा; जसें— द्वीरावतीको देशः, त्रीरावतीको देशः. येथें नदी व संख्या असल्यानें प्रकृत सूत्रानें अव्ययीभाव समास प्राप्त होत आहे, व तो बहुव्रीहीचा बाध करील.

प्रतिषेध करावयास नको. कारण कांहीं सामासिक शब्द असे असतात की ज्यांमध्यें पूर्वपदाच्या अर्थाला प्राधान्य असतें, कांहींमध्यें उत्तरपदाच्या अर्थाला प्राधान्य असतें, कांहींमध्यें अन्यपदार्थाला प्राधान्य असतें, आणि कांहींमध्यें दोन्ही पदार्थांना प्राधान्य असतें. त्यांत पूर्वपदाच्या अर्थाला प्राधान्य असलेला अव्ययीभाव होय, उत्तरपदाच्या अर्थाला प्राधान्य असलेला तत्पुरुष होय, अन्यपदार्थाला प्राधान्य असलेला बहुव्रीहि होय आणि दोन्ही पदांच्या अर्थाला प्राधान्य असलेला द्वंद्व होय. आतां द्वीरावतीकः येथें तर पूर्वपदाच्या अर्थाला प्राधान्य दिसत नाहीं. तेव्हां तेथें अव्ययीभाव समास होत नाहीं.

पण जो अर्थ ज्या शब्दानें दाखविला जातो तो त्या शब्दाचा अर्थ समजला तर द्वि आणि इरावती या दोन शब्दांनीं देश हा अर्थ दाखविला जात आहे असें आम्ही समजतों.

जो अर्थ ज्यानें दाखविला तो त्याचा. येथें जो अर्थ अशी युक्ति लढवून पूर्वपदाच्या

---

१. विद्यावंशामध्यें किंवा जन्मवंशामध्यें झालेले जे पुरुष ते वंश्य होत. त्या वंश्य या अर्थाला दाखविणाऱ्या सुबन्ताबरोबर संख्यावाचक शब्दांचा विकल्पेंकरून अव्ययीभावसमास होतो; जसें— द्वौ मुनी वंश्यौ द्विमुनि, त्रिमुनि व्याकरणस्य.

१. नदीवाचक सुबन्ताबरोबर संख्यावाचक शब्दाचा विकल्पानें अव्ययीभाव समास होतो; जसें-सप्तगङ्गम्, द्वियमुनम्.

२. तेव्हां तो त्या दोन शब्दांचाच अर्थ असल्यामुळें पूर्वपदाच्या अर्थाला प्राधान्य नाहीं असें म्हणतां येत नाहीं.

अपि चान्यपदार्थता न प्रकल्पेत । चित्रगुः शबलगुरिति । किं कारणम् । अत्रापि हि वयमेताभ्यां शब्दाभ्यामेतमर्थमुच्यमानं पश्यामः ॥ यद्यप्यत्रैताभ्यां शब्दाभ्यामेषोऽर्थ उच्यतेऽन्यपदार्थोऽपि तु गम्यते । तत्रान्यपदार्थाश्रयो बहुव्रीहिर्भविष्यति ॥ इहापि तर्हि यद्यप्यन्यपदार्थो गम्यते स्वपदार्थोऽपि तु गम्यते तत्र स्वपदार्थाश्रयोऽव्ययीभावः प्राप्नोति ॥ एवं तर्हीदमिह संप्रधार्यम् । अव्ययीभावः क्रियतां बहुव्रीहिरिति । बहुव्रीहिर्भविष्यति विप्रतिषेधेन । भवेदेकसंज्ञाधिकारे सिद्धं परंकार्यत्वे तु न सिध्यति । आरम्भसामर्थ्यादव्ययीभावः प्राप्नोति परंकार्यत्वाच्च बहुव्रीहिः ॥ परंकार्यत्वे च न दोषः । नदीभिः संख्यायाः समाहारेऽव्ययीभावो वक्तव्यः । स चावश्यं वक्तव्यः । 'सर्वमेकनदीतरे' ॥

## [अन्यपदार्थे च संज्ञायाम् ॥ २।१।२१ ॥]

अर्थाला प्राधान्य भासविण्याचा प्रयत्न केला आहे तो आम्हांला मुळींच पटत नाहीं. शिवाय चित्रगुः, शबलगुः, वगैरे स्थलीं अन्यपदार्थप्राधान्याचें नांवही तोंडांतून काढतां येणार नाहीं.

काय कारण ?

चित्रगुः येथेंही चित्र व गो या दोन पदांनीं गोप हा अन्य पदार्थ दाखविला गेला आहे असें आम्हांला म्हणतां येतें.

चित्रगुः इत्यादि स्थलीं जरी चित्र व गो या दोन पदांनीं आपआपला अर्थ दाखविला जात आहे तरी देखील तेथें गोप हा अन्य पदार्थही कळून येत आहे. तेव्हां तो अन्य पदार्थ तेथें असल्यामुळें बहुव्रीहि होईल.

तर मग त्याप्रमाणेंच द्वीरावतीको देशः येथेंही जरी देश हा अन्य पदार्थ म्हणून कळून येत आहे तरी देखील त्या दोन पदांपासून आपआपला अर्थही कळून येत आहे. तेव्हां तेथें तो पूर्वपदार्थ आहे असें समजून अव्ययीभावही होईलच.

असें आहे तर मग आतां येथें असा विचार उत्पन्न होतो की— द्वीरावतीकः येथें प्रकृत सूत्रानें अव्ययीभाव करावा किंवा 'अनेकमन्य०'((२।२।२४) यानें बहुव्रीहि करावा. तेथें विप्रतिषेध असल्यामुळें अव्ययीभावाचा बाध करून बहुव्रीहि होईल.

'आकडारादेका संज्ञा' असा पाठ घेऊन एकच संज्ञा होते असा पक्ष स्वीकारला असतां अव्ययीभावसंज्ञेचा बाध करून बहुव्रीहीसंज्ञा होईल, आणि द्वीरावतीकः हें रूप साधेल. पण 'आकडारात्परं कार्यम्' असा पाठ घेऊन पर कार्य करावें' असा पक्ष गृहीत धरला असतां साधत नाहीं. कारण अव्ययीभावसंज्ञेचें विधान केल्याचे जोरावर अव्ययीभाव प्राप्त होत आहे. आणि 'परकार्य करावें' असें परसंज्ञेचें विधान केलें असल्यामुळें बहुव्रीहिही प्राप्त होत आहे.

'पर कार्य करावें' या पक्षींही हा दोष येत नाहीं. कारण संख्याशब्दाचा नदीवाचक शब्दाबरोबर जो हा अव्ययीभाव समास सांगितला आहे तो समाहार या अर्थी होतो, असें वचन करावें. आणि तें वचन तर अवश्य केलेंच पाहिजे. 'एकनदीतरे' येथें अव्ययीभाव

३. कारण द्वि या शब्दानें दोन ही संख्या दाखविली आहे, आणि इरावतीशब्दानें एक नदी दाखविली आहे; आणि त्या दोन शब्दांपासून तयार झालेला जो सामासिक शब्द त्यानें देश हा अर्थ दाखविला जात आहे.

४. 'आकडारादेका संज्ञा' (१।४।१) या नियमामुळें परत्वास्तव बहुव्रीहि समास होऊन द्वीरावतीकः हें रूप साधेल.

५. एका चासौ नदी च एकनदी असा येथें 'पूर्वकालैक०' (२।१।४९) यानें समास होत असतो.

१. अन्यपदार्थ गम्यमान असतांना सुबन्ताचा नदीवाचक शब्दाबरोबर नित्य अव्ययीभाव समास

[तत्पुरुषः ॥ २।१।२२ ॥]

## द्विगुश्च ॥ २ । १ । २३ ॥

द्विगोस्तत्पुरुषत्वे कानि प्रयोजनानि। द्विगोस्तत्पुरुषत्वे समासान्ताः प्रयोजनम् । पञ्चगवम् दशगवम् । पञ्चराजम् दशराजम् ॥

## द्वितीया श्रितातीतपतितगतात्यस्तप्राप्तापन्नैः ॥२ ।१। २४॥

### श्रितादिषु गमिगाम्यादीनामुपसंख्यानम् ॥ १ ॥

श्रितादिषु गमिगाम्यादीनामुपसंख्यानं कर्तव्यम् । ग्रामं गमी ग्रामगमी । ग्रामं गामी ग्रामगामी ॥

### श्रितादिभिरहीने द्वितीयासमासवचनानर्थक्यं बहुव्रीहिकृतत्वात् ॥ २ ॥

श्रितादिभिरहीनवाचिन्या द्वितीयायाः समासवचनमनर्थकम् । किं कारणम् । बहुव्रीहिकृतत्वात् । इह यः कष्टं श्रितः कष्टमनेन श्रितं भवति । तत्र बहुव्रीहिणा सिद्धम् ॥

### अहीने द्वितीयास्वरवचनानर्थक्यं च ॥ ३ ॥

अहीने द्वितीया [६.२.४७] पूर्वपदं प्रकृतिस्वरं भवतीत्येतत्स्वरवचनमनर्थकम् । किं कारणम् । बहुव्रीहिकृतत्वा-

---

न व्हावा म्हणून.

(सू.२३) द्विगु समासाला तत्पुरुषसंज्ञा सांगण्याचीं प्रयोजनें कोणतीं ?

द्विगु समासाला तत्पुरुषसंज्ञा सांगण्याचें प्रयोजन समासान्त प्रत्यय होणें हें होय; जसें— पञ्चगवं दशगवं, पञ्चराजम् दशराजम्.

(सू.२४, वा.१) श्रितादिकांमध्यें गमि, गामि, बुभुक्षु वगैरे शब्दांचें ग्रहण करावें, म्हणजे द्वितीयान्ताचा गम्यादिप्रकृतिक सुबन्तांबरोबर तत्पुरुष समास होतो; जसें— ग्रामं गमी ग्रामगमी, ग्रामं गामी ग्रामगामी.

(वा.२) श्रितादिकांपैकीं ज्या शब्दाबरोबर अहीनें अशा द्वितीयान्ताचें समासविधान केलें आहे तें अनर्थक होत आहे.

काय कारण ?

जो कष्टाप्रत प्राप्त झाला त्याच्याकडून कष्ट हे आश्रित केले जाणार असा अर्थ होतोच. तेव्हां कष्टं श्रितं येन अशा अर्थी बहुव्रीहि होऊनच कष्टश्रितः हा सामासिक शब्द साधत आहे.

(वा.३) अहीन हा अर्थ गम्यमान असतांना तत्पुरुष समासामध्यें द्वितीयान्त पूर्वपदाला प्रकृतिस्वर होतो या अर्थाचें 'अहीने द्वितीया' (६।२।४७) हें स्वरविधायक वचनही अनर्थक होत आहे.

काय कारण ?

बहुव्रीहिसमास केला असतां 'बहुव्रीहौ

---

होतो, तो सामासिक शब्द संज्ञा असेल तर; जसें— उन्मत्तगङ्गं नाम देशः.

१. हा अधिकार आहे. तो बहुव्रीहिसंज्ञेपर्यंत चालू राहतो. तेथून पुढें जे समास सांगितले जाणार ते तत्पुरुषसंज्ञक होतात; जसें— कृष्णाश्रितः.

१. द्विगुसमासही तत्पुरुषसंज्ञक होतो; जसें— पञ्चानां गवां समाहारः पञ्चगवम्.

२. येथें तत्पुरुषसंज्ञा झाल्यामुळें समासान्त टच् प्रत्यय (५।४।९१,९२) झाला आहे.

१. द्वितीयान्ताचा श्रितादिप्रकृतिक सुबन्ताबरोबर विकल्पानें समास होतो, आणि तो तत्पुरुषसंज्ञक होतो; जसें— कृष्णं श्रितः कृष्णश्रितः, श्रितादिप्रकृतिक सुबन्त म्हणजे श्रित, अतीत, वगैरे शब्दांहून केलेला जो सुप्प्रत्यय तो शेवटीं असलेलें शब्दस्वरूप.

२. अहीन म्हणजे न सोडलेलें. कष्टं श्रितः येथें कष्ट सोडले असा अर्थ मनांत येत नाहीं. कष्टमतीतः येथें त्याचे कष्ट सुटले असा अर्थ अतीतशब्दापासून मनांत येतो. तेथें अहीन या अर्थाचा बोध होत नाहीं.

३. स्वरामध्येंही भेद होत नाहीं. कष्टश्रित येथें बहुव्रीहि केला तर पूर्वपदाचा प्रकृतिस्वर (६।२।१) होतो, आणि तत्पुरुष केला तरी तोच स्वर (६।२।४७) होतो.

देव ॥

जातिस्वरप्रसङ्गस्तु ॥ ४ ॥

जातिस्वरस्तु प्राप्नोति । ग्रामगतः अरण्यगत इति । जातिकालसुखादिभ्योऽनाच्छादनात्क्तोऽकृतमितप्रतिपन्नाः [६.२.१७०] इति ॥

तत्र जातादिषु वावचनात्सिद्धम् ॥ ५ ॥

यदेतद्वा जाते [१७१] इत्येतद्वा जातादिष्विति वक्ष्यामि । इमे जातादयो भविष्यन्ति ॥ ननु च भेदो भवति । बहुव्रीहौ सति समासान्तोदात्तत्वेनापि भवितव्यं पूर्वपदप्रकृतिस्वरत्वेनापि तत्पुरुषत्वे सति पूर्वपदप्रकृतिस्वरत्वेनैव ॥ नास्ति भेदः । योऽपि हि तत्पुरुषमारभते न तस्य दण्डवारितो बहुव्रीहिः । तत्र तत्पुरुषे सति द्वौ समासौ द्वौ स्वरौ बहुव्रीहौ सत्येकः समासो द्विस्वरत्वम् ॥ एवं तर्हि सिद्धे सति यत्तत्पुरुषं शास्ति तज्ज्ञापयत्याचार्यः समानेऽर्थे केवलं

---

प्रकृत्या०' (६।२।१) यानें तेथें पूर्वपदप्रकृतिस्वर साधतें आहे म्हणून.

(वा.४) अहीनार्थ गम्यमान असतांना जर श्रित वगैरे शब्दांबरोबर द्वितीयान्ताचा जो तत्पुरुष होतो तेथें बहुव्रीहिसमास केला तर ग्रामगतः, अरण्यगतः, येथें 'जातिकालसुखादिभ्योऽनाच्छादनात्' (६।२।१७०) यानें अन्तोदात्तस्वर प्राप्त होत आहे.

(वा.५) जें हें 'वा जाते' (६।२।१७१) असें सूत्र आहे त्याचे ऐवजीं 'वा जातादिषु' असें सूत्र करण्यांत येईल व श्रित, पतित आणि गत हे शब्द जातादिगणामध्यें घालतां येतील.

पण असें करण्यांत फरक होतो. तो असाः— बहुव्रीहि केला असतां अन्तोदात्त स्वरही होणार व पूर्वपदप्रकृतिस्वरही होणार. आणि तत्पुरुषसमास केला तर एकटाच पूर्वपदप्रकृतिस्वर होणार.

हा फरक येत नाहीं. कारण जो श्रितादिकांशीं तत्पुरुष समासाचें विधान करीत आहे त्याला श्रितादिकांबरोबर बहुव्रीहि करण्याची कोणीं आडकाठी केलेली नाहीं. तेव्हां तत्पुरुषाचें विधान केलें असतां ग्रामगतः,अरण्यगतः, इत्यादि स्थलीं तत्पुरुष आणि बहुव्रीहि असे दोन समास व तत्पुरुष केला त्या वेळीं पूर्वपदप्रकृतिस्वर आणि बहुव्रीहि केला त्या वेळीं अन्तोदात्तस्वर मिळून दोन स्वर. आणि जो तत्पुरुषाचें विधान करूं इच्छित नाहीं त्याच्या मतीं बहुव्रीहि हा एक समास व पूर्वपदप्रकृतिस्वर आणि अन्तोदात्त असे दोन स्वर. अशा रीतीनें कष्टश्रितः इत्यादि सामासिक शब्दस्वरूप आणि त्यासंबंधींचे स्वर हे सर्व तत्पुरुषविधान केल्यावांचूनच साधत असतां ज्यापेक्षां हा आचार्य श्रितादिकांबरोबर तत्पुरुष समासाचें विधान करीत आहे त्यापेक्षां अर्थ सारखाच असतां केवळ विग्रह निरनिराळा केल्यामुळें जेथें तत्पुरुष आणि

---

४. कष्टश्रितः येथें तत्पुरुषसमास केला तर 'थाथघञ्०' (६।२।१४४) यानें प्राप्त झालेल्या अन्तोदात्ताचा बाध करून 'अहीने द्वितीया' (६।२।४७) यानें पूर्वपदाचा मूळचा स्वरच कायम राहतो. कष्टशब्द क्तप्रत्ययान्त असल्यानें अन्तोदात्त आहे. अर्थात् समासामध्येंही तोच अन्तोदात्त कायम राहतो; आणि कष्टश्रितः येथें बहुव्रीहि केला तर 'बहुव्रीहौ प्रकृत्या' (६।२।१) यानेंच पूर्वपदप्रकृतिस्वर साधत असल्यानें 'अहीने द्वितीया' हें सूत्र करावयास नको.

५. हा अन्तोदात्त स्वर बहुव्रीहीमध्यें पूर्वपदप्रकृतिस्वराचा (६।२।१) बाधक आहे. तेव्हां तत्पुरुषामध्यें जो पूर्वपदप्रकृति स्वर होतो तो साधणार नाहीं. याकरितां द्वितीयातत्पुरुष सांगितला पाहिजे.

६. जाति, काल, आणि सुखादि यांच्या पुढील जात, श्रित, पतित, गत, या शब्दांना विकल्पानें अन्तोदात्त होतो, असा या सूत्राचा अर्थ आहे. तेव्हां ग्रामगतः इत्यादिस्थलीं एकदा अन्तोदात्त आणि एकदा पूर्वपदप्रकृतिस्वर झाल्यामुळें 'अहीने द्वितीया' हें सूत्र करावयास नको.

विग्रहभेदाद्यत्र तत्पुरुषः प्राप्नोति बहुव्रीहिश्च तत्र तत्पुरुषो भवतीति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । राज्ञः सखा राजसखः । राजा सखास्येति बहुव्रीहिर्न भवति ॥ नैतज्ज्ञापकसाध्यमपवादैरुत्सर्गा बाध्यन्त इति । बाधकेनानेन भवितव्यं सामान्यविहितस्य विशेषविहितेन । अथ न सामान्यविहितो यदुच्यते बहुव्रीहिकृतत्वादित्येदयुक्तम् ॥ अस्ति खल्वपि विशेषो बहुव्रीहेस्तत्पुरुषस्य च । किं शब्दकृतोऽथार्थकृतः । शब्दकृतश्चार्थकृतश्च । शब्दकृतस्तावत् । बहुव्रीहौ सति कपा भवितव्यं तत्पुरुषे सति न भवितव्यम् । अर्थकृतः । तत्पुरुषे सति रुहादीनां क्तः कर्तरि भवति धात्वर्थस्यानपवर्गे । आरूढो वृक्षं देवदत्त इति । बहुव्रीहौ व्यपवृक्ते कर्मणि भवति । आरूढो वृक्षो देवदत्तेनेति ॥ अन्यथाजातीयकः खल्वपि प्रत्यक्षेणार्थसंप्रत्ययोऽन्यथाजातीयकः संबन्धात् । राज्ञः सखा राजसखः ।

---

बहुव्रीहि प्राप्त होतो तेथें तत्पुरुष समासच होतो असें तो सुचवीत आहे.

असें सुचविल्याचा काय उपयोग ?

राज्ञः सखा राजसखः येथें राजा सखा यस्य या अर्थानें बहुव्रीहिसमास होत नाहीं.

सामान्यवचनाचा अपवादवचनानें बाध होतो ही गोष्ट न्यायानेंच सिद्ध होत आहे, ज्ञापकानें साध्य होण्यासारखी नाहीं. असें पहा की कष्टश्रित येथें सामान्यविहित अशा बहुव्रीहीचा विशेषविहित अशा तत्पुरुषानें सहजच बाध होत आहे. आतां जर बहुव्रीहि सामान्यविहित नसेल तर कष्टश्रित हा सामासिक शब्द बहुव्रीहीनेंच सिद्ध होत आहे हें म्हणणें मुळींच जुळत नाहीं.

शिवाय वस्तुतः विचार केला तर खरोखरच बहुव्रीहि आणि तत्पुरुष या उभयतांमध्यें फरक आहे.

काय तो फरक शब्दामुळें आहे किंवा अर्थामुळें आहे ?

शब्दामुळेंही आहे व अर्थामुळेंही आहे.

शब्दामुळें फरक असा— कष्टश्रितः येथें बहुव्रीहि केला असतां 'शेषाद्विभाषा' (५।४।१५४) यानें समासान्त कप्प्रत्यय होईल, व तत्पुरुष केला तर कप्प्रत्यय होणार नाहीं. अर्थामुळें फरक असाः— तत्पुरुष समासामध्यें रुह् वगैरे धातूंहून कर्ता या अर्थी क्तप्रत्यय करावा लागतो आणि ती क्रिया पुरी झाली नाहीं तोंच त्याचा प्रयोगही होतो[९]; उदा०— वृक्षमारूढो देवदत्तः. आणि बहुव्रीहि समासामध्यें कर्म या अर्थी क्तप्रत्यय करावा लागतो, आणि क्रिया पुरी झाल्यानंतर त्याचा प्रयोग होतो; उदा०— आरूढो वृक्षो देवदत्तेन.

शिवाय प्रत्यक्षावरून[१०] जो वस्तूचा बोध होतो तो एक तऱ्हेचा होतो आणि फक्त संबंधावरून जो (अर्थाचा) बोध होतो तो निराळ्या तऱ्हेचा होतो, उदा०— राज्ञः

---

७. कारण मैत्री ही परस्पर असल्यामुळें राजाचा जो मित्र त्याचा राजा हा मित्र असणारच, तेव्हां तेथें बहुव्रीहि प्राप्त होतो, त्याचें ज्ञापकानें निराकरण करावयाचें.

८. श्रितशब्दामध्यें कर्मार्थी क्तप्रत्यय केला तर आश्रय करणाऱ्याची अन्यपदार्थ अशा रूपानें विवक्षा करितां येते, आणि कर्ता या अर्थी केला तर तो श्रित या पदाचाच अर्थ होतो; तेव्हां बहुव्रीहि आणि तत्पुरुष या दोन समासांची एकदम प्राप्तिच येत नाहीं. तेव्हां त्यांमध्यें सामान्य व विशेष हें कांहींच बोलतां येत नाहीं.

९. येथें क्तप्रत्ययाचा अर्थ भूतकाळ आहे. तो आरोहणक्रियेच्या आरंभाचा घेतला आहे. शब्दाच्या अंगीं जी स्वाभाविक शक्ति तिच्यामुळेंच कांहीं ठिकाणीं असे प्रयोग होतात.

१०. देवदत्ताला प्रत्यक्ष पाहून जी त्याच्याविषयीं कल्पना होईल तितकी बरोबर नुसत्या शब्दानें होत नाहीं.

संबन्धादेतद्गन्तव्यं नूनं राजाप्यस्य सखेति ॥ उभयं खल्वपीष्यते । स्वस्ति सोमसखा पुनरेहि । गवांसख इति ॥

[ [1]स्वयं क्तेन ॥ २ । १ । २५ ॥ ]

[1]खट्वा क्षेपे ॥ २ । १ । २६ ॥

किमुदाहरणम् । खट्वारूढो जाल्मः । क्षेप इत्युच्यते कः क्षेपो नाम । अधीत्य स्नात्वा गुरुभिरनुज्ञातेन खट्वारोढव्या । य इदानीमतोऽन्यथा करोति स उच्यते खट्वारूढोऽयं जाल्मः । नातिव्रतवानिति ॥

[ [1]सामि ॥ २ । १ । २७ ॥ ]

[ [1]कालाः ॥ २ । १ । २८ ॥ ]

[1]अत्यन्तसंयोगे च ॥ २ । १ । २९ ॥

अत्यन्तसंयोगे समासस्याविशेषवचनात्क्तेन समासवचनानर्थक्यम् ॥ १ ॥

अत्यन्तसंयोगे समास्याविशेषवचनात्क्तान्तेन चाक्तान्तेन च कालाः क्तान्तेनेत्येतत्समासवचनमनर्थकम् । अत्यन्तसंयोग इत्येव सिद्धम् ॥

अनत्यन्तसंयोगार्थं तु ॥ २ ॥

---

सखा राजसखः देवदत्तः. येथें राजाशीं देवदत्ताचा मित्रपणा प्रत्यक्ष सखिशब्दापासून मनांत येतो तो निराळा[11], आणि ह्या संबंधावरून उलट जो देवदत्ताशीं राजाचा मित्रपणा मनांत येतो तो निराळा[12].

आतां ह्या दोन्ही तऱ्हा इष्टच आहेत. तेव्हां जशी विवक्षा असेल त्याप्रमाणें तत्पुरुषही होतो आणि बहुव्रीहिही होतो; उदा०– स्वस्ति सोमसखा पुनरेहि, गवांसखः.

(सू.२६) या सूत्राचें उदाहरण कोणतें ? खट्वारूढः हें होय.

निन्दा गम्यमान असतांना असें येथें म्हटलें आहे. खट्वारूढः या शब्दापासून निंदा कशी गम्यमान होते ?

ब्रह्मचाऱ्यानें वेदाध्ययन पुरें करून व्रतसमाप्ति केल्यानंतर गुरूंच्या आज्ञेनें गृहस्थाश्रम स्वीकारल्यानंतर खट्वेवर आरोहण करण्यास मोकळीक मिळते. तेव्हां वेदाध्ययन संपण्याचे पूर्वींच भूमिशयन सोडून जो पलंगावर शयन करतो त्याला अयोग्य केल्याबद्दल निन्दाव्यंजक खट्वारूढोऽयं जाल्मः असें म्हटलें जातें. व्रत पाळलें नसल्यामुळें येथें त्याची निंदा प्रतीत होते.

(सू.२९, वा.१) अत्यन्तसंयोग गम्यमान असतांना कालवाचक द्वितीयान्ताचा मोघम सुबन्ताबरोबर, म्हणजे क्तान्त किंवा क्तान्तभिन्न सुबन्ताबरोबर, समास सांगितला असल्यामुळें 'कालाः'या पृथक्सूत्रानें कालवाचकांचे क्तान्ताबरोबर समासविधान केलें तें व्यर्थ होत आहे. अत्यन्तसंयोगे यानेंच तेथें समास साधत आहे.

(वा.२) तर अत्यन्तसंयोग नसतांना समास

---

११. सखिशब्दाचा मूळ अर्थ प्राणास प्राण देणारा असा आहे, तो येथें पूर्णपणानें मनांत येतो.

१२. आर्थिक कल्पना ही सामान्यतः मैत्रीची होते; प्राणास प्राण देणारा इतकी होत नाहीं.

१. स्वयम् या सुबन्ताचा क्तप्रत्ययान्त शब्दाबरोबर विकल्पानें तत्पुरुष समास होतो; जसें– स्वयंकृतस्यापत्यं स्वायंकृतिः. स्वयंकृत हा समास झाल्यानें तेवढ्याला तद्धितप्रत्यय लागतो म्हणून स्वच्या अकाराला आदिवृद्धि (७।२।११७) होते.

१. खट्वाप्रकृतिक सुबन्ताचा क्तान्तप्रकृतिक सुबन्ताबरोबर तत्पुरुषसमास होतो, निंदा गम्यमान असतांना; उदा०– खट्वारूढो जाल्मः.

१. सामि या अव्ययाचा क्तप्रत्ययान्त शब्दाबरोबर तत्पुरुषसमास होतो; जसें– सामिकृतम्; अर्धवट केलेलें असा अर्थ आहे.

१. कालवाचक द्वितीयान्ताचा क्तान्ताबरोबर विकल्पानें तत्पुरुषसमास होतो; जसें– मासप्रमितः प्रतिपच्चन्द्रः.

१. अत्यन्तसंयोग गम्यमान असतांना कालवाचक द्वितीयान्ताबरोबर विकल्पानें तत्पुरुषसमास होतो; जसें– मुहूर्तं सुखं मुहूर्तसुखम्.

अनत्यन्तसंयोगार्थं तर्हीदं वक्तव्यम् । षण्मुहूर्ताश्चराचराः । ते कदाचिदहर्गच्छन्ति कदाचिद्रात्रिम् । तदुच्यते । अहर्गताः रात्रिगताः इति ॥ नैतदस्ति । गतग्रहणादप्येतेत्सिद्धम् ॥ इदं तर्हि । अहरतिसृताः रात्र्यतिसृताः । मासप्रमितश्चन्द्रमाः ॥

## तृतीया तत्कृतार्थेन गुणवचनेन ॥ २ । १ । ३० ॥

तत्कृतार्थेनेति किमर्थम् । दध्ना पटुः । घृतेन पटुः । नैतदस्ति । असामर्थ्यादत्र न भविष्यति । कथमसामर्थ्यम् । सापेक्षमसमर्थं भवतीति । न हि दध्नः पटुना सामर्थ्यम् । केन तर्हि । भुजिना । दध्ना भुङ्क्ते पटुरिति । इहापि तर्हि न प्राप्नोति । शङ्कुलाखण्डः किरिकाण इति । अत्रापि न शङ्कुलायाः खण्डेन सामर्थ्यम् । केन तर्हि । करोतिना । शङ्कुलया कृतः खण्ड इति । वचनाद्भविष्यति । इहापि तर्हि वचनात्प्राप्नोति । दध्ना पटुः । घृतेन पटुरिति । तस्मात्तत्कृतार्थग्रहणं कर्तव्यम् ॥

---

होण्याकरितां कालाः हें पृथक् सूत्र केलें पाहिजे. एका सूर्योदयापासून दुसऱ्या सूर्योदयापर्यंत जे तीस मुहूर्त होतात त्यांपैकीं मधले सहा हे चलन पावतात; म्हणजे कदाचित् ते दिवसामध्यें असतात आणि कदाचित् ते रात्रीमध्यें असतात. तेथें समास होण्याकरितां 'कालाः' हे पृथक् सूत्र केलें पाहिजे; जसें— अहर्गताः, रात्रिगताः.

हें प्रयोचन येत नाहीं. कारण 'द्वितीया श्रिता०' या सूत्रानें द्वितीयान्ताचा गतशब्दाबरोबर समास सांगितला असल्यानें त्यानेंच हें उदाहरण साधत आहे.

तर मग अहरतिसृताः, रात्र्यतिसृताः, मासप्रमितः प्रतिपच्चन्द्रः हीं उदाहरणें घ्या.

(सू.३०) येथें तत्कृतार्थेन[२] हा जो शब्द घातला आहे तो कशाकरितां ?

दध्ना पटुः, घृतेन पटुः, येथें समास न व्हावा म्हणून घातला आहे.

हें प्रयोजन संभवत नाहीं. कारण सामर्थ्य नसल्यामुळें येथें समास होणारच नाहीं.

तें सामर्थ्य कसें बरें नाहीं ?

सापेक्ष जो अर्थ तो सामर्थ्यरहित असतो[३]. प्रकृतस्थलीं दधि या पदार्थाचा पटु या पदार्थाशीं संबंध नाहीं.

तर कोणावर त्याचा संबंध आहे ?

भोजनक्रियेवर; जसें— दध्ना भुङ्क्ते पटुः.

तर शङ्कुलाखण्डः, किरिकाणः, येथेंही समास प्राप्त होत नाहीं. कारण येथेंही शङ्कुलापदार्थाचा खण्डपदार्थाशीं संबंध नाहीं.

तर कोणाशीं त्याचा संबंध आहे ?

करोतिक्रियेशीं, जसें शङ्कुलया कृतः खण्डः म्हणजे शंकुलेनें केलेला तुकडा.

तृतीयान्ताचा गुणवचन शब्दाबरोबर समास सांगितल्याचे जोरावर तृतीयान्ताचा गुणवचनावर साक्षात् अन्वय नाहीं तरी करोतिक्रियेच्या द्वारानें परंपरेनें असलेला अन्वय मनांत घेऊन तेथें समास होईल.

तर दध्ना पटुः, घृतेन पटुः, येथेंही दधिपदा-

---

२. तेव्हां त्या सहा मुहूर्तांचा अत्यन्तसंयोग दिवसाशींही नाहीं आणि रात्रीशींही नाहीं.

१. तृतीयान्त शब्दाच्या अर्थानें केलेला जो गुण तद्वाचक शब्दाबरोबर किंवा अर्थ या शब्दाबरोबर तृतीयान्ताचा तत्पुरुषसमास विकल्पानें होतो; जसें— शङ्कुलया खण्डः शङ्कुलाखण्डः, धान्येनार्थो धान्यार्थः.

२. तृतीयान्त पदाच्या अर्थानें केलेला असा अर्थ दाखविणारा.

३. दध्यानें जेवणारा हा कुशल मनुष्य असा येथें अर्थ आहे. तेव्हां येथें दधि या अर्थाला जेवणारा या अर्थाची अपेक्षा असल्यामुळें सापेक्ष असलेल्या दध्याचें पटु या अर्थाशीं सामर्थ्य नाहीं.

गुणवचनेनेति किमर्थम्। गोभिर्वपावान्। धान्येन धनवान् ॥ किं पुनरिहोदाहरणम्। शङ्कुलाखण्डो देवदत्त इति। कथं पुनर्गुणवचनेन समास उच्यमानो द्रव्यवचनेन स्यात्। इह तृतीया तत्कृतार्थेन गुणेनेतीयता सिद्धम्। सोऽयमेवं सिद्धे सति यद्वचनग्रहणं करोति तस्यैतत्प्रयोजनमेवं यथा विज्ञायेत गुणमुक्तवता गुणवचनेनेति ॥ कथं पुनरयं गुणवचनः सन्द्रव्यवचनः संपद्यते। आरभ्यते तत्र मतुब्लोपो गुणवचनेभ्यो मतुपो लुगिति। तद्यथा। शुक्लगुणः शुक्लः। कृष्णगुणः कृष्णः। एवं खण्डगुणः खण्डः ॥ यद्येवं नार्थस्तत्कृतार्थग्रहणेन। भवति हि शङ्कुलायाः खण्डेन सामर्थ्यम्। असामर्थ्याच्चात्र न भविष्यति। दध्ना पटुः। घृतेन पटुरिति। तस्मान्नार्थस्तत्कृतार्थग्रहणेन ॥

**तृतीयासमासेऽर्थग्रहणमनर्थकमर्थगतिर्हि वचनात् ॥ १ ॥**

तृतीयासमासेऽर्थग्रहणमनर्थकम्। किं

---

र्थांचा भुजिक्रियेच्या द्वारानें पटुपदार्थावर परंपरेनें अन्वय असल्यामुळें वचनाचे जोरावर समास प्राप्त होत आहे. एकंदरींत 'तत्कृतार्थेन' हा शब्द सूत्रामध्यें घातला पाहिजे.

गुणवचनेनें हा जो शब्द घातला आहे तो कशाकरितां ?

गोभिर्वपावान्[५], धान्येन धनवान्, येथें समास न व्हावा म्हणून.

पण या सूत्राचें कोणतें बरें उदाहरण ?

शङ्कुलाखण्डो देवदत्तः हें होय.

पण गुणवाचक शब्दाबरोबर सांगितला जाणारा समास द्रव्यवाचकाबरोबर कसा बरें होऊं शकेल ?

'तृतीया तत्कृतार्थेन गुणेन' एवढेंच सूत्र करून काम भागत असतां ज्यापेक्षां गुणशब्दापुढें वचनशब्द घातला आहे त्यापेक्षां गुणम् उक्तवता गुणवचनेन, म्हणजे ज्या शब्दानें पूर्वी गुण दाखविला आहे असा गुण वचन याचा अर्थ येथें विवक्षित आहे[६].

पण गुणवाचक असलेला शब्द हा द्रव्यवाचक कसा बरें होईल ?

गुणवचनेभ्यो मतुपो लुक् (५।२।९४ वा.३) या वचनानें गुणवाचकाच्या पुढें केलेल्या मतुप्प्रत्ययाचा लुक् सांगितला असल्यामुळें गुणवाचकाला द्रव्यवाचित्व येतें; जसें– शुक्लगुणकः शुक्लः. ज्याचा शुक्ल रंग आहे त्याला शुक्लशब्द लागू पडतो. तसेंच कृष्णगुणकः कृष्णः याप्रमाणें ज्याला खंड गुण आहे त्याला खंडशब्द लागू होईल.

आतां जर सूत्रामध्यें 'गुणवचनेन' हा शब्द घातला पाहिजे तर 'तत्कृतार्थेन' हा शब्द घालण्यांत उपयोग होत नाहीं. कारण शङ्कुलापदार्थाचा खण्डपदार्थातील खण्डत्व या गुणाबरोबर जन्यजनकभावसंबंधानें अन्वय संभवत असल्यामुळें तेथें सामर्थ्य आहे असें म्हणतां येतें. तेव्हां तृतीयान्ताच्या अर्थानें केलेला जो गुण तद्वाचकाबरोबर तृतीयान्ताचा समास होईल. आणि दध्ना पटुः, घृतेन पटुः येथें तृतीयान्ताचा गुणवाचकावर अन्वय संभवत नसल्यामुळें समास होणार नाहीं. तेव्हां 'तत्कृतार्थेन' हा शब्द घालण्यांत अर्थ नाहीं.

(वा.१) 'तृतीया तत्कृतार्थेन०' ह्या तृतीयासमासविधायक सूत्रामध्यें जो अर्थशब्द घातला आहे तो व्यर्थ होतें आहे.

---

४. जाति, क्रिया व संज्ञा यांहून अन्य अर्थाला दाखविणारा जो शब्द तो गुणवाचक होय.

५. वपा याचा अर्थ हृदयांतील मेद असा आहे.

६. म्हणजे सांप्रतकालीं तो गुणवाचक शब्द गुणविशिष्ट द्रव्य या अर्थाचा पाहिजे.

७. तेन कृतः अर्थो यस्य असा तत्कृतार्थेन याचा विग्रह मनांत घेऊन हा आक्षेप केला आहे.

कारणम्। अर्थगतिर्ह्यवचनात्। अन्तरेणापि वचनमर्थगतिर्भविष्यति ॥

**निर्देश्यमिति चेत्तृतीयार्थनिर्देशोऽपि ॥ २ ॥**

अथैवमपि निर्देशः कर्तव्य इति चेत्तृतीयार्थनिर्देशोऽपि कर्तव्यः स्यात्। तृतीया तदर्थकृतार्थेनेति वक्तव्यम् ॥ तत्तर्हि वक्तव्यम्। न वक्तव्यम्। नायमर्थनिर्देशः। किं तर्हि। योगाङ्गमिदं निर्दिश्यते। सति च योगाङ्गे योगविभागः करिष्यते। तृतीया तत्कृतेन गुणवचनेन समस्यते। ततोऽर्थेन। अर्थशब्देन च तृतीया समस्यते। धान्यार्थः वसनार्थः। पूर्वसदृशसमोनार्थ [२.१.३१] इत्यर्थग्रहणं न कर्तव्यं भवति ॥

**पूर्वसदृशसमोनार्थकलहनिपुणमिश्रश्लक्ष्णैः ॥ २ । १ । ३१ ॥**

**पूर्वादिष्ववरस्योपसंख्यानम् ॥ १ ॥**

पूर्वादिष्ववरस्योपसंख्यानं कर्तव्यम्। मासावरोऽयम्। संवत्सरावरोऽयम् ॥

**सदृशग्रहण उक्तम् ॥ २ ॥**

किमुक्तम्। सदृशग्रहणमनर्थकं तृतीयासमासवचनात्। षष्ठ्यर्थमिति चेत्तृती-

---

काय कारण ?

अर्थशब्द न घातला तरी देखील त्याची प्रतीति होईल.

(वा. २) आतां जरी अर्थशब्द घातल्यावांचूनही तो अर्थ लब्ध होतो तरी देखील उघडपणें कळण्यासाठीं अर्थशब्दाचा निर्देश केला पाहिजे असें म्हणणें असेल तर तृतीयान्ताच्या अर्थाचा निर्देशही करावा लागेल. म्हणजे 'तदर्थकृतार्थेन' असें म्हणावें लागेल.

तर मग तोही अर्थशब्द सूत्रांत घातला पाहिजे कीं काय ?

नको. कारण जो अर्थशब्द सूत्रामध्यें घातला आहे तो देखील अर्थाचा निर्देश करण्यासाठीं सूत्रामध्यें घातलेला नाहीं.

तर कशासाठीं ?

स्वतंत्र विधान करण्यासाठीं घातला आहे. म्हणजे अर्थात् योगविभाग करण्यांत येईल. तो असा:— तृतीया तत्कृतेन गुणवचनेन 'तृतीयान्ताचा तृतीयान्ताच्या अर्थानें केलेला जो गुण, तद्वाचक शब्दाबरोबर समास होतो'. त्याच्यापुढें 'अर्थेन' हें सूत्र: 'अर्थशब्दाबरोबरही तृतीयान्ताचा समास होतो'; जसें:— धान्येनार्थो धान्यार्थः, वसनार्थः, हिरण्यार्थः. तेव्हां 'पूर्वसदृशसमोनार्थ०' या पुढील सूत्रामध्यें अर्थशब्द घालावयास नको.

(सू. ३१, वा. १) पूर्व, सदृश, वगैरे शब्दामध्यें अवर या शब्दाचें ग्रहण करावें; जसें— मासावरोऽयम्, संवत्सरावरोऽयम्

(वा. २) येथील सदृशशब्दाविषयीं सांगितलें आहे.

काय सांगितलें आहे ?

सदृशग्रहणमनर्थकं तृतीयासमासवचनात् (६।२।११, वा. १): 'पूर्वपदाला प्रकृतिस्वर होण्याकरितां सदृशशब्द घातला तो व्यर्थ होत आहे. कारण 'पूर्वसदृश०' या सूत्रानें सदृशशब्दाबरोबर तृतीयान्ताचा समास केला असतां 'तत्पुरुषे तुल्यार्थ०' (६।२।२) यानें पूर्वपदप्रकृतिस्वर होईल.' षष्ठ्यर्थमिति चेत्तृतीयासमासानर्थक्यम् (६।२।११, वा. २): 'मातुः सदृशः मातृसदृशः असा षष्ठीसमास केला असतां तेथें पूर्वपदप्रकृतिस्वर होण्याकरितां सदृशग्रहण केलें पाहिजे असें म्हणणें असेल तर तृतीयासमासविधायक प्रकृतसूत्रामध्यें सदृशशब्द घालावयास नको.'

---

१. पूर्व, सदृश, सम, ऊन, अर्थ, कलह, निपुण, मिश्र, आणि श्लक्ष्ण या शब्दांबरोबर, तृतीयान्ताचा विकल्पानें तत्पुरुष समास होतो; जसें— मासेन पूर्वो मासपूर्वः,

यासमासवचनानर्थक्यमिति ॥

## कर्तृकरणे कृता बहुलम् ॥ २ । १ । ३२ ॥

## कर्तृकरणे कृता क्तेन ॥ १ ॥

कर्तृकरणे कृता क्तेनेति वक्तव्यम् । अहिहतः नखनिर्भिन्नः दात्रलूनः परशुच्छिन्नः । कृता क्तेनेति किमर्थम् । इह मा भूत् । दात्रेण लूनवान् । परशुना छिन्नवान् ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । बहुलवचनात्सिद्धम् ॥

## कृत्यैरधिकार्थवचने ॥२।१।३३॥

## कृत्यैरधिकार्थवचनेऽन्यत्रापि दृश्यते ॥ १ ॥

कृत्यैरधिकार्थवचनेऽन्यत्रापि दृश्यत इति वक्तव्यम् । बुसोपेन्ध्यम् तृणोपेन्ध्यम् घनघात्यम् ॥

## साधनं कृतेति वा पादहारकाद्यर्थम् ॥ २ ॥

अथवा साधनं कृता सह समस्यत इति वक्तव्यम् । किं प्रयोजनम् । पादहारकाद्यर्थम् । पादाभ्यां ह्रियते पादहारकः । गले चोप्यते गलेचोपकः ॥

## अन्नेन व्यञ्जनम् ॥ २ । १ । ३४ ॥

## भक्ष्येण मिश्रीकरणम् ॥२।१।३५॥

(सू.३२, वा.१) 'कर्तृकरणे०' या सूत्रामध्यें क्तेन असें पद घालावें. म्हणजे कर्ता किंवा करण या अर्थाला दाखविणाऱ्या तृतीयान्ताचा क्तप्रत्यय शेवटीं असलेल्या कृदन्तशब्दाबरोबर समास होईल; जसें— अहिहतः, नखनिर्भिन्नः, दात्रलूनम्, परशुच्छिन्नम्.

क्तेन असें म्हटले तें कशाकरितां ?

दात्रेण लूनवान्, परशुना छिन्नवान्, येथें समास न व्हावा म्हणून म्हटलें आहे.

तर मग तसें सूत्र केलें पाहिजे.

तसें सूत्र करावयास नको. बहुलम् असें म्हटल्यानें सर्व साधत आहे.

(सू.३३, वा.१) अधिकार्थवचन गम्यमान नसतांही हा समास होतो असें म्हणावें; कारण तशा ठिकाणींही दृष्टीस पडतो; जसें— बुसोपेन्ध्यम्, तृणोपेन्ध्यम्, घनघात्यम्.

(वा.२) किंवा 'कर्तृकरणे कृता बहुलम्' याचे ऐवजीं 'साधनं कृता' असें सूत्र करावें म्हणजे कोणत्याही कारकाचा कृदन्ताबरोबर समास होतो, असें वचन करावें.

काय प्रयोजन ?

पादहारकः गलेचोपकः, वगैरे.

(सू.३४,३५, वा.१) अन्नेन व्यञ्जनम् या सूत्रानें आणि भक्ष्येण मिश्रीकरणम् या

१. कर्ता किंवा करण या अर्थाला दाखविणारी जी तृतीया तदन्ताचा कृत्प्रत्यय शेवटीं असलेल्या शब्दाबरोबर बाहुल्येंकरून समास होतो; जसें— हरिणा त्रातो हरित्रातः, नखनिर्भिन्नः, वगैरे. बहुतकरून असें म्हटलें असल्यामुळें दात्रेण लूनवान् येथें समास होत नाहीं.

२. म्हणजे बहुतकरून असें म्हटल्यामुळें कर्तृकरण तृतीयान्ताचा कृदन्ताबरोबर सर्व ठिकाणीं समास केलाच पाहिजे असा नियम नाहीं असें ठरतें. म्हणून दात्रेण लूनवान् येथें समास होणार नाहीं.

१. कर्ता किंवा करण या अर्थाला दाखविणाऱ्या तृतीयान्ताचा कृत्यप्रत्यय शेवटीं असलेल्या शब्दाबरोबर विकल्पानें तत्पुरुषसमास होतो, अधिकार्थवचन गम्यमान असतांना. स्तुति किंवा निंदा दाखविणारें जें अर्थवादवाक्य तें अधिकार्थवचन होय; जसें— वातच्छेद्यं तृणम्, काकपेया नदी.

२. बुसेन उपेन्ध्यं काष्ठम्. अग्नि फार थोडा असल्यामुळें भूस वगैरे घालून हें काष्ठ प्रज्वलित करण्यास योग्य आहे, असा याचा अर्थ आहे.

१. व्यञ्जनवाचक तृतीयान्ताचा अन्नवाचक सुबन्ताबरोबर विकल्पानें तत्पुरुषसमास होतो; जसें— दध्ना उपसिक्त ओदनः दध्योदनः. ज्यानें संस्कार करावयाचा तें दधि किंवा दुग्ध वगैरे व्यंजन होय.

१. मिश्रणाचें साधन असा जो अर्थ तद्वाचक तृतीयान्ताचा भक्ष्यवाचक सुबन्ताबरोबर विकल्पानें तत्पुरुषसमास होतो; जसें— गुडेन मिश्रा धानाः गुडधानाः. कठिण असून ज्याचे अवयव निरनिराळे असतात तें भक्ष्य होय; उदा० लाह्या, पोहे वगैरे.

**अन्नेन व्यञ्जनं भक्ष्येण मिश्रीकरण-मित्यसमर्थसमासः ॥ १ ॥**

अन्नेन व्यञ्जनं भक्ष्येण मिश्रीकरण-मित्यसमर्थसमासोऽयं द्रष्टव्यः। किं कारणम्।

**कारकाणां क्रियया सामर्थ्यात् ॥ २ ॥**

कारकाणां क्रियया सामर्थ्यं भवति न तेषामन्योऽन्येन। तद्यथा। निश्रयण्या द्वाभ्यां काष्ठाभ्यां सामर्थ्यं न तेषामन्योऽन्येन॥ एवं तर्ह्याहायमन्नेन व्यञ्जनं भक्ष्येण मिश्रीकरणमिति न चास्ति सामर्थ्यं तत्र वचनात्समासो भविष्यति।

**वचनप्रामाण्यादिति चेन्नानाकारकाणां प्रतिषेधः ॥ ३ ॥**

वचनप्रामाण्यादिति चेन्नानाकारकाणां प्रतिषेधो वक्तव्यः। तिष्ठतु दध्ना ओदनो भुज्यते देवदत्तेनेति॥

**सिद्धं तु समानाधिकरणाधिकारे क्तस्तृतीयापूर्वपद उत्तरपदलोपश्च ॥ ४ ॥**

सिद्धमेतत्। कथम्। समानाधिकरणाधिकारे वक्तव्यं क्तस्तृतीयापूर्वपदः समस्यते सुपोत्तरपदस्य च लोपो भवतीति। दध्नोपसिक्तो दध्युपसिक्तः दध्युपसिक्त ओदनो दध्योदनः। गुडेन संसृष्टा गुडसंसृष्टाः गुडसंसृष्टा धाना गुडधानाः॥

**षष्ठीसमासश्च युक्तपूर्णान्तः ॥ ५ ॥**

षष्ठीसमासश्च युक्तपूर्णान्तः समस्यत उत्तरपदस्य च लोपो वक्तव्यः। अश्वानां

---

सूत्रांनीं सांगितलेला समास सामर्थ्यरहित अशा पदांचा आहे असें समजावें.

काय कारण ?

(वा.२) कारकांचें सामर्थ्य क्रियेशींच असतें, तें त्यांच्यामध्यें एकमेकांशीं असूं शकत नाहीं; जसें शिडीच्या उभे असलेल्या दोन पायांचें सामर्थ्य शिडीशींच असतें, एकमेकांशीं नसतें.

असें आहे तर मग ज्या अर्थीं व्यञ्जनवाचकाचा अन्नवाचकाबरोबर समास होतो, व मिश्रीकरणवाचकाचा भक्ष्यवाचकाबरोबर समास होतो असें आचार्य सांगत आहे, आणि त्या समासाकरितां घेतलेल्या पदांमध्यें सामर्थ्य तर नाहीं, त्या अर्थीं समासविधान करणें अनुपपन्न होत असल्यामुळें त्या जोरावर तेथें समास होईल.

(वा.३) समासविधान केल्याचें जोरावर सामर्थ्य नसतांही पूर्वोक्त उदाहरणस्थलीं समास होईल असें म्हटलें तर भिन्नभिन्न क्रियेमुळें जीं कारकसंज्ञक सुबन्तें त्यांचा समास होत नाहीं असें प्रतिषेधवचन केलें पाहिजे; जसें– तिष्ठतु दध्ना, ओदनो देवदत्तेन भुज्यते. येथें तिष्ठतिक्रियेमुळें दधि हें करणसंज्ञक आहे व भुजिक्रियेमुळें ओदन हें कर्म आहे.

(वा.४) हे दोन्ही समास साधत आहेत.

ते कसे ?

समानाधिकरणेन हें पद जेथें अनुवृत्त आहे त्या समासप्रकरणामध्यें तृतीयान्त आहे पूर्वपद ज्याचें व क्तप्रत्ययान्त उत्तरपद ज्याचें अशा सुबन्ताचा सुबन्ताबरोबर समास होतो आणि क्तप्रत्ययान्त उत्तरपदाचा लोप होतो असें वचन करावें; जसें– दध्ना उपसिक्तः दध्युपसिक्तः[२], दध्युपसिक्तः ओदनः दध्योदनः; गुडेन संसृष्टाः गुडसंसृष्टाः, गुडसंसृष्टाः धानाः गुडधानाः.

(वा.५) युक्त किंवा पूर्णशब्दाशीं आलेला जो षष्ठ्यन्ताचा तत्पुरुषसमास त्याचा सुबन्ताबरोबर समास होतो, आणि युक्त व पूर्ण या

---

२. दध्युपसिक्तः हा समास 'कर्तृकरणे' (२।१।३२) यानें साधत आहे व दध्युपसिक्त आणि ओदन या दोन शब्दांचाही समास 'विशेषणं विशेष्येण०' (२।१।५७) यानेंच साधत आहे. तेव्हां फक्त उत्तरपदाचा लोप सांगण्याकरितां हें वचन करावें लागत आहे.

युक्तोऽश्वयुक्तः अश्वयुक्तो रथोऽश्वरथः। दध्नः पूर्णो दधिपूर्णः दधिपूर्णो घटो दधिघटः॥ तत्तर्हीदं बहु वक्तव्यम्।

**न वासमासेऽदर्शनात् ॥६॥**

न वा वक्तव्यम्। किं कारणम्। असमासेऽदर्शनात्। यद्ध्यसमासे दृश्यते समासे च न दृश्यते तल्लोपारम्भं प्रयोजयति। न चासमास उपसिक्तशब्दः संसृष्टशब्दो युक्तशब्दः पूर्णशब्दो वा दृश्यते॥ कथं तर्हि सामर्थ्यं गम्यते।

**युक्तार्थसंप्रत्ययाच्च सामर्थ्यम् ॥७॥**

दध्ना युक्तार्थता संप्रतीयते॥ कथं पुनर्ज्ञायते दध्ना युक्तार्थता संप्रतीयत इति।

**संप्रत्ययाच्च तदर्थाध्यवसानम् ॥८॥**

संप्रत्ययाच्च तदर्थोऽध्यवसीयते॥ अवश्यं चैतदेवं विज्ञेयम्।

**संप्रतीयमानार्थलोपे ह्यनवस्था ॥९॥**

यो हि मन्यते संप्रतीयमानार्थानां शब्दानां लोपो भवतीत्यनवस्था तस्य लोपस्य स्यात्। दधीत्युक्ते बहवोऽर्था गम्यन्ते मन्दकमुत्तरकं निलीनकमिति तद्वाचिनां शब्दानां लोपो वक्तव्यः स्यात्। तथा गुड इत्युक्ते मधुरशब्दस्य शृङ्गवेरमिति च कटुशब्दस्य॥ अन्तरेण खल्वपि

---

शब्दांचा लोप होतो असें वचन करावें; जसें— अश्वानां युक्तः अश्वयुक्तः, अश्वयुक्तो रथः अश्वरथः; दध्नः पूर्णः दधिपूर्णः, दधिपूर्णो घटः दधिघटः.

तर मग हें बरेंच नवीन विधान करावें लागणार आहे.

(वा.६) तसें करावयास नको.

काय कारण ?

वाक्यामध्यें उपसिक्त वगैरे शब्द दृष्टीस पडत नाहींत म्हणून. म्हणजे जें विग्रहवाक्यामध्यें दृष्टीस पडतें व समासामध्यें दिसत नाहीं, त्याच्या लोपाकरितां वचनाचा आरंभ करावा लागतो. आणि प्रकृत स्थलीं विग्रहवाक्यांमध्यें उपसिक्त, संसृष्ट, युक्त, पूर्ण हे शब्द तर दृष्टीस पडत नाहींत.[३]

तर मग अश्वरथः, दधिघटः इत्यादि स्थलीं समस्यमान पदार्थांचें परस्परसामर्थ्य कसें बरें प्रतीत होतें ?

(वा.७) दध्योदनः असें म्हटलें असतां दधि या पदार्थाबरोबरच युक्त या अर्थाची मनांत उपस्थिति होते असल्यामुळें समस्यमानपदार्थांचे परस्परसामर्थ्य आहे.

पण युक्त हा अर्थ दधिशब्दापासून प्रतीत होतो हें कसें बरें जाणलें जात आहे ?

(वा.८) लोकव्यवहारामध्यें उपसेकादि क्रियारूप अर्थ दधिपदार्थापासूनच मनांत येत असल्यामुळें त्याचाच तो अर्थ असें समजतें; आणि असें अवश्य समजलेंच पाहिजे.

(वा.९) जो असें मानतो की— 'ज्या ठिकाणीं शब्द नसतांना त्याचा अर्थ प्रतीत होतो तेथें त्या शब्दांचा लोप होतो' त्याच्या मतीं लोपासंबंधानें अनवस्था प्रसक्त होईल. म्हणजे दधि असें नुसतें उच्चारलें असतां त्यापासून तीन तऱ्हेचें दहि मनांत येतें, जरा विरजलेलें, चांगलें विरजलेलें किंवा पुरें विरजून बिघडूं लागलेलें. तेव्हां तेथें तितक्या शब्दांचा लोप सांगावा लागेल. तसेंच गुड शब्द उच्चारला असतां मधुर हा अर्थ प्रतीत

---

३. अश्वानां रथः, दध्नो घटः, असा समास सोडविला असतां युक्त वगैरे शब्दांचा प्रयोग केल्यावांचूनही प्रतीत होणाऱ्या संबंधामुळें युक्त वगैरे अर्थांचा आक्षेप होईल. एरवीं प्रतीत होणाऱ्या संबंधाची उपपत्ति जुळून येत नाहीं. तेव्हां विग्रहवाक्यामध्येंच युक्त वगैरे शब्द नसल्यामुळें त्यांचा लोप सांगण्याचा प्रसंगच नाहीं.

४. दध्योदनः असें म्हटलें असतां दधि हा पदार्थ संस्कारक आहे, व ओदन हा संस्कार्य आहे. तो संस्कार उपसेकक्रियेवांचून संभवत नाहीं म्हणून अर्थात् युक्त या अर्थाची प्रतीति होते.

शब्दप्रयोगं बह्वोऽर्था गम्यन्तेऽक्षिनिकोचैः पाणिविहारैश्च तद्वाचिनां शब्दानां लोपो वक्तव्यः स्यात् ॥

**चतुर्थी तदर्थार्थबलिहितसुखरक्षितैः ॥ २ । १ । ३६ ॥**

किं चतुर्थ्यन्तस्य तदर्थमात्रेण समासो भवति । एवं भवितुमर्हति ।

**चतुर्थी तदर्थमात्रेण चेत्सर्वप्रसङ्गोऽविशेषात् ॥१॥**

चतुर्थी तदर्थमात्रेण चेत्सर्वप्रसङ्गः । सर्वस्य चतुर्थ्यन्तस्य तदर्थमात्रेण सह समासः प्राप्नोति । अनेनापि प्राप्नोति । रन्धनाय स्थाली । अवहननायोलूखलमिति । किं कारणम् । अविशेषात् । न हि कश्चिद्विशेष उपादीयत एवंजातीयकस्य चतुर्थ्यन्तस्य तदर्थेन सह समासो भवतीति । अनुपादीयमाने विशेषे सर्वप्रसङ्गः ॥

**बलिरक्षिताभ्यां चानर्थकं वचनम् ॥२**

बलिरक्षिताभ्यां च समासवचनमनर्थकम् । यो हि महाराजाय बलिर्महाराजार्थः स भवति । तत्र तदर्थ इत्येव

---

होतो म्हणून तेथें मधुरशब्दाचा लोप सांगावा लागेल. याप्रमाणें शृङ्गवेर म्हणजे आलें हा शब्द उचारला असतां तेथें त्याचा तिखटपणा प्रतीत होतो म्हणून तेथें कटुकशब्दाचा लोप सांगण्याची पाळी येईल. शिवाय शब्दप्रयोग केल्यावांचून डोळयाच्या खुणेनें किंवा हस्तसंकेतानें वगैरे पुष्कळसे अर्थ मनांत येतात तेथेंही त्या त्या अर्थांना दाखविणाऱ्या तितक्या शब्दांचा लोप सांगावा लागणार आहे अशी अनवस्था होणार आहे.

(सू.३६) चतुर्थ्यन्त शब्दाचा अर्थ अशी जी वस्तु तिला उपयोगीं पडणारे जे जे पदार्थ आहेत त्यांना दाखविणाऱ्या दरएक शब्दाबरोबर त्या चतुर्थ्यन्त शब्दाचा हा समास होतो कीं काय ?

असें होणें योग्य आहे ?

(वा.१) चतुर्थ्यन्ताच्या अर्थाला उपयोगीं पडणारा जो जो पदार्थ असेल त्याला त्याला दाखविणारा म्हणून जो जो शब्द त्या सर्वांबरोबर चतुर्थ्यन्ताचा समास होतो असें म्हटलें तर सर्व चतुर्थ्यन्तांचा तदर्थवाचक सर्व शब्दांबरोबर समास प्राप्त होतो. तेव्हां रन्धनाय स्थाली, अवहननाय उलूखलम्, येथें स्थाली वगैरे शब्दांबरोबरही चतुर्थ्यन्तांचा समास प्राप्त होत आहे.

काय कारण ?

विशेष धरला नाहीं म्हणून; म्हणजें अशा एक प्रकारच्या चतुर्थ्यन्तांचा तदर्थवाचकांबरोबर समास होतो असा विशेष अर्थ दाखविणारा शब्द सूत्रामध्यें घातला नाहीं. तेव्हा सूत्रामध्यें विशेष धरला नसल्यामुळें सर्व चतुर्थ्यन्तांचा तदर्थवाचक सर्वशब्दांबरोबर समास प्रसक्त होतो.

(वा.२) बलि आणि रक्षित या शब्दांबरोबर चतुर्थ्यन्तांचा समास सांगितला तोही अनर्थक होत आहे. कारण जो महाराजाला बलि म्ह. नजराणा दिला जातो तो महाराजाकरितांच असतो. तेव्हां महाराजाय बलिः महाराजबलिः येथें सूत्रांतील तदर्थ या शब्दानेंच समास होईल.

---

१. तदर्थ, अर्थ, बलि, हित, सुख आणि रक्षित या शब्दांबरोबर चतुर्थ्यन्ताचा विकल्पानें तत्पुरुषसमास होतो; जसें– यूपाय दारु यूपदारु, कुण्डलाय हिरण्यं कुण्डलहिरण्यम्. चतुर्थ्यन्ताच्या अर्थाची प्रकृतिभूत वस्तु येथें तदर्थ या शब्दानें विवक्षित आहे.

सिद्धम् ॥

यदि पुनर्विकृतिश्चतुर्थ्यन्ता प्रकृत्या सह समस्यत इत्येतल्लक्षणं क्रियेत ।

**विकृतिः प्रकृत्येति चेदश्वघासादीनामुपसंख्यानम् ॥ ३ ॥**

विकृतिः प्रकृत्येति चेदश्वघासादीनामुपसंख्यानं कर्तव्यम् । अश्वघासः श्वश्रूसुरम् हस्तिविधेति ॥

**अर्थेन नित्यसमासवचनम् ॥ ४ ॥**

अर्थशब्देन नित्यसमासो वक्तव्यः । ब्राह्मणार्थम् क्षत्रियार्थम् ॥ किं विकृतिश्चतुर्थ्यन्ता प्रकृत्या सह समस्यत इत्यतोऽर्थेन नित्यसमासो वक्तव्यः । नेत्याह । सर्वथार्थेन नित्यसमासो वक्तव्यो विग्रहो मा भूदिति ॥

**सर्वलिङ्गता च ॥ ५ ॥**

सर्वलिङ्गता च वक्तव्या । ब्राह्मणार्थं पयः । ब्राह्मणार्थः सूपः । ब्राह्मणार्था यवागूरिति ॥ किमर्थेन नित्यसमास उच्यत इत्यतः सर्वलिङ्गता वक्तव्या । नेत्याह । सर्वथा सर्वलिङ्गता वक्तव्या । किं कारणम् । अर्थशब्दोऽयं पुँल्लिङ्ग उत्तरपदार्थप्रधानश्च तत्पुरुषस्तेन पुँल्लिङ्गस्यैव समासस्याभिधानं स्यात्स्त्रीनपुंसकलिङ्गस्य न स्यात् ॥

तत्तर्हीदं बहु वक्तव्यम् । विकृतिः प्रकृत्येति वक्तव्यम् । अश्वघासादीनामुपसंख्यानं कर्तव्यम् । अर्थेन नित्यसमासो वक्तव्यः । सर्वलिङ्गता च वक्तव्या ॥ न वक्तव्यम् ।

---

आतां जर 'चतुर्थ्यन्त अशा विकृतिवाचक शब्दाचा प्रकृत वाचकशब्दाबरोबर समास होतो' असें सूत्र केलें जाईल तर—

(वा.३) विकृतिवाचकाचा प्रकृतिवाचकाबरोबर समास होतो असें गृहीत धरलें तर अश्वघासादिक समास साधण्याकरितां वचन केलें पाहिजे; जसें:— अश्वाय घासः अश्वघासः, श्वश्रूसुरम्[२], हस्तिविधा.

(वा.४) अर्थ या शब्दाबरोबर चतुर्थ्यन्ताचा नित्य समास होतो असें वचन करावें; जसें:— ब्राह्मणाय इदं ब्राह्मणार्थम्, क्षत्रियार्थम्.

चतुर्थी शेवटीं असलेल्या विकृतिवाचकाचा प्रकृतिवाचकाबरोबर समास होतो असें म्हटलें म्हणन का हें वचन करावें लागत आहे ?

तसें नाहीं; तर विग्रहवाक्य राहूं नये म्हणून केव्हांही अर्थशब्दाबरोबर नित्य समास सांगावा लागत आहे.

(वा.५) अर्थशब्दाबरोबर केलेल्या त्या समासाला सर्व लिंगें लागू होतात असें वचन करावें; जसें:— ब्राह्मणार्थं पयः, ब्राह्मणार्थः सूपः, ब्राह्मणार्था यवागूः.

अर्थशब्दाबरोबर नित्य समास सांगितला म्हणून का त्या समासाला सर्व लिंगें लागू होतात असें सांगावें लागत आहे ?

तसें नाहीं. तर केव्हांही सर्व लिंगें लागू होतात असें सांगितलेंच पाहिजे. कारण अर्थशब्द हा पुंलिंगी आहे, आणि तत्पुरुषसमासामध्यें तर उत्तरपदार्थाला प्राधान्य असते. तेव्हां उत्तरपदाचेंच लिंग समासालाही लागू होईल (२।४।२६), व स्त्रीलिंग किंवा नपुंसकलिंग समासाला लागू होणार नाहीं.

तर मग विकृतिवाचकाचा प्रकृतिवाचकाबरोबर समास, अश्वघासः वगैरे समास, अर्थशब्दाबरोबर समास, व त्याला सर्व लिंगें लागू करणें, अशीं बरींच वचनें करावीं लागणार कीं काय ?

---

२. श्वश्वै सुरा असा विग्रह 'विभाषा सेनासुरा.' (२।४।२५) यानें नपुंसकलिंग झालें आहे.

विधा= हत्तीचें अन्न, उडीद वगैरे.

यत्तावदुच्यते विकृतिः प्रकृत्येति वक्तव्यमिति । न वक्तव्यम् । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति विकृतिश्चतुर्थ्यन्ता प्रकृत्या सह समस्यत इति यदयं बलिरक्षितग्रहणं करोति । कथं कृत्वा ज्ञापकम् । यथाजातीयकानां समासे बलिरक्षितग्रहणेनार्थस्तथाजातीयकानां समासः । यदि च विकृतिश्चतुर्थ्यन्ता प्रकृत्या सह समस्यते न तदर्थमात्रेण ततो बलिरक्षितग्रहणमर्थवद्भवति ॥

यदप्युच्यतेऽश्वघासादीनामुपसंख्यानं कर्तव्यमिति । न कर्तव्यम् । अश्वघासादयः षष्ठीसमासा भविष्यन्ति । यद्धि यदर्थं भवत्ययमपि तत्राभिसंबन्धो भवत्यस्येदमिति । तद्यथा । गुरोरिदं गुर्वर्थमिति । ननु च स्वरभेदो भवति । चतुर्थीसमासे सति पूर्वपदप्रकृतिस्वरत्वेन भवितव्यं षष्ठीसमासे पुनरन्तोदात्तत्वेन । नास्ति भेदः । चतुर्थीसमासेऽपि सत्यन्तोदात्तत्वेनैव भवितव्यम् । कथम् । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति विकृतिश्चतुर्थ्यन्ता प्रकृतिस्वरा भवति न चतुर्थीमात्रमिति यदयं चतुर्थी तदर्थेऽर्थे क्ते च [६.२.४३-४५] इत्यर्थग्रहणं क्तग्रहणं च

---

वचनें करावयास नकोत. त्यांत आरंभीं जें म्हटलें आहे की 'विकृतिवाचकाचा प्रकृतिवाचकाबरोर समास होतो' तें वचन करावयास नको. कारण ज्यापेक्षां हा आचार्य बलि व रक्षित या शब्दांचें प्रकृत सूत्रांमध्यें ग्रहण करीत आहे त्यापेक्षां चतुर्थी विभक्ति शेवटीं असलेल्या अशा विकृतिवाचक शब्दाचाच प्रकृतिवाचक शब्दाबरोबर समास होतो असें तो सुचवितो.

कसें बरें हें ज्ञापक जमतें ?

ज्या प्रकारचे चतुर्थ्यन्त आणि तदर्थवाचक यांचा समास केला असतां बलि व रक्षित या शब्दांचें ग्रहण सार्थक होईल अशा प्रकारच्याच त्यांचा समास होतो. जर चतुर्थ्यन्त अशा विकृतिवाचकाचाच प्रकृतिवाचकाबरोबर समास होईल, केवळ तदर्थवाचक सर्वशब्दाबरोबर होणार नाहीं, तरच बलि व रक्षित या शब्दांचें ग्रहण सफल होतें.

आणखीही - अश्ववासः वगैरे समास साधण्यासाठीं वचन केलें पाहिजे असें जें म्हटलें आहे तेंही करावयास नको. कारण अश्ववासः वगैरे शब्द हे षष्ठी तत्पुरुषानें साधतील. कारण जें ज्याच्या उपयोगीं पडणारें असतें तेथें 'त्याचें तें' असाही संबंध संभवतो; जसें:— गुरोरिदं गुर्वर्थम्, वगैरे.

पण स्वरामध्यें फरक होत आहे; तो असा:— अश्वघासः येथें चतुर्थीसमास समास केला असतां 'चतुर्थी तदर्थे' (६।२।४३) यानें पूर्वपदाचा प्रकृतिस्वर होईल, आणि षष्ठीसमास केला तर 'समासस्य' (६।१।२२३) यानें अन्तोदात्त होईल.

हा फरक होत नाहीं. कारण चतुर्थीसमास केला तरी देखील अन्तोदात्तच होईल.

तो कसा ?

देवार्थम्, गोहितम्, येथें चतुर्थीसमास केला असतां पूर्वपदप्रकृतिस्वर होण्याकरितां 'चतुर्थी तदर्थे' याचे पुढें 'अर्थे' 'क्ते च' अशीं दोन सूत्रें ज्या पेक्षां आचार्यानें केलीं आहेत त्यापेक्षां 'चतुर्थी तदर्थे' या सूत्रानें विकृतिवाचक चतुर्थ्यन्तालाच पूर्वपदप्रकृतिस्वर होतो, वाटेल त्या चतुर्थ्यन्त शब्दाला होत नाहीं, असें त्यानें सुचविलें आहे.

---

१. तादर्थ्य म्हणजे त्याच्याकरितां असणें; हा एक विशेष प्रकारचा संबंध आहे, तेव्हां तेथें सामान्य संबंध त्यांचा असलाच पाहिजे. तादर्थ्य हा जो विशेष प्रकारचा संबंध त्यांतील फक्त विशेष अंश सोडून दिला म्हणजे जो उरेल तो सामान्य संबंधच होय. त्याची विवक्षा असतां षष्ठीविभक्ति करतां येईल.

करोति । कथं कृत्वा ज्ञापकम् । यथाजातीयकानां प्रकृतिस्वरत्वेऽर्थग्रहणेन क्तग्रहणेन चार्थस्तथाजातीयकानां प्रकृतिस्वरत्वम् । यदि च विकृतिश्चतुर्थ्यन्ता प्रकृत्या भवति न चतुर्थीमात्रं ततोऽर्थग्रहणं क्तग्रहणं चार्थवद्भवति ॥

यदप्युच्यतेऽर्थेन नित्यसमासो वक्तव्य इति । न वक्तव्यः । सर्थप्प्रत्ययः करिष्यते । किं कृतं भवति । न चैव हि कदाचित्प्रत्ययेन विग्रहो भवति । अपि च सर्वलिङ्गता सिद्धा भवति ॥ यदि सर्थेप्प्रत्ययः क्रियत इत्संज्ञा न प्राप्नोति । अथापि कथंचिदित्संज्ञा स्यादेवमपि श्र्यर्थम् भ्वर्थमित्यङ्क्स्येतीयङुवङौ स्याताम् ॥ एवं तर्हि बहुव्रीहिर्भविष्यति । किं कृतं भवति । भवति वै कश्चिदस्वपदविग्रहो बहुव्रीहिः । तद्यथा । शोभनं मुखमस्याः सुमुखीति । नैवं शक्यम् । इह हि महदर्थमित्यात्त्वकपौ प्रसज्येयाताम् ॥ एवं तर्हि तदर्थस्योत्तरपदस्यार्थशब्द आदेशः

---

कसें बरें हें ज्ञापक जमतें ?

अमुक प्रकारच्या चतुर्थ्यन्तालाच 'चतुर्थी तदर्थे' यानें पूर्वपदप्रकृतिस्वर होतो असा ज्या प्रकारचा नियम केला असतां 'अर्थे', 'क्ते च', हीं दोन सूत्रें सार्थक होतील अशा प्रकारचा तेथें नियम केला पाहिजे. तेव्हां जर 'चतुर्थी तदर्थे' यानें विकृतिवाचक अशाच चतुर्थ्यन्ताला प्रकृतिस्वर होईल, वाटेल त्या चतुर्थ्यन्ताला होणार नाहीं, तर 'अर्थे', 'क्ते च' हें सूत्रद्वय सफल होत आहे.

आणखीही जें 'अर्थशब्दाबरोबर चतुर्थ्यन्ताचा नित्य समास सांगावा' असें म्हटलें आहे तेंही वचन करावयास नको. कारण सर्थेप् असा प्रत्यय तादर्थ्य या अर्थी करण्यांत येईल.

तसा प्रत्यय करण्यांत काय फायदा होत आहे ?

प्रत्ययाबरोबर विग्रहवाक्य केव्हांही होत नाहीं. शिवाय त्या प्रत्ययान्ताला सर्व लिंगें लागू होणें हेंही साधत आहे. तेव्हां 'सर्वलिङ्गता च' हेंही वचन करावयास नको.

जर सर्थेप्प्रत्यय केला तर त्याच्या सकाराला इत्संज्ञा प्राप्त होत नाहीं.[६]

आतां जरी त्याला कशी तरी इत्संज्ञा होईल तरी पण श्र्यर्थम्, भ्वर्थम् येथें इयङ् उवङ् होऊं लागतील.

असा दोष येत आहे तर ब्राह्मणार्थम् इत्यादि स्थलीं बहुव्रीहि समास करण्यांत येईल.

असें करण्यांत काय साधत आहे ?

ज्याचा स्वपदाबरोबर विग्रह करतां येत नाहीं असाही बहुव्रीहि असतो; जसें– शोभनं मुखमस्याः सुमुखी.

येथें बहुव्रीहिसमास करणें शक्य नाहीं. कारण महदर्थम् येथें 'आन्महतः' (६।३।४६) यानें आत्व, आणि 'शेषाद्विभाषा' (५।४।

---

४. 'तदर्थं विकृतेः प्रकृतौ' (५।१।१२) येथें 'तदर्थे सर्थेप्' असें सूत्र करून चतुर्थ्यन्ताहून तदर्थ या अर्थी सर्थेप् असा प्रत्यय होतो असें विधान करतों. सकार इत्संज्ञक आहे, त्यामुळें भसंज्ञेचा बाध करून पदसंज्ञा (१।४।१६) होते, म्हणून लोप (६।४।४८) होत नाहीं; आणि नकार मागें असल्यास त्याचा लोप (८।२।७) होतो. तसाच पकार हाही इत्संज्ञक आहे; तो प्रत्ययाला अनुदात्तस्वर (३।१।४) होण्यासाठीं आहे. अर्थात् प्रकृतीला जो स्वर प्राप्त असेल तोच होईल.

५. तेव्हां ब्राह्मणाय अर्थम् असें विग्रहवाक्य न होण्यासाठीं जो नित्यशब्द घातला आहे तेंही काम या प्रत्ययाच्या कल्पनेनें सहज साधत आहे.

६. आदिर्ञिटुडवष्षः प्रत्ययस्य (१।३।५) येथें षः या पदाच्या मागें सकाराचा प्रश्लेष केला म्हणजे प्रत्ययाच्या आदिभूत सकाराला इत्संज्ञा होते, असा अर्थ होईल.

७. बहुव्रीहि केला म्हणजे अन्य पदार्थाप्रमाणें ब्राह्मणार्थशब्दाचा तिन्ही लिंगीं प्रयोग होईल. ज्या पदार्थाचा उपयोग ब्राह्मणाला आहे असा बहुव्रीहीचा अर्थ आहे. हा व्यधिकरण बहुव्रीहि आहे. या अर्थी ब्राह्मणाय अर्थो यस्य असा स्वपदविग्रह नाहीं.

करिष्यते। किं कृतं भवति। न चैव हि कदाचिदादेशेन विग्रहो भवति। अपि च सर्वलिङ्गतापि सिद्धा भवति॥ तर्हि वक्तव्यम्। न वक्तव्यम्। योगविभागः करिष्यते। चतुर्थी। चतुर्थी सुबन्तेन सह समस्यते। ततस्तदर्थार्थे। तदर्थस्योत्तरपदस्यार्थशब्द आदेशो भवति॥ इहापि तर्हि समासः प्राप्नोति। छात्राय रुचितम्। छात्राय स्वदितमिति। आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति तादर्थ्ये या चतुर्थी सा समस्यते न चतुर्थीमात्रमिति यदयं हितसुखग्रहणं करोति। कथं कृत्वा ज्ञापकम्। यथाजातीयकानां समासे हितसुखग्रहणेनार्थस्तथाजातीयकानां समासः। यदि च तादर्थ्ये या चतुर्थी सा समस्यते न चतुर्थीमात्रं ततो हितसुखग्रहणमर्थवद्भवति॥ इहापि तर्हि तदर्थस्योत्तरपदस्यार्थशब्द आदेशः प्राप्नोति। यूपाय दारु यूपदारु। रथदारु। वावचनं विधास्यते॥ इहापि तर्हि विभाषा

१५४) यानें बहुव्रीहिप्रयुक्त समासान्त कप्-प्रत्यय प्रसक्त होईल.

असें आहे तर तदर्थवाचक जें उत्तरपद त्याचे स्थानीं अर्थशब्द आदेश करण्यांत येईल.

असें करण्यांत काय साधत आहे?

आदेशाबरोबर केव्हांही विग्रहवाक्य मांडलें जात नाहीं. तेव्हां ब्राह्मणाय अर्थः असें वाक्य होणार नाहीं, आणि सर्व लिंगेंही साधत आहेत.

तर मग तदर्थवाचक उत्तरपदाला अर्थ-शब्द आदेश होण्यासाठीं तसें वचन केलें पाहिजे.

आदेशविधायक वचन करावयास नको. कारण योगविभाग करण्यांत येईल. तो असा:— 'चतुर्थी' एवढेंच एक सूत्र. चतुर्थ्यन्ताचा सुबन्ताबरोबर समास होतो; त्याचे पुढें 'तदर्थार्थे' असें दुसरें सूत्र. तदर्थवाचक उत्तर-पदाचे स्थानीं अर्थ असा आदेश होतो.

जर 'चतुर्थी' एवढेंच सूत्र केलें तर छात्राय रुचितम्, छात्राय स्वदितम्, येथेंही समास प्राप्त होत आहे.

ज्या अर्थी हा आचार्य हित व सुख या शब्दांबरोबर चतुर्थ्यन्ताचा समास सांगत आहे त्या अर्थी तादर्थ्य या अर्थाला दाखविणारी जी चतुर्थी तसल्याच चतुर्थ्यन्ताचा 'चतुर्थी' या सूत्रानें समास होतो, वाटेल त्या चतुर्थ्य-न्ताचा त्यानें समास होत नाहीं, असें तो सुच-वीत आहे.

कसें बरें हें ज्ञापक जमतें?

ज्या एक विशेष प्रकारच्या चतुर्थ्यन्ताच्या समासाचें विधान केलें असतां हित व सुख या शब्दांचें ग्रहण सार्थक होईल, तशा विशेष प्रकारच्याच चतुर्थ्यन्ताचा त्यानें समास होतो. जर तादर्थ्य या अर्थाला दाखविणारी जी चतुर्थी तदन्ताचाच समास होईल, म्हणजे सामान्यतः सर्वच चतुर्थ्यन्ताचा समास होणार नाहीं, तरच हित व सुख या शब्दांचें ग्रहण सफल होणार आहे.

तर मग यूपाय दारु यूपदारु, रथदारु, येथेंही तदर्थवाचक उत्तरपदाला अर्थ हा आदेश प्राप्त होत आहे.

महाविभाषेमुळें अर्थ या आदेशाचें विक-ल्पानें विधान केलें जाईल.

तर ब्राह्मणार्थम्, क्षत्रियार्थम्, येथेंही अर्थ या आदेशाचा विकल्प प्राप्त होत आहे.

---

कारण त्या वाक्यापासून विवक्षित अर्थाची प्रतीति होत नाहीं.

८. ब्राह्मणाय पयः येथें तादर्थ्यप्रयुक्त चतुर्थी समास केला असतां पयस् वगैरे तदर्थवाचक उत्तर-पदाला अर्थ हा आदेश करावयाचा, त्यामुळें तादर्थ्य गम्यमान असतां ब्राह्मणपयः असा प्रयोग होत नाहीं, व समास केला असतां समासांतील चतुर्थीचा लुक् झाला असल्यामुळें अर्थशब्द हा समासामध्यें आदेश होत असल्यामुळें त्यानें विग्रहवाक्य मांडतां येत नाहीं.

प्राप्नोति । ब्राह्मणार्थम् क्षत्रियार्थमिति । एवं तर्ह्याचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति प्रकृतिविकृत्योर्यः समासस्तत्र तदर्थस्योत्तरपदस्य वार्थशब्द आदेशो भवत्यन्यत्र नित्य इति यदयं बलिरक्षितग्रहणं करोति ॥ एवं तर्हि उदकार्थो वीवधः स्थानिवद्भावादुदभावः प्राप्नोति । तस्मान्नैवं शक्यम् । न चेदेवमर्थेन नित्यसमासो वक्तव्यः सर्वलिङ्गता च ॥ नैष दोषः । इदं तावदयं प्रष्टव्यः । अथेह ब्राह्मणेभ्य इति कैषा चतुर्थी । तादर्थ्य इत्याह । यदि तादर्थ्ये चतुर्थ्यर्थशब्दस्य प्रयोगेण न भवितव्यमुक्तार्थानामप्रयोग इति । समासोऽपि तर्हि न प्राप्नोति । वचनात्समासो भविष्यति ॥

यदप्युच्यते सर्वलिङ्गता च वक्तव्येति । न वक्तव्या । लिङ्गमशिष्यं लोकाश्रयत्वाल्लिङ्गस्य ॥

## पञ्चमी भयेन ॥२।१।३७॥

असें आहे तर ज्यापेक्षां हा आचार्य बलि आणि रक्षित या शब्दांचें ग्रहण करीत आहे त्यापेक्षां प्रकृतिविकृतिवाचकांचा जो समास तेथें तदर्थवाचक उत्तरपदाला विकल्पानें अर्थ हा आदेश होतो आणि अन्य ठिकाणीं नित्य होतो असें सुचवीत आहे.

असें आहे तर उदकार्थो वीवधः येथें वीवधशब्दाला अर्थ आदेश केला असतां स्थानिवद्भावानें (१।१।५६) वीवधशब्द पुढें असल्यामुळें 'मन्थौदनसक्तु०' (६।३।६०) यानें उदकशब्दाचे स्थानीं उदादेश एकदा प्राप्त होत आहे. एकंदरींत उत्तरपदाला अर्थ हा आदेश सांगणें शक्य नाहीं.

पण असा जर अर्थ आदेश सांगितला नाहीं तर 'अर्थशब्दाशीं चतुर्थ्यन्ताचा नित्यसमास होतो' असें वचन केलें पाहिजे, आणि 'त्याला तिन्ही लिंगें प्राप्त होतात' असेंही म्हटलें पाहिजे.

हा दोष येत नाहीं. अगोदर याला आम्ही असें विचारतों की ब्राह्मणेभ्यः ही चतुर्थी कोणत्या अर्थाला दाखवीत आहे ?

तादर्थ्य या अर्थाला दाखवीत आहे असें म्हणतों.

जर ही चतुर्थी तादर्थ्य या अर्थाला दाखविते तर येथें अर्थशब्दाचा प्रयोगच होऊं नये. कारण ज्यांचा अर्थ उक्त झाला असेल त्याचा पुनः प्रयोग होत नाहीं असा न्याय आहे म्हणूनं.

तर मग जर तादर्थ्यवाचक चतुर्थ्यन्ताबरोबर अर्थशब्दाचा प्रयोगच होऊं शकत नाहीं तर तेथें समास तरी कसा होणार ?

'चतुर्थी तदर्थार्थ०' यानें अर्थशब्दाबरोबर समासाचें विधान केलें असल्यामुळें त्या जोरावर समास करतांना त्या न्यायाला बाजूला सारून अर्थशब्दाचा प्रयोग करतां येईल.

आणखीही जें म्हटलें आहे की अर्थशब्दान्त चतुर्थीसमासाला सर्व लिंगें लागू होतात असें वचन करावें तेंही वचन करावयास नको. कारण कोणत्या शब्दाला कोणतें लिंग लागू करावयाचें हें लोकव्यवहारावरूनच ठरवावयाचें असल्यानें शास्त्रानें लिंगाचें विधान करावयास नको.

(सू.३७) भयशब्दाबरोबर असें जें म्हटलें आहे तें अगदींच थोडें आहे. म्हणून भय,

९. अर्थ हा आदेश वाटेल त्या चतुर्थीतत्पुरुषामध्यें विकल्पानें होत असेल तर कुबेराय बलिः कुबेरबलिः असा 'चतुर्थी' या योगविभागानें समास केला असतां तदर्थवाचक उत्तरपदाला विकल्पानें अर्थ हा आदेश होऊन कुबेरार्थो बलिः कुबेरबलिः असें रूपद्वय साधत असतां बलि व रक्षित या शब्दांचें ग्रहण निरुपयोगी होईल.

१०. तेव्हां ब्राह्मणाय अर्थः असें विग्रहवाक्य होणार नाहीं म्हणून समास नित्य होतो असें म्हणावयास नको.

१. भयशब्दाबरोबर पञ्चम्यन्ताचा विकल्पानें तत्पुरुषसमास होतो; जसें वृकाद्भयं वृकभयम्, वगैरे.

अत्यल्पमिदमुच्यते भयेनेति । भयभीतभीतिभीभिरिति वक्तव्यम् । वृकाद्भयं वृकभयम् । वृकाद्भीतो वृकभीतः । वृकाद्भीतिर्वृकभीतिः। वृकाद्भीर्वृकभीरिति।

अपर आह । भयनिर्गतजुगुप्सुभिरिति वक्तव्यम् । वृकभयम् ग्रामानिर्गतः अधर्मजुगुप्सुरिति ॥

[अपेतापोढमुक्तपतितापत्रस्तैरल्पशः ॥ २ । १ । ३८ ॥

स्तोकान्तिकदूरार्थकृच्छ्राणि क्तेन ॥ २ । १ । ३९ ॥]

**सप्तमी शौण्डैः ॥२।१।४०॥**

शौण्डादिभिरिति वक्तव्यम् । इहापि यथा स्यात् । अक्षधूर्तः स्त्रीधूर्तः । अक्षकितवः स्त्रीकितव इति ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । बहुवचननिर्देशाच्छौण्डादिभिरिति विज्ञास्यते ॥

[सिद्धशुष्कपक्वबन्धैश्च ॥ २ । १ । ४१ ॥]

**ध्वाङ्क्षेण क्षेपे ॥२।१।४२॥**

**ध्वाङ्क्षेणेत्यर्थग्रहणम् ॥ १ ॥**

ध्वाङ्क्षेण क्षेपेऽर्थग्रहणं कर्तव्यम् । इहापि यथा स्यात् । तीर्थकाक इति ॥ क्षेप इत्युच्यते क इह क्षेपो नाम । यथा तीर्थे काका न चिरं स्थातारो भवन्त्येवं यो गुरुकुलानि गत्वा न चिरं तिष्ठति स

---

भीत, भीति आणि भी या शब्दांबरोबर पञ्चम्यन्ताचा समास होतो असें म्हणावें; जसें:- वृकाद्भयं वृकभयम्, वृकभीतः, वृकभीतिः, वृकभीः.

येथें दुसरा कोणी असें म्हणतो की भयनिर्गतजुगुप्सुभिः 'भय, निर्गत आणि जुगुप्सु या शब्दांबरोबर पंचम्यन्ताचा समास होतो असें वचन करावें'; जसें:- वृकभयम्, ग्रामनिर्गतः, अधर्मजुगुप्सुः.

(सू.४०) शौण्ड, कितव, धूर्त इत्यादि शब्दांबरोबर असें म्हणावें. कारण अक्षधूर्तः, स्त्रीकितवाः येथेंही समास झाला पाहिजे.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण शौण्डैः असें बहुवचन घातलें असल्यामुळें शौण्ड, धूर्त, कितव इत्यादिक असा अर्थ समजला जाईल. कारण एरवीं बहुवचन जुळणार नाहीं.

(सू.४२, वा.१) ध्वाङ्क्षेण क्षेपे येथें अर्थग्रहण करावें, म्ह. 'ध्वाङ्क्षार्थेन क्षेपे' असें सूत्र करावें. कारण तीर्थकाकः येथेंही समास झाला पाहिजे.

येथें निन्दा गम्यमान असतांना असें म्हटलें आहे. तेव्हां तीर्थध्वाङ्क्षः या उदाहरणामध्यें कशी बरें निंदा प्रतीत होते ?

जसें क्षेत्रांतील कावळे एका जागीं क्षणभर सुद्धां असत नाहींत तसें जो गुरुगृहीं जाऊन चिरकालपर्यंत वास करीत नाहीं त्याला उद्देशून तीर्थध्वाङ्क्षः, तीर्थकाकः, वगैरे म्हटलें

---

१. अपेत, अपोढ, मुक्त, पतित आणि अपत्रस्त या शब्दांबरोबर कांहीं पञ्चम्यन्तांचा विकल्पानें तत्पुरुषसमास होतो; उदा०-सुखादपेतः सुखापेतः, चक्रमुक्तः, वगैरे.

१. स्तोक, अन्तिक, दूरार्थक शब्द आणि कृच्छ्र या शब्दांच्या पुढील जी पञ्चमी तदन्ताचा क्तप्रत्यय शेवटीं असलेल्या शब्दाबरोबर विकल्पानें तत्पुरुष समास होतो; जसें:-स्तोकान्मुक्तः, अन्तिकादागतः, दूरादागतः, कृच्छ्रान्मुक्तः, येथें 'पञ्चम्याः स्तोकादिभ्यः' (६।३।२) यानें अलुक् झाला आहे.

१. सप्तम्यन्ताचा शौण्ड, धूर्त, वगैरे शब्दांबरोबर विकल्पानें तत्पुरुषसमास होतो; जसें:-अक्षेषु शौण्डः अक्षशौण्डः.

१. सिद्ध, शुष्क, पक्व आणि बन्ध या शब्दांबरोबर सप्तम्यन्ताचा विकल्पानें तत्पुरुषसमास होतो; जसें:- सांकाश्ये सिद्धः, सांकाश्यसिद्धः, आतपे शुष्कः आतपशुष्कः, वगैरे.

१. ध्वाङ्क्ष या अर्थाला दाखविणाऱ्या शब्दांबरोबर सप्तम्यन्ताचा विकल्पानें तत्पुरुषसमास होतो, निंदा गम्यमान असेल तर; जसें:-तीर्थे ध्वाङ्क्ष इव तीर्थ-

उच्यते तीर्थकाक इति ।

## कृत्यैर्ऋणे ॥२।१।४३॥

## कृत्यैर्नियोगे यद्ग्रहणम् ॥ १ ॥

कृत्यैर्नियोग इति वक्तव्यम् । इहापि यथा स्यात् । पूर्वाह्णेगेयं साम । प्रातरध्येयोऽनुवाक इति ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । ऋण इत्येव सिद्धम् । इह यद्यस्य नियोगतः कार्यमृणं तस्य तद्भवति । तत्र ऋण इत्येव सिद्धम् ॥ यद्ग्रहणं च कर्तव्यम् । इह मा भूत् । पूर्वाह्णे दातव्या भिक्षेति ॥

## [संज्ञायाम् ॥२।१।४४॥

## क्तेनाहोरात्रावयवाः ॥२।१।४५॥

## तत्र ॥२।१।४६॥]

## क्षेपे ॥ २ । १ । ४७ ॥

किमुदाहरणम् । अवतप्तेनकुलस्थितं त एतत् ॥ क्षेप इत्युच्यते क इह क्षेपो नाम । यथावतप्ते नकुला न चिरं स्थातारो भवन्त्येवं कार्याण्यारभ्य यो न चिरं तिष्ठति स उच्यतेऽवतप्तेनकुलस्थितं त एतदिति ॥ क्षेपे सप्तम्यन्तं क्तान्तेन सह समस्यत इत्युच्यते तत्र सगतिकेन सन-

---

जाते.

(सू.४३, वा.१) कृत्यसंज्ञक जो यत्प्रत्यय तो शेवटीं असलेल्या शब्दांबरोबर सप्तम्यन्ताचा समास होतो, आवश्यक हा अर्थ गम्यमान असेल तर, असें सूत्र करावें. कारण पूर्वाह्णेगेयं साम, प्रातरध्येयोऽनुवाकः, येथेंही समास झाला पाहिजे.

तर मग तसें सूत्र केलें पाहिजे काय ?

तसें सूत्र करावयास नको. कारण ऋणे असा जो शब्द घातला आहे त्यानेंच आवश्यक हा अर्थ दाखविला जात आहे. म्हणजे ज्याला जी गोष्ट अवश्यकर्तव्य असते त्याला ती गोष्ट म्हणजे एक प्रकारचें ऋणच होय. तेव्हां तेथें ऋणे म्हणण्यानेंच काम भागेल.

यत्प्रत्ययाचें ग्रहण मात्र करावयास पाहिजे. कारण पूर्वाह्णे दातव्या भिक्षा येथें तव्यप्रत्ययान्ताबरोबर समास न झाला पाहिजे.

(सू.४७) या सूत्राचें उदाहरण काय ?

अवतप्तेनकुलस्थितं त एतत् हें होय.

निंदा गम्यमान असतांना असें म्हटलें पण येथें कशी बरें निंदा प्रतीत होत आहे ?

जसें तापलेल्या जाग्यावर एक क्षणभर देखील मुंगुस राहत नाहीं तसें जो माणूस आरंभिलेलें कार्य संपेपर्यंत त्यांत टिकाव धरून राहत नाहीं अशा चंचल वृत्तीच्या माणसाला उद्देशून हा प्रयोग करतात. निंदा गम्यमान असतांना सप्तम्यन्ताचा क्तप्रत्ययान्ताबरोबर समास होतो असें म्हटलें आहे. तेव्हां गतिसंज्ञकासकट व नकुल वगैरे कारकासकट असणाऱ्या क्तप्रत्ययान्ताबरोबर समास प्राप्त होत नाहीं.

निंदा गम्यनाम असतांना गतिसंज्ञकासकट व कारकासकट असणाऱ्या क्तप्रत्ययान्ताबरोबर

---

ध्वाङ्क्षः, तीर्थकाकः, वगैरे.

१. कृत्य नांवाचा प्रत्यय शेवटीं असलेल्या शब्दांबरोबर सप्तम्यन्ताचा विकल्पानें तत्पुरुष समास होतो, ऋण हा अर्थ गम्यमान असेल तर; जसें:– मासे देयं मासदेयम् ऋणम्.

१. (४४) सप्तम्यन्ताचा सुबन्ताबरोबर तत्पुरुषसमास होतो, संज्ञा गम्यमान असतांना; जसें:–अरण्येतिलकाः वनेकसेरुकाः. 'हलदन्तात्.' (६।३।९) यानें येथें सप्तमीचा अलुक् झाला आहे.

(४५) दिवसाचा किंवा रात्रीचा अवयवभूत जो अर्थ त्या अर्थाला दाखविणाऱ्या सप्तम्यन्ताचा क्तप्रत्यय शेवटीं असलेल्या शब्दाबरोबर विकल्पानें तत्पुरुषसमास होतो; जसें:– पूर्वाह्णे कृतं पूर्वाह्णकृतम्; पूर्वरात्रकृतम्, वगैरे.

(४६) तत्र या सप्तम्यन्ताचा क्तप्रत्ययान्ताबरोबर विकल्पानें तत्पुरुषसमास होतो; जसें:– तत्रभुक्तम्, तत्रकृतम्, वगैरे.

१. सप्तम्यन्ताचा क्तप्रत्ययान्त शब्दाबरोबर विकल्पानें तत्पुरुषसमास होतो, निंदा गम्यमान असेल तर; जसें:–अवतप्तेनकुलस्थितं त एतद्. येथें 'तत्पुरुषे कृति,'

कुलेन च समासो न प्राप्नोति ।

**क्षेपे गतिकारकपूर्व उक्तम् ॥ १ ॥**

किमुक्तम् । कृद्ग्रहणे गतिकारकपूर्वस्यापीति ॥

**पात्रेसमितादयश्च ॥२।१।४८॥**

किमर्थश्चकारः । एवकारार्थः । पात्रेसमितादय एव । क मा भूत् । परमं पात्रेसमिता इति ।

**पूर्वकालैकसर्वजरत्पुराणनवकेवलाः समानाधिकरणेन ॥२।१।४९**

इह कस्मादव्ययीभावो न भवति । एका नदी एकनदी । नदीभिः संख्येति प्राप्नोति । इह कश्चित्समासः पूर्वपदार्थप्रधानः कश्चिदुत्तरपदार्थप्रधानः कश्चिदन्यपदार्थप्रधानः कश्चिदुभयपदार्थप्रधानः । पूर्वपदार्थप्रधानोऽव्ययीभावः । उत्तरपदार्थप्रधानस्तत्पुरुषः । अन्यपदार्थप्रधानो बहुव्रीहिः । उभयपदार्थप्रधानो द्वन्द्वः । न चात्र पूर्वपदार्थप्राधान्यं गम्यते ॥ अथवाव्ययीभावः क्रियतां तत्पुरुष इति तत्पुरुषो भविष्यति विप्रतिषेधेन । भवेदेकसंज्ञाधिकारे सिद्धं परं-

---

समास होण्याबद्दल सांगितलें आहे.

(वा.१) तें काय सांगितलें आहे ?

जेथें कृद्ग्रहण केलें असेल तेथें कृत्प्रत्ययानें गतिकारक मागें असलेल्या अशाही कृदन्ताचें ग्रहण करावें.

(सू.४८) सूत्रामध्यें 'च' हा शब्द घातला आहे त्याचा अर्थ काय ?

एव या शब्दाचा जो अर्थ म्हणजे अवधारण त्या अर्थीं हा चशब्द घातला आहे. तेव्हां पात्रेसमित वगैरे हेच शब्द तत्पुरुषसंज्ञक होतात असा अर्थ झाल्यामुळें या शब्दांबरोबर दुसऱ्या एखाद्या शब्दाचा समास होत नाहीं. त्यामुळें परमं पात्रेसमिताः येथें समास कर्मधारय होत नाहीं.

(सू.४९) एका नदी एकनदी येथें अव्ययीभाव कां बरें होत नाहीं ? नदीवाचकाबरोबर संख्यावाचकाचा जो अव्ययीभाव समास सांगितला आहे (२।१।२०) तो येथें प्राप्त होत आहे.

हा दोष येत नाहीं, कारण कांहीं सामासिक शब्द असे असतात की ज्यांमध्यें पूर्वपदाच्या अर्थाला प्राधान्य असतें, कांहींमध्यें उत्तरपदाच्या अर्थाला प्राधान्य असतें, कांहींमध्यें अन्यपदार्थाला प्राधान्य असतें, आणि कांहींमध्यें दोन्ही पदांच्या अर्थांना प्राधान्य असतें. त्यांत पूर्वपदाच्या अर्थाला प्राधान्य असलेला अव्ययीभाव होय, उत्तरपदाच्या अर्थाला प्राधान्य असलेला तत्पुरुष होय, अन्यपदाच्या अर्थाला प्राधान्य असलेला बहुव्रीहि होय आणि दोन्हीही पदांच्या अर्थांना प्राधान्य असलेला द्वंद्व होय. आणि एकनदी या प्रकृत उदाहरणामध्यें तर पूर्वपदाच्या अर्थाला प्राधान्य अनुभवांत येत नाहीं. तेव्हां अर्थातच येथें अव्ययीभाव होत नाहीं.

किंवा प्रकृत उदाहरणामध्यें अव्ययीभाव करावा किंवा तत्पुरुष करावा असा विचार उत्पन्न झाला असतां विप्रतिषेध असल्यामुळें परत्वास्तव तत्पुरुष होईल.

'आकडारादेका संज्ञा' असा पाठ घेऊन एकाला एकच संज्ञा होते असा पक्ष स्वीकारिला असतां अव्ययीभावसंज्ञेचा बाध करून तत्पुरुषसंज्ञा होईल आणि एकनदी हें रूप

---

(६।२।१४) यानें सप्तमीचा अलुक् झाला आहे.

१. पात्रेसमित, गेहेशूर, वगैरे पात्रेसमितादि गणामध्यें पठित असलेले शब्द तत्पुरुषसमाससंज्ञक होतात, निंदा गम्यमान असतांना; जसें:–पात्रेसमिताः पात्रेबहुलाः, गेहेशूर, वगैरे. निपातनामुळें सप्तमीचा लुक् झाला नाहीं.

१. पूर्वकालवाचक, एक, सर्व, जरत्, पुराण, नव, केवल, या सुबन्त शब्दांचा समानाधिकरण (समानार्थप्रतिपादक) अशा सुबन्ताबरोबर विकल्पानें तत्पुरुष समास होतो; पूर्वं स्नातः पश्चादनुलिप्तः स्नातानुलिप्तः, एकभिक्षा, सर्वदेवाः, केवलान्नम् वगैरे.

कार्यत्वे तु न सिध्यति । आरम्भसामर्थ्याच्चाव्ययीभावः प्राप्नोति परंकार्यत्वाच्च तत्पुरुषः प्राप्नोति । परंकार्यत्वे च न दोषः । कथम् । नदीभिः समाहारेऽव्ययीभावो वक्तव्यः । स चावश्यं वक्तव्यः ।

सर्वमेकनदीतरे ॥

[दिक्संख्ये संज्ञायाम् ॥२।१।५०॥]

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये द्वितीयस्याध्यायस्य प्रथमे पादे द्वितीयमाह्निकम् ॥

---

साधेल.

पण 'आकडारात्परं कार्यम्' असा पाठ घेऊन परकार्य करावें असा पक्ष गृहीत धरला असतां साधत नाहीं. कारण अव्ययीभावाचें विधान केल्याचे जोरावर अव्ययीभाव प्राप्त होत आहे आणि परकार्य करावें असें विधान केलें असल्यामुळें तत्पुरुष प्राप्त होत आहे.

परकार्य करावें या पक्षींही हा दोष येत नाहीं. तो कसा ?

संख्यावाचक शब्दाचा नदीवाचक शब्दाबरोबर जो अव्ययीभावसमास सांगितला आहे तो समाहार या अर्थी होतो असें वचन करावें. आणि तें वचन तर अवश्य केलेंच पाहिजे. नाहीं तर 'सर्वमेकनदीतरे' या पद्यांतील एकनदी या प्रयोगामध्यें तत्पुरुषाचा बाध करून अव्ययीभाव होऊं लागेल.

याप्रमाणें भगवान् पतंजलिऋषींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्यांतील दुसऱ्या अध्यायाच्या पहिल्या पादांतील दुसरें आन्हिक समाप्त झालें.

---

१. दिग्वाचक आणि संख्यावाचक या शब्दांचा समानाधिकरण सुबन्ताबरोबर तत्पुरुषसमास विकल्पानें होतो, संज्ञा गम्यमान असतांना.

**तद्धितार्थोत्तरपदसमाहारे च ॥ २।१।५१ ॥**

समाहार इति कोऽयं शब्दः। समाङ्पूर्वाद्धरतेः कर्मसाधनो घञ्। समाह्रियते समाहार इति॥ यदि कर्मसाधनः पञ्च कुमार्यः समाहृताः पञ्चकुमारि दशकुमारि गोस्त्रियोरुपसर्जनस्य [१.२.४८] इति ह्रस्वत्वं न प्राप्नोति द्विगुरेकवचनम् [२.४.१] इत्येतच्च वक्तव्यम्॥ एवं तर्हि भावसाधनो भविष्यति। समाहरणं समाहारः। अथ भावसाधने सति किमभिधीयते। यत्तदौत्तराधर्यम्। कः पुनर्गवां समाहारः। यत्तदर्जनं क्रयणं भिक्षणमपहरणं वा। यद्येवं त्रिक्षिप्तेषु पूलेषु

(सू.५१) समाहार ह्या शब्दाचा काय अर्थ आहे ?

सम् आणि आङ् ह्या दोन उपसर्गांच्या पुढें हृधातूहून कर्म या अर्थी 'अकर्तरि च०' (३।३।१९) यानें घञ्प्रत्यय केला आहे. तेव्हां समाह्रियते इति समाहारः म्हणजे एका ठिकाणीं जुळविलेल्या वस्तु अशा अर्थाचा येथें समाहारशब्द आहे.

जर समाहारशब्दामध्यें कर्म या अर्थी घञ्प्रत्यय केला असेल तर पञ्चकुमार्यः समाहृताः पञ्चकुमारि, दशकुमारि, येथें 'गोस्त्रियोः' (१।२।४८) यानें ऱ्हस्व प्राप्त होणार नाहीं; आणि 'द्विगुरेकवचनम्' (२।४।१) 'समाहारद्विगुसमासाला एकवचन लागू होतें' हें सूत्रही केलें पाहिजे.

असें आहे तर सम्, आङ्, ह्या उपसर्गांच्या पुढील हृधातूहून 'भावे' (३।३।१८) या सूत्रानें भाव या अर्थी घञ्प्रत्यय होईल. तेव्हां समाहरणं समाहारः म्हणजे एकत्र जुळविणें, समुदाय, या अर्थाचा समाहारशब्द होईल.

आतां समाहारशब्दामध्यें भाव या अर्थी घञ्प्रत्यय केला असेल तर या शब्दानें काय अर्थ दाखविला जाईल ?

एकावर एक अशा क्रमानें वस्तूंची स्थिति हा अर्थ दाखविला जाईल.

पण तसा अर्थ घेतला तर गायींचा समाहार म्हणजे काय बरें समजावें ? का त्या अनेक गाईंचें एका ठिकाणीं करणें, विकणें, मागणें किंवा अपहार करणें हा गाईंचा समाहार समजावा ? समाहारशब्दाचा वरीलप्रमाणें अर्थ गृहीत धरला तरी ज्या ठिकाणीं भारे वगैरे पदार्थ पसरून ठेविले असतील किंवा ज्या

---

१. तद्धितार्थ विषय असतां, उत्तरपद पुढें असतां किंवा समाहार वाच्य असतां दिग्वाचक शब्दाचा किंवा संख्यावाचक शब्दाचा समानाधिकरण सुबन्ताबरोबर विकल्पानें तत्पुरुषसमास होतो. त्यांत संख्यावाचक शब्दाचा जो तत्पुरुषसमास होतो त्याला द्विगु अशी अधिक संज्ञा होते; जसें:–पूर्वस्यां शालायां भवः पौर्वशालः, पाञ्चकपालः, पूर्वशालाप्रियः, पञ्चगवधनः, पञ्चपूली.

२. समाहारशब्दामध्यें कर्म या अर्थी घञ्प्रत्यय केला तर जुळविलेल्या कुमारी वगैरे वस्तु असा समाहारशब्दाचा अर्थ होईल, आणि त्याच अर्थी समास झाला तर त्या कुमारी वगैरे वस्तूंच्या समुदायाला प्राधान्य येणार नाहीं, आणि त्या वस्तूंनाच प्राधान्य येईल. तेव्हां अर्थातच तेथें विभक्ति नियत नसल्यामुळें उपसर्जनसंज्ञा (१।२।४४) होणार नाहीं आणि ऱ्हस्व होणार नाहीं. तसेंच समासाचा अर्थ अशा ज्या कुमारी वगैरे वस्तु त्या अनेक असल्यामुळें समाहारद्विगूच्या पुढें बहुवचनच नेहमीं येणार, एकवचन केव्हांही येणार नाहीं. म्हणून 'द्विगुरेकवचनम्' (२।४।१) हें सूत्र केलें पाहिजे; आणि भाव या अर्थी घञ्प्रत्यय घेतला तर समुदाय हा समाहारशब्दाचा अर्थ होतो आणि तोच समासाचा अर्थ असल्यामुळें कुमारी वगैरे वस्तु अप्रधान होतात, आणि अप्रधानाचा प्रधानाशीं संबंध नियत असल्यामुळें अप्रधान हें नियतविभक्तिक असतें, म्हणून त्याला उपसर्जनसंज्ञा होऊन ऱ्हस्व होतो. तसेंच समुदाय हा अर्थ एकच असल्यामुळें समाहारद्विगूच्या पुढें एकवचनच होणार. म्हणून 'द्विगुरेकवचनम्' हें सूत्र करावें लागणार नाहीं.

गोषु चरन्तीषु न सिध्यति ॥ एवं तर्हि समभ्याशीकरणं समाहारः । एवमपि पञ्चग्रामी षण्णगरी त्रिपुरीति न सिध्यति । किं कारणम् । समेकत्ववाच्याङाभिमुख्ये वर्तते हरतिर्देशान्तरप्रापणे । नावश्यं हरतिर्देशान्तरप्रापण एव वर्तते । किं तर्हि । सादृश्येऽपि वर्तते । तद्यथा । मातुरनुहरति । पितुरनुहरति ॥ अथवा पञ्चग्रामी षण्णगरी त्रिपुरीति नैवेदमियत्येवावतिष्ठते । अवश्यमसौ ततः किंचिदाकाङ्क्षति क्रियां गुणं वा । यदाकाङ्क्षति तदेकं स च समाहारः ॥ अयं तर्हि भावसाधने सति दोषः । पञ्चपूल्यानीयतामिति भावानयने चोदिते द्रव्यानयनं न प्राप्नोति । नैष दोषः । इदं तावदयं प्रष्टव्यः । अथेह गौरनुबन्ध्योऽजोऽग्नीषोमीय इति कथमाकृतौ चोदितायां द्रव्य आरम्भणालम्भनप्रोक्षणविशसनानि क्रियन्त इति । असंभवात् । आकृतावारम्भणादीनां संभवो नास्तीति कृत्वाकृतिसह-

ठिकाणीं इतस्ततः गाई चरत असतील तेथें समाहारसिद्ध होत नाहीं.[3]

असें आहे तर मग 'अनेक पदार्थ जवळजवळ करणें' एवढाच समाहारशब्दाचा अर्थ समजावा.

समाहारशब्दाचा वरीलप्रमाणें अर्थ गृहीत धरला तरी देखील पञ्चग्रामी, षण्णगरी, त्रिपुरी, हे प्रयोग सिद्ध होत नाहींत.

काय कारण ?

समाहार या शब्दांतील सम् हा शब्द एक या अर्थाला दाखवीत आहे, व आङ् हा आभिमुख्य या अर्थीं आहे. आणि हृधातु इतर ठिकाणीं नेणें या अर्थाचा आहे.[4]

हृधातु दुसऱ्या प्रदेशीं नेणें याच अर्थी नेहमीं असतो असें नाहीं.

तर काय ?

सारखेपणा या अर्थींही आहे; जसें— मातुरनुहरति,[5] पितुरनुहरति. अथवा पञ्चग्रामी, षण्णगरी, त्रिपुरी वगैरे शब्दांचा प्रयोग करणारा तेवढाच प्रयोग करून कांहीं थांबत नाहीं, तर त्याला त्या पांच गांव, वगैरेसंबंधानें कांहीं तरी सांगावयाचें असतें. तें जें काय एखादी क्रिया किंवा एखादा गुण वगैरे कांहीं तरी एक सांगावयाचें असेल तोच तेथें समाहार होय.

तर मग समाहार या शब्दामध्यें भाव या अर्थी घञ्प्रत्यय घेतला तर असा दोष येतो की पञ्चपूली आनीयताम् या वाक्यानें समाहार आणावयास सांगितला असें होईल. ज्यांचा समाहार असे भारे वगैरे पदार्थ आणावयास सांगितले असा अर्थ मनांत येणार नाहीं. आणि लोकांत पहावें तर ते पदार्थ आणिले जातात.

हा दोष येत नाहीं. येथें अगोदर त्याला असें विचारावें की— गौरनुबन्ध्यः अजोऽग्नीषोमीयः या वाक्यामध्यें गो व अज या शब्दांनीं गोत्व, अजत्व या जातींचा निर्देश केला असतांही क्रय, स्पर्श, प्रोक्षण व विशसन वगैरे क्रिया त्या जातीच्या पशूला कां बरें करतात ? आतां गोत्व, अजत्व वगैरे जाति अमूर्त असल्यामुळें त्या जातीचे ठिकाणीं क्रय, स्पर्श वगैरे संभवत नाहींत म्हणून त्या जातींशीं संबद्ध असलेल्या द्रव्याचे ठिकाणीं क्रय, स्पर्श वगैरे केलीं जातात. असें असेल तर येथेंही

३. तेव्हां तशा ठिकाणीं पञ्चपूली, पञ्चगवम्, इत्यादि प्रयोग होणार नाहींत.

४. आणि पञ्चग्रामी वगैरे उदाहरणांमध्यें ग्राम वगैरे पदार्थ कांहीं इतर ठिकाणीं नेले जात नाहींत. तेव्हां तेथें समाहारशब्दाचा अर्थ जुळत नाहीं.

५. आईसारखा आहे, बापासारखा आहे, असा याचा अर्थ आहे. तेव्हां कोणत्याही धर्मानें सारख्या अशा अनेक पदार्थांचा एक वर्ग करणें याला समाहार म्हणतात. हा अर्थ सर्व ठिकाणीं जुळतो.

चरिते द्रव्य आरम्भणादीनि क्रियन्ते। इदमप्येवंजातीयकमेव। असंभवाद्भावानयनस्य द्रव्यानयनं भविष्यति॥ अथवाव्यतिरेकाद्द्रव्याकृत्योः॥

किं पुनर्द्विगुसंज्ञा प्रत्ययोत्तरपदयोर्भवति। एवं भवितुमर्हति।

**द्विगुसंज्ञा प्रत्ययोत्तरपदयोश्चेदितरेतराश्रयत्वादप्रसिद्धिः॥ १॥**

द्विगुसंज्ञा प्रत्ययोत्तरपदयोश्चेदितरेतराश्रयत्वादप्रसिद्धिः। केतरेतराश्रयता। द्विगुनिमित्ते प्रत्ययोत्तरपदे प्रत्ययोत्तरपदनिमित्ता च द्विगुसंज्ञा तदेतदितरेतराश्रयं भवति। इतरेतराश्रयाणि च न प्रकल्पन्ते॥ एवं तर्ह्यर्थे इति वक्ष्यामि।

**अर्थे चेत्तद्धितानुत्पत्तिर्बहुव्रीहिवत्॥२**

अर्थे चेत्तद्धितोत्पत्तिर्न प्राप्नोति। पाञ्चनापितिः द्वैमातुरः त्रैमातुरः। किं कारणम्। द्विगुनोक्तत्वाद्बहुव्रीहिवत्।

---

तसेंच समजावें. म्हणजे पञ्चफली आनीयताम् येथें समाहाराचें आणणें संभवत नसल्यामुळें ज्यांचा समाहार असतो ते पदार्थ आणिले जातील.

किंवा द्रव्य आणि जाति या परस्परांचा भेद केवळ काल्पनिक असून तो वास्तविक नाहीं. तर वास्तविक अभेदच आहे. त्याप्रमाणें पदार्थ आणि त्यांचा समुदाय या परस्परांचाहि वास्तविक भेद नसल्यामुळें पदार्थ आणिले जातात.

पण[६] काय ही द्विगुसंज्ञा प्रत्यय किंवा उत्तरपद पुढें असतांना होते?

होय. असें होणें योग्य आहे.

(वा.१) द्विगुसंज्ञा ही प्रत्यय किंवा उत्तरपद पुढें असतांना होत असेल तर अन्योन्याश्रय येत असल्यामुळें द्विगुसंज्ञाच सिद्ध होणार नाहीं.

तो अन्योन्याश्रय कसा?

तद्धितप्रत्यय आणि उत्तरपद यांवर अवलंबून द्विगुसंज्ञा, आणि द्विगुसंज्ञेवर अवलंबून प्रत्यय[७] व उत्तरपद, असें आहे म्हणून अन्योन्याश्रय होत आहे; आणि एकमेकांवर अवलंबून असलेलीं कार्यें तर घडून येतच नाहींत.

असें आहे तर तद्धितशब्दाच्या पुढें अर्थशब्द घालतां येईल.

(वा.२) तद्धितार्थ वाच्य असतां द्विगुसमास होतो असें म्हटलें तर द्वैमातुरः, त्रैमातुरः, पाञ्चनापितिः, येथें तद्धितप्रत्यय प्राप्त होऊं शकत नाहीं.

काय कारण?

द्विगुसमासानें तद्धितार्थ उक्त झाला आहे

---

६. सूत्रामध्यें जो अर्थशब्द घातला आहे तो घातला नाहीं तर काय होईल हा विचार येथून चालू आहे.

७. पञ्चसु कपालेषु संस्कृतः या अर्थी 'पञ्चकपाल' असा समास करून प्रातिपदिकसंज्ञा झाली असतां 'संस्कृतं भक्षाः' (४।२।१६) यानें अण्प्रत्यय व्हावा, आणि तो प्रत्यय पुढें असतां द्विगुसमास व्हावा, असा अन्योन्याश्रयरूपदोष येतो. तसेंच पञ्चगवधनः येथेंही 'समास हा दोन पदांचाच होतो' या पक्षीं पञ्च आणि गो या दोन पदांचा समास झाल्यानंतरच मग धनशब्दाबरोबर बहुव्रीहि करतां येईल, आणि बहुव्रीहि केल्यानंतर धन या उत्तरपदामुळें पञ्चन् आणि गो या पदांचा द्विगुसमास करतां येईल असा अन्योन्याश्रय येतो.

८. अर्थशब्द घातला म्हणजे तद्धितप्रत्ययाच्या अर्थी द्विगुसमास होतो असा अर्थ होईल; तेव्हां द्विगुसमासाला तद्धित प्रत्यय निमित्त नसल्यामुळें अन्योन्याश्रय येत नाही. तसेंच बहुव्रीहिसमास हा दोहोंपेक्षां अधिक पदांचाही करतां येतो असा पक्ष घेतला म्हणजे द्विगुसमास करण्याच्या पूर्वीही बहुव्रीहि करतां येतो, तेव्हां तोही अन्योन्याश्रय येत नाहीं.

९. द्विमातृ या द्विगुसमासाहून अपत्य या अर्थी अण्प्रत्यय, आदिवृद्धि (७।२।११७) आणि ऋकाराला उकार आदेश (४।१।११५) रपर (१।१।५१) होऊन द्वैमातुर हा शब्द सिद्ध होतो.

तद्यथा । चित्रगुः शबलगुरिति बहुव्रीहिणोक्तत्वान्मत्वर्थस्य मत्वर्थीयो न भवति ॥ एवं तर्हि समासतद्धितविधाविति वक्ष्यामि ।

**समासतद्धितविधाविति चेदन्यत्र समाससंज्ञाभावः ॥ ३ ॥**

समासतद्धितविधाविति चेदन्यत्र समाससंज्ञा न प्राप्नोति । क्वान्यत्र । स्वरे । पञ्चारत्निः दशारत्निः । इगन्ते द्विगावित्येष स्वरो न प्राप्नोति ।

**सिद्धं तु प्रत्ययोत्तरपदयोश्चेति वचनात् ॥ ४ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । प्रत्ययोत्तरपदयोश्चेति वचनात् । प्रत्ययोत्तरपदयोर्द्विगुसंज्ञा भवतीति वक्तव्यम् ॥ ननु चोक्तं द्विगुसंज्ञा प्रत्ययोत्तरपदयोश्चेदितरेतराश्रयत्वादप्रसिद्धिरिति । नैष दोषः । इतरेतराश्रयमात्रमेतच्चोदितं सर्वाणि चेतरेतराश्रयाण्येकत्वेन परिहृतानि सिद्धं तु नित्यशब्दत्वादिति । नेदं तुल्यमन्यैरितरेतराश्रयैः । न हि संज्ञा नित्या ॥ एवं तर्हि भाविनी संज्ञा विज्ञास्यते । तद्यथा ।

---

म्हणून. जसें चित्रगुः, शबलगुः, येथें बहुव्रीहिसमासानें मतुप्प्रत्ययाचा अर्थ उक्त झाला असल्यामुळें मत्वर्थीय प्रत्यय होत नाहींत तसेंच हें होय.

असें आहे तर 'समासतद्धितविधौ' असें म्हणतां येईल[१०].

(वा.३) समास किंवा तद्धित कर्तव्य असतां द्विगुसंज्ञा होते असें म्हटलें तर समास किंवा तद्धित याहून अन्यविधि कर्तव्य असतां द्विगुसंज्ञा होणार नाहीं.

तो अन्यविधि कोणता ?

स्वरविधि होय. म्हणजे पञ्चारत्निः, दशारत्निः, येथें 'इगन्तकाल०' (६।२।२९) यानें इगन्त उत्तरपद पुढें असतांना द्विगुसमासामध्यें पूर्वपदाला प्रकृतिस्वर सांगितलेला आहे तो होणार नाहीं.

(वा.४) स्वर वगैरे सर्व कार्यांविषयीं द्विगुसंज्ञा होणें ही गोष्ट साधत आहे.

ती कशी ?

प्रत्यय किंवा उत्तरपद पुढें असतांना द्विगुसंज्ञा होते असें येथें म्हटलें म्हणजे सर्व साधेल.

पण प्रत्यय किंवा उत्तरपद पुढें असतांना द्विगुसंज्ञा होते असें म्हटलें तर अन्योन्याश्रयदोष येत असल्यामुळें द्विगुसंज्ञाच सिद्ध होणार नाहीं असें पूर्वी सांगितलें आहे ना ?

हा दोष येत नाहीं. अन्योन्याश्रय येतो येवढेंच पूर्वी सांगितलें आहे. परंतु जेवढे म्हणून अन्योन्याश्रय येतात त्या सर्वांचा सामान्यतः परिहार 'सिद्धं तु नित्यशब्दत्वात्' (१।१।१, वा.९) म्हणजे शब्द हे नित्य आहेत असा सांगितलाच आहे[११].

इतर ठिकाणचे जे अन्योन्याश्रयदोष त्यांसारखी या प्रकृत अन्योन्याश्रयाची स्थिति नाहीं. कारण संज्ञा ही नित्य नाहीं[१२].

असें आहे तर भाविनी (पुढें होणारी) संज्ञा समजण्यांत येईल. तें असें– कोणी एक गृहस्थ एका कोष्टयाला म्हणतो की– या सुताचा

---

१०. धनशब्दाबरोबर बहुव्रीहि कर्तव्य असतां त्याच्या अगोदरच पञ्च आणि गो या शब्दांचा द्विगुसमास होतो म्हणून अन्योन्याश्रय येत नाहीं.

११. जर नवीन तद्धितप्रत्यय करावयाचा असेल तर अन्योन्याश्रय येईल. पण शब्द हे मूळचे सिद्धच आहेत; फक्त व्याकरणानें त्यामध्यें हा द्विगु, हा तद्धित, अशी कल्पना केली आहे.

१२. तेव्हां द्वैमातुर हा शब्द जरी मूळचाच आहे तरी त्यांतील शेवटच्या अकाराला तद्धितप्रत्यय ही संज्ञा झाल्यानंतरच पूर्वीच्या भागाला द्विगुसंज्ञा होणार असल्यामुळें अन्योन्याश्रय येथें कायम राहतोच.

कश्चित्कंचित्तन्तुवायमाह । अस्य सूत्रस्य शाटकं वयेति । स पश्यति यदि शाटको न वातव्योऽथ वातव्यो न शाटकः शाटको वातव्यश्चेति विप्रतिषिद्धम् । भाविनी खल्वस्य संज्ञाभिप्रेता स मन्ये वातव्यो यस्मिन्नुते शाटक इत्येतद्भवतीति। एवमिहापि तस्मिन्द्विगुर्भवति यस्याभिनिर्वृत्तस्य प्रत्यय उत्तरपदमिति चैते संज्ञे भविष्यतः ॥ अथवा पुनरस्त्वर्थ इति । ननु चोक्तमर्थे चेत्तद्धितानुत्पत्तिर्बहुव्रीहिवदिति । नैष दोषः । नावश्यमर्थशब्दोऽभिधेय एव वर्तते । किं तर्हि । स्यादर्थेऽपि वर्तते । तद्यथा । दारार्थं घटामहे । धनार्थं भिक्षामहे । दारा नः स्युर्धनानि नः स्युरिति । एवमिहापि तद्धितार्थे द्विगुर्भवति तद्धितः स्यादिति ॥

**द्विगोर्वा लुग्वचनं ज्ञापकं तद्धितोत्पत्तेः ॥ ५ ॥**

अथवा यदयं द्विगोर्लुगनपत्ये [४.१.८८] इति द्विगोरुत्तरस्य तद्धितस्य लुकं शास्ति तज्ज्ञापयत्याचार्य उत्पद्यते द्विगोस्तद्धित इति ॥

**समाहारसमूहयोरविशेषात्समाहारग्रहणानर्थक्यं तद्धितार्थेन कृतत्वात् ॥६**

समाहारः समूह इत्यविशिष्टावेतावर्थौ । समाहारसमूहयोरविशेषात्समा-

---

शेला वीण. तें ऐकून कोष्टी मनांत विचार करीत आहेः 'ज्यापेक्षां हा गृहस्थ शेला असा शब्द वापरीत आहे त्यापेक्षां तो सिद्धच असला पाहिजे. विणावयाचा नाहीं. बरें आतां तो विणावयाचा असेल तर तो सिद्ध नसल्यामुळें शेला असा शब्द वापरतां येणार नाहीं. तेव्हां शेला आणि वीण हें म्हणणें परस्परविरुद्ध होतें. तेव्हां शेला ही संज्ञा पुढें होणारी आहे असें या गृहस्थाला इष्ट आहे, म्हणजे विणला असतां ज्याला शेला हें नांव मिळेल असा वीण असें तो गृहस्थ समजत आहे.' त्याप्रमाणें येथेंही असा शब्द पुढें असतांना द्विगुसमास होतो की त्या द्विगूच्या पुढें तो जोडला अशी कल्पना केली असतां ज्याला प्रत्यय किंवा उत्तरपद हें नांव मिळेल.

किंवा अर्थ असा शब्द सूत्रामध्यें घालतां येईल.

पण तद्धितार्थे वाच्य असतांना द्विगुसमास होतो असें म्हटलें तर बहुव्रीहीच्या पुढें जसा मत्वर्थीय प्रत्यय होत नाहीं तसा द्विगूच्या पुढेंही तद्धित प्रत्यय उत्पन्न होऊं शकणार नाहीं असें पूर्वी म्हटलें आहे ना?

हा दोष येत नाहीं. कारण अर्थशब्द हा वाच्य या अर्थीच आहे असें नाहीं.

तर काय?

स्यात् म्हणजे व्हावें, असावें, या अर्थीही आहे; जसें– दारार्थं घटामहे, म्ह. भार्या असावी, म्हणून प्रयत्न करीत आहोंत, किंवा धनार्थं भिक्षामहे म्ह. धन असावें याकरितां भिक्षा मागत आहोंत, असा अर्थ मनांत येतो, त्याप्रमाणें येथेंही तद्धितार्थे द्विगुः स्यात् म्हणजे तद्धितप्रत्यय उत्पन्न व्हावा म्हणून द्विगुसमास होतो असा अर्थ होईल.

(वा.५) अथवा ज्यापेक्षां हा आचार्य 'द्विगोर्लुगनपत्ये' (४।१।८८) या सूत्रानें द्विगुसमासाच्या पुढील तद्धिताच्या लुकाचें अनुशासन करीत आहे त्यापेक्षां द्विगूच्या पुढें तद्धितप्रत्यय उत्पन्न होतो असें सुचवीत आहे. तेव्हां तद्धितार्थे वाच्य असतां द्विगुसमास होतो असें म्हटलें तरी दोष येत नाहीं असें तात्पर्य.

(वा.६) समाहार आणि समूह या दोन्ही शब्दांचा अर्थ एकच असल्यामुळें समाहारग्रहण व्यर्थ होत आहे.

---

१३. वस्तुतः सुतें वीण असें म्हटलें पाहिजे. कारण विणणें ही क्रिया सुतावर घडावयाची आहे, शेल्यावर नाहीं.

हारग्रहणमनर्थकम् । किं कारणम् । तद्धितार्थेन कृतत्वात् । तद्धितार्थे द्विगुरित्येवमत्र द्विगुर्भविष्यति ॥ यदि तद्धितार्थे द्विगुरित्येवमत्र द्विगुर्भवति तद्धितोत्पत्तिः प्राप्नोति । उत्पद्यतां लुग्भविष्यति । लुक्कृतानि प्राप्नुवन्ति । कानि । पञ्चपूली दशपूली । अपरिमाणबिस्ताचितकम्बल्येभ्यो न तद्धितलुकि [४.१.२२] इति प्रतिषेधः प्राप्नोति । पञ्चगवम् दशगवम् । गोरतद्धितलुकि [५.४.९२] इति टज्न प्राप्नोति ॥ नैष दोषः । अविशेषेण द्विगोर्ङीब्भवतीत्युक्त्वापरिमाणबिस्ताचितकम्बल्येभ्यः समाहार इति वक्ष्यामि । तन्नियमार्थं भविष्यति । समाहार एव नान्यत्रेति । गोरकारो द्विगोः समाहारे । अविशेषेण गोष्टज्भवतीत्युक्त्वा द्विगोः समाहार इति वक्ष्यामि । तन्नियमार्थं भविष्यति । समाहार एव नान्यत्रेति ॥

## अभिधानार्थं तु ॥ ७ ॥

अभिधानार्थं तु समाहारग्रहणं कर्तव्यम् । समाहारेणाभिधानं यथा स्यात्तद्धितार्थेन मा भूदिति । किं च स्यात् ।

---

काय कारण ?

कारण असें की तद्धितार्थ वाच्य असतां द्विगुसमास होतो या म्हणण्यानेंच समाहार या अर्थींही द्विगुसमास होईल.[१४]

पण जर तद्धितार्थीं द्विगुसमास होतो या म्हणण्यानेंच समाहारार्थीं द्विगु समास होईल तर त्या द्विगूच्या पुढें समूह या अर्थीं तद्धितप्रत्ययाची उत्पत्ति प्राप्त होत आहे.

तद्धितप्रत्यय उत्पन्न झाला तरी हरकत नाहीं. कारण 'द्विगोर्लुगनपत्ये' (४।१।८८) यानें त्याचा लुक् होईल.

लुक् झाला तर त्या लुकावर अवलंबून असलेलीं कार्यें प्राप्त होत आहेत.

तीं कार्यें कोणतीं ?

पञ्चपूली, दशपूली, येथें 'अपरिमाणबिस्ता०' (४।१।२२) यानें ङीपाचा प्रतिषेध प्राप्त होत आहे. तसेंच पञ्चगवम्, दशगवम्, येथें 'गोरतद्धितलुकि' (५।४।९२) यानें टच्प्रत्यय प्राप्त होत नाहीं.

हा दोष येत नाहीं. 'द्विगोः' (४।१।२१) या सूत्रानें द्विगुसमासाहून ङीप् होतो असें मोघम सांगून पुढें 'अपरिमाणबिस्ताचितकम्बल्येभ्यः समाहारे' असें सूत्र करून अपरिमाण वगैरे शब्द शेवटीं असलेल्या द्विगूहून ङीप्प्रत्यय होतो तो द्विगुसमाहार या अर्थी असेल तर, असें विधान करण्यांत येईल. तें नियमार्थ होईल. तो नियम असा– तद्धिताचा लुक् झाला असतां अपरिमाण वगैरे शब्द शेवटीं असलेल्या द्विगूहून पूर्वसूत्रानें ङीप्प्रत्यय करणें झाल्यास तो द्विगु समाहार या अर्थी असेल तरच करावा, एरवीं करूं नये. तसेंच 'गोः' एवढेंच सूत्र करून गोशब्दान्त तत्पुरुषाहून समासान्त टच्प्रत्यय होतो असें मोघम सांगून पुढें 'द्विगोः समाहारे' असें सूत्र करावें. म्हणजे तें नियमार्थ होईल. तो नियम असा— तद्धितलुक् झाला असतां गोशब्दान्त द्विगूहून पूर्वसूत्रानें टच्प्रत्यय करणें झाल्यास तो द्विगु समाहार या अर्थी असेल तरच करावा, एरवीं करूं नये.

(वा.७) पञ्चपूली इत्यादि स्थलीं पञ्चानां पूलानां समाहारः या अर्थाचा बोध समासाचा अर्थ म्हणून व्हावा, तद्धितप्रत्ययाचा अर्थ म्हणून होऊं नये, याकरितां समाहारग्रहण करावयास पाहिजे.

तद्धितप्रत्ययाचा अर्थ म्हणून मनांत आल्यास काय दोष येईल ?

त्या द्विगूच्या पुढें समूह या अर्थीं तद्धितप्रत्ययाची उत्पत्ति प्रसक्त होईल.

---

१४. कारण समाहार हा तद्धितप्रत्ययाचा अर्थ आहे (४।२।३७).

तद्धितोत्पत्तिः प्रसज्येत । उत्पद्यतां लुग्भविष्यति । लुक्कृतानि प्राप्नुवन्ति । सर्वाणि परिहृतानि । न सर्वाणि परिहृतानि । पञ्चकुमारि दशकुमारि । लुक्तद्धितलुकि [१.२.४९] इति ङीपो लुक्प्रसज्येत ॥

## द्वन्द्वतत्पुरुषयोरुत्तरपदे नित्यसमासवचनम् ॥ ८ ॥

द्वन्द्वतत्पुरुषयोरुत्तरपदे नित्यसमासो वक्तव्यः । वाग्दृषदप्रियः छत्त्रोपानहप्रियः । पञ्चगवप्रियः दशगवप्रियः । किं प्रयोजनम् । समुदायवृत्तावबयवानां मा कदाचिदवृत्तिर्भूदिति ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । इह द्वौ पक्षौ वृत्तिपक्षोऽवृत्तिपक्षश्च । यदा वृत्तिपक्षस्तदा सर्वेषामेव वृत्तिः । यदा त्ववृत्तिपक्षस्तदा सर्वेषामवृत्तिः ॥

## उत्तरपदेन परिमाणिना द्विगोः समासवचनम् ॥ ९ ॥

उत्तरपदेन परिमाणिना द्विगोः समासो वक्तव्यः । द्विमासजातः त्रिमासजातः । किं पुनः कारणं न सिध्यति । सुप्सुपेति वर्तते । एवं तर्हीदं स्यात् । द्वौ मासौ द्विमासम् द्विमासं जातस्येति । नैवं श-

---

समूह या अर्थीं तद्धित प्रत्यय उत्पन्न झाला तरी हरकत नाहीं. कारण 'द्विगोर्लुगनपत्ये' (४।१।८८) यानें त्याचा लुक् होईल.

लुक् झाला तर लुकावर अवलंबून असलेलीं कार्यें होऊं लागतील ना !

लुकावर अवलंबून असलेल्या सर्व कार्यांचा परिहार आतांच केला आहे.

सर्व कार्यांचा परिहार केला गेला नाहीं. तेव्हां पञ्चानां कुमारीणां समाहारः पञ्चकुमारि, दशकुमारि, येथें तद्धितार्थीं द्विगुसमास करून समूहार्थक तद्धिताचा लुक् केला असतां 'लुक्तद्धितलुकि' (१।२।४९) यानें ङीप्प्रत्ययाचा लुक् करण्याचा प्रसंग येत आहे.

(वा.८) उत्तरपद पुढें असतांना विकल्पानें प्राप्त असलेला द्वंद्व किंवा तत्पुरुषसमास नित्य होतो, असें वचन करावें; जसें— वाक् च दृषच्च प्रिये अस्य वाग्दृषदप्रियः, छत्त्रोपानहप्रियः, पञ्च गावः प्रिया अस्य पञ्चगवप्रियः, दशगवप्रियः, वगैरे.

याचें काय प्रयोजन ?

समुदायाच्या वृत्तीमधील अवयवांची केव्हांही वृत्तिरहित स्थिति असूं नये.[१५]

तर मग 'द्वंद्वतत्पुरुषयोः' हें नित्यसमास विधान करावयास पाहिजे.

तसें करावयास नको. कारण अर्थप्रतिपादनाविषयीं दोन पक्ष आहेत : एक वृत्तिपक्ष आणि दुसरा अवृत्तिपक्ष. त्यांत जेव्हां वृत्तिपक्ष[१६] घेतला तेव्हां सर्वांची वृत्तिच करावयाची. आतां जेव्हां अवृत्तिपक्ष घेतला तेव्हां सर्वांचीच अवृत्ति होते.

(वा.९) परिच्छेद्य वाचक[१७] जें उत्तरपद त्याच्या निमित्तानें मागील दोन पदांचा द्विगुसमास होण्याकरितां तीन पदांचा तत्पुरुषसमास होतो, असें वचन करावें; जसें— द्वौ मासौ जातस्य यस्य द्विमासजातः, त्रिमासजातः.

पण हा तीन पदांचा तत्पुरुष सूत्रानेंच कां बरें होत नाहीं ?

सुप् आणि सुपा या दोन पदांची अनुवृत्ति येत आहे म्हणून.

असें आहे तर मग अशा रीतीनें हा समास सोडवितां येईल— द्वयोर्मासयोः समाहारः द्विमासम्, द्विमासं जातस्य द्विमासजातः.

---

१५. त्रिपदबहुव्रीहीमध्यें पूर्वीच्या दोन पदांचा समास विकल्पानें झाला तर समासान्तप्रत्ययही (५।४।१०६,५।४।९२) विकल्पानें होऊं लागेल.

१६. तेव्हां त्रिपदबहुव्रीहीमध्यें तीन पदांची वृत्ति असा पक्ष घेतला असल्यामुळें त्यांतील दोन पदांची वृत्ति केलीच पाहिजे असें सिद्ध होतें.

१७. ज्याच्या काल वगैरेंची इयत्ता दाखविली जाते तो परिच्छेद्य होय.

क्यम् । स्वरे हि दोषः स्यात् । द्विमासजात इति प्राप्नोति । द्विमासजात इति चेष्यते । द्व्यह्नजातश्च न सिध्यति । द्व्यहजात इति प्राप्नोति न चैवं भवितव्यम् । भवितव्यं च यदा समाहारे द्विगुः । द्व्यह्नजातस्तु न सिध्यति ॥ किमुच्यते परिमाणिनेति न पुनरन्यत्रापि । पञ्चगवप्रियः दशगवप्रियः ।

**अन्यत्र समुदायबहुव्रीहित्वादुत्तरपदप्रसिद्धिः ॥ १० ॥**

अन्यत्र समुदायो बहुव्रीहिसंज्ञः । अन्यत्र समुदायबहुव्रीहित्वादुत्तरपदं प्रसिद्धम् । उत्तरपदे प्रसिद्ध उत्तरपद इति द्विगुर्भविष्यति ॥

**सर्वत्र मत्वर्थे प्रतिषेधः ॥ ११ ॥**

सर्वेषु पक्षेषु द्विगुसंज्ञाया मत्वर्थे प्रतिषेधो वक्तव्यः । किं प्रयोजनम् । पञ्चखट्वा दशखट्वा । द्विगोः [४.१.२१] इतीकारो मा भूत् । पञ्चगुः दशगुः । गोरतद्धितलुकि [५.४.९२] इति टज्मा भू-

---

अशा रीतीनें हा समास सोडविणें शक्य नाहीं; कारण स्वरामध्यें फरक होईल. म्हणजे समाहारद्विगु करून नंतर त्याचा जातशब्दाबरोबर तत्पुरुष केला तर द्विमासजातः असा तत्पुरुषामुळें अन्तोदात्त (६।१।२२३) होईल. आणि येथें तर तत्पुरुष करून नंतर द्विमास हा द्विगु केला तर त्या द्विगूमुळें द्वि याला प्रकृतिस्वर (६।२।२९) होऊन द्विमासजातः असा आद्युदात्तही इष्ट आहे.

शिवाय त्रिपदतत्पुरुषादाखल वचन केलें तर द्व्यह्नजातः हें उदाहरण साधणार नाहीं. त्याचे ऐवजीं द्व्यहजातः असें रूप प्राप्त होत आहे.

तर मग द्व्यहजातः असें रूप होतच नाहीं कीं काय ?

द्वि आणि अहन् या दोन पदांचा समाहार या अर्थी द्विगुसमास केला म्हणजे द्व्यहजातः असें होणारच. परंतु तीन पदांचा तत्पुरुष केला नाहीं तर मात्र द्व्यहजातः असें रूप मुळींच साधणार नाहीं.

ह्या त्रिपदतत्पुरुषविधायक वचनामध्यें 'उत्तरपद जें परिमाणिवाचक' असें कां बरें म्हटलें आहे ? अर्थात् तो शब्द काढून टाकून तें वचन करावें. कारण परिमाणिव्यतिरिक्त उत्तरपदाच्या निमित्तानें पञ्चगवप्रियः, दशगवप्रियः, येथें पहिल्या दोन पदांचा द्विगुसमास व्हावयास नको काय ?

(वा.१०) परिमाणिव्यतिरिक्त उत्तरपदस्थलीं म्हणजे पञ्चगवधनः इत्यादि स्थलीं तीन पदांच्या समुदायाला बहुव्रीहिसंज्ञा झाली असल्यामुळें उत्तरपद प्रसिद्ध आहे. तेव्हां अर्थातच तेथें उत्तरपदनिमित्तक द्विगुसमास होईलच.

(वा.११) अर्थशब्द , स्यात् या अर्थी असो किंवा अभिधेयवाचक असो, सर्वपक्षीं मत्वर्थी द्विगुसमास होत नाहीं, असें प्रतिषेधवचन करावें.

काय प्रयोजन ?

पञ्चखट्वा[१९], दशखट्वा, येथें 'द्विगोः'(४।१।२१) यानें ङीप्प्रत्यय न व्हावा म्हणून. तसेंच पञ्चगुः, दशगुः येथें 'गोरतद्धितलुकि' (५।४।९२) यानें टच्प्रत्यय न व्हावा म्हणून.

---

१८. समाहारद्विगु केल्यामुळें 'न संख्यादेः समाहारे' (५।४।८९) हा निषेध येईल आणि अह्न हा आदेश होणार नाहीं.

१९. पञ्चखट्वा, पञ्चगुः, येथें मत्वर्थाची विवक्षा असतांना त्याच अर्थी बहुव्रीहि होतो व बहुव्रीहीनेंच अर्थ उक्त होत असल्यामुळें त्याच अर्थी पुनः मत्वर्थीय प्रत्यय होत नाहीं. जर मत्वर्थी द्विगु झाला तर ङीप् व समासान्त हे दोष आहेतच. शिवाय या द्विगूहून मत्वर्थीय प्रत्ययही होऊं लागेल.

दिति ॥

## संख्यापूर्वो द्विगुः ॥ २ । १ । ५२ ॥

किमनन्तरे योगे यः संख्यापूर्वः स द्विगुसंज्ञ आहोस्वित्पूर्वमात्रे । किं चातः । यद्यनन्तरे योग एकशाटी द्विगोः [४.१.२१] इतीकारो न प्राप्नोति । अथ पूर्वमात्र एकभिक्षा अत्रापि प्राप्नोति ॥ अस्त्वनन्तरे । कथमेकशाटी । ईकारान्तेन समासो भविष्यति । एका शाटी एकशाटी ॥ इह तर्हि एकापूपी द्विगोरितीकारो न प्राप्नोति । अस्तु तर्हि पूर्वमात्रे । कथमेकभिक्षा । टाबन्तेन समासो भविष्यति । एका भिक्षा एकभिक्षा ॥ इह तर्हि सप्तर्षयः इगन्ते द्विगावित्येष स्वरः प्राप्नोति । अस्तु तर्ह्यनन्तरे । कथमेकापूपी । समाहार इत्येव सिद्धम् । कः पुनरत्र समा-

---

(सू.५२) काय[2] या सूत्राच्या लगत मागील सूत्रामध्यें सांगितलेला संख्यापूर्वपदक जो समास तो द्विगुसंज्ञक होतो, किंवा या सूत्राच्या मागील 'पूर्वकालैक०' (२।१।४९) इत्यादि तीन सूत्रांनीं सांगितलेला तसला समास द्विगुसंज्ञक होतो ?

या दोन तऱ्हांमध्यें काय फरक होत आहे ?

जर लगत मागील सूत्रामध्यें सांगितलेला संख्यापूर्वपदक समास द्विगुसंज्ञक होतो असें गृहीत धरलें तर एकशाटी येथें 'द्विगोः' यानें ङीप् प्रत्यय प्राप्त होऊं शकत नाहीं[3].

आतां या सूत्राच्या मागील 'पूर्वकालैक०' इत्यादि तीन सूत्रांनीं सांगितलेला तसला समास द्विगुसंज्ञक होतो असें गृहीत धरलें तर एकभिक्षा येथेंही ङीप्प्रत्यय प्राप्त होऊं शकत आहे[4].

लगत मागील सूत्रामध्यें सांगितलेला संख्यापूर्वपदक समास द्विगुसंज्ञक होतो हा पक्ष असो.

तर मग एकशाटी येथें ङीप्प्रत्यय कसा ?

एका चासौ शाटी च एकशाटी असा ङीषन्त शाटी शब्दाबरोबर समास होईल.

तर मग एकापूपी येथें 'द्विगोः' यानें ङीप् प्रत्यय प्राप्त होत नाहीं.

तर मग या सूत्राच्या मागील 'पूर्वकालैक०' इत्यादि तीन सूत्रांनीं सांगितलेला तसला समास द्विगुसंज्ञक होतो हा पक्ष असो.

या पक्षीं एकभिक्षा येथें ङीप्प्रत्यय कां होत नाहीं ?

एका चासौ भिक्षा च एकभिक्षा असा टाबन्त भिक्षाशब्दाबरोबर समास केल्यामुळें ङीप् होणार नाहीं.

तर सप्तर्षयः येथें 'दिक्संख्ये०' (२।१।५०) यानें समास केला असतां त्याला द्विगुसंज्ञा झाल्यानें 'इगन्तकाल०' (६।२।२९) यानें पूर्वपदप्रकृतिस्वर प्राप्त होत आहे.

तर लगत मागील सत्रामध्यें सांगितलेला समास हा पक्ष असो.

एकापूपी येथें ङीप्प्रत्यय कसा ?

समाहार या अर्थी द्विगु होतो, यानेंच येथें द्विगु केला म्हणजे ङीप्प्रत्यय होईल.

पण येथें अपूप हा पदार्थ एकच असल्यामुळें समाहार तो काय ?

त्या अपूपाचें जें दान तें किंवा संभ्रम हा

---

१. मागील सूत्रावरील टीप १ पहा.

२. 'अनन्तरस्य विधिर्वा' हा न्याय स्वीकारला असता 'या सूत्राच्या लगत मागील' हा पक्ष उदय पावतो, आणि व्याप्तिन्यायावर भर दिला असतां 'या सूत्राच्या मागील पूर्वकालैक० इत्यादि सूत्रत्रय' हा पक्ष उदय पावतो.

३. एकः शाटः एकशाटः असा पुंलिंगी शाटशब्दाबरोबर 'पूर्वकालैक' यानें समास केला असतां त्याला ह्या सूत्रानें द्विगुसंज्ञा झाली तर 'अकारान्तोत्तरपदो द्विगुः स्त्रियाम्' या वचनानें स्त्रीत्व असल्यामुळें 'द्विगोः' यानें ङीप्प्रत्यय होतो.

४. एको भिक्षः एकभिक्षः असा घञन्त पुंलिंगी भिक्षशब्दाबरोबर 'पूर्वकालैक०' यानें समास केला असतां त्याला द्विगुसंज्ञा झाली तर 'अकारान्तोत्तरपदो द्विगुः' यानें स्त्रीत्व सांगितलें असल्यामुळें 'द्विगोः' यानें ङीप्प्रत्यय प्रसक्त होत आहे.

हारः । यत्तदानं संभ्रमो वा ॥ इह तर्हि पञ्चहोतारः दशहोतारः इगन्ते द्विगावित्येष स्वरो न प्राप्नोति । अस्तु तर्हि पूर्वमात्रे । कथं सप्तर्षयः । अन्तोदात्तप्रकरणे त्रिचक्रादीनां छन्दसीत्येवमेतत्सिद्धम् । अथवा पुनरस्त्वनन्तरे । कथं पञ्चहोतारः दशहोतारः । आद्युदात्तप्रकरणे दिवोदासादीनां छन्दसीत्येव सिद्धम् ॥

**कुत्सितानि कुत्सनैः ॥२।१।५३॥**

किमुदाहरणम् । वैयाकरणखसूचिः । किं व्याकरणं कुत्सितमाहोस्विद्वैयाकरणः । वैयाकरणः कुत्सितस्तस्मिन्कुत्सिते तत्स्थमपि कुत्सितं भवति ॥

**[पापाणके कुत्सितैः ॥२।१।५४॥]**

**उपमानानि सामान्यवचनैः ॥२।१।५५ ॥**

उपमानानीत्युच्यते कानि पुनरुपमानानि । किं यदेवोपमानं तदेवोपमेय-

येथें समाहार होय.

तर पञ्चहोतारः, दशहोतारः, येथें 'दिक्संख्ये संज्ञायाम्' (२।१।५०) यानें समास झाला असल्यामुळें तेथें द्विगुसंज्ञा होणार नाहीं, आणि 'इगन्तकाल' (६।२।२९) हा पूर्वपदप्रकृतिस्वर होणार नाहीं.

तर मग मागील 'पूर्वकालैक०' या तीन सूत्रांनीं सांगितलेला समास हा पक्ष असो.

पण तो पक्ष घेतला तर सप्तर्षयः येथें पूर्वपदप्रकृतिस्वर प्रसक्त होतो त्याची काय वाट ?

अन्तोदात्तप्रकरणे त्रिचक्रादीनां छन्दसि (६।२।१९९, वा.१) यानें अन्तोदात्त साधेल.

किंवा लगत मागील सूत्रांमध्यें सांगितलेला समास हा पक्ष असो.

पण तो पक्ष घेतला तर पञ्चहोतारः, दशहोतारः, येथें इष्ट असलेला द्विगुप्रयुक्त पूर्वपदप्रकृतिस्वर प्राप्त होऊं शकत नाहीं याची काय वाट ?

'आद्युदात्तप्रकरणे दिवोदासादीनां छन्दसि' (६।२।९१, वा. १) यानेंच पञ्चहोतारः इत्यादिस्थलीं आद्युदात्त स्वर साधत आहे.

(सू.५३) या सूत्राचें उदाहरण काय ?

वैयाकरणखसूचिः हें होय.

पण काय या उदाहरणामध्यें व्याकरणशास्त्र निंद्य समजलें जातें किंवा व्याकरणाध्ययन करणारा निंद्य समजला जातो ?

बुद्धिमन्द असा व्याकरणाध्ययन करणारा मनुष्य हा येथें निंद्य म्हणून विवक्षित आहे. त्या मनुष्याची निन्दा केली असतां त्यानें शिकलेल्या व्याकरणाचीही निंदा अर्थातच होत आहे.

(सू.५५) येथें उपमान असें म्हटलें आहे. ज्याचा सारखेपणा दाखवावयाचा असतो त्याला उपमान म्हणतात. पण तें उपमान

५. दरिद्री मनुष्यानें एका अपूपाचें दान केलें तरी तो अनेक समजतो, किंवा एखाद्या शंकित स्वभावाच्या मनुष्याच्या मनाची स्थिति एकच अपूप कर्तव्य असला तरी अनेकाप्रमाणेंच होते. त्या ठिकाणीं एकावर अनेकत्वाचा आरोप करून समाहाराची उपपत्ति करावी.

१. निंद्य जो अर्थ त्या अर्थाला दाखविणाऱ्या सुबन्ताचा निंदासाधन जो अर्थ त्या अर्थाला दाखविणाऱ्या सुबन्ताबरोबर विकल्पानें तत्पुरुषसमास होतो; जसें— वैयाकरणखसूचिः, मीमांसकदुर्दुरूढः, वगैरे. विशेष्याला पूर्वनिपात होण्यासाठीं हें सूत्र केलें आहे.

२. प्रश्न विचारला असतां बुद्धिमांद्यामुळें जो उत्तर देऊं शकत नाहीं आणि म्हणूनच जो केवळ आकाशाकडे पहात बसतो किंवा विषयान्तर करण्याकरितां आकाशासंबंधानें कांहीं बोलूं लागतो तो तेथें निंद्य म्हणून विवक्षित आहे.

१. पाप आणि अणक या शब्दांचा निंद्यार्थवाचक सुबन्ताबरोबर विकल्पानें तत्पुरुषसमास होतो; जसें— पापनापितः, अणककुलालः. पूर्वनिपात होण्याकरितां हें सूत्र केलें आहे.

१. उपमानवाचक सुबन्ताचा सामान्यधर्मविशिष्ट जें उपमेय तद्वाचक सुबन्ताबरोबर विकल्पानें तत्पुरुषसमास होतो; जसें:— घन इव श्यामः घनश्यामः.

माहोस्विदन्यदुपमानमन्यदुपमेयम् । किं चातः । यदि यदेवोपमानं तदेवोपमेयं क इहोपमार्थो गौरिव गौरिति । अथान्यदेवोपमानमन्यदुपमेयं क इहोपमार्थो गौरिवाश्व इति ॥ एवं तर्हि यत्र किंचित्सामान्यं कश्चिच्च विशेषस्तत्रोपमानोपमेये भवतः । किं वक्तव्यमेतत् । न हि । कथमनुच्यमानं गंस्यते । मानं हि नामानिर्ज्ञातज्ञानार्थमुपादीयतेऽनिर्ज्ञातमर्थं ज्ञास्यामीति । तत्समीपे यन्नात्यन्ताय मिमीते तदुपमानम् । गौरिव गवय इति । गौर्निर्ज्ञातो गवयोऽनिर्ज्ञातः ॥ कामं तर्ह्यनेनैव हेतुना यस्य गवयो निर्ज्ञातः स्याद्गौरनिर्ज्ञातस्तेन कर्तव्यं स्याद्गवय इव गौरिति । बाढं कर्तव्यम् ॥

किं पुनरिहोदाहरणम् । शस्त्रीश्यामा ।

---

कसें बरें असतें ? सारखेपणा ह्या ज्याचा त्यालाच असतो म्हणून जें उपमान तेंच उपमेय असतें किंवा त्या दोन वस्तु अगदीं भिन्न म्हणजे उपमान निराळें आणि उपमेय निराळें असें असलें पाहिजे ?

या दोन प्रकारांमध्यें काय बरें फरक ?

जर जें उपमान तेंच उपमेय असें असेल तर बैलासारखा बैल अशी ज्याची त्यालाच उपमा देण्यांत काय बरें बोध होणार आहे ? आतां उपमान आणि उपमेय ह्या दोन वस्तु अगदीं निराळ्या म्हणजे सर्वथा विजातीय असतील[2] तर तेथेंही बैलासारखा घोडा अशी उपमा देण्यांत काय बरें बोध होणार आहे ?

असें आहे तर जेथें कांहीं अंशानें साम्य आणि कांहीं अंशानें विशेष असतो तेथें उपमान व उपमेय हीं उभयतां संभवतात, असें समजावें.

काय जेथें कांहीं अंशीं साम्य आणि कांहीं अंशीं विशेष असेल तेथें उपमानोपमेयभाव होतो अशा अर्थाचें वचन केलें पाहिजे ?

वचन करावयास नको.

तर वचनावांचून कसा बरें हा अर्थ समजण्यांत येईल ?

[3]मान म्हणजे प्रमाण होय. तें न कळलेला अर्थ कळावा यासाठीं साधन म्हणून गृहीत धरलें जातें. त्या प्रमाणाच्या जवळ जवळ गेलेलें तें उपमान होय. म्हणजे उपमान हें सर्वांशांनीं[4] उपमेयाला कळवून देत नाहीं, तर उपमेयावरील कांहीं धर्मांनींच उपमेयाला कळवून देतें; जसें— गौरिव गवयः येथें गो म्हणजे बैल[5] हा कळलेला आहे, व गवय कळलेला नाहीं.

तर मग याच हेतूवरून ज्याला गवयपदार्थ कळलेला आहे आणि गोपदार्थ मात्र कळलेला नाहीं, त्याला गवय इव गौः असें म्हणतां आलें पाहिजे.

खुशाल त्यानें तसें म्हणावें. हरकत नाहीं.

आतां या सूत्राचें काय बरें उदाहरण ?

शस्त्रीव श्यामा शस्त्रीश्यामा[6] हें होय.

पण हा श्यामाशब्द उपमान व उपमेय यांपैकीं कोणत्या अर्थाला दाखवीत[7] आहे ?

---

२. कोणत्याही प्रकारानें साम्य विवक्षित नसेल तर.

३. मानस्य समीपे यत् तत् उपमानम् अशी उपमानशब्दाची व्युत्पत्ति आहे.

४. गवय प्रत्यक्ष पाहिला असतां जशी त्याची बरोबर माहिती होते तितकी गायीसारखा म्हणण्यानें होत नाहीं.

५. बैलासारखा गवय असतो असें म्हटलें असतां गवयासंबंधानें पूर्ण कल्पना जरी झाली नाहीं तरी बरीचशी कल्पना होते.

६. शस्त्री म्हणजे सुरी तिच्यासारखी काळसर देवदत्ता नांवाची स्त्री असा अर्थ या सामासिक शब्दापासून प्रतीत होतो.

७. जर श्यामा हा शब्द श्यामगुणविशिष्ट शस्त्री या अर्थाला दाखवीत असेल तर सामानाधिकरण्य जुळतें, पण उपमेयभूत देवदत्ता या अर्थाचें अभिधान समासापासून होणार नाहीं. आतां जर

क पुनरयं श्यामाशब्दो वर्तते । शस्त्र्यामित्याह । केनेदानीं देवदत्ताभिधीयते । समासेन । यद्येवं शस्त्रीश्यामो देवदत्त इति न सिध्यति । उपसर्जनस्येति ह्रस्वत्वं भविष्यति । यदि तर्ह्युपसर्जनान्यप्येवंजातीयकानि भवन्ति तित्तिरिकल्माषी कुम्भकपाललोहिनी अनुपसर्जनलक्षण ईकारो न प्राप्नोति ॥ एवं तर्हि शस्त्र्यामेव शस्त्रीशब्दो वर्तते देवदत्तायां श्यामाशब्दः । एवमपि गुणोऽनिर्दिष्टो भवति । बहवः शस्त्र्यां गुणास्तीक्ष्णा सूक्ष्मा पृथुरिति । अनिर्दिश्यमानस्यापि गुणस्य भवति लोके संप्रत्ययः । तद्यथा । चन्द्रमुखी देवदत्तेति बहवश्चन्द्रे गुणा

---

शस्त्री या अर्थाला दाखवितो असें म्हणतो.

तर मग आतां देवदत्ता हा अर्थ कोणच्या शब्दानें दाखविला जात आहे ?

शस्त्रीश्यामा या समासानें दाखविला जात आहे.

असें आहे तर शस्त्रीश्यामो देवदत्तः हें रूप साधत नाहीं.[९]

उपमेयार्थ हा समासाचा वाच्य असल्यानें तो प्रधान आहे.

अर्थात् श्यामाशब्दाच्या अर्थाला अप्राधान्य असल्यामुळें 'गोस्त्रियोः' (१।२।४८) ह्यानें ऱ्हस्व झाल्यानें पूर्वोक्त रूप साधेल.

जर 'गोस्त्रियोः' येथें उपसर्जनपदानें लौकिक उपसर्जनाचेंही ग्रहण होत असेल तर तित्तिरिकल्माषी, कुम्भपाललोहिनी, येथें अनुपसर्जनावर अवलंबून असलेला ईकार (ङीष् व ङीप्) प्राप्त होऊं शकत नाहीं.[११]

असें आहे तर शस्त्रीशब्द हा शस्त्री या अर्थींच आहे, आणि श्याम वर्णाची देवदत्ता या अर्थी श्यामाशब्द आहे असें घ्यावें.[१२]

अशा रीतीनें दोषाचा परिहार होत आहे, तरी पण श्यामाशब्द उपमेयाकडे लागल्यामुळें शस्त्रीवरील श्यामगुण दाखविणारा शब्द नाहींसा होतो. आतां शब्दानें दाखविला नसला तरी वस्तुतः असल्यामुळें श्यामगुण घ्यावयाचा असेल तर शस्त्रीमध्यें तीक्ष्णपणा, सूक्ष्मपणा, महत्त्व इत्यादि जे बहुत गुण आहेत त्यांपैकी कोणता गुण घ्यावा तो निश्चित होत नाहीं.

उपमेच्या निमित्तभूत गुणाचा निर्देश केला नसला तरी लोकव्यवहारावरून त्याची प्रतीति होते; जसें– चन्द्रवन्मुखं यस्याः सा चन्द्रमुखी देवदत्ता असें म्हटलें असतां त्या चन्द्राचे ठिकाणीं शीतलवर्तुलत्वादि अनेक गुण आहेत

---

श्यामगुणविशिष्ट उपमेयभूत देवदत्ता या अर्थाला दाखवीत असेल तर सादृश्यसंबंधानें शस्त्रीशब्दार्थाचा श्यामापदवाच्य देवदत्तार्थाचे ठिकाणीं अन्वय केल्यानें वैयधिकरण्य होतें, म्हणून समास प्राप्त होऊं शकत नाहीं; समानाधिकरणेन हा अधिकार चालू आहे म्हणून. तेव्हां दोन्ही तऱ्हेनें दोष येतो.

८. शब्दशक्तिस्वभावामुळें समासापासून उपमेयार्थाची प्रतीति होते.

९. श्यामाशब्द शस्त्री या अर्थी असल्यामुळें तो स्त्रीलिंगी आहे. तेव्हां शस्त्रीश्यामः असें रूप होणार नाहीं.

१०. लौकिक उपसर्जन घ्यावें असा अभिप्राय आहे.

११. येथें तित्तिरिशब्द पुंलिंगी, आणि कुम्भपाल शब्द नपुंसकलिंगी आहे. त्याच अर्थाला दाखविणारे कल्माष व लोहित हे शब्दही तसेच आहेत; स्त्रीलिंगी नव्हेत. तेव्हां त्यांहून स्त्रीप्रत्यय प्राप्त होत नाहीं. समास केल्यानंतर समासाचा उपमेय हा अर्थ स्त्रीलिंगी आहे; तरी कल्माषलोहित पदार्थांना लौकिक उपसर्जनत्व असल्यामुळें 'अन्यतो ङीष्' (४।१।४०), 'वर्णादनुदात्तात्' (४।१।३९), यांनीं क्रमानें ङीष् आणि ङीप् होत नाहींत. कारण अनुपसर्जनात् असा तेथें अधिकार आहे.

१२. शस्त्रीश्यामो देवदत्तः, येथें श्यामशब्द श्यामवर्णाचा देवदत्त या अर्थी असल्यामुळें तो पुंलिंगी प्रयोग उपपन्न होतो. तित्तिरिकल्माषी येथेंही उपमेयार्थी असलेल्या अशा स्त्रीप्रत्ययान्त कल्माषीशब्दाबरोबर समास केला म्हणजे तेथेंही दोष नाहीं.

या चासौ प्रियदर्शनता सा गम्यते ॥ एवमपि समानाधिकरणेनेति वर्तते व्यधिकरणत्वात्समासो न प्राप्नोति । किं हि वचनान्न भवति । यद्यपि तावद्वचनात्समासः स्यादिह तु खलु मृगीव चपला मृगचपला समानाधिकरणलक्षणः पुंवद्भावो न प्राप्नोति ॥ एवं तर्हि तस्यामेवोभयं वर्तते । एतच्चात्र युक्तं यत्तस्यामेवोभयं वर्तेत इति । इतरथा हि बह्वपेक्ष्यं स्यात् । यदि तावदेवं विग्रहः क्रियते शस्त्रीव श्यामा देवदत्तेति शस्त्र्यां श्यामेत्येतदपेक्ष्यं स्यात् । अथाप्येवं विग्रहः क्रियते यथा शस्त्री श्यामा तद्वदियं देवदत्तेत्येवमपि देवदत्तायां श्यामेत्येतदपेक्ष्यं स्यात् । एवमपि गुणोऽनिर्दिष्टो भवति । बहवश्च शस्त्र्यां गुणास्तीक्ष्णा सूक्ष्मा पृथुरिति । अनिर्दिश्यमानस्यापि गुणस्य भवति लोके संप्रत्ययः । तद्यथा । चन्द्रमुखी देवदत्तेति बहवश्चन्द्रे गुणा या चासौ प्रियदर्शनता सा गम्यते ॥

---

तरी देखील त्यांपैकीं आल्हादकारिता म्हणून जो गुण आहे त्याचीच तेथें प्रतीति होत असते. तशी येथें श्यामगुणाची प्रतीति होईल.

तरी पण 'समानाधिकरणेन' या पदाची येथें अनुवृत्ति आहे. तेव्हां शस्त्रीशब्दाशीं श्यामाशब्दाचें वैयधिकरण्य[१३] असल्यामुळें समासच मुळीं प्राप्त होऊं शकत नाहीं.

पण वचनाचे जोरावर काय बरें होत नाहीं?[१४]

जरी 'उपमानानि०' या समासविधायक वचनाचे जोरावर वैयधिकरण्य असतांही समास झाला तरी मृगीव चपला मृगचपला येथें सामानाधिकरण्यावर अवलंबून असलेला 'पुंवत्कर्मधारय०' (६।३।४२) यानें पुंवद्भाव प्राप्त होऊं शकत नाहीं.

असें आहे तर शस्त्री[१५] आणि श्यामा हे दोन्ही शब्द देवदत्ता याकडेच लावावेत. दोन्ही शब्द देवदत्ता याकडे लावणें हें येथें योग्य आहे. एरवीं बहुत अपेक्षा करावी लागेल. म्हणजे शस्त्रीव श्यामा देवदत्ता, म्ह. श्यामवर्णाची देवदत्ता ही शस्त्रीप्रमाणें आहे, असा विग्रह करण्यांत येईल तर शस्त्रीचा श्यामगुण दाखविण्याकरितां यत्न करावा लागेल. आतां जर यथा शस्त्री श्यामा तद्वदियं देवदत्ता, म्हणजे श्यामवर्णाची शस्त्री जशी आहे तशी देवदत्ता आहे असा विग्रह करण्यांत येईल तर उपमेय देवदत्तेवरील श्यामगुण दाखविण्याकरितां प्रयत्न करावा लागेल.

आतां शस्त्री आणि श्यामा हे दोन्ही शब्द देवदत्तेकडे लावले तरी येथें कोणत्या गुणानें सादृश्य विवक्षित आहे त्या गुणाचा निर्देश येथें नाहीं, असें होणार आहे. तेव्हां त्या शस्त्रीचे ठिकाणीं जे तीक्ष्णत्व, सूक्ष्मत्व, पृथुत्व, वगैरे अनेक गुण आहेत त्यांपैकीं कोणत्या गुणामुळें शस्त्रीचें सादृश्य देवदत्तेला येथें विवक्षित आहे तें समजणार नाहीं.

पण उपमेच्या निमित्तभूत गुणाचा निर्देश नसतांही लोकव्यवहारावरून अनेक गुणांपैकीं उपमेचा निमित्त म्हणून एखाद्या गुणाचीच नियत प्रतीति होत असते; जसें— चन्द्रमुखी देवदत्ता असें सांगितलें असतां त्या चन्द्राचे ठिकाणीं असलेल्या अनेक गुणांपैकीं आल्हादकारिता म्हणून जो गुण आहे त्याचीच उपमा-

---

१३. श्यामाशब्द उपमेयाकडे लागला आहे, शस्त्रीकडे नाहीं. तेव्हां शस्त्री आणि श्यामा यांचें सामानाधिकरण्य नाहीं असें सिद्ध होतें.

१४. तेव्हां 'उपमानानि०' या सूत्रामध्यें समानाधिकरणेन याची अनुवृत्ति येईल तर उदाहरण न मिळाल्यामुळें 'उपमानानि०' हें सूत्र निर्विषय होईल. त्या जोरावर येथें अनुवृत्ति येणार नाहीं.

१५. जसा मुखं चन्द्रः येथें चन्द्रशब्द सादृश्यामुळें मुखाला लावला आहे तसा येथें शस्त्रीशब्द देवदत्तेला लावला आहे.

**उपमानसमासे गुणवचनस्य विशेषभाक्त्वात्सामान्यवचनाप्रसिद्धिः॥१॥**

उपमानसमासे गुणवचनस्य विशेषभाक्त्वात्सामान्यवचनस्याप्रसिद्धिः स्यात्। शस्त्रीश्यामा। श्यामाशब्दोऽयं शस्त्रीशब्देनाभिसंबध्यमानो विशेषवचनः संपद्यते। तत्र सामान्यवचनैरिति समासो न प्राप्नोति ॥

**न वा श्यामत्वस्योभयत्र भावात्तद्वाचकत्वाच्च शब्दस्य सामान्यवचनप्रसिद्धिः ॥ २ ॥**

न वैष दोषः। किं कारणम्। श्यामत्वस्योभयत्र भावात्। उभयत्रैवात्र श्यामत्वमस्ति शस्त्र्यां देवदत्तायां च। तद्वाचकत्वाच्च शब्दस्य। तद्वाचकश्चात्र श्यामाशब्दः प्रयुज्यते। किंवाचकः। उभयवाचकः। श्यामत्वस्योभयत्र भावात्तद्वाचकत्वाच्च शब्दस्य सामान्यवचनं प्रसिद्धम्। सामान्यवचने प्रसिद्धे सामान्यवचनैरिति समासो भविष्यति। न चावश्यं स एव सामान्यवचनो यो बहूनां सामान्यमाह द्वयोरपि यः सामान्यमाह सोऽपि सामान्यवचन एव ॥ अथवा सामान्यवचनैरित्युच्यते सर्वश्च शब्दोऽन्येन शब्देनाभिसंबध्यमानो विशेषवचनः संपद्यते त एवं विज्ञास्यामः प्रागभिसंबन्धाद्यः सामान्यवचन इति ॥

**उपमितं व्याघ्रादिभिःसामान्या-**

निमित्त या नात्यानें प्रतीति होते. तर मग उपमेय देवदत्तेचे ठिकाणीं श्रुत असलेल्या श्यामगुणाचा उपमानाकडे कां बरें संबंध होणार नाहीं ?

(वा.१) उपमानवाचकाच्या ह्या तत्पुरुषसमासामध्यें गुणवाचक शब्द हा आपल्या संनिहित पदार्थावरीलच गुण दाखवीत असल्यामुळें तो शब्द सामान्यवचन होत नाहीं; जसें– शस्त्रीश्यामा येथें शस्त्रीशब्दाशेजारीं उच्चारलेला श्यामाशब्द हा शस्त्रीवरीलच विशेष श्यामवर्ण दाखवीत असल्यामुळें तो विशेषवचन होतो. तेव्हां सामान्यवचनशब्दाबरोबर सांगितलेला समास शस्त्रीश्यामा येथें प्राप्त होत नाहीं.

(वा.२) हा दोष येत नाहीं.

काय कारण ?

शस्त्री आणि देवदत्ता या दोन्ही ठिकाणीं श्यामत्व आहे, आणि येथें त्याचा वाचक श्यामाशब्द योजिला आहे.

त्याचा वाचक म्हणजे कोणाचा वाचक ?

शस्त्री आणि देवदत्ता या दोन्ही ठिकाणच्या श्यामवर्णाचा वाचक. तेव्हां दोन्ही ठिकाणीं श्यामवर्ण असल्यामुळें व त्या दोन्ही ठिकाणच्या श्यामवर्णाला दाखविण्याऱ्या श्यामा या शब्दाचा प्रयोग केला असल्यामुळें त्या श्यामाशब्दाला सामान्यधर्मवाचकत्व ठरत आहे. अशा रीतीनें सामान्यवचनत्व ठरलें असतां सामान्यवचन शब्दाबरोबर सांगितलेला समास शस्त्रीश्यामा येथें होईल.

आतां जो शब्द बहुतांवरील साधारण धर्म दाखवितो त्यालाच सामान्यवचन म्हणावयाचें असा कांहीं ठाम नियम नाहीं. तर जो दोघांवरीलही साधारण धर्म दाखवितो तोही सामान्यवचनच म्हटला जातो. अथवा 'साधारणधर्मवाचकाबरोबर' असें येथें सूत्रामध्यें म्हटलें आहे. आणि कोणताही शब्द दुसऱ्या शब्दाबरोबर उच्चारला असतां तो विशेषवचन बनतोच. तेव्हां 'सामान्यवचनैः' याचा अर्थ आम्ही असा समजतों की दुसऱ्या शब्दाशीं संबंध जोडण्याच्या पूर्वी जो सामान्यवचनशब्द तसल्या सामान्यवचनशब्दाबरोबर

१. उपमेयवाचक सुबन्ताचा उपमानभूत अशा व्याघ्रादिगणपठित शब्दाबरोबर विकल्पानें तत्पुरुष-

## प्रयोगे ॥ २ । १ । ५६ ॥

सामान्याप्रयोग इति किमर्थम् । इह मा भूत् । पुरुषोऽयं व्याघ्र इव शूरः । पुरुषोऽयं व्याघ्र इव बलवान् ॥ सामान्याप्रयोग इति शक्यमवक्तुम् । कस्मान्न भवति पुरुषोऽयं व्याघ्र इव शूरः पुरुषोऽयं व्याघ्र इव बलवानिति । असामर्थ्यात् । कथमसामर्थ्यम् । सापेक्षमसमर्थं भवतीति ॥ एवं तर्हि सिद्धे सति यत्सामान्याप्रयोग इति प्रतिषेधं शास्ति तज्ज्ञापयत्याचार्यो भवति वै प्रधानस्य सापेक्षस्यापि समास इति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । राजपुरुषोऽभिरूपः । राजपुरुषो दर्शनीयः । अत्र वृत्तिः सिद्धा भवति ॥

## विशेषणं विशेष्येण बहुलम् ॥ २ । १ । ५७ ॥

**विशेषणविशेष्ययोरुभयविशेषणत्वादुभयोश्च विशेष्यत्वादुपसर्जनाप्रसिद्धिः ॥ १ ॥**

विशेषणविशेष्ययोरुभयविशेषणत्वादुभयोश्च विशेष्यत्वादुपसर्जनस्याप्रसि-

---

उपमानवाचकाचा समास होतो.

(सू.५६) येथें सामान्याप्रयोगे म्ह. सामान्यधर्मवाचक शब्दाचा प्रयोग नसतांना असें म्हटलें आहे तें कशाकरितां ?

पुरुषोऽयं व्याघ्र इव शूरः[2], पुरुषोऽयं व्याघ्र इव बलवान्, येथें म्हणजे उपमान आणि उपमेय या दोघांवरील साधारण धर्म दाखविणाऱ्या अशा शूर, बलवान्, या शब्दांचा प्रयोग असतांना तेथें समास न व्हावा म्हणून म्हटलें आहे.

सामान्याप्रयोगे हा शब्द सूत्रामध्यें घालावयास नको.

तर मग पुरुषोऽयं व्याघ्र इव शूरः येथें समास कां बरें होत नाहीं ?

पुरुष आणि व्याघ्र या दोघांचें परस्परसामर्थ्य नाहीं म्हणून.

तें सामर्थ्य कां बरें नाहीं ?

सापेक्ष हें सामर्थ्यहीन असतें म्हणून[2]. अशा रीतीनें पूर्वोक्त उदाहरणामध्यें समासाचा अभाव सिद्ध होत असतां ज्यापेक्षां 'सामान्याप्रयोगे' असा प्रतिषेध आचार्य करीत आहेत त्यापेक्षां विशेष्याला सापेक्षत्व असलें तरी देखील त्याचा समास होतो असें ते सुचवीत आहेत.

असें सुचविल्याचा काय उपयोग ?

राजपुरुषोऽभिरूपः, राजपुरुषो दर्शनीयः, येथें प्रधान पुरुषाशीं आभिरूप्याचा अन्वय आहे तरीही त्याचा राजशब्दाबरोर समास होतो.

(सू.५७,वा.१) विशेषणाचा विशेष्याबरोबर सांगितलेला जो हा तत्पुरुषसमास तेथें विशेषण आणि विशेष्य या उभयतांपैकीं प्रत्येकालाही विशेषणत्व व विशेष्यत्व असल्यामुळें त्यांपैकीं उपसर्जन कोणतें तें निश्चित ठरवितां येत नाहीं[2]; जसें– कृष्णतिलाः येथें तिळ आहेत पण ते कृष्णवर्णाचेच पाहिजेत म्हणून तिल-

---

समास होतो, पण साधारणधर्मवाचक शब्दाचा प्रयोग नसेल तर; जसें– पुरुषो व्याघ्र इव पुरुषव्याघ्रः.

२. शूरः याचा पुरुषाकडे संबंध असल्यामुळें पुरुष हा सापेक्ष समजला जातो. तेव्हां त्याचें व्याघ्राशीं सामर्थ्य नाहीं.

१. विशेषणीभूत सुबन्ताचा समानाधिकरण अशा विशेष्याबरोबर बाहुल्येंकरूनतत्पुरुष समास होतो; उदा०:– नीलमुत्पलं नीलोत्पलम्.

२. विशेषण असें जें ठरेल त्याला उपसर्जनसंज्ञा (१।२।४३) होणार आहे, आणि त्यालाच समासामध्यें पूर्वनिपात (२।२।३०) होणार आहे,

द्धिः । कृष्णतिला इति । कृष्णशब्दोऽयं तिलशब्देनाभिसंबध्यमानो विशेषणवचनः संपद्यते । तथा तिलशब्दः कृष्णशब्देनाभिसंबध्यमानो विशेषणवचनः संपद्यते । तदुभयं विशेषणं भवत्युभयं च विशेष्यम् । विशेषणविशेष्ययोरुभयविशेषणत्वादुभयोश्च विशेष्यत्वादुपसर्जनस्याप्रसिद्धिः ॥

**न वान्यतरस्य प्रधानभावात्तद्विशेषकत्वाच्चापरस्योपसर्जनप्रसिद्धिः ॥२॥**

न वैष दोषः । किं कारणम् । अन्यतरस्य प्रधानभावात् । अन्यतरदत्र प्रधानम् । तद्विशेषकत्वाच्चापरस्य । तद्विशेषकं चापरम् । अन्यतरस्य प्रधानभावात्तद्विशेषकत्वाच्चापरस्योपसर्जनसंज्ञा भविष्यति । यदास्य तिलाः प्राधान्येन विवक्षिता भवन्ति कृष्णो विशेषणत्वेन तदा तिलाः प्रधानं कृष्णो विशेषणम् ॥ कामं तर्ह्यनेनैव हेतुना यस्य कृष्णाः प्राधान्येन विवक्षिता भवन्ति तिला विशेषणत्वेन तेन कर्तव्यं तिलकृष्णा इति । न कर्तव्यम् । न ह्ययं द्वन्द्वः । तिलाश्च कृष्णाश्चेति । न खल्वपि षष्ठीसमासः । तिलानां कृष्णा इति । किं तर्हि । द्वाविमौ प्रधानशब्दावेकस्मिन्नर्थे युगपदवरुध्येते न च द्वयोः प्रधानशब्दयोरेकस्मिन्नर्थे युगपदवरुध्यमानयोः किंचिदपि प्रयोजनमस्ति तत्र प्रयोगादेतद्गन्तव्यं नून-

शब्दाशीं कृष्णशब्दाचा संबंध केला असतां कृष्ण हें तिळाचें विशेषण समजलें जातें. तसेंच कृष्णवर्णाचे पदार्थ अनेक आहेत पण ते तिळच पाहिजेत म्हणून त्या कृष्णशब्दाशीं तिलशब्दाचा संबंध केला अतां तिल हें कृष्णाचें विशेषण समजलें जातें. अशा रीतीनें ह्या दोहोंपैकीं वाटेल तें विशेष्य होतें आणि वाटेल तें विशेषण होतें. तेव्हां विशेषण म्हणून इष्ट असलेल्यालाही विशेष्यत्व येतें, आणि विशेष्य म्हणून इष्ट असलेल्यालाही विशेषणत्व येत असल्यामुळें त्यांपैकीं उपसर्जन कोण हें ठरवितां येत नाहीं.

(वा.२) हा दोष येत नाहीं.

काय कारण ?

कृष्ण आणि तिल या दोन पदार्थांपैकीं एका पदार्थाला प्राधान्य आहे, आणि दुसरा पदार्थ त्या प्रधानार्थाचा विशेषण आहे. तेव्हां तिल हें एक विशेष्य आणि दुसरें त्याचें विशेषण असल्यामुळें त्या विशेषणाला उपसर्जनसंज्ञा होईल. प्रयोग करणाऱ्याला ज्यापेक्षां तिल हे प्रधान म्हणून विवक्षित आहेत आणि त्या प्रधानाचें विशेषण म्हणून कृष्णशब्दार्थ विवक्षित आहे त्यापेक्षां तीळ हे विशेष्य होय, व कृष्ण हें त्याचें विशेषण होय.

तर मग विवक्षेवरूनच जर हें ठरत असेल तर ज्याला कृष्णशब्दार्थ प्रधान म्हणून विवक्षित आहे आणि तीळ हे विशेषण म्हणून विवक्षित आहेत त्यानें खुशाल तिलकृष्णाः असा प्रयोग करावा काय ?

तसा प्रयोग करतां येणार नाहीं. कारण तिलकृष्णाः हा कांहीं तिलाश्च कृष्णाश्च असा द्वंद्वसमास नव्हे, किंवा तिलानां कृष्णाः असा षष्ठीतत्पुरुषही नव्हे.

तर काय आहे ?

हे दोन स्वतंत्र प्रथमान्त शब्द एकाच अर्थी एकदम प्रयोगांत आणले आहेत. आतां परस्पर अनुपकारक[४] म्हणजे स्वतंत्र अशा दोन शब्दांचा एका कालीं एकाच अर्थीं प्रयोग करण्याचें कांहींही कारण नाहीं. आणि तो तसा प्रयोग तर केला आहे. त्यावरून असें

३. कारण हे दोन शब्द येथें निरनिराळ्या वस्तूंना दाखविणारे नव्हेत.

४. विशेषणविशेष्यभावानें एकमेकाला उपकारक नसणारे, अर्थात् दोघांनाही प्राधान्य असलेले.

मत्रान्यतरत्प्रधानं तद्विशेषकं चापरमिति । तत्र त्वेतावान्संदेहः किं प्रधानं किं विशेषणमिति । स चापि क्व संदेहः । यत्रोभौ गुणशब्दौ । तद्यथा । कुब्जखञ्जः खञ्जकुब्ज इति । यत्र ह्यन्यतरद्द्रव्यमन्यतरो गुणस्तत्र यद्द्रव्यं तत्प्रधानम् । तद्यथा । शुक्लमालभेत कृष्णमालभेतेति न पिष्टपिण्डीमालभ्य कृती भवति । अवश्यं तद्गुणं द्रव्यमाकाङ्क्षति ॥ कथं तर्हीमौ द्वौ प्रधानशब्दावेकस्मिन्नर्थे युगपदवरुध्येते वृक्षः शिंशपेति नैतयोरावश्यकः समावेशः । न ह्यवृक्षः शिंशपास्ति ॥

**पूर्वापरप्रथमचरमजघन्यसमानमध्यमध्यमवीराश्च ॥ २।१।५८ ॥**

अथ किमर्थमुत्तरत्रैवमाद्यनुक्रमणं क्रियते न विशेषणं विशेष्येण बहुलम् [२.१.५७] इत्येव सिद्धम् ।

**बहुलवचनस्याकृत्स्नत्वादुत्तरत्रानुक्रमणसामर्थ्यम् ॥ १ ॥**

अकृत्स्नं बहुलवचनमित्युत्तरत्रानुक्रमणं क्रियते । यद्यकृत्स्नं यदनेन कृतम-

---

ध्यानांत येतें की यांपैकीं एक प्रधान आहे व दुसरा हा त्या प्रधानाचें विशेषण आहे. फक्त तेथें एवढाच संशय उरतो की त्या उभयतांपैकीं प्रधान कोण आणि विशेषण कोण ? हा संशय तरी कोठें येतो की जेथें दोन्हीही शब्द गुणवाचक[5] आहेत; जसें— खञ्जकुब्जः, कुब्जखञ्जः, वगैरे. जेथें उभयतांपैकीं एक द्रव्य आणि दुसरा गुण आहे तेथें जें द्रव्य असतें तें प्रधान होय[6]; जसें— श्वेतमालभेत, कृष्णमालभेत. या छागालंभन[7]-विधीचे ठिकाणीं श्वेत छागाच्या अभावीं कृष्ण छागाचें आलंभन केलें जातें, पण छाग मुळींच नसेल तर त्याच्या ऐवजीं पिष्टपिंडाचें आलंभन केल्यानें काम भागत नाहीं[8].

तर मग शिंशपा आणि वृक्ष या दोन शब्दांचा एकाच अर्थी व एका कालीं कसा बरें प्रयोग केलेला दिसतो[9] ?

वरील दोन शब्दांचा एका अर्थी एकदम प्रयोग होतोच असा नियम नाहीं. तेथें वृक्षशब्दाची कांहीं जरूरी दिसत नाहीं. कारण वृक्षाशिवाय इतराला शिंशपा म्हणतच नाहींत.[10]

(सू.५८) 'पूर्वापर' ह्या प्रकृत सूत्रापासून पुढील सूत्रें कशाकरितां बरें आरंभिलीं आहेत ? 'विशेषणं विशेष्येण' यानेंच त्यांचें काम भागेल.

(वा.१) 'विशेषणं विशेष्येण०' या सूत्रांतील बहुलग्रहणावरून समास कोठें होतो

---

५. गुणवाचकाचा द्रव्याच्या द्वारानेंच क्रियेकडे अन्वय असल्यामुळें दोन गुणवाचकांमध्यें सारखेपणा आहे म्हणून तेथें विशेषण आणि विशेष्य हा संशय येतो.

६. द्रव्याचा साक्षात्क्रियेकडे अन्वय असल्यामुळें त्याला प्राधान्य आहे, म्हणून तें गुणवाचकाच्या दृष्टीनें विशेष्यच असतें.

७. छाग म्हणजे बोकड.

८. तेव्हां नुसत्या द्रव्यानें काम भागतें, पण नुसत्या गुणानें कधींही भागत नाहीं. तेव्हां अर्थातच द्रव्याला प्राधान्य आहे, असें सिद्ध होतें.

९. म्हणजे तेथें अमुक विशेषण आणि अमुक विशेष्य असें कशावरून ठरतें ?

१०. तेव्हां शिंशपाशब्द उच्चारला म्हणजे वृक्षशब्दाची जरूरच नाहीं. आतां जर अगोदर वृक्ष असें म्हटलें तर मात्र तो वृक्ष कोणता हें समजण्याकरितां त्याला विशेषणाची जरूर लागते. तेव्हां अर्थातच शिंशपा हें विशेषण आहे असें ठरतें. तेव्हां 'शिंशपावृक्षः' असाच सामासिक शब्द होतो, 'वृक्षशिंशपा' असा होत नाहीं.

१. पूर्व, अपर, प्रथम, चरम, जघन्य, समान, मध्य, मध्यम आणि वीर ह्या सुबन्त शब्दांचा समानाधिकरण अशा सुबन्ताबरोबर विकल्पेंकरून तत्पुरुष-समास होतो; जसें— पूर्ववैयाकरणः, अपराध्यापकः वगैरे.

कृतं तत्। एवं तर्हि न ब्रूमोऽकृत्स्नमिति। कृत्स्नं च कारकं च साधकं च निर्वर्तकं च। यच्चानेन कृतं सुकृतं तत्। किमर्थं तर्ह्येवमाद्यनुक्रमणं क्रियते। उदाहरणभूयस्त्वात्। ते खल्वपि विधयः सुपरिगृहीता भवन्ति येषु लक्षणं प्रपञ्चश्च। केवलं लक्षणं केवलः प्रपञ्चो वा न तथा कारकं भवति॥ अवश्यं खल्वस्माभिरिदं वक्तव्यं बहुलम् अन्यतरस्याम् उभयथा वा एकेषामिति। सर्ववेदपारिषदं हीदं शास्त्रम्। तत्र नैकः पन्थाः शक्य आस्थातुम्॥

## श्रेण्यादयः कृतादिभिः॥२।१।५९

श्रेण्यादयः पठ्यन्ते कृतादिराकृतिगणः॥

**श्रेण्यादिषु च्व्यर्थवचनम्॥ १॥**

श्रेण्यादिषु च्व्यर्थग्रहणं कर्तव्यम्।

---

आणि कोठें होत नाहीं याचा विचार सर्वसाधारण लोकांना पूर्णपणें होणें अशक्य असल्यामुळें 'पूर्वापर०' इत्यादि सूत्रांचा आरंभ केला आहे.

जर बहुलग्रहणावरून पूर्णपणानें काम होत नाहीं तर त्या बहुलग्रहणानें जें केलें तें न केल्यासारखें समजलें जाईल.

असें आहे तर बहुलग्रहण हें अपुऱ्या अर्थाचें आहे असें आमचें म्हणणें नाहीं. तर तें पुऱ्या अर्थाचें आहे. कारक आहे, साधक आहे, व निर्वर्तक आहे. त्याच्यांत कोणताही कमीपणा नाहीं. तेव्हां त्या बहुलग्रहणानें केलेलें कार्य तें पक्केंच कार्य होत आहे.

बहुलग्रहणानें सर्व काम भागत आहे तर मग 'पूर्वापर०' इत्यादि सूत्रांचा आरंभ कशाकरितां केला आहे ?

'विशेषणं विशेष्येण०' या सूत्राचीच पुष्कळशीं उदाहरणें दाखविण्याकरितां[2] केला आहे. कारण ज्या विधीविषयीं विधायक सामान्यशास्त्र आहे व त्याच सामान्यशास्त्राचा विस्तार विशेषशास्त्रानें करून दाखविला आहे, असे विधि सर्वसाधारण लोकांनाही उत्तम तऱ्हेनें कळतात. तसा केवळ सामान्यशास्त्रानें किंवा सामान्यशास्त्र न सांगतां केवळ विस्तार केल्यानें विषयविभाग निश्चित कळत नाहीं. शिवाय[3] कोठें बहुलम्, कोठें अन्यतरस्याम्, कोठें उभयथा, आणि कोठें एकेषाम् हे शब्द घालून जो आचार्यांनीं शास्त्राचा पाठ केला आहे तो आम्हांला अत्यन्त आवश्यक आहे. कारण सर्व वेदांनाही लागू[4] पडणारें असें हें व्याकरणशास्त्र आहे. तेथें एकाच मार्गाचें अवलंबन करणें शक्य नाहीं.

(सू.५९) श्रेण्यादिगण गणपाठामध्यें दाखविला आहे. तसा कृतादि गणाचा पाठ नाहीं. तो आकृतिगण समजावयाचा आहे.

(वा.१) श्रेण्यादिगणपठित शब्दांविषयीं

---

२. 'विशेषणं विशेष्येण' या शास्त्राची प्रवृत्ति कोठें होते, कोठें होत नाहीं, हा विषयविभाग मंदबुद्धि लोकांनाही स्पष्टपणें निश्चित ठरवितां यावा म्हणून 'पूर्वापर०' इत्यादि सूत्रें केलीं आहेत.

३. 'विशेषणं विशेष्येण०' या सूत्रामध्यें बहुलग्रहणाचे ऐवजीं 'वा'शब्द घालून व्यवस्थितविभाषा स्वीकारली असतां सर्व काम भागेल. मग बहुलशब्दघटित सूत्र करण्याचें काय कारण असें कोणाला वाटेल तर त्याचें हें उत्तर आहे.

४. जर हें व्याकरणशास्त्र भाषेपुरतेंच असतें तर तुह्या म्हणण्याप्रमाणें 'वा'शब्द घालून सूत्र केल्यानें निर्वाह झाला असता; परंतु वेदामध्यें सूत्रानें स्पष्ट सांगितल्यावांचून निराळेंच एखादें कार्य करणें इष्ट असतें; त्याकरितां 'क्वचिदन्यदेव' या अर्थाचा बहुलशब्द घालूनच शास्त्र करणें भाग आहे. त्याकरितां स्पष्ट निराळें सूत्र करावयाचें म्हटलें तर अशा तऱ्हेचे शब्द वेदामध्यें अनन्त असल्यामुळें सूत्रेंही अनन्त करावीं लागणार असल्यामुळें शास्त्र फारच वाढेल.

१. सुबन्त अशा श्रेणि, एक, पूग, वगैरे गणपठित शब्दांचा समानाधिकरण अशा कृतादिगणांतील शब्दांबरोबर विकल्पानें तत्पुरुषसमास होतो; जसें– अश्रेणयः श्रेणयः कृताः श्रेणिकृताः.

अश्रेणयः श्रेणयः कृताः श्रेणिकृताः। यदा हि श्रेणय एव किंचित्क्रियन्ते तदा मा भूदिति ॥ अन्यत्रायं च्व्यर्थग्रहणेषु च्व्यन्तस्य प्रतिषेधं शास्ति। तदिह न तथा किं कारणम्। अन्यत्र पूर्वं च्व्यन्तकार्यं परं च्व्यर्थकार्यम्। इह पुनः पूर्वं च्व्यर्थकार्यं परं च्व्यन्तकार्यमिति ॥

**क्तेन नञ्विशिष्टेनानञ्॥२।१।६०**

**नञ्विशिष्टे समानप्रकृतिवचनम्॥१॥**

नञ्विशिष्टे समानप्रकृतिग्रहणं कर्तव्यम्। इह मा भूत्। सिद्धं चाभुक्तं चेति ॥

अनञिति च प्रतिषेधो वक्तव्यः। इह

---

च्विप्रत्ययाचा अर्थ जो अभूततद्भाव (५।४। ५०) तो गम्यमान असतांना श्रेण्यादिकांचा कृतादिशब्दांबरोबर समास होतो असें वचन करावें; जसें– अश्रेणयः श्रेणयः कृताः श्रेणिकृताः. आतां जेव्हां खरोखरच श्रेणि कांहीं कामाकरितां केल्या जातील त्या वेळीं समास न व्हावा म्हणून.

अन्यें[२] ठिकाणीं (१।४।७४ वा.१) हा आचार्य च्व्यर्थ ग्रहण करून त्याविषयीं 'च्व्यन्तस्य प्रतिषेधः' (१।४।७४ वा.३) असा असा प्रत्यक्ष च्विप्रत्यय केला असतांना त्या कार्याचा निषेध सांगतो त्याप्रमाणें प्रकृतस्थळीं सांगत नाहीं याचें काय बरें कारण ?

कारण असें की अन्य ठिकाणीं प्रत्यक्ष च्विप्रत्ययामुळें होणारें कार्य अष्टाध्यायीमध्यें आचार्यांनें प्रथमतः (१।४।६१) पठित आहे, व त्यानंतर (१।४।७४) च्विप्रत्ययाच्या अर्थामुळें होणारें कार्य पठित आहे. आणि प्रकृत. स्थलीं त्याच्या उलट म्हणजे च्विप्रत्ययाच्या अर्थामुळें होणारें कार्य प्रथमतः (२।१।५९) पठित आहे व त्याच्या पुढें (२।२।१८) प्रत्यक्ष च्विप्रत्ययामुळें होणारें कार्य पठित आहे.

(सू.६०, वा.१) नञ्शब्दानें युक्त असलेल्या क्तप्रत्ययान्ताविषयीं समानप्रकृतिग्रहण करावें; म्हणजे नञ्विशिष्ट क्तप्रत्ययान्त व नञ्रहित क्तप्रत्ययान्त या उभयतांमधील क्तप्रत्ययाची प्रकृति अर्थानें आणि वर्णांनीं सारखी असली तरच समास होतो असें वचन करावें. कारण 'सिद्धं चाभुक्तं च' येथें समास न झालपाहिजे. आणखी नञानें युक्त अशा क्तप्रत्यायान्ताबरोबर ज्या सुबन्ताचा समास होणार तें नञानें रहित असावें असेंही म्हटलें पाहिजे.[२] कारण कर्तव्यमकृतम् येथें समास न झाला पाहिजे.

---

२. साक्षात् वगैरे शब्दांना च्विप्रत्ययाचा अर्थ गम्यमान असतांना विकल्पानें सांगितलेली गतिसंज्ञा प्रत्यक्ष च्विप्रत्यय केला असतांना इष्ट नाहीं म्हणून तेथें निषेध केला आहे; तेव्हां तेथें नित्यगतिसंज्ञा होते. तसें येथें श्रेणि वगैरे शब्दांचा च्विप्रत्ययाचा अर्थ गम्यमान असतांना कृत वगैरे शब्दांबरोबर विकल्पानें सांगितलेला तत्पुरुषसमास प्रत्यक्ष च्विप्रत्यय केला असतांना इष्ट नाहीं, नित्यसमासच तेथें इष्ट आहे. परंतु येथें या समासविकल्पाचा निषेध कां केला नाहीं असा आक्षेप आहे.

३. तेव्हां तेथें परत्वास्तव विकल्पानें गतिसंज्ञा होऊं लागेल म्हणून निषेध करावा लागला.

१. ज्याच्यामागें नञ्शब्द नाहीं अशा क्तप्रत्ययान्ताचा, समानाधिकरण असून मागें नञ् असलेल्या अशा प्रत्ययान्ताबरोबर विकल्पानें तत्पुरुषसमास होतो; जसें– कृतं च तदकृतं च कृताकृतम्, भुक्ताभुक्तम्, पीतापीतम्.

२. अनञ् असें म्हटलें नाहीं तर नञानें युक्त आणि क्तप्रत्ययान्त अशा सुबन्ताबरोबर ज्या पूर्वपदाचा समास करावयाचा तें त्याच्या उलट म्हणजे नञानें रहित आणि क्तप्रत्ययान्त नसलेलें असें मनांत येईल आणि त्यामुळें कर्तव्यशब्दाचा अकृतशब्दाबरोबर समास होऊं लागेल. सूत्रामध्यें अनञ् असें म्हटलें म्हणजे मात्र पूर्वपद हें फक्त नञानेंच त्याच्या उलट पाहिजे असा अर्थ होईल आणि कर्तव्य या पूर्वपदामध्यें तव्यप्रत्ययानेंही निराळेपणा येत असल्यानें समास होत नाहीं.

मा भूत् । कर्तव्यमकृतमिति ॥

## नुडिडधिकेन च ॥ २ ॥

नुडिडधिकेन च समासो वक्तव्यः । इहापि यथा स्यात् । अशितानशितेन जीवति । क्लिष्टाक्लिशितेन जीवतीति ॥

किमुच्यते समानप्रकृतिग्रहणं कर्तव्यमिति यदा नञ्विशिष्टेनेत्युच्यते न चात्र नञ्कृत एव विशेषः । किं तर्हि । प्रकृतिकृतोऽपि ॥ अयं विशिष्टशब्दोऽस्त्येवावधारणे वर्तते । तद्यथा । देवदत्तयज्ञदत्तावाढ्यावभिरूपौ दर्शनीयौ पक्षवन्तौ देवदत्तस्तु यज्ञदत्तात्स्वाध्यायेन विशिष्टः । स्वाध्यायेनैवेति गम्यतेऽन्ये गुणाः समा भवन्ति । अस्त्याधिक्ये वर्तते । तद्यथा । देवदत्तयज्ञदत्तावाढ्यावभिरूपौ दर्शनीयौ पक्षवन्तौ देवदत्तस्तु यज्ञदत्तात्स्वाध्यायेन विशिष्टः । स्वाध्यायेनाधिकोऽन्ये गुणा अविवक्षिता भवन्ति ॥ तद्यदा तावदवधारणे विशिष्टशब्दस्तदा नैवार्थः समानप्रकृतिग्रहणेन । नेह भविष्यति । सिद्धं चाभुक्तं चेति । नाप्यनञिति प्रतिषेधेन । नेह भविष्यति । कर्तव्यमकृतमिति ।

---

(वा. २) नुट् आणि इट् हे आगम ज्यामध्यें अधिक आहेत अशाही नञानें युक्त क्त-प्रत्ययान्ताबरोबर समास होतो असें वचन करावें. कारण अशितानशितेन जीवति, क्लिष्टाक्लिशितेन जीवति, येथें नुट् व इट् अधिक असतांही समास झाला पाहिजे.[३]

समानप्रकृतिग्रहण करावें असें येथें काय बरें म्हटलें आहे? त्याचें प्रयोजन कांहींच नाहीं. कारण सूत्रामध्यें नञामुळेंच ज्यांत आधिक्य आहे अशा अर्थाचें 'नञ्विशिष्टेन' असें म्हटलें आहे. आणि सिद्धं चाभुक्तं च येथें तर केवळ नञामुळेंच फरक आहे असें नाहीं तर प्रकृतीमुळेंही आहे. आतां विशिष्ट शब्द हा अवधारणसहित आधिक्य या अर्थी आहे;[४] असेंः– देवदत्त व यज्ञदत्त हे उभयतां संपन्न, सुंदर, दर्शनीय आणि चार माणसांचे पोशिंदे असे आहेत. त्यांपैकीं देवदत्त हा यज्ञदत्तापेक्षां वेदविद्येनें विशिष्ट आहे असें सांगितलें असतां फक्त वेदविद्येनेंच अधिक आहे बाकीचे गुण उभयतांचे सारखे आहेत असा अर्थ मनांत येतो. तसेंच अवधारणरहित आधिक्य या अर्थीही विशिष्ट शब्द आहे; जसेंः– देवदत्त व यज्ञदत्त हे उभयतां संपन्न, सुंदर, दर्शनीय आणि चार माणसांचे पोशिंदे आहेत; आणि देवदत्त यज्ञदत्तापेक्षां वेदाध्ययनानें विशिष्ट आहे असें म्हटलें असतां वेदाध्ययनानें अधिक येवढाच अर्थ मनांत येतो; बाकीचे गुण सारखे किंवा अधिक हें कांहींच मनांत येत नाहीं. तेव्हां अवधारणसहित अधिक या अर्थाला विशिष्ट शब्द दाखवितो असें जेव्हां गृहीत धरलें तेव्हां 'समानप्रकृतिग्रहणम्' हें वचन करण्याचा उपयोग नाहीं.[५] सिद्धं चाभुक्तं च येथें समास प्राप्त होणारच नाहीं. तसेंच 'अनञ्'[६] हा प्रतिषेधही करण्यांत उपयोग होत नाहीं.

---

३. कारण अशित आणि अनशित यांमध्यें फक्त नञानेंच निराळेपणा नाहीं, तर नुट् (६।३।७४) या आगमानेंही आहे. तसेंच क्लिष्ट आणि अक्लिशित यांमध्यें इट् (७।२।३५) या आगमानेंही होत आहे.

४. विशिष्ट हा शब्द अधिक या अर्थाचा वाचक आहे. म्हणजे देवदत्त हा यज्ञदत्तापेक्षां अमक्या गुणानें विशिष्ट आहे, म्ह. अधिक आहे, असें म्हटलें असतां तेवढ्याच गुणानें अधिक आहे असा कांहीं ठिकाणीं अर्थ भासतो. यालाच अवधारण म्हणतात. कांहीं ठिकाणीं असें अवधारण भासत नाहीं. तेथें अधिक एवढाच अर्थ विशिष्ट शब्दाचा असतो.

५. फक्त नञामुळेंच निराळेपणा पाहिजे, आणि येथें सिध् आणि भुज् हे धातु दोन निराळे असल्यामुळेंही निराळेपणा आहे.

६. येथेंही नञाशिवाय इतर गोष्टीनें म्हणजे तव्य आणि क्त या प्रत्ययांनींही निराळेपणा होत आहे.

नुडिडधिकेनापि तु तदा समासो न प्राप्नोति । यदाधिक्ये विशिष्टशब्दस्तदा समानप्रकृतिग्रहणं कर्तव्यम् । इह मा भूत् । सिद्धं चाभुक्तं चेति । अनञिति च प्रतिषेधो वक्तव्यः । इह मा भूत् । कर्तव्यमकृतमिति । नुडिडधिकेनापि तु समासः सिद्धो भवति । तत्राधिक्ये विशिष्टशब्दं मत्वा समानप्रकृतिग्रहणं चोद्यते ॥

अवधारणं नञा चेन्नुडिड्विशिष्टेन न प्रकल्पेत ।

अथ चेदधिकविवक्षा कार्यं तुल्यप्रकृतिकेनेति ॥

**कृतापकृतादीनां चोपसंख्यानम् ॥ ३**

कृतापकृतादीनां चोपसंख्यानं कर्तव्यम् । कृतापकृतम् भुक्तविभुक्तम् पीतविपीतम् ॥

**सिद्धं तु क्तेन विसमाप्तावनञ् ॥ ४ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । क्तान्तेन क्रियाविसमाप्तावनञ्क्तान्तं समस्यत इति वक्तव्यम् ॥

**गतप्रत्यागतादीनां चोपसंख्यानम् ।५**

गतप्रत्यागतादीनां चोपसंख्यानं कर्तव्यम् । गतप्रत्यागतम् यातानुयातम् पुटापुटिका क्रयाक्रयिका फलाफलिका मानो-

---

कर्तव्यमकृतम् येथें समास प्राप्त होणारच नाहीं. परंतु याप्रमाणें नञ्विशिष्ट क्तप्रत्ययान्तामध्यें नुट् व इट् अधिक असतां तेथेंही समास प्राप्त होणार नाहीं, म्हणून 'नुडिडधिकेन' हें वचन मात्र केलें पाहिजे. आतां जेव्हां केवळ आधिक्य या अर्थाला दाखविणारा विशिष्ट शब्द घेतला तेव्हां 'समानप्रकृतिग्रहणम्' हें वचन करावयास पाहिजे, सिद्धं चाभुक्तं च येथें समास न व्हावा म्हणून. तसेंच 'अनञ्' असेंही म्हटलें पाहिजे, कर्तव्यमकृतम् येथें समास न व्हावा म्हणून. परंतु नुट् व इट् अधिक असतांही तेथें समास सूत्रानेंच साधत असल्यामुळें 'नुडिडधिकेन' हें वचन मात्र करावयास नको. तात्पर्य, केवळ आधिक्यार्थक विशिष्ट शब्द गृहीत धरून 'समानप्रकृतिग्रहणम्' हें वचन केलें पाहिजे असें म्हटलें आहे.

केवळ नञ्च अधिक असतां समास होतो असें म्हटलें तर नुट्, इट् अधिक असतां समास प्राप्त होणार नाहीं. आतां केवळ आधिक्य या अर्थाचा विशिष्ट शब्द विवक्षित असेल तर 'समानप्रकृतिग्रहणम्' हें वचन करावयास पाहिजे.

(वा.३) कृतापकृत वगैरे ठिकाणीं समास होण्याकरितां वचन करावें; जसें:— कृतापकृतम्, भुक्तविभुक्तम्, पीतमपीतम्, वगैरे.

(वा.४) कृतापकृत वगैरे स्थलीं समास साधत आहे.

तो कसा ?

क्रियेची असमाप्ति गम्यमान असतांना क्तप्रत्ययान्ताबरोबर नञ्रहित अशा क्तप्रत्ययान्ताचा समास होतो असें वचन करावें.

(वा.५) गतप्रत्यागत वगैरे ठिकाणींही समास होण्याकरितां वचन करावें; जसें— गतप्रत्यागतम्, पातानुपातम्, पुटापुटिका, क्रया-

---

७. कारण फक्त नञामुळेंच फरक झाला असला पाहिजे असा आग्रह धरतां येत नाहीं.

८. कारण येथें उत्तरपद नञानें युक्त नाहीं.

९. कृताकृतं येथें कर्तव्यापैकीं एका अंशाचें करणें आणि एका अंशाचें न करणें यामुळें त्या क्रियेची असमाप्ति प्रतीत होते. तसें जें केलें तें विरूप केलें असल्यामुळें न केल्यासारखेंच होतें, तेव्हां कृतापकृतम् इत्यादि स्थलीं क्रियेची असमाप्ति प्रतीत होत असल्यामुळें समास साधतो.

१०. जो गांवाला जाण्याकरितां बाहेर पडला तो त्या गावाला न पोचतांच मधून परत फिरला त्याच्या जाण्यायेण्याला गतप्रत्यागत असें म्हणतात. गतं च तत्प्रत्यागतं च असा समास सोडवावयाचा.

न्मानिका ॥

**[सन्महत्परमोत्तमोत्कृष्टाः पूज्यमानैः ॥२।१।६१॥**

**वृन्दारकनागकुञ्जरैः पूज्यमानम् ॥२।१।६२॥**

**कतरकतमौ जातिपरिप्रश्ने ॥ २।१।६३॥**

**किं क्षेपे ॥२।१।६४**

**पोटायुवतिस्तोककतिपयगृष्टिधेनुवशावेहद्बष्कयणीप्रवक्तृश्रोत्रियाध्यापकधूर्तैर्जातिः ॥ २।१।६५ ॥**

**प्रशंसावचनैश्च ॥२।१।६६॥]**

**युवा खलतिपलितवलिनजरतीभिः ॥२।१।६७॥**

अयुक्तोऽयं निर्देशः । समानाधिकरणेनेति वर्तते कः प्रसङ्गो यद्व्यधिकरणानां समासः स्यात् ॥ एवं तर्हि ज्ञापयत्याचार्यो यथाजातीयकमुत्तरपदं तथाजातीयकेन पूर्वपदेन समस्यत इति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । प्रातिपदिकग्रहणे लिङ्गविशिष्टस्यापि ग्रहणं भवतीत्येषा परिभाषा न कर्तव्या भवति ॥

**[कृत्यतुल्याख्या अजात्या ॥**

---

क्रयिका, फलाफलिका, मानोन्मानिका.

(सू.६७) येथें युवन् या पुंलिंगी शब्दाचा जरती या स्त्रीलिंगी शब्दाबरोबर जो समास सांगण्यांत आला आहे तो अयोग्य होय. कारण 'समानाधिकरणेन' या अधिकाराची येथें अनुवृत्ति आहे. तेव्हां व्यधिकरण अशा त्या शब्दांच्या समासाचा मुळीं प्रसंगच येत नाहीं.

असें आहे तर ज्या जातीचें उत्तरपद असेल त्या जातीच्या पूर्वपदाबरोबर हा समास होतो असें आचार्य सुचवीत आहे.

असें सुचविल्याचें काय फळ ?

'प्रातिपदिकांचें ग्रहण केलें असेल तेथें त्या प्रातिपदिकानें स्त्रीलिंगप्रत्ययविशिष्टाचेंही ग्रहण

---

१ (६१) सत, महत, परम, उत्तम आणि उत्कृष्ट ह्या शब्दांचा समानाधिकरण अशा पूज्यमानवाचक शब्दाबरोबर विकल्पानें तत्पुरुष समास होतो; जसें:– संश्चासौ पुरुषश्च सत्पुरुषः, महापुरुषः.

(६२). वृन्दारक, नाग आणि कुंजर या शब्दांबरोबर समानाधिकरण अशा पूज्यमानवाचक सुबन्ताचा विकल्पानें तत्पुरुषसमास होतो; जसें:— गौश्चासौ वृन्दारकश्च गोवृन्दारकः, गोनागः, वगैरे.

(६३). जातिविषयक प्रश्न या अर्थाला दाखविणाऱ्या कतर आणि कतम या शब्दांचा समर्थ सुबन्ताबरोबर विकल्पानें तत्पुरुषसमास होतो; जसें:– कतरकठः, कतमकलापः.

(६४). निंदा या अर्थाला दाखविणाऱ्या किम्-शब्दाचा समर्थ सुबन्ताबरोबर विकल्पानें तत्पुरुषसमास होतो, जसें– किंराजा, किंसखा.

(६५). पोटा, युवति, स्तोक, कतिपय, गृष्टि, धेनु, वशा, वेहत्, बष्कयणी, प्रवक्तृ, श्रोत्रिय, अध्यापक, आणि धूर्त या शब्दांबरोबर जातिवाचक सुबन्ताचा विकल्पेंकरून तत्पुरुषसमास होतो; जसें:– इभी चासौ पोटा च इभपोटा, वगैरे.

(६६). प्रशंसा या अर्थाला दाखविणाऱ्या शब्दांबरोबर जातिवाचक सुबन्ताचा विकल्पेंकरून तपुरुषसमास होतो; जसें– प्रशस्ता गौः गोमतल्लिका, अश्वप्रकाण्डम्, वगैरे.

१. समानाधिकरण अशा खलति, पलित, वलिन आणि जरती या शब्दांबरोबर युवन्शब्दाचा विकल्पेंकरून तत्पुरुषसमास होतो; जसें– युवा चासौ खलतिश्च युवखलतिः, युवपलितः, वगैरे.

२. मुखं चन्द्रः वगैरे स्थलीं भिन्नलिंगी शब्दांचेंही सामानाधिकरण्य दृष्टीस पडतें, तथापि तें नियतलिंग स्थलींच असतें. युवन् हा शब्द नियतलिंग नसल्यामुळें पुंल्लिंगी युवन्शब्दाचें स्त्रीलिंगी जरतीशब्दाबरोबर सामानाधिकरण्य उपपन्न होत नाहीं.

३. म्हणजे येथें युवति या स्त्रीलिंगी शब्दाबरोबर.

१. कृत्यप्रत्यय शेवटीं असलेले शब्द किंवा तुल्य या अर्थाला दाखविणारे शब्द यांचा जातिवाचक नव्हे अशा सुबन्ताबरोबर विकल्पानें तपुरुषसमास होतो; जसें– भोज्यं च तदुष्णं च भोज्योष्णम्,

२ । १ । ६८ ॥]

**वर्णो वर्णेन ॥ २ । १ । ६९ ॥**

इदं विचार्यते वर्णेन तृतीयासमासो वा स्यात्। कृष्णेन सारङ्गः कृष्णसारङ्गः। समानाधिकरणो वा। कृष्णः सारङ्गः कृष्णसारङ्ग इति। कश्चात्र विशेषः।

**वर्णेन तृतीयासमास एतप्रतिषेधे वर्णग्रहणम् ॥ १ ॥**

वर्णेन तृतीयासमास एतप्रतिषेधे वर्णग्रहणं कर्तव्यम्। तृतीया पूर्वपदं प्रकृतिस्वरं भवति। अनेते वर्ण इति वक्तव्यम्॥ अथ द्वितीयेन वर्णग्रहणेनैतविशेषणेनार्थः। बाढमर्थो यद्यवर्ण एतशब्दोऽस्ति। ननु चायमस्ति। आ इत एतः कृष्णेतः लोहितेत इति। नार्थ एवमर्थेन वर्णग्रहणेन। यदि तावदयं कर्मणि क्तस्तृतीया कर्मणि [६.२.४८] इत्यनेन स्वरेण भवितव्यम्। अथापि कर्तरि परत्वात्कृत्स्वरेण भवितव्यम्॥ अथ समानाधिकरणः।

**समानाधिकरणे द्विर्वर्णग्रहणम् ॥ २ ॥**

---

करावें' ही परिभाषा करावयास नको.

(सू.६९) येथें हा विचार केला जात आहे की वर्णवाचिशब्दाबरोबर कृष्णेन[१] सारङ्गः कृष्णसारङ्गः असा तृतीयातत्पुरुष समास करावयाचा, किंवा कृष्णश्चासौ सारङ्गश्च असा समानाधिकरण तत्पुरुषसमास करावयाचा ?

या दोन तऱ्हांत काय फरक आहे ?

(वा.१) वर्णवाचकाबरोबर तृतीयासमास केला तर स्वरविधि कर्तव्य असतां वर्णग्रहण करावें लागेल; म्हणजे 'तत्पुरुषे तुल्यार्थ०' (६।२।२) या तृतीयान्त पूर्वपदाला प्रकृतिस्वर सांगणाऱ्या सूत्राच्या पुढें 'अनेते वर्णः' वर्णवाचक पूर्वपदाला प्रकृतिस्वर होत नाहीं; एतशब्द उत्तरपद पुढें असतांना, असें सूत्र करावें. कारण हिमेन[३] एतः हिमैतः येथें तृतीयान्त पूर्वपदाला प्रकृतिस्वर न झाला पाहिजे. 'अनेते वर्णः' येथें एतशब्दाला विशेषण देण्याकरितां दुसरा सप्तम्यन्त वर्णशब्द घालण्याचा उपयोग आहे काय ?

खात्रीनें उपयोग होईल. पण जर एतशब्द वर्णाखेरीज अन्य अर्थाला दाखवीत असेल तर.

असेल तर असें कां म्हणतां ? हा आहे कीः– आ इतः एतः, कृष्णेन एतः कृष्णेतः; लोहितेतः.

याकरितां दुसरा शब्द घालण्याचें कारण नाहीं. जर आ इतः एतः येथील क्तप्रत्यय कर्मार्थक असेल तर कृष्णेतः येथें 'तृतीया कर्मणि' (६।२।४८) यानें तृतीयान्ताला प्रकृतिस्वर होणारच[४]. आतां कर्ता या अर्थाला दाखविणारा क्तप्रत्यय असेल तथापि पूर्वपदप्रकृतिस्वरापेक्षां परत्वास्तव 'गतिकारको०' (६।२।१३९) यानें कृत्स्वर होईल. आतां वर्णवाचकांचा समानाधिकरण समास केला तर–

(वा.२) वर्णवाचकांचा समानाधिकरण

---

तुल्यश्वेतः, वगैरे.

१. वर्णविशेषवाचक सुबन्ताचा समानाधिकरण अशा वर्णविशेषवाचक सुबन्ताबरोबर विकल्पानें तत्पुरुषसमास होतो; जसेः– कृष्णश्चासौ सारङ्गश्च कृष्णसारङ्गः, लोहितशबलः.

२. कृष्णवर्णामुळें मिश्रवर्णाचा. कृष्णश्वेतः येथेंही कृष्णवर्णानें सहित श्वेतवर्णाचा असा तृतीयासमास संभवतो. तेव्हां 'वर्णो वर्णेन' हें प्रकृतसूत्र तृतीयासमासाच्या प्रकरणांत घालावें किंवा जें सूत्रकारांनीं या समानाधिकरणसमासाच्या प्रकरणांत घातलें आहे तेथेंच ठेवावें असें या प्रश्नाचें तात्पर्य आहे.

३. हिमेन येथें हेत्वर्थी तृतीया. 'तृतीया तत्कृतार्थेन' (२।१।३०) यानें समास झाला आहे.

४. अनेते हा निषेध मागील सूत्राचाच (६।२।२) आहे; 'तृतीया कर्मणि' याचा होणार नाहीं.

समानाधिकरणे द्विर्वर्णग्रहणं कर्तव्यम्। वर्णो वर्णेष्वनेत इति वक्तव्यम्। एकं वर्णग्रहणं कर्तव्यमिह मा भूत्। परमशुक्लः परमकृष्ण इति। द्वितीयं वर्णग्रहणं कर्तव्यमिह मा भूत्। कृष्णतिला इति॥ एकं वर्णग्रहणमनर्थकम्। अन्यतरत्र कस्मान्न भवति। लक्षणप्रतिपदोक्तयोः प्रतिपदोक्तस्यैवेति॥

एवं सति तान्येतानि त्रीणि वर्णग्रहणानि भवन्ति समासविधौ द्वे स्वरविधौ चैकम्। यस्यापि तृतीयासमासस्तस्यापि तान्येव त्रीणि वर्णग्रहणानि भवन्ति समासविधौ द्वे स्वरविधौ चैकम्। सामान्येन मम तृतीयासमासो भविष्यति तृतीया तत्कृतार्थेन गुणवचनेन [२.१.३०] इति॥ अवश्यं वर्णेन प्रतिपदं समासो वक्तव्यो यत्र तेन न सिध्यति तदर्थम्। क च तेन न सिध्यति। शुक-

समास केला तर दोनदां वर्णशब्द घातला पाहिजे. म्हणजे 'वर्णो वर्णेष्वनेते' (६।२।३) असें सूत्र पढलें पाहिजे. परमशुक्लः, परमकृष्णः, येथें पूर्वपदप्रकृतिस्वर न होण्याकरितां एक म्हणजे प्रथमान्त वर्णशब्द घातला पाहिजे, आणि कृष्णतिलाः इत्यादि स्थलीं पूर्वपदप्रकृतिस्वर न व्हावा म्हणून दुसरा म्हणजे सप्तम्यन्त वर्णशब्द घातला पाहिजे.

समानाधिकरणसमासपक्षीं 'वर्णो वर्णेष्वनेते' (६।२।३) या सूत्रांतील दोन वर्णशब्दांपैकीं एक वर्णशब्द उगीच घातला आहे.

पण एक वर्णशब्द काढला तर वर्णवाचकशब्द पुढें असतांना वर्णभिन्नवाचकाला किंवा वर्णभिन्नवाचक शब्द पुढें असतांना मागील वर्णवाचकाला पूर्वपदप्रकृतिस्वर कां बरें होणार नाहीं?

त्या स्वरविधीविषयीं लक्षणप्रतिपदोक्त परिभाषेनें 'वर्णो वर्णेन' (२।१।६९) यानेंच केलेला समास घ्यावयाचा असल्यामुळें इतर ठिकाणीं पूर्वपदप्रकृतिस्वर होणार नाहीं.

असें आहे तर 'वर्णो वर्णेन' या समासविधीचे ठिकाणीं दोन वर्णशब्द आणि 'अनेते वर्णः' या स्वरविधीचे ठिकाणीं एक वर्णशब्द मिळून एकंदर तीन वर्णशब्द समानाधिकरणसमासपक्षीं होतात. आतां ज्याच्या मतीं वर्णवाचकाशीं तृतीयासमास करावयाचा त्याच्याही मतीं समासविधीचे ठिकाणीं दोन वर्णशब्द आणि स्वरविधीचे ठिकाणीं एक वर्णशब्द मिळून तीन वर्णशब्द होत आहेतच.

पण माझ्या मतीं 'तृतीया तत्कृतार्थेन' (२।१।३०) या सामान्यसूत्रानेंच कृष्णसारङ्गः इत्यादि वर्णवाचकांचा समास होईल.

'वर्णो वर्णेन' हा वर्णवाचकाबरोबर प्रतिपदोक्त समास मुद्दाम अशाकरितां सांगितलाच पाहिजे की जेथें 'तृतीया तत्कृतार्थेन०' (२।१।३०) यानें समास होऊं शकतच नाहीं.

कोठें बरें 'तृतीया तत्कृतार्थेन०' यानें समास होऊं शकत नाहीं?

शुकबभ्रुः, हरितबभ्रुः, येथें.

५. तेव्हां अर्थातच तृतीयासमासपक्षीं तीन वर्णशब्दांची जरूरी नाहीं.

६. शुक म्हणजे हिरवा किंवा पांढरा. हरित म्हणजे हिरवा. बभ्रु म्हणजे पिंगट. हे तिन्ही विशेष वर्ण असल्यामुळें यांपैकीं कोणत्याही एका वर्णानें दुसरा वर्ण केला असें म्हणतां येत नाहीं. सारङ्ग म्हणजे मिश्र वर्ण हा विशेष वर्णांनीं केला जातो म्हणून कृष्णसारङ्गः या उदाहरणामध्यें 'तृतीया तत्कृता०' या सामान्यसूत्रानें समास सिद्ध होईल. परंतु विशेषणवाचक अशा दोन शब्दांच्या तृतीयासमासाकरितां 'वर्णो वर्णेन' हें स्वतंत्र सूत्र केलेंच पाहिजे. आतां शुकेन बभ्रुः येथें तृतीया सह या अर्थी समजावी.

बभ्रुः हरितबभ्रुरिति । तथा च सति तान्येव त्रीणि वर्णग्रहणानि भवन्ति समासविधौ द्वे स्वरविधौ चैकम् ॥ अथेदानीं समानाधिकरणः सामान्येन सिद्धः स्यात् । बाढं सिद्धः । कथम् । विशेषणं विशेष्येण बहुलम् [२.१.५७] इति । एवमपि द्वे वर्णग्रहणे कर्तव्ये स्वरविधावेव प्रतिपदोक्तस्याभावात् ॥ तस्मात्समानाधिकरण इत्येष पक्षो ज्यायान् ॥

**समानाधिकरणाधिकारे प्रधानोपसर्जनानां परं परं विप्रतिषेधेन ॥ ३ ॥**

तेव्हां 'वर्णो वर्णेन' हें सूत्र करणें जरूर असल्यामुळें समासविधीचे ठिकाणीं दोन आणि स्वरविधीचे ठिकाणीं एक मिळून तीन वर्णशब्द होणारच.

बरें आतां समानाधिकरणसमासपक्षीं शुकबभ्रुः अशा उदाहरणामध्यें समानाधिकरणसमास सामान्यसूत्रानें करतां येईल काय ?

होय, खात्रीनें करतां येईल.

तो कोणत्या सूत्रानें ?

'विशेषणं विशेष्येण०' (२।१।५७) या सूत्रानें. तरीसुद्धां स्वरविधीचे ठिकाणींच दोन वर्णशब्द घालावे लागत आहेत. कारण 'वर्णो वर्णेन' हा प्रतिपदोक्तसमास आतां नाहीं. तेव्हां एकंदरींत एकवर्णशब्द कमी होत असल्यामुळें तृतीयासमासपक्षापेक्षां समानाधिकरणसमास हा पक्ष श्रेष्ठ होय.

(वा.३) यॉं कर्मधारयसमासाच्या प्रक-

समानाधिकरणाधिकारे प्रधानोपसर्जनानां परं परं भवति विप्रतिषेधेन । प्रधानानां प्रधानमुपसर्जनानामुपसर्जनम् ॥ प्रधानानां तावत्प्रधानम् । वृन्दारकनागकुञ्जरैः पूज्यमानम् [२.१.६२] इत्यस्यावकाशः । गोवृन्दारकः अश्ववृन्दारकः । पोटायुवतीनामवकाशः । इभ्ययुवतिः आढ्ययुवतिः । इहोभयं प्राप्नोति । नागयुवतिः वृन्दारकयुवतिः । प्रधानानां परं प्रधानं भवति विप्रतिषेधेन ॥ उपसर्जनानां परमुपसर्जनम् । सन्महत्परमो-

रणामध्यें प्रधानप्रधानांचा किंवा उपसर्जनउपसर्जनांचा परस्परसमास प्रसक्त असतां विप्रतिषेध असल्यामुळें परत्वास्तव परसूत्रावरून प्रधानामध्यें प्रधान कोण आणि उपसर्जनांमध्यें उपसर्जन कोण तें ठरवावें. परशास्त्रावरून प्रधानामध्यें प्रधान ठरविल्याचें उदाहरणः– वृन्दारकनागकुंजरैः' (२।१।६२) या समासाला गोवृन्दारकः, अश्ववृन्दारकः, येथें अवकाश आहे. व 'पोटायुवति०' (२।१।६५) या समासाला इभ्ययुवतिः, आढ्ययुवतिः, येथें अवकाश आहे. आणि नागयुवतिः, वृन्दारकयुवतिः, येथें त्या दोन्ही शास्त्रांची प्राप्ति येत आहे. तेव्हां येथें नाग आणि युवति या दोन प्रधानांपैकीं युवति हेंच प्रधान ठरतें. कारण परत्वास्तव 'पोटायुवति०' या परशास्त्रानेंच येथें समास होत आहे. परशास्त्रावरून उपसर्जनामध्यें उपसर्जन ठरविल्याचें

७. समासविधायक सूत्रामध्यें जें पद प्रथमाविभक्ति लावून उच्चारलेलें असतें तें उपसर्जन (१।२।४३) होय. तेंच सामासिक शब्दामध्यें विशेषण समजलें जातें, आणि तेंच त्या शब्दामध्यें पूर्वी (२।२।३०) उच्चारलें जातें. तसेंच समासविधायक शास्त्रामध्यें जें पद तृतीयाविभक्ति लावून उच्चारलेलें असतें, तें त्या दोन शब्दांमध्यें प्रधान म्हणजे विशेष्य होय, आणि तेंच त्या सामासिक शब्दामध्यें पुढें उच्चारलें जातें. अशी व्यवस्था जरी आहे तरी कांहीं ठिकाणीं संशय उत्पन्न होतो. ज्या दोन शब्दांचा समास एका सूत्रानें केला तर एक प्रधान ठरतो त्याच दोन शब्दांचा दुसऱ्या सूत्रानें समास केला तर दुसरा प्रधान ठरतो. तशा ठिकाणचा संशय दूर करण्याकरितां ह्या वार्तिकाची प्रवृत्ति आहे.

८. येथें 'वृन्दारकनाग०' या शास्त्रानें समास केला तर नागाला प्राधान्य ठरून युवतिनाग असें होईल, आणि 'पोटायुवति०' या शास्त्रानें समास केला तर युवतीला प्राधान्य ठरून नागयुवति असें होईल. तेव्हां येथें परत्वास्तव 'पोटायुवति०' यानेंच समास करावयाचा आहे.

त्तमोत्कृष्टाः [६१] इत्यस्यावकाशः । सद्गवः सदश्वः । कृत्यतुल्याख्या अजात्या [६८] इत्यस्यावकाशः । तुल्यश्वेतः तुल्यकृष्णः । इहोभयं प्राप्नोति । तुल्यसन् तुल्यमहान् । उपसर्जनानां परमुपसर्जनं भवति विप्रतिषेधेन ॥

**समानाधिकरणसमासाद्बहुव्रीहिः ॥४**

समानाधिकरणसमासाद्बहुव्रीहिर्भवति विप्रतिषेधेन । समानाधिकरणसमासस्यावकाशः । वीरः पुरुषो वीरपुरुषः । बहुव्रीहेरवकाशः । कण्ठेकालः । इहोभयं प्राप्नोति । वीरपुरुषको ग्रामः । बहुव्रीहिर्भवति विप्रतिषेधेन ॥

**कदाचित्कर्मधारयः सर्वधनाद्यर्थः ॥५**

कदाचित्कर्मधारयो भवति बहुव्रीहेः । किं प्रयोजनम् । सर्वधनाद्यर्थः । सर्वधनी । सर्वबीजी । सर्वकेशी नटः । गौरखरवदरण्यम् । गौरमृगवदरण्यम् । कृष्णसर्पवान्वल्मीकः । लोहितशालिमान्ग्रामः । किं प्रयोजनम् । कर्मधारयप्रकृतिभिर्मत्वर्थीयैरभिधानं यथा स्यात् । किं च कारणं न स्यात् । बहुव्रीहिणोक्तत्वान्मत्वर्थस्य ॥ यद्युक्तत्वं हेतुः कर्मधारयेणाप्युक्तत्वान्न प्राप्नोति । न खल्वपि

---

उदाहरणः— 'सन्महत्पर०' (२।१।६१) या समासाला सद्गवः,सदश्वः,येथें अवकाश आहे, आणि 'कृत्यतुल्या०' (२।१।६८) या समासाला तुल्यश्वेतः, तुल्यमहान्, येथें अवकाश आहे; आणि तुल्यसन्, तुल्यमहान्, येथें त्या दोन्ही शास्त्रांची प्राप्ति येत आहे. तेव्हां येथें तुल्य आणि सत् या दोन उपसर्जनांपैकीं तुल्य हेंच उपसर्जन ठरतें. कारण परत्वास्तव 'कृत्यतुल्या०' (२।१।६८) या परशास्त्रानेंच येथें समास होत आहे.

(वा.४) कर्मधारयसमास व बहुव्रीहिसमास हे उभयतां एके ठिकाणीं प्राप्त झाले असतां विप्रतिषेध असल्यामुळें परत्वास्तव बहुव्रीहिसमास होतो. कर्मधारयसमासाला वीरः पुरुषो वीरपुरुषः येथें अवकाश आहे व बहुव्रीहिसमासाला कण्ठेकालः येथें अवकाश आहे; आणि वीराः पुरुषा यत्र वीरपुरुषको ग्रामः येथें त्या दोन्ही समासांची प्राप्ति येत आहे. त्यांत विप्रतिषेध असल्यामुळें परत्वास्तव कर्मधारय समासाचा बाध करून बहुव्रीहिसमास होतो.

(वा.५) क्वचित्स्थलीं पूर्वविप्रतिषेधानें बहुव्रीहिसमासापेक्षां अगोदर कर्मधारयसमास होतो.

याचें काय प्रयोजन ?

सर्वधनी, सर्वबीजी, सर्वकेशी नटः, गौरखरवदरण्यम्, कृष्णसर्पवान् वल्मीकः, लोहितशालिमान् ग्रामः.

येथें सर्वधन, सर्वबीज, सर्वकेश, गौरखर, असा कर्मधारय समास झाल्यामुळें काय होतें ?

कर्मधारयाच्या पुढें केलेल्या मत्वर्थीय प्रत्ययांनीं त्या अर्थाचें अभिधान केलें जातें.

पण कर्मधारय केला नाहीं तर असें कां बरें होणार नाहीं ?

सर्वधन वगैरे उदाहरणांमध्यें कर्मधारयाचा परत्वास्तव बाध करून बहुव्रीहि केला तर त्या बहुव्रीहीनेंच मत्वर्थ दाखविला जातो म्हणून तेथें मत्वर्थीय प्रत्यय करतां येणार नाहीं.

बहुव्रीहीहून मत्वर्थीय न होण्याचें कारण बहुव्रीहीनें मत्वर्थ दाखविला गेला हें आहे तर कर्मधारयानेंही मत्वर्थ दाखविला जात असल्यामुळें[१०] कर्मधारयाहून मत्वर्थीय प्राप्त होऊं शकत नाहीं. कारण मत्वर्थीय प्रत्यय हा

---

९. बहुव्रीहीनें जो अर्थ दाखविला जातो तो अर्थ ह्या उदाहरणामध्यें कर्मधारय आणि त्याच्या पुढें मत्वर्थीय प्रत्यय अशा दोन वृत्तींनीं दाखविला जातो. पहिल्या तीन उदाहरणांमध्यें सर्वधन वगैरे शब्दांहून इन्प्रत्यय (५।२।११५) आणि पुढील तीन उदाहरणांमध्यें मतुप् (५।२।९४) प्रत्यय झाला आहे.

१०. शब्द व त्यांचे अर्थ हे मूळचे नित्यच आहेत. तेव्हां सर्वधन याचा 'ज्याचें सर्व द्रव्य आहे'

संज्ञाश्रयो मत्वर्थीयः । किं तर्हि । अर्थाश्रयः । स यथैव बहुव्रीहिणोक्तत्वान्न भवत्येवं कर्मधारयेणाप्युक्तत्वान्न भविष्यति ॥ एवं तर्हीदं स्यात् । सर्वाणि धनानि सर्वधनानि सर्वधनान्यस्य सन्ति सर्वधनीति । नैवं शक्यम् । नित्यमेवं सति कर्मधारयः स्यात् । तत्र यदुक्तं कदाचित्कर्मधारय इत्येतदयुक्तम् ॥ एवं तर्हि भवति वै किंचिदाचार्याः कार्यवद्बुद्धिं कृत्वा पठन्ति कार्याः शब्दा इति । तद्वदिदं पठितं समानाधिकरणसमासाद्बहुव्रीहिः कर्तव्यः कदाचित्कर्मधारयः सर्वधनाद्यर्थ इति ॥

यदुच्यते समानाधिकरणसमासाद्बहुव्रीहिर्भवति विप्रतिषेधेनेति नैष युक्तो विप्रतिषेधः । अन्तरङ्गः कर्मधारयः । कान्तरङ्गता । स्वपदार्थे कर्मधारयोऽन्यपदार्थे बहुव्रीहिः । अस्तु । विभाषा कर्मधारयो यदा न कर्मधारयस्तदा बहुव्रीहिर्भविष्यति ॥ एवमपि यद्यत्र कदाचित्क-

संज्ञेवर अवलंबून होणारा असा नव्हे तर तें आहे ज्याला किंवा तें आहे ज्याचे ठिकाणीं अशा अर्थावर अवलंबून होणारा आहे. तेव्हां तो अर्थ जसा बहुव्रीहीनें दाखविला जातो म्हणून बहुव्रीहीहून मत्वर्थीय होत नाहीं, तसा कर्मधारयानें मत्वर्थ दाखविला जात असल्यामुळें कर्मधारयाहून मत्वर्थीय होणार नाहीं.

असें आहे तर असें करतों:– सर्वाणि धनानि सर्वधनानि, सर्वधनान्यस्य सन्ति सर्वधनी. म्हणजे प्रथमतः अन्य पदार्थाची विवक्षा न करतां केवल स्वपदार्थीं सर्व आणि धन या शब्दांचा कर्मधारय करून नंतर अन्यपदार्थरूप मत्वर्थीयाचें विधान केल्यानें सर्वधनी वगैरे पूर्वोक्त सर्व उदाहरणें साधतील.

वार्तिककारांचा असा अभिप्राय असणें शक्य नाहीं. कारण तसें केलें तर सर्व ठिकाणीं नेहमीं कर्मधारयच होईल. तेव्हां बहुव्रीहीविषयीं क्वचित्स्थलीं कर्मधारय होतो या अर्थाचें 'कदाचित्कर्मधारयः' असें जें पूर्वी म्हटलें आहे तें अयोग्य ठरेल.

घटपटादि पदार्थ हे जसे नित्य नसून काय आहेत तसेच शब्दही आहेत असें कांहीं तरी मनांत धरून जसे शब्द हे कार्य आहेत असें आचार्य म्हणतात तसेंच येथें मनांत धरून 'समानाधिकरणसमासापेक्षां परत्वात्स्तव बहुव्रीहिसमास करावा, आणि सर्वधनी वगैरे उदाहरणें सिद्ध होण्याकरितां क्वचित्स्थलीं बहुव्रीहिसमासापेक्षां पूर्वविप्रतिषेधानें कर्मधारयसमास करावा असें आचार्यांनीं येथें म्हटलें आहे.[११]

आतां 'कर्मधारयसमासापेक्षां विप्रतिषेध असल्यामुळें परत्वात्स्तव बहुव्रीहिसमास होतो' असें जें म्हटलें आहे त्यांत विप्रतिषेध योग्य नाहीं. कारण कर्मधारय हा समास अंतरंग आहे. तो अंतरंग कसा ? केवळ वृत्तीमधील पदांच्या अर्थावरच अवलंबून कर्मधारय आहे, आणि बाहेरच्या अन्यपदार्थावर अवलंबून बहुव्रीहि आहे.

कर्मधारयसमासाला अंतरंगत्व असो, पण तो कर्मधारय वैकल्पिक असल्यामुळें जेव्हां

असा अर्थ मूळचाच आहे, त्या अर्थी बहुव्रीहि आला तेथें क्वचित् ठिकाणीं कर्मधारय करण्यास वार्तिककारानीं सांगितलें आहे. तेव्हां बहुव्रीहि केला नाहीं तरी अर्थ कायम आहेच.

११. कार्यशब्दपक्षीं सूत्रांनीं ज्या अर्थी जे प्रकृतिप्रत्यय सांगितले ते त्या अर्थी त्या प्रकृतीच्या पुढें तो प्रत्यय लावून शब्द बनवावयाचे असतात. अर्थात् अमुक शब्दाचा अमुक अर्थ हें सूत्रांत सांगितल्या-

वरून ठरवावयाचें असतें. तेव्हां अन्यपदार्थीं बहुव्रीहिसमास विहित असल्यामुळें अन्य पदार्थ दाखविण्याचें सामर्थ बहुव्रीहीमध्येंच आहे. कर्मधारय हा स्वपदार्थीं विहित असल्यामुळें त्यामध्यें अन्य पदार्थ दाखविण्याचें सामर्थ्य नाहीं. तेव्हां बहुव्रीहिविषयीं पूर्वविप्रतिषेधानें केलेला कर्मधारयसमास अन्य पदार्थाला दाखवूं शकत नाहीं. सबब त्याहून मत्वर्थीय प्रत्यय करतां येतो.

र्मधारयो भवति कर्मधारयप्रकृतिभिर्मत्वर्थीयैरभिधानं प्राप्नोति । सर्वश्चायमेवमर्थो यत्नः कर्मधारयप्रकृतिभिर्मत्वर्थीयैरभिधानं मा भूदिति ॥ एवं तर्हि नेदं तस्य योगस्योदाहरणं विप्रतिषेधे परमिति । किं तर्हि । इष्टिरियं पठिता । समानाधिकरणसमासाद्बहुव्रीहिरिष्टः कदाचित्कर्मधारयः सर्वधनाद्यर्थ इति । यदीष्टिः पठिता नार्थोऽनेन । इह हि सर्वे मनुष्या अल्पेन यत्नेन महतोऽर्थानाकाङ्क्षन्ति । एकेन माषेण शतसहस्रम् । एकेन कुद्दालकेन खारीसहस्रम् । तत्र कर्मधारयप्रकृतिभिर्मत्वर्थीयैराभिधानमस्तु बहुव्रीहिणेति बहुव्रीहिणा भविष्यति लघुत्वात् ॥ कथं सर्वधनी सर्वबीजी सर्वकेशी नट इति । इनिप्रकरणे सर्वादेरिनिं वक्ष्यामि । तच्चावश्यं वक्तव्यं ठनो बाधनार्थम् ॥ कथं गौरखरवदरण्यम् गौरमृगवदरण्यम् कृष्णसर्पवान्वल्मीकः लोहितशालिमान्ग्रामः । अस्त्यत्र विशेषः ।

---

कर्मधारय नाहीं तेव्हां बहुव्रीहिसमास होईल.

तरीही पण जर येथें यदाकदाचित् कर्मधारयसमास केला तर त्या कर्मधारयाहून केलेल्या मत्वर्थीयानें अन्य पदार्थाचें अभिधान प्राप्त होत आहे, आणि हा सर्व खटाटोप तर कर्मधारयाहून मत्वर्थीय न व्हावा म्हणून आहे.

असें आहे तर समानाधिकरणसमासापेक्षां परत्वास्तव बहुव्रीहि होतो, आणि सर्वधनी वगैरे उदाहरणें साधण्याकरितां क्वचित्स्थलीं पूर्वविप्रतिषेधानें कर्मधारय होतो, असें जें म्हटलें आहे तें 'विप्रतिषेधे परं कार्यम्' (१।४।२) या सूत्रावरून सिद्ध होणाऱ्या अर्थाचा फक्त अनुवाद केला आहे असें समजूं नये, तर हें इष्टिरूप वचन पठित आहे. म्हणजे वीरपुरुष इत्यादि स्थलीं प्रथमतःच अन्य पदार्थाची विवक्षा असतां एकदम बहुव्रीहिच करावयाचा, व सर्वधनी वगैरे स्थलीं कर्मधारय करून नंतर अन्य पदार्थाची विवक्षा करावयाची, असा नियम इष्टसिद्धीकरितां सांगितला जात आहे.

जर ही इष्टि आहे तर हें मुद्दाम वचन करण्यांत कांहीं फायदा दिसत नाहीं. कारण या जगामध्यें सर्वलोकांची स्वल्पस्वल्प साधनानें मोठामोठा स्वार्थ मिळविण्याकडे साहजिकच प्रवृत्ति दिसते; जसें:— एक मासाभर सोनें घेऊन तेवढ्यावर हजारों मासे सोनें मिळवितात, किंवा एका कुदळीनें जमिनीचा थोडासा भाग नांगरून त्यांत बीं पेरून त्या अल्पस्वल्प बीजापासून वाढीदिढीनें व्यापार करतां करतां शेकडों पल्ले धान्य संपादन करतात; तसें प्रकृत स्थलीं कर्मधारयाहून केलेल्या मत्वर्थीय प्रत्ययानें अन्यपदार्थ दाखवावा, किंवा एकदमच बहुव्रीहि समासानें दाखवावा. असा विचार उत्पन्न झाला असतां थोडक्यांत होत असल्यामुळें एकदम बहुव्रीहीनेंच अन्य पदार्थ कळविला जाईल.

तर मग आतां ज्यांमध्यें कर्मधारयाहून मत्वर्थीय प्रत्यय झालेला दिसतो असे सर्वधनी, सर्वबीजी, सर्वकेशी नटः, हे प्रयोग कसें साधावयाचे ?

'अत इनिठनौ' या इनिप्रकरणामध्यें 'सर्वादेश्च' (५।२।१३५ वा.२) सर्वशब्द आरंभीं असलेल्या ह्रस्व अकारान्त प्रातिपदिकाहून इनिप्रत्यय होतो असें वचन[12] आहे. त्यानें तेथें कर्मधारयाहून इनिप्रत्यय होईल व तें वचन तर ठनाचा बाध करून इनिप्रत्ययच व्हावा यासाठीं अवश्य[13] केलेंच पाहिजे.

तरी पण गौरखरवदरण्यम्, गौरमृगवदरण्यम्, कृष्णसर्पवान् वल्मीकः, लोहितशालिमान्

---

१२. बहुव्रीहि करून एका वृत्तीनें काम भागत असतांही त्या वचनाच्या जोरावर कर्मधारय करून नंतर मत्वर्थीय प्रत्यय अशा दोन वृत्ति करतां येतील,

१३. क्वचित् स्थलीं 'पूर्वविप्रतिषेधानें कर्मधारय होतो' हें वार्तिक येथें मुद्दाम केलें तरी.

जात्यात्राभिसंबन्धः क्रियते । कृष्णसर्पो नाम सर्पजातिः सास्मिन्वल्मीकेऽस्ति । यदा ह्यन्तरेण जातिं तद्वत्ताभिसंबन्धः क्रियते कृष्णसर्पो वल्मीक इत्येवं तदा भविष्यति ॥

**पूर्वपदातिशय आतिशायिकाद्बहुव्रीहिः सूक्ष्मवस्त्रतराद्यर्थः ॥ ६ ॥**

पूर्वपदातिशय आतिशायिकाद्बहुव्रीहिर्भवति विप्रतिषेधेन । किं प्रयोजनम् । सूक्ष्मवस्त्रतराद्यर्थः । आतिशायिकस्यावकाशः । पटुतरः पटुतमः । बहुव्रीहेरवकाशः । चित्रगुः शबलगुः । इहोभयं प्राप्नोति । सूक्ष्मवस्त्रतरः तीक्ष्णशृङ्गतरः । बहुव्रीहिर्भवति विप्रतिषेधेन ॥ नैष युक्तो विप्रतिषेधः । विप्रतिषेधे परमित्युच्यते पूर्वश्च बहुव्रीहिः पर आतिशायिकः । इष्टवाची परशब्दः । विप्रतिषेधे परं यदिष्टं तद्भवति ॥ एवमप्ययुक्तः । अन्तरङ्ग आतिशायिकः । कान्तरङ्गता । ङ्याप्प्रातिपदिकादातिशायिकः सुबन्तानां बहु-

ग्रामः, येथें कर्मधारयाहून जो मतुप्प्रत्यय केला आहे त्याची काय वाट ?

येथें विशेष आहे तो असा:— कृष्णसर्प नांवाची एक सापांतील जाति आहे. त्या जातीचा संबंध त्या वारुळाशीं दाखवावयाचा आहे. म्हणजे त्या जातीचा साप ज्यामध्यें आहे असें वारुळ, असा अर्थ येथें विवक्षित आहे.[१४] आतां जेव्हां एक प्रकारची सर्पजाति दाखवावयाची नसून केवळ कृष्णवर्णाचा साप ज्यामध्यें आहे एवढाच अर्थ दाखवावयाचा असेल तेव्हां बहुव्रीहिच होतो.

(वा.६) पूर्वपदार्थाच्या अतिशयाची विवक्षा असतांना आतिशायिक प्रत्ययापेक्षां विप्रतिषेध असल्यामुळें पूर्वी बहुव्रीहिसमास करून नंतर अतिशयार्थक प्रत्यय करावा.

याचें काय प्रयोजन ?

सूक्ष्मवस्त्रतरः वगैरे प्रयोग सिद्ध होणें हें होय.

अतिशय या अर्थी सांगितलेल्या प्रत्ययाला अवकाश पटुतरः, पटुतमः, येथें आहे. आणि बहुव्रीहीला अवकाश चित्रगुः, शबलगुः, येथें आहे. आतां सूक्ष्मवस्त्रतरः, तीक्ष्णशृङ्गतरः, येथें त्या दोघांचीही प्राप्ति येते. त्यांमध्यें विप्रतिषेधामुळें बहुव्रीहि अगोदर होतो.

हा विप्रतिषेध योग्य नाहीं. कारण 'विप्रतिषेध असतां अष्टाध्यायींतील पुढील शास्त्रानें विहित असलेलें कार्य करावें' (१।४।२) असें सांगितलें आहे, व बहुव्रीहिसमासशास्त्र पूर्वी (२।२।२४) पठित आहे; आणि अतिशय या अर्थी प्रत्यय सांगणारें शास्त्र पुढें (५।३।५७) पठित आहे.

'विप्रतिषेधे परम्' येथील परशब्द हा इष्ट या अर्थाचा वाचक आहे. तेव्हां 'विरोध असतां परस्परविरुद्ध अशा त्या दोन शास्त्रांपैकीं जें शास्त्र इष्ट असेल त्याची प्रवृत्ति करावी' असा 'विप्रतिषेधे परम्' याचा अर्थ होत असल्यामुळें पूर्वी बहुव्रीहिसमास करण्यास हरकत नाहीं.

तरीही हा विप्रतिषेध अयुक्तच ठरतो. कारण अतिशय या अर्थाचा प्रत्यय हा अंतरंग आहे.

तो अंतरंग कसा ?

ङ्याप्प्रातिपदिकात् हा अधिकार चालू असल्यामुळें केवळ प्रातिपदिकाहून अतिशय या अर्थी तद्धितप्रत्यय सांगितला आहे. आणि सुबन्तसमुदायाचा बहुव्रीहिसमास सांगितला आहे. म्हणून बहुव्रीहि अंतरंग नाहीं.

अतिशय या अर्थाचा प्रत्ययही अंतरंग नाहीं.

तें कसें?

१४. कृष्ण वर्णाचा आहे साप ज्यामध्यें असा बहुव्रीहि केला तर त्या विशेष जातीचा बोध होणार नाहीं. तेव्हां तसा बोध होण्याकरितां तेथें कर्मधारय आणि त्याच्या पुढें मत्वर्थीय प्रत्यय अशा दोन वृत्ति करण्याकडे लोकांची प्रवृत्ति होईलच. कारण ज्यास्त फायदा असेल तर गौरवही स्वीकारलें जातें.

व्रीहिः । आतिशायिकोऽपि नान्तरङ्गः । कथम् । समर्थात्तद्धित उत्पद्यते सामर्थ्यं च सुबन्तेन । एवमप्यन्तरङ्गः । कथम् । स्वपदार्थे आतिशायिकोऽन्यपदार्थे बहुव्रीहिः । एवमपि नान्तरङ्गः । कथम् । स्पर्धायामातिशायिको भवति न चान्तरेण प्रतियोगिनं स्पर्धा भवति ॥ नैव वात्रातिशायिकः प्राप्नोति । किं कारणम् । असामर्थ्यात् । कथमसामर्थ्यम् । सापेक्षमसमर्थं भवतीति । यावता वस्त्राणि तद्वन्तमपेक्षन्ते तद्वन्तं चापेक्ष्य वस्त्राणां वस्त्रैर्युगपत्स्पर्धा भवति । ननु चायमातिशायिक एवमात्मकः सत्यां व्यपेक्षायां विधीयते । सत्यमेवमात्मको यां च नान्तरेण व्यपेक्षामातिशायिकस्य प्रवृत्तिस्तस्यां सत्यां भवितव्यम् । कां च नान्तरेण व्यपेक्षामातिशायिकस्य प्रवृत्तिः । या हि प्रतियोगिनं प्रति व्यपेक्षा । या हि तद्वन्तं प्रति न तस्यां भवितव्यम् ॥ बहुव्रीहिरपि तर्हि न प्राप्नोति । किं कारणम् । असा-

समर्थ म्ह. अन्वययोग्य अशाहून तद्धित-प्रत्ययाची उत्पत्ति होत असते. आणि ती अन्वययोग्यता प्रातिपदिकाच्या पुढें सुप्प्रत्यय केल्यानंतरच येते.

तरीही देखील अतिशय या अर्थी होणारा प्रत्यय अंतरंग आहेच.

तो कसा ?

ज्याच्यापुढें तो प्रत्यय करावयाचा असतो त्याच्याच अर्थावरील अतिशय तो दाखवितो, आणि बहुव्रीहि हा अन्य पदार्थ दाखवितो.

तरी देखील तो अतिशय या अर्थी होणारा प्रत्यय अंतरंग होत नाहीं. कारण स्पर्धा दाखवावयाची असतां तो प्रत्यय होतो, ती स्पर्धा[15] प्रतिस्पर्धी असल्यावांचून संभवत नाहीं. शिवाय येथें अतिशय या अर्थी प्रत्ययाची प्राप्तिच येत नाहीं.

काय कारण ?

सामर्थ्य नाहीं म्हणून.

तें सामर्थ्य येथें कां बरें नाहीं ?

सापेक्ष जो अर्थ तो असमर्थ असतो म्हणून. ज्यापेक्षां वस्त्रें हीं येथें आपल्या मालकाची अपेक्षा करतात[16], आणि आपल्या मालकाची अपेक्षा धरूनच वस्त्रांची अन्य वस्त्राबरोबर युगपत्स्पर्धा येथें सूक्ष्मवस्त्रतरः[17] या प्रयोगावरून प्रतीत होते.

अहो पण हा अतिशय अर्थाचा प्रत्यय अशाच स्वरूपाचा आहे की तो सापेक्ष असतांनाच मुद्दाम सांगितला आहे[18].

ही गोष्ट खरी आहे, पण ज्या प्रकारची सापेक्षता असल्यावांचून त्या प्रत्ययाची प्रवृत्तिच होत नाहीं तसलीच सापेक्षता असतांना तो प्रत्यय प्रवृत्त होईल.

कसल्या प्रकारची सापेक्षता असल्यावांचून त्या प्रत्ययाची प्रवृत्तिच होऊं शकत नाहीं ?

जी प्रतिस्पर्धी अशा दुसऱ्या वस्त्रांविषयीं सापेक्षता ती असल्यावांचून त्या प्रत्ययाची प्रवृत्ति होत नाहीं. पण येथें जी त्या वस्त्रांच्या मालकाविषयीं सापेक्षता भासते ती असतांना मात्र तो प्रत्यय होणार नाहीं.

तर मग येथें बहुव्रीहिसुद्धां येऊं शकत नाहीं.

१५. ज्यापेक्षां अतिशय दाखवावयाचा असेल तो तेथें प्रतिस्पर्धी होय. तेव्हां अतिशय या अर्थी होणाऱ्या प्रत्ययाला प्रतिस्पर्धी पदार्थाची अपेक्षा आहे, आणि बहुव्रीहीला अन्य पदार्थाची अपेक्षा आहे; तेव्हां त्या दृष्टीनें प्रत्ययाला बहुव्रीहीपेक्षां अंतरंग म्हणतां येत नाहीं.

१६. येथें सूक्ष्मपणामुळें वस्त्रांचा अतिशय दाखवावयाचा आहे, आणि त्या वस्त्रांचा तर अन्य पदार्थ अशा आपल्या मालकाकडे संबंध झाला आहे; तेव्हां वस्त्रें हीं येथें सापेक्ष होत आहेत.

१७. ह्याच्या मागावर अतिशय सूक्ष्म वस्त्रें निघतात अशी त्या मालकाची प्रतीति या प्रयोगावरून होते.

१८. प्रतिस्पर्धी पदार्थाची अपेक्षा येथें अवश्य असणारच.

मर्थ्यादेव । कथमसामर्थ्यम् । सापेक्षमसमर्थं भवतीति । यावता वस्त्राणि वस्त्रान्तराण्यपेक्षन्ते तद्वता चाभिसंबन्धः॥

एवं तर्हि नेदं तस्य योगस्योदाहरणं विप्रतिषेधे परमिति । किं तर्हि । इष्टिरियं पठिता । पूर्वपदातिशय आतिशायिकाद्बहुव्रीहिरिष्टः सूक्ष्मवस्त्रतराद्यर्थ इति । यदीष्टिरियं पठिता नार्थोऽनेन । कथं यैषा युक्तिरुक्ता वस्त्रान्तराणां वस्त्रान्तरैर्युगपत्स्पर्धा तद्वता चाभिसंबन्ध इति । यदा ह्यन्तरेण वस्त्राणां वस्त्रैर्युगपत्स्पर्धां तद्वता चाभिसंबन्धः क्रियते निष्प्रतिद्वन्द्वस्तदा बहुव्रीहिर्बहुव्रीहेरातिशायिकः ॥ न तर्हीदानीमिदं भवति सूक्ष्मतरवस्त्र इति । भवति । यदान्तरेण तद्वन्तं वस्त्राणां वस्त्रैर्युगपत्स्पर्धा निष्प्रतिद्वन्द्वस्तदातिशा-

---

काय कारण ?

सामर्थ्य नाहीं म्हणूनच.

तें सामर्थ्य कां बरें नाहीं ?

सापेक्ष जो अर्थ तो असमर्थ असतो म्हणून. येथें 'अमक्यांपेक्षा अतिशय सूक्ष्म' अशा रीतीनें प्रतिस्पर्धी वस्त्रान्तराची अपेक्षा करीत असलेल्या अशा वस्त्रांचा येथें अन्य पदार्थ अशा आपल्या मालकाकडे संबंध प्रतीत होत आहे.

असें आहे तर[१९] 'विप्रतिषेधे परम्' या सूत्राचें हें उदाहरण येथें दाखविलें आहे असें समजूं नये.

तर काय ?

'पूर्वपदार्थावरील अतिशय दाखवावयाचा असतां आतिशायिकप्रत्ययापेक्षां प्रथमतः बहुव्रीहिसमास करावा. कारण सूक्ष्मवस्त्रतरः वगैरे प्रयोग साधले पाहिजेत' असें येथें वार्तिककारांनीं स्वतंत्र इष्टिरूपवचन केलें आहे असें समजावें.

जर हें स्वतंत्र वचन केलें आहे असें म्हणणें असेल तर येथें स्वतंत्र वचन करण्याची कांहींच जरूर दिसत नाहीं.

वस्त्रांची दुसऱ्या वस्त्रांबरोबर स्पर्धा आणि त्या वस्त्रांचा अन्यपदार्थाशीं संबंध या दोन्ही गोष्टी येथें असल्यामुळें बहुव्रीहि आणि आतिशायिक या उभयतांची प्राप्ति नाहीं, अशा प्रकारें युक्ति दाखविलीच आहे. तेव्हां वचनाचा उपयोग नाहीं असें कसें म्हणतां ?

जेव्हां वस्त्रांची वस्त्रान्तराबरोबर स्पर्धा विवक्षित नसून केवळ अन्य पदार्थाबरोबर त्या वस्त्रांचा संबंध केला जातो तेव्हां आतिशायिक येऊंच शकत नाहीं. तर एकटा बहुव्रीहिसमासच प्रवृत्त होतो. नंतर स्पर्धेची विवक्षा केली असतां त्या बहुव्रीहीहून आतिशायिक प्रत्यय होतात. तेव्हां वचनावांचून काम भागते.

तर मग आतां सूक्ष्मतरवस्त्रः असा प्रयोग होतच नाहीं काय ?

तसा प्रयोग होतो. जेव्हां वस्त्रांचा आपल्या मालकाशीं संबंध विवक्षित न ठेवतां वस्त्रांची वस्त्रान्तराबरोबर स्पर्धा विवक्षित असते तेव्हां बहुव्रीहीचा विषयच नसल्यामुळें एकटा आतिशायिकच प्रवृत्त होतो. आणि नंतर त्या वस्त्रांचा आपल्या मालकाशीं संबंध केला असतां बहुव्रीहि होऊन सूक्ष्मतरवस्त्रः असाही प्रयोग होतो.

पण एकाच्या प्रकर्षानें दुसऱ्याचा प्रकर्ष कसा बरें दाखविला जाईल ?

---

१९. सामर्थ्य नसल्यामुळें अतिशय या अर्थाचा प्रत्यय आणि बहुव्रीहि या दोघांचीही प्राप्ति येथें होत नसली तर.

२०. प्रकर्ष म्हणजे अतिशय. हा वस्तुतः येथें वस्त्रांच्या सूक्ष्मपणाचा आहे. वस्त्रांचाही नाहीं आणि त्या वस्त्रांच्या मालकाचाही नाहीं. तेव्हां त्या मालक या अन्य पदार्थाचा बोधक जो सूक्ष्मवस्त्र हा बहुव्रीहि त्याहून अतिशय या अर्थी तद्धितप्रत्यय

यिकः ॥ कथं पुनरन्यस्य प्रकर्षेणान्यस्य प्रकर्षः स्यात् । नैवान्यस्य प्रकर्षेणान्यस्य प्रकर्षेण भवितव्यम् । यथैवायं द्रव्येषु यतते वस्त्राणि मे स्युरित्येवं गुणेष्वपि यतते सूक्ष्मतराणि मे स्युरिति । नात्रातिशायिकः प्राप्नोति । किं कारणम् । गुणवचनादित्युच्यते न च समासो गुणवचनः । समासोऽपि गुणवचनः । कथम् । अजहत्स्वार्था वृत्तिरिति । अथ जहत्स्वार्थायां तु दोष एव । जहत्स्वार्थायां च न दोषः । भवति बहुव्रीहौ तद्गुणसंविज्ञानमपि । तद्यथा । शुक्लवाससमानय लोहितोष्णीषा ऋत्विजः प्रचरन्तीति तद्गुण आनीयते तद्गुणाश्च प्रचरन्ति ॥

**उत्तरपदातिशय आतिशायिको बहुव्रीहेर्बह्वाढ्यतराद्यर्थः ॥ ७ ॥**

उत्तरपदातिशय आतिशायिको बहुव्रीहेर्भवति विप्रतिषेधेन । किं प्रयोजनम् । बह्वाढ्यतराद्यर्थः। बह्वाढ्यतरः बहुसुकुमारतरः। कः पुनरत्र विशेषो बहुव्रीहेर्वातिशायिकः स्यादातिशायिकान्तेन वा बहुव्रीहिः। स्वरकपोर्विशेषः । यद्यत्रातिशायिका-

एकाच्या प्रकर्षानें दुसऱ्याचा प्रकर्ष होत नाहींच. पण जसा हा माणूस वस्त्रें मला असावींत म्हणून त्याविषयीं यत्न करीत असतो, तसा तीं वस्त्रें नाजूक, सफाईदार, वगैरे असावींत म्हणून त्या वस्त्रांच्या सूक्ष्मत्वगुणाविषयींही खबरदारी घेत असतो.[२१]

तरी पण प्रकृत स्थलीं सूक्ष्मवस्त्र या बहुव्रीहिसमासाहून आतिशायिक प्राप्त होत नाहीं.

काय कारण ?

कांहीं एक धर्मानें विशिष्ट अशा धर्मिबोधक शब्दाहून त्या धर्माचा प्रकर्ष दाखवावयाचा असतां प्रत्यय होतो असें सांगितलें आहे, आणि सूक्ष्मवस्त्र हा समास तर अन्यपदार्थी रूढ असल्यामुळें त्यापासून त्या धर्माचा बोधच होत नाहीं.[२२]

समासापासून त्या धर्माचा बोध होतो.

तो कसा ?

अजहत्स्वार्था वृत्ति स्वीकारली म्हणजे झालें.

मग जहत्स्वार्था वृत्ति या पक्षीं हा दोषच समजावयाचा कीं काय ?

जहत्स्वार्था वृत्ति घेतली असतांही हा दोष नाहीं. कारण बहुव्रीहीविषयीं तद्गुणसंविज्ञानही[२३] आहे. तें जसें:– शुक्लवाससमानय, लोहितोष्णीषा ऋत्विजः प्रचरन्ति, असें म्हटलें असतां पांढरें वस्त्र पांघरलेलाच मनुष्य आणला जातो किंवा तांबडें पागोटें घातलेले असेच ऋत्विज संचार करतात.

(वा.७) उत्तरपदाच्या अर्थावरील अतिशय दाखवावयाचा असतां विप्रतिषेध असल्यानें परत्वास्तव बहुव्रीहीपेक्षां अगोदर आतिशायिक प्रत्यय करावा.

काय प्रयोजन ?

बह्वाढ्यतरः वगैरे उदाहरणें साधावयाचीं आहेत म्हणून; जसें:– अतिशयेन बहव आढ्या यस्मिन् बह्वाढ्यतरः, बहुसुकुमारतरः.

पण प्रथमतः बहुव्रीहि करून नंतर त्या बहुव्रीहीहून आतिशायिक केला, अथवा प्रथमतः आतिशायिक प्रत्यय करून त्या आतिशायिक प्रत्ययान्ताबरोबर बहुव्रीहि केला यांत काय फरक आहे ?

स्वर आणि कप् यांमुळें फरक होत आहे. तो असा:–जर आतिशायिक प्रत्ययाच्या पूर्वी

करतां येणार नाहीं.

२१. आणि त्याला त्याच्या इच्छेप्रमाणें वस्तु मिळाली म्हणजे आपला प्रकर्ष झाला असें तो समजतो.

२२. कारण जहत्स्वार्था वृत्ति या पक्षीं समासामध्यें आंतील पदांना अर्थ नसतो. मागें (२।१।१ पृ.२३९) पहा.

२३. ते गुण म्हणजे सामासिक शब्दांतील आंतील पदांचे अर्थ. त्यांचें संविज्ञान म्हणजे त्या अन्य पदार्थाचा जिकडे संबंध होत असेल तिकडे त्या अन्य पदार्थाबरोबर त्या पदार्थांचा संबंध होणें.

बहुव्रीहिः स्याद्बह्वाढ्यतर एवं स्वरः प्रसज्येत बह्वाढ्यतर इति चेष्यते। बह्वाढ्यकतर इति च प्राप्नोति बह्वाढ्यतरक इति चेष्यते।

**समानाधिकरणाधिकारे शाकपार्थिवादीनामुपसंख्यानमुत्तरपदलोपश्च॥८**

समानाधिकरणाधिकारे शाकपार्थिवादीनामुपसंख्यानं कर्तव्यमुत्तरपदलोपश्च वक्तव्यः। शाकभोजी पार्थिवः शाकपार्थिवः। कुतपवासाः सौश्रुतः कुतपसौश्रुतः। अजापण्यस्तौल्वलिरजातौल्वलिः। यष्टिप्रधानो मौद्गल्यो यष्टिमौद्गल्यः॥

**[कुमारश्रमणादिभिः॥२।१।७०॥]**

**चतुष्पादो गर्भिण्या॥२।१।७१॥**

चतुष्पाज्जातिरिति वक्तव्यम्। इह मा भूत्। कालाक्षी गर्भिणी। स्वस्तिमती गर्भिणी।

**मयूरव्यंसकादयश्च॥२।१।७२॥**

किमर्थश्चकारः। एवकारार्थः। मयूरव्यंसकादय एव। क मा भूत्। परमो मयूरव्यंसक इति॥

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये द्वितीयस्याध्यायस्य प्रथमे पादे तृतीयमाह्निकम्॥ पादश्च समाप्तः॥

---

बहु व आढ्यतर या पदांचा बहुव्रीहिसमास होईल तर बह्वाढ्यतरः येथें 'बहोर्नञ्वदुत्तरपदभूम्नि' (६।२।१७५) यानें आढ्य या उत्तरपदांतील शेवटच्या अकाराला उदात्तस्वर करण्याचा प्रसंग येईल. आणि आढ्यतर या उत्तरपदांतील शेवटच्या अकाराला उदात्त होणें तर इष्ट आहे.[२४] तसेंच पूर्वी समास केला तर समासान्त कप्प्रत्यय (५।४।१५४) होऊन त्याच्यापुढें तरप्प्रत्यय झाल्यानें बह्वाढ्यकतर; असें रूप होऊं लागेल. आणि तरप्प्रत्ययाच्या पुढें कप् झाल्यानें बह्वाढ्यतरकः असें रूप होणें तर इष्ट आहे.

(वा.८) या कर्मधारयसमासप्रकरणामध्यें शाकपार्थिव वगैरे उदाहरणांचें उपसंख्यान करावें, आणि उत्तरपदाचा लोप होतो असें वचन करावें; जसें:—शाकभोजी पार्थिवः शाकपार्थिवः, कुतपवासाः सौश्रुतः कुतपसौश्रुतः, अजापण्यस्तौल्वलिः अजातौल्वलिः, यष्टिप्रधानो मौद्गल्यः यष्टिमौद्गल्यः.

(सू.७१) चार पायांच्या व्यक्तीला दाखविणारा जो शब्द तो जातिवाची असेल तर त्याचा गर्भिणीशब्दाबरोबर समास होतो असें वचन करावें; कालाक्षी गर्भिणी, स्वस्तिमती गर्भिणी, येथें समास न व्हावा म्हणून.

(सू.७२) येथें घातलेला चशब्द कोणत्या अर्थाला दाखवितो?

एवशब्दाच्या अर्थाला दाखवितो.[२] म्हणजे मयूरव्यंसक वगैरे गणामध्यें निर्दिष्ट केलेले जे सामासिक शब्द तेवढेच ते समजावेत.

त्यामुळें कोठें काय होत नाहीं?

परमो मयूरव्यंसकः[३] असें वाक्यच राहतें.

येथें दुसऱ्या अध्यायाच्या पहिल्या पादांतील तिसरें आन्हिक व पहिला पाद समाप्त झाला.

---

२४. तात्पर्य, येथें अतिशयाची विवक्षा पूर्वी करून नंतर अन्य पदार्थाशीं त्याच्या संबंधाची विवक्षा करावी.

१. कुमारशब्दाचा श्रमणादिगणांतील शब्दांबरोबर विकल्पानें तत्पुरुषसमास होतो; जसें:-कुमारी चासौ श्रमणा च कुमारश्रमणा.

१. पशुजातीला दाखविणाऱ्या शब्दांचा गर्भिणीशब्दाबरोबर विकल्पानें तत्पुरुषसमास होतो; जसें:—गौश्चासौ गर्भिणी च गोगर्भिणी.

१. मयूरव्यंसक, छात्रव्यंसक, वगैरे या गणांतील शब्द विकल्पानें तत्पुरुषसंज्ञक होतात; जसें:— मयूर इव व्यंसकः मयूरव्यंसकः.

२. म्हणजे येथें चशब्द अर्थ अवधारणार्थक आहे.

३. मयूरव्यंसक एवढाच समास होतो. त्याचा पुनः दुसऱ्या कोणत्याही शब्दाबरोबर समास होत नाही.

## [पूर्वापराधरोत्तरमेकदेशिनैकाधिकरणे ॥ २ । २ । १ ॥]

## अर्धं नपुंसकम् ॥ २ । २ । २ ॥

इह कस्मान्न भवति । ग्रामार्धः नगरार्ध इति । अर्धशब्दस्य नपुंसकलिङ्गस्येदं ग्रहणं पुँल्लिङ्गश्चायमर्धशब्दः । क्व पुनरयं नपुंसकलिङ्गः क्व पुँल्लिङ्गः । समप्रविभागे नपुंसकलिङ्गोऽवयववाची पुँल्लिङ्गः ॥ इह कस्मान्न भवति । अर्धं पिप्पलीनामिति । न वा भवत्यर्धपिप्पल्य इति । भवति यदा खण्डसमुच्चयः । अर्धपिप्पली चार्धपिप्पली चार्धपिप्पली चार्धपिपल्य इति । यदा त्वेतद्वाक्यं भवत्यर्धं पिप्पलीनामिति तदा न भवितव्यम् । तदा कस्मान्न भवति । एकाधिकरण इति वर्तते ॥ न तर्हीदानीमिदं भवति अर्धराशिरिति । भवति । एकमेतदधिकरणं भवति योऽसौ राशिर्नाम ॥

## द्वितीयतृतीयचतुर्थतुर्याण्यन्यतरस्याम् ॥ २ । २ । ३ ॥

अन्यतरस्यांग्रहणं किमर्थम् । अन्यतरस्यां समासो यथा स्यात्समासेन मुक्ते

---

(सू.२) ग्रामार्धः, नगरार्धः, येथें प्रकृत सूत्रानें सांगितलेला समास कां बरें होत नाहीं ?

नपुंसकलिंगी अर्धशब्दाचा सूत्रामध्यें उच्चार केला आहे आणि वरील उदाहरणांतील अर्धशब्द पुंलिंगी आहे.

पण हा अर्धशब्द कोणत्या अर्थी नपुंसकलिंगी व कोणत्या अर्थी पुंल्लिंगी समजावा ?

बरोबर सारख्या प्रमाणाचा अर्धा वांटा या अर्थी नपुंसकलिंगी आणि साधारण अर्धा वांटा या अर्थी पुंल्लिंगी आहे.

आतां अर्धं पिप्पलीनाम् येथें कां बरें प्रकृत सूत्रानें समास होत नाहीं ?

मग अर्धपिप्पल्यः असें रूप होतच नाहीं कीं काय ?

तसें रूप होतें. पण प्रत्येक पिंपळीचें अर्धें खण्ड मिळून तीन अर्धीं खण्डें असा अर्थ दाखवावयाचा असेल तर; जसें:– अर्धं पिप्पल्याः अर्धपिप्पली, अर्धपिप्पली चार्धपिप्पली चार्धपिप्पली चार्धपिप्पल्यः; आणि जेव्हां तीन पिंपळयांचा समभाग अर्धा हिस्सा म्हणजे दीड पिंपळी असा अर्थ कळवावयाचा असतो, जसें, अर्धं पिप्पलीनाम् येथें समास होत नसतो.

तेव्हां त्या अर्थी समास कां बरें होत नाहीं ?

एकाधिकरणे या पदाची पूर्वसूत्रांतून येथें अनुवृत्ति आहे, म्हणजे अवयवी हा एकत्वसंख्येनें युक्त असेल तरच हा समास होतो.

तर मग आतां अर्धं राशेरर्धराशिः हा समास होतच नाहीं कीं काय[2] ?

तो समास होतो. कारण राशि म्हणून जो अवयवी आहे तो सबंध एकच धरतां येतो.

(सू.३) येथें अन्यतरस्याम् हा शब्द घातला आहे तो कशाकरितां ?

विकल्पानें समास व्हावा, म्हणजे समास न करतां द्वितीयं भिक्षायाः असें वाक्यही प्रयोगांत यावें, म्हणून.

---

१. अवयव या अर्थाला दाखविणाऱ्या पूर्व, अपर, अधर आणि उत्तर या शब्दांचा एकत्वसंख्येनें युक्त अशा अवयविवाचक सुबन्ताबरोबर विकल्पानें तत्पुरुषसमास होतो; जसें:–पूर्वं कायस्य पूर्वकायः, अपरकायः.

१. समविभाग या अर्थाला दाखविणाऱ्या अर्धशब्दाचा एकत्वसंख्येनें युक्त अशा अवयविवाचक सुबन्ताबरोबर विकल्पानें तत्पुरुषसमास होतो; जसें:– अर्धं पिप्पल्याः अर्धपिप्पली.

२. राशीमध्यें घटक अवयव अनेक असल्यामुळें अवयवी हा एक नाहीं असा या शंककाचा अभिप्राय आहे.

१. द्वितीय, तृतीय, चतुर्थ आणि तुर्य या शब्दांचा एकसंख्येनें युक्त अशा अवयवीबरोबर विकल्पानें तत्पुरुषसमास होतो; जसें:– द्वितीयं भिक्षायाः द्वितीयभिक्षा.

वाक्यमपि यथा स्यात् । द्वितीयं भिक्षाया इति । नैतदस्ति प्रयोजनम् । प्रकृता महाविभाषा तया वाक्यमपि भविष्यति ॥ इदं तर्हि प्रयोजनमेकदेशिसमासेन मुक्ते षष्ठीसमासोऽपि यथा स्यात् । भिक्षाद्वितीयमिति । एतदपि नास्ति प्रयोजनम् । अयमपि विभाषा षष्ठीसमासोऽपि । तावुभौ वचनाद्भविष्यतः ॥ अत उत्तरं पठति ।

**द्वितीयादीनां विभाषाप्रकरणे विभाषावचनं ज्ञापकमवयवविधाने सामान्यविधानाभावस्य ॥ १ ॥**

द्वितीयादीनां विभाषाप्रकरणे विभाषावचनं क्रियते ज्ञापकार्थम् । किं ज्ञाप्यते । एतज्ज्ञापयत्याचार्योऽवयवविधौ सामान्यविधिर्न भवतीति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । भिनत्ति छिनत्ति । श्नमि कृते शन्न भवति ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । शबादेशाः श्यन्नादयः करिष्यन्ते । तत्तर्हि शपो ग्रहणं कर्तव्यम् । न कर्तव्यम् । प्रकृतमनुवर्तते । क्व प्रकृतम् । कर्तरि शप् [३.१.६८] इति । तद्वै प्रथमानिर्दिष्टं षष्ठीनिर्दिष्टेन चेहार्थः । रुधादिभ्य इत्येषा पञ्चमी शबिति प्रथमायाः षष्ठीं प्रकल्पयिष्यति तस्मादित्युत्तरस्य [१.१.६७] इति । प्रत्ययविधिरयं न च प्रत्ययविधौ पञ्चम्यः प्रकल्पिका भवन्ति । नायं प्रत्ययविधिः । विहितः प्रत्ययः प्रकृतश्चानुवर्तते ॥ एवं

---

हें प्रयोजन नाहीं. कारण महाविभाषाधिकार चालू असल्यामुळें एकदा वाक्यही प्रयोगांत आणतां येईल.

तर मग अन्यतरस्याम् हा शब्द घालण्याचें हें प्रयोजन समजावें की हा एकदेशिसमास एकदा न करतां भिक्षाद्वितीयम् असा षष्ठीतत्पुरुषही व्हावा.

हेंही प्रयोजन नाहीं. कारण हा एकदेशिसमासही वैकल्पिक आहे आणि षष्ठीतत्पुरुषही (२।२।८) वैकल्पिक आहे. तेव्हां त्या षष्ठीतत्पुरुषाचा ह्या एकदेशिसमासानें विकल्पानें बाध केल्यामुळें दोन्हीही समास होतील.

हेंच मनांत धरून वार्तिककार लिहितातः—

(वा.१) द्वितीय, तृतीय, चतुर्थ, वगैरेंसंबधीं विभाषाप्रकरणामध्यें विकल्पदर्शक अन्यतरस्याम् हा शब्द ज्ञापनाकरितां घातला आहे.

तें काय ज्ञापन केलें जात आहे ?

विशेषविधि केला असतां तेथें सामान्यविधि प्रवृत्त होत नाहीं.

हें ज्ञापन केल्याचें काय प्रयोजन ?

भिनत्ति, छिनत्ति, येथें श्नम् (३।१।७८) केला असतां शप् (३।१।६८) होत नाहीं.

हेंही प्रयोजन नाहीं. कारण श्यन्, श्नु वगैरे विकरण हे शपांचे स्थानीं करण्यांत येतील.

तर श्यन् वगैरे विकरणविधायक सूत्रांमध्यें स्थानी या नात्यानें शपाचें ग्रहण केलें पाहिजे.

करावयास नको. कारण पूर्वीं केलेलें शब्ग्रहण येथें अनुवृत्त होत आहे.

तें शब्ग्रहण पूर्वीं कोठें केलेलें आहे ?

कर्तरि शप् (३।१।६८) येथें.

पण तेथील तें शब्ग्रहण प्रथमाविभक्ति लावून निर्दिष्ट केलें आहे, आणि येथें तर षष्ठीविभक्ति लाविलेलें असें पाहिजे आहे.

रुधादिभ्यः ही पञ्चमी 'पञ्चमीनिर्देशानें सांगितलेलें कार्य तें त्याहून पुढच्याला करावें' (१।१।६७) या परिभाषेच्या साहाय्यानें अनुवृत्त आलेल्या शप् या प्रथमेची षष्ठी बनवील.

पण हा प्रत्ययविधि आहे, आणि प्रत्ययविधीमधील पंचमी तर आपल्या पुढील प्रथमेला षष्ठी बनवूं शकत नाहीं.

येथें कांहीं त्या प्रत्ययाचा विधि नाहीं. पूर्वं[२]

---

२. कारण त्या प्रत्ययाचें तेथेंच नवीन विधान करावयाचें आहे, तो पूर्वसिद्ध नाहीं.

तर्हि ज्ञापयत्याचार्यो यत्रोत्सर्गापवादं विभाषा तत्रापवादेन मुक्त उत्सर्गो न भवतीति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । दिक्पूर्वपदान्ङीप् [४.१.६०] । प्राङ्मुखी प्राङ्मुखा । प्रत्यङ्मुखी प्रत्यङ्मुखा । ङीपा मुक्ते ङीष् न भवति ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । वक्ष्यत्येतत् । दिक्पूर्वपदान्ङीषोऽनुदात्तत्वं ङीब्विधाने ह्यन्यत्रापि ङीष्विषयान्ङीप्प्रसङ्ग इति ॥ इदं तर्हि प्रयोजनम् । अर्धपिप्पली अर्धकोशातकी । एकदेशिसमासेन मुक्ते षष्ठीसमासो न भवति । उन्मत्तगङ्गम् लोहितगङ्गम् । अव्ययीभावेन मुक्ते बहुव्रीहिर्न भवति । दाक्षिः प्लाक्षिः । इञा मुक्तेऽण्न भवति ॥ यद्येतज्ज्ञाप्यत उपगोरपत्यमौपगवः तद्धितेन मुक्त उपग्वपत्यमिति न सिध्यति । अस्त्यत्र विशेषः । द्वे ह्यत्र विभाषे । दैवयज्ञिशौचिवृक्षिसात्यमुग्रिकाण्ठेविद्धिभ्योऽन्यतरस्याम् [४.१.८१] इति समर्थानां प्रथमाद्वा [८२] इति च । तत्रैकया वृत्तिर्विभाषापरया वृत्तिविषये विभाषापवादः ॥

---

सूत्रामध्यें विहित असलेलें शब्दग्रहण फक्त येथें अनुवृत्त होत आहे.

असें आहे तर जेथें उत्सर्ग व अपवाद हीं दोन्ही शास्त्रें वैकल्पिक आहेत तेथें अपवादाच्या अभावपक्षीं उत्सर्गशास्त्र प्रवृत्त होत नाहीं, असें ज्ञापन करावें.

या ज्ञापनाचें काय फळ ?

जेथें दिग्वाचक पूर्वपद असून स्वाङ्गवाचक उत्तरपद आहे अशा प्रातिपदिकाहून 'अस्वाङ्गपूर्वपदाद्वा' (४।१।५३) या वैकल्पिक ङीषाचा अपवाद म्हणून विकल्पानें ङीप्प्रत्यय 'दिक्पूर्वपदान्ङीप्' (४।१।६०) यानें सांगितला आहे; जसें:– प्राङ्मुखी प्राङ्मुखा, प्रत्यङ्मुखी प्रत्यङ्मुखा. येथें ङीप्प्रत्ययाच्या अभावपक्षीं ङीष् होत नाहीं.

हेंही प्रयोजन नाहीं. कारण दिग्वाचक पूर्वपदकाहून पुढच्या ङीषाचे स्थानीं ङीप् आदेश होतो (४।१।६०, वा. २ वर भाष्य) असें स्वतंत्र रीतीनें ङीपाचें विधान केलें तर जेथें ङीप्प्रत्यय होत नाहीं अशा प्राग्गुल्फा इत्यादि उदाहरणांमध्येंही ङीप् होण्याचा प्रसंग येईल (४।१।६८ वा.२), असें तेथें सांगितलें आहे.

तर मग अर्धपिप्पली, अर्धकोशातकी, हें प्रयोजन समजावें. येथें एकदेशिसमासाच्या (२।२।२) अभावपक्षीं षष्ठीतत्पुरुष होत नाहीं. तसेंच उन्मत्तगङ्गं, लोहितगङ्गम्, येथें अव्ययीभावसमासाच्या अभावपक्षीं बहुव्रीहिसमास होत नाहीं. आणि दाक्षिः, प्लाक्षिः, येथें इञ्प्रत्ययाच्या अभावपक्षीं अण्प्रत्यय होत नाहीं.

जर असें ज्ञापन केलें जात आहे तर उपगोरपत्यमौपगवः येथें अपवादभूत तद्धितप्रत्ययाच्या अभावपक्षीं उपग्वपत्यम् असा समास होणार नाहीं.

येथें थोडा विशेष आहे तो असा:– तस्यापत्यम् (४।१।९२) येथें दोन विभाषा आहेत. एक 'दैवयज्ञिशौचि०' (४।१।८१) या सूत्रांतून अन्यतरस्याम् या पदाची अनुवृत्ति आहे, आणि दुसरी 'समर्थानाम्०' (४।१।८२) या सूत्रांतून वा या पदाची अनुवृत्ति आहे. त्यांत एका विभाषेनें एकार्थीभावरूप वृत्तीचा विकल्प व दुसऱ्या विभाषेनें वृत्तीविषयीं षष्ठीसमासापवाद अशा तद्धिताचा विकल्प केल्यामुळें उपग्वपत्यम् असा सामासिक शब्द साधत आहे.

---

३. तेव्हां 'विशेषविधि केला असतां तेथें सामान्यविधि प्रवृत्त होत नाहीं' असें ज्ञापन करण्याचा कांहीं उपयोग नाहीं.

४. त्या वेळीं अर्धं पिप्पल्याः असें वाक्यच कायम राहतें. उन्मत्तगङ्गम्, दाक्षिः, येथेंही असेंच समजावें.

क्रियमाणेऽपि वा अन्यतरस्यांग्रहणे षष्ठीसमासो न प्राप्नोति । किं कारणम् । पूरणेनेति प्रतिषेधात् । नैतत्पूरणान्तम् । अनैतत्पर्यवपन्नम् । एतदपि पूरणान्तमेव । कथम् । पूरणं नामार्थस्तमाह तीयशब्दोऽतः पूरणम् । योऽसौ पूरणान्तात्स्वार्थे भागेऽन्सोऽपि पूरणमेव ॥ एवं तर्ह्यन्यतरस्यांग्रहणसामर्थ्यात्षष्ठीसमासोऽपि भविष्यति ॥

**प्राप्तापन्ने च द्वितीयया ॥२।२।४॥**

किमर्थश्चकारः । अनुकर्षणार्थः । अन्यतरस्यामित्यतदनुकृष्यते । किं प्रयोजनम् । अन्यतरस्यां समासो यथा स्यात्समासेन मुक्ते वाक्यमपि यथा स्यात् । जीविकां प्राप्त इति । नैतदस्ति प्रयोजनम् । प्रकृता महाविभाषा तया वाक्यमपि भविष्यति ॥ इदं तर्हि प्रयोजनं द्वितीयासमासोऽपि यथा स्यात् । जीविकाप्राप्त इति । एतदपि नास्ति प्रयोजनम् । अयमप्युच्यते द्वितीयासमासोऽपि तदुभयं वचनाद्भविष्यति ॥ एवं तर्हि नायमनुकर्षणार्थश्चकारः । किं तर्हि ।

---

आतां प्रकृत सूत्रामध्यें अन्यतरस्याम् या शब्दाचें ग्रहण केलें तरीही भिक्षाद्वितीयम् येथें षष्ठीसमास प्राप्त होत नाहीं.

काय कारण ?

'पूरणगुण०' (२।२।११) यानें पूरणप्रत्ययान्ताशीं षष्ठीसमासाचा निषेध केला आहे म्हणून.

हे द्वितीयादि शब्द पूरणप्रत्ययान्त नाहींत, तर पूरणप्रत्ययान्ताहून स्वार्थी केलेल्या (५।३।४८) अन्प्रत्ययानें युक्त आहेत.

हे अन्प्रत्ययान्त द्वितीयादि शब्दही पूरणप्रत्ययान्तच आहेत.

ते कसे ?

पूरण म्हणून हा एक अर्थ आहे. त्याला तीयप्रत्यय दाखवितो, म्हणून त्या तीयप्रत्ययालाही पूरण हें नांव दिलें जातें. आतां जो हा पूरणप्रत्ययान्ताहून भाग हा स्वार्थी अन् प्रत्यय केला आहे त्यानेंही पूरण हा अर्थ दाखविला असल्यामुळें तो अन्प्रत्ययही पूरणप्रत्ययच होय.

असें आहे तर अन्यतरस्याम् हा शब्द निरर्थक होत आहे. त्यामुळें त्याचे जोरावर येथें 'पूरणगुण०' हा निषेध येत नसल्यामुळें षष्ठीसमास होईल.

(सू.४) येथें चशब्द घातला तो कशाकरितां?

अनुवृत्ति करण्यासाठीं.

ती कोणाची अनुवृत्ति केली जात आहे ?

पूर्वसूत्रांतील अन्यतरस्याम् या पदाची अनुवृत्ति केली जात आहे.

त्या अनुवृत्तीचें काय प्रयोजन ?

विकल्पानें समास व्हावा, म्हणजे समासाच्या अभावपक्षीं जीविकां प्राप्तः असें वाक्यही प्रयोगांत आणतां यावें.

हें प्रयोजन नाहीं. कारण महाविभाषाधिकार चालू असल्यामुळें त्यानें एकदा वाक्यही प्रयोगांत आणतां येईल.

तर चशब्द घालण्याचें हें प्रयोजन समजावें की एकदा जीविकाप्राप्तः असा द्वितीयासमासही करतां यावा.

हेंही प्रयोजन होऊं शकत नाहीं. कारण प्रकृत समासही प्राप्तापन्न हे विशेष शब्द उच्चारून सांगितला आहे, आणि द्वितीयासमासही हेच विशेष शब्द उच्चारून सांगितला आहे. तेव्हां विधानाचे जोरावर ते उभयतांही समास होतील.

असें आहे तर हा चशब्द अनुवृत्तीकरितां घातला नाहीं, तर या चशब्दानें अत्वाचें

---

१. प्राप्त आणि आपन्न या शब्दांचा द्वितीयान्ताबरोबर विकल्पानें तत्पुरुषसमास होतो; आणि प्राप्त व आपन्न या शब्दांना अकार अन्तादेश होतो; जसें:— प्राप्तो जीविकां प्राप्तजीविकः जीविकाप्राप्तः, प्राप्ता जीविकां प्राप्तजीविका वगैरे.

अत्वमनेन विधीयते । प्राप्तापन्ने द्वितीयान्तेन सह समस्येते अत्वं च भवति प्राप्तापन्नयोरिति । प्राप्ता जीविकां प्राप्तजीविका । आपन्ना जीविकामापन्नजीविका ॥

## [1]कालाः परिमाणिना ॥२।२।५॥

किंप्रधानोऽयं समासः। उत्तरपदार्थप्रधानः। यद्युत्तरपदार्थप्रधानः सधर्मणानेनान्यैरुत्तरपदार्थप्रधानैर्भवितव्यम् । अन्येषु चोत्तरपदार्थप्रधानेषु यैवासावन्तर्वर्तिनी विभक्तिस्तस्याः समासेऽपि श्रवणं भवति । तद्यथा । राज्ञः पुरुषो राजपुरुष इति । इह पुनर्वाक्ये षष्ठी समासे प्रथमा । केनैतदेवं भवति । योऽसौ मासजातयोरभिसंबन्धः स समासे निवर्तते । अभिहितः सोऽर्थोऽन्तर्भूतः प्रातिपदिकार्थः संपन्नस्तत्र प्रातिपदिकार्थे प्रथमेति प्रथमा भवति । न तर्हीदानीमिदं भवति मासजातस्येति । भवति बाह्यमर्थमपेक्ष्य षष्ठी ॥

### कालस्य येन समासस्तस्यापरिमाणित्वादनिर्देशः ॥ १ ॥

कालस्य येन समासः सोऽपरिमाणी तस्यापरिमाणित्वादनिर्देशः । अगमको निर्देशोऽनिर्देशः । न हि जातस्य मासः

---

विधान केलें जात आहे. तें असें:—प्राप्त आणि आपन्न या शब्दांचा द्वितीयान्ताबरोबर समास होतो व ह्या शब्दांच्या शेवटच्या वर्णाला ऱ्हस्व अकार आदेश होतो; जसें:— प्राप्ता जीविकां प्राप्तजीविका, आपन्ना जीविकामापन्नजीविका.

(सू.५) या सूत्रानें सांगितलेल्या समासांतील कोणता पदार्थ प्रधान आहे ?

उत्तरपदाचा अर्थ हा प्रधान होय.

जर या समासांतील उत्तरपदाचा अर्थ प्रधान आहे तर इतर जे उत्तरपदार्थप्रधान समास त्यांच्यासारखीच या समासामध्यें स्थिति असली पाहिजे. उत्तरपदार्थप्रधान अशा इतर समासांमध्यें पोटांत जी विभक्ति केली असते तिचें समास केल्यावरही श्रवण होत असतें; जसें:— राज्ञः पुरुषः राजपुरुषः[2]; आणि येथें तर विग्रहवाक्यामध्यें जात या प्रधानशब्दाच्या पुढें षष्ठी ऐकूं येते व समास केल्यावर प्रथमा ऐकूं येते. तेव्हां हा असा कोणत्या कारणानें बरें फरक होत आहे ?

मासो जातस्य या स्थितीमध्यें षष्ठीचा अर्थ जो जाताचा मासाशीं परिच्छेद्यपरिच्छेदकभावसंबंध प्रतीत होतो तो समास केला असतां एकार्थीभावामुळें संबंध या रूपानें प्रतीत होत नाहीं; तर तो आतां समासानेंच दाखविला जातो. म्हणूनच तो त्या समासाच्या अर्थामध्यें अन्तर्भूत झाला असल्यामुळें प्रातिपदिकार्थ बनून राहिला आहे. तेव्हां या प्रातिपदिकार्थी प्रथमा विहित असल्यामुळें समासाच्या पुढें प्रथमा होते.

तर मग आतां मासजातस्य अशी मासजात या सामासिक शब्दापुढें षष्ठी होतच नाहीं काय ?

षष्ठी होते. पण त्या प्रातिपदिकार्थाचा दुसऱ्या पदार्थाशीं जो संबंध त्या अर्थी होते.

(वा.१) कालवाचक शब्दाचा ज्या शब्दाबरोबर समास करावयाचा त्याचें काल हें परिमाण होत नाहीं. म्हणून सूत्रांतील परिमाणिना हा शब्द बरोबर नाहीं. म्हणजे आपल्याला जो अर्थ पाहिजे तो त्या शब्दापासून निघत नाहीं. कारण जन्मलेल्याचें परिमाण मास होऊं शकत नाहीं.

---

[1] ज्याची मोजदाद करावयाची तो परिमाणी. त्या अर्थाला दाखविणाऱ्या सुबन्ताबरोबर कालवाचक शब्दांचा विकल्पानें तत्पुरुषसमास होतो; जसें:- मासो जातस्य मासजातः, संवत्सरजातः.

[2] येथें पुरुष या प्रधानशब्दापुढें समास करतांना जी विभक्ति तीच समास झाल्यानंतर त्या सामासिक शब्दापुढें दिसते.

परिमाणम् । कस्य तर्हि । त्रिंशद्रात्रस्य । तद्यथा । द्रोणो बदराणां देवदत्तस्येति । न देवदत्तस्य द्रोणः परिमाणम् । कस्य तर्हि । बदराणाम् ॥

## सिद्धं तु कालपरिमाणं यस्य स कालस्तेन ॥ २ ॥

सिद्धमेतत् । कथम् । कालपरिमाणं यस्य स कालस्तेन सह समस्यत इति वक्तव्यम् । सिध्यति । सूत्रं तर्हि भिद्यते ॥ यथान्यासमेवास्तु । ननु चोक्तं कालस्य येन समासस्तस्यापरिमाणित्वादनिर्देश इति । कं पुनः कालं मत्वा भवानाह कालस्य येन समासस्तस्यापरिमाणित्वादनिर्देश इति । येन मूर्तीनामुपचयाश्चापचयाश्च लक्ष्यन्ते तं कालमाहुः । तस्यैव हि कयाचित्क्रियया युक्तस्याहरिति च भवति रात्रिरिति च । कया क्रियया । आदित्यगत्या । तयैवासकृदावृत्तया मास इति भवति संवत्सर इति च । यद्येवं भवति जातस्य मासः परिमाणम् ॥

## एकवचनद्विगोश्चोपसंख्यानम् ॥३॥

एकवचनान्तानामिति वक्तव्यम् । इह मा भूत् । मासौ जातस्य । मासा जातस्येति ॥ द्विगोश्चेति वक्तव्यम् । इहापि यथा स्यात् । द्विमासजातः त्रिमासजातः ॥

## उक्तं वा ॥ ४ ॥

---

तर मग मास हें कोणाचें परिमाण आहे ?

तीस दिवसांचें. तें जसें:- 'द्रोणो बदराणां देवदत्तस्य' म्हणजे देवदत्ताचीं बोरें द्रोणभर आहेत, असें म्हटलें असतां द्रोण हें देवदत्ताचें परिमाण नव्हे, तर तें बोरांचें परिमाण होय.

(वा.२) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

ज्याच्या कालाचें परिमाण केलें जातें त्याच्याशीं त्या कालवाचक शब्दाचा समास होतो, असें सूत्र करावें.

अशा रीतीनें सिद्ध होईल. परंतु सूत्राचा बदल होत आहे.

तर मग मूळचें जसें सूत्र आहे तसेंच तें असूं दे.

पण कालवाचकाचा ज्याच्याशीं समास करावयाचा त्याचें काल हें परिमाण होत नाहीं, म्हणून सूत्रांतील परिमाणिना हा शब्द बरोबर नाहीं असें आतांच म्हटलें आहे ना ?

अरे पण, तूं कोणता काल मनांत धरून 'कालवाचकाचा ज्याच्याशीं समास करावयाचा त्याचें काल हें परिमाण होत नाहीं म्हणून सूत्रांतील परिमाणिना हा शब्द बरोबर नाहीं' असें म्हणत आहेस ?

ज्याच्या योगानें तरुलता वगैरे मूर्त पदार्थांची केव्हां वाढ आणि केव्हां ऱ्हास झालेले दिसतात त्याला काल असें म्हणतात. कांहीं एक क्रियेनें युक्त झालेल्या त्याच कालाला दिवस व रात्र असा व्यवहार होतो.

कांहीं एक क्रियेनें म्हणजे कोणत्या क्रियेनें ?

सूर्याच्या गतिरूप क्रियेनें. वारंवार झालेल्या त्याच गतिक्रियेमुळें मास, संवत्सर, इत्यादि व्यवहार होतो.

असें आहे तर मग उपजणें या क्रियेमुळें मास हें जन्मलेल्या मुलाचें परिमाण होतें असें सिद्ध झालें.

(वा.३)एकवचन ज्याच्यापुढें आहे अशाच कालवाचकांचा हा समास होतो असें वचन करावें; कारण मासौ जातस्य, मासा जातस्य, येथें समास न झाला पाहिजे.

तसेंच तो कालवाचक शब्द द्विगुसंज्ञक असला तरी त्याचाही समास होतो, असें वचन करावें : द्वौ मासौ जातस्य, त्रयो मासा जातस्य, द्विमासजातः, त्रिमासजातः.

(वा.४) याविषयीं सांगितलें आहे.

---

१. मास हें तीस दिवसांचें परिमाण आहे, असें म्हणणाऱ्याला खरें कालाचें स्वरूप समजलेंच नसावें.

किमुक्तम् । एकवचने तावदुक्तमनभिधानादिति ॥ द्विगोः किमुक्तम् । उत्तरपदेन परिमाणिना द्विगोः समासवचनमिति ॥

## नञ् ॥ २ । २ । ६ ॥

किंप्रधानोऽयं समासः । उत्तरपदार्थप्रधानः । यद्युत्तरपदार्थप्रधानोऽब्राह्मणमानयेत्युक्ते ब्राह्मणमात्रस्यानयनं प्राप्नोति ॥ अन्यपदार्थप्रधानस्तर्हि भविष्यति । यद्यन्यपदार्थप्रधानोऽवर्षा हेमन्त इति हेमन्तस्य यल्लिङ्गं वचनं च तत्समासस्यापि प्राप्नोति । पूर्वपदार्थप्रधानस्तर्हि भविष्यति । यदि पूर्वपदार्थप्रधानोऽव्ययसंज्ञा प्राप्नोति । अव्ययं ह्यस्य पूर्वपदमिति । नैष दोषः । पाठेनाव्ययसंज्ञा क्रियते न च नञ्समासस्तत्र पठ्यते । यद्यपि नञ्समासो न पठ्यते नञ्तु पठ्यते । पाठेनाप्यव्ययसंज्ञायां सत्या-

---

काय सांगितलें आहे ?

एकवचनान्त अशाच कालवाचकाचा समास होतो याविषयीं असें सांगितलें आहे की समासामध्यें द्वित्वबहुत्वाचा अवगम होत नाहीं; अर्थात् एकवचनान्ताचा समास होईल.

आतां द्विगूच्या संबंधानें काय सांगितलें आहे ?

'परिमाणिवाचक अशा उत्तरपदामुळें दिग्वाचक किंवा संख्यावाचक यांचा सुबन्ताबरोबर द्विगुसमास होण्याकरितां बहुत पदांचा तत्पुरुषसमास होतो असें वचन करावें' असें (२।१।५१, वा.९) सांगितलें आहे.

(सू.६) प्रकृत सूत्रानें सांगितलेल्या समासामध्यें पूर्वपदार्थ आणि उत्तरपदार्थ यांपैकीं कोणाला प्राधान्य आहे ?

उत्तरपदार्थाला प्राधान्य आहे.

जर उत्तरपदार्थाला प्राधान्य असेल तर अब्राह्मणमानय असें सांगितलें असतां वाटेल त्या ब्राह्मणालाच घेऊन येण्याची पाळी येत आहे.

तर ह्या नञ्तत्पुरुषसमासामध्यें अन्यपदार्थाला प्राधान्य मानावें.

जर नञ्समास हा अन्यपदार्थप्रधान[3] असेल तर अवर्षा हेमन्तः येथें हेमन्तशब्दार्थाचें जें लिंगवचन तेंच अवर्षाः या नञ्समासाला लागू करण्याची पाळी येत आहे.

तर येथें पूर्वपदार्थाला प्राधान्य समजावें.

जर हा नञ्समास पूर्वपदार्थप्रधान असेल तर याचें पूर्वपद अव्यय असल्यामुळें याला अव्ययसंज्ञा प्राप्त होत आहे.

हा दोष येत नाहीं. कारण ज्यांना अव्ययसंज्ञा होणें इष्ट आहे त्या शब्दांचा प्रत्यक्ष पाठ करून अव्ययसंज्ञेचें विधान केलें आहे, आणि नञ्समासाचा तर त्या ठिकाणीं पाठ केलेला नाहीं.

जरी नञ्समासाचा त्या ठिकाणीं पाठ केलेला नाहीं, तथापि नञाचा तेथें पाठ असल्यामुळें त्याला अव्ययसंज्ञा होईल. आतां लिंगवचनें हीं मुख्य अर्थाच्या धोरणानें लागत असतात, आणि या नञ्समासामध्यें तर अव्ययाचा अर्थच प्रधान आहे; तेव्हां त्याला

---

या अभिप्रायानें हा प्रश्न विचारला आहे.

१. अकारेत्संज्ञक न या अव्ययाचा समर्थ सुबन्ताबरोबर विकल्पानें तत्पुरुषसमास होतो; जसें– न ब्राह्मणः अब्राह्मणः, अवृषलः.

२. अब्राह्मणः येथें नञाचा अर्थ प्रतिषेध होय. त्या नञानें ब्राह्मणरूप अर्थाचा निषेध केल्यामुळें तो अर्थच नाहींसा झाला आहे. तेव्हां नसलेल्या अर्थाला प्राधान्य कसें असूं शकेल ? तें तर आहे. सबब नाइलाजास्तव नञ् अनर्थक आहे असें मानलें पाहिजे. तेव्हां अब्राह्मण आणि ब्राह्मण या दोन्ही शब्दांचा अर्थ समान ठरतो. म्हणून अब्राह्मणम् आनय असें म्हटलें तरी ब्राह्मणच आणणें भाग आहे.

३. न ब्राह्मण्यं यस्य सोऽब्राह्मणः या अर्थी बहुव्रीहिसंज्ञेचा बाध करून नञ्समास केल्यामुळें अन्यपदार्थप्राधान्य या समासाला संभवतें.

मभिधेयवल्लिङ्गवचनानि भवन्ति यश्चेहार्थोऽभिधीयते न तस्य लिङ्गसंख्याभ्यां योगोऽस्ति ॥ नेदं वाचनिकमलिङ्गतासंख्यता वा । किं तर्हि । स्वाभाविकमेतत् । तद्यथा । समानमीहमानानां चाधीयानानां च केचिदर्थैर्युज्यन्तेऽपरे न । न चेदानीं कश्चिदर्थवानिति कृत्वा सर्वैरर्थवद्भिः शक्यं भवितुं कश्चिद्वानर्थक इति कृत्वा सर्वैरनर्थकैः । तत्र किमस्माभिः शक्यं कर्तुम् । यन्नञः प्राक्समासाल्लिङ्गसंख्याभ्यां योगो नास्ति समासे च भवति स्वाभाविकमेतत् ॥ अथवाश्रयतो लिङ्गवचनानि भविष्यन्ति । गुणवचनानां हि शब्दानामाश्रयतो लिङ्गवचनानि भवन्ति । तद्यथा । शुक्लं वस्त्रम् शुक्ला शाटी शुक्लः कम्बलः शुक्लौ कम्बलौ शुक्लाः कम्बला इति । यदसौ द्रव्यं श्रितो भवति गुणस्तस्य यल्लिङ्गं वचनं च तद्गुणस्यापि भवति । एवमिहापि यदसौ द्रव्यं श्रितो भवति समासस्तस्य यल्लिङ्गं वचनं च तत्समासस्यापि भविष्यति ॥ अथवा पुनरस्तूत्तरपदार्थप्रधानः । ननु चोक्तमब्राह्मणमानयेत्युक्ते ब्राह्मणमात्रस्यानयनं प्राप्नोतीति । नैष दोषः । इदं तावदयं प्रष्टव्यः । अथेह राजपुरुषमानयेत्युक्ते पुरुषमात्रस्यानयनं कस्मान्न भवति । अस्त्यत्र विशेषः । राजा विशेषकः प्रयुज्यते तेन विशिष्टस्यानयनं भवति । इहापि तर्हि

---

लिंगवचनांचा अन्वय नाहीं, म्हणून या नञ्तत्पुरुषाला लिंग व संख्या लागणार नाहींत.

अव्ययाच्या अर्थाला लिंगाचा आणि संख्येचा संबंध होत नाहीं असें कांहीं वचन नाहीं, तर ही गोष्ट स्वाभाविक आहे; जसें:— एका गुरूपाशीं सारख्या प्रमाणांत अभ्यास करणाऱ्या अशा अनेक शिष्यांपैकीं कांहीं एकांना त्याचें फळ मिळतें आणि कांहीं एकांना तितकें मिळत नाहीं. तेव्हां एखाद्याला फळ मिळालें म्हणून त्यावरून सगळ्यांनाच तें मिळालें पाहिजे असें नाहीं, किंवा एखाद्याला फळ मिळालें नाही म्हणून त्यावरून सर्वांनाच तें मिळत नाहीं असेंही होत नाहीं. असें असतां तेथें आम्हीं काय करावें ? येथें समास होण्याच्या पूर्वी नञर्थाला लिंगसंख्येचा योग नाहीं आणि समास झाल्यानंतर लिंगसंख्यांचा योग होतो, हें शब्दशक्तिस्वभावसिद्ध आहे.

अथवा येथें नञ्तत्पुरुषाच्या आश्रयावर अवलंबून लिंगवचनें लागू शकतील. गुणवाचक शब्दांना त्या गुणाच्या आश्रयामुळेंच लिंगवचनें प्राप्त होतात; तें जसें:— शुक्लं वस्त्रं, शुक्ला शाटी, शुक्लः कम्बलः, शुक्लौ कम्बलौ, शुक्लाः कम्बलाः. येथें शुक्ल हा गुण ज्या द्रव्याचा आश्रय करीत आहे त्या द्रव्याचें जें लिंग आणि वचन तेंच गुणवाचकालाही लागू होतें. त्याप्रमाणें प्रकृत स्थलींही समासार्थ जो भेद तो ज्यावर आहे त्या द्रव्याचें जें लिंग आणि वचन तें समासार्थालाही लागू होईल. किंवा या नञ्तत्पुरुषामध्यें प्राधान्य उत्तरपदार्थाला असो.

पण अब्राह्मणमानय असें सांगितलें असतां वाटेल त्या ब्राह्मणाला आणण्याची पाळी येते असें आतांच दूषण दिलें आहे ना ?

हा दोष येत नाहीं. अगोदर याला असें विचारावें की 'राजपुरुषमानय' असें सांगितलें असतां कोणत्याही पुरुषाला कां बरें आणिलें जात नाहीं ?

येथें विशेष आहे; पुरुषांतील विशेष दाखविणाऱ्या 'राजशब्दाचा प्रयोग येथें आहे, त्यामुळें राजाचा ज्या पुरुषाशीं संबंध आहे असाच पुरुष आणिला जातो. तर येथेंही ब्राह्मणावरील विशेष दाखविणारा असा नञ् शब्द योजिला आहे, त्यामुळें कोणताही ब्राह्मण न आणतां नञर्थानें युक्त असाच

नञ्विशेषकः प्रयुज्यते तेन नञ्विशिष्टस्यानयनं भविष्यति । कः पुनरसौ । निवृत्तपदार्थकः ॥ यदा पुनरस्य पदार्थो निवर्तते किं स्वाभाविकी निवृत्तिराहोस्विद्वाचनिकी । किं चातः । यदि स्वाभाविकी किं नञ्प्रयुज्यमानः करोति । अथ वाचनिकी तद्वक्तव्यं नञ्प्रयुज्यमानः पदार्थं निवर्तयतीति । एवं तर्हि स्वाभाविकी निवृत्तिः । ननु चोक्तं किं नञ्प्रयुज्यमानः करोतीति । नञ्प्रयुज्यमानः पदार्थं निवर्तयति । कथम् । कीलप्रतिकीलवत् । तद्यथा । कील आहन्यमानः प्रतिकीलं निर्हन्ति । यद्येतदन्नञो माहात्म्यं स्यान्न जातुचिद्राजानो हस्त्यश्वं बिभृयुर्नत्येव राजानो ब्रूयुः । एवं तर्हि स्वाभाविकी निवृत्तिः । ननु चोक्तं किं नञ्प्रयुज्यमानः करोतीति । नञ्निमित्ता तूपलब्धिः । तद्यथा । समन्धकारे द्रव्याणां समवस्थितानां प्रदीपनिमित्तं दर्शनं न च तेषां प्रदीपो निर्वर्तको भवति ॥ यदि

---

ब्राह्मण आणला जाईल.

नञर्थानें विशिष्ट असा उत्तरपदाचा जो ब्राह्मण अर्थ तो कोणता ?

ज्याचे ठिकाणीं मुख्य ब्राह्मण्य निवृत्त आहे असा क्षत्रियादिक तो नञर्थानें विशिष्ट असा उत्तरपदार्थ ब्राह्मण होय.

नञ्समासावरून उत्तरपदाच्या मुख्यार्थाची म्हणजे ब्राह्मण्य वगैरेंची जी निवृत्ति प्रतीत होते ती काय साहजिकच होते किंवा नञाच्या प्रयोगानें केली जाते ?

यांत काय फरक आहे ?

जर ती निवृत्ति साहजिकच होत असेल तर तेथें नञ्शब्द योजल्याचा काय उपयोग होणार आहे ?

आतां जर ती निवृत्ति नञाच्या प्रयोगानें केली जात असेल तर 'नञाचा प्रयोग केला असतां तो नञ् उत्तरपदाच्या मुख्यार्थाची निवृत्ति करतो' असें मानावें लागेल, असा फरक आहे.

असें आहे तर साहजिकच निवृत्ति होते असें आम्ही समजतों.

पण तसें समजलें तर नञाच्या प्रयोगाचा उपयोग होत नाहीं असा दोष पूर्वी दाखविला आहे ना ?

तर मग नञाचा प्रयोग केला असतां तो उत्तरपदार्थाची निवृत्ति करूं शकतो असें समजावें.

ती निवृत्ति कशी करतो ?

खिळयानें खिळा उखडण्याप्रमाणें; जसें :– फळी वगैरेंमध्यें खिळा मोडून अडकून राहिला असतां त्या खिळयावर दुसरा खिळा ठोकला असतां तो पहिल्या खिळयाला दुसऱ्या बाजूनें बाहेर काढून टाकतो, तसा अब्राह्मणः या नञ्समासाचा प्रयोग उत्तरपदार्थाची निवृत्ति करतो.

जर एवढें नञ्प्रयोगाचें सामर्थ्य असेल तर राजे लोकांना हत्ती, घोडे, वगैरे सैन्य ठेवण्याचें कारण नाहीं; अशत्रुः असा नञ्शब्दाचा प्रयोग सुरू ठेवला म्हणजे काम भागेल.

असें आहे तर कारणान्तरानें निवृत्ति होते असेंच आम्ही समजतों.

पण या वेळीं नञ्प्रयोग करून त्याचा कांहीं उपयोग होत असें नाहीं आतांच म्हटलें आहे ना ?

कारणान्तरानें निवृत्ति होते खरी, पण ती नञाचा प्रयोग केल्यामुळें कळून येते; जसें– गाढ अंधःकारामध्यें असलेले घटपटादि पदार्थ दिवा आणिल्यानें कळून येतात; दिवा हा कांहीं त्या घटपटादिकांना उत्पन्न करीत नाहीं.

---

४. नञाचा प्रयोग ह्या कारणाशिवाय कारणान्तरानें जी निवृत्ति प्रतीत होते ती साहजिकच होय.

पुनरयं निवृत्तपदार्थकः किमर्थं ब्राह्मणशब्दः प्रयुज्यते। एवं यथा विज्ञायेतास्य पदार्थो निवर्तत इति। नेति ह्युक्ते संदेहः स्यात्कस्य पदार्थो निवर्तत इति। तत्रासंदेहार्थं ब्राह्मणशब्दः प्रयुज्यते। एवं वैतत्। अथवा सर्व एते शब्दा गुणसमुदायेषु वर्तन्ते ब्राह्मणः क्षत्रियो वैश्यः शूद्र इति।

तपः श्रुतं च योनिश्चेत्येतद्ब्राह्मणकारकम्।
तपःश्रुताभ्यां यो हीनो जातिब्राह्मण एव सः॥

तथा गौरः शुच्याचारः पिङ्गलः कपिलकेश इत्येतानप्यभ्यन्तरान्ब्राह्मण्ये गुणान्कुर्वन्ति। समुदायेषु च वृत्ताः शब्दा अवयवेष्वपि वर्तन्ते। तद्यथा। पूर्वे पञ्चालाः। उत्तरे पञ्चालाः। तैलं भुक्तम्। घृतं भुक्तम्। शुक्लः नीलः कपिलः कृष्ण इति। एवमयं समुदाये ब्राह्मणशब्दः प्रवृत्तोऽवयवेष्वपि वर्तते जातिहीने गुणहीने च॥ गुणहीने तावत्। अब्राह्मणोऽयं यस्तिष्ठन्मूत्रयति। अब्राह्मणोऽयं यो गच्छन्भक्षयति॥ जातिहीने संदेहाद्दुरुपदेशाच्च ब्राह्मणशब्दो वर्तते। संदेहात्तावत्। गौरं शुच्याचारं पिङ्गलं कपिलकेशं दृष्ट्वाध्यवस्यति ब्राह्मणोऽयमिति। ततः पश्चादुप-

---

आतां येथें जर या ब्राह्मण वगैरे उत्तरपदार्थांची निवृत्तिच कळविणेची असेल तर त्या उत्तरपदाचा प्रयोग तरी कशाकरितां केला जात आहे?

अमुक पदार्थ निवृत्त झाला हें कळावें म्हणून. जर ब्राह्मण वगैरे शब्दाचा प्रयोग न करतां नुसता नञाचाच प्रयोग केला तर कोणत्या पदाचा अर्थ निवृत्त होतो हें संशयित राहील. तो संशय राहू नये यासाठीं ब्राह्मण वगैरे शब्दांचा प्रयोग केला जात आहे. नञ्समासस्थलींही अशीच वस्तुस्थिति आहे.[५]

किंवा ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र हे सगळे शब्द ज्या ठिकाणीं ते ते गुणसमुदाय दृष्टीस पडतात त्या त्या व्यक्तीला लागू होतात; जसें—तपश्चर्या, वेद व वेदांगें वगैरेंचा अभ्यास आणि ब्राह्मणापासून ब्राह्मण स्त्रीचे ठिकाणीं जन्म या गोष्टी त्या व्यक्तीला ब्राह्मणशब्द लागू पडण्यास कारणीभूत होतात. जो तपश्चर्या आणि वेदशास्त्राभ्यास यानें रहित तो केवळ जातीनें ब्राह्मण समजला जातो. तसेंच गौरवर्ण, शुचिर्भूत आचार, पिंगल वर्ण, व कपिल केश या गुणांच्या समुदायाचाही ब्राह्मण्याचे पोटांत अन्तर्भाव करतात. समुदायाला लागू असलेले कांहीं शब्द अवयवालाही लागू होतात; जसें—पूर्वे पञ्चालाः, तैलं भुक्तम्, घृतं भुक्तम्, शुक्लो नीलः कपिलः कृष्णः वगैरे. त्याप्रमाणें ज्या गुणसमुदायावर अवलंबून ब्राह्मणशब्द उपयोगांत येतो, तो त्या समुदायापैकीं कांहीं गुणांनीं युक्त असलेल्या म्हणजे जातिहीन किंवा गुणहीन अशा व्यक्तीलाही लागू होतो. त्यांत गुणहीनाचें उदाहरणः— जो उभ्यानें मूत्रक्रिया किंवा भक्षणक्रिया करतो अशाला अब्राह्मणोऽयम् असें म्हणतात. जातिहीनाचें उदाहरणः— संशयामुळें किंवा ब्राह्मण्याच्या खुणा सांगण्यांत चूक झाल्यामुळें ब्राह्मणशब्द लागू होतो. गौरवर्ण, शुद्ध आचार, पिंगट वर्ण, व कपिल केश हे गुण पाहून संशय उत्पन्न होतो व हा ब्राह्मण आहे असें वाटतें. नंतर हा ब्राह्मण नव्हे तर अब्राह्मण आहे असें

---

५. अब्राह्मण असा नञाच्या जवळ ब्राह्मणशब्द दुसऱ्या तऱ्हेनेंही उपयोगांत येतो असें येथून दाखविलें आहे. ब्राह्मणशब्द उपयोगांत येण्याला ज्या अनेक गोष्टी लागतात त्यांपैकीं कांहीं आहेत आणि कांहीं नाहींत अशा ठिकाणीं अब्राह्मण असें म्हणतात. ज्या गोष्टी आहेत त्यांमुळें ब्राह्मण म्हटलें जातें, आणि ज्या नाहींत त्यांची निवृत्ति नञानें दाखविली जाते.

लभते नायं ब्राह्मणोऽब्राह्मणोऽयमिति । तत्र संदेहाच्च ब्राह्मणशब्दो वर्तते जातिकृता चार्थस्य निवृत्तिः । दुरुपदेशात् । दुरुपदिष्टमस्य भवत्यमुष्मिन्नवकाशे ब्राह्मणस्तमानयेति । स तत्र गत्वा यं पश्यति तमध्यवस्यति ब्राह्मणोऽयमिति । ततः पश्चादुपलभ्यते नायं ब्राह्मणोऽब्राह्मणोऽयमिति । तत्र दुरुपदेशाच्च ब्राह्मणशब्दो वर्तते जातिकृता चार्थस्य निवृत्तिः । आतश्च संदेहाद्दुरुपदेशाद्वा न ह्ययं कालं माषराशिवर्णमापण आसीनं दृष्ट्वाध्यवस्यति ब्राह्मणोऽयमिति । निर्ज्ञातं तस्य भवति ॥ इदं खल्वपि भूय उत्तरपदार्थप्राधान्ये सति संगृहीतं भवति । किम् । अनेकमिति । किमत्र संगृहीतम् । एकवचनम् । कथं पुनरेकस्य प्रतिषेधेन बहूनां संप्रत्ययः स्यात् । प्रसज्यायं क्रियागुणौ ततः पश्चान्निवृत्तिं करोति । तद्यथा । आसय शायय भोजयानेकमिति । यद्यपि तावदत्रैतच्छक्यते वक्तुं यत्र क्रियागुणौ प्रसज्येते यत्र खलु न प्रसज्येते तत्र कथम् । अनेकस्तिष्ठतीति । भवति चैवं-

---

याला कांहीं पुराव्यावरून समजतें. तेथें संशयावरून ब्राह्मणशब्द उपयोगांत येतो आणि जाति नसल्यामुळें ब्राह्मणत्वाची निवृत्ति नञानें दाखविली जाते. खुणा सांगण्यांत चूक झाल्यामुळेंही असें होतें. अमुक वाड्यामध्यें ब्राह्मण आहे त्याला घेऊन ये असें चुकीनें सांगितलें असतां तो तेथें जाऊन ज्याला पाहतो त्याला हा ब्राह्मण आहे असें ठरवितो. मागून हा ब्राह्मण नव्हे तर अब्राह्मण आहे असें कांहीं कारणावरून समजतो. येथें सांगण्यांत चूक झाल्यामुळें भलत्या ठिकाणीं ब्राह्मणशब्द उपयोगांत येतो, आणि जाति नसल्यामुळें ब्राह्मणत्वाची निवृत्ति नञानें दाखविली जाते. आणि या कारणावरूनही असेंच ठरते की संशयामुळें किंवा सांगण्यांत चूक झाल्यामुळें भलत्याला ब्राह्मण ठरविला जातो, तेथेंच ब्राह्मणशब्द उपयोगांत येतो. उडदांच्या ढिगाप्रमाणें अतिशय काळाकुट्ट अशा बाजारांत बसलेल्या एखाद्या मनुष्याला पाहून 'हा ब्राह्मण आहे' असें कधींही वाटत नाहीं. कारण याला त्याचें खरें स्वरूप कळलेलेंच असतें.

आतां नञ्समासामध्यें उत्तरपदाच्या अर्थाला प्राधान्य मानलें असतां आणखी एक गोष्ट साधते.

ती कोणती ?

अनेकम् हें उदाहरण पहा.

येथें काय साधलें आहे ?

एकवचन करतां आलें ही गोष्ट साधली.

पण अनेकम् येथें एकाचा निषेध केला असतां त्यापासून दोन, तीन वगैरेंचा बोध कसा बरें होईल ?

क्रिया किंवा गुण यांचें प्रथमतः विधान करून मागून हा नञ् त्यांची निवृत्ति करीत आहे; जसें:— आण, बशीव, निजीव, व जेऊं घाल, या क्रिया करावयास सांगून पुढें तो अनेकम् असें म्हणतो.

ज्या ठिकाणीं प्रथमतः क्रिया किंवा गुण यांची प्राप्ति आहे तेथें अनेकम् यापासून जरी दोन, तीन, वगैरेंचा बोध होणें शक्य आहे, तरी पण जेथें प्रथमतः क्रिया किंवा गुण यांची प्रसक्तिच नाहीं तेथें म्हणजे अनेकस्तिष्ठति येथें बहुतांचें ज्ञान कसें ?

---

६. कारण एक नसला म्हणजे तेथें दोन, तीन, वगैरे कांहीं तरी असलेच पाहिजेत असा कांहीं नियम नाहीं. कदाचित् तेही नसतील.

७. येथें जर कोणीच नसेल तर आणणें वगैरे क्रिया करण्यास जें सांगितलें त्याचा कांहींच उपयोग होणार नाहीं. म्हणून तेथें एक नाहीं तर दोन, तीन, वगैरे आहेत अशीच प्रतीति होणार आहे.

जातीयकानामप्येकस्य प्रतिषेधेन बहूनां संप्रत्ययः । तद्यथा । न न एकं प्रियम् । न न एकं सुखमिति ॥

इह अब्राह्मणत्वम् अब्राह्मणता परत्वात्त्वतलौ प्राप्नुतः । तत्र को दोषः । स्वरे हि दोषः स्यात् । अब्राह्मणत्वमित्येवं स्वरः प्रसज्येत । अब्राह्मणत्वमिति चेष्यते ॥

## नञ्समासे भाववचन उक्तम् ॥ १ ॥

किमुक्तम् । त्वतल्भ्यां नञ्समासः पूर्वविप्रतिषिद्धं त्वतलोः स्वरसिद्ध्यर्थमिति ॥

## ईषदकृता ॥ २ । २ । ७ ॥

## ईषद्गुणवचनेन ॥ १ ॥

ईषद्गुणवचनेनेति वक्तव्यम् । अकृतेति ह्युच्यमान इह च प्रसज्येत । ईषद्गार्ग्य इति । इह च न स्यात् । ईषत्कडार इति ॥

## षष्ठी ॥ २ । २ । ८ ॥

## कृद्योगा च ॥ १ ॥

कृद्योगा च षष्ठी समस्यत इति वक्तव्यम् । इध्मप्रव्रश्चनः पलाशशातनः ॥ किमर्थमिदमुच्यते । प्रतिपदविधाना च षष्ठी न समस्यत इति वक्ष्यति तस्यायं

---

जेथें प्रथमतः क्रिया वगैरेंची प्रसक्तिच नाहीं अशा ठिकाणीं देखील एकाचा निषेध केल्यामुळें बहुतांचें ज्ञान होतें; जसें:—आम्हांला एक वस्तु आवडते असें नाहीं, किंवा आम्हांला एक वस्तु सुखकर आहे असें नाहीं.

आतां अब्राह्मणत्वम्, अब्राह्मणता, येथें न ब्राह्मणस्य भावः अशी एकदम भाव आणि प्रतिषेध यांच्या संबंधाची विवक्षा असतां परत्वास्तव समासाचा बाध करून प्रथमतः त्व किंवा तल् प्रत्यय प्राप्त होत आहे.

तसें झालें असतां काय दोष येत आहे ?

स्वराविषयीं दोष येईल तो असाः— त्व किंवा तल्प्रत्यय करून तदन्ताशीं नञाचा समास केला तर 'तत्पुरुषे तुल्यार्थ०' (६।२।२) यानें पूर्वपदप्रकृतिस्वर होऊन अब्राह्मणत्वम् असें आद्युदात्तपद होईल आणि पूर्वी नञ्समास करून त्व, तल्प्रत्यय केला असतां प्रत्ययस्वर होऊन अब्राह्मणत्वम् असें अन्तोदात्त पद इष्ट आहे.

(वा. १) नञ्समास आणि भावार्थक प्रत्यय या उभयतांची एकदम विवक्षा असतां सांगितलें आहे.

तें काय सांगितलें आहे ?

त्वतल्भ्यां० (५।१।१९, वा.८). त्व आणि तल् याला प्रत्ययस्वर करतां यावा म्हणून त्यांच्यापेक्षां प्रथमतः नञ्समास करावा असें सांगितलें आहे.

(सू ७ वा.१) ईषत्शब्दाचा गुणवाचकाबरोबर समास होतो असें सूत्र करावें. कृदन्ताशिवाय एवढेंच म्हटलें तर ईषद्गार्ग्य येथेंही समास होऊं लागेल आणि ईषत्कडारः येथें होणार नाहीं.

(सू ८ वा.१) कृत्प्रत्ययाचा योग असतां विहित जी षष्ठी (२।३।६५) त्या षष्ठ्यन्ताचा अन्वययोग्य अशा सुबन्ताबरोबर समास होतो असें वचन करावें; जसें— इध्मानां प्रव्रश्चनः इध्मप्रव्रश्चनः, पलाशशातनः.

पण कशाकरितां हें वचन केलें पाहिजे ?

---

८. या वाक्यापासून अनेक वस्तु आवडतात असें सहजच ज्ञान होतें.

१. ईषत् या शब्दाचा कृदन्ताखेरीज समर्थ अशा सुबन्ताबरोबर विकल्पानें तत्पुरुषसमास होतो; जसें— ईषत्पिङ्गलः, ईषद्रक्तम्.

२. गडेः कडच (उणा. ३।१३५) यानें कडारशब्दामध्यें जो आरन्प्रत्यय झाला आहे तो कृत्प्रत्यय आहे.

१. षष्ठ्यन्ताचा अन्वययोग्य अशा सुबन्ताबरोबर विकल्पानें तत्पुरुषसमास होतो; जसें— राज्ञः पुरुषो राजपुरुषः.

पुरस्तादपकर्षः । का पुनः षष्ठी प्रतिपदविधाना का कृद्योगा । सर्वा षष्ठी प्रतिपदविधाना शेषलक्षणां वर्जयित्वा । कर्तृकर्मणोः कृति [२.३.६५] इति या षष्ठी सा कृद्योगा ॥

तत्स्थैश्च गुणैः ॥ २ ॥

तत्स्थैश्च गुणैः षष्ठीगुणैः षष्ठी समस्यत इति वक्तव्यम् । ब्राह्मणवर्णः चन्दनगन्धः पटहशब्दः नदीघोषः ॥

न तु तद्विशेषणैः ॥ ३ ॥

न तु तद्विशेषणैरिति वक्तव्यम् । इह मा भूत् । घृतस्य तीव्रः । चन्दनस्य मृदुरिति ॥

किमर्थमिदमुच्यते । गुणेनेति प्रतिषेधं वक्ष्यति तस्यायं पुरस्तादपकर्षः । किं कारणं गुणेन नेत्युच्यते न पुनर्गुणवचनेन नेत्युच्यते । नैवं शक्यम् । इह हि न स्यात् । काकस्य कार्ष्ण्यम् । कण्टकस्य तैक्ष्ण्यम् । बलाकायाः शौक्ल्यमिति । एतदेव तस्मिन्योग उदाहरणम् । यद्वै ब्राह्मणस्य शुक्लाः वृषलस्य कृष्णा इत्यसामर्थ्यादत्र न भविष्यति । कथम-

---

प्रतिपदविधाना जी षष्ठी त्या षष्ठ्यन्ताचा समास होत नाहीं असें पुढें सांगणार आहे, त्याचा हा पूर्वी अपवाद सांगून ठेवला आहे.

पण प्रतिपदविधाना षष्ठी ती कोणती आणि कृद्योगामुळें होणारी षष्ठी ती कोणती ?

'षष्ठी शेषे' (२।३।५०) या सूत्रानें सांगितलेली षष्ठी सोडून बाकीची सर्व षष्ठी प्रतिपदविधाना होय. आणि 'कर्तृकर्मणोः कृति' (२।३।६५) या सूत्रानें सांगितलेली जी षष्ठी ती कृद्योगषष्ठी होय.

(वा.२) द्रव्यवाचक षष्ठ्यन्ताचा द्रव्यावर असणारे अशाच रूपानें नेहमीं भासणाऱ्या[2] गुणवाचक शब्दाबरोबर समास होतो असें वचन करावें; जसें:– ब्राह्मणस्य वर्णः ब्राह्मणवर्णः, चन्दनगन्धः, पटहशब्दः, नदीघोषः.

(वा.३) त्या गुणवाचकांचें जें विशेषण त्या विशेषणाबरोबर षष्ठीसमास होत नाहीं, असें वचन करावें; जसें घृतस्य तीव्रो गन्धः,चन्दनस्य मृदुः.

पण हें वचन[3] कशाकरितां केलें पाहिजे ?

'पूरणगुण०' (२।२।११) या सूत्रानें गुणवाचक शब्दाबरोबर षष्ठीसमासाचा निषेध सांगणार आहे, त्याचा हा पूर्वी अपवाद सांगून ठेवला आहे.

पण 'पूरणगुण०' येथें गुणशब्द घालून गुणवाचक अशा कोणत्याही शब्दाबरोबर जो षष्ठीसमासाचा निषेध सांगितला आहे तो तसा न सांगतां गुणवचन असा शब्द घालून गुण असून द्रव्याला बोलणारे असे जे गुणवचनशब्द त्यांबरोबरच समासाचा निषेध कां सांगितला नाहीं ?

'पूरणगुण' येथें गुणशब्दाच्या ऐवजीं गुणविशिष्ट द्रव्य अशा अर्थाचा गुणवचन असा शब्द घालणें शक्य नाहीं. कारण काकस्य कार्ष्ण्यम्, बलाकायाः शौक्ल्यम्, येथें निषेध लागू पडणार नाहीं, आणि त्या निषेधशास्त्राचें खरें उदाहरण काकस्य कार्ष्ण्यम् हेंच आहे. आतां ब्राह्मणस्य शुक्लाः, वृषलस्य कृष्णाः, असें जें उदाहरण दिलें आहे तेथें गुणविशिष्ट द्रव्यवाचक अशा शुक्लशब्दाशीं किंवा कृष्णशब्दाशीं षष्ठ्यन्ताचें सामर्थ्य नसल्यामुळेंच समास होणार नाहीं.

तें सामर्थ्य कां बरें नाहीं ?

---

२. शुक्ल हा गुण शुक्लः पटः असा पट या द्रव्याशीं ऐक्यानेंही भासतो तसा कधींही न भासणारा.

३. तत्स्थैश्च गुणैः हें वचन.

४. गुणवचन असें म्हटलें म्हणजे शुक्ल वगैरे शब्दांशींच समासाचा निषेध होईल; ब्राह्मणवर्णः इत्यादि उदाहरणांमध्यें निषेध होणारच नाहीं. तेव्हां तत्स्थैश्च गुणैः हें वार्तिक करावयास नको.

सामर्थ्यम् । सापेक्षमसमर्थं भवतीति । द्रव्यमत्रापेक्ष्यते दन्ताः । तस्माद्गुणेन नेति वक्तव्यम् । गुणेन नेत्युच्यमाने तत्स्थैश्च गुणैरिति वक्तव्यम् । तत्स्थैश्च गुणैरित्युच्यमाने न तु तद्विशेषणैरिति वक्तव्यम् ॥

**[याजकादिभिश्च ॥ २ । २ । ९ ॥]**[1]

**न निर्धारणे ॥ २ । २ । १० ॥**[1]

**प्रतिपदविधाना च ॥ १ ॥**

प्रतिपदविधाना च षष्ठी न समस्यत इति वक्तव्यम् । इह मा भूत् । सर्पिषो ज्ञानम्[2] । मधुनो ज्ञानमिति ॥

**पूरणगुणसुहितार्थसदव्ययतव्यसमानाधिकरणेन ॥ २ । २ । ११ ॥**[1]

गुणे किमुदाहरणम् । ब्राह्मणस्य शुक्लाः । वृषलस्य कृष्णा इति । नैतदस्ति प्रयोजनम् । असामर्थ्यादत्र न भविष्यति । कथमसामर्थ्यम् । सापेक्षमसमर्थं भवतीति । द्रव्यमत्रापेक्ष्यते दन्ताः ॥ इदं तर्हि । काकस्य कार्ष्ण्यम् । कण्टकस्य तैक्ष्ण्यम् । बलाकायाः शौक्ल्यमिति ॥ इदं चाप्युदाहरणम् । ब्राह्मणस्य

---

ज्याचा समास करावयाचा तें, ज्यांच्याशीं समास करावयाचा त्याहून इतरांविषयीं सापेक्ष असतां सामर्थ्यहीन असतें म्हणून. येथें ब्राह्मणाचे दांत पांढरे असा ब्राह्मणाचा अन्वय दांतांकडे आहे. अशा रीतीनें ब्राह्मण हा शब्द सापेक्ष होत आहे. एकंदरींत 'पूरण-गुण' येथें 'गुण' एवढाच शब्द ठेवला पाहिजे. तो तसा ठेवला असतां 'तत्स्थैश्च गुणैः' हें वचन केलें पाहिजे, आणि हें वचन केलें म्हणजे 'न तु तद्विशेषणैः' हेंही वचन केलें पाहिजे.

(सू.१०, वा.१) साक्षात् धातुविशेष किंवा कारकविशेष यांचें उपादान करून सांगितलेली जी षष्ठी ती प्रतिपदविधाना षष्ठी होय. त्या षष्ठ्यन्ताचा सुबन्ताबरोबर समास होत नाहीं असें वचन करावें. कारण सर्पिषो ज्ञानम्, मधुनो ज्ञानम्, येथें समास न झाला पाहिजे.

(सू.११) गुणवाचकाबरोबर षष्ठ्यन्ताचा समास होत नाहीं याचें उदाहरण कोणतें ?

ब्राह्मणस्य शुक्लाः, वृषलस्य कृष्णाः, इत्यादि.

हें प्रयोजन नाहीं. कारण सामर्थ्य नसल्यामुळें येथें समास होणार नाहीं.

तें सामर्थ्य कां बरें नाहीं ?

ज्या षष्ठ्यन्ताचा समास करावयाचा तें, ज्याच्याशीं समास करावयाचा त्याहून इतरांविषयीं सापेक्ष असतां, सामर्थ्यहीन असतें. येथें ब्राह्मणाचे दांत पांढरे ह्यांत ब्राह्मणाचा अन्वय दातांकडे आहे आणि असा ब्राह्मण हा शब्द सापेक्ष होत आहे.

तर मग काकस्य कार्ष्ण्यम्, कण्टकस्य तैक्ष्ण्यम्, बलाकायाः शौक्ल्यम्, वगैरेही उदाहरणें समजावींत. ब्राह्मणस्य शुक्लाः, वृषलस्य कृष्णाः, हेंही उदाहरण आहेच.

---

१. याजकादि गणांतील शब्दाबरोबर षष्ठ्यन्ताचा विकल्पानें तत्पुरुषसमास होतो; जसें:- ब्राह्मणानां याजकः ब्राह्मणयाजकः, देवपूजकः. 'कर्तरि च' (२।२।१६) या निषेधाचा हा अपवाद आहे.

१. यतश्च निर्धारणम् (२।३।४१) या सूत्रानें षष्ठी केली असेल त्या षष्ठ्यन्ताचा सुबन्ताबरोबर समास करूं नये; उदा० नृणां ब्राह्मणः श्रेष्ठः येथें नृ आणि ब्राह्मण यांचा समास होत नाहीं.

२. येथें 'ज्ञोऽविदर्थस्य करणे' (२।३।५१) या सूत्रानें षष्ठी केली आहे.

१. पूरणार्थवाचकप्रत्ययान्त, गुणवाचक, तृप्ति या अर्थाचे शब्द, सत् नांवाचा प्रत्यय शेवटीं असलेले शब्द, अव्यय, तव्यप्रत्ययान्त, आणि समानाधिकरण, या शब्दांबरोबर षष्ठ्यन्ताचा समास होत नाहीं; उदा०-सतां षष्ठः, काकस्य कार्ष्ण्यम्.

शुक्लाः । वृषलस्य कृष्णा इति । ननु चोक्तमसामर्थ्यादत्र न भविष्यति कथमसामर्थ्यं सापेक्षमसमर्थं भवतीति द्रव्यमत्रापेक्ष्यते दन्ता इति । नैष दोषः । भवति वै कस्यचिदर्थात्प्रकरणाद्वापेक्ष्यं निर्ज्ञातं तदा वृत्तिः प्राप्नोति ॥

सति किमुदाहरणम् । ब्राह्मणस्य पक्ष्यन् । ब्राह्मणस्य पक्ष्यमाणः । नैतदस्ति । प्रतिषिध्यतेऽत्र षष्ठी लप्रयोगे नेति । या च श्रूयत एषा बाह्यमर्थमपेक्ष्य भवति । तत्रासामर्थ्यान्न भविष्यति । कथमसामर्थ्यम् । सापेक्षमसमर्थं भवतीति । द्रव्यमत्रापेक्ष्यत ओदनः ॥ इदं तर्हि । चौरस्य द्विषन् । वृषलस्य द्विषन् । ननु चात्रापि प्रतिषिध्यते । वक्ष्यत्येतत् । द्विषः शतुर्वावचनमिति ॥

अव्यये किमुदाहरणम् । ब्राह्मणस्योच्चैः । वृषलस्य नीचैरिति । नैतदस्ति ।

---

पण सामर्थ्य नसल्यामुळें येथें समास होणार नाहीं असें म्हटलें आहे ना ?

तें सामर्थ्य कां बरें नाहीं ?

ज्या षष्ठ्यन्ताचा समास करावयाचा तें, ज्याच्याशीं समास करावयाचा त्याहून इतरांविषयीं सापेक्ष असतां सामर्थ्यहीन असतें. आणि येथें ब्राह्मणाचे दात पांढरे असा ब्राह्मणाचा अन्वय दांतांकडे आहे. असा ब्राह्मण हा शब्द सापेक्ष होत आहे.

हा दोष येत नाहीं. कारण जेव्हां एखाद्याला अर्थावरून किंवा प्रकरणावरून दांत वगैरे अपेक्षित असलेला अर्थ ज्ञातच असतो तेव्हां ब्राह्मणाचें काय अशी अपेक्षाच होत नाहीं. तेव्हां ब्राह्मणाचा शुक्ल याच्याशींच अन्वय असल्यामुळें समास प्राप्त होत आहे.

आतां सत् म्हणजे शतृ आणि शानच् हे प्रत्यय, त्यांचें उदाहरण कोणतें ?

ब्राह्मणस्य पक्ष्यन्[2], ब्राह्मणस्य पक्ष्यमाणः, हें होय.

हें उदाहरण संभवत नाहीं. कारण येथें लकाराचे स्थानीं आदेश झाला असल्यामुळें 'न लोकाव्यय०' (२।३।६९) या सूत्रानें षष्ठीचा निषेध केला आहे. आतां ब्राह्मणशब्दाच्या पुढें जी ही षष्ठी दिसत आहे ती पचिक्रियेपेक्षां अन्य जो ओदन वगैरे अध्याहृत अर्थ त्याच्या संबंधामुळें झालेली आहे. अर्थात् ती षष्ठी ब्राह्मणाचा ओदनाशीं संबंध दाखविते. पक्ष्यन्शब्दार्थाशीं अन्वय दाखवीत नाहीं. तेव्हां तेथें सामर्थ्य नसल्यामुळें समासाची प्राप्तिच येत नाहीं.

तें सामर्थ्य कां बरें नाहीं ?

ज्याचा समास करावयाचा त्याला, ज्याच्याशीं समास करावयाचा त्याहून इतरांची अपेक्षा असेल तर तें असमर्थ असतें म्हणून. येथें ओदनरूपी द्रव्याची अपेक्षा षष्ठ्यन्तानें केली जात आहे.

तर चोरस्य द्विषन्[3], वृषलस्य द्विषन्, हें उदाहरण घ्यावें.

अरे पण, येथेंही षष्ठीचा निषेध येत आहे[4]च. 'द्विष्धातुप्रकृतिक शतृप्रत्ययान्ताचा प्रयोग असतां विकल्पानें षष्ठीचा निषेध होतो' (२।३।६९, वा.६) असें वार्तिक पुढें सांगणार आहे.

आतां अव्ययाचें उदाहरण काय ?

ब्राह्मणस्योच्चैः, वृषलस्य नीचैः, हें होय.

हें उदाहरण नाहीं. कारण येथें सामर्थ्य

---

२. पच्धातूच्या पुढील लट्प्रत्ययाचे स्थानीं 'लटः सद्वा' (३।३।१४) यानें शतृ, शानच्, हे आदेश झाले आहेत.

३. येथें चोरस्य याचा द्विषन् याकडेच संबंध आहे. 'द्विषोऽमित्रे' (३।२।१३१) यानें शतृप्रत्यय केला आहे. तो लादेश नसल्यामुळें 'न लोकाव्यय०' (२।३।६९) हा षष्ठीचा निषेध येत नाहीं.

४. 'न लोका०' येथें तृन् हा प्रत्याहार आहे (२।३।६९,वा. ५).

असामर्थ्यादत्र न भविष्यति । कथमसामर्थ्यम् । सापेक्षमसमर्थं भवतीति । द्रव्यमत्रापेक्ष्यत आसनम् ॥ इदं तर्हि । ब्राह्मणस्य कृत्वा । वृषलस्य कृत्वेति । एतदपि नास्ति । प्रतिषिध्यते तत्र षष्ठ्यव्ययप्रयोगे नेति । या च श्रूयत एषा बाह्यमर्थमपेक्ष्य भवति । तत्रासामर्थ्यान्न भविष्यति । कथमसामर्थ्यम् । सापेक्षमसमर्थं भवतीति । द्रव्यमत्रापेक्ष्यते कटः ॥ इदं तर्हि । पुरा सूर्यस्योदेतोराधेयः । पुरा वत्सानामपाकर्तोः । ननु चात्रापि प्रतिषिध्यतेऽव्ययमिति कृत्वा । वक्ष्यत्येतत् । अव्ययप्रतिषेधे तोसुन्कसुनोरप्रतिषेध इति ॥

समानाधिकरणे किमुदाहरणम् । राज्ञः पाटलिपुत्रकस्य । शुकस्य माराविदस्य । पाणिनेः सूत्रकारस्य । नैतदस्ति । असामर्थ्यादत्र न भविष्यति । कथमसामर्थ्यम् । समानाधिकरणमसमर्थवद्भवतीति ॥ इदं तर्हि । सर्पिषः पीयमानस्य । यजुषः क्रियमाणस्येति । ननु चात्राप्यसामर्थ्यादेव न भविष्यति । कथमसाम-

---

नसल्यामुळें समास होणार नाहीं.

तें सामर्थ्य कां बरें नाहीं ?

ज्याचा समास करावयाचा त्याला, ज्याच्याशीं समास करावयाचा त्याहून इतराची अपेक्षा असेल तर तें सामर्थ्यहीन असतें म्हणून. येथें ब्राह्मणस्य या षष्ठीला आसनरूपी द्रव्याची अपेक्षा आहे.

तर मग ब्राह्मणस्य कृत्वा, वृषलस्य कृत्वा, हीं उदाहरणें घ्यावींत.

हींही उदाहरणें नव्हेत. कारण 'न लोका०' (२।३।६९) यानें अव्ययाचा प्रयोग असतां तेथें षष्ठीचा निषेध केला आहे. आतां ही जी षष्ठी दिसत आहे ती कृत्वा यापेक्षां अन्य कट वगैरे अर्थावर अवलंबूनच झाली आहे. तेव्हां सामर्थ्य नसल्यामुळें समास होत नाहीं.

तें सामर्थ्य कां बरें नाहीं ?

ज्याचा समास करावयाचा त्याला, ज्याच्याशीं समास करावयाचा त्याहून इतराची अपेक्षा असेल तर तें सामर्थ्यरहित असतें म्हणून. येथें ब्राह्मणस्य या षष्ठीला कट वगैरे द्रव्याची अपेक्षा आहे.

तर मग पुरा सूर्यस्य उदेतोराधेयः, पुरा वत्सानामपाकर्तोः, हें उदाहरण होय.

पण येथेंही अव्ययाचा प्रयोग असल्यामुळें षष्ठीचा निषेध प्राप्त होत आहे ना ?

'अव्ययाचा योग असतां जो षष्ठीचा निषेध केला आहे तेथें तोसुन् किंवा कसुन्प्रत्यय शेवटीं असलेल्या अव्ययाचा योग असतां तो निषेध लागू होत नाहीं' (२।३।६९, वा.४) असें वचन पुढें सांगण्यांत येणार आहे.

समानाधिकरणा(एकार्थप्रतिपादका)बरोबर षष्ठ्यन्ताचा समास होत नाहीं याचें उदाहरण कोणतें ?

राज्ञः पाटलिपुत्रकस्य, शुकस्य माराविदस्य, पाणिनेः सूत्रकारस्य, हीं उदाहरणें होत.

हीं उदाहरणें होत नाहींत. कारण येथें सामर्थ्य नसल्यामुळें समास होणार नाहीं.

तें सामर्थ्य कां बरें नाहीं ?

समानाधिकरणशब्द सामर्थ्यहीन असतात असा अतिदेश केला आहे म्हणून.

तर सर्पिषः पीयमानस्य, यजुषः क्रियमाणस्य, हें उदाहरण होय.

पण येथेंही सामर्थ्य नसल्यामुळेंच समास होणार नाहीं.

---

५. उदेतोः येथें उद्‌उपसर्गपूर्वक इण्‌धातूहून आणि अपकर्तोः येथें अपउपसर्गपूर्वक कृधातूहून 'भावलक्षणे स्थेण्' (३।४।१६) या सूत्रानें तोसुन्प्रत्यय केला आहे. येथें सूर्य आणि उदय यांचा प्रत्यक्ष संबंध असल्यामुळें सामर्थ्य आहे.

र्थ्यम् । समानाधिकरणमसमर्थवद्भवतीति । अधात्वभिहितमित्येवं तत् ॥

[क्तेन च पूजायाम् ॥२।२।१२॥

अधिकरणवाचिना च ॥२।२।१३]

कर्मणि च ॥ २ । २ । १४ ॥

कथमिदं विज्ञायते । कर्मणि या षष्ठी सा न समस्यत इति । आहोस्वित्कर्मणि यः क्त इति । कुतः संदेहः । उभयं प्रकृतं तत्रान्यतरच्छक्यं विशेषयितुम् । कश्चात्र विशेषः ।

**कर्मणीति षष्ठीनिर्देशश्चेदकर्तरि कृता समासवचनम् ॥ १ ॥**

कर्मणीति षष्ठीनिर्देशश्चेदकर्तरि कृता समासो वक्तव्यः । इध्मप्रव्रश्चनः पलाशशातनः ॥

**तृजकाभ्यां चानर्थकः प्रतिषेधः ॥२॥**

तृजकाभ्यां चानर्थकः प्रतिषेधः । अपां स्रष्टा । कर्मणीत्येव सिद्धम् ॥ अस्तु तर्हि कर्मणि यः क्त इति । किमुदाहरणम् । ब्राह्मणस्य भुक्तम् । वृषलस्य पीतमिति ।

**क्तनिर्देशेऽसमर्थत्वादप्रतिषेधः ॥३॥**

---

तें सामर्थ्य कां बरें नाहीं ?

समानाधिकरणशब्द सामर्थ्यरहित असतात असें सांगितलें आहे म्हणून.

जेथें धातुसहचरित प्रत्ययानें कर्ता, कर्म, वगैरेंचें अभिधान केलें जात नाहीं तेथें तें असामर्थ्य असतें.

(सू.१४)काय, कर्म या अर्थाला दाखविणारी जी षष्ठी त्या षष्ठ्यन्ताचा समास होत नाहीं असें समजावयाचें, किंवा कर्म या अर्थाला दाखविणारा जो क्तप्रत्यय तदन्ताबरोबर षष्ठीसमास होत नाहीं असें समजावयाचें ?

कशामुळें हा संशय येत आहे ?

क्त आणि षष्ठी हीं उभयतां मागून अनुवृत्त येत आहेत. त्यांपैकीं कोणाही एकाला कर्मणि हें विशेषण लावतां येणें शक्य आहे म्हणून.

या दोहोंमध्यें काय विशेष ?

(वा.१) कर्मणि या पदानें षष्ठ्यर्थाचा निर्देश केला आहे असें म्हटलें तर कर्त्याहून अन्य अर्थाला दाखविणारा जो कृत्प्रत्यय तो शेवटीं असलेल्या शब्दाबरोबर समास होण्याबद्दल वचन करावें लागेल; जसें:– इध्मप्रव्रश्चनः, पलाशशातनः. शिवाय,

(वा.२) 'तृजकाभ्यां कर्तरि' (२।२।२५) हा षष्ठीसमासाचा निषेधही अनर्थक होऊं लागेल. कारण अपां स्रष्टा, पुरां भेत्ता, यवानां लावकः. येथें 'कर्मणि च' या प्रकृतसूत्रानेंच निषेध सिद्ध होत आहे.

तर मग कर्म या अर्थाला दाखविणारा जो क्तप्रत्यय तो शेवटीं असलेल्या शब्दाबरोबर षष्ठीसमास होत नाहीं हा दुसरा पक्ष असूं दे.

याचें काय उदाहरण ?

ब्राह्मणस्य भुक्तम्, वृषलस्य पीतम्.

(वा.३) कर्मणि या पदानें क्तप्रत्ययाच्या अर्थाचा निर्देश केला आहे असें गृहीत धरलें

---

१. 'मतिबुद्धि०' (३।२।१८८) या सूत्रानें सांगितलेला क्तप्रत्यय शेवटीं असलेल्या शब्दाबरोबर षष्ठ्यन्ताचा समास होत नाहीं; उदा० राज्ञां मतः, राज्ञां बुद्धः, राज्ञां पूजितः

१. 'क्तोऽधिकरणे०' (३।४।७६) या सूत्रानें सांगितलेला जो अधिकरणार्थी क्तप्रत्यय तो शेवटीं असलेल्या शब्दाबरोबर षष्ठ्यन्ताचा समास होत नाहीं; उदा० आश्चर्यो गवां दोहोऽगोपेन.

१. 'उभयप्राप्तौ कर्मणि' (२।३।६६) यानें सांगितलेली जी षष्ठी तदन्ताचा सुबन्ताबरोबर समास होत नाहीं.

२. येथें प्रवृश्च्यतेऽनेन असा करणीं ल्युट्प्रत्यय आहे. 'कर्तृकर्मणोः कृति' (२।३।६५) यानें कर्मणि षष्ठी, असेंच पलाशशातनः येथेंही समजावें.

क्तनिर्देशेऽसमर्थत्वादप्रतिषेधः । अनर्थकः प्रतिषेधो ऽप्रतिषेधः । समासः कस्मान्न भवति । असामर्थ्यात् । कथमसामर्थ्यम् । सापेक्षमसमर्थं भवतीति । द्रव्यमत्रापेक्ष्यत ओदनः ॥

**प्रतिषेध्यमिति चेत्कर्तर्यपि प्रतिषेधः ॥ ४ ॥**

अथैवं सति प्रतिषेधः कर्तव्य इति दृश्यते कर्तर्यपि प्रतिषेधो वक्तव्यः स्यात् । ब्राह्मणस्य गतः । ब्राह्मणस्य यात इति ॥

**पूजायां च प्रतिषेधानर्थक्यम् ॥ ५ ॥**

पूजायां च प्रतिषेधोऽनर्थकः । राज्ञां पूजितः । कर्मणीत्येव सिद्धम् ॥

**तस्मादुभयप्राप्तौ कर्मणि षष्ठ्याः प्रतिषेधः ॥ ६ ॥**

तस्मादुभयप्राप्तौ कर्मणि [२.३.६६] इत्येवं या षष्ठी तस्याः प्रतिषेधो वक्तव्यः । स तर्हि वक्तव्यः । न वक्तव्यः । इत्यर्थेऽयं चः पठितः । कर्मणि च । कर्मणीत्येवं या षष्ठीति ॥

**[तृ[१]जकाभ्यां कर्तरि ॥२।२।१५॥**

**क[१]र्तरि च ॥२।२।१६॥]**

**नि[१]त्यं क्रीडाजीविकयोः ॥ २ । २ । १७ ॥**

---

तर पूर्वोक्त उदाहरणस्थलीं सामर्थ्य नसल्यामुळें हा प्रतिषेध अप्रतिषेधच होईल म्हणजे अनर्थक होईल.

तर मग ब्राह्मणस्य भुक्तम् येथें समास कां बरें होत नाहीं ?

सामर्थ्य नाहीं म्हणून.

तें सामर्थ्य कां बरें नाहीं ?

ज्याचा समास करावयाचा त्याला, ज्याच्याशीं समास करावयाचा त्याहून इतराची अपेक्षा असेल तर तें असमर्थ असतें. येथें ब्राह्मणस्य या षष्ठीला भुक्तपदार्थाखेरीज ओदन वगैरे द्रव्याची अपेक्षा आहे.

(वा.४) आतां ब्राह्मणस्य भुक्तम् या पूर्वोक्त उदाहरणामध्यें समासप्राप्तीची शंका[३] वाटते, म्हणून कर्मार्थक क्तप्रत्ययान्ताबरोबर षष्ठीसमासाचा निषेध केला पाहिजे, असें समजत असशील तर ब्राह्मणस्य ग[४]तः येथें कर्त्रर्थक क्तप्रत्ययान्ताबरोबर षष्ठीसमासाच्या निषेधाबद्दल वचन करावें लागेल.

(वा.५) शिवाय 'क्तेन च पूजायाम्' (२।२।१२) या सूत्रानें क्तप्रत्ययान्ताबरोबर जो षष्ठीसमासाचा निषेध केला आहे तोही व्यर्थ होईल. कारण राज्ञां पूजितः, राज्ञामर्चितः, या उदाहरणांमध्यें 'कर्मणि च' या प्रकृत सूत्रानेंच निषेध सिद्ध होत आहे.

(वा.६) तेव्हां दोन्हीही पक्षीं दोष दिसत असल्यामुळें 'उभयप्राप्तौ' या सूत्रानें विहित जी षष्ठी त्या षष्ठ्यन्ताचा समास होत नाहीं असा निषेध केला पाहिजे.

तर मग तसें सूत्र करावयास पाहिजे.

तसें सूत्र करावयास नको. कारण मूळ सूत्रांत जो हा चशब्द घातला आहे तो 'इति' ह्या शब्दाच्या अर्थाला दाखविणारा असा घातला आहे. तेव्हां 'कर्मणि' असें उच्चारून सांगितलेली जी षष्ठी त्या षष्ठ्यन्ताचा समास होत नाहीं असा 'कर्मणि च' या सूत्राचा अर्थ

---

३. ब्राह्मणस्य याचा ओदनाशीं संबंध आहे आणि त्याच्या द्वारानें भुक्त याकडे संबंध आहे; असें परंपरेनें सामर्थ्य मनांत घेऊन ही शंका येत आहे.

४. येथें ग्रामाच्या द्वारानें ब्राह्मणाचा गत याकडे संबंध आहे.

१. कर्ता या अर्थाला दाखविणारा जो तृच्प्रत्यय किंवा अकप्रत्यय तो शेवटीं असलेल्या शब्दाबरोबर षष्ठ्यन्ताचा समास होत नाहीं; उदा० अपां स्रष्टा, ओदनस्य पाचकः.

१. कर्ता या अर्थाला दाखविणारी जी षष्ठी तसल्या षष्ठ्यन्ताचा अकप्रत्ययान्त शब्दाबरोबर समास होत नाहीं; उदा० भवतः शायिका.

१. क्रीडा किंवा जीविका हे अर्थ गम्यमान असतांना अकप्रत्यय शेवटीं असलेल्या शब्दाबरोबर

किमिह नित्यग्रहणेनाभिसंबध्यते विधिराहोस्वित्प्रतिषेधः। विधिरित्याह। कुत एतत्। विधिर्हि विभाषा नित्यः प्रतिषेधः॥

**कुगतिप्रादयः ॥ २ । २ । १८ ॥**

**प्रादिप्रसङ्गे कर्मप्रवचनीयप्रतिषेधः १**

प्रादिप्रसङ्गे कर्मप्रवचनीयानां प्रतिषेधो वक्तव्यः। वृक्षं प्रति विद्योतते विद्युत्। साधुर्देवदत्तो मातरं प्रति॥

**व्यवेतप्रतिषेधश्च ॥ २ ॥**

व्यवेतानां च प्रतिषेधो वक्तव्यः। आ मन्द्रैरिन्द्र हरिभिर्याहि मयूररोमभिः॥

**सिद्धं तु क्वाङ्स्वतिदुर्गतिवचनात् ॥ ३ ॥**

सिद्धमेतत्। कथम्। क्वाङ्स्वतिदुर्गतयः समस्यन्त इति वक्तव्यम्। कु। कुब्राह्मणः कुवृषलः। आङ्। आकडारः आपिङ्गलः। सु। सुब्राह्मणः सुवृषलः। अति। अतिब्राह्मणः अतिवृषलः। दुर्। दुर्ब्राह्मणः। गति। प्रकारकः प्रणायकः प्रसेचकः ऊरीकृत्य ऊरीकृतम्॥

**प्रादयः क्तार्थे ॥ ४ ॥**

प्रादयः क्तार्थे समस्यन्त इति वक्त-

---

होतो.

(सू.१७) काय येथें नित्यशब्दाचा कोणाशीं संबंध करावयाचाः– विधीशीं अथवा निषेधाशीं ?

विधीशीं संबंध करावयाचा असें म्हणतों.

कशावरून ?

विभाषा या अधिकारामुळें विधीचा विकल्प चालू आहे व प्रतिषेध हा नित्यच आहे.

(सू.१८ वा.१) प्रादिकांच्या समासप्रकरणामध्यें कर्मप्रवचनीय प्रादिकांचा समास होत नाहीं असें वचन करावें; जसें:– वृक्षं प्रति विद्योतते विद्युत्, साधुर्देवदत्तो मातरं प्रति.

(वा.२) पदान्तरानें व्यवहित अशा प्रादिकांचा अव्यवहित पदाशीं समास होत नाहीं, असें समासाच्या निषेधादाखल वचन करावें; जसें:–आ मन्द्रैरिन्द्र हरिभिर्याहि मयूररोमभिः.

(वा.३) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

कु, आङ्, सु, अति, दुर् आणि गतिसंज्ञक यांचा समर्थाबरोबर समास होतो, असें सूत्र करावें; जसें:– कुब्राह्मणः, कुवृषलः, आकडारः, आपिङ्गलः, सुब्राह्मणः, सुवृषलः, अतिब्राह्मणः, अतिवृषलः, दुर्ब्राह्मणः, दुर्वृषलः, प्रकारकः, प्रणायकः, प्रसेचकः, ऊरीकृत्य, ऊरीकृतम्.

(वा.४) क्तप्रत्ययान्त शब्दाच्या अर्थाला दाखविणाऱ्या प्रादिकांचा समास होतो, असें

---

षष्ठ्यन्ताचा नित्य समास होतो; उदा० उद्दालकपुष्पाणां भञ्जनं यस्यां क्रीडायां सा उद्दालकपुष्पभञ्जिका, दन्तलेखनेन जीवतीति दन्तलेखकः.

२. तेव्हां अर्थातच तेथें नित्यपदाचा संबंध करण्यांत उपयोग होणार आहे.

१. कु, गतिसंज्ञक आणि प्र, परा, वगैरे प्रादिक यांचा अन्वययोग्य अशा सुबन्ताबरोबर नित्यतत्पुरुष समास होतो; उदा० कुत्सितः पुरुषः कुपुरुषः, ऊरीकृत्य, सुपुरुषः.

२. येथें आ याचा याहि याकडे संबंध आहे. परंतु मन्द्रैः वगैरे पदांनीं व्यवधान आहे. हा निषेध केला नसता तर याहि याच्या द्वारानें मन्द्रैः या जवळच्या पदाशीं संबंध आहे असें गृहीत धरून त्याच्याबरोबर समास झाला असता.

३. असें सूत्र केलें असतां प्रति, परि, अनु, उप, अपि, इत्यादि कर्मप्रवचनीयसंज्ञकांचा समास प्राप्तच होऊं शकत नाहीं. आतां या नवीन सूत्रामध्यें आङ्ग्रहण केलें असल्यामुळें आ मन्द्रैः येथें समास प्रसक्त होतो, तथापि आ याचा मन्द्रशब्दाशीं साक्षात् संबंध नसल्यामुळें होणार नाहीं. परंपरेनें सामर्थ्य हें इलाज नाहीं तेथेंच ध्यावयाचें आहे.

४. प्रादिक शब्द हे वृत्तींत सांपडले असतां पदैकदेशप्रयोगन्यायानें गत वगैरे क्तप्रत्ययान्ताच्या अर्थाला दाखवितात. कारण तेथें प्रगत या अर्थी प्र याचा प्रयोग केला आहे.

व्यम्। प्रगत आचार्यः प्राचार्यः। प्रान्तेवासी प्रपितामहः॥

एतदेव च सौनागैर्विस्तरतरकेण पठितम्॥ स्वती पूजायाम्॥ स्वती पूजायामिति वक्तव्यम्। सुराजा अतिराजा॥ दुर्निन्दायाम्॥ दुर्निन्दायामिति वक्तव्यम्। दुष्कुलम् दुर्गवः॥ आङीषदर्थे॥ आङीषदर्थे इति वक्तव्यम्। आकडारः आपिङ्गलः॥ कुः पापार्थे॥ कुः पापार्थे इति वक्तव्यम्। कुब्राह्मणः कुवृषलः॥ प्रादयो गताद्यर्थे प्रथमया॥ प्रादयो गताद्यर्थे प्रथमया समस्यन्त इति वक्तव्यम्। प्रगत आचार्यः प्राचार्यः। प्रान्तेवासी प्रपितामहः॥ अत्यादयः क्रान्ताद्यर्थे द्वितीयया॥ अत्यादयः क्रान्ताद्यर्थे द्वितीयया समस्यन्त इति वक्तव्यम्। अतिक्रान्तः खट्वामतिखट्वः। अतिमालः॥ अवादयः क्रुष्टाद्यर्थे तृतीयया॥ अवादयः क्रुष्टाद्यर्थे तृतीयया समस्यन्त इति वक्तव्यम्। अवक्रुष्टः कोकिलयावकोकिलो वसन्तः॥ पर्यादयो ग्लानाद्यर्थे चतुर्थ्या॥ पर्यादयो ग्लानाद्यर्थे चतुर्थ्या समस्यन्त इति वक्तव्यम्। परिग्लानोऽध्ययनाय पर्यध्ययनः॥ निरादयः क्रान्ताद्यर्थे पञ्चम्या॥ निरादयः क्रान्ताद्यर्थे पञ्चम्या समस्यन्त इति वक्तव्यम्। निष्क्रान्तः कौशाम्ब्या निष्कौशाम्बिः। निर्वाराणसिः॥

अव्ययं प्रवृद्धादिभिः॥ अव्ययं प्रवृद्धादिभिः समस्यत इति वक्तव्यम्।

---

वचन करावें; जसें:– प्रगत आचार्यः प्राचार्यः, प्रगतः अन्तेवासी प्रान्तेवासी, पितामहस्य पितृत्वं प्रगतः प्रपितामहः.

हेंच सौनाग नांवाच्या वैयाकरणांनीं विस्तारानें पठन केलें आहे तें असें:– पूजा या अर्थाला दाखविणाऱ्या सु आणि अति यांचा अन्वययोग्य अशा सुबन्ताबरोबर समास होतो, असें वचन करावें; जसें:–शोभनो राजा सुराजा. निंदा या अर्थाला दाखविणाऱ्या दुर्‌शब्दाचा तसाच समास होतो, असें वचन करावें, जसें:– दुष्कुलम्, दुर्गवः. किंचित् या अर्थाला दाखविणाऱ्या आङ्‌शब्दाचा तसाच समास होतो, असें वचन करावें; जसें:– आकडारः, आपिङ्गलः. गर्हित या अर्थाला दाखविणाऱ्या कुशब्दाचा समास होतो असें वचन करावें; जसें:– कुब्राह्मणः; कुवृषलः.

गत, प्राप्त, वगैरे अर्थांना दाखविणाऱ्या प्र, परा, वगैरे प्रादिक शब्दांचा प्रथमान्ताबरोबर नित्यतत्पुरुषसमास होतो असें वचन करावें; जसें:– प्रगत आचार्यः प्राचार्यः, प्रान्तेवासी, प्रपितामहः.

अतिक्रान्त, उद्गत, वगैरे अर्थांना दाखविणाऱ्या अति, उद्, वगैरे शब्दांचा द्वितीयान्ताबरोबर समास होतो तो नित्य होतो आणि तत्पुरुषसंज्ञक होतो, असें वचन करावें; जसें:– अतिक्रान्तः खट्वामतिखट्वः, उद्गतो वेलामुद्वेलः.

क्रुष्ट, नद्ध, वगैरे अर्थांना दाखविणाऱ्या अव, परि, सम्, वगैरे शब्दांचा तृतीयान्ताबरोबर नित्यतत्पुरुषसमास होतो असें वचन करावें; जसें:– अवक्रुष्टः कोकिलया अवकोकिलः, संनद्धो वर्मणा संवर्मा.

ग्लान, उद्युक्त, वगैरे अर्थांना दाखविणाऱ्या परि, उद्, वगैरे शब्दांचा चतुर्थ्यन्ताबरोबर नित्यतत्पुरुषसमास होतो असें वचन करावें; जसें:– परिग्लानोऽध्ययनाय पर्यध्ययनः, उद्युक्तः संग्रामाय उत्संग्रामः.

क्रान्त, गत, वगैरे अर्थांना दाखविणाऱ्या निर्, उद्, वगैरे शब्दांचा पञ्चम्यन्ताबरोबर नित्यतत्पुरुषसमास होतो असें वचन करावें; जसें:– निष्क्रान्तः कौशाम्ब्याः निष्कौशाम्बिः, कुलादुद्गतः उत्कुलः, निर्वाराणसिः.

पुनःप्रवृद्धं बहिर्भवति । पुनर्णवः पुनः-सुखम् ॥ इवेन विभक्त्यलोपः पूर्वपद-प्रकृतिस्वरत्वं च । वाससीइव । कन्ये-इव ॥ उदात्तवता तिङा गतिमता चाव्ययं समस्यत इति वक्तव्यम् । अनु-व्यचलत् अनुप्राविशत् । यत्परियन्ति ॥

## उपपदमतिङ् ॥ २ । २ । १९ ॥

अतिङिति किमर्थम् । कारको व्रज-ति । हारको व्रजति ॥ अतिङिति शक्य-मकर्तुम् । कस्मान्न भवति । कारको व्रजति । हारको व्रजतीति । सुप्सुपेति वर्तते ॥ अत उत्तरं पठति ।

### उपपदमतिङिति तदर्थप्रतिषेधः ॥ १ ॥

उपपदमतिङिति तदर्थस्यायं प्रति-षेधो वक्तव्यः । कस्य । तिङर्थस्य । कः पुनस्तिङर्थः । क्रिया ॥

### क्रियाप्रतिषेधो वा ॥ २ ॥

अथवा व्यक्तमेवेदं पठितव्यमुपपद-मक्रियेति ॥ अथाक्रियेति किं प्रत्युदाह्रि-यते । कारको गतः । हारको गतः ।

---

अव्ययाचा प्रवृद्ध वगैरे शब्दांबरोबर समास होतो असें वचन करावें; जसें:– पुनः-प्रवृद्धं बहिर्भवति, पुनर्णवः, पुनःसुखम्.

इव या अव्ययाबरोबर सुबन्ताचा समास होतो, व पूर्वपदाच्या पुढील विभक्तीचा लुक् होत नाहीं, आणि पूर्वपदाचा मूळचा स्वर कायम राहतो, असें वचन करावें; जसें:– वाससीइव, कन्येइव.

उदात्तस्वरानें किंवा गतिसंज्ञकानें युक्त अशा तिङन्ताबरोबर अव्ययाचा समास होतो असें वचन करावें; जसें– अनुव्यचलत्[५], अनु-व्याकरोति, यत्परियन्ति.

(सू.१९) येथें अतिङ् हा शब्द घातला आहे तो कशाकरितां[१] ?

कारको व्रजति,[२] हारको व्रजति, येथें व्रजति या तिङन्त उपपदाचा समास न व्हावा हा त्याचा उपयोग आहे.

अतिङ् हा शब्द सूत्रांत नसला तरी चालेल. मग पूर्वोक्तस्थलीं समास कां बरें होत नाहीं ?

प्रथमान्त आणि तृतीयान्त अशा सुप् आणि सुपा या पदांची येथें अनुवृत्ति येत आहे.

हें मनांत धरून वार्तिककार म्हणतात—

(वा.१) अतिङ् हा त्याच्या अर्थाला दाख-विणाऱ्या शब्दाच्या समासाचा प्रतिषेध होय.

त्याच्या अर्थाला म्हणजे कोणाच्या अर्थाला ?

तिङन्ताच्या अर्थाला.

त्या तिङन्ताचा अर्थ तो कोणता ?

क्रिया हा त्याचा अर्थ होय.

(वा.२) अथवा उपपदमक्रिया असेंच स्पष्ट सूत्र लिहावें.

आतां अक्रिया याचें प्रत्युदाहरण कोणतें ?

कारको गतः[३], कारको यातः, हें प्रत्युदाहरण होय.

---

५. येथें व्यचलत् या गतिविशिष्ट तिङन्ताबरोबर अनुशब्दाचा समास करावयाचा; तेव्हां येथें हा समास एकदम तीन पदांचा होतो. यत्परियन्ति येथें 'निपातैर्यद्यदिहन्त०' (८।१।३०) यानें निघाताचा निषेध झाल्यामुळें यन्तिशब्द प्रत्ययस्वरानें आद्यु-दात्त असल्यामुळें त्याचा परिशब्दाशीं समास झाला आहे.

१. उपपदाचा तिङन्ताशिवाय अन्वययोग्य अशा शब्दाबरोबर नित्यतत्पुरुषसमास होतो; जसें:– कुम्भं करोतीति कुम्भकारः, नगरकारः.

२. अतिङ् हें उपपदाचें विशेषण आहे असें गृहीत धरून हा उपयोग दाखविला आहे. येथें व्रजति हें उपपद आहे. 'तुमुन्ण्वुलौ०' (३।३।१०) यानें ण्वुल्-प्रत्यय झाला आहे.

३. गत हा शब्द क्रियावाची उपपद आहे. कारण त्यांतील गम्धातूनें गमनक्रिया दाखविली आहे. येथें 'तुमुन्ण्वुलौ०' (३।३।१०) यानें ण्वुल्-प्रत्यय झाला आहे. येथें समास झाला तर गतकारकः असें होईल.

नैतत्क्रियावाचि। किं तर्हि। द्रव्यवाचि॥ इदं तर्हि। कारकस्य गतिः। कारकस्य व्रज्या। एतदपि द्रव्यवाचि। कथम्। कृदभिहितो भावो द्रव्यवद्भवतीति॥ एवं तर्हि सिद्धे सति यदतिङिति प्रतिषेधं शास्ति तज्ज्ञापयत्याचार्योऽनयोर्योगयोर्निवृत्तं सुप्सुपेति। किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम्। गतिकारकोपपदानां कृद्भिः सह समासो भवतीत्येषा परिभाषा न कर्तव्या भवति। यद्येतज्ज्ञाप्यते केनेदानीं समासो भविष्यति। समर्थेन॥ यद्येवं धातूपसर्गयोरपि समासः प्राप्नोति पूर्वं धातुरुपसर्गेण युज्यते पश्चात्साधनेनेति। नैतदस्ति। पूर्वं धातुः साधनेन युज्यते पश्चादुपसर्गेण। साधनं हि क्रियां निर्वर्तयति तामुपसर्गो विशिनष्टि। अभिनिर्वृत्तस्य चार्थस्योपसर्गेण विशेषः शक्यो वक्तुम्॥

षष्ठीसमासादुपपदसमासो विप्रतिषेधेन ॥ ३ ॥

पण गत हा शब्द क्रियावाचक नव्हे, तर द्रव्यवाची होय.

तर मग कारकस्य गतिः, कारकस्य व्रज्या, हें प्रत्युदाहरण समजावें.

हेंही द्रव्यवाचक आहे.

तें कसें ?

कृत् नांवाच्या प्रत्ययानें प्रतिपादन केलेला धात्वर्थ देखील लिंगसंख्यान्वयी असल्यामुळें द्रव्याप्रमाणेंच प्रतीत होतो.

तेव्हां अशा रीतीनें सिद्ध होत असतां अतिङ् असा जो प्रतिषेध आचार्य करीत आहेत त्यावरून ते असें सुचवितात की पूर्वीच्या आणि या अशा दोन सूत्रांमध्यें सुप् आणि सुपा या पदांची अनुवृत्ति येत नाहीं.

असें सुचविल्याचें काय प्रयोजन ?

'गति, कारक आणि उपपद यांचा, कृदन्ताहून सुप्विभक्ति करण्याचे पूर्वीच त्या कृदन्ताबरोबर समास होतो' अशी जी परिभाषा ती करावयास नको.

पण जर सुपा या तृतीयान्त पदाची अनुवृत्ति येथें केली नाहीं तर आतां त्या उपपदाचा कोणाबरोबर बरें समास होईल ?

अन्वययोग्य अशा शब्दाबरोबर.

असें आहे तर धातु आणि उपसर्ग यांचाही समास होऊं लागेल. कारण धातूचा प्रथमतः उपसर्गाशीं संबंध होतो व मागून कारकाशीं संबंध होतो.

धातूचा प्रथमतः उपसर्गाशीं संबंध होत नाहीं तर प्रथमतः धातूचा कारकाशींच संबंध होतो व मागून उपसर्गाशीं होतो. कारण कारक हें क्रियेला उत्पन्न करणारें आहे आणि उपसर्ग हा फक्त क्रियेवरील कांही विशेष दाखविणारा आहे. तेव्हां क्रिया उत्पन्न झाल्यानंतरच उपसर्गानें तिच्यावरील विशेष दाखविणें शक्य होणार आहे.

(वा.३) षष्ठीतत्पुरुष आणि उपपदसमास हे

४. गत ह्या शब्दामध्यें क्रियेला प्राधान्य नाहीं, तर प्रत्ययार्थ कर्त्याला प्राधान्य आहे.

५. याचें असें तात्पर्य – पूर्वसूत्रामध्यें 'कुप्रादयः' आणि 'गतिः' असा योगविभाग करावयाचा. 'उपपदम्' आणि 'अतिङ्' असा विभाग करावयाचा. अतिङ् या प्रतिषेधाचा 'गतिः आणि उपपदम्' या मागील दोन्हींही सूत्रांशीं संबंध करावयाचा. त्यामुळें एकंदर असा वाक्यार्थ होतो : गतिसंज्ञकाचा अन्वययोग्य शब्दाबरोबर नित्यसमास होतो; तसेंच उपपदसंज्ञकाचा अन्वययोग्य शब्दांबरोबर नित्यसमास होतो. या दोन सूत्रांनीं सांगितलेला जो समास तो तिङन्ताशीं मात्र होत नाहीं. अर्थात् 'गतिकारकोपपदानाम्०' ही परिभाषा फलित होते.

६. सुपा याची अनुवृत्ति केली नाहीं म्हणजे जसा सुप्प्रत्यय करण्याचे पूर्वी कृत्प्रत्ययान्ताशींच समास करतां येतो तसा कृत्प्रत्यय करण्याचे पूर्वी फक्त धातूशींच उपसर्गांचा समास होऊं लागेल.

षष्ठीसमासादुपपदसमासो भवति विप्रतिषेधेन । षष्ठीसमासस्यावकाशः । राज्ञः पुरुषो राजपुरुषः । उपपदसमासस्यावकाशः । स्तम्बेरमः कर्णेजपः । इहोभयं प्राप्नोति । कुम्भकारः नगरकारः । उपपदसमासो भवति विप्रतिषेधेन ॥

**न वा षष्ठीसमासस्याभावादुपपदसमासः ॥ ४ ॥**

न वार्थो विप्रतिषेधेन । किं कारणम् । षष्ठीसमासस्याभावादुपपदसमासो भविष्यति । कथम् । गतिकारकोपपदानां कृद्भिः सह समासवचनं प्राक्सुबुत्पत्तेरिति वचनात् ॥ अथवा विभाषा षष्ठीसमासो यदा न षष्ठीसमासस्तदोपपदसमासो भविष्यति । अनेनैव यथा स्यात्तेन मा भूदिति । कश्चात्र विशेषस्तेन वा स्यादनेन वा । उपपदसमासो नित्यसमासः षष्ठीसमासः पुनर्विभाषा । ननु च नित्यं यः समासः स नित्यसमासो यस्य विग्रहो नास्ति । नेत्याह । नित्याधिकारे यः समासः स नित्यसमासः । नैवं शक्यम् । अव्ययीभावस्य ह्यनित्यसमासता प्रसज्येत । तस्मान्नित्यः समासो नित्यसमासो यस्य विग्रहो नास्ति॥

उभयतां एके ठिकाणीं प्राप्त झाले असतां त्यांमध्यें विप्रतिषेध असल्यामुळें परत्वात्तव उपपदसमास होतो. उपपद समासावांचून षष्ठीसमासाचें उदाहरणः— राज्ञः पुरुषो राजपुरुषः. षष्ठीसमासावांचून उपपदसमासाचें उदाहरणः— स्तम्बेरमः,कर्णेजपः;आणि कुम्भकारः,नगरकारः येथें उभयतांची प्राप्ति येत आहे. तेव्हां विप्रतिषेध असल्यामुळें परत्वात्तव उपपदसमास होतो.

(वा.४) अथवा येथें विप्रतिषेधापर्यंत जाण्याचें कारणच दिसत नाहीं.

काय कारण ?

कुम्भकार वगैरे उदाहरणांमध्यें कार या कृत्प्रत्ययान्त शब्दापुढें सुप्प्रत्यय केल्यानंतरच षष्ठीतत्पुरुषाची प्राप्ति येणार आहे. तेव्हां सुप्प्रत्यय करण्याचे पूर्वी एकटा उपपदसमासच प्राप्त होत असल्यामुळें तो होईल. कारण 'गति,कारक आणि उपपद यांचा कृत्प्रत्ययान्त शब्दाबरोबर त्यांच्यापुढें विभक्ति करण्याचे पूर्वींच समास होतो' अशी परिभाषा आहे.

किंवा षष्ठीसमास हा विकल्पानें सांगितला असल्यामुळें जेव्हां षष्ठीसमास नाहीं तेव्हां उपपदसमास होईल.

पण येथें नेहमीं 'उपपदमतिङ्' या प्रकृत सूत्रानेंच समास झाला पाहिजे. केव्हांही 'षष्ठी' (२।२।८) या सूत्रानें होतां कामा नये.

यांत काय बरें विशेष आहे ? त्यानें समास केला काय आणि प्रकृत सूत्रानें झाला काय ?

त्यांत फरक असा आहे की प्रकृत उपपदसमास हा नित्य आहे व षष्ठीसमास हा वैकल्पिक आहे.

पण नित्यसमास म्हणजे ज्याचें विग्रहवाक्य असत नाहीं तर नेहमीं समासच होतो तो नित्यसमास म्हटला जातो.

नित्यसमासाचें हें लक्षण बरोबर नाहीं. तर नित्यम् या अधिकारामध्यें ज्या समासाचें विधान आहे तो नित्यसमास होय.

नित्यसमासाचें असें लक्षण मानतां येणें शक्य नाहीं. कारण तसें गृहीत धरलें तर अव्ययीभाव हा अनित्यसमास ठरेल. तेव्हां ज्याचा

७. कुम्भकारः वगैरे स्थलीं 'उपपदमतिङ्' यानेंच समास होणें इष्ट आहे. कारण तो नित्य आहे म्हणून 'सिन्नित्यसमासयोः' (६।१।१२५, वा.१) या वार्तिकाची प्रवृत्ति होते, आणि षष्ठी समास केला तर तो अनित्य समास आहे, म्हणून 'अन्तोदात्तादुत्तरपदा०'(६।१।१६९) याची प्रवृत्ति होऊं लागेल.

८. तेव्हां कुम्भकारः येथें षष्ठीतत्पुरुष किंवा उपपदसमास म्हणून नित्यसमास होतो. कारण तो केला नाहीं तरी त्यावेळीं उपपदसमास होत असल्यामुळें वाक्याचा प्रयोग होत नाहीं.

९. कारण 'अव्ययं विभक्ति०' (२।१।६) इत्यादि सूत्रांमध्यें नित्यम् असा अधिकार नाहीं. विभाषा

**अमैवाव्ययेन ॥ २ । २ । २० ॥**

एवकारः किमर्थः । नियमार्थः । नैतदस्ति प्रयोजनम् । सिद्धे विधिरारभ्यमाणोऽन्तरेणाप्येवकारं नियमार्थो भविष्यति ॥ इष्टतोऽवधारणार्थस्तर्हि भविष्यति । यथैवं विज्ञायेत । अमैवाव्ययेनेति । मैवं विज्ञायि । अमाव्ययेनैवेति । अस्ति चेदानीं कश्चिदनव्ययमम्शब्दो यदर्थो विधिः स्यात् । अस्तीत्याह । खशयं ब्राह्मणकुलामिति । नैतदस्ति प्रयोजनम् । अन्तरङ्गत्वादत्र समासो भविष्यति ॥ इदं तर्हि प्रयोजनममैव यत्तुल्यविधानमुपपदं तत्रैव यथा स्यादमा चान्येन च यत्तुल्यविधानमुपपदं तत्र मा भूदिति । अग्रे भोजम् । अग्रे भुक्त्वा ॥ अग्रादिष्वप्राप्तविधेः समासप्रतिषेधं

---

नेहमीं समास असतो म्हणजे ज्याला विग्रहवाक्य नाहीं तोच नित्यसमास होय.

(सू.२०) अमैव येथें एवशब्द घातला आहे तो कशाकरितां ?

नियमाकरितां घातला आहे.

हें एवशब्द घालण्याचें प्रयोजन नाहीं. कारण जी गोष्ट अन्य सूत्रानें साधते त्याकरितां आरंभिलेला विधि तो एवकार घातल्यावांचूनच नियमाकरितां समजला जातो.

तर मग इष्ट आहे तसा नियमाचा आकार ठरविण्यासाठीं एवकार असूं शकेल. म्हणजे उपपदाचा अव्ययाबरोबर समास करणें झाल्यास णमुल्प्रत्ययान्त अव्ययाबरोबरच समास करावा, असा नियमाचा आकार समजला जावा आणि उपपदाचा अमन्ताबरोबर समास करणें झाल्यास अव्ययाबरोबरच करावा, असा नियमाचा आकार न समजला जावा.

पण अव्यय नव्हे असा एखादा तरी अमन्तशब्द आहे काय की ज्याच्या निवृत्तीसाठीं 'अमन्ताशीं उपपदसमास करणें झाल्यास अव्ययाबरोबरच करावा' असा नियम ठरविण्यांत येईल ?

खशयं[२] ब्राह्मणकुलम् येथें शयम् हा अव्यय नव्हे असा अमन्तशब्द आहे असें म्हणतां येतें.

याकरितां एवकार घालण्याचें प्रयोजन नाहीं. कारण येथें शयशब्दाहून सुप्रत्यय करून त्याचें स्थानीं अमादेश केल्यानंतर तें अमन्त होत आहे. अर्थात् नियमशास्त्र बहिरंग ठरतें, आणि सुप्रत्यय करण्याचें पूर्वींच उपपदसमास प्राप्त होत असल्यामुळें तो अंतरंग आहे. तेव्हां नियमशास्त्राला बहिरंगत्वामुळें असिद्धत्व असल्यानें तें पूर्वीं प्राप्त झालेल्या उपपदसमासाची निवृत्ति करूं शकत नसल्यामुळें अंतरंगत्वास्तव उपपदसमास होईल.

तर मग एवशब्द घालण्याचें प्रयोजन असें समजावें की णमुल्प्रत्ययाचेच विधानाबरोबर ज्याला उपपदसंज्ञा विहित आहे त्याच उपपदाचा अव्ययाशीं समास व्हावा; आणि दुसरा एखादा प्रत्यय जोडीला असलेल्या णमुल्प्रत्ययाचे विधानाबरोबर ज्याला उपपदसंज्ञा विहित असेल तसल्या उपपदाचा समास न व्हावा. तेव्हां अग्रे भोजम्[३], अग्रे भुक्त्वा,. येथें समास न होण्याकरितां 'अग्रादिष्वप्राप्त-

---

या अधिकाराच्या पूर्वीं तीं सूत्रें असल्यामुळें अर्थातच समास नित्य होतो म्हणून वाक्य होत नाहीं.

१. अम् म्हणजे णमुल्प्रत्यय. त्या एकट्या णमुल्प्रत्ययाबरोबर ज्याला उपपदसंज्ञेचें विधान केलें आहे त्याच उपपदाचा अव्ययाबरोबर तत्पुरुषसमास होतो; उदा०— स्वादुंकारम्.

२. अधिकरणे शेतेः (३।२।१५) यानें शीङ्धातूहून अच्प्रत्यय, 'अतोऽम्' (७।१।२४) यानें सुप्रत्ययाला अम् आदेश. या अमन्ताशीं उपपदसमास न व्हावा यासाठीं तसा नियम ठरविला जाईल. तो तसा न ठरवितां 'अव्ययाशीं उपपदसमास करणें झाल्यास अमन्ताशींच करावा' असा नियम ठरविण्यासाठीं एकवार घातला आहे.

३. 'विभाषाऽग्रेप्रथ०' (३।४।२४) यानें क्त्वा-

चोदयिष्यति स न वक्तव्यो भवति ॥

[तृतीयाप्रभृतीन्यन्यतरस्याम् ॥२।२।२१॥

क्त्वा च ॥२।२।२२॥]

**शेषो बहुव्रीहिः ॥ २ । २ । २३ ॥**

शेष इत्युच्यते कः शेषो नाम । येषां पदानामनुक्तः समासः स शेषः ।

**शेषवचनं पदतश्चेन्नाभावात् ॥ १ ॥**

शेषवचनं पदतश्चेत्तन्न । किं कारणम् । अभावात् । न हि सन्ति तानि पदानि येषां पदानामनुक्तः समासः ॥ अर्थतस्तर्हि शेषग्रहणम् । येष्वर्थेष्वनुक्तः समासः स शेषः ।

**अर्थतश्चेदविशिष्टम् ॥ २ ॥**

अर्थतश्चेदविशिष्टमेतद्भवति । कुतः । पदतः । न हि सन्ति तेऽर्था येष्वनुक्तः समासः ॥ त्रिकतस्तर्हि शेषग्रहणम् । यस्य त्रिकस्यानुक्तः समासः स शेषः । कस्य चानुक्तः । प्रथमायाः ॥

इति श्रीभ.प.व्या.द्वि.अ.द्वि.पा.प्रथममाह्निकम्॥

---

विधेः समासप्रतिषेधः' (३।४।२४, वा.१) असें जें वचन केलें आहे तें करावयास नको.

(सू.२३) येथें शेषः असें म्हटलें आहे. शेष म्हणजे पूर्वोच्चारितांहून शिल्लक राहिलेला. तेव्हां असा शेष येथें कोणता बरें घ्यावयाचा आहे?

ज्या पदांचा समास अद्याप सांगितला नाहीं तो शेषपदाचा अर्थ होय.

(वा.१) जर पदांच्या अपेक्षेनें शेष घ्यावयाचा असेल तर तें बरोबर नाहीं.

काय कारण?

ज्या पदांचा समासविधान करण्याकडे उपयोग केला नाहीं अशीं पदेंच मुळीं शिल्लक राहिलेलीं नाहींत, म्हणून[२].

तर अर्थाच्या दृष्टीनें शेष समजावा. म्हणजे ज्या अर्थीं समास अद्याप सांगितला नाहीं तो शेष होय.

(वा.२) जर अर्थाच्या अपेक्षेनें शेषपदार्थ ठरवावयाचा तर यांत त्यापेक्षां फरक नाहीं.

त्यापेक्षां म्हणजे कोणापेक्षां?

पदांच्या अपेक्षेनें शेषपदार्थ ठरविण्यापेक्षां. कारण ज्या अर्थांचा समास सांगितला नाहीं असा अर्थच मुळीं शिल्लक राहिलेला नाहीं[३].

तर मग सु, औ, जस्, इत्यादि त्रिकाच्या अपेक्षेनें शेषपदार्थ घ्यावयाचा. म्हणजे ज्या त्रिकाचा समास विशेषशब्दानें अद्याप सांगितलेला नाहीं तो शेष होय.

कोणत्या त्रिकाचा समास अद्याप सांगितलेला नाहीं?

प्रथमाविभक्तीच्या त्रिकाचा.

अ.२, पा.२, आ.१ समाप्त.

---

प्रत्यय जोडीला धरून णमुल्प्रत्ययाचें विधान केलें आहे. सबब एकट्या णमुल्प्रत्ययाचेंच हें उपपद नसल्यामुळें अग्रे भोजम् इत्यादि स्थलीं समास होत नाहीं.

१. 'उपदंशस्तृतीयायाम्' (३।४।४७) या सूत्राला आरंभ करून 'अन्वच्यानुलोम्ये' (३।४।६४) येथपर्यंतच्या सूत्रांमध्यें निर्दिष्ट केलेल्या उपपदांचा णमुल्प्रत्ययान्त अव्ययाबरोबर विकल्पानें तत्पुरुष होतो; उदा०—मूलकोपदंशं भुङ्क्ते, मूलकेनोपदंशम्.

१. 'उपदंशस्तृतीयायाम्' (३।४।४७) याला आरंभ करून 'अन्वच्यानु०' (३।४।६४) येथपर्यंतच्या सूत्रांमध्यें निर्दिष्ट केलेल्या उपपदांचा क्त्वाप्रत्ययान्ताबरोबर विकल्पानें तत्पुरुषसमास होतो; उदा०—उच्चैःकृत्य, उच्चैः कृत्वा.

१. द्वितीया (२।१।२४), तृतीया (२।१।३०) असे जे उच्चारलेले द्वितीया वगैरे शब्द त्यांहून अन्य तो शेष म्हणजे अर्थात् प्रथमा होतो. बहुव्रीहिसमास हा प्रथमान्तपदाचा होतो.

२. 'सह सुपा' (२।१।४) यानें सुबन्त या नात्यानें सर्व पदांचा उपयोग समासाकडे केला आहे.

३. सामासिक शब्दाचा अर्थ पूर्वपदार्थ, उत्तरपदार्थ आणि अन्यपदार्थ असा तीन प्रकारचा संभवतो. तो तिन्ही प्रकारचा पूर्वीं सांगितला आहे. 'द्वितीयाश्रिता०' (२।१।२४) इत्यादिक सूत्रांनीं उत्तरपदार्थीं तत्पुरुषसंज्ञेचें विधान केलें आहे व 'अव्ययं विभक्ति०' (२।१।६) 'अन्यपदार्थे च०' (२।१।२१) इत्यादिक सूत्रांनीं पूर्वपदार्थीं आणि अन्यपदार्थीं अव्ययीभाव समासाचें विधान केलें आहे.

**अनेकमन्यपदार्थे ॥ २।२।२४ ॥**

पदग्रहणं किमर्थम् । अनेकमन्यार्थ इतीयत्युच्यमाने वाक्यार्थेऽपि बहुव्रीहिः स्यात् । यथा मे माता तथा मे पिता सुस्नातं भो इति । पदग्रहणे पुनः क्रियमाणे न दोषो भवति ॥ अथान्यग्रहणं किमर्थम् । अनेकं पदार्थ इतीयत्युच्यमाने स्वपदार्थेऽपि बहुव्रीहिः स्यात् । राजपुरुषः तक्षपुरुष इति । नैतदस्ति प्रयोजनम् । तत्पुरुषः स्वपदार्थे बाधको भविष्यति । भवेदेकसंज्ञाधिकारे सिद्धं परंकार्यत्वे तु न सिध्यति । आरम्भसामर्थ्याच्च तत्पुरुषः परंकार्यत्वाच्च बहुव्रीहिः प्राप्नोति ॥ परंकार्यत्वे च न दोषः । शेष इति वर्ततेऽशेषत्वान्न भविष्यति ।

**शेषवचन उक्तम् ॥ १ ॥**

किमुक्तम् । तत्र शेषवचनाद्दोषः संख्यासमानाधिकरणनञ्समासेषु बहु-

---

(सू.२४) अन्यपदार्थे येथें पदशब्द घातला आहे तो कशाकरितां ?

जर येथें 'अनेकमन्यार्थे' एवढेंच म्हटलें तर वाक्याच्या अर्थीही अनेक सुबन्तांचा बहुव्रीहि होऊं लागेल; जसें— यथा मे माता तथा पिता सुस्नातं भोः; आणि पदशब्द घातला तर मात्र हा दोष येत नाहीं.

आतां अन्य हा शब्द कशाकरितां घातला आहे ?

'अनेकं पदार्थे' एवढेंच म्हटलें तर स्वपदार्थींही बहुव्रीहि होऊं लागेल; जसें— राजपुरुषः, तक्षपुरुषः.

स्वपदार्थीं बहुव्रीहि न होण्याकरितां अन्यशब्द घालावयास नको. कारण स्वपदार्थीं बहुव्रीहीचा बाध करून तत्पुरुषसमास होईल.

'आ कडारादेका संज्ञा' (१।४।१) असा पाठ घेतला असतां हें साधेल.

पण'आ कडारात्परं कार्यम्'असा पाठ घेतला असतां साधत नाहीं. म्हणजे या पक्षीं आकडाराधिकारामध्यें पुढें असलेलें कार्य करावें, एवढेंच सांगितलें असल्यामुळें स्वपदार्थीं बहुव्रीहिसमास प्राप्त होतो, आणि अनवकाश असल्यामुळें तत्पुरुषही प्राप्त होत आहे.

'आकडाराधिकारामध्यें पुढील कार्य करावयाचें' या पक्षींही हा दोष येत नाहीं. कारण 'अनेकमन्य०' (२।२।२४) येथें शेषपदाची अनुवृत्ति आहे. तेव्हां स्वपदार्थ हा शेष नसल्यामुळें बहुव्रीहिसमास होणार नाहीं.

(वा.१) शेषो बहुव्रीहिः येथील शेषशब्दाविषयीं सांगितलेंच आहे.

तें काय सांगितलें आहे ?

तत्र शेष०(१।१।४,वा.१९) येथें शेषग्रहण केलें असल्यामुळें संख्यावाचकाचा नदीवाचकाशीं समास, समानाधिकरणसमास व नञ्समास या ठिकाणीं बहुव्रीहिसमास होणार नाहीं. म्हणून शेषशब्द सूत्रांतून काढून टाकण्यांत यावा. अर्थात् स्वपदार्थीं बहुव्रीहीच्या

---

१. अन्यपदाच्या अर्थीं विद्यमान जीं अनेक सुबन्तें त्यांचा विकल्पेंकरून बहुव्रीहिसमास होतो; उदा० चित्रा गावो यस्य स चित्रगुः, शबलगुः.

२. तुझे वडील स्वभावानें कसे आहेत या प्रश्नाचें उत्तर 'यथा मे माता' असें दिलें असतां तेथें 'तथा मे पिता' या वाक्याच्या अर्थीं विद्यमान अशा यथा, मे, माता, या अनेक सुबन्तांचा बहुव्रीहि होऊं लागेल. तसेंच 'स्नान कर' असें एखाद्याला म्हटलें असतां त्याचें उत्तर 'यथा मे माता तथा पिता' असें दिलें. त्याचा अर्थ माझे आईप्रमाणें बापही कुलशीलसंपन्न आहे. हीं उत्तरांतील अनेक पदें 'मी सदा स्नान केलेलाच आहें' या वाक्याच्या अर्थीं आहेत. तेव्हां त्यांचा बहुव्रीहि समास होऊं लागेल.

३. राजा चासौ पुरुषश्च असा याचा विग्रह समजावा.

४. समानाधिकरणतत्पुरुष हा स्वपदार्थीं होणारा पूर्वीं (२।१।४९-७२) सांगितला असल्यामुळें त्याला शेष म्हणतां येत नाहीं असा अभिप्राय आहे.

व्रीहिप्रतिषेध इति ॥ अथैकसंज्ञाधिकारे नार्थोऽन्यग्रहणेन । एकसंज्ञाधिकारे च कर्तव्यम् । अक्रियमाणे ह्यन्यग्रहणे यथैव तत्पुरुषः स्वपदार्थे बहुव्रीहिं बाधत एवमन्यपदार्थेऽपि बाधेत ॥

अथानेकग्रहणं किमर्थम् । अन्यपदार्थे इतीयत्युच्यमान एकस्यापि पदस्य बहुव्रीहिः स्यात् । सर्पिषोऽपि स्यात् । मधुनोऽपि स्यात् । गोमूत्रस्यापि स्यात् । नैतदस्ति प्रयोजनम् । सुप्सुपेति वर्तते ॥ इदं तर्हि प्रयोजनं बहूनामपि समासो यथा स्यात् ।

सुसूक्ष्मजटकेशेन सुनताजिनवाससा ॥

उत्तरार्थं चानेकग्रहणं कर्तव्यम् । चार्थे द्वन्द्वः [२.२.२९] अनेकमिति । इहापि यथा स्यात् । प्लक्षन्यग्रोधखदिरपलाशा इति । एतदपि नास्ति प्रयोजनम् । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति बहूना-

निवृत्तीसाठीं प्रकृत सूत्रामध्यें अन्यशब्द घातला पाहिजे.

आतां एका संज्ञा असा पाठ घेतला त्या वेळीं सूत्रामध्यें अन्यशब्द घालण्याचा कांहीं उपयोग नाहीं ना ?

एका संज्ञा असा पाठ घेतला त्या वेळींही अन्यशब्द सूत्रांत घातला पाहिजे. न घातला तर ज्याप्रमाणें तत्पुरुष हा स्वपदार्थी प्राप्त झालेल्या बहुव्रीहीचा बाध करतो त्याप्रमाणें अन्यपदार्थी प्राप्त झालेल्या बहुव्रीहीचाही बाध करील.[5]

आतां अनेकम् हा जो शब्द घातला आहे तो कशाकरितां ?

अन्यपदाच्या अर्थी विद्यमान अशा शब्दाला बहुव्रीहिसंज्ञा होते, एवढेंच म्हटलें तर एकाही पदाचा बहुव्रीहि होऊं लागेल; जसें— सर्पिषोऽपि[6] स्यात्, गोमूत्रस्यापि स्यात्.

अनेक हा शब्द घालण्याचें हें प्रयोजन होत नाहीं. कारण प्रथमान्त सुप्शब्द व तृतीयान्त 'सुपा' हा शब्द यांची येथें अनुवृत्ति आहे.

तर बहुत पदांचाही बहुव्रीहि व्हावा हें अनेकम् या शब्दाचें प्रयोजन समजावें; जसें— सुष्ठु सूक्ष्मा जटाः केशा यस्य स सुसूक्ष्मजटकेशः, सुनताजिनवासाः.[7]

शिवाय 'चार्थे द्वंद्वः' या पुढील सूत्रांत अनुवृत्ति होण्यासाठींही प्रकृत सूत्रामध्यें अनेकम् हा शब्द घातला पाहिजे. कारण प्लक्षश्च न्यग्रोधश्च धवश्च खदिरश्च पलाशश्च प्लक्षन्यग्रोधधवखदिरपलाशाः असा अनेकपदांचाही द्वंद्व झाला पाहिजे.

बहुत पदांचा समास होणें हेंही अनेकशब्द घालण्याचें प्रयोजन होत नाहीं. कारण 'तद्धितार्थोत्तरपद०'(२।१।५१)या सूत्रानें उत्तरपद पुढें

५. समानाधिकरणतत्पुरुष हा अनवकाश असल्यामुळें स्वपदार्थावर किंवा अन्यपदार्थावर अवलंबून कोणत्याही प्रकारें येणाऱ्या बहुव्रीहीचा बाध करील. कण्ठेकालः येथें बहुव्रीहीला चारितार्थ्य आहे.

६. ज्या ठिकाणीं भोजनामध्यें अत्यंत थोडें तूप वाढण्यांत येतें तेथें थट्टेकरितां 'सर्पिषोऽपि स्यात्' हें वाक्य उच्चारिलें जातें. तुपाचा एखादा बिंदु असेल असा त्या वाक्याचा अर्थ फलित होतो. येथें अपि हा शब्द बिंदु या अन्यपदार्थी आहे म्हणून त्याला बहुव्रीहिसंज्ञा होईल. किंवा स्यात् हा शब्द बिंदु या अन्यपदार्थी आहे म्हणून त्याला बहुव्रीहिसंज्ञा होईल. त्यामुळें समासान्त कप्प्रत्यय (५।४।१५४) होऊं लागेल.

७. सुष्ठु सूक्ष्माः सुसूक्ष्माः, सुसूक्ष्माश्च ते जटाश्च सुसूक्ष्मजटाः असे दोन कर्मधारय करून नंतर सुसूक्ष्मजटाः केशा यस्य असा द्विपदबहुव्रीहि केला तर बहुव्रीहीमध्यें सुशब्दाच्या पुढील उत्तरपदाला 'नञ्सुभ्याम्' (६।२।१७२) यानें सांगितलेला अन्तोदान्त स्वर येथें होणार नाहीं. आतां सूक्ष्माश्च ते जटाश्च सूक्ष्मजटाः, सूक्ष्मजटाश्च ते केशाश्च सूक्ष्मजटकेशाः, असे पुढील दोन कर्मधारय करून नंतर सुष्ठु सूक्ष्मजटकेशा यस्य असा द्विपदबहुव्रीहि केला तर पूर्वी सांगितलेला स्वर साधेल, पण

मपि समासो भवतीति यदयमुत्तरपदे द्विगुं शास्ति। तत्पुरुषोऽपि तर्हि बहूनां प्राप्नोति। ग्रहणेन तत्पुरुष उच्यते तेन बहूनां न भविष्यति॥ अत उत्तरं पठति।

**अनेकवचनमुपसर्जनार्थम् ॥ २ ॥**

अनेकग्रहणं क्रियत उपसर्जनार्थम्। प्रथमानिर्दिष्टं समास उपसर्जनम् [१.२.४३] इत्यनेकस्य सुप उपसर्जनसंज्ञा यथा स्यात्। चित्रगुः शबलगुरिति॥

**न वैकविभक्तित्वात् ॥ ३ ॥**

न वैतदपि प्रयोजनमस्ति। किं कारणम्। एकविभक्तित्वात्। एकविभक्ति चापूर्वनिपाते [४४] इत्युपसर्जनसंज्ञा भविष्यति। चित्रगुः शबलगुरिति। चित्रा यस्य गावश्चित्रगुस्तिष्ठति। चित्रा यस्य गावश्चित्रगुं पश्य। चित्रा यस्य गावश्चित्रगुणा कृतम्। चित्रा यस्य गावश्चित्रगवे देहि। चित्रा यस्य गावश्चित्रगोरानय। चित्रा यस्य गावश्चित्रगोः स्वम्। चित्रा यस्य गावश्चित्रगौ निधेहि। चित्रा यस्य गावो हे चित्रगो इति॥ यदि तर्हि यतः कुतश्चिदेव किंचित्पदमध्याहृत्यैकविभक्त्या योगः क्रियत एतदप्येकविभक्तियुक्तं भवतीहापि प्राप्नोति।

---

असतांना द्विगुसमासाचें आचार्यांनीं जें विधान केलें त्यावरून त्यांनीं बहुत पदांचाही समास होतो असें सुचविलें आहे.

असें आहे तर तत्पुरुषसमासही बहुत पदांचा होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण विशेषरूपानें पूर्वोत्तरपदांचा निर्देश करून तत्पुरुषाचें विधान केलें आहे म्हणून बहुत पदांचा तत्पुरुष होणार नाहीं. हें मनांत घेऊन वार्तिककार म्हणतात—

(वा.२) अनेक हा शब्द सूत्रामध्यें घातला आहे तो बहुव्रीहींतील सर्वपदांना 'प्रथमानिर्दिष्टम्०' (१।२।४३) यानें उपसर्जनसंज्ञा व्हावी म्हणून घातला आहे; उदा० चित्रगुः, शबलगुः.

(वा.३) हेंही अनेकम् या शब्दाचें प्रयोजन होत नाहीं.

काय कारण ?

बहुव्रीहीच्या पोटांतील प्रत्येक शब्दाच्या पुढें नियत प्रथमाविभक्तिच असल्यामुळें 'एकविभक्ति च' (१।२।४४) यानें बहुव्रीहींतील सर्व पदांना उपसर्जनसंज्ञा होईल. चित्रा यस्य गावश्चित्रगुस्तिष्ठति, चित्रा यस्य गावश्चित्रगुं पश्य, चित्रा यस्य गावश्चित्रगुणा कृतम्, चित्रा यस्य गावश्चित्रगवे देहि, चित्रा यस्य गावश्चित्रगोरानय, चित्रा यस्य गावचित्रगोः स्वम्, चित्रा यस्य गावश्चित्रगौ निधेहि, चित्रा यस्य गावो हे चित्रगो, अशा रीतीनें चित्रगु या सामासिक शब्दाला अनेक विभक्ति लागल्या तरी आंतील गोशब्दाची प्रथमा सर्वत्र कायमच आहे.

पण असें जर कांहीं तरी पदाचा अध्याहार करून कोणापेक्षां तरी असलेलें नियतविभक्तित्व उपसर्जनसंज्ञेच्या उपयोगीं पडत असेल तर राजकुमारी, तक्षकुमारी, या षष्ठीसमासा-

---

सुशब्दार्थसौष्ठवाचा अन्वय सूक्ष्म पदार्थांवर होऊं शकत नाहीं. तेव्हां या दोन्ही गोष्टी साधण्याकरितां बहुत पदांचा बहुव्रीहि स्वीकारल्यावांचून दुसरी तोड नाहीं.

८. बहुव्रीहींतील सर्व पदें सूत्रांतील अनेकम् या प्रथमान्तपदानें घेतां येतात म्हणून सर्व पदांना उपसर्जनसंज्ञा होते; त्यामुळें गो यालाही ती संज्ञा झाल्यामुळे ह्रस्व (१।२।४८) होतो.

९. जसें चित्रगु या बहुव्रीहीमध्यें यस्य सन्ति हीं पदें अध्याहृत घेऊन गो हें पद नियतविभक्तिकच आहे असें दाखविलें आणि तेंही समासांतील इतर पदांपेक्षां न दाखवितां सामासिक शब्दापेक्षां दाखविलें तसें राजकुमारी या तत्पुरुषामध्येंही या अस्ति हीं पदें अध्याहृत घेऊन कुमारी हें पद राजकुमारी या सामासिक शब्दापेक्षां नियतविभक्तिक आहे असें दाखवितां येईल.

राजकुमारी तक्षकुमारी। राज्ञो या कुमारी राजकुमारी तिष्ठति। राज्ञो या कुमारी राजकुमारीं पश्य। राज्ञो या कुमारी राजकुमार्या कृतम्। राज्ञो या कुमारी राजकुमार्यै देहि। राज्ञो या कुमारी राजकुमार्या आनय। राज्ञो या कुमारी राजकुमार्याः स्वम्। राज्ञो या कुमारी राजकुमार्यां निधेहि। राज्ञो या कुमारी हे राजकुमारि इति॥ एकविभक्तियुक्तमेव यन्नित्यं न चैतन्नित्यमेकविभक्तियुक्तमेव। राज्ञः कुमारीं पश्य राजकुमारीं पश्येत्यपि भवति। किं वक्तव्यमेतत्। न हि। कथमनुच्यमानं गंस्यते। एकग्रहणसामर्थ्यात्। यदि हि यदेकविभक्तियुक्तं चानेकविभक्तियुक्तं च तत्र स्यादेकग्रहणमनर्थकं स्यात्। विभक्तियुक्तं चापूर्वनिपात इत्येव ब्रूयात्॥

पदार्थाभिधानेऽनुप्रयोगानुपपत्तिरभिहितत्वात्॥ ४॥

पदार्थस्याभिधाने ऽनुप्रयोगस्यानुपपत्तिः। चित्रगुर्देवदत्त इति। किं कारणम्। अभिहितत्वात्। चित्रगुशब्देनाभिहितः सोऽर्थ इति कृत्वानुप्रयोगो न प्राप्नोति॥

---

मध्येंही राज्ञो या कुमारी राजकुमारी तिष्ठति, राज्ञो या कमारी राजकुमारीं पश्य, राज्ञो या कुमारी राजकुमार्या कृतम्, राज्ञो या कुमारी राजकुमार्यै देहि राज्ञो या कुमारी राजकुमार्या आनय, राज्ञो या कुमारी राजकुमार्याः स्वम्, राज्ञो या कुमारी राजकुमार्यां निधेहि, राज्ञो या कुमारी हे राजकुमारि, अशा रीतीनें राजकुमारी या सामासिक शब्दाला अनेक विभक्ति लागल्या तरी आंतील कुमारी हें पद नियतविभक्तिक आहे असें म्हणावें लागेल.

जें विग्रहामध्यें नेहमीं एकाच विभक्तीनें युक्त असतें तें एकविभक्तिक होय. राजकुमारी या समासाच्या विग्रहामध्यें कुमारी हें पद नेहमीं एकाच विभक्तीनें युक्त असूं शकत नाहीं. कारण राज्ञः कुमारीं पश्य, राजकुमारीं पश्य, असेंही होतें.

पण जें नेहमीं एकाच विभक्तीनें युक्त असतें तेंच एकविभक्तिक होय असें अपूर्व वचन केलें पाहिजे कीं काय ?

तसें वचन करावयास नको.

तर मग सांगितल्यावांचून अमुकच एक नियतविभक्तिक हें कशावरून बरें समजावें ?

'एकविभक्ति चा०' (१।२।४४) येथें एक शब्द घातला आहे त्यावरून. जर जे एका विभक्तीनें युक्त, आणि जे पाळीपाळीनें अनेक विभक्तींनीं युक्त त्यालाही उपसर्जनसंज्ञा होईल तर एकशब्द घालण्यांत काय अर्थ आहे ? तर 'विभक्तियुक्तमपूर्वनिपाते'[११] असेंच सूत्र केलें असतें.

(वा.४) पदार्थं दाखविण्याविषयीं अनुप्रयोग करण्यांत येतो तो करतां येणार नाहीं; जसें—, चित्रगुर्देवदत्तः.

काय कारण ?

देवदत्त या अनुप्रयोगानें जो अर्थ दाखविला जातो तो अर्थ चित्रगुः या बहुव्रीहीनेंच दाखविला गेला आहे, म्हणून त्याचा पुनः

---

१०. यालाच परिनिष्ठित विभक्तीनें विग्रह असें म्हणतात. म्हणजे सामासिक शब्दाहून जी विभक्ति पुढें होणारी असेल तीच विभक्ति पूर्वपदार्थाला प्राधान्य असेल तर पूर्वपदाहून आणि उत्तरपदार्थाला प्राधान्य असेल तर उत्तरपदाहून आणि उभयपदार्थांना प्राधान्य असेल तर दोन्ही पदांहून विग्रहामध्यें होते. अन्य पदार्थाला प्राधान्य असेल तर तेथें मात्र विग्रहामध्यें तीच विभक्ति होत नाहीं.

११. विभक्तियुक्तम् हें सुद्धां संज्ञेचें उद्देश्य दाखविण्याकरितांच करावें लागत आहे. 'अपूर्वनिपाते' एवढेंच म्हटलें तर उपसर्जनसंज्ञा कोणाला करावयाची तें कळून येणार नाहीं.

**न वानभिहितत्वात् ॥ ५ ॥**

न वैष दोषः । किं कारणम् । अनभिहितत्वात् । चित्रगुशब्देनानाभिहितः सोऽर्थ इति कृत्वानुप्रयोगो भविष्यति ॥ कथमनभिहितो यावतेदानीमेवोक्तं पदार्थाभिधानेऽनुप्रयोगानुपपत्तिरभिहितत्वादिति ।

**सामान्याभिधाने हि विशेषानभिधानम् ॥ ६ ॥**

सामान्ये ह्यभिधीयमाने विशेषोऽनभिहितो भवति । तत्रावश्यं विशेषार्थिना विशेषोऽनुप्रयोक्तव्यः । चित्रगुः । कः । देवदत्त इति ॥ भवेत्सिद्धं यदा सामान्ये वृत्तिर्यदा तु खलु विशेषे वृत्तिस्तदा न सिध्यति । चित्रा गावो देवदत्तस्य चित्रगुर्देवदत्त इति । तदापि सिद्धम् । कथम् । नेदमुभयं युगपद्भवति वाक्यं च समासश्च । यदा वाक्यं न तदा समासः । यदा समासो न तदा वाक्यम् । यदा समासस्तदा सामान्ये वृत्तिः । तत्रावश्यं विशेषार्थिना विशेषोऽनुप्रयोक्तव्यः । चित्रगुः । कः । देवदत्त इति ॥ सामान्यस्यैव तर्ह्यनुप्रयोगो न प्राप्नोति । चित्रगु तत् । चित्रगु किंचित् । चित्रगु सर्वमिति ।

---

प्रयोग होणार नाहीं.

(वा.५) हा दोष येत नाहीं.

काय कारण ?

अनुप्रयोगानें जो अर्थ दाखविला जातो तो अर्थ चित्रगुः या बहुव्रीहीनें दाखविला जात नाहीं म्हणून अनुप्रयोग होईल.

अनुप्रयोगानें दाखविलेला अर्थ चित्रगुः या बहुव्रीहीनें दाखविला जात नाहीं असें कसें बरें म्हणतां येईल? कारण 'अनुप्रयोगानें दाखविलेला अर्थ चित्रगुः यानें दाखविला गेला असल्यामुळें अनुप्रयोग करितां येणार नाहीं' असें आतांच म्हटलें आहे ना ?

(वा.६)सामान्यरूपानें अर्थ दाखविला असतां तेथें विशेषरूपानें तो अर्थ दाखविला जात नाहीं, म्हणून विशेषरूपानें अर्थ दाखविण्याची इच्छा करणाऱ्यानें विशेष अर्थाचा अनुप्रयोग खुशाल करावा; जसें चित्रगुः या बहुव्रीहीनें दाखविलेला अन्य पदार्थ तो कोणता, असें विचारलें असतां तेथें देवदत्त या विशेषशब्दाचा अनुप्रयोग करतां येतो. जेव्हां चित्रा गावो यस्य अशा मोघम स्वरूपांत अन्य पदार्थ दाखविण्याच्या इच्छेनें बहुव्रीहिसमास केला तेव्हां तोच अन्यपदार्थ अमुक असा विशेषस्वरूपांत दाखविण्याकरितां देवदत्तशब्दाचा अनुप्रयोग होईल. पण जेव्हां चित्रा गावो यस्य देवदत्तस्य अशा विशेषस्वरूपांतच अन्य पदार्थ दाखविण्याच्या इच्छेनें बहुव्रीहिसमास केला तेव्हां अनुप्रयोग होणार नाहीं.

तेव्हांही अनुप्रयोग करतां येतो.

तो कसा ?

समास आणि त्याचें विग्रहवाक्य या उभयतांचा एका वेळीं प्रयोग करणें संभवत नाहीं. जेव्हां वाक्याचा प्रयोग केला तेव्हां समासाचा प्रयोग करावयाचा नाहीं, आणि जेव्हां समासाचा प्रयोग केला त्या वेळीं विग्रहवाक्य प्रयोगांत आणावयाचें नाहीं. बरें, समासाचा तर असा स्वभाव आहे की तो मोघम स्वरूपांतच नेहमीं अन्य पदार्थ दाखवितो. तेव्हां सामान्यस्वरूपांत दाखविलेला अन्य पदार्थ विशेष स्वरूपांत दाखविण्याची इच्छा करणाऱ्यानें जरूर विशेषशब्दाचा अनुप्रयोग करावा; जसें– चित्रगु कोण ? तर देवदत्त होय.

तर मग समासानें अन्य पदार्थ हा सामान्यस्वरूपांत दाखविला असल्यामुळें सामान्यशब्दाचा प्रयोग करतां येणार नाहीं; जसें– चित्रगु कोण ? असें विचारलें असतां चित्रगु तत्, चित्रगु किंचित्, चित्रगु सर्वम्, असें

सामान्यमपि यथा विशेषस्तद्वत्। चित्रगवित्युक्ते संदेहः स्यात्सर्वं वाविश्वं वेति। तत्रावश्यं संदेहनिवृत्त्यर्थं विशेषार्थिना विशेषोऽनुप्रयोक्तव्यः ॥

अथवा विभक्त्यर्थोऽभिधीयते। एतच्चात्र युक्तं यद्विभक्त्यर्थोऽभिधीयते तत्र हि सर्वपश्चात्पदं वर्ततेऽस्येति।

**विभक्त्यर्थाभिधानेऽद्रव्यस्य लिङ्गसंख्योपचारानुपपत्तिः ॥ ७ ॥**

विभक्त्यर्थाभिधानेऽद्रव्यस्य लिङ्गसंख्याभ्यामुपचारोऽनुपपन्नः। बहुयवम् बहुयवा बहुयवः बहुयवौ बहुयवा इति॥

अपर आह। विभक्त्यर्थाभिधाने द्रव्यस्य लिङ्गसंख्योपचारानुपपत्तिः। विभक्त्यर्थाभिधाने द्रव्यस्य ये लिङ्गसंख्ये ताभ्यां विभक्त्यर्थस्योपचारोऽनुपपन्नः। बहुयवम् बहुयवा बहुयवः बहुयवौ बहुयवा इति। कथं ह्यन्यस्य लिङ्गसंख्याभ्यामन्यस्योपचारः स्यात्॥

**सिद्धं तु यथा गुणवचनेषु ॥ ८ ॥**

सिद्धमेतत्। कथम्। यथा गुणवचनेषु। गुणवचनेषूक्तं गुणवचनानां शब्दानामाश्रयतो लिङ्गवचनानि भवन्तीति। तद्यथा। शुक्लं वस्त्रम् शुक्ला शाटी शुक्लः

---

उत्तर दिलें जातें. येथें तत्, किंचित् आणि सर्व या सामान्यशब्दांचा अनुप्रयोग केला आहे.

ज्याप्रमाणें एक विशेष दुसऱ्या विशेषाची निवृत्ति करतो त्याप्रमाणें सामान्यही विशेषाची निवृत्ति करीत असल्यामुळें तेंही एक विशेषासारखेंच आहे. तेव्हां चित्रगु असें उच्चारलें असतां प्रकृत सर्वच चित्रगु घ्यावयाचे किंवा त्यांपैकीं एखादा, असा संशय येतो; तेथें चित्रगुशब्दानें एखादाच न घेतां सर्वच घ्यावयाचे असा विशेष कळविण्याची इच्छा असणाऱ्यानें जरूर तसा अनुप्रयोग करावा.

किंवा समासानें विभक्त्यर्थसंबंधाचेंच मुख्यत्वानें प्रतिपादन केलें जातें.[12]

शिवाय हें म्हणणें योग्यच आहे. कारण समासाचा अर्थ दाखविणाऱ्या विग्रहवाक्यामध्यें सर्वांच्या मागून 'अस्य' हें पद उच्चारलें जातें.[13]

(वा.७) बहुव्रीहीनें विभक्त्यर्थरूपसंबंधाचें प्रतिपादन केलें जातें असें म्हटलें तर तो विभक्त्यर्थरूपसंबंध असत्त्वभूत असल्यामुळें त्याचा लिंग आणि संख्या यांच्याशीं योग जुळून येत नाहीं; जसें:— बहुयवं, बहुयवा, बहुयवः, बहुयवौ, बहुयवाः.

अन्य कोणी एक वैयाकरण[14] म्हणतो की बहुव्रीहीनें विभक्त्यर्थरूपसंबंधाचें प्रतिपादन केलें जातें असें म्हटलें तर द्रव्याचा जो लिंग व संख्या यांच्याशीं योग होत असतो तो जुळून येत नाहीं; जसें:— बहुयवम्, बहुयवा, बहुयवः, बहुयवौ, बहुयवाः. कारण एकाच्या लिंगाचा आणि संख्येचा दुसऱ्याशीं कसा बरें संबंध होईल?

(वा.८) हें सिद्ध होत आहे.

तें कसें?

गुणवाचक शब्दांविषयीं जसें, तसें.

गुणवाचक शब्दांविषयीं कसें?

गुणवाचक शब्दांना त्या गुणाच्या आश्रयामुळें लिंगवचनें प्राप्त होतात असें म्हटलें आहे (२।२।६, भाष्य, पृ.३१८, पं.१३); जसें:— शुक्लं वस्त्रम्, शुक्ला शाटी, शुक्लः कम्बलः, शुक्लौ कम्बलौ, शुक्लाः कम्बलाः. येथें शुक्ल हा

---

१२. संबंधी दाखविण्याकरितां देवदत्त वगैरे शब्दांचा प्रयोग होण्याला कांहींच हरकत नाहीं.

१३. अन्य पदाच्या अर्थीं बहुव्रीहिसमास सांगितला आहे तें अन्यपद चित्राः गावः अस्य असें अस्य अस्मिन् वगैरे वाक्यामध्यें शेवटीं योजलें जातें, त्या पदामध्यें प्रत्ययाच्या अर्थाला प्राधान्य आहे. तेव्हां बहुव्रीहीमध्येंही त्यालाच प्राधान्य असणें हें योग्यच आहे.

१४. हा वैयाकरण वार्तिकामध्यें अद्रव्यस्य असा पदच्छेद न करतां द्रव्यस्य असाच करीत आहे.

कम्बलः शुक्लौ कम्बलौ शुक्लाः कम्बला इति। यदसौ द्रव्यं श्रितो भवति गुणस्तस्य यल्लिङ्गं वचनं च तद्गुणस्यापि भवति। एवमिहापि यदसौ द्रव्यं श्रितो भवति विभक्त्यर्थस्तस्य यल्लिङ्गं वचनं च तत्समासस्यापि भविष्यति ॥

यदि तर्हि विभक्त्यर्थोऽभिधीयते कृत्स्नः पदार्थः कथमभिहितो भवति सद्रव्यः सलिङ्गः ससंख्यश्च। अर्थग्रहणसामर्थ्यात्। इहानेकमन्यपद इतीयता सिद्धम्। कथं पुनः पदे नाम वृत्तिः स्यात्। शब्दो ह्येष शब्देऽसंभवादर्थे कार्यं विज्ञास्यते। सोऽयमेवं सिद्धे सति यदर्थग्रहणं करोति तस्यैतत्प्रयोजनं कृत्स्नः पदार्थो यथाभिधीयेत सद्रव्यः सलिङ्गः ससंख्यश्चेति॥ यदि तर्हि कृत्स्नः पदार्थोऽभिधीयते लैङ्गाः सांख्याश्च विधयो न सिध्यन्ति।

उक्तं वा ॥ ९ ॥

किमुक्तम्। लैङ्गेषु तावदुक्तं सिद्धं तु स्त्रियाः प्रातिपदिकविशेषणत्वात्स्वार्थे टाबादय इति। सांख्येष्वप्युक्तं कर्मादीनामनुक्ता एकत्वादय इति कृत्वा सांख्या भविष्यन्ति ॥ प्रथमा तर्हि न

---

गुण ज्या द्रव्याचा आश्रय करीत आहे त्या द्रव्याचें जें लिंग आणि वचन तेंच गुणवाचकालाही लागू होतें. त्याप्रमाणें येथेंही विभक्त्यर्थसंबंध हा ज्या द्रव्याचा आश्रय करीत आहे त्या द्रव्याचें जें लिंग व वचन तें समासालाही लागू होईल.

जर बहुव्रीहीनें विभक्त्यर्थ जो संबंध तो दाखविला जात असेल तर त्या संबंधाचें संबंधी द्रव्य, लिंग आणि संख्या या सर्वांची जी त्या संबंधाबरोबर नेहमीं बहुव्रीहीपासून प्रतीति होत असते तिची वाट काय ?

येथें 'अनेकमन्यपदे' एवढेंच सूत्र करावें. बहुव्रीहीनें अन्य पद दाखविणें संभवत नसल्यामुळें[15] अन्यपदे यांतील पदशब्दाचा पदार्थ असा अर्थ अर्थातच समजला जाईल. असें असतां पुनः मुद्दाम जो अर्थशब्द घातला आहे त्याचे जोरावर द्रव्य, लिंग आणि संख्या यांनीं विशिष्ट असाच अन्यपदाचा अर्थ घ्यावयाचा. म्हणून तो नेहमीं लिंगसंख्याविशिष्टसंबंधीलाच दाखवितो.

जर बहुव्रीहीनें लिंग, संख्या, वगैरेनीं विशिष्ट असा संबंधी दाखविला जात आहे तर अन्यपदार्थावरील लिंग आणि संख्या हेही दाखविले गेले असल्यामुळें लिंगवाचक किंवा संख्यावाचक प्रत्यय बहुव्रीहीहून होणार नाहीं.

(वा.९) हें सांगितलेंच आहे.

तें काय सांगितलें आहे ?

लिंगबोधक कार्याविषयीं असें सांगितलें आहे की 'स्त्रियाम्' हें प्रातिपदिकाचें विशेषण असल्यामुळें टाप् वगैरे प्रत्यय स्वार्थी होतात (४।१।३, वा.५).

संख्यावाचक प्रत्ययाविषयींही सांगितलें आहे.

काय सांगितलें आहे ?

कर्म, करण, संप्रदान, वगैरेंची एकत्व वगैरे संख्या बहुव्रीहीनें दाखविली नसल्यामुळें[16] संख्यावाचक प्रत्यय होतील.

तर मग कर्म, करण, वगैरे अर्थ विवक्षित नसतील तेथें प्रथमाविभक्ति प्राप्त होऊं शकत नाहीं.[17]

---

१५. कारण चित्रविचित्र गाईंचा देवदत्त वगैरे पदार्थीं कांहींच संबंध सांगतां येत नाहीं.

१६. चित्रगु या बहुव्रीहीनें अन्यपदार्थाची संख्या दाखविली असली तरी तो अन्यपदार्थ बाह्य क्रियेमुळें कर्म, करण, वगैरे रूपानें जो भासतो तशा अन्यपदार्थाची संख्या दाखविण्याचें सामर्थ्य बहुव्रीहीमध्यें नाहीं.

१७. अन्यपदार्थ हा कर्म, करण, वगैरे रूपानें भासत नसेल तेथें प्रथमा होते. तेव्हां तेथें ती प्रथमाविभक्ति केवळ प्रातिपदिकाच्या अर्थांना

प्राप्नोति । समयाद्भविष्यति । यदि सामयिकी न नियोगतोऽन्याः कस्मान्न भवन्ति । कर्मादीनामभावात् ॥ षष्ठी तर्हि प्राप्नोति । शेषलक्षणा षष्ठ्यशेषत्वान्न भविष्यति ॥ एवमपि व्यतिकरः प्राप्नोति । एकस्मिन्नपि द्विवचनबहुवचने प्राप्नुतो द्वयोरप्येकवचनबहुवचने बहुष्वप्येकवचनद्विवचने । अर्थतो व्यवस्था भविष्यति ॥ अथवा संख्या नामेयं परप्रधाना । संख्येयमनया विशेष्यम् । यदि चात्र प्रथमा न स्यात्संख्येयमविशेषितं स्यात् ॥ अथवा वक्ष्यत्येतत्तत्र वचनग्रहणस्य प्रयोजनमुक्तेष्वप्येकत्वादिषु प्रथमा यथा स्यादिति ॥ एवमपि षष्ठी

'परश्च' या सूत्रानें केवळ प्रकृति किंवा केवळ प्रत्यय यांचा प्रयोग करूं नये (३।१।२, वा.११) असा नियम केला असल्यामुळें प्रथमा विभक्ति होईल.

जर केवळ प्रकृतीचा प्रयोग करूं नये हा कायदा संभाळण्याकरितांच विभक्ति करावयाची तर प्रथमाच करावी असें कां? द्वितीया वगैरे कां बरें करूं नयेत ?

ती ती विभक्ति होण्यास योग्य असे जे कर्म, करण, वगैरे अर्थ ते प्रकृत स्थलीं नाहींत म्हणून द्वितीयादि विभक्ति होत नाहींत.

तर मग षष्ठीविभक्ति प्राप्त होत आहे.

षष्ठी ही शेष अर्थावर अवलंबून होत असते. प्रातिपदिकार्थाचा प्रथमाविभक्तिविधानाकडे उपयोग केला असल्यामुळें प्रातिपदिकार्थाला शेषत्व नाहीं, म्हणून षष्ठी होणार नाहीं.

केवळ प्रकृतीचा प्रयोग करूं नये हा नियम संभाळण्याकरितां प्रथमाविभक्तिच करावयाची असें ठरलें तरी देखील वचनांचा व्यत्यास हा दोष येणारच. तो व्यत्यास असा : एकत्व या अर्थीही द्विवचन किंवा बहुवचन प्राप्त होतें, व द्वित्व या अर्थीही एकवचन किंवा बहुवचन प्राप्त होतें आणि बहुत्व या अर्थीही एकवचन किंवा द्विवचन प्राप्त होत आहे.

एकत्वादि अर्थाला अनुसरून एकवचनादिकांची व्यवस्था होईल.[१८]

अथवा, संख्या म्हणून जी आहे ती संख्येयप्रधान असते.[१९] म्हणजे या संख्येनें संख्येय इतके आहेत असा बोध करून द्यावयाचा असतो. तेव्हां जर येथें प्रथमाविभक्ति न होईल तर संख्येय इतके आहेत असें कांहींच कळून येणार नाहीं.

अथवा एकत्व, द्वित्व आणि बहुत्व हीं उक्त झालीं असलीं तरी देखील प्रथमाविभक्ति होते असें 'प्रातिपदिकार्थ०' (२।३।४६) या सूत्रावर त्याच सूत्रांतील वचनग्रहणाचें प्रयोजन सांगणार आहे.

---

वरील संख्या दाखविते. ती संख्या बहुव्रीहीनें दाखविली असल्यामुळें प्रथमा होणार नाहीं.

१८. एकत्वसंख्या असेल तेथें एकवचनच करणें योग्य होय; असेंच द्वित्व, बहुत्व यांविषयीं समजावें.

१९. बहुव्रीहीनें जरी प्रातिपदिकार्थाची संख्या उक्त आहे तरी कर्म, करण, वगैरेंची उक्त नाहीं. म्हणून द्वितीया, तृतीया, वगैरे होतील. आतां कर्म, करण, वगैरे अर्थ नसतील तेथें प्रत्यय पुढें केलाच पाहिजे या नियमामुळें प्रथमा होईल असें पूर्वी सांगितलें. आतां येथें त्या शंकेचें उत्तर निराळें देत आहेत. तें असें की बहुव्रीहीनें जी संख्या उक्त होते ती एक, दोन, वगैरे विशेषरूपानें उक्त होत नाहीं, सामान्यरूपानें उक्त होते; आणि विशेषरूपानें उक्त झाल्याशिवाय तिनें आपलें कर्तव्य बजाविलेंसें होत नाहीं. तेव्हां अर्थातच 'संख्येयपदार्थ अमुक' हें दाखविण्याकरितां प्रथमा होईल.

२०. एकः, द्वौ, बहवः, येथें त्या त्या प्रकृतीनेंच एकत्वादिक उक्त आहेत तरी देखील वचनग्रहणानें संख्या या अर्थीं प्रथमेचें विधान केल्याचे जोरावर 'उक्तार्थानामप्रयोगः' या न्यायाला मागें सारून वचनविपर्यास न करतांच तेथें प्रथमाविभक्ति करण्यांत येते. त्याप्रमाणें चित्रगुः येथेंही वचनग्रहणानें विपर्यास न करतांच प्रथमाविभक्ति होईल.

प्राप्नोति । किं कारणम् । व्यभिचरत्येव ह्ययं समासो लिङ्गसंख्ये षष्ठ्यर्थं पुनर्न व्यभिचरति । अभिहितः सोऽर्थोऽन्तर्भूतः प्रातिपदिकार्थः संपन्नस्तत्र प्रातिपदिकार्थे प्रथमेति प्रथमा भविष्यति ॥ न तर्हीदानीमिदं भवति चित्रगोर्देवदत्तस्येति । भवति बाह्यमर्थमपेक्ष्य षष्ठी ॥

परिगणनं कर्तव्यम् ।

**बहुव्रीहिः समानाधिकरणानाम् ॥१०**

समानाधिकरणानां बहुव्रीहिर्वक्तव्यः । किं प्रयोजनम् । व्यधिकरणानां मा भूदिति । पञ्चभिर्भुक्तमस्येति ॥

**अव्ययानां च ॥ ११ ॥**

अव्ययानां बहुव्रीहिर्वक्तव्यः । उच्चैर्मुखः नीचैर्मुखः ॥

**सप्तम्युपमानपूर्वपदस्योत्तरपदलोपश्च ॥१२॥**

सप्तमीपूर्वस्योपमानपूर्वस्य च बहुव्रीहिर्वक्तव्य उत्तरपदस्य च लोपो वक्तव्यः । कण्ठेस्थः कालोऽस्य कण्ठेकालः । उष्ट्रमुखमिव मुखमस्योष्ट्रमुखः । खरमुखः ॥

**समुदायविकारषष्ठ्याश्च ॥ १३ ॥**

समुदायषष्ठ्या विकारषष्ठ्याश्च बहु-

---

तरी देखील षष्ठी प्राप्त होत आहे.

काय कारण ?

कारण असें की चित्रगुः हा बहुव्रीहिसमास, पुंस्त्व वगैरे लिंग, व एकत्व वगैरे संख्या, या अर्थांना नियत दाखवूं शकत नाहीं, आणि षष्ठ्यर्थसंबंधाला केव्हांही कायम दाखवूं शकत आहे.[२१]

संबंध हा अर्थ समासानें अभिहित झाला असून समासाच्या अर्थामध्यें प्रविष्ट झाला असल्यामुळें तो आतां प्रातिपदिकार्थच बनला आहे. तेव्हां 'प्रातिपदिकार्थ०' (२।३।४६) या सूत्रानें प्रातिपदिकार्थी प्रथमाच होईल.

तर मग आतां चित्रगोर्देवदत्तस्य अशी षष्ठी होत नाहींच कीं काय ?

देवदत्त वगैरे अन्य पदार्थांचा जो गृह वगैरे बाह्यार्थाशीं संबंध त्याला दाखविणारी षष्ठी होण्यास कांहींच हरकत नाहीं.

बहुव्रीहिसमास कोणत्या कसल्या प्रकारच्या शब्दांचा होतो हें ठरवून ठेवावें.

(वा.१०) भिन्न भिन्न प्रवृत्तिनिमित्तानें एका अर्थाला दाखविणाऱ्या अशा सुबन्तांचा बहुव्रीहिसमास होतो असें वचन करावें; निरनिराळ्या प्रवृत्तिनिमित्तानें निरनिराळ्या अर्थाला दाखविणाऱ्या शब्दांचा बहुव्रीहि न व्हावा म्हणून; जसें— पञ्चभिर्भुक्तमस्य.

(वा.११) अव्ययांचाही बहुव्रीहिसमास होतो असें वचन करावें; जसें— उच्चैर्मुखमस्य उच्चैर्मुखः, नीचैर्मुखः.

(वा.१२) सप्तम्यन्त किंवा उपमान आहे पूर्वपद ज्यामध्यें अशा शब्दांचा दुसऱ्या शब्दाबरोबर बहुव्रीहिसमास होतो आणि पूर्वपदांतील उत्तरपदाचा लोप होतो असें वचन करावें; जसें— कण्ठेस्थः कालोऽस्य कण्ठेकालः, उष्ट्रमुखमिव मुखमस्य उष्ट्रमुखः, खरमुखः.

(वा.१३) अवयवावयविभावरूप संबंधाला किंवा प्रकृतिविकृतिभावरूप संबंधाला दाखविणाऱ्या षष्ठीच्या पुढें असलेला जो समुदायवाचक शब्द तदन्ताचा दुसऱ्या शब्दाबरोबर बहुव्रीहिसमास होतो, आणि समुदायवाचक व विकृतिवाचक शब्दाचा लोप होतो असें वचन

---

२१. चित्रगू स्त्रियौ असा अन्यपदार्थ विवक्षित असतां बहुव्रीहिसमासाच्या लिंगसंख्या बदलतात. पण तेथें षष्ठ्यर्थसंबंध बदलत नाहीं. तो आहे तोच कायम आहे. तेव्हां व्यभिचारी अशा अर्थावर अवलंबून असलेल्या प्रथमेपेक्षां अव्यभिचारी अशा संबंधावर अवलंबून असलेली षष्ठीच पुढें सरसावत आहे.

व्रीहिर्वक्तव्य उत्तरपदस्य च लोपो वक्तव्यः। केशानां समाहारश्चूडा अस्य केशचूडः। सुवर्णस्य विकारोऽलंकारोऽस्य सुवर्णालंकारः॥

प्रादिभ्यो धातुजस्य वा ॥१४॥

प्रादिभ्यो धातुजस्य बहुव्रीहिर्वक्तव्य उत्तरपदस्य च वा लोपो वक्तव्यः। प्रपतितपर्णः प्रपर्णः। प्रपतितपलाशः प्रपलाशः॥

नञोऽस्त्यर्थानाम् ॥१५॥

नञोऽस्त्यर्थानां बहुव्रीहिर्वक्तव्य उत्तरपदस्य च वा लोपो वक्तव्यः। अविद्यमानपुत्रः अपुत्रः। अविद्यमानभार्यः अभार्यः॥

तत्तर्हीदं बहु वक्तव्यम्।

न वानभिधानादसमानाधिकरणेषु संज्ञाभावः ॥१६॥

न वा वक्तव्यम्। असमानाधिकरणानां बहुव्रीहिः कस्मान्न भवति। पञ्चभिर्भुक्तमस्येति। अनभिधानात्॥ तच्चावश्यमनभिधानमाश्रयितव्यम्। क्रियमाणेऽपि वै परिगणने यत्राभिधानं नास्ति न भवति तत्र बहुव्रीहिः। तद्यथा। पञ्च भुक्तवन्तोऽस्येति॥

अथैतस्मिन्सत्यनभिधाने यदि वृत्तिपरिगणनं क्रियते वर्तिपरिगणनमपि कर्तव्यम्। तत्कथं कर्तव्यम्।

अर्थनियमे मत्वर्थग्रहणम् ॥१७॥

---

करावें; जसें— केशसमाहारश्चूडा अस्य केशचूडः, सुवर्णविकारोऽलंकारो यस्य सुवर्णालंकारः.

(वा.१४) प्र, परा, वगैरेंच्या पुढील धातुसाधित नामाचा दुसऱ्या शब्दाबरोबर बहुव्रीहिसमास होतो व धातुसाधित नामाचा विकल्पानें लोप होतो, असें वचन करावें; जसें:– प्रपतितानि पर्णानि यस्य प्रपर्णः, प्रपतितपर्णः; प्रपलाशः, प्रपतितपलाशः.

(वा.१५) नञाच्या पुढील अस्तित्वार्थक शब्दांचा शब्दान्तराबरोबर बहुव्रीहिसमास होतो आणि अस्तित्वार्थक शब्दाचा विकल्पानें लोप होतो असें वचन करावें; जसें:– अविद्यमानः पुत्रोऽस्य अपुत्रः, अविद्यमानपुत्रः; अविद्यमानभार्यः, अभार्यः.

तर मग अशीं पुष्कळशीं वचनें केलीं पाहिजेत.

(वा.१६) अशीं वचनें करावयास नकोत.

तर मग पञ्चभिर्भुक्तमस्य येथें निरनिराळ्या प्रवृत्तिनिमित्तानें निरनिराळ्या अर्थांना दाखविणाऱ्या शब्दांचा बहुव्रीहि कां बरें होत नाहीं?

त्या वाक्यापासून मनांत येणारा जो अर्थ त्याला पञ्चभुक्त हा बहुव्रीहि दाखवूं शकत नाहीं म्हणून तेथें बहुव्रीहि होत नाहीं. जो समास करून पाहिलें असतां ज्या अर्थाला दाखवूं शकत नाहीं त्या अर्थी तो समास होत नाहीं असें जरूर मानलें पाहिजे. अमुक एक प्रकारच्या शब्दांचा बहुव्रीहि होतो असें परिगणन ठरविलें तरी देखील जेथें अन्य पदार्थ दाखविला जात नाहीं तेथें बहुव्रीहि होत नाहीं असें मानलेंच पाहिजे; जसें:– पञ्च भुक्तवन्तोऽस्य वगैरे. येथें पञ्चभुक्तवान् या समासापासून शब्दशक्तिस्वभावामुळें अन्यपदार्थाचा बोध होत नाहीं, म्हणून येथें बहुव्रीहिसमास होत नाहीं.

आतां अनभिधानानें काम भागत असतांही जर साधारण लोकांना स्पष्ट कळण्यासाठीं शब्दाचें परिगणन केलें जात आहे तर ज्या अर्थी हा बहुव्रीहि इष्ट आहे त्या अर्थाचेंही परिगणन करावयास पाहिजे.

तें अर्थाचें परिगणन कशा प्रकारानें बरें करावें?

(वा.१७) बहुव्रीहीचा अर्थ नियमित ठरविण्याबद्दल मत्वर्थग्रहण करावें. म्हणजे मतुप्प्रत्ययाचा जो अर्थ, षष्ठ्यर्थ किंवा सप्तम्यर्थ,

अर्थनियमे मत्वर्थग्रहणं कर्तव्यम् । मत्वर्थे यः स बहुव्रीहिरिति वक्तव्यम् । इह मा भूत् । कष्टं श्रितमनेनेति ॥

**तथा चोत्तरस्य वचनार्थः ॥१८॥**

एवं च कृत्वोत्तरस्य योगस्य वचनार्थ उपपन्नो भवति । केचित्तावदाहुर्यद्वृत्तिसूत्र इति । संख्ययाव्ययासन्नादूराधिकसंख्याः संख्येये [२.२.२५] इति । अपर आह यद्वार्त्तिक इति ॥

**कर्मवचनेनाप्रथमायाः ॥१९॥**

कर्मवचनेनाप्रथमाया बहुव्रीहिर्वक्तव्यः । ऊढो रथोऽनेनोढरथोऽनड्वान् । उपहृतः पशू रुद्रायोपहृतपशू रुद्रः । उद्धृत ओदनः स्थाल्या उद्धृतौदना स्थाली ॥ यदि कर्मवचनेनेत्युच्यते कर्तृवचनेन कथम् । प्राप्तमुदकं ग्रामं प्राप्तोदको ग्रामः । आगता अतिथयो ग्राममागतातिथिर्ग्रामः ।

**कर्तृवचनेनापि ॥२०॥**

कर्तृवचनेनापीति वक्तव्यम् ॥ अप्रथमाया इति किमर्थम् । वृष्टे देवे गतः ॥ अथाप्रथमाया इत्युच्यमान इह कस्मान्न

---

त्याच अर्थाला दाखविणाऱ्या शब्दांचा बहुव्रीहि होतो, असें वचन करावें; कष्टं श्रितमनेन येथें बहुव्रीहि न व्हावा म्हणून.

(वा.१८) असें अर्थाचें परिगणन केलें असतां पुढील बोलण्याचा उपयोग होतो. येथें 'पुढील' याचा 'संख्याव्यया०' (२।२।२५) हें पुढील सूत्र[२२] असा कोणी अर्थ करतात.

दुसरे कोणी 'पुढील' याचा पुढील वार्तिक[२३] असा अर्थ समजतात.

(वा.१९) प्रथमाविभक्त्यन्ताचा अर्थ खेरीज करून सर्व अन्यपदार्थी कर्मवाचक प्रत्ययान्ताचा कर्मबोधक शब्दाबरोबर बहुव्रीहि समास होतो असें वचन करावें; जसें– ऊढो रथो येन् ऊढरथोऽनड्वान्, उपहृतः पशू रुद्राय उपहृतपशू रुद्रः, उद्धृतः ओदनः स्थाल्या उद्धृतौदना स्थाली. (जर मत्वर्थी बहुव्रीहीचें विधान केलें तरच हें वार्तिक संगतवार जुळून येत आहे. नाहीं तर 'अनेकमन्यपदार्थे' यानेंच सर्व उदाहरणें साधत असल्यामुळें या वचनाच्या उपक्रमाचा प्रसंगच येत नाहीं असें तात्पर्य.)

जर कर्मबोधक शब्दाबरोबर असें म्हटलें तर कर्तृवाचक शब्दाबरोबर कर्तृवाचक प्रत्यान्ताचा समास कसा बरें होईल? जसें:– प्राप्तं उदकं ग्रामं प्राप्तोदको ग्रामः, आगता अतिथयो ग्राममागतातिथिर्ग्रामः.

(वा.२०) प्रथमाविभक्त्यर्थ वगळून सर्व अन्यपदार्थी कर्तृबोधक शब्दाबरोबरही बहुव्रीहिसमास होतो, असें वचन करावें.

प्रथमाविभक्त्यर्थ वगळून असें म्हटलें तें कशाकरितां?

वृष्टे देवे गतः येथें गतः या प्रथमाविभक्त्यन्तार्थी वृष्टदेवः असा बहुव्रीहि न व्हावा म्हणून.

आतां प्रथमाविभक्त्यर्थ वगळून असें म्हटलें असतां वृष्टे देवे गतं पश्य येथें गतम् या द्वितीयान्तार्थी बहुव्रीहि कां बरें होत नाहीं?

येथें वृत्तिविषय शब्दाच्या बाहेरील पश्य या दर्शनक्रियेमुळें द्वितीया झाली आहे म्हणून ती बहिरंग आहे. तेव्हां तसली द्वितीया येथें

---

२२. मत्वर्थींच बहुव्रीहि होतो असें परिगणन केलें नाहीं तर 'संख्ययाऽव्यया०' या पुढील सूत्राच्या उदाहरणामध्यें संख्येय, संशय, इत्यादि अन्यपदार्थ घेऊन प्रकृत सूत्रानेंच बहुव्रीहि सिद्ध होत असल्यामुळें पुढील सूत्र व्यर्थ होईल.

२३. परिगणन केलें नाहीं तर येन, यस्मै, इत्यादि अन्यपदार्थ घेऊन ऊढरथः इत्यादि उदाहरणें प्रकृत सूत्रानेंच सिद्ध होत असल्यामुळें 'कर्मवचनेन०' वगैरे वार्तिकें व्यर्थ होतील.

भवति । वृष्टे देवे गतं पश्येति । बहिरङ्गात्राप्रथमा ॥

**सुबधिकारेऽस्तिक्षीरादिवचनम् ॥२१॥**

सुबधिकारेऽस्तिक्षीरादीनामुपसंख्यानं कर्तव्यम् । अस्तिक्षीरा ब्राह्मणी ॥ तत्तर्हि वक्तव्यम् ।

**न वाव्ययत्वात् ॥२२॥**

न वा वक्तव्यम् । किं कारणम् । अव्ययत्वात् । अव्ययमेषोऽस्तिशब्दो नैषोऽस्तेर्लट् । कथमव्ययत्वम् । उपसर्गविभक्तिस्वरप्रतिरूपकाश्च निपातसंज्ञा भवन्तीति निपातसंज्ञा निपातोऽव्ययमित्यव्ययसंज्ञा ॥

अथ किंसब्रह्मचारीति कोऽयं समासः। बहुव्रीहिरित्याह । कोऽस्य विग्रहः । के सब्रह्मचारिणोऽस्येति । यद्येवं कठ इति प्रतिवचनं नोपपद्यते । न ह्यन्यत्पृष्टेनान्यदाख्येयम् ॥ एवं तर्ह्येवं विग्रहः करिष्यते केषां सब्रह्मचारी किंसब्रह्मचारीति । प्रतिवचनं चैवं हि नोपपद्यते

घेतां येत नाहीं.

(वा.२१) या अनेक सुबन्तांच्या बहुव्रीहिप्रकरणामध्यें अस्तिक्षीर वगैरे शब्दांचें उपसंख्यान करावें. म्हणजे अन्यपदार्थी अस्तिक्षीर याला बहुव्रीहिसंज्ञा होते असें विधान करावें[24]; जसें:- अस्ति क्षीरमस्याः सा ब्राह्मणी अस्तिक्षीरा.

तर मग येथें तें उपसंख्यान केलें पाहिजे.

(वा.२२) उपसंख्यान करावयास नको.

काय कारण ?

येथील अस्ति हा शब्द अव्यय आहे. अस्-धातूच्या पुढें लट्प्रत्यय करून तयार केलेलें क्रियापद नव्हे.

अस्ति याला अव्ययसंज्ञा कशी बरें?

उपसर्ग, विभक्ति आणि स्वर यांच्यासारखे दिसणारे जे शब्द ते निपातसंज्ञक होतात (१।४।५७ गणसूत्र) या चादिगणपठित सूत्रानें विभक्तिप्रतिरूपक अस्तिशब्दाला निपातसंज्ञा होते व 'स्वरादिनिपात॰' (१।१।३७) यानें निपाताला अव्ययसंज्ञा होते.

आतां किंसब्रह्मचारी हा समास कोण ?

हा बहुव्रीहिसमास आहे असें म्हणतों.

हा समास कसा सोडवायाचा ?

के सब्रह्मचारिणोऽस्य असा. याचें सहाध्यायी कोण असा याचा अर्थ आहे.

जर असा विग्रह केला तर त्याचें कठः हें उत्तर जुळत नाहीं. कारण एक विचारलें असतां त्याचें दुसरेंच उत्तर देणें योग्य होत नाहीं[25].

असें आहे तर किंसब्रह्मचारी हा षष्ठीतत्पुरुषसमास केषां सब्रह्मचारी असा सोडविण्यांत येईल.

तरी पण कठः असें उत्तर जुळत नाहींच[26]. शिवाय स्वराविषयीं दोष येतो. किंसब्रह्मचारी असा 'समासस्य' (६।१।२२३) यानें अन्तोदात्त स्वर होऊं लागेल, आणि किंसब्रह्मचारी

२४. अस्ति हा शब्द केवळ तिङन्तच आहे असा या शंककाचा समज आहे.

२५. कठ म्हणजे कठशाखेचें अध्ययन करणारा. ज्याचे सहाध्यायी विचारले त्याला अनुलक्षून 'कठः' हें उत्तर दिलें आहे. तेव्हां प्रश्न सहाध्यायींविषयीं आणि उत्तर ज्याचे सहाध्यायी विचारले त्याविषयीं. असें होतें म्हणून हें उत्तर योग्य होत नाहीं. आतां सहाध्यायींना अनुलक्षूनच हें उत्तर दिलें आहे असें म्हणावें तर तेंही जुळत नाहीं. कारण सहाध्यायी अनेक आहेत आणि उत्तर कठः असें एकवचनी आहे.

२६. कठः हें सब्रह्मचारी याला अनुलक्षून म्हटलें असलें तर ज्यांचा सब्रह्मचारी त्यांच्याबद्दल प्रश्न आणि सब्रह्मचारीविषयीं उत्तर योग्य नाहीं. आतां ज्यांचा सब्रह्मचारी त्यांना अनुलक्षूनच कठः असें उत्तर दिलें आहे, असें म्हणावें तर कठानाम् असें षष्ठीविभक्तींत उत्तर पाहिजे, प्रथमाविभक्तींत जुळत नाहीं.

स्वरे च दोषो भवति । किंसब्रह्मचारी- त्येवं स्वरः प्रसज्येत किंसब्रह्मचारीति चेष्यते ॥ एवं तर्ह्येवं विग्रहः करिष्यते कः सब्रह्मचारी किंसब्रह्मचारीति । भवेत्प्रतिवचनमुपपन्नं स्वरे तु दोषो भवति ॥ एवं तर्ह्येवं विग्रहः करिष्यते कः सब्रह्मचारी तव किंसब्रह्मचारी त्वमिति ॥ अथवा पुनरस्त्वयमेव विग्रहः के सब्रह्मचारिणोऽस्येति । ननु चोक्तं कठ इति प्रतिवचनं नोपपद्यत इति । नैष दोषः । अग्नौकरवाणिन्यायेन भविष्यति । तद्यथा । कश्चित्कंचिदाह । अग्नौ करवाणीति । कुर्विति कर्तर्यनुज्ञाते कर्माप्यनुज्ञातं भवति । अपर आह । अग्नौ करिष्यत इति । क्रियतामिति कर्मण्यनुज्ञाते कर्ताप्यनुज्ञातो भवति । यथैव खल्वपि के सब्रह्मचारिणोऽस्येति कठा इत्युक्ते संबन्धादेतद्गम्यते नूनं सोऽपि कठ इत्येवं कठ इत्युक्ते संबन्धादेतद्गन्तव्यं स्यान्नूनं तेऽपि कठा इति ॥ न खल्वपि ते शक्याः समासेन प्रतिनिर्देष्टुम् । उपसर्जनं हि ते भवन्ति ॥

असा बहुव्रीहीचा आद्युदात्तस्वर तर इष्ट आहे.

असें आहे तर कः सब्रह्मचारी किंसब्रह्मचारी असा कर्मधारय समास सोडविण्यांत येईल.

तसा समास सोडविला तर कठः असें उत्तर बरोबर जुळेल, पण स्वराविषयीं दोष कायम राहणारच.

असें आहे तर कः सब्रह्मचारी तव, किंसब्रह्मचारी त्वम्, असा बहुव्रीहिसमास सोडविण्यांत येईल. म्हणजे कांहींच दोष येणार नाहीं. अथवा के सब्रह्मचारिणोऽस्य असाच समास सोडविला तरी हरकत नाहीं.

पण तसा समास सोडविला तर उत्तर जुळणार नाहीं असा दोष दिला आहे ना ?

हा दोष येत नाहीं. कारण अग्नौकरवाणि या न्यायानें उत्तर जुळतें; जसें:– कोणी एक कोणाला अग्नौ करवाणि अशी अग्नौकरण करण्याबद्दल परवानगी मागतो. तो त्याला कुरु म्हणून परवानगी देतो. येथें कुरु हा कर्तरि लोट्प्रत्यय असल्यामुळें कर्त्याला परवानगी दिली असतां अर्थात् कर्मालाही परमानगी दिलीशी होते. अथवा कोणी एक अग्नौ करिष्यते अशी परवानगी मागतो. त्याला क्रियताम् अशी परवानगी दिली. येथें कर्मणि लोट् प्रत्यय केला असल्यामुळें कर्माला परवानगी दिली असतां कर्त्यालाही अर्थात् परवानगी दिलीशी होते. तसेंच येथें समजावें. जसें:– या देवदत्ताचे सहाध्यायी कोण या प्रश्नाला कठाः असें उत्तर दिलें असतां त्यांचा सहाध्यायी देवदत्त हाही कठशाखेचाच आहे असें निश्चित समजलें जातें. तसें त्याच प्रश्नाचें कठः म्हणजे देवदत्त हा कठ आहे असें उत्तर दिलें असतांही अर्थात् याचे सहाध्यायीही कठशाखीयच होत असें त्या प्रश्नाचें उत्तर मिळतें. प्रश्न[२७] करतांना किंसब्रह्मचारी हा सामासिक शब्द वापरला असल्यामुळें आणि त्या शब्दांत ते सब्रह्मचारी अप्रधान असल्यामुळें उत्तर देतांना त्यांचा प्रतिनिर्देश करणें शक्य नाहीं.

आतां 'अर्धतृतीयाः' हा समास कोणता ?

हा बहुव्रीहि समास आहे असें म्हणतों.

२७. आर्थिक उत्तर देण्यापेक्षां प्रत्यक्षच कठः असें उत्तर येथें कां देतां येत नाहीं तें या ग्रंथानें दाखविलें आहे. अस्य के सब्रह्मचारिणः अशा वाक्यानें प्रश्न केला असतां तेथें त्यांना प्राधान्य असल्यामुळें उत्तरांत कठाः असा त्या सहाध्यायींचा प्रतिनिर्देश करतां येतो. 'किंसब्रह्मचारी अयम्' असा सामासिक शब्दानें प्रश्न केला तर मात्र त्या शब्दामध्यें सहाध्यायींना अप्राधान्य असल्यामुळें त्यांचा प्रतिनिर्देश करतां येत नाहीं, तर त्या सामासिक शब्दामध्यें प्रधान जो अन्यपदार्थ त्याचाच उत्तरांत प्रतिनिर्देश कठः असाच करतां येतो.

अथार्धतृतीया इति कोऽयं समासः। बहुव्रीहिरित्याह। कोऽस्य विग्रहः। अर्धं तृतीयमेषामिति। कः समासार्थः। समासार्थो नोपपद्यतेऽन्यपदार्थो हि नाम स भवति। येषां पदानां समासस्ततोऽन्यस्य पदस्यार्थोऽन्यपदार्थः॥ एवं तर्ह्येवं विग्रहः करिष्यतेऽर्धं तृतीयमनयोरिति। एवमपि कः षष्ठ्यर्थः। षष्ठ्यर्थो नोपपद्यते। किं हि तयोरर्धं भवति॥ अस्तु तर्ह्ययमेव विग्रहोऽर्धं तृतीयमेषामिति। ननु चोक्तं समासार्थो नोपपद्यत इति। नैष दोषः। अवयवेन विग्रहः समुदायः समासार्थः। यद्यवयवेन विग्रहः समुदायः समासार्थः

असिद्वितीयोऽनुससार पाण्डवम्

संकर्षणद्वितीयस्य बलं कृष्णस्य वर्धतामिति

द्वयोर्द्विवचनमिति द्विवचनं प्राप्नोति॥ अस्तु तर्ह्ययमेव विग्रहोऽर्धं तृतीयमनयोरिति। ननु चोक्तं षष्ठ्यर्थो नोपपद्यत

---

हा समास कशा रीतीनें सोडवावयाचा?

अर्धं तृतीयमेषाम् असा. ज्यामध्यें तिसरा अर्धा आहे म्हणजे अडीच असा अर्थ होय.

येथें बहुव्रीहिसमासाचा अर्थ जो अन्यपदार्थ तो जुळत नाहीं, कारण ज्या पदांचा समास कर्तव्य असेल त्या पदांहून अन्य पदाचा जो अर्थ तो अन्यपदार्थ होय[२८].

असें आहे तर अर्धं तृतीयमनयोः[२९] अशा रीतीनें समास सोडविण्यांत येईल.

तरीसुद्धां अडचण आहेच. म्हणजे अनयोः या षष्ठीचा अर्थ काय तो जुळत नाहीं. कारण तिसऱ्याचा अर्धा भाग हा पूर्ण जे दोन त्यांचा कोणीच नव्हे.

तर मग अर्धं तृतीयमेषाम् असा जो प्रथमतः समास सोडविला होता तसाच घ्यावा.

पण तसा समास सोडविला तर तिसरा अर्धा हा अडीच या अन्यपदार्थापैकींच असल्यामुळें तो अन्यपदार्थ होऊं शकत नाहीं असा दोष पूर्वी दिला आहे ना?

हा दोष नाहीं. पूर्ण दोन आणि एक अर्धा भाग मिळून जो समुदाय तो समुदाय या रूपानें अन्यपदार्थ होय, आणि त्या समुदायांतील अवयव जो तिसरा अर्धा हा भाग तो अवयव या नात्यानें अर्ध आणि तृतीय या पदांचा अर्थ आहे.

जर समुदाय अन्यपदार्थ गृहीत धरावयाचा तर असिद्वितीयोऽनुससार, संकर्षणद्वितीयस्य बलं कृष्णस्य वर्धताम्, येथें असि आणि त्याला धारण करणारा पुरुष या उभयतांचा समुदाय तो 'असिद्वितीय' या बहुव्रीहीचा अन्य पदार्थ म्हणून गृहीत धरला असल्यामुळें 'दोघांबद्दल द्विवचन घालावें' (१।४।२२) या नियमानें द्विवचन होऊं लागेल[३०].

तर मग अर्धं तृतीयमनयोः असा जो दुसऱ्यांदा समास सोडविला होता तसाच घ्यावा.

पण त्या वेळीं अर्धा तिसरा हा त्या उभयतांचा कोणी नसल्यामुळें अनयोः येथें षष्ठी घातली ती जुळत नाहीं, असा दोष पूर्वी दाखविला आहे ना?

---

२८. अर्ध, आणि तृतीय या शब्दांचा समास केला आहे. त्यांचा अर्थ अर्धा तिसरा असा आहे. तो अर्थ अन्यपदार्थ जो अडीच त्यामध्यें आहेच, त्यामुळें अडीच या अर्थाला अन्यपदार्थ म्हणतां येत नाहीं.

२९. अर्धा आहे तिसरा ज्यांचा असे दोन हा अन्यपदार्थ होय.

३०. याप्रमाणेंच संकर्षणद्वितीय या बहुव्रीहिसमासाच्या पुढेंही द्विवचन होऊं लागेल, असें समजावें.

इति । नैष दोषः । इदं तावदयं प्रष्टव्यः । अथेह देवदत्तस्य भ्रातेति कः षष्ठ्यर्थ इति । तत्रैतस्यादेकस्मात्प्रादुर्भाव इति । एतच्च वार्त्तम् । तद्यथा । सार्थिकानामेकप्रतिश्रय उषितानां प्रातरुत्थाय प्रतिष्ठमानानां न कश्चित्परस्परं संबन्धो भवति । एवंजातीयकं भ्रातृत्वं नाम । अत्र चेद्युक्तः षष्ठ्यर्थो दृश्यत इहापि युक्तो दृश्यताम् ॥ इह तर्ह्यर्धतृतीया आनीयन्तामित्युक्तेऽर्धस्यानयनं न प्राप्नोति ॥ अस्तु तर्ह्ययमेव विग्रहोऽर्धं तृतीयमेषामिति । ननु चोक्तमसिद्वितीयोऽनुससार पाण्डवम् संकर्षणद्वितीयस्य बलं कृष्णस्य वर्धतामिति द्वयोर्द्विवचनमिति द्विवचनं प्राप्नोतीति । नैष दोषः । अयं तीयान्तः शब्दोऽस्त्येव पूरणमस्ति सहायवाची । तद्यः सहायवाची तस्येदं ग्रहणम् । असिद्वितीयः असिसहाय इति गम्यते ॥ एवमप्यर्धतृतीया इत्येकस्मिन्नेकवचनं प्राप्नोति । एकार्था हि समुदाया भवन्ति । तद्यथा । शतम् यूथम् वनमिति ॥ अस्तु तर्ह्ययमेव विग्रहोऽर्धं तृतीयमनयोरिति । ननु चोक्तमर्धतृतीया आनीयन्तामित्युक्तेऽर्धस्यान-

हा दोष येत नाहीं. येथें याला अगोदर असें विचारावें की देवदत्तस्य भ्राता येथें जी षष्ठी घातली आहे तिचा काय अर्थ? म्हणजे देवदत्ताचा भाऊ असें जें म्हणतात तें कोणत्या संबंधामुळें म्हणतात? आतां दोघांचे जन्म एकापासून होणें हा त्या उभयतांचा संबंध असें म्हणावें तर तें म्हणणें अगदीं फोल आहे, असें पहा की रात्रभर एका धर्मशाळेंत राहून पहाटे उठून आपापल्या इच्छित स्थळाकडे चालूं होणारे जे व्यापारी लोक त्यांचा परस्परांमध्यें कांहीं एक संबंध असत नाहीं. तीच स्थिति दोन भावांची आहे. येथें जर षष्ठ्यर्थसंबंध हा योग्य म्हणून दिसतो आहे तर अर्धं तृतीयमनयोः येथेंही पूर्ण दोन आणि तिसरा अर्धा यांचा संबंध योग्य आहे असें कां समजूं नये?

पण अर्धं तृतीयमनयोः असा समास सोडविला तर दोन हा अन्य पदार्थ होत असल्यामुळें अर्धतृतीयाः आनीयन्ताम् असें सांगितलें असतां तिसरा अर्धा आणिला जाणार नाहीं.

तर मग अर्धं तृतीयमेषाम् असा जो प्रथमतः समास सोडविला होता तसाच घ्यावा.

पण तसा समास सोडविला तर असिद्वितीयः, संकर्षणद्वितीयस्य येथें 'दोघांबद्दल द्विवचन घालावें' या नियमानुसार द्विवचन प्रसक्त होतें असा दोष दाखविला आहे ना?

हा दोष येत नाहीं. कारण तीयशब्द शेवटीं असलेला असा हा द्वितीयशब्द पूरण या अर्थाचा वाचक तर आहेच, पण तसाच सहाय या अर्थाचाही वाचक आहे. त्यांत जो सहाय या अर्थाला दाखवितो तसला द्वितीयशब्द असिद्वितीयः येथें घातला आहे. असिद्वितीयः यापासून असि आहे सहाय ज्याला असा अर्थ मनांत येतो.[३१]

वरील दोष घालविला तरी अर्धतृतीयाः येथें दोन पूर्ण व तिसरा अर्धा मिळून बनलेला समुदाय हा अन्य पदार्थ असल्यामुळें एकवचन होऊं लागेल. समुदाय हा नेहमीं एकच असल्यामुळें शतं, यूथं, वनम्, येथें जसें एकवचन होतें तसेंच हें होय.

तर मग अर्धं तृतीयमनयोः असा जो दुसऱ्यांदा समास सोडविला होता तो घ्यावा.

पण तसा समास सोडविला तर अर्धतृतीया आनीयान्ताम् असें सांगितलें असतां अन्य-

३१. अव्युत्पन्न असा जो द्वितीयशब्द तो प्रकृत उदाहरणामध्यें घेतला आहे. तेव्हां अन्यपदार्थ एकच असल्यामुळें द्विवचनाचा प्रसंग येत नाहीं.

यनं न प्राप्नोतीति । नैष दोषः । भवति बहुव्रीहौ तद्गुणसंविज्ञानमपि । तद्यथा । शुक्लवाससमानय लोहितोष्णीषा ऋत्विजः प्रचरन्तीति तद्गुण आनीयते तद्गुणाश्च प्रचरन्ति ॥ अथवा पुनरस्त्वयमेव विग्रहोऽर्धं तृतीयमेषामिति । ननु चोक्तमेकवचनं प्राप्नोतीति । नैष दोषः । संख्या नामेयं परप्रधाना । संख्येयमनया विशेष्यम् । यदि चात्रैकवचनं स्यात्संख्येयमविशेषितं स्यात् ॥ इह तर्ह्यर्धतृतीया द्रोणा इत्ययं द्रोणशब्दः समुदाये प्रवृत्तोऽवयवे नोपपद्यते । नैष दोषः । समुदायेष्वपि शब्दाः प्रवृत्ता अवयवेष्वपि वर्तन्ते । तद्यथा । पूर्वे पञ्चालाः । उत्तरे पञ्चालाः । तैलं भुक्तम् । शुक्लः नीलः कृष्ण इति । एवमयं समुदाये द्रोणशब्दः प्रवृत्तोऽवयवेष्वपि वर्तते । कामं तर्ह्यनेनैव हेतुना यदा द्वौ द्रोणावर्धाढकं च कर्तव्यमर्धतृतीया द्रोणा इति । न कर्तव्यम् । समुदायेष्वपि हि शब्दाः प्रवृत्ता अवयवेष्वपि वर्तन्ते । केष्ववयवेषु । योऽवयवस्तं समुदायं न व्यभिचरति । कं च समुदायं न व्यभिचरति । अर्धद्रोणो द्रोणम् । अर्धाढकं पुनर्व्यभि-

पदार्थ दोन असल्यामुळें तिसरा अर्धा आणिला जाणार नाहीं असा दोष दाखविला आहे ना ?

हा दोष येत नाहीं. कारण बहुव्रीहीविषयीं तद्गुणसंविज्ञानही[३२] होतें; जसें— शुक्लवाससमानय, लोहितोष्णीषा ऋत्विजः प्रचरन्ति, असें म्हटलें असतां शुभ्र वस्त्रासकट तो पुरुष आणिला जातो, आणि तांबडें पागोटें घालूनच ते ऋत्विज हिंडतात.

किंवा अर्धं तृतीयमेषाम् असा जो प्रथमतः समास सोडविला होता तसाच ध्यावा.

पण तसा समास सोडविला तर समुदाय हा नेहमीं एकच असतो म्हणून अर्धतृतीयाः येथें एकवचन होऊं लागेल असा दोष दाखविला आहे ना ?

हा दोष येत नाहीं. कारण संख्या म्हणून जी आहे ती परप्रधान असते. म्हणजे या संख्येनें संख्येय इतके आहेत असा बोध करून द्यावयाचा असतो. तेव्हां जर येथें एकवचन होईल तर संख्येय किती आहेत तें काहींच कळून येणार नाहीं.

तर अर्धः तृतीयो येषां द्रोणानां ते अर्धतृतीया द्रोणाः येथें द्रोणशब्द हा दोन सगळे द्रोण व एक अर्धा द्रोण मिळून अडीच द्रोणांचा समुदाय असा येथें अर्थ आहे त्यांत अर्धा हा पुरा द्रोण नसल्यानें द्रोणशब्दापुढें बहुवचन केलें तें जुळत नाहीं.

हा दोष येत नाहीं. तिसरा द्रोण पुरा नसला तरी त्याला द्रोणशब्द लावतां येतो. कारण कोणत्याही पदार्थाला दाखविण्याविषयीं प्रवृत्त झालेले शब्द त्यांतील अवयवांनाही लागू होतात; जसें— पूर्वे पञ्चालाः, उत्तरे पञ्चालाः, तैलं भुक्तं, घृतं भुक्तं, शुक्लो, नीलः, कपिलः, वगैरे.

तर मग याच युक्तीवरून दोन द्रोण आणि अर्धें आढक मिळून समुदाय अन्यपदार्थ असतां त्या अर्थीं 'अर्धतृतीयाः द्रोणाः' असा प्रयोग करतां येईल.

तशा अर्थीं तो प्रयोग करतां येणार नाहीं. कारण समुदायवाचक शब्द अवयवालाही लागतात हें खरें आहे, पण जो अवयव ज्या समुदायाला सोडून कधींही असत नाहीं, त्याच अवयवाला तो समुदायवाचक शब्द लागतो. कोणता अवयव कोणत्या समुदायाला सोडून असूं शकत नाहीं ? अर्धा द्रोण हा शब्द

३२. पहा मागें १।१।२७, भाष्य पृ.२२०, पं. १२. तेव्हां अर्धा तिसरा हा अन्यपदार्थामध्यें प्रविष्ट नसला तरी अन्यपदार्थाबरोबर आणिला जाईल.

चरति ॥

**संख्ययाऽव्ययासन्नादूराधिकसंख्याः संख्येये ॥ २ । २ । २५ ॥**

द्वित्राः त्रिचतुरा इति कोऽयं समासः। बहुव्रीहिरित्याह। कोऽस्य विग्रहः। द्वौ वा त्रयो वेति। भवेद्यदा बहूनामानयनं तदा बहुवचनमुपपन्नं यदा तु खलु द्वावानीयेते तदा न सिध्यति। तदापि सिद्धम्। कथम्। केचित्तावदाहुः। अनिर्ज्ञातेऽर्थे बहुवचनं प्रयोक्तव्यमिति। तद्यथा। कति भवतः पुत्राः। कति भवतो भार्या इति। अपर आह। द्वौ वेत्युक्ते त्रयो वेति गम्यते। त्रयो वेत्युक्ते द्वौ वेति गम्यते। सैषा पञ्चाधिष्ठाना वाक्तत्र युक्तं बहुवचनम् ॥

अथ द्विदशाः त्रिदशा इति कोऽयं समासः। बहुव्रीहिरित्याह। कोऽस्य विग्रहः। द्विर्दश द्विदशा इति।

**संख्यासमासे सुजन्तत्वात्संख्याप्रसिद्धिः ॥ १ ॥**

संख्यासमासे सुजन्तत्वात्संख्येत्यप्र-

---

द्रोणपरिमाण माहीत असल्याशिवाय उपयोगांत आणतां येत नाहीं, पण अर्धाढक हा शब्द मात्र द्रोणपरिमाणाची माहिती नसली तरी उपयोगांत आणतां येतोच, म्ह. केवळ एका आढकाच्या ज्ञानानेंही अर्धें आढक कळूं शकतें.(तात्पर्य द्रोणरूप परिमाणाचा अर्धें आढक हा जरी अवयव आहे तरी तो व्यभिचारी अवयव असल्यामुळें द्रोणशब्द त्या अवयवाला दाखवूं शकत नाहीं. म्हणून दोन द्रोण आणि अर्धें आढक मिळून अन्यपदार्थ विवक्षित असतां तेथें अर्धतृतीया द्रोणाः असा प्रयोग होत नाहीं.)

(सू.२५) द्वित्राः, त्रिचतुराः, हा समास कोणता ?

हा बहुव्रीहिसमास होय असें म्हणतों.

हा समास कसा सोडवावयाचा ?

'द्वौ वा त्रयो वा' असा.

दोन किंवा तीन असा द्वित्रशब्दाचा अर्थ आहे. तेव्हां द्वित्रा आनीयन्ताम् असें सांगितल्यानंतर तीन पदार्थ आणिले तर द्वित्राः येथें बहुवचन केलें तें बरोबर जुळून येतें, पण दोनच पदार्थ आणिले तर मात्र बहुवचन जुळून येत नाहीं.

दोन आणिले असतांही बहुवचन जुळून येतें.

तें कसें ?

कोणी एक असें म्हणतात की जर पदार्थांची संख्या निश्चित कळत नसेल तर तेथें बहुवचनाचा प्रयोग करावा; जसें- कति भवतः पुत्राः- तुला मुलगे किती आहेत ? कति भवतो भार्याः- तुझ्या बायका किती आहेत ? अन्य कोणी असें म्हणतो की द्वौ वा त्रयो वा यांतील 'द्वौ वा' याचा अर्थ 'दोन असावेत, पण कदाचित् तीनही असूं शकतील'. तेव्हां पाळीपाळीनें असलेली दोन आणि तीन संख्या मिळून पांच या संख्येला द्वित्रशब्द दाखवीत असल्यामुळें बहुवचन केलें तें योग्य आहे.

आतां द्विदशाः, त्रिदशाः, हा [1]समास कोणता ?

हा बहुव्रीहिसमास आहे असें म्हणतों.

हा समास कसा सोडवावयाचा ?

द्विर्दश (दोन वेळ दहा) द्विदशाः, असा.

(वा.१) संख्यावाचक शब्दांच्या बहुव्रीहिसमासामध्यें सुजन्तशब्द असल्यामुळें त्याला संख्यावाचकत्व नाहीं. तेव्हां संख्यावाचकाचा हा समास झाला आहे, असें म्हणतां येत नाहीं.

---

१. संख्येनें मोजले जाणारे जे पदार्थ त्या अर्थी योजलेल्या संख्यावाचक शब्दाबरोबर अव्ययांचा, आसन्न, अधिक, अदूर, या शब्दांचा आणि संख्यावाचक शब्दांचा विकल्पेंकरून बहुव्रीहिसमास होतो; उदा०- दशानां समीपे ये सन्ति उपदशाः, म्ह. नऊ किंवा अकरा. तसेंच आसन्नविंशाः,

सिद्धिः। न हि सुजन्ता संख्यास्ति ॥ एवं तर्ह्येवं विग्रहः करिष्यते द्वौ दशतौ द्विदशा इति । एवमप्यत्कारान्तत्वात्संख्ययेत्यप्रसिद्धिः। न ह्यत्कारान्ता संख्यास्ति ॥ अस्तु तर्ह्ययमेव विग्रहो द्विर्दश द्विदशा इति। ननु चोक्तं संख्यासमासे सुजन्तत्वात्संख्येत्यप्रसिद्धिरिति ।

**न वासुजन्तत्वात् ॥ २ ॥**

न वैष दोषः। किं कारणम्। असुजन्तत्वात्। सुजन्तेत्युच्यते न चात्र सुजन्तं पश्यामः॥ किं पुनः कारणं वाक्ये सुज्दृश्यते समासे तु न दृश्यते ।

**सुजभावोऽभिहितार्थत्वात्समासे ॥३॥**

समासे सुचोऽभावः। किं कारणम्। अभिहितार्थत्वात्। अभिहितः सुजर्थः समासेनेति कृत्वा समासे सुज्न भविष्यति। किं च भोः सुजर्थे इति समास उच्यते। न खलु सुजर्थ इत्युच्यते गम्यते तु सुजर्थः। कथम्। यावता संख्येयो यः संख्यया संख्यायते स च क्रियाभ्यावृत्त्यर्थः। स चोक्तः समासेनेति कृत्वा समासे सुज्न भविष्यति ॥

---

असें आहे तर द्वौ दशतौ[२] द्विदशाः असा समास सोडविण्यांत येईल.

तरीही अत्शब्द शेवटीं असलेला दशत् हा शब्द संख्यावाचक नसल्यामुळें संख्यावाचकाबरोबर हा समास झाला आहे असें म्हणतां येत नाहीं. कारण अत्शब्द शेवटीं असलेला असा संख्यावाचक शब्द एकही नाहीं.

तर द्विर्दश द्विदशाः असाच हा समास सोडवावयाचा.

पण संख्यावाचक शब्दांच्या या बहुव्रीहिसमासामध्यें सुजन्तशब्द असल्यामुळें त्याला संख्यावाचकत्व नाहीं. तेव्हां संख्यावाचकाचा हा समास झाला आहे असें म्हणतां येत नाहीं असें म्हटलें आहे ना ?

(वा.२) हा दोष येत नाहीं. कारण सुजन्तशब्द असल्यामुळें असें तुम्ही म्हणतां, पण या समासामध्यें सुजन्तशब्द दृष्टीस पडत नाहीं.

पण याचें काय बरें कारण की तो समास सोडवितांना त्या वाक्यामध्यें द्विः असा सुच्प्रत्यय दृष्टीस पडतो आणि समासामध्यें दृष्टीस पडत नाहीं ?

(वा.३) समासामध्यें सुच्प्रत्यय नाहीं.

काय कारण ?

दोन वेळां असा जो सुच्प्रत्ययाचा अर्थ तो द्विदशाः या समासानेंच अभिहित झाला असल्यामुळें समासामध्यें सुच्प्रत्यय होत नाहीं.

अहो पण सुच्प्रत्ययाच्या अर्थी हा समास सांगितला आहे काय ?

सुच्प्रत्ययाच्या अर्थी हा समास सांगितला नाहीं हें खरें, पण त्या समासापासून सुच्प्रत्ययाचा अर्थ मनांत मात्र येतो.

तो कसा ?

जे एका संख्येनें मोजलेले पदार्थ ते संख्यावाचक शब्दानें दाखविले जातात; त्यांच्याशीं पुनः दुसऱ्या संख्येचा संबंध येथें होत[३] आहे. त्या दुसऱ्या संख्येनें संख्येय पदार्थ तर मोजले जात नाहींत.[४] म्हणून त्या संख्येय पदार्थांची जी तेथें विवक्षित क्रिया असेल त्या क्रियेची आवृत्ति किती वेळां होते ती त्या दुसऱ्या संख्येनें मोजली जाते. तेव्हां अशा रीतीनें सुच्प्रत्ययाचा अर्थ समासानेंच उक्त झाला आहे. म्हणून समासामध्यें सुच्प्रत्यय होत नाहीं.

---

२. दहा हें परिमाण ज्या वर्गाचें त्या अर्थी डतिप्रत्यय (५।१।६०) होऊन दशत् असा शब्द सिद्ध झाला आहे.

३. द्विदशाः येथें दोन या संख्येचा दहा ह्या संख्येयाशीं संबंध प्रतीत होत आहे.

४. कारण ते एका संख्येनें मोजलेलेच आहेत.

**आशिष्यः संख्योत्तरपदः संख्येयवाभिधायित्वात् ॥ ४ ॥**

अशिष्यः संख्योत्तरपदो बहुव्रीहिः । किं कारणम् । संख्येयवाभिधायित्वात् । संख्येयं वार्थश्चाभिधीयते तत्रान्यपदार्थ इत्येव सिद्धम् ॥ भवेत्सिद्धमधिकविंशाः अधिकत्रिंशा इति यत्रैतद्विचार्यते विंशत्यादयो दशदर्थे वा स्युः परिमाणिनि वेति । इदं तु न सिध्यति अधिकदशा इति यत्र नियोगतः संख्या संख्येय एव वर्तते ॥ अथोपदशा इति कोऽयं समासः । बहुव्रीहिरित्याह । कोऽस्य विग्रहः । दशानां समीप उपदशा इति । कस्य पुनः सामीप्यमर्थः । उपस्य । यद्येवं नान्यपदार्थो भवति ॥ तत्र प्रथमानिर्दिष्टं संख्याग्रहणं शक्यमकर्तुम् ॥

**मत्वर्थे वा पूर्वस्य विधानात् ॥ ५ ॥**

अथवा मत्वर्थे पूर्वो योगोऽमत्वर्थोऽयमारम्भः ॥

**कब्भावार्थं वा ॥ ६ ॥**

अथवा कब्मा भूदिति ॥

**दिङ्नामान्यन्तराले ॥२।२।२६॥**

(वा.४) संख्यावाचक उत्तरपदाबरोबर जो हा बहुव्रीहिसमास सांगितला आहे तो सांगावयास नको.

काय कारण ?

कारण असें की या बहुव्रीहीनें संख्येय पदार्थ किंवा विकल्प ह्या अर्थाचें प्रतिपादन केलें जात आहे. तेव्हां ते अन्य पदार्थ होत असल्यामुळें त्या अर्थी बहुव्रीहि पूर्वसूत्रानेंच येथें सिद्ध होईल.

अधिकविंशाः, अधिकत्रिंशाः, वगैरे ठिकाणीं 'अनेकमन्यपदार्थे' यानें बहुव्रीहि सिद्ध होईल. कारण विंशति, त्रिंशत्, वगैरे शब्द संख्या या अर्थी आहेत किंवा संख्येय या अर्थी आहेत, अशा दोन्ही अर्थांबद्दल विचार केला असतां तेथें संख्या हा अर्थ घेतां येतो. पण जेथें संख्याशब्द केवळ संख्येय या अर्थालाच नियमानें दाखवितो तेथें म्ह. अधिकदशाः वगैरे स्थलीं संख्येय हा अन्य पदार्थ होत नसल्यामुळें 'अन्यपदार्थे' यानें बहुव्रीहि होणार नाहीं, तेव्हां त्याकरितां हें सूत्र केलें पाहिजे.

आतां, उपदशाः हा समास कोणता समजावयाचा ?

हा बहुव्रीहि आहे असें म्हणतों.

हा समास कसा सोडवावयाचा ?

'दशानां समीपे उपदशाः' असा, म्हणजे दहांच्या जवळचे.

या समासामध्यें जवळचे हा अर्थ कोणाचा ?

उप या अव्ययाचा.

जर उप याचाच तो अर्थ आहे तर तो अन्य पदाचा अर्थ होत नाहीं. तेव्हां पूर्वसूत्रानें सिद्धि होत नसल्यामुळें हें सूत्र केलें तें बरोबरच केलें आहे. फक्त त्यामध्यें प्रथमाविभक्तीनें संख्याशब्द जो उच्चारला आहे तो उच्चारला नाहीं तरी चाललें.

(वा.५) अथवा षष्ठ्यर्थे किंवा सप्तम्यर्थे या मत्वर्थीच पूर्वसूत्रानें बहुव्रीहीचें विधान केलें आहे. उपदशाः इत्यादि ठिकाणीं मत्वर्थ नसल्यामुळें प्रकृत सूत्राचा आरंभ केला आहे.

(वा.६)[६] अथवा 'शेषाद्विभाषा'(५।४।१५४) यानें सांगितलेला समासान्त कप्प्रत्यय तो येथें वृत्ति नाहीं.

५. कारण द्वित्राः येथें विकल्प हा अन्यपदार्थ असल्यामुळें पूर्वसूत्रानेंच तेथें काम भागणार आहे.

६. शेषपदाची अनुवृत्ति असून सांगितलेला जो बहुव्रीहि त्याच बहुव्रीहीहून 'शेषाद्विभाषा' यानें कप्प्रत्यय होतो. शेषपदाची अनुवृत्ति 'अनेकमन्य०' या सूत्रांतच आहे. त्याच्या पुढील सूत्रामध्यें अनु-

१. दोहोंमधील अंतर हा अर्थ दाखवावयाचा असतां पूर्व, उत्तर, वगैरे दिशांचे वाचक जे रूढ शब्द त्या दोन शब्दांचा विकल्पानें बहुव्रीहिसमास होतो; उदा०– दक्षिणस्याः पूर्वस्याश्च दिशोऽन्तरालं दक्षिणपूर्वा, म्ह. आग्नेयी दिशा होय; तीच त्या

## तेन सहेति तुल्ययोगे ॥२।२।२८॥

**दिक्समाससहयोगयोश्चान्तराल-प्रधानाभिधानात् ॥ १ ॥**

दिक्समाससहयोगयोश्चाशिष्यो बहुव्रीहिः। किं कारणम्। अन्तरालप्रधानाभिधानात्। दिक्समासे सहयोगे चान्तरालं प्रधानं चाभिधीयते तत्रान्यपदार्थ इत्येव सिद्धम्॥ यद्येवं दक्षिणपूर्वा दिक् समानाधिकरणलक्षणः पुंवद्भावो न प्राप्नोति। अद्य पुनरियं सैव दक्षिणा सैव पूर्वेति कृत्वा समानाधिकरणलक्षणः पुंवद्भावः सिद्धो भवति॥ न सिध्यति। भाषितपुंस्कस्य पुंवद्भावो न चैतौ भाषितपुंस्कौ। ननु च भो दक्षिणशब्दः पूर्वशब्दश्च पुंसि भाष्येते। समानायामाकृतौ यद्भाषितपुंस्कमाकृत्यन्तरे चैतौ भाषितपुंस्कौ। दक्षिणा पूर्वेति दिक्शब्दौ दक्षिणः पूर्व इति व्यवस्थाशब्दौ। यदि पुनर्दिक्शब्दा अपि व्यवस्थाशब्दाः स्युः। कथं यानि दिगपदिष्टानि कार्याणि। यदा दिशो व्यवस्थां वक्ष्यन्ति।

---

न व्हावा म्हणून प्रकृत सूत्राचा आरंभ केला आहे.

(सू. २६, २८) दिग्वाचकांचा आणि सहशब्दाचा जो बहुव्रीहिसमास ह्या दोन सूत्रांनीं सांगितला आहे तो सांगावयास नको.

काय कारण ?

दिग्वाचकांच्या समासानें दोन दिशांमधील अंतराल हा अर्थ दाखविला जातो. तसेंच सहशब्दाच्या समासानें पिता वगैरे प्रधान अर्थ दाखविला जातो. तेव्हां अंतराल आणि प्रधान हे अन्यपदार्थ असल्यामुळें पूर्वसूत्रानेंच तेथें बहुव्रीहि होत आहे.

जर अन्तराल हा अन्यपदार्थ समजून पूर्वसूत्रानें बहुव्रीहि केला तर दक्षिणपूर्वा दिक् येथें सामानाधिकरण्यावर अवलंबून असलेला पुंवद्भाव पूर्वपदाला प्राप्त होऊं शकत नाहीं.

आणि या सूत्राचा आरंभ केला असता जी ही दक्षिणदिशा तीच पूर्वदिशा असल्यामुळें समानाधिकरण उत्तरपदावर अवलंबून असलेला पुंवद्भाव साधतो.

पुंवद्भाव साधत नाहीं. कारण पुंवद्भाव हा केवळ सामानाधिकरण्यावर अवलंबून नाहीं, तर भाषितपुंस्कत्वावरही अवलंबून आहे, आणि दिशा या अर्थाचे दक्षिणा व पूर्वा हे शब्द तर पुंल्लिंगी नाहींत.

अरे पण दक्षिण व पूर्व हे शब्द पुंल्लिंगी आहेत ना ?

जो शब्द ज्या अर्थी स्त्रीलिंगी असतो त्याच अर्थी जर तो पुंलिंगी असेल तरच तो भाषितपुंस्क म्हटला जातो, व हे पूर्व, दक्षिण शब्द तर निराळ्या अर्थानें पुंल्लिंगी आहेत. म्हणजे दक्षिणा, पूर्वा हे स्त्रीलिंगी शब्द रूढीनें दिशा या अर्थाला दाखवितात. आणि दक्षिणः, पूर्वः, हे पुंल्लिंगी शब्द अवधिविशेषानें युक्त देश या अर्थाला दाखवितात.

आतां जर दिग्वाचक पूर्वा वगैरे शब्द देखील अवधिविशेषानें युक्त देश याच अर्थाचे आहेत असें गृहीत धरलें तर त्यांना भाषितपुंस्क म्हणतां येईल, पण त्या वेळीं त्यांना दिक्शब्द समजून जीं कार्यें होत असतात तीं कोणत्या समजुतीनें करावीत ?

आतां ज्याचा दिशेशीं संबंध झाला असेल

---

दोन्ही दिशांचे मध्यें आहे. ती आग्नेयी दिशा दक्षिणा आणि पूर्वा या दोघींच्या जवळ असल्यामुळें ते दोन्ही शब्द लक्षणेनें आग्नेयी दिशा या अर्थी आहेत. तेव्हां दक्षिणपूर्वा हा बहुव्रीहिसमास कर्मधारयाप्रमाणें स्वपदार्थीच आहे. कर्मधारय जर केला तर अंतोदात्त स्वर होऊं लागेल म्हणून मुद्दाम हें सूत्र केलें आहे.

२. दोघांचा क्रिया वगैरेशीं संबंध गम्यमान असतांना सहशब्दाचा तृतीयान्तावरोबर विकल्पानें बहुव्रीहिसमास होतो; उदा०—पुत्रेण सह सपुत्र आगतः.

३. दक्षिण दिशेच्या जवळचा भाग जो आग्नेयीदिशा तोच पूर्वदिशेच्या जवळचा भाग असल्यामुळें,

यदि तर्हि यो यो दिशि वर्तते स स दिक्शब्दो रमणीयादिष्वतिप्रसङ्गो भवति । रमणीया दिक् शोभना दिगिति ॥ अथ मतमेतद्दिशि दृष्टो दिग्दृष्टः दिग्दृष्टः शब्दो दिक्शब्दः दिशं यो न व्यभिचरतीति रमणीयादिष्वतिप्रसङ्गो न भवति पुंवद्भावस्तु न प्राप्नोति ॥ एवं तर्हि सर्वनाम्नो वृत्तिमात्रे पुंवद्भावो वक्तव्यो दक्षिणोत्तरपूर्वाणामित्येवमर्थम् । एवं च कृत्वास्तु दिक्समाससहयोगयोश्चान्तरालप्रधानाभिधानादित्येव । ननु चोक्तं दक्षिणपूर्वा दिक् समानाधिकरणलक्षणः पुंवद्भावो न प्राप्नोतीति । नैष दोषः । सर्वनाम्नो वृत्तिमात्रे पुंवद्भावेन परिहृतम् ॥

**मत्वर्थे वा पूर्वस्य विधानात् ॥ २ ॥**

अथवा मत्वर्थे पूर्वो योगोऽमत्वर्थोऽयमारम्भः ॥

**कब्भावार्थं वा ॥ ३ ॥**

अथवा कब्मा भूदिति ॥

**तत्र तेनेदमिति सरूपे ॥२।२।२७॥**

तो दिक्शब्द असें म्हणावें तर रमणीया दिक्, शोभना दिक्, येथें रमणीया वगैरे शब्दांनाही दिक्शब्द म्हणावें लागेल.

आतां दिशि दृष्टो दिग्दृष्टः, दिग्दृष्टः शब्दो दिक्शब्दः म्ह. दिग्व्यतिरिक्त अर्थाला कधींही न दाखवितां जो दिशा या अर्थाला दाखविणारा म्हणून नेहमीं पाहण्यांत येतो तोच शब्द दिक्शब्द होय असें म्हणणें असेल तर रमणीय वगैरे शब्दांना 'दिक्शब्द' हें नांव लागू करण्याची पाळी टळते खरी, पण दक्षिणपूर्वा दिक् येथें पुंवद्भाव करतां येणार नाहीं.[४]

असें आहे तर 'सर्वनामसंज्ञक शब्दाला कोणत्याही वृत्तीमध्यें पुंवद्भाव होतो' असें वचन करावें. तें वचन 'दक्षिणोत्तरपूर्वाणाम्' येथें उत्तराशब्दाला पुंवद्भाव होण्याकरितां अवश्य केलेंच पाहिजे.[५]

तेव्हां एकंदरींत अन्तराल आणि प्रधान हे अन्य पदार्थ असल्यामुळें पूर्वसूत्रानेंच बहुव्रीहि सिद्ध होत आहे म्हणून 'दिङ्नामान्य०' आणि 'तेन सहेति' हीं दोन्ही सूत्रें करावयास नकोत असें जें आरंभीं म्हटलें आहे तेंच खरें ठरतें.

पण असा पूर्वसूत्रानेंच बहुव्रीहि केला तर 'दक्षिणपूर्वा' येथें सामानाधिकरण्यावर अवलंबून असलेला पुंवद्भाव प्राप्त होऊं शकत नाहीं असा दोष दाखविला आहे ना ?

हा दोष येत नाहीं. कारण कोणत्याहि वृत्तीमध्यें सर्वनामसंज्ञक शब्दाला पुंवद्भाव होतो ह्या वचनानेंच तो दोष दूर होत आहे.

(वा.२) किंवा मत्वर्थींच पूर्वसूत्रानें बहुव्रीहीचें विधान केलें आहे. तेव्हां मत्वर्थ नसल्यामुळें येथें बहुव्रीहि होण्याकरितां हीं दोन्ही सूत्रें आरंभिलीं आहेत.

(वा.३) अथवा 'शेषाद्विभाषा' यानें सांगितलेला समासान्त कप्प्रत्यय न व्हावा म्हणून हीं सूत्रें आरंभिलीं आहेत.

(सू.२७) तृतीयान्त आणि सप्तम्यन्त

---

४. कारण अशा दिक्शब्दाला भाषितपुंस्क म्हणतां येत नाहीं.

५. कारण सामानाधिकरण्य नसल्यामुळें उत्तरा या शब्दाला 'स्त्रियाः पुंवत०' (६।३।३४) या सूत्रानें पुंवद्भाव प्राप्त होत नाहीं.

१. कोणत्याही वस्तूच्या वाचक अशा एकमेकांसारख्या दोन सप्तम्यन्त शब्दांचा बहुव्रीहि होतो, व 'त्या वस्तु एकमेकांच्या धरून दोघांमध्यें प्रवृत्त झालेलें युद्ध' असा त्या बहुव्रीहीचा अर्थ समजला जाईल; तसेंच कोणत्याही वस्तूच्या वाचक अशा एकमेकांसारख्या दोन तृतीयान्त शब्दांचा बहुव्रीहि होतो, व 'त्या वस्तूच्या योगानें एकमेकाला प्रहार करून दोघांमध्यें प्रवृत्त झालेलें युद्ध' असा त्या बहुव्रीहीचा अर्थ समजला जाईल; जसें– केशेषु केशेषु गृहीत्वा इदं युद्धं प्रवृत्तं केशाकेशि युद्धम्; किंवा दण्डैश्च दण्डैश्च प्रहृत्य इदं युद्धं प्रवृत्तं दण्डा-

**तृतीयासप्तम्यन्तेषु च क्रियाभिधानात् ॥ १ ॥**

तृतीयासप्तम्यन्तेषु चाशिष्यो बहुव्रीहिः। किं कारणम्। क्रियाभिधानात्॥ क्रियाभिधीयते तत्रान्यपदार्थ इत्येव सिद्धम्॥

**न वैकशेषप्रतिषेधार्थम् ॥ २ ॥**

न वाशिष्यः। किं कारणम्। एकशेषप्रतिषेधार्थमिदं वक्तव्यम्॥

**पूर्वदीर्घार्थं च ॥ ३ ॥**

पूर्वदीर्घार्थं चेदं वक्तव्यम्। केशाकेशि॥ स्यादेतत्प्रयोजनं यदि नियोगतोऽस्यानेनैव दीर्घत्वं स्यात्। अथेदानीमन्येषामपि दृश्यते [६.३.१३७] इति दीर्घत्वं न प्रयोजनं भवति॥

**मत्वर्थे वा पूर्वस्य विधानात् ॥ ४ ॥**

अथवा मत्वर्थे पूर्वो योगोऽमत्वर्थोऽयमारम्भः॥

**कप्भावार्थं वा ॥ ५ ॥**

अथवा कप्मा भूदिति॥

**चार्थे द्वन्द्वः ॥ २ । २ । २९ ॥**

चार्थ इत्युच्यते चश्चाव्ययं तेन समासस्याव्ययसंज्ञा प्राप्नोति। नैष दोषः। पाठेनाव्ययसंज्ञा क्रियते न च समासस्तत्र पठ्यते॥ पाठेनाप्यव्ययसंज्ञायां सत्यामभिधेयवल्लिङ्गवचनानि भवन्ति यश्चेहार्थो-

---

पदांचा स्वतंत्र रीतीनें जो हा बहुव्रीहि सांगितला आहे तो सांगावयास नको.

काय कारण ?

केशाकेशि, दण्डादण्डि वगैरे समासानें युद्ध करणें या क्रियेचें प्रतिपादन केलें जात आहे. ती क्रिया अन्यपदार्थ असल्यामुळें पूर्वसूत्रानेंच तेथें बहुव्रीहि सिद्ध होत आहे.

(वा.२) हा बहुव्रीहि सांगावयास नको, असें म्हणतां येत नाहीं.

काय कारण ?

केशाकेशि वगैरें ठिकाणीं दोन्ही पदें सरूप असल्यामुळें एकशेष (१।२।६४) प्राप्त होतो. त्याचे बाधाकरितां स्वतंत्र रीतीनें बहुव्रीहीचें विधान केलें पाहिजे.

(वा.३) तसेंच पूर्वपदाला दीर्घ होण्याकरितांही 'तत्र तेनेदम्०' हें प्रकृत सूत्र केलें पाहिजे.

जर याच सूत्रानें दीर्घाचें विधान केलें असेल तर हें प्रयोजन बरोबर आहे. पण जर 'अन्येषामपि दृश्यते' (६।३।१३७) यानें येथें दीर्घ केला तर मात्र हें प्रयोजन म्हणतां येत नाहीं.

(वा.४) किंवा मत्वर्थी म्हणजे षष्ठ्यर्थी किंवा सप्तम्यर्थी पूर्वसूत्रानें बहुव्रीहीचें विधान केलें आहे, आणि केशाकेशि येथें युद्धक्रिया हा अन्य पदार्थ दाखविला तरी तो मत्वर्थ नसल्यामुळें पूर्वसूत्र येऊं शकत नाहीं; तेव्हां मत्वर्थव्यतिरिक्त अशा अर्थींही बहुव्रीहि होण्याकरितां हें सूत्र आरंभिलें आहे.

(वा.५) किंवा समासान्त कप्प्रत्यय न व्हावा यासाठीं हें सूत्र आरंभिलें आहे.

(सू.२९) चशब्दाच्या अर्थी[१] द्वंद्व होतो असें येथें म्हटलें आहे. च हा शब्द तर अव्यय आहे. तेव्हां त्याच्या अर्थी झालेल्या या द्वंद्वसमासालाही अव्ययसंज्ञा होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण ज्या शब्दांना अव्ययसंज्ञा होणें इष्ट आहे त्यांचा स्वरादि वगैरे गणामध्यें पाठ करून त्यांना अव्ययसंज्ञा केली जाते आणि द्वंद्वसमासाचा तर तेथें पाठ नाहीं.

स्वरादि गणामध्यें त्या त्या शब्दाचा प्रत्यक्ष

---

दण्डि युद्धम्.

१. चशब्दाचा जो अर्थ, म्हणजे इतरेतरयोग किंवा समाहार, या अर्थाला दाखविणारीं जीं अनेक सुबन्तें त्यांचा एकमेकांबरोबर द्वंद्वसमास विकल्पानें होतो; उदा०—घटश्च पटश्च घटपटौ; घटपटयोः समाहारः घटपटम्.

ऽभिधीयते न तस्य लिङ्गसंख्याभ्यां योगोऽस्ति॥ नेदं वाचनिकमलिङ्गतासंख्यता वा। किं तर्हि। स्वाभाविकमेतत्। तद्यथा। समानमीहमानानां चाधीयानानां च केचिदर्थैर्युज्यन्तेऽपरे न। न चेदानीं कश्चिदर्थवानिति कृत्वा सर्वैरर्थवद्भिः शक्यं भवितुं कश्चिद्वानर्थक इति सर्वैरनर्थकैः। तत्र किमस्माभिः शक्यं कर्तुम्। यत्प्राक्समासाच्चार्थस्य लिङ्गसंख्याभ्यां योगो नास्ति समासे च भवति स्वाभाविकमेतत्॥ अथवाश्रयतो लिङ्गवचनानि भविष्यन्ति। गुणवचनानां हि शब्दानामाश्रयतो लिङ्गवचनानि भवन्ति। तद्यथा। शुक्लं वस्त्रम् शुक्ला शाटी शुक्लः कम्बलः शुक्लौ कम्बलौ शुक्लाः कम्बला इति। यदसौ द्रव्यं श्रितो भवति गुणस्तस्य यल्लिङ्गं वचनं च तद्गुणस्यापि भवति। एवमिहापि यदसौ द्रव्यं श्रितो भवति समासस्तस्य यल्लिङ्गं वचनं च तत्समासस्यापि भविष्यति॥

अथेह कस्मान्न भवति। याज्ञिकश्चायं वैयाकरणश्च। कठश्चायं बह्वृचश्च। औक्थिकश्चायं मीमांसकश्चेति। शेष इति वर्ततेऽशेषत्वान्न भविष्यति॥ यदि शेष इति वर्तते

---

उल्लेख करून अव्ययसंज्ञा सांगितली आहे असें गृहीत धरिलें तेव्हां स्वरादि गणामध्यें ज्यांचा पाठ आहे त्यांनाच अव्ययसंज्ञा होते असें म्हटलें तरी लिंग आणि संख्या यांचा योग हा अर्थावरच अवलंबून राहील, आणि येथें चशब्दानें जो अर्थ दाखविला जातो त्या अर्थाला तर लिंगसंख्येचा संबंध नाहीं; तेव्हां द्वंद्वालाही लिंगसंख्येचा संबंध होणार नाहीं.

एखाद्या अर्थाला लिंगाचा व संख्येचा योग नसणें हें कांहीं वचनानें सांगितलें नाहीं; तर अर्थाच्या स्वभावावर अवलंबून आहे; जसें– अगदीं सारख्या प्रमाणांत अभ्यास करणाऱ्या अशा अनेक शिष्यांपैकीं कांहींना फलप्राप्ति होते व कांहींना तितकी होत नाहीं. आतां एखाद्याला फलप्राप्ति झाली म्हणून सर्वांना फलप्राप्ति होते असें शक्य नाहीं. किंवा एखाद्याला फलप्राप्ति झाली नाहीं म्हणून ती कोणालाच झाली नाहीं असेंही शक्य नाहीं. तेथें आम्हीं काय करावें? समासाच्या पूर्वी म्हणजे विग्रहवाक्यामध्यें चशब्दानें दाखविलेल्या अर्थाला लिंगसंख्येचा योग होत नाहीं, आणि समास केल्यानंतर त्या समासानें दाखविलेल्या त्याच अर्थाला लिंगसंख्येचा योग होतो; तेव्हां हें स्वभावावर अवलंबून आहे हेंच खरें.

किंवा गुणवाचक शब्दांप्रमाणें आश्रयाला अनुसरून लिंगवचनें होतील. गुणवाचक शब्दांना त्या गुणाच्या आश्रयाच्या ठिकाणीं असलेलीं लिंगवचनें लागू होतात; जसें– शुक्लं वस्त्रम्, शुक्ला शाटी, शुक्लः कम्बलः, शुक्लौ कम्बलौ, शुक्लाः कम्बलाः, येथें शुक्ल हा गुण ज्या द्रव्याचा आश्रय करून आहे त्या द्रव्याचीं जीं लिंगवचनें तीं गुणवाचकाला लागू होतात. त्याप्रमाणें येथेंही समासाचा अर्थ ज्या द्रव्याचा आश्रय करून आहे त्या द्रव्यासंबंधीं जें लिंग किंवा वचन तें समासालाही लागू होईल.

आतां याज्ञिकश्चायं वैयाकरणश्च, कठश्चायं बह्वृचश्च, औक्थिकश्चायं मीमांसकश्च, येथें कां बरें द्वंद्व होत नाहीं?

'शेषो बहुव्रीहिः' येथून शेषपद येथें अनुवृत्त आहे. तेव्हां वरील उदाहरणांत दाखल केलेलीं पदें शेषें नसल्यामुळें तेथें द्वंद्व येऊं

---

२. याज्ञिक असून व्याकरण जाणणारा जो पुरुष त्याचे ठिकाणीं याज्ञिकत्व, वैयाकरणत्व, या अनेक धर्मांचा समुच्चय चशब्द दाखवीत आहे, तेव्हां चार्थ असल्यामुळें द्वंद्व होऊं लागेल.

३. 'विशेषणं विशेष्येण०' (२।१।५७) येथें विशेषणविशेष्यवाचक पदांचा समाससंज्ञेकडे उपयोग

उपास्नातं स्थूलसिक्तं तूष्णींगङ्गं महाह्रदम् ।
द्रोणं चेदशको गन्तुं मा त्वा ताप्सीं कृताकृते ॥
इत्येतन्न सिध्यति । नैष दोषः । अन्यद्धि कृतमन्यदकृतम् ॥
**चार्थे द्वन्द्ववचनेऽसमासेऽपि चार्थसंप्रत्ययादनिष्टप्रसङ्गः ॥ १ ॥**
चार्थे द्वन्द्ववचनेऽसमासेऽपि चार्थसंप्रत्ययादनिष्टं प्राप्नोति ।
अहरहर्नयमानो गामश्वं पुरुषं पशुम् ।
वैवस्वतो न तृप्यति सुराया इव दुर्मदी ॥
इन्द्रस्त्वष्टा वरुणो वायुरादित्य इति ॥
**सिद्धं तु युगपदधिकरणवचने द्वन्द्व-**

---

शकणार नाहीं.

जर येथें शेषपद अनुवृत्त आहे तर—

'उपास्नात वगैरे नांवाची पांच तीर्थें आहेत. त्या तीर्थांचे ठिकाणीं जाण्याविषयीं जर तूं समर्थ झाला आहेस तर आतां तुला पुण्य आणि पाप हीं पीडा करूं शकत नाहींत', येथें कृताकृते हा द्वंद्वसमास केला आहे तो साधत नाहीं.

हा दोष नाहीं. कारण कृत म्ह. पुण्य हें निराळें आणि अकृत म्ह. पाप हें निराळें.

(वा.१) चशब्दाच्या अर्थीं द्वंद्वसमासाचें विधान केलें तर ज्या ठिकाणीं द्वंद्व होत नसतो त्याठिकाणींही चशब्दाचा अर्थ जुळत असल्यामुळें द्वंद्वसमास होऊं लागेल; जसें– अहरहः इत्या. 'मदोन्मत्त मनुष्य जसा सुरापानानें तृप्त होत नाहीं तसा दररोज बैल, घोडे, वगैरे पशूंना आणि पुरुषांना यमसदनाला नेणारा अंतक हा तृप्त होत नाहीं'. येथें गो, अश्व, वगैरे.

इन्द्रस्त्वष्टा वरुणो वायुरादित्यः वगैरे.

(वा.२) हें सिद्ध होत आहे.

---

झाला असल्यामुळें पूर्वीं दाखल केलेलीं पदें शेष होऊं शकत नाहींत.

४. कृताकृते या क्तप्रत्यान्त पदांचा 'क्तेन नञ्विशिष्टेनानञ्' (२।१।६०) या सूत्रानें समासविधीकडे उपयोग केला असल्यामुळें कृत आणि अकृत या पदांना शेष म्हणतां येत नाहीं. तेव्हां तेथें द्वंद्व होणार नाहीं.

५. म्हणजे जें कृत तेंच अकृत असा कृताकृत या उभयतांचा एकच अर्थ नाहीं, आणि 'क्तेन नञ्विशिष्टेनानञ्' या सूत्रानें सांगितलेल्या समासाकडे एकाच अर्थाला दाखविणाऱ्या कृताकृतशब्दांचा उपयोग झाला आहे, तेव्हां पुण्यपापरूप वेगवेगळया अर्थाला दाखविणारे कृताकृतशब्द शेषच ठरत आहेत.

६. सूत्रांतील चार्थे याचा सुबन्ताकडे संबंध न होतां द्वंद्वः याकडे संबंध होत आहे असें गृहीत धरून ही शंका केली आहे. जसा समूह या अर्थीं अण्प्रत्यय (४।२।३७) सांगितला आहे तसा हा चार्थीं द्वंद्व सांगितला आहे, असा अर्थामध्यें फरक झाल्यामुळें ह्या वेळीं सामर्थ्य हें अनेक सुबन्तांचें एकमेकांशीं न पाहतां त्या सुबन्तांचें चार्थाशीं सामर्थ्य असलें पाहिजे, असें होईल. तेव्हां जसें 'वपुः काकानाम्, समूहो बकानाम्'. येथें काकांचा समूहाशीं संबंध नाहीं म्हणून सामर्थ्य नसल्यामुळें अण्प्रत्यय होत नाहीं. तसा ज्या ठिकाणीं चार्थ म्हणजे समुदाय हा सुबन्ताच्या अर्थाचा विवक्षित नसेल तेथें द्वंद्व होणार नाहीं, परंतु ज्या ठिकाणीं अनेक सुबन्तांचें एकमेकांशीं सामर्थ्य नसेल तेथें द्वंद्वसमास होऊं लागेल. याच अभिप्रायानें गाम्, अश्वम्, पुरुषम्, येथें दोष दाखविला आहे. येथें गाम्, अश्वम्, इत्यादि अनेक सुबन्तांचें एकमेकांशीं सामर्थ्य नाहीं. कारण येथें गो, अश्व, वगैरे प्रत्येकाचा स्वतंत्र रीतीनें नयमानः याकडे अन्वय आहे. यालाच समुच्चय असें म्हणतात. परस्परांची अपेक्षा न धरतां अनेकांचा एकावर अन्वय होणें हा समुच्चय होय, हा 'च' याचा अर्थ आहे. परस्परांच्या अपेक्षेनें जो अनेकांचा एकावर अन्वय होणें याला इतरेतरयोग किंवा समाहार म्हणतात. या दोन्ही ठिकाणींच द्वंद्व समास इष्ट आहे. अनेक पदार्थ असतील तेथें परस्परांच्या अपेक्षेनें इतरावर अन्वय करणें किंवा स्वतंत्र रीतीनें निरनिराळा अन्वय करणें हें वक्त्याच्या इच्छेवर अवलंबून आहे.

## वचनात् ॥ २ ॥

सिद्धमेतत् । कथम् । युगपदधिकरणवचने द्वन्द्वो भवतीति वक्तव्यम् ॥

## तत्र पुंवद्भावप्रतिषेधः ॥ ३ ॥

तत्रैतस्मिँल्लक्षणे पुंवद्भावस्य प्रतिषेधो वक्तव्यः । पट्वीमृद्व्यौ । समानाधिकरणलक्षणः पुंवद्भावः प्राप्नोति ॥

## विप्रतिषिद्धेषु चानुपपत्तिः ॥ ४ ॥

विप्रतिषिद्धेषु युगपदधिकरणवचनताया अनुपपत्तिः । शीतोष्णे सुखदुःखे जननमरणे । किं कारणम् । सुखप्रतिघातेन हि दुःखं दुःखप्रतिघातेन च सुखम् ॥ यत्तावदुच्यते तत्र पुंवद्भावप्रतिषेध इति । इदं तावदयं प्रष्टव्यः । अथेह कस्मान्न भवति । दर्शनीयाया माता दर्शनीयामातेति । अथ मतमेतत्प्राक्समासाद्यत्र सामानाधिकरण्यं तत्र पुंवद्भावो भवतीतीहापि न दोषो भवति ॥ यदप्युच्यते विप्रतिषिद्धेषु चानुपपत्तिरिति । सर्व एव हि शब्दा विप्रतिषिद्धाः । इहापि प्लक्षन्यग्रोधाविति प्लक्षशब्दः प्रयुज्यमानः प्लक्षार्थं संप्रत्याययति न्यग्रोधार्थं निवर्तयति न्यग्रोधशब्दः प्रयुज्यमानो न्यग्रोधार्थं संप्रत्याययति प्लक्षार्थं निवर्तयति । अत्र

---

तें कसें ?

'युगपदधिकरणवचने[७] द्वंद्वः' असें सूत्र करावें. म्हणजे ज्या अनेक शब्दांपैकीं प्रत्येक शब्द त्या सर्व शब्दांचा अर्थ एकदम दाखवीत असतो त्याच अनेक शब्दांचा द्वंद्व होतो, असें सूत्र करावें.

(वा.३) तसें सूत्र केलें असतां द्वंद्वसमासामध्यें पुंवद्भावाच्या प्रतिषेधादाखल वचन करावयास पाहिजे; जसें—पट्वी च मृद्वी च पट्वीमृद्व्यौ; येथें पट्वी आणि मृद्वी हे दोन्ही शब्द प्रत्येकीं 'पट्वीमृद्वी' या समुदायाला दाखवीत आहेत. तेव्हां दोन्ही शब्द समानाधिकरण होत असल्यामुळें पुंवद्भाव (३।३।३४) होऊं लागेल.

(वा.४) परस्परविरोधी अशा अर्थांना दाखविणाऱ्या अनेक शब्दांपैकीं प्रत्येक शब्दानें ते अनेक अर्थ दाखविणें संभवत नाहीं; जसें—शीतोष्णे, सुखदुःखे, जननमरणे.

काय कारण ?

सुख बाजूला सारून दुःख उद्भवतें व दुःख बाजूला सारून सुख उद्भवतें म्हणून.

आतां जें म्हटलें आहे की— पट्वीमृद्व्यौ येथें पुंवद्भावाच्या प्रतिषेधादाखल वचन केलें पाहिजे, पण अगोदर त्याला असें विचारावें की दर्शनीयाया माता 'दर्शनीयामाता' येथें पुंवद्भाव कां बरें होत नाहीं ?

आतां जर असा समज असेल की जेथें समासाच्या पूर्वी सामानाधिकरण्य असतें तेथेंच पुंवद्भाव होतो, तर पट्वीमृद्व्यौ येथेंही दोष येत नाहीं.

आणखीही जें म्हटलें आहे की परस्परविरुद्ध अशा अर्थाला दाखविणाऱ्या अनेक शब्दांपैकीं प्रत्येक शब्दानें ते अनेक अर्थ दाखविणें संभवत नाहीं. त्यावर उत्तर— सगळेच शब्द परस्परविरोधी अशा अर्थाला दाखवितात; जसें— प्लक्षन्यग्रोधौ; येथें प्लक्षशब्द उच्चारला म्हणजे तो न्यग्रोध वगैरे इतर अर्थ बाजूला सारून प्लक्ष हा अर्थ मनांत आणून

---

७. घटपट या द्वंद्वामध्यें घट या शब्दाचा घटपट इतका अर्थ आहे, आणि पटशब्दाचाही तितका अर्थ आहे. अनेक शब्दांना एकमेकांच्या संनिधानानें प्रत्येकीं त्या अनेक अर्थांचें प्रतिपादन करतां येणें याला युगपदधिकरणवचन म्हणतात.

८. परस्परविरोधी अशा अनेक पदार्थांचें एककालीं अस्तित्व संभवत नाहीं. त्यामुळें तसले अनेक अर्थ एका शब्दानें एकदम दाखविणें शक्य नाहीं.

९. अनेक शब्दांपैकीं प्रत्येक शब्दाला इतर शब्दाच्या सांनिध्यामुळें अनेक शब्दांचा अर्थ असतो, ही गोष्ट द्वंद्वाप्रमाणें तत्पुरुषामध्येंही मानतां येते,

चेद्युक्ता युगपदधिकरणवचनता दृश्यत इहापि युक्ता दृश्यताम् ॥

एवमपि शब्दपौर्वापर्यप्रयोगादर्थपौर्वापर्याभिधानम् । शब्दपौर्वापर्यप्रयोगादर्थपौर्वापर्याभिधानं प्राप्नोति । अतः किम् । युगपदधिकरणवचनताया अनुपपत्तिः । प्लक्षन्यग्रोधौ प्लक्षन्यग्रोधा इति । यथैव हि शब्दानां पौर्वापर्यं तद्वदर्थानामपि भवितव्यम् ।

**शब्दपौर्वापर्यप्रयोगादर्थपौर्वापर्याभिधानमिति चेद्द्विवचनबहुवचनानुपपत्तिः ॥ ५ ॥**

शब्दपौर्वापर्यप्रयोगादर्थपौर्वापर्याभिधानमिति चेद्द्विवचनबहुवचनयोरनुपपत्तिः । प्लक्षन्यग्रोधौ प्लक्षन्यग्रोधा इति प्लक्षशब्दः सार्थको निवृत्तो न्यग्रोधशब्द उपस्थित एकार्थस्तस्यैकार्थत्वादेकवचनमेव प्राप्नोति ॥

**विग्रहे च युगपद्वचनं ज्ञापकं युगपद्वचनस्य ॥ ६ ॥**

विग्रहे खल्वपि युगपद्वचनता दृश्यते । द्यावा ह क्षामा । द्यावा चिदस्मै पृथिवी

---

देतो. तेव्हां येथें जर प्रत्येक शब्द त्या अनेक अर्थांना एककालीं योग्य रीतीनें दाखवूं शकतो, तर शीतोष्णे, सुखदुःखे इत्यादि स्थलींही प्रत्येक शब्द त्या अनेक अर्थांना दाखवितो हें योग्य ठरणारच.

[10]असें असलें तरी शब्दांचा प्रयोग पौर्वापर्यक्रमानें होत असल्यामुळें त्या शब्दांचा अर्थही पौर्वापर्यक्रमानेंच मनांत येणार आहे.

क्रमानें अर्थ मनांत आल्यापासून काय बिघाड होत आहे?

प्रत्येक शब्दापासून अनेक अर्थांचा बोध एकदम होणार नाहीं; जसें— प्लक्षन्यग्रोधौ; येथें शब्दांमध्यें जसा पौर्वापर्यक्रम आहे त्याप्रमाणें प्रत्येक शब्दापासून मनांत येणाऱ्या अनेक अर्थांमध्येंही क्रम असणारच.[11]

(वा.५)शब्दांचा पौर्वापर्यक्रमानें प्रयोग केला जात असल्यामुळें अर्थही पौर्वापर्यक्रमानेंच मनांत येतो असें म्हटलें तर प्लक्षन्यग्रोधौ, प्लक्षन्यग्रोधाः, येथें द्विवचन आणि बहुवचन करतां येणार नाहीं. कारण आपल्या अर्थासह प्लक्षशब्द निवृत्त होतो आणि मागून एकाच अर्थाचा एकटा न्यग्रोधशब्द मनांत येतो, तो एकाच अर्थाचा असल्यामुळें एकवचन प्राप्त होत आहे.[12]

(वा.६) वाक्यामध्यें देखील एकच शब्द एकदम अनेक अर्थांना दाखवितो असें दिसतें; जसें— द्यावा[13] ह क्षामा, द्यावा चिदस्मै पृथिवी

---

१०. 'युगपदधिकरणवचन' या पक्षावर जे दोन दोष, पुंवद्भाव होऊं लागेल आणि विरुद्ध दोन अर्थ एका शब्दानें दाखवितां येणार नाहींत, असे दाखविले ते दूर केले तरी पण ते अनेक अर्थ जरी एका शब्दानें दाखविले तरी एकदम दाखवितां येणार नाहींत, असा दोष येतोच.

११. प्लक्ष, न्यग्रोध, या दोन शब्दांपासून जो अर्थ मनांत येतो तो अर्थ त्यांतील प्रत्येक शब्दापासून एकदम मनांत येतो हा युगपदधिकरणवचनपक्ष होय. तेव्हां त्या दोन शब्दांपासून क्रमानें मनांत येतो तर अर्थातच त्या प्रत्येक शब्दापासूनही क्रमानेंच मनांत येणार आहे.

१२. पौर्वापर्यक्रमानेंच अर्थ मनांत येतो म्हणजे प्लक्ष हा अर्थ मनांतून निवृत्त होऊन न्यग्रोधशब्दार्थ मनांत येतो, म्हणून द्विवचन जुळून येणार नाहीं.

१३. द्योशब्द हा द्युलोक आणि भूलोक या दोन अर्थांला एकदम दाखवितो, म्हणूनच येथें द्योशब्दाहून द्विवचन झालें आहे. द्यावा हें प्रथमाद्विवचन आहे. द्योशब्दाच्या पुढील औप्रत्ययाला आकार-आदेश (७।१।३९), णित्अतिदेश (७।१।९०), वृद्धि (७।२।११५), आव्आदेश (६।१।७८) होऊन द्यावा असें रूप होतें. पृथिवीशब्दाचेही तेच दोन अर्थ आहेत. पृथिवी हेंही प्रथमेचें द्विवचनच आहे;

नमेते इति। किमेतत्। युगपदधिकरणवचनताया उपोद्बलकम्। विग्रहे किल नाम युगपदधिकरणवचनता स्यात्किं पुनः समासे॥

समुदायात्सिद्धम्। समुदायात्सिद्धमेतत्। किमेतत्समुदायात्सिद्धमिति। द्विवचनबहुवचनप्रसिद्धिरिति चोदितं तस्यायं परिहारः।

**समुदायात्सिद्धमिति चेन्नैकार्थत्वात्समुदायस्य॥ ७॥**

समुदायात्सिद्धमिति चेत्तन्न। किं कारणम्। एकार्थत्वात्समुदायस्य। एकार्था हि समुदाया भवन्ति। तद्यथा। शतम् यूथम् वनमिति॥ नैकार्थ्यम्। नायमेकार्थः। किं तर्हि। द्व्यर्थो बह्वर्थश्च। प्लक्षोऽपि द्व्यर्थो न्यग्रोधोऽपि द्व्यर्थः। यदि तर्हि प्लक्षोऽपि द्व्यर्थो न्यग्रोधोऽपि द्व्यर्थस्तयोरनेकार्थत्वाद्बहुवचनप्रसङ्गः। तयोरनेकार्थत्वाद्बहुषु बहुवचनम् [१.४.२१] इति बहुवचनं प्राप्नोति।

**तयोरनेकार्थत्वाद्बहुवचनप्रसङ्ग इति चेन्न बहुत्वाभावात्॥ ८॥**

तयोरनेकार्थत्वाद्बहुवचनप्रसङ्ग इति चेत्तन्न। किं कारणम्। बहुत्वाभावात्। नात्र बहुत्वमस्ति। किमुच्यते बहुत्वाभावादिति यावतेदानीमेवोक्तं प्लक्षोऽपि द्व्य-

---

नमेते.

द्यावा ह क्षामा इत्यादिकाचा उपन्यास हें काय आहे ?

'युगपदधिकरणवचन' या पक्षाला पोषक असें हें एक उदाहरण दाखविलें आहे. तें असें की— वाक्यामध्यें सुद्धां जर एक शब्द अनेक अर्थांना एकदम दाखवितो तर मग समासामध्यें प्रत्येक शब्दाला तसें सहजच मानतां येईल.

द्वंद्वसमासानें समुदाय या अर्थाचें प्रतिपादन केलें जात असल्यामुळें हें सिद्ध होत आहे.

समुदायाचें अभिधान केलें जात असल्यामुळें सिद्ध होतें असें जें म्हटलें तें काय सिद्ध होतें ?

द्वंद्वांतील प्रत्येक शब्दाला एका वेळीं अनेकार्थाभिधायित्व नाहीं असें समजून द्वंद्वाहून द्विवचन किंवा बहुवचन सिद्ध होत नाहीं, असा जो दोष दिला त्याचा हा परिहार आहे.

(वा.७) द्वंद्वसमासानें समुदाय या अर्थाचें अभिधान केलें जात असल्यामुळें त्याहून द्विवचनादि सिद्ध होतें असें म्हणणें बरोबर नाहीं.

काय कारण ?

समुदायरूप अर्थ हा एकच असतो म्हणून; जसें— शतं, यूथं, वनम्, वगैरे. येथें समुदायरूप अर्थाला दाखविणाऱ्या शत वगैरे शब्दांच्या पुढें एकवचन दृष्टीस पडत आहे.

पण द्वंद्वांतील प्रत्येक शब्द एकाच अर्थाचा नाहीं तर दोन अर्थांचा किंवा बहुत अर्थांचा आहे. प्लक्षशब्दही दोन अर्थांचा आहे आणि न्यग्रोधशब्दही दोन अर्थांचा आहे.

जर प्लक्षशब्दही दोन अर्थांचा आणि न्यग्रोधशब्दही दोन अर्थांचा असेल तर प्लक्ष व न्यग्रोध या दोन्ही शब्दांना दोन दोन अर्थ असल्यामुळें 'बहुत अर्थांकरितां बहुवचन घालावें' (१।४।२१) या सूत्रानें बहुवचन प्राप्त होत आहे.

(वा.८) प्लक्ष व न्यग्रोध या दोन्ही शब्दांना दोन दोन अर्थ असल्यामुळें बहुवचनाचा प्रसङ्ग येतो असें म्हणणें असेल तर बरोबर नाहीं.

काय कारण ?

येथें बहुत्व नाहीं म्हणून.

बहुत्व नाहीं असें कसें म्हणतां ? कारण

---

त्याला पूर्वसवर्ण झाला आहे (७।१।३९).

र्थो न्यग्रोधोऽपि द्व्यर्थ इति । याभ्यामेवार्थाभ्यामेको द्व्यर्थस्ताभ्यामेवापरोऽपि ॥ यद्येवमन्यवाचकेनान्यस्य वचनानुपपत्तिः । अन्यवाचकेन शब्देनान्यस्य वचनं नोपपद्यते ।

**अन्यवाचकेनान्यस्य वचनानुपपत्तिरिति चेत्प्लक्षस्य न्यग्रोधत्वान्न्यग्रोधस्य प्लक्षत्वात्स्वशब्देनाभिधानम् ॥ ९ ॥**

अन्यवाचकेनान्यस्य वचनानुपपत्तिरिति चेदेवमुच्यते तन्न । किं कारणम् । प्लक्षस्य न्यग्रोधत्वान्न्यग्रोधस्य प्लक्षत्वात्स्वशब्देनाभिधानं भविष्यति । प्लक्षोऽपि न्यग्रोधो न्यग्रोधोऽपि प्लक्षः ॥ कथं पुनः प्लक्षोऽपि न्यग्रोधो न्यग्रोधोऽपि प्लक्षः स्याद्यावता कारणाद्द्रव्ये शब्दनिवेशः ।

**कारणाद्द्रव्ये शब्दनिवेश इति चेत्तुल्यकारणत्वात्सिद्धम् ॥ १० ॥**

कारणाद्द्रव्ये शब्दनिवेश इति चेदेवमुच्यते तन्न । तुल्यकारणत्वात्सिद्धम् । तुल्यं हि कारणम् । यदि तावत्प्रक्षरतीति प्लक्षः स्यान्न्यग्रोधेऽप्येतद्भवति । तथा यदि न्यग्रोहतीति न्यग्रोधः प्लक्षेऽप्येत-

---

प्लक्षशब्दही दोन अर्थांचा आहे आणि न्यग्रोधशब्दही दोन अर्थांचा आहे असें आतां नुकतेंच म्हटलें आहे ना ?

ज्या दोन अर्थांमुळें येथें प्लक्ष हा शब्द दोन अर्थांचा आहे त्याच दोन अर्थांमुळें न्यग्रोध हा शब्द दोन अर्थांचा होतें[१४] आहे.

असें आहे तर–

एका अर्थाला[१५] दाखविणाऱ्या शब्दानें अन्य अर्थ दाखविणें हें जुळून येत नाहीं[१६].

(वा.९)एका अर्थाला दाखविणाऱ्या शब्दानें विजातीय दुसरा अर्थ दाखविणें शक्य नाहीं असें म्हणणें असेल तर तें बरोबर नाहीं.

काय कारण ?

प्लक्षही न्यग्रोध आहे आणि न्यग्रोधही प्लक्ष आहे[१७]. तेव्हां हे दोन्ही अर्थ दोन्ही शब्दांचे स्वतःचेच आहेत म्हणून.

पण प्लक्ष हा न्यग्रोध आणि न्यग्रोध हा प्लक्ष कसा बरें होऊं शकतो ? कारण कांहीं तरी कारणामुळेंच त्या त्या पदार्थाला तो तो शब्द लागत असतो.

(वा.१०)कांहीं तरी कारणामुळेंच त्या त्या पदार्थाला तो तो शब्द लागत असतो असें असेल तर आम्ही असें म्हणतों की तें तुमचें म्हणणें बरोबर नाहीं. कारण येथें त्या दोन्ही पदार्थांना दोन्ही शब्द लागण्याचें कारण सारखेंच आहे. असें पहा की प्रक्षरतीति प्लक्षः, म्हणजे विस्तृत होणारा पदार्थ. या व्युत्पत्तीवरून जर प्लक्षशब्दाचा अर्थ ठरविला असेल तर न्यग्रोधवृक्षही त्या प्लक्षशब्दाचा अर्थ होऊं शकेल. तसेंच जर न्यग्रोहतीति न्यग्रोधः म्हणजे ज्याला खालीं शाखा फुटतात तो पदार्थ, या व्युत्पत्तीवरून न्यग्रोधशब्दाचा अर्थ ठरविला असेल तर प्लक्ष हाही न्यग्रोधशब्दाचा अर्थ होऊं शकेल.

पण लोकांमध्यें अमुक शब्द अमुक अर्थी वापरलेला दृष्टीस पडणें हेंच अमुक शब्द अमुक अर्थी आहे असें ठरविण्याचें मुख्य कारण आहे, आणि न्यग्रोध या अर्थी तर

---

१४. तेव्हां हे निरनिराळे असे चार पदार्थ येथें होत नाहींत. तेव्हां बहुवचन होणार नाहीं.

१५. युगपदधिकरणवचन (टीप ११ पहा) या पक्षावर आलेले दोन दोष पूर्वी दूर केले. त्यानंतर दाखविलेले जे 'दोन अर्थ एकदम दाखवितां येणार नाहींत आणि द्वंद्वाहून द्विवचनबहुवचन होणार नाहीं' असे दोन दोष तेही दूर केले. आतां येथून त्या पक्षावर निराळा दोष दाखवीत आहेत.

१६. लोकांतील प्रयोगावरून अमुक. शब्दाचा अमुक एक अर्थ आहे असें ठरवावयाचें असतें. तेव्हां प्लक्ष हा शब्द न्यग्रोधाला आणि न्यग्रोध हा प्लक्षाला दाखवितो हें म्हणणें योग्य नाहीं.

१७. प्लक्षालाही न्यग्रोध म्हणतां येतें आणि न्यग्रोधालाही प्लक्ष म्हणतां येतें.

द्भवति ॥ दर्शनं वै हेतुर्न च न्यग्रोधे प्लक्षशब्दो दृश्यते ।

**दर्शनं हेतुरिति चेत्तुल्यम् ॥ ११ ॥**

दर्शनं हेतुरिति चेत्तुल्यमेतद्भवति । प्लक्षेऽपि न्यग्रोधशब्दो दृश्यतां तुल्यं हि कारणम् ॥ न वै लोक एष संप्रत्ययो भवति । न हि प्लक्ष आनीयतामित्युक्ते न्यग्रोध आनीयते ।

**तद्विषयं च ॥ १२ ॥**

तद्विषयं चैतद्द्रष्टव्यं प्लक्षस्य न्यग्रोधत्वम् । किंविषयम् । द्वन्द्वविषयम् ॥ युक्तं पुनर्यन्नियतविषया नाम शब्दाः स्युः । बाढं युक्तम् ।

**अन्यत्रापि तद्विषयदर्शनात् ॥ १३ ॥**

अन्यत्रापि हि नियतविषयाः शब्दा दृश्यन्ते । तद्यथा । समाने रक्ते वर्णे गौर्लोहित इति भवत्यश्वः शोण इति । समाने च काले वर्णे गौः कृष्ण इति भवत्यश्वो हेम इति । समाने च शुक्ले वर्णे गौः श्वेत इति भवत्यश्वः कर्क इति ॥ यदि तर्हि प्लक्षोऽपि न्यग्रोधो न्यग्रोधोऽपि प्लक्ष एकेनोक्तत्वादपरस्य प्रयोगोऽनुपपन्नः । एकेनोक्तत्वात्तस्यार्थस्यापरस्य प्रयोगो नोपपद्यते । प्लक्षेण न्यग्रोधस्य न्यग्रोधप्रयोगः ।

**एकेनोक्तत्वादपरस्य प्रयोगोऽनुपपन्न इति चेदनुक्तत्वात्प्लक्षेण न्यग्रोधस्य न्यग्रोधप्रयोगः ॥ १४ ॥**

---

प्लक्षशब्द वापरलेला दिसून येत नाहीं.

(वा. ११) तो शब्द त्या अर्थी वापरल्याचें दिसून येणें हें जर अमुक शब्द अमुक अर्थी आहे असें ठरविण्याचें कारण असेल तर तें कारण दोन्हीकडे सारखेंच आहे. म्हणजे प्लक्ष या अर्थीही न्यग्रोधशब्दाचा प्रयोग दिसतो व न्यग्रोध या अर्थीही प्लक्षशब्दाचा प्रयोग दिसतो.

पण लोकांमध्यें प्लक्षशब्दापासून न्यग्रोधवृक्ष मनांत येत नाहीं. कारण प्लक्ष आनीयताम् म्ह. प्लक्ष घेऊन ये असें सांगितलें असतां न्यग्रोधवृक्ष आणिला जात नाहीं.

प्लक्ष हा न्यग्रोधशब्दानेंही दाखविला जातो हें म्हणणें तेवढ्यापुरतेंच आहे असें समजावें.

तेवढ्यापुरतें म्हणजे कोणापुरतें ?

द्वंद्वसमासापुरतें; म्हणजे द्वंद्वांतील त्या शब्दांनाच ते तसे अर्थ दिसतात.

पण शब्दानें विशेष ठिकाणींच एखादा अर्थ दाखवावा हें म्हणणें योग्य आहे काय ?

होय, खास योग्य आहे.

(वा. १३) कारण इतर शब्दांसंबंधानेंही असें दृष्टीस पडतें. कांहीं शब्द असे आहेत की जे ठराविक ठिकाणींच आपल्या अर्थी उपयोगांत येतात; जसें– बैल आणि घोडा हे दोन्ही सारखेच तांबड्या रंगाचे आहेत, पण त्या तांबड्या रंगामुळें लागणारा लोहितशब्द बैलालाच लावलेला दिसतो; आणि शोण हा शब्द घोड्यालाच लावलेला दिसतो, तसेंच दोन्ही ठिकाणीं काळा रंग सारखाच असतां त्या रंगामुळें लागणारा कृष्णशब्द बैलालाच लावलेला दिसतो आणि हेम हा शब्द घोड्यालाच लावलेला दिसतो. याचप्रमाणें पांढरा रंग दोन्ही ठिकाणीं सारखाच असतां त्या रंगामुळें लागणारा श्वेतशब्द बैलालाच लावलेला दिसतो, आणि कर्क हा शब्द घोड्यालाच लावलेला दिसतो.

जर प्लक्षही न्यग्रोधशब्दाचा अर्थ असेल आणि न्यग्रोधही प्लक्षशब्दाचा अर्थ असेल तर एकाच शब्दानें ते दोन्ही अर्थ दाखविले असल्यामुळें त्याच अर्थी पुनः दुसऱ्या शब्दाचा प्रयोग करण्याचें कारण नाहीं. प्लक्षशब्दानेंच न्यग्रोध हाही अर्थ दाखविला असल्यामुळें तेथें न्यग्रोधशब्दाचा प्रयोग बरोबर होणार नाहीं.

(वा. १४) एकाच शब्दानें ते दोन्ही अर्थ दाखविले असल्यामुळें त्याच अर्थी पुनः दुसऱ्या शब्दाचा प्रयोग करण्याचें कारण नाहीं, असें

एकेनोक्तत्वादपरस्य प्रयोगोऽनुपपन्न इति चेत्तन्न । किं कारणम् । अनुक्तत्वात्प्लक्षेण न्यग्रोधस्य न्यग्रोधप्रयोगः । अनुक्तः प्लक्षेण न्यग्रोधार्थ इति कृत्वा न्यग्रोधशब्दः प्रयुज्यते । कथमनुक्तो यावतेदानीमेवोक्तं प्लक्षोऽपि न्यग्रोधो न्यग्रोधोऽपि प्लक्ष इति । सहभूतावेतावन्योन्यस्यार्थमाहतुर्न पृथग्भूतौ । किं पुनः कारणं सहभूतावेतावन्योन्यस्यार्थमाहतुर्न पुनः पृथग्भूतौ ।

**अभिधानं पुनः स्वाभाविकम् ॥१५॥**

स्वाभाविकमभिधानम् ॥ अथवेह कौचित्प्राथमकल्पिकौ प्लक्षन्यग्रोधौ कौचित्क्रियया वा गुणेन वा प्लक्ष इवायं प्लक्षो न्यग्रोध इवायं न्यग्रोध इति । तत्र प्लक्षावित्युक्ते संदेहः स्यात्किमिमौ प्लक्षावेवाहोस्वित्प्लक्षन्यग्रोधाविति । तत्रासंदेहार्थं न्यग्रोधशब्दः प्रयुज्यते ॥

इयं युगपदधिकरणवचनता नाम दुःखा च दुरुपपादा च । यच्चाप्यस्या निबन्धनमुक्तं द्यावा ह क्षामेति तदपि च्छान्दसं तत्र सुपां सुपो भवन्तीत्येव सिद्धम् ।

---

जें म्हटलें तें बरोबर नाहीं.

काय कारण ?

प्लक्षशब्दानें न्यग्रोध हा अर्थ दाखविला नसल्यामुळें न्यग्रोधशब्दाचा प्रयोग करणें ओघानेंच प्राप्त होत आहे.

पण प्लक्षशब्दानें न्यग्रोध हा अर्थ दाखविला नाहीं असें कसें बरें म्हणतां येईल ? कारण आतां नुकतेंच सांगितलें की प्लक्षही न्यग्रोधशब्दाचा अर्थ आहे व न्यग्रोधही प्लक्षशब्दाचा अर्थ आहे.

एकमेकांच्या अगदीं जवळ असलेले असेच प्लक्ष आणि न्यग्रोध हे शब्द परस्परांचा अर्थ दाखवूं शकतात. तेच फुटकळ झाले असतां एकमेकांच्या अर्थाला दाखवूं शकत नाहींत.

पण याचें काय बरें कारण की एकमेकाच्या अगदी जवळ असलेलेच परस्पराच्या अर्थाला दाखवितात आणि तेच फुटकळ झाले असतां एकमेकांच्या अर्थाला दाखवीत नाहींत ?

(वा. १५) अर्थाचें प्रतिपादन करणें हें शब्दशक्तिस्वभावावर अवलंबून आहे. अथवा[18] प्लक्ष आणि न्यग्रोध ह्या नांवानें प्रसिद्ध असलेले जे वृक्ष ते प्लक्ष आणि न्यग्रोध या शब्दांचे मुख्य अर्थ होत आणि क्रियेमुळें किंवा गुणामुळें त्या मुख्यार्थासारखे जे दुसरे वृक्ष ते त्या शब्दांचे गौण अर्थ होत. तेव्हां प्लक्षन्यग्रोधौ ह्याच्याऐवजीं प्लक्षौ असें द्विवचनान्त पद उच्चारलें असतां संशय येतो की हे दोन्ही मुख्यच प्लक्ष आहेत किंवा एक मुख्य आणि एक गौण म्हणजे प्लक्षासारखा न्यग्रोध असे ते दोन आहेत. हा संशय दूर होण्यासाठीं न्यग्रोधशब्दाचा प्रयोग केला जातो. याप्रमाणें युगपदधिकरणवचनपक्षावरील दोष कसे तरी दूर करतां आले तरी एकंदरींत विचार केला असतां हा पक्ष अत्यन्त क्लेशकारक आहे[19] आणि प्रमाणसिद्धही ठरत नाहीं.

आतां जें या युगपदधिकरणवचनपक्षाला पोषक म्हणून 'द्यावा ह क्षमा' हें उदाहरण दाखविलें आहे तें वैदिक उदाहरण आहे. तेव्हां तेथें 'सुपां सुलुक्' (७।१।३९) या सूत्रानें द्योशब्दापुढील प्रथमेच्या एकवचनाचे स्थानीं आकारादेश केला असतांही तें उदाहरण

---

१८. 'प्लक्ष आणि न्यग्रोध या प्रत्येक शब्दाचें जर ते दोन्ही अर्थ आहेत तर प्लक्षौ म्हणण्यानेंच काम भागेल; न्यग्रोधशब्द उच्चारावयास नको', या शंकेचें एक उत्तर दिलें; दुसरें उत्तर येथून देत आहे.

१९. प्लक्षन्यग्रोधौ असें उच्चारिलें असतां या समुदायानें प्लक्ष आणि न्यग्रोध असे दोन अर्थ दाखविलें एवढाच अर्थ मनांत येतो. त्या समुदायांतील प्रत्येक शब्दाला दोन दोन अर्थ आहेत असा अनुभव येत नाहीं. सबब हा पक्ष मोठ्या कष्टानेंही मनावर चढत नाहीं ही दुःखाची गोष्ट आहे.

सूत्रं च भिद्यते ॥ यथान्यासमेवास्तु । ननु चोक्तं चार्थे द्वन्द्ववचनेऽसमासेऽपि चार्थसंप्रत्ययादनिष्टप्रसङ्ग इति । नैष दोषः । इह चे द्वन्द्व इतीयता सिद्धम् । कथं पुनश्चे नाम वृत्तिः स्यात् । शब्दो ह्येष शब्देऽसंभवादर्थे कार्यं विज्ञास्यते । सोऽयमेवं सिद्धे सति यदर्थग्रहणं करोति तस्यैतत्प्रयोजनमेवं यथा विज्ञायेत चेन कृतोऽर्थश्चार्थ इति । कः पुनश्चेन कृतोऽर्थः । समुच्चयोऽन्वाचय इतरेतरयोगः समाहार इति । समुच्चयः । प्लक्षश्चेत्युक्ते गम्यत एतन्न्यग्रोधश्चेति । अन्वाचयः । प्लक्षश्चेत्युक्ते गम्यत एतत्सापेक्षोऽयं प्रयुज्यत इति । इतरेतरयोगः । प्लक्षश्च न्यग्रोधश्चेत्युक्ते गम्यत एतत्प्लक्षोऽपि न्यग्रोधसहायो न्यग्रोधोऽपि प्लक्षसहाय

---

साधत आहे[20].

शिवाय 'चार्थे द्वन्द्वः' याचे ऐवजीं 'युगपदधिकरणवचने द्वन्द्वः' असें सूत्र केल्यामुळें सूत्रांत बदलही होत आहे.

तर मग मूळचें आहे तसेंच सूत्र असूं दे.

पण 'चार्थे द्वन्द्वः' असें सूत्र केलें तर ज्या ठिकाणीं द्वन्द्वसमास इष्ट नाहीं अशा समुच्चय आणि अन्वाचय या दोन ठिकाणीं द्वन्द्वसमास होऊं लागेल असा दोष दाखविला आहे ना?

हा दोष येत नाहीं. 'चार्थे द्वन्द्वः' याचे ऐवजीं 'चे द्वन्द्वः' एवढेंच सूत्र केल्यामुळें काम भागत आहे. पण 'च' हा शब्द असल्यामुळें त्या अर्थीं द्वन्द्व संभवत नसल्यामुळें त्या चशब्दाच्या अर्थीं तें कार्य समजलें जाईल. अशा रीतीनें अर्थशब्दावाचूनही चार्थीं द्वन्द्व सिद्ध होत असतांना हा आचार्य मुद्दाम जो अर्थ शब्द उच्चारीत आहे त्याचा हेतु असा दिसतो की चेन कृतोऽर्थश्चार्थः, म्हणजे च या शब्दानें केलेला जो अर्थ तो चार्थ होय, असा चार्थ या शब्दाचा अर्थ समजला जावा.

च या शब्दानें केलेला असा अर्थ तो कोणता?

समुच्चय, अन्वाचय, इतरेतरयोग आणि समाहार हा तो अर्थ होय[21]. समुच्चयाचें[22] उदाहरणः– प्लक्षश्च म्ह. प्लक्षही आहे असें म्हटलें असतां चशब्दाचे जोरावर न्यग्रोधश्च म्ह. न्यग्रोधही आहे असा अर्थ मनांत येतो. तसेंच न्यग्रोधश्च म्ह. न्यग्रोधही आहे असें म्हटलें असतां चशब्दाचें जोरावर प्लक्षश्च म्ह. प्लक्षही आहे असा अर्थ मनांत येतो. अन्वाचयाचें उदाहरणः–ग्रामो गम्यताम् म्ह. गांवाला जावें असा उपक्रम करून प्लक्षश्च आनीयताम् असें सांगितलें असतां प्लक्ष आणणें हें गांवाला जाण्यावर अवलंबून आहे म्हणजे आनुषङ्गिक आहे असें मनांत येतें. इतरेतरयोगाचें उदाहरणः– प्लक्षश्च न्यग्रोधश्च असें म्हटलें असतां प्लक्षही न्यग्रोधानें सहित आणि न्यग्रोधही प्लक्षानें सहित असा अर्थ मनांत येतो. समा-

---

२०. तेव्हां बावा येथें मूळचा द्विवचनप्रत्यय झालाच नाहीं की ज्याकरितां द्यो हा शब्द दोन अर्थांचा एकदमच बोध करून देतो असें मानावें लागलें असतें, आणि तसें मानलें तरच तें युगपदधिकरणवचनपक्षाला पोषक झालें असतें.

२१. चशब्दाचा प्रयोग ज्या ठिकाणीं केलेला असतो त्यांपैकीं कांहीं ठिकाणीं समुच्चय होतो, कांहीं ठिकाणीं अन्वाचय, कांहीं ठिकाणीं इतरेतरयोग, आणि कांहीं ठिकाणीं समाहार होतो. हे चार 'च' या शब्दाचे प्रत्यक्ष अर्थ नव्हेत. चशब्दाचा प्रयोग असेल तेथें या चारांपैकीं कोणत्या तरी एका प्रकारची स्थिति होते.

२२. समुच्चयाची व्याख्या पूर्वीं टीप ६ मध्यें दिली आहे. जर त्या दोन गोष्टींपैकीं एक गोष्ट दुसऱ्यावर अवलंबून असली म्हणजे एक काम करतांना त्यांत सहज दुसरें झालें तर करावयाचें, नाहीं झालें तर त्याची विशेष अपेक्षा नाहीं, या स्थितीला अन्वाचय म्हणतात. इतरेतरयोग आणि समाहार यांच्याही व्याख्या पूर्वीं दिल्या आहेत.

इति । समाहारेऽपि क्रियते प्लक्षन्यग्रोधमिति । तत्रायमप्यर्थो द्वन्द्वैकवद्भावो न पठितव्यो भवति । समाहारस्यैकत्वादेव सिद्धम् ॥

एकादश द्वादशेति कोऽयं समासः । एकादीनां दशादिभिर्द्वन्द्वः । एकादीनां दशादिभिर्द्वन्द्वः समासः ।

**एकादीनां दशादिभिर्द्वन्द्व इति चेद्विंशत्यादिषु वचनप्रसङ्गः ॥ १६ ॥**

एकादीनां दशादिभिर्द्वन्द्व इति चेद्विंशत्यादिषु वचनं प्राप्नोति । एकविंशतिः द्वाविंशतिः ॥

**सिद्धं त्वधिकान्ता संख्या संख्यया समानाधिकरणाधिकारेऽधिकलोपश्च ॥ १७ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । समानाधिकरणाधिकारे वक्तव्यमधिकान्ता संख्या संख्यया सह समस्यतेऽधिकशब्दस्य च लोपो भवतीति । एकाधिका विंशतिरेकविंशतिः । द्व्यधिका विंशतिर्द्वाविंशतिः ॥ यदि समानाधिकरणः स्वरो न सिध्यति । यद्धि तत्संख्या पूर्वपदं प्रकृतिस्वरं भवतीति द्वन्द्व इत्येवं तत् । किं पुनः कारणं द्वन्द्व इत्येवं तत् । इह मा भूत् । शतसहस्रमिति ॥ अस्तु तर्हि द्वन्द्वः । ननु चोक्तमेकादीनां दशादिभिर्द्वन्द्व इति चेद्विंशत्यादिषु वचनप्रसङ्ग इति । नैष दोषः । सर्वो द्वन्द्वो विभाषैकवद्भवति । यदा

---

हाराचे उदाहरणामध्यें परस्परांचा मिळून एक समुदाय असा अर्थ मनांत येतो. त्यामुळें प्लक्षन्यग्रोधम् असा एकवचनान्त प्रयोग केला जातो. त्यांत आणखीही एक गोष्ट साधते, ती ही की युगपदधिकरणपक्षीं 'द्वन्द्वसमासाच्या पुढें विकल्पानें एकवचन करावें' असें सांगावें लागत असतें तें आतां सांगावयास नको. कारण समाहार म्हणजे समुदाय हा अर्थ एक असल्यामुळें तो दाखविण्यासाठीं एकवचनच घालणें योग्य आहे.

एकादश, द्वादश, हा समास कोणता ?

एक, द्वि, वगैरे शब्दांचा दशन्, विंशति, वगैरे शब्दांबरोबर द्वन्द्वसमास समजावा.

(वा.१६) एक, द्वि, वगैरे शब्दांचा दशन्, विंशति, वगैरे शब्दांबरोबर द्वंद्वसमास समजला तर एकविंशति वगैरे शब्दांच्या पुढें द्विवचन, बहुवचन, होऊं लागेल; जसें:-- एकविंशतिः, द्वाविंशतिः.

(वा.१७) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

कर्मधारयप्रकरणामध्यें अधिकशब्द पुढें असलेल्या अशा संख्याशब्दाचा दुसऱ्या संख्याशब्दाबरोबर समास होतो आणि अधिकशब्दाचा लोप होतो, असें वचन करावें; जसें:-- एकाधिका विंशतिः एकविंशतिः, द्व्यधिका विंशतिः द्वाविंशतिः.

जर एकविंशति वगैरे शब्दांमध्यें कर्मधारय समास असेल तर स्वर साधत नाहीं. कारण 'संख्या' (६।२।३५) या सूत्रानें संख्यावाचक पूर्वपदाला जो प्रकृतिस्वर सांगितला आहे तो द्वन्द्वामध्येंच सांगितला आहे.

तो द्वन्द्वामध्येंच होतो असें सांगण्याचें काय बरें कारण ?

कारण असें की सहस्राणां शतं शतसहस्रम् या षष्ठीसमासामध्यें संख्यावाचकाला पूर्वपद प्रकृतिस्वर न झाला पाहिजे.

तर मग एकविंशतिः वगैरे ठिकाणीं द्वन्द्वसमासच असूं दे.

पण एक, द्वि, वगैरे शब्दांचा दशन्, विंशति, वगैरे शब्दांबरोबर द्वंद्वसमास केला तर एकविंशतिः, द्वाविंशतिः, वगैरे ठिकाणीं द्विवचन-बहुवचनाचा प्रसंग येतो असा दोष दाखविला आहे ना ?

तर्ह्येकवचनं तदा नपुंसकलिङ्गं प्राप्नोति। लिङ्गमाशिष्यं लोकाश्रयत्वाल्लिङ्गस्य ॥

**उपसर्जनं पूर्वम् ॥ २ । २ । ३० ॥**

किमर्थमिदमुच्यते ।

**उपसर्जनस्य पूर्ववचनं परप्रयोगनिवृत्त्यर्थम् ॥ १ ॥**

उपसर्जनस्य पूर्ववचनं क्रियते परप्रयोगो मा भूदिति ॥

**न वानिष्टादर्शनात् ॥ २ ॥**

न वैतत्प्रयोजनमस्ति। किं कारणम् । अनिष्टादर्शनात् । न हि किंचिदनिष्टं दृश्यते। न हि कश्चिद्राजपुरुष इति प्रयोक्तव्ये पुरुषराज इति प्रयुङ्क्ते। यदि चानिष्टं दृश्येत ततो यत्नार्हं स्यात् ॥

अथ यत्र द्वे षष्ठ्यन्ते भवतः कस्मात्तत्र प्रधानस्य पूर्वनिपातो न भवति। राज्ञः पुरुषस्य राजपुरुषस्येति ।

**षष्ठ्यन्तयोः समासेऽर्थाभेदात्प्रधानस्यापूर्वनिपातः ॥३॥**

षष्ठ्यन्तयोः समासेऽर्थाभेदात्प्रधानस्य पूर्वनिपातो न भविष्यति। एवं न चेदमकृतं भवत्युपसर्जनं पूर्वमित्यर्थश्चाभिन्न इति कृत्वा प्रधानस्य पूर्वनिपातो न भविष्यति ॥

---

हा दोष येत नाहीं. कारण, कोणताही द्वन्द्वसमास असो, तो सर्व विकल्पानें एकार्थप्रतिपादक होतो (१।२।६३भाष्य भाग१ पृ.५६२).

पण एकार्थप्रतिपादक झाला तर तो अर्थातच समाहारद्वन्द्व होत असल्यामुळें 'स नपुंसकम्' (२।४।१७) यानें नपुंसकलिंग होऊं लागेल.

हें लिंगविधायक शास्त्र करावयास नको. कारण लिंग हें लोकव्यवहारावर अवलंबून असतें.

(सू.३०) कशाकरितां हें शास्त्र केलें जात आहे ?

(वा. १) समासामध्यें उपसर्जनाचा प्रयोग पुढें न व्हावा म्हणून त्याचा पूर्वी प्रयोग करावा असें येथें सांगितलें आहे.

(वा.२) हा याचा उपयोग बरोबर दिसत नाहीं.

काय कारण ?

कारण असें की तसा अनिष्ट प्रयोग करण्याचें कांहीं कारण दिसत नाहीं. कारण राजाचा पुरुष असें सांगावयाचें असतां तेथें त्याच्या उलट पुरुषराजः असें कोण बरें म्हणेल ? जर अनिष्ट प्रयोगाचा प्रसंग येईल तर त्याच्या निवृत्तीकरतां खटपट करणें योग्य होईल.

आतां जेथें षष्ठ्यन्त शब्द दोन असतील तेथें ज्या अप्रधानाचा संबंध दाखवावयाचा त्या अप्रधानाच्या पूर्वी प्रधानाचा प्रयोग कां बरें होत नाहीं ? जसें:— राज्ञः पुरुषस्य राजपुरुषस्य.

(वा.३)राज्ञः पुरुषस्य या दोन षष्ठ्यन्तांच्या समासामध्यें राजाचा पुरुष या अर्थामध्यें कांहींच फरक झाला नसल्यामुळें प्रधान जो पुरुष त्याचा अप्रधानाच्या पूर्वी प्रयोग होणार नाहीं. अशा रीतीनें हें प्रकृत सूत्र करावयास नको असें मात्र होत नाहीं. कारण अर्थामध्यें फरक होत नाहीं म्हणून प्रधानाचा अप्रधाना-

---

१. उपसर्जनशब्दाचा प्रयोग समासामध्यें प्रथमतः करावा; उदा०— कष्टं श्रितः कष्टश्रितः.

२. संबंध दाखविणारा षष्ठ्यन्तशब्द, ज्या प्रधानाशीं संबंध दाखवावयाचा असेल त्याच्यामागेंच उच्चारला तर तो संबंध कोणाचा कोणाशीं आहे हें चट्दिशीं मनांत येतें; आणि वाक्यामध्यें ज्या क्रमानें शब्द उच्चारले तोच क्रम समासामध्यें कायम राहणार आहे.

३. प्राप्तजीविकः (२।२।४), पूर्वकायः (२।२।१), इत्यादि उदाहरणांमध्यें अप्रधानाच्या पूर्वी प्रधानाचा प्रयोग इष्ट आहे. त्याकरितां प्रकृत सूत्र केलेंच पाहिजे.

**[राजदन्तादिषु परम् ॥२।२।३१॥**
**द्वंद्वे घि ॥ २ । २ । ३२ ॥**
**अजाद्यदन्तम् ॥ २ । २ ३३ ॥]**
**अल्पाच्तरम् ॥ २ । २ । ३४ ॥**

किमयं तन्त्रं तरनिर्देश आहोस्विदतन्त्रम् । किं चातः । यदि तन्त्रं द्वयोर्नियमो बहुष्वनियमः । तत्र को दोषः । शङ्खदुन्दुभिवीणानामिति न सिध्यति । दुन्दुभिशब्दस्यापि पूर्वनिपातः प्राप्नोति । अथातन्त्रं

मृदङ्गशङ्खतूणवाः पृथङ्नदन्ति संसदि प्रासादे धनपतिरामकेशवानामित्येतन्न सिध्यति । यथेच्छसि तथास्तु ॥ अस्तु तावत्तन्त्रम् । ननु चोक्तं द्वयोर्नियमो बहुष्वनियम इति तत्र शङ्खदुन्दुभिवीणानामिति न सिध्यति दुन्दुभिशब्दस्यापि पूर्वनिपातः प्राप्नोतीति । नैष दोषः । यदेतदल्पाच्तरमिति तदल्पाजिति वक्ष्यामि ॥ अथवा पुनरस्त्वतन्त्रम् । ननु चोक्तं मृदङ्गशङ्खतूणवाः पृथङ्नदन्ति संसदि प्रासादे धनपतिरामकेशवानामित्येतन्न सिध्यतीति ।

---

च्या पूर्वी प्रयोग कोठेंच होणार नाहीं.

(सू.३४) काय या सूत्रामध्यें उच्चारलेल्या तरप्रत्ययाचा अर्थ विवक्षित आहे किंवा नाहीं ?

यांत काय फरक आहे ?

जर तरप्रत्ययाचा अर्थ विवक्षित असेल तर दोन शब्दांच्या द्वंद्वालाच हा नियम लागू होईल, आणि बहुत शब्दांच्या द्वंद्वाला हा नियम लागू पडणार नाहीं.[2]

तसें असतां काय दोष येत आहे ?

शङ्खदुन्दुभिवीणानाम् असाच प्रयोग नियमानें होणार नाहीं. येथें दुन्दुभिशब्दाचाही पूर्वी प्रयोग होऊं लागेल.

आतां तरप्रत्ययाचा अर्थ विवक्षित नाहीं असें गृहीत धरलें तर मृदङ्गशङ्खतूणवाः पृथङ्नदन्ति, प्रासादे धनपतिरामकेशवानाम्, हे प्रयोग साधत नाहींत.

तरप्रत्ययाचा अर्थ विवक्षित किंवा अविवक्षित यापैकीं तुझ्या इच्छेप्रमाणें वाटेल तें असो; विवक्षितच कां असेना ?

पण तसें गृहीत धरलें तर दोन शब्दांच्या द्वंद्वालाच हा नियम लागू होईल आणि बहुत शब्दांच्या द्वंद्वाला नियम लागू होणार नाहीं; तेव्हां शङ्खदुन्दुभिवीणानाम् असाच प्रयोग नियमानें होणार नाहीं, दुन्दुभिशब्दाचाही पूर्वी प्रयोग होऊं लागेल, असा दोष दिला आहे ना ?

हा दोष येत नाहीं; कारण जें हें 'अल्पाच्तरम्' असें सूत्र केलें आहे त्याच्या ऐवजीं 'अल्पाच्' एवढेंच सूत्र करण्यांत येईल.

किंवा अविवक्षित कां असे ना ?

पण तसें गृहीत धरलें तर मृदङ्गशङ्खतूणवाः पृथङ्नदन्ति, प्रासादे धनपतिरामकेशवानाम् हे प्रयोग साधत नाहींत, असा दोष दाखविला

---

१. (३१) राजदन्त वगैरे सामासिक शब्दांमध्यें पूर्वी प्रयोग करण्याला योग्य अशा शब्दाचा पुढें प्रयोग करावा; उदा०- दन्तानां राजा राजदन्तः, उलूखलमुसलम्.

(३२) द्वंद्वसमासामध्यें घिसंज्ञक शब्दाचा पूर्वी प्रयोग करावा; उदा०- हरिश्च हरश्च हरिहरौ, पटुगुप्तौ.

(३३) स्वर आरंभीं असलेल्या आणि ऱ्हस्व अकार शेवटीं असलेल्या अशा शब्दाचा द्वंद्वसमासामध्यें पूर्वी प्रयोग करावा; उदा०-ईशश्च कृष्णश्च ईशकृष्णौ.

१. ज्यामध्यें स्वर अल्प आहेत अशा शब्दाचा द्वंद्वसमासामध्यें पूर्वी प्रयोग करावा; उदा०- शिवकेशवौ.

२. 'द्विवचनविभज्यो०' (५।३।५७) या सूत्रानें दोघांपैकीं एकाचा अतिशय दाखविणें असतां तरप्प्रत्यय सांगितला आहे.

३. तरप्रत्ययाचा अर्थ अविवक्षित आहे, म्हणजे येथें तरप्रत्यय स्वार्थीं केला आहे असें गृहीत धरलें असतां बहुतपदांच्या द्वंद्वाविषयींही हा नियम लागू होतो. तेव्हां शङ्खशब्दाचा आणि रामशब्दाचा पूर्वी प्रयोग करावा लागेल.

४. तेव्हां तें अर्थातच बहुत शब्दांच्या द्वंद्वालाही लागू पडेल.

**अतन्त्रे तरनिर्देशे शङ्खतूणवयोर्मृदङ्गेन समासः ॥१॥**

अतन्त्रे तरनिर्देशे शङ्खतूणवयोर्मृदङ्गेन समासः करिष्यते । शङ्खश्च तूणवश्च शङ्खतूणवौ । मृदङ्गश्च शङ्खतूणवौ च मृदङ्गशङ्खतूणवाः । रामश्च केशवश्च रामकेशवौ । धनपतिश्च रामकेशवौ च धनपतिरामकेशवास्तेषां धनपतिरामकेशवानामिति ॥

अथ यत्र बहूनां पूर्वनिपातप्रसङ्गः किं तत्रैकस्य नियमो भवत्याहोस्विदविशेषेण ।

**अनेकप्राप्तावेकस्य नियमोऽनियमः शेषेषु ॥ २ ॥**

अनेकप्राप्तावेकस्य नियमो भवति शेषेष्वनियमः । पटुमृदुशुक्लाः पटुशुक्लमृदव इति ॥

**ऋतुनक्षत्राणामानुपूर्व्येण समानाक्षराणाम् ॥ ३ ॥**

ऋतुनक्षत्राणामानुपूर्व्येण समानाक्षराणां पूर्वनिपातो वक्तव्यः । शिशिरवसन्तावुदगयनस्थौ । कृत्तिकारोहिण्यः ॥

**अभ्यर्हितम् ॥४॥**

अभ्यर्हितं पूर्वं निपततीति वक्तव्यम् । मातापितरौ श्रद्धामेधे ॥

**लघ्वक्षरम् ॥५॥**

लघ्वक्षरं पूर्वं निपततीति वक्तव्यम् । कुशकाशम् शरशीर्यम् ॥

अपर आह । सर्वत एवाभ्यर्हितं पूर्वं निपततीति वक्तव्यम् । लघ्वक्षरादपीति । श्रद्धातपसी । दीक्षातपसी ॥

**वर्णानामानुपूर्व्येण ॥६॥**

---

आहे ना ?

(वा. १) तरप्रत्ययाचा अर्थ अविवक्षित समजला तर अगोदर शङ्ख आणि तूणव यांचा द्वंद्व करून नंतर मृदङ्गशब्दाबरोबर समास करण्यांत येईल; जसें— शङ्खश्च तूणवश्च शङ्खतूणवौ, शङ्खतूणवौ च मृदङ्गश्च मृदङ्गशङ्खतूणवाः. तसेंच रामश्च केशवश्च रामकेशवौ, रामकेशवौ च धनपतिश्च धनपतिरामकेशवाः, तेषां धनपतिरामकेशवानाम्.

आतां जेथें बहुतांचा पूर्वी प्रयोग प्राप्त होतो तेथें काय त्यांपैकीं एकाचाच पूर्वी प्रयोग करावयाचा किंवा पाळीपाळीनें त्या सर्वांचाच पूर्वी प्रयोग करावयाचा ?

(वा.२) अनेकांचा पूर्वी प्रयोग प्राप्त असतां एकाचाच पूर्वी प्रयोग ठरवून पुढें उरलेले शब्द वाटेल तसे उच्चारावेत; जसें— पटुमृदुशुक्लाः, पटुशुक्लमृदवः.

(वा. ३) सारख्या अक्षराचे जे ऋतुवाचक किंवा नक्षत्रवाचक शब्द त्यांच्या द्वंद्वसमासामध्यें प्रवृत्तिक्रमानें पूर्वी प्रयोग होतो, असें वचन करावें; जसें— शिशिरवसन्तौ, कृत्तिकारोहिण्यः.

(वा.४) द्वंद्वामध्यें श्रेष्ठार्थवाचक शब्दाचा पूर्वी प्रयोग करावा असें वचन करावें; जसें— मातापितरौ, श्रद्धामेधे.

(वा.५) ज्या शब्दांतील अक्षरें लघु आहेत अशा शब्दाचा द्वंद्वामध्यें पूर्वी प्रयोग करावा असें वचन करावें; जसें:— कुशकाशम्, शरशीर्यम्.

अन्य कोणी एक वैयाकरण म्हणतो—

सर्व नियमांना मागें सारून अभ्यर्हिताचा पूर्वी प्रयोग होतो असें वचन करावें. 'लघ्वक्षरम्' यालाही मागें सारून अभ्यर्हिताचा पूर्वी प्रयोग होतो; जसें:— दीक्षातपसी, श्रद्धातपसी.

(वा. ६) ब्राह्मणादि वर्णवाचक शब्दांच्या द्वंद्वामध्यें त्यांच्या क्रमानें पूर्वनिपात होतो असें

---

५. पहिल्या द्वंद्वामध्यें अल्पाच् असा शङ्खशब्द पूर्वी आला आहे, आणि दुसऱ्या द्वंद्वामध्यें 'शङ्खतूणव' या शब्दापेक्षां अल्पाच् असा मृदङ्गशब्द पूर्वी आला आहे. धनपतिरामकेशवानाम् येथें असेंच समजावें.

वर्णानां चानुपूर्व्येण पूर्वनिपातो भवतीति वक्तव्यम् । ब्राह्मणक्षत्रियविट्शूद्राः ॥

**भ्रातुश्च ज्यायसः ॥७॥**

भ्रातुश्च ज्यायसः पूर्वनिपातो भवतीति वक्तव्यम् । युधिष्ठिरार्जुनौ ॥

**संख्याया अल्पीयसः ॥८॥**

संख्याया अल्पीयसः पूर्वनिपातो वक्तव्यः । एकादश द्वादश ॥

**धर्मादिषूभयम् ॥९॥**

धर्मादिषूभयं पूर्वं निपततीति वक्तव्यम् । धर्मार्थौ अर्थधर्मौ । कामार्थौ अर्थकामौ । गुणवृद्धी वृद्धिगुणौ । आद्यन्तौ अन्तादी ।

## सप्तमीविशेषणे बहुव्रीहौ ॥ २ । २ । ३५ ॥

**बहुव्रीहौ सर्वनामसंख्ययोरुपसंख्यानम् ॥१॥**

बहुव्रीहौ सर्वनामसंख्ययोरुपसंख्यानं कर्तव्यम् । विश्वदेवः विश्वयशाः । द्विपुत्रः द्विभार्यः ॥ अथ यत्र संख्यासर्वनाम्नोरेव बहुव्रीहिः कस्य तत्र पूर्वनिपातेन भवितव्यम् । परत्वात्संख्यायाः । द्व्यन्याय त्र्यन्याय ॥

**वा प्रियस्य ॥२॥**

वा प्रियस्य पूर्वनिपातो वक्तव्यः । प्रियगुडः गुडप्रियः ॥

**सप्तम्याः पूर्वनिपाते गड्वादिभ्यः परवचनम् ॥३॥**

सप्तम्याः पूर्वनिपाते गड्वादिभ्यः परा सप्तमी भवतीति वक्तव्यम् । गडुकण्ठः गडुशिराः ॥

## निष्ठा ॥ २ । २ । ३६ ॥

**निष्ठायाः पूर्वनिपाते जातिकालसुखादिभ्यः परवचनम् ॥१॥**

---

वचन करावें; जसें– ब्राह्मणक्षत्त्रियविट्शूद्राः.

(वा. ७) ज्येष्ठभ्रातृवाचक शब्दांचा पूर्वी प्रयोग करावा असें वचन करावें; जसें:– युधिष्ठिरार्जुनौ.

(वा. ८) समासामध्यें लहान संख्येला दाखविणाऱ्या शब्दाचा पूर्वी प्रयोग करावा असें वचन करावें; जसें:– एकादश, द्वादश.

(वा. ९) द्वंद्वामध्यें धर्मादि गणांतील शब्दांचा पूर्वीही प्रयोग होतो आणि पुढेंही प्रयोग होतो; जसें–अर्थधर्मौ, धर्मार्थौ; कामार्थौ, अर्थकामौ; गुणवृद्धी, वृद्धिगुणौ; आद्यन्तौ, अन्तादी.

(सू. ३५ वा. १) बहुव्रीहिसमासामध्यें सर्वनामसंज्ञक शब्दाचा किंवा संख्यावाचक शब्दाचा पूर्वी प्रयोग होतो असें वचन करावें; जसें:– विश्वे देवा यस्य विश्वदेवः; विश्वयशाः; द्विपुत्रः; द्विभार्यः.

आतां जेथें संख्या आणि सर्वनामसंज्ञक शब्द या उभयतांचाच बहुव्रीहिसमास असेल तेथें कोणाचा पूर्वी प्रयोग करावयाचा ?

'सर्वनामसंख्ययोः' या वचनामध्यें सर्वनामशब्दाच्या पुढें संख्याशब्द घातला असल्यानें परत्वास्तव (१।४।२) संख्यावाचकाचा पूर्वी प्रयोग करावयाचा; जसें– द्व्यन्याय, त्र्यन्याय.

(वा. २) बहुव्रीहीमध्यें प्रियशब्दाचा विकल्पेंकरून पूर्वी प्रयोग होतो असें वचन करावें; जसें– प्रियगुडः गुडप्रियः.

(वा. ३) सप्तम्यन्ताचा पूर्वी प्रयोग होतो असें जें सांगितलें आहे तेथें गडु वगैरे शब्द असतील तर त्यांच्या पुढें सप्तम्यन्ताचा प्रयोग होतो असें वचन करावें; जसें– कण्ठे गडुर्यस्य गडुकण्ठः, गडुशिराः.

(सू. ३६ वा. १) निष्ठाप्रत्यय शेवटीं असलेल्या शब्दाचा जो हा पूर्वी प्रयोग सांगितला आहे

१. सप्तम्यन्ताचा किंवा विशेषणाचा बहुव्रीहीमध्यें पूर्वी प्रयोग होतो; उदा०-कण्ठेकालः, चित्रगुः, शबलगुः.

१. निष्ठाप्रत्यय (१।१।२६) शेवटीं असलेल्या शब्दाचा बहुव्रीहीमध्यें पूर्वी प्रयोग होतो; उदा०—कृतकृत्यः.

निष्ठायाः पूर्वनिपाते जातिकालसुखादिभ्यः परा निष्ठा भवतीति वक्तव्यम् । शार्ङ्गजग्धी पलाण्डुभक्षिती । मासजाता संवत्सरजाता । सुखजाता दुःखजाता ॥

**न वोत्तरपदस्यान्तोदात्तवचनं ज्ञापकं परभावस्य ॥२॥**

न वा वक्तव्यम् । किं कारणम् । उत्तरपदस्यान्तोदात्तवचनं ज्ञापकं परभावस्य । यदयं जातिकालसुखादिभ्यः परस्या निष्ठाया उत्तरपदस्यान्तोदात्तत्वं शास्ति तज्ज्ञापयत्याचार्यः परात्र निष्ठा भवतीति ॥

**प्रतिषेधे तु पूर्वनिपातप्रसङ्गस्तस्माद्राजदन्तादिषु पाठः ॥३॥**

प्रतिषेधे तु पूर्वनिपातः प्राप्नोति । अकृतमितप्रतिपन्ना इति । तस्माद्राजदन्तादिषु पाठः कर्तव्यः ॥ न कर्तव्यः । अत्रापि प्रतिषेधवचनं ज्ञापकं परा निष्ठा भवतीति ॥

**प्रहरणार्थेभ्यश्च ॥४॥**

प्रहरणार्थेभ्यश्च परे निष्ठासप्तम्यौ भवत इति वक्तव्यम् । अस्युद्यतः मुसलोद्यतः । असिपाणिः दण्डपाणिः ॥

**द्वन्द्वे घ्यजाद्यदन्तं विप्रतिषेधेन ॥५॥**

द्वन्द्वे घि [२.२.३२] इत्यस्मादजाद्यदन्तम् [३३] इत्येतद्भवति विप्रतिषेधेन । द्वन्द्वे घीत्यस्यावकाशः । पटुगुप्तौ । अजाद्यदन्तमित्यस्यावकाशः । उष्ट्रखरौ । इहोभयं प्राप्नोति । इन्द्राग्नी । अजाद्यदन्तमित्येतद्भवति विप्रतिषेधेन ॥

---

तेथें जातिवाचक, कालवाचक, आणि सुखादिगणांतील शब्द असतील तर त्यांच्यापुढें निष्ठाप्रत्यय शेवटीं असलेल्या शब्दाचा प्रयोग होतो असें वचन करावें; जसें— शार्ङ्गजग्धी, पलाण्डुभक्षिती, मासजाता, संवत्सरजाता, सुखजाता, दुःखजाता.

(वा.२) तसें वचन करावयास नको.

काय कारण ?

'जातिकालसुखादिभ्यो०' (६।२।१७०) या सूत्रानें बहुव्रीहीमध्यें जातिवाचक, कालवाचक आणि सुखादि शब्द यांच्यापुढील कृत, मित, आणि प्रतिपन्न यांखेरीज क्तप्रत्यय शेवटीं असलेल्या उत्तरपदाला अन्तोदात्त स्वर होतो असें ज्यापेक्षां आचार्य सांगतात त्यापेक्षां बहुव्रीहीमध्यें जाति, काल आणि सुखादि यांच्यापुढें निष्ठाप्रत्यय शेवटीं असलेल्या शब्दाचा प्रयोग होतो असें सुचवीत आहेत.

(वा.३) कृत, मित व प्रतिपन्न या शब्दांना अन्तोदात्ताचा प्रतिषेध केला आहे.तेव्हां अन्तोदात्त विधानावरून सुचविलेला परनिपात त्यांना होणार नाहीं. अर्थात् कृत, मित आणि प्रतिपन्न या शब्दांचा पूर्वी प्रयोग प्राप्त होतो म्हणून त्यांचा पुढें प्रयोग होण्यासाठीं राजदन्तादिगणामध्यें (२।२।३१) पाठ केला पाहिजे.

अथवा राजदन्तादिगणामध्यें पाठ करावयास नको. कारण कृत, मित व प्रतिपन्न या शब्दांना अन्तोदात्ताचा निषेध केला त्यावरूनच त्यांचा पुढें प्रयोग होतो असें सूचित होईल.[२]

(वा.४) प्रहारसाधन जो पदार्थ तद्वाचक शब्दाच्या पुढें निष्ठाप्रत्ययान्ताचा किंवा सप्तम्यन्ताचा प्रयोग होतो असें वचन करावें; जसें— असिरुद्यतो येन अस्युद्यतः, मुसलोद्यतः, असिपाणिः, दण्डपाणिः.

(वा.५) 'द्वन्द्वे घि' याला मागें सारून परत्वास्तव 'अजाद्यदन्तम्' हें सूत्र प्रवृत्त होतें. 'द्वन्द्वे घि' या सूत्राला पटुगुप्तौ येथें चारितार्थ्य आहे, अजाद्यदन्तम्, उष्ट्रखरौ, येथें अवकाश आहे, आणि इन्द्राग्नी येथें दोन्हीही सूत्रें प्रवृत्त होत आहेत. तेथें परत्वास्तव 'अजाद्यदन्तम्' हें सूत्र प्रवृत्त होतें.

२. उत्तरपदान्तोदात्तस्वर हा कृतादिकांचा पुढें प्रयोग होईल तरच प्राप्त होतो. परवीं प्राप्त होत नाहीं, तेव्हां अर्थातच त्यांचा पुढें प्रयोग होतो असं यावरून सूचित होतें.

## उभाभ्यामल्पाच्तरम् ॥६॥

उभाभ्यामल्पाच्तरम् [३४] इत्येतद्भवति विप्रतिषेधेन ॥ द्वन्द्वे घीत्यस्यावकाशः । पटुगुप्तौ । अल्पाच्तरमित्यस्यावकाशः । वाग्दृषदौ । इहोभयं प्राप्नोति । वागग्नी । अल्पाच्तरमित्येतद्भवति विप्रतिषेधेन ॥ अजाद्यदन्तमित्यस्यावकाशः । उष्ट्रखरौ । अल्पाच्तरमित्यस्यावकाशः । स एव । इहोभयं प्राप्नोति । वागिन्द्रौ । अल्पाच्तरमित्येतद्भवति विप्रतिषेधेन ॥

(वा. ६) 'द्वन्द्वे घि' 'अजाद्यदन्तम्' या दोन्ही सूत्रांपेक्षां परत्वास्तव 'अल्पाच्तरम्' हें सूत्र प्रवृत्त होतें. 'द्वन्द्वे घि' याला पटुगुप्तौ येथें अवकाश आहे. अल्पाच्तरम् याला वाग्दृषदौ येथें अवकाश आहे. आणि वागग्नी येथें उभयता प्राप्त होत आहेत. तेथें 'द्वन्द्वे घि' याला मागें सारून परत्वास्तव अल्पाच्तरम् हें सूत्र प्रवृत्त होतें.

अजाद्यदन्तम् याला उष्ट्रखरौ येथें अवकाश आहे. अल्पाच्तरम् याला वाग्दृषदौ येथें अवकाश आहे. आणि वागिन्द्रौ येथें दोन्हीही सूत्रें प्राप्त होत आहेत. तेथें परत्वास्तव 'अल्पाच्तरम्' हें सूत्र प्रवृत्त होतें.

## [वाहिताग्न्यादिषु ॥२।२।३७॥][1]

## कडाराः कर्मधारये ॥२।२।३८॥[1]

कडारादय इति वक्तव्यम् । इहापि यथा स्यात् । गडुलशाण्डिल्यः शाण्डिल्यगडुलः । खण्डवात्स्यः वात्स्यखण्डः ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । बहुवचननिर्देशात्कडारादय इति विज्ञास्यते[2] ॥

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये द्वितीयस्याध्यायस्य द्वितीये पादे द्वितीयमाह्निकम् ॥ पादश्च समाप्तः ॥

'कडारादयः कर्मधारये' असें सूत्र करावें. कारण गडुलश्चासौ शाण्डिल्यश्च गडुलशाण्डिल्यः शाण्डिल्यगडुलः, खण्डवात्स्यः, वात्स्यखण्डः, येथेंही विकल्पानें पूर्वी प्रयोग झाला पाहिजे.

तर मग तसें सूत्र करावयास पाहिजे.

तसें सूत्र करावयास नको. कारण कडाराः असा बहुवचनानें उल्लेख केला असल्यामुळें त्याचा कडारादि असा अर्थ समजला जाईल.

याप्रमाणें भगवान पतंजलिऋषींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्यांतील दुसऱ्या अध्यायाच्या दुसऱ्या पादांतील दुसरें आन्हिक समाप्त झालें; व दुसरा पाद समाप्त झाला.

---

१. आहिताग्नि वगैरे शब्दांमध्यें निष्ठाप्रत्यय शेवटीं असलेल्या शब्दाचा विकल्पानें पूर्वी प्रयोग होतो; जसें:— आहिताग्निः अग्न्याहितः, जातपुत्रः पुत्रजातः.

१. कडार, गडुल, वगैरे कडारादिगणांतील शब्दांचा कर्मधारयसमासामध्यें विकल्पानें पूर्वी प्रयोग होतो; उदा.— कडारजैमिनिः, जैमिनिकडारः.

२ कडारशब्द हा एक असल्यामुळें तेथें एकवचन करणेंच योग्य असतां जें बहुवचन घातलें आहे त्यावरून लक्षणेनें कडारशब्दाचा कडार वगैरे शब्द असा अर्थ सूचित होतो.

——

## अनभिहिते ॥ २।३।१ ॥

अनभिहित इत्युच्यते किमिदमनभिहितं नाम। उक्तं निर्दिष्टमभिहितमित्यनर्थान्तरम्। यावद्ब्रूयादनुक्तेऽनिर्दिष्ट इति तावदनभिहित इति ॥

**अनभिहितवचनमनर्थकमन्यत्रापि विहितस्याभावादभिहिते ॥ १ ॥**

अनभिहितवचनमनर्थकम्। किं कारणम्। अन्यत्रापि विहितस्याभावादभिहिते। अन्यत्राप्यभिहिते विहितं न भवति ॥ कान्यत्र। चित्रगुः शबलगुः। बहुव्रीहिणोक्तत्वान्मत्वर्थस्य मत्वर्थीयो न भवति ॥ गर्गाः वत्साः। बिदाः उर्वाः। यञञ्भ्यामुक्तत्वादपत्यार्थस्य न्याय्योत्पत्तिर्न भवति ॥ सप्तपर्णः अष्टापदमिति। समासेनोक्तत्वाद्वीप्साया द्विर्वचनं न भवति ॥ यत्तावदुच्यते चित्रगुः शबलगुः बहुव्रीहिणोक्तत्वान्मत्वर्थस्य मत्वर्थीयो न भवतीति। अस्तिना सामानाधिकरण्ये मतुब्विधीयते न चात्रास्तिना

---

(सू.१) येथें अनभिहिते असें म्हटलें आहे त्याचा अर्थ काय समजावयाचा ?

उक्त, निर्दिष्ट व अभिहित या तीन शब्दांचा अर्थ एकच आहे, निराळा नाहीं. तेव्हां अनुक्त किंवा अनिर्दिष्ट हा शब्द उच्चारला असतां त्यापासून जो अर्थ मनांत येतो त्याच अर्थाचा येथील अनभिहित हा शब्द समजावा.

(वा.१) अनभिहिते असें जें म्हटलें आहे तें निरर्थक होय.

काय कारण ?

कारण असें की अन्य ठिकाणींही जो अर्थ एका शब्दानें दाखविला गेला असेल तो अर्थ दाखविण्याकरितां विहित असलेलाही शब्द पुनः योजला जात नाहीं.

अन्य ठिकाणीं म्हणजे कोठें ?

चित्रगुः, शबलगुः, येथें बहुव्रीहीनें मत्वर्थ दाखविला असल्यामुळें पुनः मत्वर्थीय प्रत्यय होत नाहीं. गर्गाः[2], वत्साः, बिदाः, उर्वाः, येथें यञ्, अञ्, या प्रत्ययांनीं अपत्यार्थ दाखविला असल्यामुळें प्रत्यय लुप्त झाला तरी तो अर्थ दाखविण्याकरितां सामान्यनियमानें पुनः अण् प्रत्ययाची उत्पत्ति होत नाहीं. तसेंच सप्तपर्णः[3], अष्टापदः, येथें समासानेंच वीप्सा दाखविली असल्यामुळें पुनः ती दाखविण्यासाठीं द्विर्वचन होत नाहीं.

आतां चित्रगुः, शबलगुः, येथें मत्वर्थ हा बहुव्रीहीनें उक्त झाला असल्यामुळें पुनः मत्वर्थीय प्रत्यय होत नाहीं असें म्हटलें तें बरोबर नाहीं. कारण अस्ति या क्रियापदांतील तिङ्प्रत्ययाशीं सामानाधिकरण्य असतां मतुप्प्रत्ययाचें विधान केलें आहे आणि चित्रगुः, शबलगुः, येथें तर चित्रगो, शबलगो, या शब्दांचें

---

१. अनभिहिते हें अधिकारसूत्र आहे. तेव्हां येथून पुढें प्रत्येक सूत्रामध्यें अनभिहिते या पदाचा संबंध होतो. अनभिहित म्हणजे अनुक्त होय. याचा उपयोग असा की 'कर्मणि द्वितीया' या पुढील सूत्रानें जी कर्म या अर्थी द्वितीया सांगितली आहे ती कटं करोति या कर्तरिप्रयोगामध्यें क्रियापदांतील प्रत्ययानें कर्मार्थ उक्त झाला नाहीं म्हणून कटशब्दाच्यापुढें द्वितीया झाली आहे, आणि क्रियते कटः या कर्मणि प्रयोगामध्यें प्रत्ययानें कर्मरूपी अर्थ उक्त झाला असल्यामुळें कटशब्दाच्यापुढें द्वितीया झाली नाहीं, तर 'प्रातिपदिकार्थ०' (२।३।४६) या सूत्रानें प्रथमा झाली आहे.

२. गर्गस्य गोत्रापत्यानि गर्गाः येथें गर्गशब्दाहून यञ्प्रत्यय (४।१।१०५) आणि त्याचा लुक् (२।४।६४) झाला आहे.

३. सप्त सप्त पर्णानि यस्य सप्तपर्णः म्ह. एक प्रकारचें झाड. याच्या प्रत्येक कांड्याला सात पानें असतात. अष्ट अष्ट पदानि यस्य अष्टापदम्. पद म्ह. कोष्ठ, सोंगट्या खेळण्याचा पट.

सामानाधिकरण्यम् ॥ यदप्युच्यते गर्गाः वत्साः बिदाः उर्वाः यञञ्भ्यामुक्तत्वादपत्यार्थस्य न्याय्योत्पत्तिर्न भवतीति । समर्थानां प्रथमाद्वा [४.१.८२] इति वर्तते न चैतत्समर्थानां प्रथमम् । किं तर्हि । द्वितीयमर्थमुपसंक्रान्तम् ॥ यदप्युच्यते सप्तपर्णः अष्टापदमिति समासेनोक्तत्वाद्वीप्साया द्विर्वचनं न भवतीति । यदत्र वीप्सायुक्तं नादः प्रयुज्यते । किं पुनस्तत् । पर्वणि पर्वणि सप्त पर्णान्यस्य । पङ्क्तौ पङ्क्तावष्टौ पदानीति ॥ श्नम्बहुजकक्षु तर्हि । श्नम् । भिनत्ति । छिनत्ति । श्नमोक्तत्वात्कर्तृत्वस्य कर्तरि शब् न भवति । बहुच् । बहुकृतम् बहुभिन्नमिति । बहुचोक्तत्वादीषदसमाप्तेः कल्पबादयो न भवन्ति । अकच् । उच्चकैः नीचकै-

अस्ति या क्रियापदाशीं सामानाधिकरण्य नाहीं.

आणखीही जें म्हटलें आहे की गर्गाः, वत्साः, बिदाः, उर्वाः, येथें यञ् व अञ् ह्या प्रत्ययांनीं अपत्यार्थ उक्त झाला असल्यामुळें पुनः सामान्य शास्त्रानें अण्प्रत्ययाची उत्पत्ति होत नाहीं तेंही बरोबर नाहीं. कारण तस्यापत्यम् (४।१।९२) या सामान्य शास्त्रामध्यें 'समर्थानां प्रथमाद्वा' (४।१।८२) हा अधिकार अनुवृत्त आहे; आणि गर्गाः इत्यादिकांतील गर्ग वगैरे शब्द तर समर्थांपैकीं प्रथमोच्चारित नव्हेत, तर समर्थांपैकीं द्वितीयपदाच्या अर्थाप्रत प्राप्त झालेले आहेत.

तसेंच आणखीही जें म्हटलें आहे, सप्तपर्ण, अष्टापद, येथें समासानेंच वीप्सा उक्त असल्यामुळें पुनः त्या अर्थी द्विर्वचन होत नाहीं, तेंही बरोबर नाहीं. कारण येथें ज्या पदार्थांची वीप्सा आहे त्या अर्थाच्या शब्दाचा येथें प्रयोगच केलेला नाहीं.

येथें कोणत्या बरें पदार्थाची वीप्सा विवक्षित आहे ?

पर्वणि पर्वणि सप्त पर्णान्यस्य, पङ्क्तौ पङ्क्तौ अष्टौ पदान्यस्य, म्हणजे प्रत्येक कांड्याला सात पानें आहेत, आणि प्रत्येक ओळीला आठ घरें आहेत. तेव्हां कांडें आणि ओळ या अर्थाच्या शब्दाचा प्रयोग येथें नसल्यामुळें द्विर्वचनाची प्राप्तिच नाहीं.

तर मग हीं उदाहरणें घ्यावींत: श्नम्, बहुच्, अकच् या तीन ठिकाणीं सामान्य शास्त्रानें सांगितलेल्या प्रत्ययाची उत्पत्ति होत नाहीं; जसें– भिनत्ति, छिनत्ति, येथें श्नम्प्रत्ययानें कर्ता हा अर्थ उक्त झाला असल्यामुळें पुनः त्या अर्थी शप्प्रत्यय होत नाहीं. बहुकृतम्, बहुभिन्नम्, येथें बहुच्प्रत्ययानें थोडा कमीपणा हा अर्थ उक्त झाला असल्यामुळें पुनः त्या अर्थी कल्पप्, देश्य, वगैरे प्रत्यय होत नाहींत; आणि उच्चकैः, नीचकैः, येथें अकच्प्रत्ययानें कुत्सा,

४. जसें– दण्डः अस्ति यस्य दण्डवान्, म्हणजे दंड आहे ज्याचा, असें येथें अस्ति याच्याशीं सामानाधिकरण्य दंडाला आहे. चित्राः गावः यस्य चित्रगुः इत्यादि बहुव्रीहिस्थळीं अस्ति याच्याशीं सामानाधिकरण्य चित्रगो इ० यांना आहे. परंतु बहुव्रीहि केल्यामुळें चित्रगोशब्दाचा मूळचा अर्थ राहिला नाहीं तर त्या गाईंचा मालक जो अन्य पदार्थ तोच चित्रगो या शब्दांचा अर्थ झाला आहे. तेव्हां आतां चित्रविचित्र आहेत गायी ज्याच्या या अर्थी मतुप्प्रत्यय करतां येणार नाहीं.

५. 'तस्यापत्यम्' या सूत्रामध्यें प्रत्ययात् हें पद अधिकारानें लब्ध होतें. सूत्रामध्यें प्रथमतः उच्चारित पद असा त्याचा अर्थ आहे. तें प्रथमतः उच्चारलेलें पद सूत्रामध्यें तस्य हें आहे. आणि अपत्यम् हें पद दुसऱ्यांदा उच्चारलें आहे. तेव्हां अपत्यवाचकाहून प्रत्यय न होतां ज्याचें अपत्य असेल त्याहून प्रत्यय होतो असा 'तस्यापत्यम्' याचा अर्थ ठरतो. गर्गाः इत्यादि स्थळीं अपत्यार्थी केलेल्या यञ् व अञ् प्रत्ययाचा लुक् झाला असला तरी त्याचा अर्थ कायम असल्यामुळें येथील गर्ग हा शब्द गर्गाचीं अपत्यें या अर्थाचा झाला आहे. तेव्हां असा जो गर्गशब्द त्याला प्रथमतः उच्चारित असें म्हणतां येत नाहीं.

रिति। अकचोक्तत्वात्कुत्सादीनां काद्यो न भवन्ति ॥ ननु च श्नम्बहुजकचोऽपवादास्तेऽपवादत्वाद्बाधका भविष्यन्ति।

**श्नम्बहुजकक्षु नानादेशत्वादुत्सर्गाप्रतिषेधः ॥ २ ॥**

समानदेशैरपवादैरुत्सर्गाणां बाधनं भवति नानादेशत्वान्न प्राप्नोति ॥ किं पुनरिहाकर्तव्योऽनभिहिताधिकारः क्रियत आहोस्विदन्यत्र कर्तव्यो न क्रियते। इहाकर्तव्यः क्रियते। एष एव हि न्याय्यः पक्षो यदभिहिते विहितं न स्यात् ॥

**अनभिहितस्तु विभक्त्यर्थस्तस्मादनभिहितवचनम् ॥ ३ ॥**

अनभिहितस्तु विभक्त्यर्थः। कः पुनर्विभक्त्यर्थः। एकत्वादयो विभक्त्यर्थास्तेष्वनभिहितेषु कर्मादयोऽभिहिता विभक्तीनामुत्पत्तौ निमित्तत्वाय मा भूवन्निति तस्मादनभिहितवचनम्। तस्मादनभिहिताधिकारः क्रियते ॥

अवश्यं चैतदेवं विज्ञेयमेकत्वादयो

---

अज्ञान, वगैरे अर्थ उक्त झाले असल्यामुळें पुनः तेथें त्या अर्थी क वगैरे प्रत्यय होत नाहींत.

पण श्नम्, बहुच्, अकच्, हे अपवाद असल्यामुळें ते सामान्य शास्त्राचा बाध करतील.

(वा.२) सामान्य शास्त्राचा आणि विशेष शास्त्राचा प्रदेश एकच असेल तर अपवादशास्त्रानें सामान्य शास्त्राचा बाध होत असतो. श्नम्, बहुच् आणि अकच् यांचा देश सामान्य शास्त्रापेक्षां निराळा असल्यामुळें त्यांच्याकडून शप् वगैरेंचा बाध होणें शक्य नाहीं.

पण काय हो, आतां या ठिकाणीं 'अनभिहिते' हा अधिकार करावयास नको असतां केला आहे किंवा अन्य ठिकाणीं करावयास पाहिजे असतां केला नाहीं ?

या ठिकाणीं करावयास नको असतां केला आहे. कारण जो अर्थ शब्दान्तरानें दाखविला गेला तो अर्थ दाखविण्यासाठीं विहित असलेला शब्द पुनः योजावयाचा नाहीं हाच न्याय सरास आहे.

(वा.३) विभक्तीचा अर्थ अनुक्तच आहे.

विभक्तीचा अर्थ तो कोणता ?

एकत्व, द्वित्व, वगैरे हे विभक्तीचे अर्थ होत. ते एकत्वादिक विभक्त्यर्थ अनुक्त असल्यामुळें त्या सबबीवर उक्त असेही कर्म, करण, वगैरे अर्थ द्वितीयादि विभक्तींची उत्पत्ति होण्याविषयीं कारण होतील, ते न व्हावेत म्हणून अनभिहिते हा अधिकार केला आहे.

एकत्वादिक हे विभक्त्यर्थ होत असें जरूर समजलेंच पाहिजे.

---

६. श्नम्प्रत्यय धातूमधील अचाच्या पुढें होतो आणि शप्प्रत्यय धातूच्या पुढें होतो. बहुच्प्रत्यय शब्दाच्या पूर्वी होतो आणि कल्पप् वगैरे प्रत्यय शब्दाच्या पुढें होतात. तसेंच अकच्प्रत्यय शब्दामधील टीच्या पूर्वी होतो आणि क वगैरे प्रत्यय शब्दाच्या पुढें होतात. उत्सर्ग म्ह. सामान्य शास्त्र आणि अपवाद यांमध्यें विरोध असतांनाच बाध्यबाधकभाव होतो असें वार्तिककारांचें मत आहे. तेव्हां निरनिराळ्या ठिकाणीं होणाऱ्या उत्सर्ग आणि अपवाद यांमध्यें विरोध नसल्यामुळें बाध्यबाधकभाव होत नाहीं. तेव्हां श्नम् वगैरेंनीं कर्ता वगैरे अर्थ उक्त होत असल्यामुळेंच शप् वगैरे होत नाहींत असेंच म्हटलें पाहिजे. त्याप्रमाणें येथेंही कर्म वगैरे अर्थ उक्त असतांना द्वितीया वगैरे होणार नाहींत. तेव्हां 'अनभिहिते' हा अधिकार नको असें सिद्ध झालें.

७. विभक्तिप्रत्ययाचा अर्थ कर्ता, कर्म, वगैरे आहे आणि एकत्व, द्वित्व, वगैरे संख्याही आहे. तेव्हां ज्या ठिकाणीं कर्ता, कर्म, हे अर्थ उक्त असतील त्या ठिकाणीं जरी ते उक्त असले तरी संख्या दाखविण्याकरितां प्रत्यय होतील. त्या प्रत्ययांपैकीं कर्म उक्त असेल तेथें द्वितीया न व्हावी; कर्ता, करण, हे अर्थ उक्त असतील तेथें तृतीया न व्हावी याकरितां हा अधिकार पाहिजे.

विभक्त्यर्था इति ।

**अभिहिते प्रथमाभावः ॥ ४ ॥**

यो हि मन्यते कर्मादयो विभक्त्यर्थास्तेष्वभिहितेषु सामर्थ्यान्मे विभक्तीनामुत्पत्तिर्न भविष्यतीति प्रथमा तस्य न प्राप्नोति । क्व । वृक्षः प्लक्षः । किं कारणम् । प्रातिपादिकेनोक्तः प्रातिपदिकार्थ इति ॥

न क्वचित्प्रातिपदिकेनानुक्तः प्रातिपदिकार्थ उच्यते च प्रथमा सा वचनाद्भविष्यति ॥ तवैव तु खल्वेष दोषो यस्य त एकत्वादयो विभक्त्यर्था अभिहिते प्रथमाभाव इति । प्रथमा ते न प्राप्नोति । क्व । पचत्योदनं देवदत्त इति । किं कारणम् । तिङोक्ता एकत्वादय इति । अनभिहिताधिकारं च त्वं करोषि परिगणनं च ॥

न क्वचित्तिङैकत्वादीनामनभिधानमुच्यते च प्रथमा सा वचनाद्भविष्यति । ननु चेहानभिधानं वृक्षः प्लक्ष इति । अत्राप्यभिधानमस्ति । कथम् । वक्ष्यत्येतत् । अस्तिर्भवन्तीपरः प्रथमपुरुषोऽप्रयुज्यमानोऽप्यस्तीति । वृक्षः प्लक्षः । अस्तीति गम्यते ॥ तवैव तु खल्वेष दोषो

---

(वा.४) क्रियते कटः इत्यादि स्थलीं द्वितीयादिक विभक्ति होत नाहीं, असें जो म्हणतो त्याच्या मतीं प्रथमाही होणार नाहीं.

कोठें ?

वृक्षः, प्लक्षः, येथें.

काय कारण ?

कारण असें की प्रातिपदिकार्थीं प्रथमा सांगितली आहे (२।३।४६), आणि तो प्रातिपदिकार्थ तर प्रातिपदिकानेंच उक्त होत आहे.

पण प्रातिपदिकानें न दाखविलेला असा प्रातिपदिकार्थ कोठेंच नाहीं, आणि प्रथमा तर प्रातिपदिकार्थींच सांगितली आहे. तेव्हां अर्थातच विधानाच्या जोरावर प्रातिपदिकार्थ उक्त असतांही तेथें प्रथमा होईल.

ज्या तुझ्या मतीं एकत्वादिक हे विभक्त्यर्थ आहेत त्या तुलाच हा दोष लागू होत आहे. एकत्वादिक हे क्रियापदांतील प्रत्ययानें उक्त असतां तेथें प्रथमा येऊं शकत नाहीं. म्हणून तुझ्या मतीं प्रथमाविभक्ति होणार नाहीं.

प्रथमाविभक्ति कोठें होणार नाहीं ?

पचत्योदनं देवदत्तः येथें.

काय कारण ?

कारण असें की पचति येथील तिङानें कर्त्याचें एकत्वादिक उक्त झालें आहे. अनभिहिताधिकारही तूं करीत आहेस आणि तिङ्, कृत्, तद्धित व समास यांनीं अनभिहित असें परिगणनही करीत आहेस.[८] तिङानें न दाखविलेले असे एकत्वादिक विभक्त्यर्थ कोठेंच नाहींत आणि तशा एकत्वादिक अर्थीं तर प्रथमाविभक्ति सांगितली आहे. तेव्हां अर्थात् विधानाच्या जोरावर तिङानें एकत्वादिक उक्त असतांही तेथें प्रथमाविभक्ति होईल.

पण वृक्षः, प्लक्षः, येथें तिङानें न दाखविलेलें असें एकत्व दृष्टी पडत आहे ना ?

येथही तिङानें दाखविलेलें असेंच एकत्व आहे.

तें कसें बरें ?

अस्ति याचा प्रयोग वक्त्यानें केलेला नसेल तरी तो सर्वत्र आहेच असें समजावें, असें पुढें सांगणार आहे. कारण नुसतें वृक्षः, प्लक्षः, असें म्हटलें असतां त्याचे पुढें आहे असा अर्थ मनांत येतो. पण तुझ्या मतीं कर्म, करण, वगैरे हे विभक्त्यर्थ असल्यामुळें तुलाच हा दोष लागू होत आहे. म्हणजे कर्मादिक अभिहित

---

८. तेव्हां क्रियापदांतील तिङ्प्रत्ययानेंच एकत्व वगैरे उक्त होत आहे; तेव्हां अनभिहिते या अधिकारामुळें प्रथमा होणार नाहीं असा दोष येतो.

यस्य ते कर्मादयो विभक्त्यर्था अभिहिते प्रथमाभाव इति । प्रथमा ते प्राप्नोति । क । कटं करोति भीष्ममुदारं शोभनं दर्शनीयमिति । कटशब्दादुत्पद्यमानया द्वितीययाभिहितं कर्मेति कृत्वा भीष्मादिभ्यो द्वितीया न प्राप्नोति । का तर्हि प्राप्नोति । प्रथमा । तद्यथा । कृतः कटो भीष्म उदारः शोभनो दर्शनीय इति करोतेरुत्पद्यमानेन क्तेनाभिहितं कर्मेति कृत्वा भीष्मादिभ्यो द्वितीया न भवति । का तर्हि । प्रथमा भवति ॥

नैष दोषः । न हि ममानभिहिताधिकारोऽस्ति नापि परिगणनम् । सामर्थ्यान्मे विभक्तीनामुत्पत्तिर्भविष्यत्यस्ति च सामर्थ्यम् । किम् । कर्मविशेषो वक्तव्यः ॥ अथवा कटोऽपि कर्म भीष्मादयोऽपि तत्र कर्मणीत्येव सिद्धम् ॥ अथवा कट एव कर्म तत्सामानाधिकरण्याद्भीष्मादिभ्यो द्वितीया भविष्यति॥ अस्ति खल्वपि विशेषः कटं करोति भीष्ममुदारं शोभनं दर्शनीयमिति च कृतः कटो भीष्म उदारः शोभनो दर्शनीय इति च । करोतेरुत्पद्यमानः क्तोऽनवयवेन सर्वं कर्माभिधत्ते कटशब्दात्पुनरुत्पद्यमानया द्वितीयया यत्कटस्थं कर्म तच्छक्यमभिधातुं न हि कर्मविशेषः ॥ तत्रैव तु ख-

---

असतां तेथें प्रथमाविभक्तीची प्रवृत्ति तूं स्वीकारली आहेस. तेव्हां प्रथमा प्राप्त होत आहे.

ती प्रथमा कोठें प्राप्त होत आहे ?

कटं करोति भीष्ममुदारं शोभनं दर्शनीयम् येथें कटशब्दार्थाचें कर्मत्व कटशब्दाच्या पुढें केलेल्या द्वितीयाविभक्तीनें उक्त झालें असल्यामुळें भीष्म वगैरे विशेषणवाचक शब्दांहून द्वितीयाविभक्ति होणार नाहीं.

तर कोणती विभक्ति होईल ?

प्रथमाविभक्ति होईल; जसें:— कृतः कटो भीष्म उदारः शोभनो दर्शनीयः येथें कृधातूच्या पुढें झालेल्या क्तप्रत्ययानें कर्मत्व अभिहित झालें असल्यामुळें भीष्म वगैरे शब्दांच्या पुढें द्वितीयाविभक्ति होत नाहीं.

तर कोणती विभक्ति होते ?

प्रथमाविभक्ति होते.

हा दोष येत नाहीं. कारण माझ्या मतीं अनभिहिताधिकारही नाहीं व तिङ्कृत्तद्धित० इत्यादि परिगणनही नाहीं. तेव्हां केवळ योग्यता असल्यामुळें भीष्म वगैरे विशेषणवाचकांहून द्वितीयेची उत्पत्ति होईल.

योग्यता आहे असें कशावरून समजावें ?

विशेष प्रकारचें कर्म दाखवावें अशी वक्त्याची इच्छा दिसते यावरून.

अथवा कट हेंही कर्म होय, व भीष्म वगैरे देखील स्वतंत्र कर्में होत, तेव्हां सर्वांनाच पृथक् पृथक् कर्मसंज्ञा असल्यामुळें 'कर्मणि द्वितीया' या पुढील सूत्रानें प्रत्येकाच्या पुढें द्वितीया होईल.

किंवा येथें कट हें कर्म आहे आणि भीष्म वगैरे हे शब्द निरनिराळ्या रूपानें पण कट याच अर्थाला दाखविणारे असल्यामुळें त्या भीष्मादिक शब्दांच्यापुढेंही द्वितीया होईल.

पण कटं करोति भीष्ममुदारं शोभनम् व कटः कृतो भीष्म उदारः शोभनो दर्शनीयः या दोहोंमध्यें फरक आहे तो असा:— कृतः येथें उत्पत्ति या अर्थाच्या कृधातूच्यापुढें कर्म या अर्थी केलेल्या क्तप्रत्ययानें उत्पत्तिक्रियेचें कर्म सर्वप्रकारचें उक्त होतें. तेव्हां क्तप्रत्ययानें कट आणि भीष्म वगैरे विशेषणें या सर्वांवरीलच कर्मत्व दाखविलें असल्यामुळें विशेषविशेष्यांपैकीं कोठेंही द्वितीया येऊं शकत नाहीं; आणि कटम् येथें कटशब्दाच्या पुढील द्वितीया तर कटशब्दानें ज्या तऱ्हेचा अर्थ दाखविला जातो त्याच अर्थावरील कर्मत्व दाखवूं शकते; भीष्म वगैरे विशेषणांवरील

त्वेष दोषो यस्य त एकत्वादयो विभक्त्यर्था अभिहिते प्रथमाभाव इति । प्रथमा ते न प्राप्नोति । क्व । एकः द्वौ बहव इति । किं कारणम् । प्रातिपदिकेनोक्ता एकत्वादय इति ॥

कर्मादिष्वपि वै विभक्त्यर्थेष्ववश्यमेकत्वादयो निमित्तत्वेनोपादेयाः । कर्मण एकत्वे कर्मणो द्वित्वे कर्मणो बहुत्व इति । न चैकत्वादीनामेकत्वादयः सन्ति । अथ सन्ति ममापि सन्ति । तेष्वनभिहितेषु प्रथमा भविष्यति ॥ अथवोभयवचना ह्येते । द्रव्यं चाहुर्गुणं च । यत्स्थोऽसौ गुणस्तस्यानुक्ता एकत्वादय इति कृत्वा प्रथमा भविष्यति ॥ अथवा संख्या नामेयं परप्रधाना । संख्येयमनया विशेष्यम् । यदि चात्र प्रथमा न स्यात्संख्येयमविशेषितं स्यात् ॥ अथवा वक्ष्यति तत्र वचनग्रहणस्य प्रयोजनमुक्तेष्वप्येकत्वादिषु प्रथमा यथा स्यादिति ॥ अथवा समयाद्धवि-

---

कर्मत्व दाखवूं शकत नाहीं. पण एकत्व वगैरे विभक्तीचे अर्थ होत असें म्हणणाऱ्या तुझ्याच मतीं खरोखर हा पुढील दोष येय आहे. एकत्वादिक प्रातिपदिकानें अभिहित झाल्यामुळें प्रथमाविभक्ति येऊं शकत नाहीं.

कोठें येऊं शकत नाहीं ?

एकः, द्वौ, बहवः, येथें.

काय कारण ?

एक, द्वि, वगैरे शब्दांनींच एकत्व, द्वित्व, वगैरे अर्थ दाखविले गेले आहेत म्हणून.

पण कर्म वगैरे विभक्तींचे अर्थ आहेत या पक्षींही एकत्वादिक विभक्ति होण्यास कारणीभूत आहेत असें जरूर मानलेंच पाहिजे. म्हणजे कर्माचें एकत्व दाखविणें असेल तर द्वितीयेचें एकवचन होतें, द्वित्व दाखविणें असेल तर द्विवचन होतें, आणि बहुत्व दाखविणें असेल तर बहुवचन होतें. तसेंच प्रातिपदिकार्थाचें एकत्व दाखविणें असल्यास प्रथमा–एकवचन होतें, इत्यादि. तेव्हां एकत्वादिकांचे ठिकाणीं दुसरी एकत्वादि संख्या नसल्यामुळें एकः, द्वौ, वगैरे स्थळीं विभक्ति होणार नाहीं हा दोष येतोच.

आतां एकः इत्यादि स्थळीं प्रातिपदिकार्थभूत एक, दोन, वगैरे संख्या निराळी व त्या संख्येवर विभक्तीनें दाखविली जाणारी एक, दोन, वगैरे संख्या निराळी आहे, असें म्हणशील तर माझ्याही मतानें प्रातिपदिकार्थभूत संख्येहून निराळी अशी त्या संख्येवर राहणारी एकत्वादिक संख्या आहे; ती संख्या अनभिहित असल्यामुळें एकः वगैरे स्थळीं प्रथमाविभक्तीची प्रवृत्ति होईल.

किंवा एक, दोन, वगैरे संख्याशब्द हे सामान्यतः द्रव्य आणि त्यांतील संख्या हा गुण या दोन्हीही अर्थाला मिळून दाखवितात; तो गुण ज्या द्रव्यावर आहे त्या विशेष द्रव्यावरील संख्येला स्वातंत्र्यानें दाखवीत नाहींत. अर्थात् तसल्या प्रकारची संख्या म्ह. एकत्वादिक अनभिहितच असल्यामुळें ती दाखविण्यासाठीं प्रथमा होईल.

किंवा संख्या म्हणून जी आहे ती सर्वत्र विशेषणच असते. या संख्येनें आपलें विशेष्यभूत जें संख्येय तें अमुक इतकें आहे असें दाखविलें जातें. तेव्हां जर एकः वगैरे स्थलीं प्रथमाविभक्ति होणार नाहीं तर तें दाखविलें जाणार नाहीं.

किंवा 'प्रातिपदिकार्थ०' या सूत्रावर प्रातिपदिकार्थावरील संख्या अभिहित असतांही प्रथमा व्हावी असें वचनग्रहणाचें प्रयोजन सांगणार असल्यामुळें प्रातिपदिकानें एकत्वादिक संख्या उक्त झाली असतांही प्रथमा होईल.

किंवा प्रत्यय पुढें केल्याशिवाय केवळ प्रकृतीचा प्रयोग करूं नये असा परश्न (३।१ २) या सूत्रानें नियम केला असल्यामुळें एकः इत्यादि स्थळीं प्रथमा होईल.

ष्यति । यदि सामयिकी न नियोगतोऽन्याः कस्मान्न भवन्ति । कर्मादीनामभावात् ॥ षष्ठी तर्हि प्राप्नोति । शेषलक्षणा षष्ठ्यशेषत्वान्न भविष्यति ॥ एवमपि व्यतिकरः प्राप्नोति । एकस्मिन्नपि द्विवचनबहुवचने प्राप्नुतः । द्वयोरप्येकवचनबहुवचने प्राप्नुतः। बहुष्वप्येकवचनद्विवचने प्राप्नुतः । अर्थतो व्यवस्था भविष्यति ॥

परिगणनं कर्तव्यम् ।

**तिङ्कृत्तद्धितसमासैः परिसंख्यानम् ॥ ५ ॥**

तिङ्कृत्तद्धितसमासैः परिसंख्यानं कर्तव्यम् । तिङ् । क्रियते कटः । कृत् । कृतः कटः । तद्धित । औपगवः कापटवः । समास । चित्रगुः शबलगुः ।

**उत्सर्गे हि प्रातिपदिकसामानाधिकरण्ये विभक्तिवचनम् ॥ ६ ॥**

उत्सर्गे हि प्रातिपदिकसामानाधिकरण्ये विभक्तिर्वक्तव्या । क्व । कटं करोति भीष्ममुदारं शोभनं दर्शनीयमिति । कटशब्दादुत्पद्यमानया द्वितीययाभिहितं कर्म-

---

जर केवळ प्रकृतीचा प्रयोग करूं नये हा नियम संभाळण्याकरितां विभक्ति करावयाची तर प्रथमाच काय म्हणून करावी ? द्वितीया वगैरे कां बरें होत नाहीं ?

कर्म, करण, वगैरे अर्थ असतील तरच द्वितीयादि विभक्ति होतात. आणि प्रकृत स्थळीं ते अर्थ विवक्षित नसल्यामुळें द्वितीयादिक विभक्ति होत नाहींत.

तरी पण षष्ठीविभक्ति प्राप्त होत आहे.

षष्ठीविभक्तीविषयीं कारक व प्रातिपदिकार्थ यांपेक्षां निराळा स्वस्वामिभाव वगैरे कोणी तरी संबंध हा निमित्त म्हणून धरला आहे, त्याची प्रकृत स्थळीं प्रतीति होत नसल्यामुळें षष्ठी होणार नाहीं.

तरीही अदलाबदल होणारच. म्हणजे एकवचनाचे ऐवजीं द्विवचन व बहुवचनही प्राप्त होत आहे, व द्विवचनाचे ऐवजीं एकवचन आणि बहुवचनही प्राप्त होत आहे. तसेंच बहुवचनाचे ऐवजीं एकवचन व द्विवचनही प्राप्त होत आहे.

अर्थाला अनुसरूनही ही व्यवस्था होईल.[९]

कर्म, करण, वगैरे अर्थांचें कोणत्या शब्दांनीं अभिधान झालें असावें, त्या शब्दांचें परिगणन करावें.

(वा.५) कर्म, करण वगैरे अर्थांचें तिङ्, कृत्, तद्धित आणि समास यांनींच प्रतिपादन केलें असल्यास ते उक्त समजावेत. तिङाचें उदाहरण– क्रियते कटः[१०]. कृताचें उदा० – कृतः कटः. तद्धिताचें उदाहरण– औपगवः, कापटवः, समासाचें उदा०–चित्रगुः, शबलगुः.

(वा.६) कर्म वगैरे अर्थ अनुक्त असतां असें मोघम म्हटलें तर एकाच वस्तूला दाखविणारीं अशीं अनेक प्रातिपदिकें असतील तेथें विभक्तीचें विधान करावें लागेल.

तेथें म्हणजे कोठें ?

कटं करोति भीष्ममुदारं शोभनं दर्शनीयम्

---

९. अनन्वित अर्थाचा प्रत्यय करण्यापेक्षां अनुवादक अर्थाचा प्रत्यय करणें हेंच योग्य आहे.

१०. कर्मणिप्रयोगामध्यें क्रियते या क्रियापदांतील ते या तिङ्प्रत्ययानें कर्म हा अर्थ होतो म्हणून कटः येथें द्वितीया (२।३।२) झाली नाहीं. तसेंच कृतः कटः येथें कृधातूहून केलेल्या क्त या कृत्प्रत्ययानें कर्म हा अर्थ उक्त होतो. तसेंच औपगवः येथें उपगूचा अपत्याशीं संबंध अण् या तद्धितप्रत्ययानें उक्त होतो म्हणून षष्ठी (२।३।५०) होत नाहीं. तसेंच चित्रगुः येथें बहुव्रीहिसमासानें गाईचा मालकाशीं संबंध उक्त होतो म्हणून षष्ठी होत नाहीं.

ति कृत्वा भीष्मादिभ्यो द्वितीया न प्राप्नोति ॥ का तर्हि स्यात्। षष्ठी। शेषलक्षणा षष्ठ्यशेषत्वान्न भविष्यति ॥ अन्या अपि न प्राप्नुवन्ति। किं कारणम्। कर्मादीनामभावात् ॥ समयश्च कृतो न केवला प्रकृतिः प्रयोक्तव्या न केवलः प्रत्यय इति न चान्या उत्पद्यमाना एतमभिसंबन्धमुत्सहन्ते वक्तुमिति कृत्वा द्वितीया भविष्यति ॥ अथवा कटोऽपि कर्म भीष्मादयोऽपि तत्र कर्मणीत्येव सिद्धम्। अथवा कट एव कर्म तत्सामानाधिकरण्याद्भीष्मादिभ्यो द्वितीया भविष्यति ॥ तस्मान्नार्थः परिगणनेन ॥

**द्वयोः क्रिययोः कारकेऽन्यतरेणाभिहिते विभक्त्यभावप्रसङ्गः ॥ ७ ॥**

द्वयोः क्रिययोः कारकेऽन्यतरेणाभिहिते विभक्तिर्न प्राप्नोति। क्व। प्रासाद आस्ते। शयन आस्त इति। किं कारणम्।

येथें.

या ठिकाणीं कट ही वस्तु कर्म आहे आणि त्याच वस्तूला कट, भीष्म, वगैरे शब्द दाखवितात. तेव्हां तें कर्म कटशब्दापुढील द्वितीयाविभक्तीनें उक्त होत असल्यामुळें भीष्म, उदार, वगैरे शब्दांहून द्वितीया प्राप्त होऊं शकत नाही.

तर मग कोणती विभक्ति प्राप्त होईल ?

षष्ठीविभक्ति प्राप्त होत आहे.

पण कारक व प्रातिपदिकार्थ यांहून निराळा जो स्वस्वामिभाव वगैरे संबंध त्या अर्थी षष्ठी सांगितली आहे. तसा संबंध येथें नसल्यामुळें षष्ठीविभक्ति होणार नाहीं. तसेंच इतर विभक्तिही प्राप्त होऊं शकत नाहींत.

काय कारण ?

कारण असें की अनुक्त असे कर्मादिक अर्थ येथें नाहींत. शिवाय केवळ प्रकृतीचा किंवा केवळ प्रत्ययाचा प्रयोग करूं नये असा नियम केला आहे. तेव्हां भीष्मादि शब्दांच्या पुढें द्वितीयाविभक्तीशिवाय दुसरी कोणतीही विभक्ति केली तर ती विभक्ति भीष्मादिकांचा कटम् याच्याशीं संबंध दाखवूं शकणार नाहीं.[११]

शिवाय केवळ प्रकृतीचा प्रयोग करूं नये हा नियम सांभाळण्याकरितां केली जाणारी विभक्ति द्वितीयाच होईल.

किंवा कट हा कर्म आहे आणि भीष्म वगैरे हींही स्वतंत्र कर्मे आहेत. तेव्हां कट, भीष्म, वगैरे प्रत्येकापुढें 'कर्मणि द्वितीया' यानेंच द्वितीया होईल.

अथवा कटत्वजातिविशिष्ट अशा कटालाच कर्मसंज्ञा आहे. भीष्मादिकांना कर्मसंज्ञा नाहीं. तरी पण भीष्मादिकही त्या कटपदार्थाचीं समानाधिकरण अशीं विशेषणें आहेत; तेव्हां विशेष्याची जी विभक्ति तीच विशेषणालाही लागू करणें[१२] उचित असल्यामुळें भीष्मादि शब्दांपुढें द्वितीया होईल. एकंदरींत परिगणन करण्याचा उपयोग नाहीं.

(वा.७) दोन क्रियांचें जें कारक तें त्या क्रियांना दाखविणाऱ्या दोन धातूंपैकीं एका धातूपुढील प्रत्ययानें उक्त झालें असल्यामुळें तेथें विभक्ति होणार नाहीं.

तेथें म्हणजे कोठें ?

प्रासादे आस्ते, शयने आस्ते, येथें.

काय कारण ?

कारण असें की प्रासादे आस्ते येथें सदिधातूनें आणि आसिधातूनें दाखविलेल्या क्रियेचें अधिकरण एकच प्रासाद[१३] होय.

---

११. सामानाधिकरण्य हें विशेष्य आणि विशेषण या उभयतांची विभक्ति समान असली तरच प्रतीत होतें, एरवीं होत नाहीं.

१२. मागील टीप ९ पाहाणें.

१३. प्रकर्षेण आसीदन्ति लोका अस्मिन् इति प्रासादः म्हणजे लोक हे विशेष पद्धतीनें ज्या ठिकाणीं बसतात तो प्रासाद होय. प्र-आ-उपसर्गपूर्वक सद्धातूहून अधिकरण या अर्थी घञ्प्रत्यय (३।३।१२१) झाला आहे.

सदिप्रत्ययेनाभिहितमधिकरणमिति कृत्वा सप्तमी न प्राप्नोति ॥

**न वान्यतरेणानभिधानात् ॥ ८ ॥**

न वैष दोषः। किं कारणम्। अन्यतरेणानभिधानात्। अन्यतरेणात्रानभिधानम्। सदिप्रत्ययेनाभिधानमासिप्रत्ययेनानभिधानम्। यतोऽनभिधानं तदाश्रया सप्तमी भविष्यति ॥ कुतो नु खल्वेतत्सत्यभिधाने चानभिधाने चानभिहिताश्रया सप्तमी भविष्यति न पुनरभिहिताश्रयः प्रतिषेध इति।

**अनभिहिते हि विधानम् ॥ ९ ॥**

अनभिहिते हि सप्तमी विधीयते नाभिहिते प्रतिषेधः॥ यद्यपि तावदत्रैतच्छक्यते वक्तुं यत्रान्या चान्या च क्रिया यत्र तु खलु सैव क्रिया तत्र कथम्।

---

प्रासाद हा शब्द अधिकरणीं घञ्प्रत्यय करून बनविला आहे. तेव्हां तें अधिकरण सदिधातूपुढील घञ्प्रत्ययानें उक्त झालें असल्यामुळें प्रासाद शब्दाच्या पुढें आसिधातूनें दाखविलेल्या क्रियेमुळें अधिकरण दाखविण्यासाठींही सप्तमीविभक्ति प्राप्त होऊं शकत नाहीं.

(वा.८) हा दोष येत नाहीं.

काय कारण ?

कारण असें की दोन धातूंपैकीं एका धातूपुढील प्रत्ययानें तें अधिकरण दाखविलें गेलें नाहीं, म्हणून. म्हणजे सदिधातूपुढील घञ्प्रत्ययानें प्रासादरूप अधिकरण दाखविलें गेलें असलें तरी आसिधातूपुढील कर्ता या अर्थीं केलेल्या 'ते' या प्रत्ययानें तें दाखविलें गेलें नाहीं. तेव्हां ज्या धातूपुढील प्रत्ययानें तें अधिकरण उक्त झालेलें नाहीं त्या धातूचें हें अधिकरण आहे असें दाखविण्यासाठीं सप्तमी होईल.

पण तोच अर्थ एकाकडून उक्त असतां आणि एकाकडून अनुक्त असतां तेथें अनुक्त आहे म्हणून सप्तमी प्रवृत्त होईल आणि उक्त आहे म्हणून त्या सप्तमीचा प्रतिषेध मात्र होणार नाहीं हें कशावरून ?

(वा.९) अधिकरण अनभिहित असतां सप्तमीचें विधान केलें आहे, म्हणजे अनभिहिते पर्युदास होय. अधिकरण अभिहित असतां सप्तमी करूं नये असा प्रतिषेध केला नाहीं.[१४] अर्थात् 'अनभिहिते' हा प्रसज्यप्रतिषेध नव्हे.

आतां जेथें भिन्न भिन्न स्वरूपाच्या दोन क्रिया आहेत तेथें त्या क्रियेचें एकच अधिकरण एकीकडून अभिहित झालें असलें तरी एकीकडून अनभिहित असल्यामुळें तेथें सप्तमी प्रवृत्त होईल असें उत्तर देणें शक्य आहे,

---

१४. पर्युदासपक्ष घेतला असतां सप्तमीच्या प्रवृत्तीला अधिकरणाचें अनभिहितत्व हें कारण दाखविलें असल्यामुळें व प्रासादरूप अधिकरणकारक सदिधातूपुढील घञ्प्रत्ययानें उक्त झालें तरी आसिधातूपुढील 'ते' या प्रत्ययानें उक्त झालें नसल्यामुळें त्याचें अनभिहितत्व कायमच असल्यामुळें सप्तमी प्रवृत्त होते. प्रसज्यप्रतिषेध घेतला असता तर प्रतिषेधाच्या प्रवृत्तीला अधिकरणाचें अभिहितत्व हें कारण दाखविलें गेल्यामुळें प्रासादरूप अधिकरण आसिधातूपुढील प्रत्ययाकडून अनुक्त असलें तरी सदिधातूपुढील प्रत्यायाकडून अभिहित झालें असल्यामुळें त्याचें अभिहितत्व कायम असल्यानें निषेध प्रवृत्त झाला असता. तेव्हां तेंच अधिकरण एकीकडून अभिहित व एकीकडून अनभिहित आहे तरी पर्युदास घेतल्यानें सप्तमी प्रवृत्त होते, आणि निषेध प्रवृत्त होत नाहीं. एकाच वस्तूला परस्परविरुद्ध असा कर्तृकर्मादि व्यवहार होत असल्यामुळें कारकशक्ति ही द्रव्यस्वरूप नसून त्या द्रव्यस्वरूपापेक्षां निराळी आहे असें ठरतें. म्हणून भिन्न स्वरूपांच्या दोन क्रियेचें अधिकरण वस्तु एकच असलें तरीं भिन्न भिन्न अशा दोन क्रियांमुळें जी अधिकरणशक्ति ती भिन्न भिन्न असल्यामुळें एक अधिकरण शक्ति अभिहित झाली तरी दुसरी अधिकरणशक्ति अनभिहितच असल्यामुळें तेथें सरळच सप्तमी प्रवृत्त होते.

आसन आस्ते । शयने शेत इति । अत्राप्यन्यत्वमस्ति । कुतः । कालभेदात्साधनभेदाच्च । एकस्यात्रासेरासिः साधनं सर्वकालश्च प्रत्ययः । अपरस्य बाह्यं साधनं वर्तमानकालश्च प्रत्ययः ॥ किं पुनर्द्रव्यं साधनमाहोस्विद्गुणः । किं चातः । यदि द्रव्यं साधनं नैतदन्यद्भवत्यभिहितात् । अथ हि गुणः साधनं भवत्येतदन्यदभिहितात् । अन्यो हि सदिगुणोऽन्यश्चासिगुणः ॥ किं पुनः साधनं न्याय्यम् । गुण इत्याह । कथं ज्ञायते । एवं हि कश्चित्कंचित्पृच्छति । क देवदत्त इति । स तस्मा आचष्टे । असौ वृक्ष इति । कतरस्मिन् । यस्तिष्ठतीति । स वृक्षोऽधिकरणं भूत्वान्येन शब्देनाभिसंबध्यमानः कर्ता संपद्यते । द्रव्ये पुनः साधने सति यत्कर्म कर्मैव स्याद्यत्करणं करणमेव यदधिकरणमधिकरणमेव ॥

**अनभिहितवचनमनर्थकं प्रथमाविधानस्यानवकाशत्वात् ॥ १० ॥**

---

तरी पण जेथें एकच क्रिया आहे तेथें म्हणजे आसने आस्ते, शयने शेते, येथें कसें ?

आसने आस्ते, शयने शेते, येथेंही प्रतीत होणारी आसिक्रिया आसने, आस्ते, या भिन्न भिन्न शब्दांपासून प्रतीत होत असल्यामुळें ती भिन्न भिन्न असल्यासारखीच आहे.

कशावरून ?

साधन व काल हे निरनिराळे आहेत म्हणून. आसन या शब्दापासून मनांत येणाऱ्या आसिक्रियेचें साधन आसिक्रियाच आहे, व ल्युट्प्रत्यय हा कालविशेष धरून सांगितला नसल्यामुळें तो त्या क्रियेचा भूतभविष्यादि सर्व काल दाखवीत आहे, आणि आस्ते यापासून मनांत येणाऱ्या आसिक्रियेचें साधन बाहेरचें देवदत्त वगैरे आहे, व लट्प्रत्यय हा वर्तमानकाळीं सांगितला असल्यामुळें तो वर्तमानकाळ दाखवितो.

पण काय हो, घट, पट, वगैरे पदार्थाला कारक म्हणावयाचें किंवा त्यावरील शक्तीला कारक म्हणावयाचें ? या दोहोंपैकीं कांहींही गृहीत धरलें तरी यांत काय बरें फरक होणार आहे ?

जर पदार्थाला कारक म्हणावयाचें असें गृहीत धरलें तर प्रासाद वगैरे पदार्थ एकच असल्यामुळें व तो घञ्प्रत्ययानें अधिकरण या नात्यानें उक्त होत असल्यामुळें त्याला अनभिहित म्हणतां येणार नाहीं. आतां जर शक्तीला कारक म्हणावयाचें तर मात्र एक अधिकरणशक्ति उक्त झाली तरी दुसरी अधिकरणशक्ति उक्त होत नसल्यामुळें अनभिहित असें म्हणतां येतें. कारण सदिधातूमुळें येणारी अधिकरणशक्ति निराळी व आसिधातूमुळें येणारी अधिकरणशक्ति निराळी आहे.

पण पदार्थ आणि शक्ति यांपैकीं कोणाला बरें कारक म्हणणें न्याय्य आहे ?

शक्तीला कारक हें नांव देणें योग्य होय असें म्हणतों.

हें कशावरून ठरविण्यांत येत आहे ?

कोणी एक कोणा एकाला विचारीत आहे की देवदत्त हा कोठें आहे ? तेव्हां तो त्याला उत्तर देत आहेः देवदत्त हा वृक्षावर आहे. पुनः तो विचारीत आहे की कोणत्या वृक्षावर आहे ? त्यावर तो उत्तर देत आहेः जो हा समोर वृक्ष उभा आहे त्यावर. येथें तो वृक्ष अधिकरण झाला असून त्याचा दुसऱ्या शब्दाबरोबर संबंध केला असतां तो कर्ता झाला आहे. जर द्रव्याला कारक म्हणावयाचें तर जें कर्म म्हणून ठरलें तें कर्मच कायम राहील. याप्रमाणें करण तें करणच आणि अधिकरण तें अधिकरणच होऊं शकेल. कारण द्रव्याच्या स्वरूपांत बदल होणें शक्य नाहीं.

(वा. १०) अनभिहिते हें सूत्र निरर्थक होय.

अनभिहितवचनमनर्थकम्। किं कारणम्। प्रथमाविधानस्यानवकाशत्वात्। अनवकाशा प्रथमा सा वचनाद्भविष्यति। सावकाशा प्रथमा। कोऽवकाशः। अकारकम्। वृक्षः प्लक्ष इति।

**अवकाशोऽकारकमिति चेन्नास्तिर्भवन्तीपरः प्रथमपुरुषोऽप्रयुज्यमानोऽप्यस्ति ॥ ११ ॥**

अवकाशोऽकारकमिति चेत्तन्न। किं कारणम्। अस्तिर्भवन्तीपरः प्रथमपुरुषोऽप्रयुज्यमानोऽप्यस्तीति गम्यते। वृक्षः प्लक्षः। अस्तीति गम्यते ॥

**विप्रतिषेधाद्वा प्रथमाभावः ॥ १२ ॥**

अथवा द्वितीयादयः क्रियन्तां प्रथमा वेति प्रथमा भविष्यति विप्रतिषेधेन। द्वितीयादीनामवकाशः। कटं करोति भीष्ममुदारं शोभनं दर्शनीयमिति। प्रथमाया अवकाशः। अकारकम्। वृक्षः प्लक्ष इति। इहोभयं प्राप्नोति। कृतः कटो भीष्म उदारः शोभनो दर्शनीय इति। प्रथमा भविष्यति विप्रतिषेधेन ॥ न सिध्यति। परत्वात्षष्ठी प्राप्नोति। शेषलक्षणा षष्ठ्यशेषत्वान्न भविष्यति ॥

**कृत्प्रयोगे तु परं विधानं षष्ठ्यास्त-**

काय कारण ?

क्रियते कटः इत्यादि स्थलीं द्वितीयादि विभक्ति होतील तर प्रथमाविभक्ति अचरितार्थ होईल; म्हणून द्वितीयादि विभक्तींचा बाध करून तेथें प्रथमा होईल.

पण प्रथमाविभक्तीला चारितार्थ्य आहे ना ?

तें कोठें ?

जें कारक नव्हे अशा ठिकाणीं, म्हणजे वृक्षः, प्लक्षः, येथें.

(वा.११) वृक्षः, प्लक्षः, येथें म्हणजे जें कारक नव्हे अशा ठिकाणीं प्रथमाविभक्तीला चारितार्थ्य आहे असें म्हणणें असेल तर तें बरोबर नाहीं.

काय कारण ?

कारण असें की ज्याच्यापुढील लट्प्रत्ययाचे स्थानीं प्रथमपुरुष केला आहे अशा अस्धातूचा प्रयोग केला नसतांही तो तेथें आहेच असें मानावें लागतें. कारण नुसतें वृक्षः, प्लक्षः, असें म्हटलें तरी तेथें वृक्ष आहे, प्लक्ष आहे, असें नियमित मनांत येतें.

(वा.१२) किंवा क्रियते कटः इत्यादिस्थलीं द्वितीयादि विभक्ति कराव्यात किंवा प्रथमाविभक्ति करावी, असा विचार उत्पन्न झाला असतां विप्रतिषेध असल्यामुळें परत्वास्तव द्वितीयादि विभक्तींचा बाध करून प्रथमाविभक्ति होईल. द्वितीयादि विभक्तींना कटं करोति भीष्ममुदारम् येथें अवकाश[१५] आहे; आणि प्रथमाविभक्तीला जेथें कारकसंज्ञा नाहीं, म्हणजे वृक्षः प्लक्षः येथें, अवकाश[१६] आहे. असें असून कृतः कटो भीष्म उदारः येथें दोन्हीही विभक्तींची प्राप्ति येत आहे. तेथें विरोध असल्यामुळें द्वितीयादि विभक्तींचा बाध करून प्रथमाविभक्ति होईल.

अशा रीतीनें सिद्ध होत नाहीं. कारण प्रथमेपेक्षां परत्वास्तव तेथें षष्ठीविभक्ति प्राप्त होत आहे.

कारक किंवा प्रातिपदिकार्थ यांहून अन्य असे जे स्वस्वामिभाव वगैरे संबंध त्या अर्थी सांगितलेली षष्ठी, तसा संबंध येथें नसल्यामुळें, होणार नाहीं.

(वा.१३) कर्तव्यः कटः, येथें कृत्प्रत्ययाचा प्रयोग असल्यामुळें तेथें परत्वास्तव

१५. प्रथमा सांगणाऱ्या 'प्रातिपदिकार्थ०' (२।३।४६) या सूत्रामध्यें मात्रशब्द उच्चारला आहे. आणि कटम्, भीष्मम्, येथें कर्म अर्थ जास्त आहे त्यामुळें प्रथमेची प्राप्ति येत नाहीं.

१६. 'आणि हें सर्व असतेंच' हें मनांत न घेतां हा अवकाश दाखविला आहे.

**त्प्रतिषेधार्थम् ॥ १३ ॥**

कृत्प्रयोगे तु परत्वात्षष्ठी प्राप्नोति तत्प्रतिषेधार्थमनभिहिताधिकारः कर्तव्यः। कर्तव्यः कट इति ॥ स कथं कर्तव्यः। यद्येकत्वादयो विभक्त्यर्थाः। अथ हि कर्मादयो विभक्त्यर्था नार्थोऽनभिहिताधिकारेण ॥

## कर्मणि द्वितीया ॥ २। ३। २ ॥

**समयानिकषाहायोगेषूपसंख्यानम् ॥१**

समयानिकषाहायोगेषूपसंख्यानं कर्तव्यम्। समया ग्रामम्। निकषा ग्रामम्। हायोगे। हा देवदत्तम्। हा यज्ञदत्तम् ॥

अपर आह ॥ द्वितीयाविधानेऽभितःपरितःसमयानिकषाध्यधिधिग्योगेषूपसंख्यानम् ॥ द्वितीयाविधानेऽभितःपरितः समयानिकषाध्यधिधिग्योगेषूपसंख्यानं कर्तव्यम्। अभितो ग्रामम्। परितो ग्रामम्। समया ग्रामम्। निकषा ग्रामम्। अध्यधि ग्रामम्। धिग्जाल्मम्। धिग्वृषलम् ॥

अपर आह।

उभसर्वतसोः कार्या धिगुपर्यादिषु त्रिषु।
द्वितीयाम्रेडितान्तेषु ततोऽन्यत्रापि दृश्यते॥

उभय सर्व इत्येताभ्यां तसन्ताभ्यां द्वितीया वक्तव्या। उभयतो ग्रामम्। सर्वतो ग्रामम् ॥ धिग्योगे। धिग्जाल्मम्। धिग्वृषलम् ॥ उपर्यादिषु त्रिष्वाम्रेडितान्तेषु द्वितीया वक्तव्या। उपर्युपरि ग्रामम्। अध्यधि ग्रामम्। अधोऽधो ग्रामम् ॥ ततोऽन्यत्रापि दृश्यते। न देवदत्तं प्रतिभाति किंचित्।

बुभुक्षितं न प्रतिभाति किंचित् ॥

---

प्रथमेचा बाध करून 'कर्तृकर्मणोः कृति' (२।३।६५) यानें षष्ठीविभक्ति प्राप्त होत आहे. त्या षष्ठीच्या निवारणासाठीं 'अनभिहिते' हें सूत्र केलें पाहिजे.

हें सूत्र केलें पाहिजे हें खरें, पण तें कोणत्या पक्षीं केलें पाहिजे ?

जेव्हां एकत्वादिक हें मुख्यत्वानें विभक्तीचे अर्थ आहेत हा पक्ष स्वीकारला तेव्हां हा अनभिहिताधिकार केला पाहिजे. आतां जर मुख्यत्वानें कर्ता, कर्म, वगैरे हेच विभक्तींचे अर्थ आहेत हा पक्ष घेतला तर 'अनभिहिते' हें अधिकारसूत्र करण्याचा कांहीं उपयोग दिसत नाहीं.

(सू.२, वा.१) समया, निकषा व हा या शब्दांचा योग असतां द्वितीया होते असें वचन करावें; जसें— समया ग्रामम्, निकषा ग्रामम्, हा देवदत्तम्.

अन्य कोणी एक वैयाकरण म्हणतोः अभितः, परितः, समया, निकषा, अध्यधि आणि धिक् या शब्दांचा योग असतां द्वितीया होते असें वचन करावें; जसें— अभितो, परितो, समया, निकषा, अध्यधि ग्रामम्, धिक् जाल्मम्.

दुसरा कोणी एक वैयाकरण म्हणतोः

ज्याच्यापुढें तसिल्प्रत्यय आहे अशा उभ किंवा सर्व या शब्दाचा योग असतां द्वितीया होते असें वचन करावें; जसें— उभयतो ग्रामम्, सर्वतो ग्रामम्. धिक्शब्दाचा योग असतां द्वितीया होते; जसें— धिक् जाल्मम्, धिक् वृषलम्. आम्रेडितसंज्ञक शब्द ज्यांच्या पुढें आहे अशा उपरि, अधि आणि अधस् या शब्दांचा योग असतां द्वितीया होते असें सांगावें; जसें उपर्युपरि ग्रामम्, अध्यधि ग्रामम्, अधोऽधो ग्रामम्. यांहून अन्य शब्दांचा योग असतांही द्वितीया केल्याचें दृष्टोत्पत्तीस येतें; जसें— न

---

१. तिङ्, कृत्, तद्धित आणि समास यांनीं अनभिहित अशा कर्म या अर्थीं द्वितीया होते; उदा० कटं करोति.

## तृतीया च होश्छन्दसि ॥२।३।३॥

किमर्थमिदमुच्यते । तृतीया यथा स्यात् । अथ द्वितीया सिद्धा । सिद्धा कर्मणीत्येव ॥ तृतीयापि सिद्धा । कथम् । सुपां सुपो भवन्तीत्येव । असत्येतस्मिन्सुपां सुपो भवन्तीति तृतीयार्थोऽयमारम्भः । यवाग्वाग्निहोत्रं जुहोति ॥ एवं तर्हि तृतीयापि सिद्धा । कथम् । कर्तृकरणयोरित्येव । अयमग्निहोत्रशब्दोऽस्त्येव ज्योतिषि वर्तते । तद्यथा । अग्निहोत्रं प्रज्वलयतीति । अस्ति हविषि वर्तते । तद्यथा । अग्निहोत्रं जुहोतीति । जुहोतिरस्त्येव प्रक्षेपणे वर्ततेऽस्ति प्रीणात्यर्थे वर्तते । तद्यदा तावद्यवागूशब्दात्तृतीया तदाग्निहोत्रशब्दो ज्योतिषि वर्तते जुहोतिश्च प्रीणात्यर्थे । तद्यथा । यवाग्वाग्निहोत्रं जुहोति । अग्निं प्रीणाति । यदा यवागूशब्दाद्द्वितीया तदाग्निहोत्रशब्दो हविषि वर्तते जुहोतिश्च प्रक्षेपणे । तद्यथा । यवागूमग्निहोत्रं जुहोति । यवागूं हविरग्नौ प्रक्षिपति ॥

## अन्तरान्तरेणयुक्ते ॥२।३।४॥

इह कस्मान्न भवति । किं ते बाभ्रवशालङ्कायनानामन्तरेण गतेनेति । लक्षण-

देवदत्त प्रतिभाति किंचित्.

(सू.३) हें सूत्र कशाकरितां केलें आहे ?

तृतीयाविभक्ति व्हावी म्हणून.

तर मग द्वितीयाविभक्तिही अन्य तऱ्हेनें साधत आहे काय ?

होय. साधत आहे.

ती कशी ?

'कर्मणि द्वितीया' यानेंच द्वितीया सिद्ध होत आहे.

तर मग तृतीयाही साधत आहे.

ती कशी ?

'सुपांचे स्थानीं सुप् आदेश होतात' (७।१।३९ वा.) या वचनानेंच तृतीया सिद्ध होत आहे.

सूत्र करण्याचे वेळीं 'सुपांचे स्थानीं सुप् आदेश होतात' हें वार्तिक नसल्यामुळें तृतीया होण्याकरितां हें सूत्र केलें आहे; जसें– यवाग्वा अग्निहोत्रं जुहोति.

असें आहे तर तृतीयाही सिद्ध होत आहे.

ती कशी ?

'कर्ता किंवा करण या अर्थीं तृतीया करावी' (२।३।१८) या सूत्रानेंच तृतीया सिद्ध होत आहे. कारण हा अग्निहोत्रशब्द ज्योति म्ह. अग्नि या अर्थींही वापरल्याचें दिसत आहे; जसें 'अग्निहोत्र प्रज्वलित केलें' येथें. हविर्द्रव्य या अर्थींही अग्निहोत्रशब्द दृष्टीस पडतो; जसें 'अग्निहोत्रं जुहोति' येथें हविर्द्रव्याचा अग्नीमध्यें होम करतो असा अर्थ मनांत येतो. तसेंच हुधातु अग्नीमध्यें टाकणें या अर्थीं आहे, व संतुष्ट करणें या अर्थींही आहे. तेव्हां ज्या वेळीं यवागूशब्दाच्या पुढें तृतीया करावयाची त्या वेळीं अग्निहोत्रशब्द अग्नि या अर्थाचा घ्यावयाचा आणि हुधातु संतोष करणें या अर्थाचा घ्यावयाचा. तेव्हां यवाग्वा अग्निहोत्रं जुहोति या वाक्याचा 'पेज या हविर्द्रव्यानें अग्नीचा संतोष करतो' असा अर्थ मनांत येतो. जेव्हां यवागूशब्दाच्या पुढें द्वितीया करावयाची तेव्हां अग्निहोत्रशब्द हविर्द्रव्य या अर्थाचा समजावयाचा व हुधातु प्रक्षेप या अर्थाचा समजावयाचा. तेव्हां यवागूनामक हविर्द्रव्याचा अग्नीमध्यें प्रक्षेप करतो असा अर्थ मनांत येतो.

(सू.४) 'किं ते बाभ्रवशालङ्कायनानामन्तरेण गतेन' येथें कां बरें द्वितीया होत नाहीं ?

१. हुधातूचें जें कर्म त्याहून तृतीया करावी आणि द्वितीयाही करावी वेदामध्यें; जसें:– यवाग्वा अग्निहोत्रं जुहोति, किंवा यवागूमग्निहोत्रं जुहोति.

१. अन्तरा किंवा अन्तरेण या शब्दांचा योग असतां द्वितीया होते. उदा०–अन्तरा त्वां मां हरिः.

२. 'बाभ्रव आणि शालङ्कायन या दोघांमधील

प्रतिपदोक्तयोः प्रतिपदोक्तस्यैवेति ॥ अथवा यद्यपि तावदयमन्तरेणशब्दो दृष्टापचारो निपातश्चानिपातश्चायं तु खल्वन्तराशब्दोऽदृष्टापचारो निपात एव तस्यास्य कोऽन्यो द्वितीयः सहायो भवितुमर्हत्यन्यदतो निपातात्। तद्यथा। अस्य गोर्द्वितीयेनार्थ इति गौरेवानीयते नाश्वो न गर्दभः ॥

**अन्तरान्तरेणयुक्तानामप्रधानवचनम् ॥ १ ॥**

अन्तरान्तरेणयुक्तानामप्रधानग्रहणं कर्तव्यम्। अप्रधाने द्वितीया भवतीति वक्तव्यम्। अन्तरा त्वां च मां च कमण्डलुरिति। कमण्डलोर्द्वितीया मा भूदिति। कः पुनरेताभ्यां कमण्डलोर्योगः। यत्तत्त्वां च मां चान्तरा तत्कमण्डलोः स्थानम् ॥ तत्तर्हि वक्तव्यम्। न वक्तव्यम्। कमण्डलोर्द्वितीया कस्मान्न भवति। उपपदविभक्तेः कारकविभक्तिर्बली-

---

'लाक्षणिक व प्रतिपदोक्त या उभयतांचें ग्रहण संभवत असतां प्रतिपदोक्ताचेंच ग्रहण करावें' या परिभाषेनें विभक्तिप्रतिरूपक निपातसंज्ञक अन्तरेण या अव्ययाचेंच येथें ग्रहण करावयाचें; तृतीया एकवचनाचें ग्रहण करावयाचें नाहीं.

किंवा अन्तरेण हा शब्द निपातच आहे असा नियम नाहीं. या गोष्टीला व्यभिचार आहे. कारण तो शब्द निपातही आहे आणि निपातभिन्न असा तृतीयान्तही आहे. पण अन्तरा हा शब्दमात्र निपातच आहे; त्याला मात्र व्यभिचार नाहीं. तेव्हां त्या अन्तराशब्दाला जोडीदार म्हणून आचार्यांनीं त्याच्याबरोबर उच्चारलेला अन्तरेण हा शब्द निपातावांचून दुसरा कोण बरें असूं शकेल? जसें 'या बैलाला जोडीदार दुसरा पाहिजे' असें सांगितलें असतां बैलच आणिला जातो, घोडा किंवा गाढव आणलें जात नाहीं.

(वा. १) अन्तरा किंवा अन्तरेण यांच्याशीं योग असतां विशेषणीभूत अशा अर्थाला दाखविणाऱ्या शब्दापुढें द्वितीया होते, असें वचन करावें; कारण अन्तरा त्वां मां च कमण्डलुः येथें कमण्डलुशब्दापुढें द्वितीया न झाली पाहिजे.

पण अन्तरा किंवा अन्तरेण यांच्या अर्थाशीं कमण्डलूचा काय बरें संबंध पोचतो?

तुझ्या व माझ्या मध्यें जें अंतर आहे तें कमण्डलूचें स्थान होय, असा आधाराच्या द्वारानें संबंध आहे.

तर मग तसें वचन केलें पाहिजे.

तसें वचन करावयास नको.

तर मग कमण्डलुशब्दाच्या पुढें द्वितीया कां बरें होत नाहीं?

'एखाद्या विशेष शब्दाच्या प्रयोगावर अवलंबून असलेल्या विभक्तीपेक्षां कारकावर अवलंबून असलेली विभक्ति बलिष्ठ समजावी' या परिभाषेच्या जोरावर कमण्डलुशब्दाच्यापुढें प्रथमा होईल.

---

फरक करून तुला काय करावयाचें आहे'? असा याचा अर्थ आहे. येथें अन्तरेण हें अन्तरशब्दाचें तृतीयेचें एकवचन आहे.

३. तात्पर्य, अन्तराशब्दाच्या साहचर्यानें अन्तरेण हा निपातच घ्यावयाचा असें सिद्ध होतें.

४. येथें त्वाम् आणि माम् यांचा अन्वय अन्तरा याचेकडे झाला आहे, त्यामुळें त्वाम् आणि माम् हीं अन्तरा याचीं विशेषणें होत. आणि अन्तरा याचा अन्वय कमण्डलूकडे झाला आहे, त्यामुळें कमण्डलु हें अन्तरा याचें विशेष्य होय. तुझ्यामाझ्यामध्यें कमण्डलु आहे असा या वाक्याचा अर्थ आहे.

५. अस्ति याचा संबंध सर्वत्र असल्यामुळें त्या अस्तिक्रियेचा कमण्डलु हा कर्ता आहे, तो अस्ति यांतील तिङ्प्रत्ययानें उक्त होतो. तेव्हां 'अभिहिते प्रथमा' (२।३।४६, वा.४) झाली आहे. म्हणून प्रथमेला कारकविभक्ति म्हणतां येतें.

यसीति प्रथमा भविष्यति ॥

## कालाध्वनोरत्यन्तसंयोगे॥२।३।५

### अत्यन्तसंयोगे कर्मवल्लाद्यर्थम् ॥१॥

अत्यन्तसंयोगे कालाध्वानौ कर्मवद्भवत इति वक्तव्यम्। किं प्रयोजनम्। लाद्यर्थम्। लादिभिरभिधानं यथा स्यात्। आस्यते मासः। शय्यते क्रोशः॥ अथ वत्करणं किमर्थम्। स्वाश्रयमपि यथा स्यात्। आस्यते मासम्। शय्यते क्रोशम्। अकर्मकाणां भावे लो भवतीति भावे लो यथा स्यात्॥ तत्तर्हि वक्तव्यम्। न वक्तव्यम्। प्राकृतमेवैतत्कर्म यथा कटं करोति शकटं करोतीति॥ एवं मन्यते। यत्र कश्चित्क्रियाकृतो विशेष उपजायते तन्न्याय्यं कर्मेति। न चेह कश्चित्क्रियाकृतो विशेष उपजायते॥ नैवं शक्यम्। इहापि न स्यात्। आदित्यं पश्यति। हिमवन्तं शृणोति। ग्रामं गच्छति। तस्मात्प्राकृतमेवैतत्कर्म यथा कटं करोति शकटं करोतीति॥ यदि तर्हि प्राकृतमेवैतत्कर्माकर्मकाणां भावे लो भवतीति भावे लो न प्राप्नोति।

---

(सू.५,वा.१) अत्यन्त संयोग गम्यमान असतां काल किंवा अध्वा हे उभयता कर्मसंज्ञकाप्रमाणें समजावेत असें वचन करावें.

काय उपयोग ?

कर्मार्थक लकार किंवा कृत्प्रत्यय वगैरेंनीं काल किंवा अध्वा यांचें अभिधान झालें असतां तेथें द्वितीया न व्हावी; जसें:– आस्यते मासः, शय्यते क्रोशः.

आतां कर्मवत् येथें वत्शब्द घातला आहे तो कशाकरितां ?

मूळच्या स्वरूपावर अवलंबून असलेलेंही कार्य झालें पाहिजे याकरितां घातला आहे; जसें आस्यते मासम्, शय्यते क्रोशम्, येथें मूळचें स्वरूप विचारांत घेतलें तर मास व क्रोश हें खरें कर्म नसल्यामुळें धातु अकर्मक समजून त्याहून भाव या अर्थी लकार करून भावेप्रयोग होतो.

तर मग कर्मवत् असें येथें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण जसें कटं करोति, शकटं करोति, येथें कट हें स्वाभाविक कर्म आहे तसेंच मासमास्ते येथेंही मासम् हें स्वाभाविक कर्म आहे.[3]

पण जेथें क्रियेमुळें कांहीं एक विशेष दृश्य उत्पन्न होतें तें खरें कर्म होय, आणि मासमास्ते येथें तर क्रियेमुळें मासपदार्थांचे ठिकाणीं कांहीं एकही दृश्यविशेष उत्पन्न होत नाहीं.

हें म्हणणें बरोबर नाहीं. कारण तसें गृहीत धरलें तर आदित्यं पश्यति, हिमवन्तं शृणोति, ग्रामं गच्छति, येथें क्रियेमुळें आदित्य वगैरेंचे ठिकाणीं कांहींही विशेष उत्पन्न होत नसल्यामुळें त्यांना कर्मसंज्ञा होणार नाहीं. एकंदरींत कटं करोति येथें कट हें जसें स्वाभाविक कर्म आहे तसें मासमास्ते येथें मासपदार्थही स्वाभाविकच कर्म होय.

जर मासपदार्थाला स्वाभाविकच कर्मसंज्ञा आहे तर अकर्मक धातूहून भावार्थी सांगितलेला लकार मासमास्यते देवदत्तेन येथें येऊं शकत नाहीं.[4]

---

१. काल किंवा अध्वा म्ह. मार्ग यांचा निरंतर संयोग गम्यमान असतांना काल व अध्वा यांच्या वाचकांहून द्वितीया होते; उदा० मासं गुडधानाः, मासमधीते, मासं कल्याणी, क्रोशं कुटिला नदी, क्रोशं गिरिः, क्रोशं रमणीया वनराजिः.

२. येथें मास व क्रोश ह्यांहून नुसती द्वितीया न होतां कर्मसंज्ञा होऊन द्वितीया झाली आहे. कर्मसंज्ञा झाल्यामुळें मास व क्रोश हीं कर्मै गृहीत धरून कर्मणिप्रयोग करतां येतो.

३. आस्धातूचा अर्थ 'असणें' एवढाच नव्हे तर 'असण्यानें व्यापणें' इतका अर्थ आहे. तेव्हां मास व क्रोश हीं त्या क्रियेचीं कर्मै सहजच होत आहेत.

४. तेव्हां आसधातूचा 'असणें' एवढाच अर्थ मानला पाहिजे. तसें मानलें असतां तो अकर्मक

आस्यते मासं देवदत्तेनेति ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । अकर्मकाणामित्युच्यते न च केचित्कालभावाध्वभिरकर्मकाः । त एवं विज्ञास्यामः । कचिद्येऽकर्मका इति ॥ अथवा येन कर्मणा सकर्मकाश्चाकर्मकाश्च भवन्ति तेनाकर्मकाणां न चैतेन कर्मणा कश्चिदप्यकर्मकः ॥ अथवा यत्कर्म भवति न च भवति तेनाकर्मकाणां न चैतत्कर्म क्वचिदपि न भवति ॥

न तर्हीदानीमिदं सूत्रं वक्तव्यम् । वक्तव्यं च । किं प्रयोजनम् । यत्राक्रिययात्यन्तसंयोगस्तदर्थम् । क्रोशं कुटिला नदी । क्रोशं रमणीया वनराजिः ॥

## अपवर्गे तृतीया ॥ २ । ३ । ६ ॥

क्रियापवर्ग इति वक्तव्यम् । साधनापवर्गे मा भूत् । मासमधीतोऽनुवाको न चानेन गृहीत इति ॥

---

तेव्हां कर्मवत् असें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. अकर्मक धातूहून भावे-लकाराचें जें विधान केलें आहे तेथें काल, देश, वगैरे कर्म प्रत्येक धातूला संभवत असल्यामुळें एकही धातु अकर्मक असा असूं शकत नाहीं, म्हणून देशकाल वगैरेंहून अतिरिक्त कर्म ज्यांना नाहीं असें जे धातु ते अकर्मकपदानें घ्यावयाचे, असें समजलें जाईल. अथवा जें कर्म असल्यामुळें धातु सकर्मक म्हटला जातो तेंच कर्म नसल्यामुळें धातु अकर्मक म्हटला जातो असें जें कर्म, अर्थात् द्रव्यरूप कर्म होय, तें ज्यांना नाहीं ते धातु अकर्मक होत.

किंवा जें कर्म असूं शकतें व नसूंही शकतें तसलें कर्म नसल्यामुळें जे अकर्मक धातु ते अकर्मकपदानें घ्यावयाचे. काल, देश, वगैरे हीं कर्में कोणत्याही धातूला संभवत नाहींत असें मुळींच नाहीं.

तर मग आतां हें द्वितीयाविधायक प्रकृत सूत्र करावयास नकोच कीं काय ?

प्रकृत सूत्र करावयास पाहिजे.

काय उपयोग ?

जेथें क्रियाभिन्नाशीं अत्यन्त संयोग असेल तेथें कर्मसंज्ञा नसल्यामुळें द्वितीया होण्याकरितां हें प्रकृत सूत्र उपयोगी होतें; जसें— क्रोशं कुटिला नदी, क्रोशं रमणीया वनराजिः.

(सू.६) सूत्रामध्यें समाप्ति असतां असें मोघम म्हटलें आहे त्याचें ऐवजीं क्रियेची समाप्ति असतां असें म्हणावें; कारण साधनांची समाप्ति असतां तेथें तृतीया न झाली पाहिजे; जसें:— मासमधीतोऽनुवाको न चानेन गृहीतः.

---

होत असल्यामुळें भावे-लकार करतां येतो, पण कर्म नसल्यामुळें कर्म या अर्थी लकार करतां येणार नाहीं. तेव्हां कर्मवत् असें म्हटलें पाहिजे.

५. आसनपूर्वक व्यापन या अर्थी आस्धातूची वृत्ति गृहीत धरण्यानें देश, काल, यांना कर्मसंज्ञा होईल.

६. तेव्हां कालादिव्यतिरिक्त द्रव्य कर्म नसल्यामुळें आस् वगैरे धातूंना अकर्मक म्हणतां येतें. सबब मासमास्यते देवदत्तेन येथें भावे-लकार व कालादिकांना कर्मसंज्ञा या दोन्ही गोष्टी साधत असल्यामुळें कर्मवद्भाववचनाची अपेक्षा नाहीं.

१. फलप्राप्ति झाल्यामुळें त्या फलाच्या उत्पादकक्रियेची परिसमाप्ति गम्यमान असेल तर काल व अध्वा ह्यांच्या वाचकाहून तृतीया होते, पण काल व अध्वा यांचा त्या क्रियेशीं अत्यन्त संयोग असला पाहिजे; उदा०—अह्ना क्रोशेन वाऽनुवाकोऽधीतः.

२. फलप्राप्ति झाल्यामुळें त्या फलाच्या उद्देशानें आरंभिलेली क्रिया बंद ठेवणें ती क्रियेची परिसमाप्ति होय, आणि फलप्राप्ति न झाल्यामुळें ती फलोत्पादक क्रिया वारंवार करणें जरूर आहे; पण आळसानें किंवा अन्य कांहीं कारणानें ती क्रिया बंद करणें याला साधनाची समाप्ति असें म्हणतात. अह्नाऽनुवाकोऽधीतः येथें दिवसभर अध्ययन केल्यामुळें अनुवाक पाठ झाला असा अर्थ मनांत येत असल्यामुळें पाठ झाल्यामुळें अध्ययन बंद झालें आहे, म्हणून क्रियेची

## सप्तमीपञ्चम्यौ कारकमध्ये ॥ २ । ३ । ७ ॥

क्रियामध्य इति वक्तव्यम् । इहापि यथा स्यात् । अद्य देवदत्तो भुक्त्वा द्व्यहाद्भोक्ता द्व्यहे भोक्ता । कारकमध्य इतीयत्युच्यमान इहैव स्यात् । इहस्थोऽयमिष्वासः क्रोशाल्लक्ष्यं विध्यति क्रोशे लक्ष्यं विध्यति । यं च विध्यति यतश्च विध्यत्युभयोस्तन्मध्यं भवति ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । नान्तरेण साधनं क्रियायाः प्रवृत्तिर्भवति । क्रियामध्यं चेत्कारकमध्यमपि भवति तत्र कारकमध्य इत्येव सिद्धम् ॥

## कर्मप्रवचनीययुक्ते द्वितीया ॥ २ । ३ । ८ ॥

**कर्मप्रवचनीययुक्ते प्रत्यादिभिश्च लक्षणादिषूपसंख्यानं सप्तमीपञ्चम्योः प्रतिषेधार्थम् ॥ १ ॥**

कर्मप्रवचनीययुक्ते प्रत्यादिभिश्च लक्षणादिषूपसंख्यानं कर्तव्यम् । वृक्षं प्रति

---

(सू.७) 'कारकमध्ये' याचे ऐवजीं 'दोन क्रियांच्या मध्यें' असें म्हणावें. कारण 'अद्य देवदत्तो भुक्त्वा द्व्यहे द्व्यहाद्वा भोक्ता' येथें सप्तमी आणि पंचमी झाली पाहिजे म्हणून. दोन कारकांच्या मध्यें असें म्हटलें तर 'इहस्थोऽयमिष्वासः क्रोशे क्रोशाद्वा लक्ष्यं विध्यति' येथेंच होईल. कारण ज्याचा वेध करतो व ज्या ठिकाणापासून करतो त्या कर्म आणि अपादान या दोन कारकांच्यामध्यें हा क्रोश आहे.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण कारकशक्ति असल्यावांचून क्रियेची प्रवृत्तिच होत नाहीं. तेव्हां ज्या दोन क्रियांच्यामध्यें हा द्व्यहकाल आहे तो द्व्यहकाल दोन कारकांमध्यें आहे असेंही म्हणतां येतें. एकंदरींत, दोन कारकांच्या मध्यें असें म्हटल्यानेंच तेथें सप्तमी आणि पञ्चमी साधत आहे, म्हणून त्याकरितां 'क्रियांमध्यें' असें म्हणावयास नको.

(सू.८, वा.१) कर्मप्रवचनीयाशीं योग असतांना सांगितलेली जी ही द्वितीया ती लक्षण वगैरे अर्थ गम्यमान असतांना कर्मप्रवचनीयसंज्ञा (१।४।९०) झालेल्या प्रति, परि आणि अनु यांच्याशीं योग असतांना होते असें मुद्दाम पुनः सांगावें; जसें:— वृक्षं प्रति विद्योतते विद्युत्, वृक्षं परि विद्योतते

---

परिसमाप्ति आर्थिक सूचित होते, म्हणून तेथें तृतीया झाली आहे; आणि मासमधीतोऽनुवाकः, न चानेन गृहीतः, येथें महिनाभर घोकला पण त्याला तो तोंडपाठ झाला नाहीं असा अर्थ मनांत येत असल्यानें तोंडपाठ न झाल्यामुळें कंटाळून म्हणणें बंद केलें असें सूचित होतें. तेव्हां येथें साधनाची समाप्ति असल्यामुळें तृतीया होत नाहीं, तर 'कालाध्वनो०' यानें द्वितीयाच होते.

१. कर्ता, कर्म, वगैरे दोन कारकशक्तींच्या मध्यें असलेला जो काल किंवा अध्वा त्याहून सप्तमी किंवा पंचमी होते; जसें:—अद्य भुक्त्वाऽयं द्व्यहे द्व्यहाद्वा भोक्ता, इहस्थोऽयं क्रोशे क्रोशाद्वा लक्ष्यं विध्येत्. आजच्या भोजनक्रियेची जी कर्तृशक्ति, आणि दोन दिवसानंतरच्या भोजनक्रियेची जी कर्तृशक्ति यांच्यामध्यें द्व्यह हा काल आहे. तेव्हां तेथें पंचमी व सप्तमी झाली आहे. अयं हा कर्ता व लक्ष्य हें कर्म, या दोन कर्तृकर्मशक्तींच्यामध्यें क्रोश असल्यामुळें तेथेंही पंचमी व सप्तमी केली आहे.

२. कारण येथें कर्ता देवदत्त हा एकच आहे; भोजनक्रिया मात्र निरनिराळ्या वेळीं होत असल्यामुळें निरनिराळी समजली जाते.

३. कालभेदामुळें क्रिया भिन्न होते, तर क्रियाभेदामुळें कर्ता भिन्न भिन्न आहे, असें सहजच म्हणतां येणार आहे.

१. कर्मप्रवचनीयाशीं योग असतां तेथें द्वितीया होते; उदा०—जपमनुप्रावर्षत्, येथें अनु याला कर्मप्रवचनीय संज्ञा (१।४।८४) झाली आहे.

२. येथें प्रति आणि अनु यांचा योग असतांना वृक्षशब्दाहून जशी द्वितीया झाली आहे तशी परि याचा योग असतांनाही झाली पाहिजे. परंतु परि

विद्योतते विद्युत् । वृक्षं परि । वृक्षमनु । साधुर्देवदत्तो मातरं प्रति । मातरं परि । मातरमनु । किं प्रयोजनम् । सप्तमीपञ्चम्योः प्रतिषेधार्थम् । सप्तमीपञ्चम्यौ मा भूतामिति । साधुनिपुणाभ्यामर्चायां सप्तमीति सप्तमी । पञ्चम्यपाङ्परिभिः [२.३.१०] इति पञ्चमी । तत्रायमप्यर्थोऽप्रतेरिति न वक्तव्यं भवति ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् ।

**उक्तं वा ॥ २ ॥**

किमुक्तम् । एकत्र तावदुक्तमप्रतेरिति । इतरत्रापि यद्यपि तावदयं परिर्दृष्टापचारो वर्जने चावर्जने चायं खल्वपशब्दोऽदृष्टापचारो वर्जनार्थ एव तस्य कोऽन्यो द्वितीयः सहायो भवितुमर्हत्यन्यदतो वर्जनार्थात् । तद्यथा । अस्य गोर्द्वितीयेनार्थ इति गौरेवानीयते नाश्वो न गर्दभः ॥

## यस्मादधिकं यस्य चेश्वरवचनं तत्र सप्तमी ॥ २ । ३ । ९ ॥

कथमिदं विज्ञायते । यस्य चैश्वर्यमीश्वरतेश्वरभावस्तस्मात्कर्मप्रवचनीययुक्तादिति । आहोस्विद्यस्य स्वस्येश्वरस्त-

---

विद्युत्, वृक्षमनु विद्योतते विद्युत्, साधुर्देवदत्तो मातरं प्रति, साधुर्देवदत्तो मातरं परि, साधुर्देवदत्तो मातरं अनु.

ह्या पुनः सांगण्याचा काय बरें उपयोग ?

साधुनिपुणाभ्यामर्चायां सप्तमी (२।३।४३) या सूत्रानें सांगितलेली सप्तमी आणि पञ्चम्यपाङ्परिभिः (२।३।१०) या सूत्रानें सांगितलेली पञ्चमी न व्हावी याकरितां. शिवाय असें करण्यांत 'साधुनिपुणाभ्याम्०' या सूत्रामध्यें अप्रतेः हें पद घालावयास नको हाही फायदा होत आहे.

तर मग तसें सांगितलें पाहिजे ?

तसें सांगावयास नको.

(वा.२) अथवा हें सांगितलेंच आहे.

तें काय बरें सांगितलें आहे ?

त्यांपैकीं एका ठिकाणीं म्हणजे 'साधुनिपुणाभ्याम्०' या सूत्रामध्यें सूत्रकारांनींच अप्रतेः असें म्हटलें आहे[३]. पंचमीविषयींही म्हटलें आहे की जरी परि हा शब्द वर्जन या अर्थाचाच आहे असा नियम नाहीं, या गोष्टीला व्यभिचार आहे; कारण त्याचा वर्जन हाही अर्थ आहे आणि इतरही अर्थ आहे, तरी पण अप हा शब्द मात्र वर्जन याच अर्थाचा आहे, त्याला व्यभिचार नाहीं. अशा त्या अपशब्दाला जोडीदार म्हणून येथें सूत्रकारांनीं उच्चारलेला परि हा शब्द वर्जनार्थावांचून दुसऱ्या कोणत्या बरें अर्थाचा साजेल ? जसें 'या बैलाला दुसरा जोडीदार पाहिजे' असें सांगितलें असतां त्याला जोडीदार साजेल असा दुसरा बैलच आणिला जातो, घोडा किंवा गाढव आणिलें जात नाहीं.

(सू.९) येथें यस्य चेश्वरवचनम् याचा कसा अर्थ समजावा ? ज्याचा ईश्वरपणा दाखवयाचा आहे त्याहून सप्तमी होते. कर्मप्रवचनीयाचा योग असतांना असा, किंवा ज्या वस्तूचा ईश्वर दाखवावयाचा आहे त्याहून सप्तमी होते,

---

याचा योग असतांना ह्या द्वितीयेचा बाध करून पंचमी (२।३।१०) होऊं लागेल. तसेंच साधुर्देवदत्तो मातरं प्रति वगैरे उदाहरणांमध्यें ह्या द्वितीयेचा बाध करून सप्तमी (२।३।४३) होऊं लागेल. त्या पंचमी आणि सप्तमी यांच्या बाधाकरितां पुन्हा येथें मुद्दाम द्वितीयेचें विधान केलें आहे.

३. तेथें अप्रतेः याच्याऐवजीं 'अप्रत्यादिभिः' असें म्हणावें असें तेथें सांगितलें आहे.

४. तेव्हां 'पञ्चम्यपाङ्परिभिः' (२।३।१०) या सूत्रामध्यें अपशब्दाच्या साहचर्यानें परि हा शब्द वर्जन या अर्थाचाच घ्यावयाचा असें सिद्ध झालें.

१. ज्याच्यापेक्षां आधिक्य दाखवावयाचें आणि ज्याचा ईश्वर दाखवावयाचा किंवा ज्याची मालकी दाखवावयाची त्याहून सप्तमी होते, कर्मप्रवचनीयाचा योग असतांना; उदा०—उप परार्धे हरेर्गुणाः. अधि भुवि रामः, अधि रामे भूः.

स्मात्कर्मप्रवचनीययुक्तादिति । कश्चात्र विशेषः ।

**यस्य चेश्वरवचनमिति कर्तृनिर्देश-श्चेदवचनात्सिद्धम् ॥ १ ॥**

यस्य चेश्वरवचनमिति कर्तृनिर्देश-श्चेदन्तरेण वचनं सिद्धम् । आधि ब्रह्मदत्ते पञ्चालाः । आधृतास्ते तस्मिन्भवन्ति । सत्यमेवमेतत् । नित्यं परिग्रहीतव्यं परि-ग्रहीत्रधीनं भवति ॥

**प्रथमानुपपत्तिस्तु ॥ २ ॥**

प्रथमा नोपपद्यते। कुतः। पञ्चालेभ्यः। का तर्हि स्यात् । षष्ठीसप्तम्यौ । स्वामी-श्वराधिपति [२.३.३९] इति । न तत्रा-धिशब्दः पठ्यते । यद्यपि न पठ्यतेऽधिरी-श्वरवाची । न तत्र पर्यायवचनानां ग्रहणम्। कथं ज्ञायते । यदयं कस्यचित्पर्यायवच-नस्य ग्रहणं करोति । अधिपतिदायादेति ॥ षष्ठी तर्हि प्राप्नोति । शेषलक्षणा षष्ठ्य-शेषत्वान्न भविष्यति ॥ द्वितीया तर्हि प्राप्नोति कर्मप्रवचनीययुक्ते द्वितीया [२. ३.८] इति । सप्तम्योक्तत्वात्तस्याभि-संबन्धस्य द्वितीया न भविष्यति । भवे-

---

कर्मप्रवचनीयाचा योग असतांना, असा सम-जावयाचा.

या दोहोंमध्यें काय फरक आहे ?

(वा.१) यस्य चेश्वरवचनम्० यांतील यस्य या शब्दानें नियमन करणारा गृहीत धरला तर हें सूत्र केल्यावांचूनच तेथें 'सप्तम्य-धिकरणे च' (२।३।३६) यानें सप्तमी साधत आहे; जसें अधि ब्रह्मदत्ते पञ्चालाः येथें पंचालदेश हे ब्रह्मदत्ताचे ठिकाणीं स्थित आहेत; आणि ही गोष्ट खरीच आहे, कारण जी वस्तु ज्यानें संपादन केलेली असते ती वस्तु नेहमीं त्या संपादकावर अवलंबूनच राहते[2].

(वा.२) शिवाय प्रथमाविभक्ति करतां येत नाहीं.

कोणाच्या पुढें ?

पञ्चालशब्दाच्या पुढें.

तर मग कोणती विभक्ति करतां येईल ?

'स्वामीश्वराधिपतिदायाद०' (२।३।३९) या सूत्रानें षष्ठी किंवा सप्तमी करतां येईल.

पण त्या सूत्रामध्यें अधिशब्दाचा पाठ केलेला नाहीं.

जरी अधिशब्दाचा पाठ केला नसला तरी अधिशब्दाचा ईश्वर हाच अर्थ आहे ना ?

पण 'स्वामीश्वर०' या सूत्रामध्यें ईश्वर या अर्थाचे दुसरे शब्द घ्यावयाचे नाहींत.

हें कशावरून ठरविलें जात आहे ?

ज्यापेक्षां हा आचार्य अधिपतिदायाद० असा ईश्वर या अर्थाचा अधिपतिशब्द घालीत आहे त्यापेक्षां पर्यायशब्दांचें ग्रहण करावयाचें नाहीं.

तर मग स्वस्वामिभावसंबंध असल्यामुळें पञ्चालशब्दाचे पुढें षष्ठीविभक्ति प्राप्त होत आहे.

कारक किंवा प्रातिपदिकार्थ एतद्व्यतिरिक्त स्वस्वामिभावादिसंबंधरूप जो शेष त्या अर्थीं षष्ठी सांगितली आहे, आणि पञ्चालः येथें तर प्रातिपदिकार्थ विवक्षित असल्यामुळें पञ्चाल-शब्दाच्या पुढें षष्ठी होणार नाहीं.

तर मग 'कर्मप्रवचनीययुक्ते०' (२।३।८) या सूत्रानें पञ्चालशब्दाच्या पुढें द्वितीया प्राप्त होत आहे[3].

ब्रह्मदत्ते या सप्तमीनें तो संबंध दाखविला गेला असल्यामुळें 'उक्तार्थानां अप्रयोगः' या

---

२. तेव्हां संपादक हा त्याच्या मालकीच्या वस्तूंचा आधार आहे असें म्हणण्यास कांहींच हर-कत नाहीं.

३. 'अधिरीश्वरे' या सूत्रानें स्वस्वामिभावसंबं-धाला दाखविणाऱ्या अधिशब्दाला कर्मप्रवचनीयसंज्ञा सांगितली आहे. तेव्हां जसा ब्रह्मदत्त या स्वामीला अधीचा योग आहे तसा पंचाल या स्वलाही अधीचा योग आहेच.

द्योऽधेर्ब्रह्मदत्तस्य चाभिसंबन्धः स सप्तम्योक्तः स्याद्यस्तु खल्वधेः पञ्चालानां चाभिसंबन्धस्तत्र द्वितीया प्राप्नोति ॥

**स्ववचनात्सिद्धम् ॥ ३ ॥**

अस्तु यस्य स्वस्येश्वरस्तस्मात्कर्मप्रवचनीययुक्तादिति ॥ एवमप्यन्तरेण वचनं सिद्धम् । अधि ब्रह्मदत्तः पञ्चालेषु । आधृतः स तेषु भवति । सत्यमेवमेतत् । नित्यं परिग्रहीता परिग्रहीतव्याधीनो भवति ॥ प्रथमानुपपत्तिस्तु । प्रथमा नोपपद्यते । कुतः । ब्रह्मदत्तात् । का तर्हि स्यात् । षष्ठीसप्तम्यौ । स्वामीश्वराधिपतीति । न तत्राधिशब्दः पठ्यते । यद्यपि न पठ्यतेऽधिरीश्वरवाची । न तत्र पर्यायवचनानां ग्रहणम् । कथं ज्ञायते । यदयं कस्यचित्पर्यायवचनस्य ग्रहणं करोति । अधिपतिदायादेति ॥ षष्ठी तर्हि प्राप्नोति । शेषलक्षणा षष्ठ्यशेषत्वान्न भविष्यति ॥ द्वितीया तर्हि प्राप्नोति कर्मप्रवचनीययुक्ते द्वितीयेति । सप्तम्योक्तत्वात्तस्याभिसंबन्धस्य द्वितीया न भविष्यति । भवेद्योऽधेः पञ्चालानां चाभिसंबन्धः स

---

न्यायानें पञ्चालशब्दाच्या पुढें द्वितीया होणार नाहीं.

पण कर्मप्रवचनीय अधि आणि ब्रह्मदत्त यांचा जो संबंध तो ब्रह्मदत्तशब्दाच्या पुढील सप्तमीनें दाखविला जाईल, पण पञ्चाल आणि अधि यांचा संबंध त्या सप्तमीनें दाखविणें शक्य नाहीं म्हणून पञ्चालशब्दाच्या पुढें द्वितीया प्राप्त होत आहेच.

(वा.३) तर मग ज्या वस्तूचा ईश्वर दाखवावयाचा त्याहून कर्मप्रवचनीयाचा योग असतांना सप्तमी होते असा यस्य चेश्वरवचनम् याचा अर्थ असूं दे.

तरी देखील हें प्रकृत सूत्र केल्याशिवायच त्याहून सप्तमी साधत आहे; जसें— अधि ब्रह्मदत्तः पञ्चालेषु, येथें ब्रह्मदत्त हा मालक आपल्या मालकींतील अशा पञ्चालदेशामध्यें अवस्थित असणारच. आणि हें बरोबरच आहे. कारण संपादक हा नेहेमीं संपादयितव्य वस्तूवर अवलंबून असतो. शिवाय प्रथमाविभक्ति करतां येत नाहीं.

कोणाच्या पुढें ?

ब्रह्मदत्तशब्दाच्या पुढें.

तर मग त्याच्या पुढें कोणती विभक्ति करतां येईल ?

'स्वामीश्वराधिपति०' (२।३।३९) यानें षष्ठी किंवा सप्तमी करतां येईल.

पण त्या सूत्रामध्यें अधिशब्दाचा पाठ केलेला नाहीं.

जरी अधिशब्दाचा पाठ केला नसला तरी अधिशब्दाचा ईश्वर हाच अर्थ आहे ना ?

पण 'स्वामीश्वराधिपतिदायाद०' (२।३।३९) या सूत्रामध्यें ईश्वर या अर्थाचे दुसरे शब्द घ्यावयाचे नाहींत.

हें कशावरून ठरविलें जात आहे ?

ज्यापेक्षां हा आचार्य अधिपतिदायाद० असा ईश्वर या अर्थाचा अधिपतिशब्द घालीत आहे त्यापेक्षां पर्यायशब्दांचें तेथें ग्रहण करावयाचें नाहीं.

तर मग ब्रह्मदत्तशब्दाच्या पुढें षष्ठीविभक्ति प्राप्त होत आहे.

कारक आणि प्रातिपदिकार्थ यांहून वेगळा जो स्वस्वामिभावादिसंबंध तो शेष होय. त्या शेष या अर्थी षष्ठी सांगितली आहे; आणि ब्रह्मदत्तः येथें तर प्रातिपदिकार्थ विवक्षित असल्यामुळें ब्रह्मदत्तशब्दाच्या पुढें षष्ठी येऊं शकत नाहीं.

तर मग 'कर्मप्रवचनीययुक्ते' यानें ब्रह्मदत्तशब्दाच्या पुढें द्वितीया प्राप्त होत आहे.

पञ्चालेषु या सप्तमीनें तो संबंध दाखविला गेला असल्यामुळें ब्रह्मदत्तशब्दाच्या पुढें

सप्तम्योक्तः स्याद्यस्तु खल्वधेर्ब्रह्मदत्तस्य चाभिसंबन्धस्तत्र द्वितीया प्राप्नोति ॥ एवं तर्हि स्ववचनात्सिद्धम् । अधिः स्वं प्रति कर्मप्रवचनीयसंज्ञो भवतीति वक्तव्यम् ॥ एवमपि यदा ब्रह्मदत्तेऽधिकरणे सप्तमी तदा पञ्चालेभ्यो द्वितीया प्राप्नोति कर्मप्रवचनीययुक्ते द्वितीयेति। उपपदविभक्तेः कारकविभक्तिर्बलीयसीति प्रथमा भविष्यति ॥

[पञ्चम्यपाङ्परिभिः ॥२।३।१०॥ प्रतिनिधिप्रतिदाने च यस्मात् ॥२।३।११॥]

**गत्यर्थकर्मणि द्वितीयाचतुर्थ्यौ चेष्टायामनध्वनि ॥२।३।१२॥**

**अध्वन्यर्थग्रहणम् ॥१॥**

अध्वन्यर्थग्रहणं कर्तव्यम् । इहापि मा भूत् । पन्थानं गच्छति । वीवधं गच्छतीति ॥

**आस्थितप्रतिषेधश्च ॥२॥**

आस्थितप्रतिषेधश्चायं वक्तव्यः । यो ह्युत्पथेन पन्थानं गच्छति पथे गच्छतीत्येव तत्र भवितव्यम् ॥

---

द्वितीया होणार नाहीं.

पण कर्मप्रवचनीय अधि आणि पञ्चाल यांचा जो संबंध तोच पञ्चालशब्दाच्या पुढील सप्तमीनें दाखविला जाईल, आणि अधि व ब्रह्मदत्त यांचा जो संबंध तो दाखविला गेला नसल्यामुळें तेथें द्वितीया प्राप्त होत आहे.

असें आहे तर अधिरीश्वरे याच्या ऐवजीं 'अधिः स्वम्' असें सूत्र करावें. स्व आणि स्वामी यांपैकीं स्वभूत अर्थावरील संबंधाला दाखवीत असतांच अधिशब्द कर्मप्रवचनीय संज्ञक होतो असा त्याचा अर्थ समजावा.

तरीही जेव्हां ब्रह्मदत्तशब्दाच्या पुढें अधिकरणीं सप्तमी केली तेव्हां पञ्चालशब्दाच्या पुढें 'कर्मप्रवचनीययुक्ते०' यानें द्वितीया प्राप्त होत आहेच.

उपपदविभक्तीपेक्षां कारकविभक्ति बलाढ्य असल्यामुळें द्वितीयेचा बाध करून पञ्चालशब्दाच्या पुढें प्रथमाविभक्ति होईल.

(सू.१२, वा.१) कर्मवाचक शब्द अध्वा हा नसावा असें जें सूत्रांत म्हटलें आहे तेथें अध्वा या अर्थाचा कोणताही शब्द नसावा असें म्हणावें. कारण पन्थानं गच्छति, वीवधं गच्छति, इत्यादि ठिकाणीं पथिन् वगैरे शब्दांहूनही अध्वशब्दाप्रमाणें चतुर्थी न झाली पाहिजे.

(वा.२) गमन करणाऱ्यानें आस्थित म्हणजे गमन करणारा ज्या मार्गानें गमन करतो त्याच मार्गाविषयीं 'अनध्वनि' हा प्रतिषेध प्रवृत्त होतो असें वचन करावें. कारण जो चांगला रस्ता लागेतोपर्यंत आडमार्गानें जातो तेथें तो चांगला रस्ता हा जर पथिन्शब्दाचा अर्थ असेल तर तेथें चतुर्थी होतेच.

---

४. कारण पञ्चालाः येथें सन्ति म्हणजे आहेत अशी अस्तिक्रिया आहे व तिचा पंचाल हा कर्ता आहे. तेव्हां 'अभिहिते प्रथमा' ही कारकविभक्ति प्रथमा (२।३।४६, वा.४) प्राप्त होत आहे.

१. कर्मप्रवचनीय अशा अप्, आङ् किंवा परि यांचा योग असतांना पंचमी होते, उदा०-अप हरेः परि हरेः संसारः,आ मुक्तेः संसारः,आ सकलाद् ब्रह्म.

१. ज्याचा प्रतिनिधि दाखवावयाचा असेल, किंवा एखादी वस्तु घेऊन तिच्याबद्दल जी वस्तु देणें असेल त्याहून पंचमी होते, कर्मप्रवचनीयाचा योग असतांना; उदा०-प्रद्युम्नः कृष्णात्प्रति, तिलेभ्यः प्रति यच्छति माषान्.

१. गमनक्रियेच्या कर्माहून द्वितीया किंवा चतुर्थी होते; त्या गमनक्रियेमध्यें शरीरव्यापार झाला असला पाहिजे आणि गमनक्रियेचें कर्म मार्ग हें नसलें पाहिजे; उदा०-ग्रामं ग्रामाय वा गच्छति.

किमर्थं पुनरिदमुच्यते । चतुर्थी यथा स्यात् । अथ द्वितीया सिद्धा । सिद्धा कर्मणीत्येव । चतुर्थ्यपि सिद्धा । कथम् । संप्रदान इत्येव । न सिध्यति । कर्मणा यमभिप्रैति स संप्रदानम् [१.४.३२] इत्युच्यते क्रियया चासौ ग्राममभिप्रैति । कया क्रियया । गमिक्रियया । क्रियाग्रहणमपि तत्र चोद्यते ॥

**चेष्टायामनध्वनि स्त्रियं गच्छत्यजां नयतीत्यतिप्रसङ्गः ॥३॥**

चेष्टायामनध्वनि स्त्रियं गच्छत्यजां नयतीत्यतिप्रसङ्गो भवति ॥

**सिद्धं त्वसंप्राप्तवचनात् ॥४॥**

सिद्धमेतत् । कथम् । असंप्राप्ते कर्मणि द्वितीयाचतुर्थ्यौ भवत इति वक्तव्यम् ॥

**अध्वनश्चानपवादः ॥५॥**

एवं च कृत्वानध्वनीत्येतदपि न वक्तव्यं भवति । संप्राप्तं ह्येतत्कर्माध्वानं गच्छतीति ॥

## चतुर्थी संप्रदाने ॥२।३।१३॥

**चतुर्थीविधाने तादर्थ्य उपसंख्यानम् ॥१॥**

चतुर्थीविधाने तादर्थ्य उपसंख्यानं कर्तव्यम् । यूपाय दारु । कुण्डलाय

---

हें सूत्र करण्याचा काय बरें उद्देश ?

चतुर्थी व्हावी म्हणून.

पण द्वितीया साधत आहे काय ?

होय. 'कर्मणि द्वितीया' यानेंच साधत आहे.

तर चतुर्थीही साधत आहे.

ती कशानें ?

'चतुर्थी संप्रदाने' (२।३।१३) यानेंच.

त्यानें चतुर्थी साधत नाहीं. कारण 'दा-धातूच्या कर्माशीं ज्याचा संबंध होणें इष्ट आहे त्याला संप्रदान' असें म्हटलें जातें, आणि प्रकृत स्थलीं तर गमनकर्ता हा क्रियेशीं ग्रामाचा संबंध करूं इच्छितो.

कोणत्या क्रियेशीं ?

गमनक्रियेशीं.

पण 'कर्मणा यमभिप्रैति०' या सूत्रामध्यें क्रियेबरोबर ज्याचा संबंध होणें इष्ट आहे त्यालाही संप्रदानसंज्ञा होते, असेंही म्हटलें आहे.[2]

(वा.३) शरीरव्यापार असतांना आणि मार्गभिन्न कर्म असतांना प्रकृत सूत्रानें सांगितलेली चतुर्थी स्त्रियं गच्छति, अजां नयति[3], येथें प्राप्त होते असा दोष येतो.

(वा.४) हा दोष येत नाहीं.

तो कसा ?

जी वस्तु गमनक्रिया करतांना प्राप्त झालेली नसून गमनक्रियेनें प्राप्त होणारी आहे तसल्या कर्माच्या अर्थी द्वितीया आणि चतुर्थी होते असें वचन करावें.

(वा.५) शिवाय असंप्राप्त म्हणण्यानें सूत्रामधील 'अनध्वनि' असें म्हणावयास नको. कारण अध्वानं गच्छति येथें अध्वरूपी कर्म गमनक्रिया करतांना प्राप्त झालेलेंच आहे.

(सू.१३,वा.१) ही जी प्रकृत सूत्रानें चतुर्थी सांगितली आहे ती तादर्थ्य या अर्थीही होते असें म्हणावें; जसें– यूपाय दारु, कुण्डलाय हिरण्यम्.

तादर्थ्य म्हणजे काय ?

---

२. 'कर्मणा' (१।४।३२) येथें 'क्रियाग्रहणमपि कर्तव्यम्' असें म्हटलें आहे.

३. स्त्री व अजा ह्या वस्तु गमनक्रियेच्या वेळींच प्राप्त झालेल्या आहेत. त्यामुळें दोष येत नाहीं. तसेंच 'आस्थितप्रतिषेधश्च' हें पूर्वीचें वार्तिक करावयास नको; कारण आडमार्गानें जातांना चांगला रस्ता प्राप्त झालेला नसतोच.

१. संप्रदानकारकाहून चतुर्थी होते; उदा०— विप्राय गां ददाति.

हिरण्यम् ॥ किमिदं तादर्थ्यमिति । तदर्थस्य भावस्तादर्थ्यम् । तदर्थं पुनः किम् । सर्वनाम्नोऽयं चतुर्थ्यन्तस्यार्थशब्देन सह समासः । कथं चात्र चतुर्थी । अनेनैव । यद्येवमितरेतराश्रयं भवति । केतरेतराश्रयता । निर्देशोत्तरकालं चतुर्थ्या भवितव्यं चतुर्थ्या च निर्देशस्तदितरेतराश्रयं भवति । इतरेतराश्रयाणि च न प्रकल्पन्ते ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति भवत्यर्थशब्देन योगे चतुर्थीति यदयं चतुर्थी तदर्थार्थ [२.१.३६] इति चतुर्थ्यन्तस्यार्थशब्देन सह समासं शास्ति ॥ न खल्वप्यवश्यं चतुर्थ्यन्तस्यैवार्थशब्देन सह समासो भवति । किं तर्हि । षठ्यन्तस्यापि भवति । तद्यथा । गुरोरिदं गुर्वर्थमिति ॥ यदि तादर्थ्य उपसंख्यानं क्रियते नार्थः संप्रदानग्रहणेन । योऽपि ह्युपाध्यायाय गौर्दीयत उपाध्यायार्थः स भवति तत्र तादर्थ्य इत्येव सिद्धम् ॥ अवश्यं संप्रदानग्रहणं कर्तव्यं यान्येन लक्षणेन संप्रदानसंज्ञा तदर्थम् । छात्राय रुचितम् । छात्राय

---

तदर्थस्य भावस्तादर्थ्यं असा याचा विग्रह आहे.

पण तदर्थ म्हणजे काय ?

तद् या सर्वनामशब्दाहून चतुर्थी करून त्याचा अर्थशब्दाबरोबर समास केला आहे. तस्मै इदं तदर्थम्.

पण तदर्थ या समासाच्या पोटांतील तद्‌शब्दाच्यापुढें चतुर्थीविभक्ति कशानें करावयाची ?

'तादर्थ्ये उपसंख्यानम्' याच वचनानें करावयाची.

असें आहे तर अन्योन्याश्रयदोष येतो.

अन्योन्याश्रयदोष कसा बरें येतो ?

चतुर्थ्यन्त तद्‌शब्दाचा अर्थशब्दाबरोबर समास करून भावार्थी ष्यञ्प्रत्यय (५।१।१२४) करून तादर्थ्ये हा निर्देश तयार झाल्यानंतर त्या तादर्थ्य या अर्थी चतुर्थीविधान होणार आहे, आणि त्या निर्देशामध्यें अगोदरच चतुर्थी केली आहे; तेव्हां निर्देशावर अवलंबून चतुर्थीविधान व चतुर्थीविधानावर अवलंबून निर्देश असें होत असल्यानें अन्योन्याश्रय येतो, आणि अशा रीतीनें अन्योन्यावर अवलंबून असलेलीं कार्यें तर मुळीं अस्तित्वांतच येत नाहींत.

तर मग अर्थशब्दाचा योग असतांना चतुर्थी होते असें वचन केलें पाहिजे.

निराळें वचन करावयास नको. कारण ज्यापेक्षां हा आचार्य 'चतुर्थीतदर्थार्थ०'(२।१।३६) या सूत्रानें चतुर्थ्यन्ताचा अर्थशब्दाबरोबर समास होतो असें सांगतो त्यापेक्षां अर्थशब्दाचा योग असतां तेथें चतुर्थी करावी असें तो सुचवितो.

शिवाय अर्थशब्दाबरोबर चतुर्थ्यन्ताचाच समास होतो असा कांहीं बळकट नियम नाहीं. तेव्हां षष्ठ्यन्ताचाही अर्थशब्दाबरोबर समास करतां येतो; जसें:—गुरोरिदं गुर्वर्थम्.[२]

जर 'तादर्थ्ये' या अर्थी चतुर्थीचें विधान केलें आहे, तर आतां सूत्रामध्यें 'संप्रदाने' हा शब्द घालण्याचा कांहीं उपयोग नाहीं. कारण उपाध्यायाला जो बैल देण्यांत येतो तो उपाध्यायाकरितांच होय. तेव्हां तेथें 'तादर्थ्ये' या म्हणण्यानेंच चतुर्थी साधत आहे.

सूत्रामध्यें 'संप्रदाने' हा शब्द अवश्य घातला पाहिजे. कारण 'रुच्यर्थानां प्रीयमाणः' (१।४।३३) इत्यादि सूत्रांनीं सांगितलेली जी संप्रदानसंज्ञा तेथें चतुर्थी व्हावी म्हणून; जसें:— छात्राय रुचितम्[३], छात्राय स्वदितम्.

तर मग 'तादर्थ्य या अर्थीही चतुर्थी होते'

---

२. तेव्हां तदर्थशब्दामध्यें षष्ठीतत्पुरुषसमास संभवत असल्यामुळें अन्योन्याश्रयदोष उद्भवत नाहीं.

३. छात्र व रुचि यांमध्यें तादर्थ्य नसल्यामुळें चतुर्थी होणार नाहीं; म्हणून संप्रदान या अर्थी चतुर्थी

स्वदितमिति ॥

तत्तर्ह्युपसख्यानं कर्तव्यम् । न कर्तव्यम् । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति भवति तादर्थ्ये चतुर्थीति यदयं चतुर्थी तदर्थार्थेति चतुर्थ्यन्तस्य तदर्थेन सह समासं शास्ति ॥

**क्लृपि संपद्यमाने ॥२॥**

क्लृपि संपद्यमाने चतुर्थी वक्तव्या । मूत्राय कल्पते यवागूः । उच्चाराय कल्पते यवान्नमिति ॥

**उत्पातेन ज्ञाप्यमाने ॥३॥**

उत्पातेन ज्ञाप्यमाने चतुर्थी वक्तव्या । वाताय कपिला विद्युदातपायातिलोहिनी । पीता भवति सस्याय दुर्भिक्षाय सिता भवेत् ॥

मांसौदनाय व्याहरति मृगः ॥

**हितयोगे च ॥४॥**

हितयोगे चतुर्थी वक्तव्या । हितमरोचकिने । हितमामयाविने ॥

**[ क्रियार्थोपपदस्य च कर्मणि स्थानिनः ॥ २ । ३ । १४ ॥**

**तुमर्थाच्च भाववचनात् ॥ २ । ३ । १५ ॥ ]**

**नमःस्वस्तिस्वाहास्वधालंवषड्योगाच्च ॥२।३।१६॥**

**स्वस्तियोगे चतुर्थी कुशलार्थैराशिषि वाविधानात् ॥१॥**

स्वस्तियोगे चतुर्थी कुशलार्थैराशिषि

---

असें वचन केलें पाहिजे. तसें वचन करावयास नको. कारण ज्यापेक्षां हा आचार्य 'चतुर्थीतदर्थार्थ०' (२।१।३६) या सूत्रानें चतुर्थ्यन्ताचा त्याकरितां जी वस्तु तद्वाचकाबरोबर समास होतो असें सांगतो त्यापेक्षां तादर्थ्य या अर्थी चतुर्थी होते असें तो सुचवितो.

(वा.२) क्लृपधातूचा प्रयोग असतां उत्पन्न होणारा जो विकार तद्वाचक शब्दाहून चतुर्थी होते असें वचन करावें; जसें— मूत्राय कल्पते यवागूः, उच्चाराय कल्पते यवान्नम्, वगैरे.

(वा.३) अशुभसूचक असा जो भूतांचा विकार त्यानें सुचविलेला जो अर्थ तद्वाचक शब्दाहून चतुर्थी होते असें वचन करावें; जसें— वाताय कपिला विद्युत् आतपाय अतिलोहिनी । कृष्णा सर्वविनाशाय दुर्भिक्षाय सिता भवेत् ॥ मांसौदनाय व्याहरति मृगः.

(वा.४) हितशब्दाचा योग असतां चतुर्थी होते असें वचन करावें; जसें– अरोचकिने हितम्, आमयाविने हितम्.

(सू.१६, वा.१) कुशल या अर्थाच्या

---

होण्यासाठीं सूत्रामध्यें संप्रदानशब्द घातला पाहिजे.

४. यवागू म्ह. पेज, कांजी. ही मूत्र या रूपानें परिणाम पावते, असा मूत्राय कल्पते यवागूः या वाक्याचा अर्थ आहे. तसेंच यवान्नाचा मलरूपानें परिणाम होतो, असा उच्चाराय० या वाक्याचा अर्थ आहे. येथें मूत्र व उच्चार हे विकारवाचक शब्द आहेत.

५. एखादे वेळीं विजेमध्यें जो थोडा काळसरपणा दिसतो तो सोसाट्याचा वारा सुटणार असें सुचवितो. अशा रीतीनें सर्व उदाहरणांचा अर्थ समजावा.

६. रोगाख्यायां ण्वुल्०' (३।३।१०८) यानें ण्वुल्; अरुचि नांवाच्या रोगानें आजारी झालेला.

१. एका क्रियेकरितां जी दुसरी क्रिया ती उपपद असतांना तुमुन्प्रत्यय सांगितला (३।३।१०) आहे. परंतु तेथें जर त्या तुमुन्प्रत्ययान्ताचा प्रयोग केला नसेल तर त्या तुमुन्प्रत्ययान्ताचें जें कर्म त्याहून चतुर्थी होते; उदा०—फलेभ्यो याति, फलानि आहर्तुं याति, म्हणजे फळें आणण्याकरतां जातो असा अर्थ आहे.

१. 'तुमुन्ण्वुलौ०' (३।३।१०) या सूत्रानें सांगितलेल्या तुमुन्प्रत्ययाच्या अर्थी सांगितलेला (३।३।११) असा जो भावार्थक प्रत्यय तो शेवटी असलेल्या प्रातिपदिकाहून चतुर्थी होते; उदा०—यागाय याति.

१. नमस्,स्वस्ति,स्वाहा,स्वधा,अलम् आणि वषट् यांचा योग असतांना चतुर्थी होते; उदा०–हरये नमः.

वाविधानाद्भवति विप्रतिषेधेन । स्वस्तियोगे चतुर्थ्या अवकाशः । स्वस्ति जाल्माय । स्वस्ति वृषलाय । कुशलार्थैराशिषि वाविधानस्यावकाशः । अन्ये कुशलार्थाः । कुशलं देवदत्ताय । कुशलं देवदत्तस्य । इहोभयं प्राप्नोति । स्वस्ति गोभ्यः । स्वस्ति ब्राह्मणेभ्य इति । चतुर्थी भवति विप्रतिषेधेन ॥

## अलमिति पर्याप्त्यर्थग्रहणम् ॥२॥

अलमिति पर्याप्त्यर्थग्रहणं कर्तव्यम् । इह मा भूत् । अलंकुरुते कन्यामिति ॥

अपर आह । अलमिति पर्याप्त्यर्थग्रहणं कर्तव्यम् । इहापि यथा स्यात् । अलं मल्लो मल्लाय । प्रभुर्मल्लो मल्लाय । प्रभवति मल्लो मल्लायेति ॥

## मन्यकर्मण्यनादरे विभाषा-प्राणिषु ॥२।३।१७॥

अप्राणिष्वित्युच्यते तत्रेदं न सिध्यति । न त्वा श्वानं मन्ये । न त्वा शुने मन्य इति ॥ एवं तर्हि योगविभागः करिष्यते । मन्यकर्मण्यनादरे विभाषा । ततोऽप्राणिषु । अप्राणिषु च विभाषेति । इहापि तर्हि प्राप्नोति । न त्वा काकं मन्ये । न त्वा शुकं मन्य इति ॥ यदेतदप्राणिष्वित्ये-

---

शब्दांचा योग असतांना आणि आशीर्वाद गम्यमान असतांना 'चतुर्थी चाशिष्या०' (२।३।७३) या सूत्रानें विकल्पानें सांगितलेली जी चतुर्थी तिच्यापेक्षां प्रकृत सूत्रानें स्वस्ति-शब्दाचा योग असतांना नित्य सांगितलेली चतुर्थी ही विरोध असल्यामुळें प्रथमतः प्रवृत्त होते. स्वस्तिशब्दाच्या योगीं सांगितलेल्या चतुर्थीला स्वस्ति जाल्माय, स्वस्ति वृषलाय, येथें अवकाश आहे, व कुशल या अर्थाच्या शब्दांचा योग असतांना आणि आशीर्वाद गम्यमान असतांना विकल्पानें सांगितलेल्या चतुर्थीला स्वस्तिशब्दाखेरीज अन्य म्ह. कुशल वगैरे शब्दांचा योग असतांना चारितार्थ्य आहे; जसें— कुशलं देवदत्तस्य, कुशलं देवदत्ताय; आणि स्वस्ति गोभ्यः, स्वस्ति ब्राह्मणेभ्यः, येथें उभयतांची प्राप्ति येत आहे. तेथें वैकल्पिक चतुर्थीचा बाध करून पूर्वविप्रतिषेधानें स्वस्तिशब्दाच्या योगीं सांगितलेली नित्य चतुर्थी होते.

(वा.२) पर्याप्ति या अर्थाला दाखविणारा अलंशब्द सूत्रामध्यें घातला आहे असें समजावें. कारण अलंकुरुते कन्याम् येथें चतुर्थी न झाली पाहिजे.

अन्य कोणी एक वैयाकरण या वार्तिकाचा असा अर्थ समजतो की सूत्रांतील अलंशब्दाच्या ऐवजीं 'पर्याप्त्यर्थ' हा शब्द घालावा. कारण अलं मल्लो मल्लाय, प्रभुर्मल्लो मल्लाय, प्रभवति मल्लो मल्लाय, येथें पर्याप्ति या अर्थाचा कोणताही शब्द असला तरी चतुर्थी झाली पाहिजे.

(सू.१७) प्राणिभिन्न कर्म असें येथें म्हटलें आहे. तेव्हां न त्वा श्वानं मन्ये, न त्वा शुने मन्ये, येथें विकल्पानें चतुर्थी साधत नाहीं.

असें आहे तर सूत्राचा विभाग करण्यांत येईल तो असाः— 'मन्यकर्मण्यनादरे विभाषा' असें पूर्वसूत्र होय; त्याचे पुढें 'अप्राणिषु'ः तिरस्कार दाखवावयाचा असेल तर प्राणिभिन्न अशा मन्यधातूच्या कर्माहून विकल्पानें चतुर्थी होते.

पण असें केलें तर न त्वा काकं मन्ये, न त्वा शुकं मन्ये, येथेंही पूर्वसूत्रानें विकल्पानें चतुर्थी होऊं लागेल.

---

१. ज्याचा तिरस्कार दाखविला जात आहे असें जें दिवादि गणांतील मनधातूचें प्राणिभिन्न कर्म त्याहून चतुर्थी विकल्पानें होते; उदा०— न त्वां तृणं मन्ये तृणाय वा.

२. ह्या पूर्वसूत्रामध्यें प्राणिभिन्न अशी अट नसल्यामुळें त्यानें श्वन्शब्दाहून विकल्पानें चतुर्थी होईल.

तदनावादिष्विति वक्ष्यामि। इमे च नावादयो भविष्यन्ति। न त्वा नावं मन्ये यावत्तीर्णं न नाव्यम्। न त्वान्नं मन्ये यावद्भुक्तं न श्राद्धम्। अत्र येषु प्राणिषु नेष्यते ते नावादयो भविष्यन्ति ॥

मन्यकर्मणि प्रकृष्यकुत्सितग्रहणम् ॥१॥

मन्यकर्मणि प्रकृष्यकुत्सितग्रहणं कर्तव्यम्। इह मा भूत्। त्वा तृणं मन्य इति ॥

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये द्वितीयस्याध्यायस्य तृतीये पादे प्रथममाह्निकम् ॥

हें जें 'अप्राणिषु' असें म्हटलें आहे त्याचें ऐवजीं 'अनावादिषु' असें पठन करण्यात येईल. ते नौ वगैरे शब्द हे असूं शकतील. न त्वा नावं मन्ये यावत्तीर्णं न नाव्यम्. (जें नावेनें तरून नेतां येईल तें तूं तरून नेलें नाहींस सबब तुला होडग्याइतकेंही मानीत नाहीं.) न त्वाऽन्नं मन्ये यावद्भुक्तं न श्राद्धमिति. येथें ज्या प्राण्यांविषयीं चतुर्थीविकल्प इष्ट नाहीं ते प्राणी या, नौ, वगैरे शब्दांच्या गणांत आहेत असें समजावें.

(वा.१) मन्यधातूचें जें कर्म त्याविषयीं 'प्रकृष्य कुत्सिते' असें विशेषण द्यावें. म्हणजे अतिशय कुत्साद्योतक जें मन्यधातूचें कर्म तेथें चतुर्थी होते असें सांगावें. कारण त्वां तृणं मन्ये येथें तृणशब्दाहून चतुर्थी न झाली पाहिजे.

याप्रमाणें भगवान् पतंजलिऋषींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्यांतील दुसऱ्या अध्यायाच्या तिसऱ्या पादांतील पहिलें आह्निक समाप्त झालें.

---

१. तुला तृणासारखें समजतो, असा अर्थ आहे. येथें तृणासारखें म्हणण्यानें तिरस्कार गम्यमान होतो, परंतु अत्यंत तिरस्कार गम्यमान होत नाहीं. न त्वां तृणं मन्ये येथें तृणाइतकेंही तुला समजत नाहीं असें म्हटलें असतां अत्यंत तिरस्कार गम्यमान होतो, अशाच ठिकाणीं चतुर्थी होते असें वार्तिककारांचें मत आहे.

## कर्तृकरणयोस्तृतीया ॥२।३।१८॥

### तृतीयाविधाने प्रकृत्यादिभ्य उपसंख्यानम् ॥१॥

तृतीयाविधाने प्रकृत्यादिभ्य उपसंख्यानं कर्तव्यम्। प्रकृत्याभिरूपः। प्रकृत्या दर्शनीयः। प्रायेण याज्ञिकाः। प्रायेण वैयाकरणाः। माठरोऽस्मि गोत्रेण। गार्ग्योऽस्मि गोत्रेण। समेन धावति। विषमेण धावति। द्विद्रोणेन धान्यं क्रीणाति। त्रिद्रोणेन धान्यं क्रीणाति। पञ्चकेन पशून्क्रीणाति। साहस्रेणाश्वान्क्रीणाति॥ तत्तर्हि वक्तव्यम्। न वक्तव्यम्। कर्तृकरणयोस्तृतीयेत्येव सिद्धम्॥ इह तावत्प्रकृत्याभिरूपः प्रकृत्या दर्शनीय इति प्रकृतिकृतं तस्याभिरूप्यम्॥ प्रायेण याज्ञिकाः प्रायेण वैयाकरणा इति। एष तत्र प्रायो येन तेऽधीयते॥ माठरोऽस्मि गोत्रेण गार्ग्योऽस्मि गोत्रेणेति। एतेनाहं संज्ञाये॥ समेन धावति विषमेण धावतीति। इदमत्र प्रयोक्तव्यं सन्न प्रयुज्यते समेन पथा धावति विषमेण पथा धावतीति॥ द्विद्रोणेन धान्यं क्रीणाति त्रिद्रोणेन धान्यं क्रीणातीति। तादर्थ्यात्ताच्छब्द्यम्। द्विद्रोणार्थं द्विद्रोणम्। द्विद्रोणेन हिरण्येन धान्यं क्रीणातीति॥ पञ्चकेन पशून्क्रीणातीति। अत्रापि तादर्थ्यात्ताच्छब्द्यम्। पञ्चपश्वर्थः पञ्चकः। पञ्च-

---

(सू.१८, वा.१) या तृतीयेच्या प्रकरणामध्यें प्रकृति वगैरे शब्दांहून तृतीया होते असें सांगावें; जसें— प्रकृत्याऽभिरूपः, प्रकृत्या दर्शनीयः, प्रायेण याज्ञिकः, प्रायेण वैयाकरणः, माठरोऽस्मि गोत्रेण, गार्ग्योस्मि गोत्रेण, समेन धावति, विषमेण धावति, द्विद्रोणेन धान्यं क्रीणाति, त्रिद्रोणेन धान्यं क्रीणाति, पञ्चकेन पशून् क्रीणाति, साहस्रेणाश्वान् क्रीणाति.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण 'कर्तृकरणयोस्तृतीया' यानेंच तेथें तृतीया साधत आहे. प्रकृत्या अभिरूपः, प्रकृत्या दर्शनीयः, येथें प्रकृतीनें केलेलें असें त्याचें सौंदर्य आहे, असा अर्थ आहे. तेव्हां प्रकृति हें करणच आहे.

तसेंच प्रायेण[२] याज्ञिकः, प्रायेण वैयाकरणः, येथेंही बाहुल्य हें याज्ञिक असण्याचें करण आहे की ज्यामुळें ते लोक हेंच शिकतात. तसेंच माठरोऽस्मि गोत्रेण, गार्ग्योऽस्मि गोत्रेण, येथें मी माठर आहें, मी गार्ग्य आहें, अशा रीतीनें मला लोकांनीं गोत्रामुळें ओळखावें, असा अर्थ विवक्षित आहे; त्यामुळें ओळखणें या क्रियेचें गोत्र हें करण होत आहे. समेन धावति, विषमेण धावति, येथें समेन 'पथा' हा शब्द अवश्य घालावयास पाहिजे असतां तो घातला नाहीं.[३] द्विद्रोणेन धान्यं क्रीणाति येथेंही जी वस्तु ज्याच्याकरितां असते त्या अर्थाचा शब्द त्या वस्तु या अर्थीं वापरला आहे. द्विद्रोणाकरितां जें द्रव्य त्याला द्विद्रोण असें म्हटलें आहे. दोन द्रोणांला रुपया अशा किंमतीनें धान्य विकत घेतो असा याचा अर्थ आहे. तेव्हां येथें करणीं तृतीयाच होणार आहे. तसेंच पञ्चकेन पशून् क्रीणाति येथेंही जी वस्तु ज्याच्याकरितां असते त्या अर्थाचा शब्द त्या वस्तु या अर्थीं वापरला आहे. पांच

---

१. कर्ता किंवा करण अनभिहित असतां त्याहून तृतीया होते; उदा० रामेण बाणेन हतो वाली.

२. देवदत्त हा काय शिकला आहे या प्रश्नाचें हें उत्तर आहे. प्राय म्हणजे बाहुल्य. ह्याच्या कुलामध्यें याज्ञिक लोक बरेच आहेत तेव्हां हाही याज्ञिक असावा असा याचा अर्थ आहे.

३. तेव्हां पथा हें करण येथें अध्याहृत घ्यावयाचें आहे आणि त्याचें विशेषण समेन हें आहे तेव्हां तेथें करणीं तृतीयाच होत आहे.

केन पशून्क्रीणातीति ॥ साहस्रेणाश्वान्क्रीणातीति । सहस्रपरिमाणं साहस्रम् । साहस्रेण हिरण्येनाश्वान्क्रीणातीति ॥

## सहयुक्तेऽप्रधाने ॥२।३।१९॥

किमुदाहरणम् । तिलैः सह माषान्वपतीति । नैतदस्ति । तिलैर्मिश्रीकृत्य माषा उप्यन्ते तत्र करण इत्येव सिद्धम् ॥ इदं तर्हि ॥ पुत्रेण सहागतो देवदत्त इति । अप्रधाने कर्तरि तृतीया यथा स्यात् । एतदपि नास्ति प्रयोजनम् । प्रधाने कर्तरि लादयो भवन्तीति प्रधानकर्ता क्तेनाभिधीयते यश्चाप्रधानं सिद्धा तत्र कर्तरीत्येव तृतीया ॥ इदं तर्हि । पुत्रेण सहागमनं देवदत्तस्येति । षष्ठयत्र बाधिका भविष्यति ॥ इदं तर्हि । पुत्रेण सह स्थूलः । पुत्रेण सह पिङ्गल इति ॥ इदं चाप्युदाहरणं तिलैः सह माषान्वपतीति । ननु चोक्तं तिलैर्मिश्रीकृत्य माषा उप्यन्ते तत्र करण इत्येव सिद्धमिति । भवेत्सिद्धं यदा तिलैर्मिश्रीकृत्योप्येरन् । यदा तु खलु कस्यचिन्माषबीजावाप उपस्थितस्तदर्थं च क्षेत्रमुपार्जितं तत्रान्यदपि किंचिदुप्यते

---

पशूंकरतां जें द्रव्य त्याला पशुक असें म्हटलें आहे. रुपयाला पांच असे पशु विकत घेतो असा याचा अर्थ आहे. तेव्हां येथेंही करणींच तृतीया होणार आहे. तसेंच साहस्रेणाश्वान् क्रीणाति येथें सहस्र हा संख्यावाचक शब्द सहस्र रुपये या अर्थी योजला आहे. तेव्हां हजारांनीं घोडे विकत घेतो असा अर्थ असल्यामुळें करणीं तृतीयाच होत आहे.

(सू.१९) या सूत्राचें उदाहरण काय?

तिलैः सह माषान् वपति हें उदाहरण होय. तिळांनीं मिश्रित केलेले असे माष पेरले जात आहेत असा याचा अर्थ आहे. तेव्हां तीळ हें मिश्रणक्रियेचें करण असल्यामुळें तेथें पूर्वसूत्रानेंच तृतीया होईल.

तर पुत्रेण सहागमनं देवदत्तस्य हें उदाहरण घ्यावें.

येथें 'कर्तृकर्मणोः कृति' (२।३।६५) यानें प्रधानकर्त्याहून तृतीयेचा बाध करून षष्ठी होईल.

तर पुत्रेण सह स्थूलः, पुत्रेण सह पिङ्गलः हें उदाहरण समजावें.

तिलैः सह माषान् वपति हेंही या सूत्राचें उदाहरण समजावें.

पण तिळांनीं मिश्रित केलेले असे माष पेरले जातात. तेव्हां मिश्रणक्रियेचें तीळ हे करण होत असल्यामुळें तेथें पूर्वसूत्रानेंच तृतीया होईल असें म्हटलें आहे ना?

तुझ्या म्हणण्याप्रमाणें तिळांनीं मिश्रित करून जर उडीद पेरले जातील तर तिलशब्दाच्या पुढें करणीं तृतीया साधेल. पण जेव्हां एखाद्याला उडदांचें बीं पेरणें जरूर झालें व त्याकरितां एक शेत मिळवून तेथें तें

---

१. सह या अर्थाचा योग असतां तेथें अप्रधानवाचक शब्दाच्या पुढें तृतीया होते; उदा० पुत्रेण सहागतः पिता.

२. आगतः येथील क्तप्रत्ययानें कर्ता उक्त असल्यामुळें जशी पितृशब्दाहून पूर्वसूत्रानें तृतीया होत नाहीं तशी पुत्र या कर्त्याहूनही होणार नाहीं, म्हणून हें सूत्र केलें पाहिजे.

३. येथें आगमन हा ल्युट्प्रत्यय भावी केला असल्यामुळें पुत्र आणि देवदत्त हे दोन्ही कर्ते अनुक्त आहेत. तेव्हां त्या दोन्ही ठिकाणीं पूर्वसूत्रानें तृतीया प्राप्त झाली ती अप्रधानांहूनच होते असा नियम होण्याकरितां हें सूत्र केलें पाहिजे.

४. 'कर्तृकर्मणोः०' या सूत्रानें अप्रधान कर्त्याहून मात्र षष्ठी होणार नाहीं, कारण प्रधान कर्त्याचें उदाहरण मिळत असतांना तेथें अप्रधान कर्ता घेण्याला प्रमाण नाहीं.

५. येथें स्थौल्यगुणाचा संबंध दाखवावयाचा आहे, क्रियेचा नाहीं. तेव्हां पुत्र हा कर्ता होत नाहीं. म्हणून पूर्वसूत्रानें तृतीया सिद्ध होत नाहीं.

यदि भविष्यति भविष्यतीति तदा न सिध्यति ॥

**सहयुक्तेऽप्रधानवचनमनर्थकमुपपदविभक्तेः कारकविभक्तिबलीयस्त्वादन्यत्रापि ॥१॥**

सहयुक्तेऽप्रधानवचनमनर्थकम् । किं कारणम् । उपपदविभक्तेः कारकविभक्तिर्बलीयस्त्वात् । अन्यत्रापि कारकविभक्तिर्बलीयसीति प्रथमा भविष्यति । क्वान्यत्र । गाः स्वामी व्रजतीति ॥

## येनाङ्गविकारः ॥२।३।२०॥

इह कस्मान्न भवति । अक्षि काणमस्येति ।

**अङ्गाद्विकृतात्तद्विकारतश्चेदङ्गिनो वचनम् ॥१॥**

अङ्गाद्विकृतात्तृतीया वक्तव्या तेनैव चेद्विकारेणाङ्गी द्योत्यत इति वक्तव्यम् ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । अङ्गशब्दोऽयं समुदायशब्दो येनेति च करण एषा तृतीया । येनावयवेन समुदायोऽङ्गी द्योत्यते तस्मिन्भवितव्यं न चैतेनावयवेन समुदायो द्योत्यते ॥

## इत्थंभूतलक्षणे ॥२।३।२१॥

**इत्थंभूतलक्षणे तत्स्थे प्रतिषेधः ॥१॥**

---

बीं पेरलें. नंतर त्याच शेतांत सहजगत्या आलें तर आलें अशा कल्पनेनें दुसरें एखादें धान्य पेरलें; तेथें मिश्रीकरण नसल्यामुळें तिल-शब्दाच्या पुढें करणीं तृतीया येत नाहीं.

(वा.१) सहयुक्ते० या सूत्रामध्यें प्रधाना-हून तृतीया न व्हावी यासाठीं घातलेला 'अ-प्रधानें' हा शब्द फुकट होत आहे.

काय कारण ?

कारण असें की उपपदावर अवलंबून असलेल्या विभक्तीपेक्षां कारकाच्या निमित्तानें येणारी विभक्ति बलिष्ठ आहे. अन्य ठिकाणीं-ही उपपदविभक्तीपेक्षां कारकविभक्ति बलव-त्तर आहे म्हणून उपपदविभक्तीला मागें सारून प्रथमा वगैरे कारकविभक्ति होते. या-प्रमाणें येथेंही उपपदविभक्तीचा बाध करून प्रधानाच्या पुढें प्रथमा वगैरे होईल.

अन्य ठिकाणीं म्हणजे कोठें ?

गाः स्वामी व्रजति येथें.

(सू.२०) अक्षि काणमस्य येथें अक्षि-शब्दाच्या पुढें तृतीया कां बरें होत नाहीं ?

(वा.१) विकारयुक्त असा जो शरीराचा अवयव तद्वाचक शब्दाहून तृतीया होते, पण त्या विकारामुळें अङ्गी विकृत आहे असें कळ-विलें जात असेल तर, असें वचन करावें.

तर मग तसें वचन केलें पाहिजे.

तसें वचन करावयास नको. कारण येथील अङ्गशब्द हा अवयवांचा समुदाय जें शरीर वगैरे त्या अर्थाला दाखवितो. येन येथें यत् शब्दाच्या पुढें करणीं तृतीया केली आहे. तेव्हां विकारयुक्त अशा ज्या अवयवांमुळें अङ्गी मनुष्य हा विकृत असा प्रकाशित केला जाईल तेथें त्या अवयववाचक शब्दाहून तृतीया होते. अक्षि काणमस्य येथें अक्षि या विकृत अवयवामुळें अङ्गी विकृत असा प्रका-शित केला जात नाहीं. सबब अक्षि काणमस्य येथ तृतीया होऊं शकत नाहीं.

(सू.२१, वा.१) कांहीं एक विशेष प्रकारा-प्रत प्राप्त झालेला जो पदार्थ त्याच्या वाचक-

---

६. येथें स्वामिशब्दाचा योग असल्यामुळें प्राप्त झालेली जी षष्ठी किंवा सप्तमी (२।३।३९) ही उप-पदविभक्ति तिचा बाध करून गो या कर्माहून द्वितीया ही कारकविभक्ति झाली आहे.

१ म्हणजे अवयव, येथें मात्र अङ्गशब्दानें अङ्गांचा समुदाय अभिप्रेत आहे. ज्या विकृत अवयवामुळें अवयवीला विकृत म्हटलें जातें त्या ठिकाणीं त्या अव-यववाचक शब्दाहून तृतीया होते.

१. कांहीं एक विशेष प्रकाराप्रत प्राप्त झालेला जो पदार्थ त्याच्या त्या प्रकाराची द्योतक जी वस्तु

इत्थंभूतलक्षणे तत्स्थे प्रतिषेधो वक्तव्यः। अपि भवान्कमण्डलुपाणिं छात्रमद्राक्षीदिति ॥

## न वेत्थंभूतस्य लक्षणेनापृथग्भावात् ॥२॥

न वा वक्तव्यम् । किं कारणम् । इत्थंभूतस्य लक्षणेनापृथग्भावात् । यत्रेत्थंभूतस्य पृथग्भूतं लक्षणं तत्र भवितव्यं न चात्रेत्थंभूतस्य पृथग्भूतं लक्षणम् ॥ किं वक्तव्यमेतत् । न हि । कथमनुच्यमानं गंस्यते । तथा ह्ययं प्राधान्येन लक्षणं प्रतिनिर्दिशति । इत्थंभूतस्य लक्षणमित्थंभूतलक्षणं तस्मिन्नित्थंभूतलक्षण इति ॥

## संज्ञोऽन्यतरस्यां कर्मणि ॥ २ । ३ । २२ ॥

## संज्ञः कृत्प्रयोगे षष्ठी विप्रतिषेधेन॥१॥

संज्ञोऽन्यतरस्यां कर्मणीत्येतस्मात्कृत्प्रयोगे षष्ठी भवति विप्रतिषेधेन । संज्ञोऽन्यतरस्यामित्यस्यावकाशः । मातरं संजानीते । मात्रा संजानीते । कृत्प्रयोगे षष्ठ्या अवकाशः । इध्मप्रव्रश्चनः पलाशशातनः । इहोभयं प्राप्नोति । मातुः संज्ञाता । पितुः

---

शब्दानेंच जर तो प्रकार दाखविला असेल तर तेथें त्या प्रकारार्थक शब्दाहून तृतीया होत नाहीं, असें प्रतिषेधादाखल वचन करावें; जसें अपि भवान् कमण्डलुपाणिं छात्रमद्राक्षीत् ?

(वा.२) प्रतिषेधवचन करावयास नको.

काय कारण ?

कारण असें की जेथें कांहीं एक विशेष प्रकाराप्रत प्राप्त झालेल्या पदार्थापेक्षां त्या प्रकाराची मुख्यत्वानें पृथक् उपस्थिति असते तेथें तृतीया होत असते; आणि प्रकृत स्थलीं तर प्रकाराप्रत प्राप्त झालेल्या मनुष्याची उपस्थिति कमण्डलुपाणि या शब्दापासून होते त्यापेक्षां निराळ्या शब्दापासून कमण्डलु या प्रकाराची उपस्थिति होत नाहीं.

मग प्रकाराची मुख्यत्वानें पृथक् उपस्थिति असतांनाच तृतीया होते असें वचन केलें पाहिजे काय ?

तसें वचन करावयास नको.

तर मग सांगितल्यावांचून कशावरून बरें हें समजावें ?

सांगतों– हा आचार्य प्रकृत सूत्रामध्यें प्रकाराचा निर्देश मुख्यत्वानें करीत आहे. म्हणजे इत्थंभूतस्य लक्षणम् इत्थंभूतलक्षणम्, तस्मिन्नित्थंभूतलक्षणे असा हा षष्ठीतत्पुरुष समास आहे.

(सू.२२, वा.१) कृत्प्रत्यय केला असतां 'संज्ञोऽन्यतरस्यां कर्मणि' या प्रकृत सूत्रानें विकल्पानें सांगितलेल्या तृतीयेचा विरोध असल्यामुळें परत्वास्तव बाध करून 'कर्तृकर्मणोः.' (२।३।६५) यानें षष्ठी होते. 'संज्ञोऽन्यतरस्याम्०' याला मातरं संजानीते, मात्रा संजानीते, येथें अवकाश आहे. 'कर्तृकर्मणोः कृति' या षष्ठीला इध्मप्रव्रश्चनः, पलाशशातनः, येथें अवकाश आहे; आणि मातुः संज्ञाता, पितुः संज्ञाता, येथें उभयतांही विभक्ति प्राप्त होत आहेत. तेव्हां

---

तद्वाचकाहून तृतीया होते; उदा० जटाभिस्तापसः, येथें तापस या विशेष प्रकाराचें द्योतक जटा ही वस्तु होय.

२. येथें विशेष प्रकाराप्रत प्राप्त झालेल्या पदार्थाचा वाचक कमण्डलुपाणि हा सामासिक शब्द आहे, व त्यांतील कमण्डलु या शब्दानें तो प्रकार दाखविला आहे; म्हणून कमण्डलुशब्दाहून तृतीया होत नाहीं,

३. षष्ठीतत्पुरुषांमध्यें उत्तर पदार्थाला मुख्यत्व असतें. येथें लक्षण हें उत्तरपद आहे. लक्षण म्हणजेच प्रकार होय. तेव्हां अर्थातच प्रकाराची मुख्यत्वानें प्रतीति ज्या शब्दापासून होते तेथेंच तृतीया होते; उदा०— कमण्डलुना छात्रमद्राक्षीत्.

१. सम् हा उपसर्ग मागें असलेला जो ज्ञाधातु त्याच्या कर्माहून विकल्पानें तृतीया होते; उदा०— पित्रा पितरं वा संजानीते.

संज्ञातेति । षष्ठी भवति विप्रतिषेधेन ॥

## उपपदविभक्तेश्चोपपदविभक्तिः ॥२॥

उपपदविभक्तेश्चोपपदविभक्तिर्भवति विप्रतिषेधेन । अन्यारादितरर्तेदिक्शब्दाञ्चूत्तरपदाजाहियुक्ते [२.३.२९] इत्यस्यावकाशः । अन्यो देवदत्तात् । स्वामीश्वराधिपतिदायादसाक्षिप्रतिभूप्रसूतैश्च [३९] इत्यस्यावकाशः । गोषु स्वामी । गवां स्वामी । इहोभयं प्राप्नोति । अन्यो गोषु स्वामी । अन्यो गवां स्वामीति । स्वामीश्वराधिपतीत्येतद्भवति विप्रतिषेधेन ॥ नैष युक्तो विप्रतिषेधः । न ह्यत्र गावोऽन्ययुक्ताः । कस्तर्हि । स्वामी ॥ एवं तर्हि तुल्यार्थैरतुलोपमाभ्यां तृतीयान्यतरस्याम् [७२] इत्यस्यावकाशः । तुल्यो देवदत्तस्य । तुल्यो देवदत्तेनेति । स्वामीश्वराधिपतीत्यस्यावकाशः । स एव । इहोभयं प्राप्नोति । तुल्यो गोभिः स्वामी । तुल्यो गवां स्वामीति । तुल्यार्थैरतुलोपमाभ्यामित्येतद्भवति विप्रतिषेधेन ॥

## हेतौ ॥ २ । ३ । २३ ॥

## निमित्तकारणहेतुषु सर्वासां प्रायदर्शनम् ॥

निमित्तकारणहेतुषु सर्वा विभक्तयः प्रायेण दृश्यन्त इति वक्तव्यम् । किं निमित्त वसति । केन निमित्तेन वसति ।

---

विरोध असल्यामुळें परत्वास्तव तृतीयेचा बाध करून षष्ठी होते.

(वा.२) उपपदाच्या संबंधानें भिन्न भिन्न सूत्रांनीं सांगितलेल्या भिन्न भिन्न विभक्ति एके ठिकाणीं प्राप्त झाल्या तर त्यांमध्यें विरोध असल्यामुळें पर असेल ती होते; उदा०—'अन्यारादितरर्ते०' (२।३।२९) या उपपदविभक्तीला अन्यो देवदत्तात् येथें अवकाश आहे व 'स्वामीश्वराधि०' (२।३।३९) यानें सांगितलेल्या उपपदविभक्तीला गोषु स्वामी, गवां स्वामी येथें अवकाश आहे. आणि अन्यो गोषु स्वामी, अन्यो गवां स्वामी, या ठिकाणीं उभयतांची प्राप्ति येत आहे. तेव्हां विरोध असल्यामुळें परत्वास्तव पञ्चमीचा बाध करून 'स्वामीश्वराधि०' या सूत्रानें षष्ठी व सप्तमीविभक्ति होते.

हा विप्रतिषेध बरोबर नाहीं. कारण या ठिकाणीं अन्यशब्दाकडे गाईचा अन्वय नाहीं.[२]

तर मग अन्य शब्दाकडे कोणाचा अन्वय आहे ?

पूर्वींच्या स्वामीचा अन्यशब्दाकडे अन्वय आहे.

तर मग दुसरें उदाहरण देतों: 'तुल्यार्थैरतुलोपमाभ्यां तृतीयाऽन्यतरस्याम्' (२।३।७२) या सूत्रानें सांगितलेल्या तृतीयेला व षष्ठीला तुल्यो देवदत्तस्य, तुल्यो देवदत्तेन, येथें अवकाश आहे, व 'स्वामीश्वराधिपतिदायादसाक्षिप्रतिभूप्रसूतैश्च' (२।३।३९) या सूत्रानें सांगितलेल्या षष्ठीला व सप्तमीला अवकाश आतां दाखविलाच आहे, आणि तुल्यो गोभिः स्वामी, तुल्यो गवां स्वामी, येथें उभयतांचीही प्राप्ति येत आहे; तेव्हां विरोध असल्यामुळें परत्वास्तव 'तुल्यार्थैरतुलोपमाभ्यां तृतीयाऽन्यतरस्याम्' यानें सांगितलेली उपपदविभक्ति होते.

(सू.२३) निमित्त, कारण किंवा हेतु या शब्दांचा प्रयोग असतांना तेथें बहुतेक सर्व[२] विभक्ति केलेल्या दृष्टीस पडतात; जसें:— किं निमित्तं वसति, इत्यादि.

---

२. तेव्हां येथें 'अन्यारादितरर्ते०' यानें सांगितलेल्या पंचमीची प्राप्तिच येत नाहीं.

१. हेतु म्ह. कारण दाखवावयाचें असतां त्या शब्दाच्या पुढें तृतीया होते; उदा०—पुण्येन दृष्टो हरिः.

२. किं निमित्तं वसति हें उदाहरण प्रथमेचें आणि द्वितीयेचें समजावें. किं कारणं हेंही असेंच समजावें.

कस्मै निमित्ताय वसति । कस्मान्निमित्ताद्वसति । कस्य निमित्तस्य वसति । कस्मिन्निमित्ते वसति ॥ किं कारणं वसति । केन कारणेन वसति । कस्मै कारणाय वसति । कस्मात्कारणाद्वसति । कस्य कारणस्य वसति । कस्मिन्कारणे वसति ॥ को हेतुर्वसति । कं हेतुं वसति । केन हेतुना वसति । कस्मै हेतवे वसति । कस्माद्धेतोर्वसति । कस्य हेतोर्वसति । कस्मिन्हेतौ वसति ॥

## [ [1]अकर्तर्यृणे पञ्चमी ॥२।३।२४॥

## विभाषा गुणेऽस्त्रियाम् ॥ २ । ३ । २५ ॥

## षष्ठी हेतुप्रयोगे ॥२।३।२६॥

## सर्वनाम्नस्तृतीया च ॥२।३।२७॥]

## अपादाने पञ्चमी ॥२।३।२८॥

पञ्चमीविधाने ल्यब्लोपे कर्मण्युपसंख्यानम् ॥१॥

पञ्चमीविधाने ल्यब्लोपे कर्मण्युपसंख्यानं कर्तव्यम् । प्रासादमारुह्य प्रेक्षते प्रासादात्प्रेक्षते ॥

### अधिकरणे च ॥२॥

अधिकरणे चोपसंख्यानं कर्तव्यम् । आसनात्प्रेक्षते । शयनात्प्रेक्षते ॥

### प्रश्नाख्यानयोश्च ॥३॥

प्रश्नाख्यानयोश्च पञ्चमी वक्तव्या । कुतो भवान् । पाटलिपुत्रात् ॥

### यतश्चाध्वकालनिर्माणम् ॥४॥

यतश्चाध्वकालनिर्माणं तत्र पञ्चमी वक्तव्या । गवीधुमतः सांकाश्यं चत्वारि योजनानि । कार्त्तिक्या आग्रहायणी मासे ॥

### तद्युक्तात्काले सप्तमी ॥५॥

तद्युक्तात्काले सप्तमी वक्तव्या ।

---

(सू.२८, वा.१) आरुह्य वगैरे ल्यप्प्रत्ययान्ताचा प्रयोग केला नसतांही अर्थ मनांत येत असेल तर त्या क्रियेच्या कर्मांहून पंचमी होते असें येथें वचन करावें; जसें— प्रासादमारुह्य प्रेक्षते प्रासादात्प्रेक्षते.

(वा.२) ल्यबन्ताचा प्रयोग नसूनही त्याचा अर्थ मनांत येत असेल तर त्या क्रियेच्या अधिकरणाहूनही पंचमी होते; जसें— आसनमारुह्य प्रेक्षते आसनात्प्रेक्षते, शयनात्प्रेक्षते.

(वा.३) प्रश्न किंवा उत्तर गम्यमान असतां तेथें पंचमी होते असें वचन करावें; जसें— कुतो भवान् ? उत्तर— पाटलिपुत्रात्.

(वा.४) ज्या प्रदेशापासून एखादा मार्ग, किंवा ज्या वेळेपासून एखादा विशेष काल सुरू झाला असें दाखवावयाचें असेल त्या शब्दाच्या पुढें पंचमी होते; जसें— गवीधुमतः[2] सांकाश्यं चत्वारि योजनानि, कार्तिक्या आग्रहायणी मासे.

(वा.५) त्या पञ्चम्यन्ताच्या अर्थानें युक्त जो काल तद्वाचक शब्दापुढें सप्तमी होते असें

---

१.(२४)हेतुभूत जें ऋण तद्वाचकाहून पञ्चमी होते, मात्र तें ऋण कर्तृसंज्ञक नसावें; उदा०—शताद्बद्धः.

(२५) हेतुभूत असून स्त्रीलिंगी नसलेला जो गुणवाचक शब्द त्याच्या पुढें विकल्पानें पंचमी होते; उदा०— जाड्याद्बद्धः, जाड्येन बद्धः.

(२६) हेतु दाखवावयाचा असून हेतुशब्दाचा प्रयोग असेल तर तेथें हेतुत्व दाखविणारी षष्ठी होते; उदा०—अन्नस्य हेतोर्वसति.

(२७) हेतुशब्दाचा प्रयोग असेल तर तेथें सर्वनामशब्दाहून हेतुत्व दाखविणारी तृतीया व षष्ठी होते; उदा०—कस्य हेतोर्वसति, केन हेतुना वसति.

१. अपादान नांवाचें जें कारक तद्वाचक शब्दापुढें पंचमीविभक्ति होते; उदा०— ग्रामादागच्छति, पर्वतादवरोहति.

२. गवीधुमत् नांवाच्या एका नगरापासून सांकाश्यनगर चार योजनें अंतरावर आहे; कार्तिकी पौर्णिमेपासून आग्रहायणी पौर्णिमा एक महिना अंतरावर आहे.

कार्त्तिक्या आग्रहायणी मासे ॥

अध्वनः प्रथमा च ॥६॥

अध्वनः प्रथमा च सप्तमी च वक्तव्या। गवीधुमतः सांकाश्यं चत्वारि योजनानि। चतुर्षु योजनेषु ॥

तत्तर्हीदं बहु वक्तव्यम् । न वक्तव्यम् । अपादान इत्येव सिद्धम्॥ इह तावत्प्रासादात्प्रेक्षते शयनात्प्रेक्षत इत्यपक्रामति तत्तस्मादर्शनम् । यद्यपक्रामति किं नात्यन्तायापक्रामति । संततत्वात् । अथवान्यान्यप्रादुर्भावात्॥प्रत्याख्यानयोश्च पञ्चमी वक्तव्येति । इदमत्र प्रयोक्तव्यं सन्न प्रयुज्यते कुतो भवानागच्छति पाटलिपुत्रादागच्छामीति ॥ यतश्चाध्वकालनिर्माणं तत्र पञ्चमी वक्तव्येति । इदमत्र प्रयोक्तव्यं सन्न प्रयुज्यते गवीधुमतो निःसृत्य सांकाश्यं चत्वारि योजनानि ॥ कार्त्तिक्या आग्रहायणी मास इति । इदमत्र प्रयोक्तव्यं सन्न प्रयुज्यते कार्त्तिक्याः प्रभृत्याग्रहायणी मास इति ॥ तद्युक्तात्काले सप्तमी वक्तव्येति । इदमत्र प्रयोक्तव्यं सन्न प्रयुज्यते कार्त्तिक्या आग्रहायणी

---

वचन करावें; जसें– कार्तिक्या आग्रहायणी मासे.

(वा.६) त्या पञ्चम्यन्ताच्या अर्थानें युक्त जें मार्गाचें प्रमाण तद्वाचक शब्दापुढें प्रथमा किंवा सप्तमी होते असें वचन करावें; जसें– गवीधुमतः सांकाश्यं चत्वारि योजनानि, गवीधुमतः सांकाश्यं चतुर्षु योजनेषु.

तर मग हीं बरींचशीं वचनें केलीं पाहिजेत.

वचनें करावयास नकोत. 'अपादाने पञ्चमी' या प्रकृत सूत्रानेंच तेथें पंचमी साधत आहे. असें पहा की प्रासादात्प्रेक्षते, आसनात् प्रेक्षते, शयनात् प्रेक्षते, येथें चक्षुरिन्द्रिय हें प्रासाद, आसन किंवा शयन यापासून निघून दर्शनीय वस्तूकडे जाऊन त्या वस्तूचें ज्ञान करून देतें. आतां जरी चक्षुरिन्द्रिय हें प्रासाद वगैरेपासून निघून दूर जातें तरी त्याचें मूळ ठिकाण कांहीं सुटत नाहीं.

सूर्याचे किरणाप्रमाणें मुळाशीं संबंध कायम ठेवूनच बाहेर लांबवर जातें.

त्या त्या विषयाला घेणारें चक्षुरिन्द्रिय प्रत्येक क्षणीं निरनिराळेंच समजलें जातें. प्रश्नवाक्य आणि उत्तरवाक्य यांमध्यें पंचमी होते असें जें म्हटलें आहे त्या संबंधानें इतकेंच सांगावयाचें की कुतो भवान् या प्रश्नवाक्यामध्यें व पाटलिपुत्रात् या उत्तरवाक्यामध्यें अनुक्रमें आगच्छति आणि आगच्छामि या क्रियापदांचा प्रयोग करणें जरूर असतां तो केला गेला नाहीं.

तसेंच ज्या प्रदेशापासून एखादा मार्ग किंवा ज्या वेळेपासून एखादा विशेष काल सुरू झाला असें दाखवावयाचें असेल त्या शब्दाच्या पुढें पंचमी होते असें जें म्हटलें त्यावर उत्तर:— गवीधुमतः सांकाश्यं चत्वारि योजनानि या उदाहरणामध्यें गवीधुमतः या शब्दाच्या पुढें निःसृत्य या शब्दाचा प्रयोग करणें जरूर असतां तो केला गेला नाहीं. तसेंच कार्तिक्या आग्रहायणी मासे या उदाहरणामध्यें कार्तिक्याः या शब्दाच्या पुढें प्रभृति या शब्दाचा प्रयोग करणें जरूर असतां तो केला गेला नाहीं.

तसेंच 'त्या पञ्चम्यन्ताच्या अर्थानें युक्त

---

३. तेव्हां पूर्वक्षणचें चक्षुरिन्द्रिय दूर गेलें तें गेलेंच, त्याच्या पुढच्या क्षणचें तेथें असतें.

४. तेव्हां तेथेंही आगमनक्रियेमुळें वियोग होत असल्यामुळें अपादानसंज्ञा (१।४।२४) होऊन प्रकृत सूत्रानेंच पंचमी होईल.

५. तेव्हां निघणें या क्रियेचें गवीधुमत् हें नगर अपादान होत आहे.

६. यावरून 'प्रभृति म्ह. पासून या अर्थाचा योग असतांना पंचमी करावी' असें सिद्ध होतें.

गते मास इति ॥ अध्वनः प्रथमा च सप्तमी चेति । इदमत्र प्रयोक्तव्यं सन्न प्रयुज्यते गवीधुमतो निःसृत्य यदा चत्वारि योजनानि गतानि भवन्ति ततः सांकाश्यम् । चतुर्षु योजनेषु गतेषु सांकाश्यमिति ॥

**अन्यारादितरर्तेदिक्शब्दाञ्चूत्तरपदाजाहियुक्ते ॥२।३।२९॥**

अञ्चूत्तरपदग्रहणं किमर्थं न दिक्शब्दैर्योग इत्येव सिद्धम् । षष्ठ्यतसर्थप्रत्ययेन [२.३.३०] इति वक्ष्यति तस्यायं पुरस्तादपकर्षः ॥

**षष्ठ्यतसर्थप्रत्ययेन ॥२।३।३०॥**

अर्थग्रहणं किमर्थम् । षष्ठ्यतस्प्रत्ययेनेत्युच्यमान इहैव स्यात् । दक्षिणतो ग्रामस्य । उत्तरतो ग्रामस्येति । इह न स्यात् । उपरि ग्रामस्य । उपरिष्टाद्ग्रामस्येति । अर्थग्रहणे पुनः क्रियमाणेऽतस्प्रत्य-

---

जो काल तद्वाचक शब्दापुढें सप्तमी करावी' असें जें म्हटलें आहे त्यावर उत्तरः— कार्तिक्या आग्रहायणी मासे या उदाहरणामध्यें मासे या शब्दाच्या मागें 'गते' हा शब्द घालणें जरूर असतां तो घातला गेला नाहीं.

तसेंच 'त्या पञ्चम्यन्ताच्या अर्थानें युक्त जें मार्गाचें प्रमाण तद्वाचक शब्दापुढें प्रथमा किंवा सप्तमी करावी' असें जें म्हटलें आहे त्यावर उत्तरः— गवीधुमतः निःसृत्य सांकाश्यं चत्वारि योजनानि याचे ऐवजीं जी गवीधुमतः निःसृत्य यदा चत्वारि योजनानि गतानि भवन्ति ततः सांकाश्यम् अशी वाक्यरचना करणें जरूर असतां ती केली गेली नाहीं; किंवा चतुर्षु योजनेषु गतेषु ततः सांकाश्यम् अशी वाक्यरचना करणें जरूर असतां ती केली गेली नाहीं.

(सू.२९) अञ्चुधातु आहे उत्तरपद ज्याचें अशा सामासिक शब्दाचा योग असतां पञ्चमीचें विधान केलें तें कशासाठीं ? तें करावयास नको. दिग्वाचक शब्दाचा योग असतां पञ्चमीचें विधान केलें आहे त्यानेंच तेथेंही काम भागेल.

अतसुच्प्रत्ययाच्या अर्थाचे प्रत्यय शेवटीं असलेल्या शब्दांचा योग असतांना पुढील सूत्रानें षष्ठी सांगितली आहे त्या षष्ठीचा अपवाद म्हणून अञ्चूत्तरपदक शब्दांचा योग असतांना तेथें अगोदर पञ्चमी सांगून ठेविली आहे.

(सू.३०) अतसर्थ येथें अर्थ हा शब्द घातला आहे तो कशासाठीं ?

अर्थशब्द न घालतां 'षष्ठ्यतसुप्रत्ययेन' एवढेंच सूत्र केलें तर दक्षिणतो ग्रामस्य, उत्तरतो ग्रामस्य, येथेंच प्रकृत सूत्रानें षष्ठी होईल, व उपरि ग्रामस्य, उपरिष्टात् ग्रामस्य येथें होणार नाहीं; आणि अर्थशब्द घातला

---

७. तेव्हां कार्तिकी पौर्णिमेपासून महिना उलटून गेला असतां आग्रहायणीचा दिवस येतो, असा अर्थ मनांत येत असल्यामुळें 'यस्य च भावेन०' (२।३।३७) या सूत्रानें मासशब्दाहून सप्तमी होईल.

८. तेव्हां भवन्ति या क्रियेचा चत्वारि योजनानि हा कर्ता असल्यामुळें प्रथमा होईल.

९. तेव्हां तेथें 'यस्य च भावेन०' (२।३।३७) यानें सप्तमी होईल.

१. अन्य, आरात्, इतर, ऋते, दिक्शब्द, अञ्चूत्तरपद, आच्प्रत्ययान्त आणि आहिप्रत्ययान्त यांचा योग असतांना पंचमीविभक्ति होते; उदा०— अन्यो भिन्नो वा कृष्णात्, आराद्वनात्, ऋते कृष्णात्, चैत्रात्पूर्वः फाल्गुनः, प्राक् किंवा प्रत्यक् ग्रामात्, दक्षिणा ग्रामात्, दक्षिणाहि ग्रामात्.

१. अतसुच् (५।३।२८)प्रत्ययाच्या अर्थाचे जे प्रत्यय ते प्रत्यय शेवटीं असलेल्या शब्दांचा योग असतांना षष्ठी होते; उदा०—ग्रामस्य दक्षिणतः, पुरः, पुरस्तात्.

२. उपर्युपरिष्टात् (५।३।३२) या सूत्रानें ऊर्ध्वशब्दाच्या पुढें रिल् किंवा रिष्टातिल्प्रत्यय होतो आणि ऊर्ध्वशब्दाचे स्थानीं 'उप' हा आदेश होतो.

येन च सिद्धं भवति यश्चान्यस्तेन समानार्थः ॥ अथ प्रत्ययग्रहणं किमर्थम् । इह मा भूत् । प्राग्ग्रामात् । प्रत्यग्ग्रामात् । अञ्चूत्तरपदस्याप्येतत्प्रयोजनमुक्तं तत्रान्यतरच्छक्यमकर्तुम् ॥

**[एनपा द्वितीया ॥२।३।३१॥]**

**पृथग्विनानानाभिस्तृतीयान्यतरस्याम् ॥ २ । ३ । ३२ ॥**

**पृथगादिषु पञ्चमीविधानम् ॥१॥**

पृथगादिषु पञ्चमी विधेया । पृथग्देवदत्तात् । किमर्थम् । न प्रकृतं पञ्चमीग्रहणमनुवर्तते । क प्रकृतम् । अपादाने पञ्चमी [२.३.२८] इति ।

**अनधिकारात् ॥२॥**

अनधिकारः सः ॥

**अधिकारे हि द्वितीयाषष्ठीविषये प्रतिषेधः ॥३॥**

अधिकारे हि द्वितीयाषष्ठीविषये प्रतिषेधो वक्तव्यः स्यात् । दक्षिणेन ग्रामम् । दक्षिणतो ग्रामस्य ॥ एवं तर्ह्यन्यतरस्यां-

---

म्हणजे ज्यांत शेवटीं अतस्प्रत्यय आहे तसल्या शब्दाचा योग असतां तेथेंही षष्ठी करतां येते, व अतस्प्रत्ययाच्या अर्थाचे जे दुसरे प्रत्यय ते शेवटीं असलेल्या शब्दांचा योग असतां तेथेंही षष्ठी करतां येते.

अतसर्थप्रत्ययेन येथें प्रत्यय हा शब्द घातला तो कशासाठीं ?

अशासाठीं घातला आहे की प्राक् ग्रामात्, प्रत्यक् ग्रामात्, येथें षष्ठी न झाली पाहिजे.

'अन्यारादितरर्ते०' या पूर्वसूत्रामध्यें अञ्चूत्तरपद या शब्दाचा योग असतां पञ्चमी सांगण्याचा उद्देश प्राक् ग्रामात्, प्रत्यक् ग्रामात्, येथें प्रकृत सूत्रानें षष्ठी न व्हावी असा सांगितला आहे, व प्रकृत सूत्रामध्यें प्रत्ययशब्द घालण्याचा उद्देशही तोच सांगत आहांत. तेव्हां हा उद्देश उभयतांपैकीं कोणत्याही एकाकडून साधत असल्यामुळें त्यांपैकीं कोणताही एक शब्द न घातला तरी चालेल.

(सू.३२,वा.१) पृथक्, विना आणि नाना यांचा योग असतांना एकदा पंचमी होते असें वचन करावें; जसें– पृथक् देवदत्तात्.

कशासाठीं ही पञ्चमी सांगितली पाहिजे ?

सांगावयास नको. कारण मागून पञ्चमी हें पद येथें अनुवृत्त होईल.

तें पञ्चमी हें पद मागें कोठें बरें घातलें आहे ?

'अपादाने पञ्चमी' येथें.

(वा.२) तेथें पञ्चमीशब्द आहे खरा, पण तो कांहीं अधिकार या सदराखालीं घेतां येत नाहीं.

(वा.३) जर 'अपादाने पञ्चमी' येथील पञ्चमी हा शब्द अधिकार या सदराखालीं घेतला तर 'षष्ठ्यतसर्थ०' आणि 'एनपा द्वितीया' या सूत्रांनीं सांगितलेली जी षष्ठी आणि द्वितीया तेथेंही पंचमीचा संबंध होऊन दक्षिणतो ग्रामस्य, दक्षिणेन ग्रामम्, येथें पंचमी होऊं लागेल, म्हणून तिच्या निषेधाकरितां वचन करणें भाग पडेल.

असें आहे तर प्रकृत सूत्रामध्यें अन्यतर-

---

३. प्रत्ययशब्द घातल्याचे जोरावर अतस्प्रत्ययाच्या अर्थाचा आणि श्रूयमाण अशा प्रत्ययाचा योग असतांनाच षष्ठी होते असा अर्थ होतो. म्हणून प्राक्, प्रत्यक्, येथें केलेल्या अस्तातिप्रत्ययाचा 'अञ्चेर्लुक्' (५।३।३०) यानें लुक् झाल्यामुळें अशा स्थळीं षष्ठी होत नाहीं.

१. एनप्प्रत्यय शेवटीं असलेल्या शब्दाचा योग असतांना द्वितीया किंवा षष्ठी होते; उदा०– दक्षिणेन ग्रामं ग्रामस्य वा.

१. पृथक्, विना आणि नाना यांचा योग असतांना तृतीया होते व एकदा पंचमी आणि द्वितीया होते; उ०–पृथक् रामेण रामात् रामं वा.

ग्रहणसामर्थ्यात्पञ्चमी भविष्यति। अस्त्यन्यदन्यतरस्यांग्रहणस्य प्रयोजनम्। किम्। यस्यां नाप्राप्तायां तृतीयारभ्यते सा यथा स्यात्। कस्यां च नाप्राप्तायाम्। अन्ततः षष्ठ्याम्।

तत्तर्हि वक्तव्यम्। न वक्तव्यम्। प्रकृतमनुवर्तते। क्व प्रकृतम्। अपादाने पञ्चमीति। ननु चोक्तमनधिकारः सः अधिकारे हि द्वितीयाषष्ठीविषये प्रतिषेध इति। एवं तर्हि संबन्धमनुवर्तिष्यते। अपादाने पञ्चमी [२८]। अन्यारादितरर्तेदिक्शब्दाञ्चूत्तरपदाजाहियुक्ते [२९] पञ्चमी। षष्ठ्यतसर्थप्रत्ययेन [३०] अन्यारादिभिर्योगे पञ्चमी। एनपा द्वितीया [३१] अन्यारादिभिर्योगे पञ्चमी। पृथग्विनानानाभिस्तृतीयान्यतरस्याम्। पञ्चमीग्रहणमनुवर्ततेऽन्यारादिभिर्योग इति निवृत्तम्॥ अथवा मण्डूकगतयोऽधिकाराः। तद्यथा मण्डूका उत्प्लुत्योत्प्लुत्य गच्छन्ति तद्वदधिकाराः॥ अथवान्यवचनाच्चकाराकरणात्प्रकृतस्यापवादो विज्ञायते यथोत्सर्गेण प्रसक्तस्य। अन्यस्या

---

स्याम् हा जो शब्द एकदा पञ्चमी होण्यासाठीं घातला आहे तो व्यर्थ होईल. तेव्हां त्याचे जोरावर व्यवहित अशाही पंचमीचा येथें संबंध करतां येईल.

अन्यतरस्याम् हा शब्द व्यर्थ होत नाहीं. त्याचा उद्देश निराळा आहे.

तो काय उद्देश ?

पृथक् वगैरे शब्दांचा योग असतांना जी विभक्ति हटकून येऊं शकते ती विभक्तिही एकदा व्हावी.

पृथक् वगैरे शब्दांना कोणती बरें विभक्ति हटकून येऊं शकते ?

षष्ठी ही सर्वत्र कायमची येणारी आहे.

तर मग 'पृथगादिषु पञ्चमीविधानम्' हें वचन केलें पाहिजे ?

तें वचन करावयास नको. कारण मागून पञ्चमी हें पद येथें अनुवृत्त होईल.

तें पञ्चमी हें पद मागें कोठें बरें घातलें आहे ?

'अपादाने पञ्चमी' येथें.

पण तो पञ्चमीशब्द अधिकार या सदराखालीं घेतां येत नाहीं. तसा घेतला तर 'षष्ठ्यतसर्थ०', 'एनपा द्वितीया' या सूत्रांनीं सांगितलेली जी षष्ठी आणि द्वितीया येथेंही तिचा संबंध होईल. तेव्हां तिचा निषेध करावा लागेल असें पूर्वी म्हटलें आहे ना ?

असें आहे तर त्या पञ्चमीशीं ज्यांचा संबंध आहे त्या शब्दांसह पंचमीची अनुवृत्ति करण्यांत येईल. ती अशीः— 'अपादाने पञ्चमी' या सूत्रांतून 'अन्यारादितरर्ते०' या सूत्रामध्यें पञ्चमी हा शब्द अनुवृत्त येत आहे. 'षष्ठ्यतसर्थ०' या सूत्रामध्यें 'अन्य वगैरे शब्दांचा योग असतांना पञ्चमी होते' एवढ्याची अनुवृत्ति करण्यांत येईल. पुढें 'एनपा द्वितीया' येथेंही 'अन्य वगैरे शब्दांचा योग असतांना पञ्चमी होते' एवढ्याची अनुवृत्ति करण्यांत येईल. त्याच्यापुढें 'पृथग्विना०' या सूत्रामध्यें मात्र फक्त पञ्चमीचीच अनुवृत्ति येते, 'अन्य वगैरे शब्दांचा योग असतांना' ह्याची अनुवृत्ति येत नाहीं.

अथवा बेडकांच्या गतीप्रमाणें अधिकारांची गति असते. म्हणजे बेडूक ज्याप्रमाणें उड्या मारीत मारीत जातात त्याप्रमाणें अधिकारही कांहीं सूत्रें ओलांडून पुढें उड्या मारीत जातात.

अथवा 'अन्यवचनाच्चकाराकरणात्'. 'षष्ठ्यतसर्थ०', 'एनपा द्वितीया' या सूत्रांमध्येंही पंचमीची अनुवृत्ति येत आहे. पण त्या सूत्रांनीं षष्ठी व द्वितीया ही निराळी विभक्ति सांगि-

---

२. तेव्हां अर्थातच त्या पंचमीशीं 'पृथक् वगैरे शब्दांचा योग असतांना' याचा संबंध होईल.

विभक्तेर्वचनाच्चकारस्यानुकर्षणार्थस्याकरणात्प्रकृतायाः पञ्चम्या द्वितीयाषष्ठ्यौ बाधिके भविष्यतो यथोत्सर्गेण प्रसक्तस्यापवादो बाधको भवति ॥ अथवा वक्ष्यत्येतत्। अनुवर्तन्ते च नाम विधयो न चानुवर्तनादेव भवन्ति। किं तर्हि। यत्नाद्भवन्तीति ॥

**[करणे च स्तोकाल्पकृच्छ्रकतिपयस्यासत्त्ववचनस्य ॥२।३।३३॥**

**दूरान्तिकार्थैः षष्ठ्यन्यतरस्याम् ॥ २। ३। ३४॥]**

**दूरान्तिकार्थेभ्यो द्वितीया च ॥ २। ३। ३५ ॥**

**दूरान्तिकार्थेभ्यः पञ्चमीविधाने तद्युक्तात्पञ्चमीप्रतिषेधः ॥१॥**

दूरान्तिकार्थेभ्यः पञ्चमीविधाने तद्युक्तात्पञ्चम्याः प्रतिषेधो वक्तव्यः। दूराद्ग्रामस्य ॥

**न वा तत्रापि दर्शनादप्रतिषेधः ॥२॥**

न वा। तत्रापि दर्शनात्पञ्चम्याः प्रतिषेधोऽनर्थकः। तत्रापि पञ्चमी दृश्यते।

दूरादावसथान्मूत्रं दूरात्पादावसेचनम्।
दूराच्च भाव्यं दस्युभ्यो दूराच्च कुपितादुगुरोः

---

तली असल्यामुळें व तेथें पूर्वीच्या विभक्तीचा समुच्चय करण्याकरितां चशब्द घातला नसल्यामुळें ती षष्ठी व द्वितीया ह्या दोन्ही पंचमीचा बाध करतील; जसें सामान्य शास्त्रानें सांगितलेल्या कार्यांचा विशेष शास्त्रानें बाध केला जातो तसेंच हें होय.

अथवा पुढें असें सांगणार आहें की विधि हे अनुवृत्त होवोत, पण केवळ अनुवृत्त झाले म्हणजे तेवढ्यावरूनच कांहीं त्यांचें तेथें विधान मात्र होत नाहीं, तर विधान करण्याबद्दल कांहीं सूचक यत्न करावा लागतो.[३]

(सू.३५, वा.१) दूर किंवा जवळ या अर्थाला दाखविणाऱ्या शब्दांपुढें पञ्चमी केली असेल त्या ठिकाणीं त्या शब्दांचा योग असतांना इतर शब्दांहून पूर्वसूत्रानें प्राप्त झालेली पंचमी होत नाहीं, असें विधानादाखल वचन करावें; जसें– दूराद्ग्रामस्य.

(वा.२) अनर्थक जो प्रतिषेध तो अप्रतिषेध होय. पंचमीचा निषेध केला असतां तो फुकट होतो म्हणून प्रतिषेधवचन करावयास नको. कारण पञ्चम्यन्तानें दाखविलेल्या दूर किंवा जवळ या अर्थानें युक्त (अर्थात् त्या अर्थाचा प्रतियोगी = अवधिभूत) जो अर्थ तद्वाचक शब्दापुढें अथवा तेथेंही पंचमी केल्याचें दिसून येत आहे म्हणून हा पंचमीचा प्रतिषेध करणें व्यर्थ आहे. तशा ठिकाणीं पंचमी केलेली दृष्टीस पडते याचें उदाहरण दूरादावसथाद्०.[२] येथें आवस-

---

३. तो यत्न 'षष्ठ्यतसर्थ०' आणि 'एनपा द्वितीया' या दोन सूत्रांमध्यें कांहींच दिसत नाहीं, आणि 'पृथग्विना०, या प्रकृत सूत्रामध्यें मात्र दिसतो. कारण येथें अन्यतरस्याम् हा शब्द घातला आहे त्याचा अर्थ चशब्दाप्रमाणें समुच्चय आहे.

१. द्रव्यवाचक नसून केवळ धर्मवाचक अशा स्तोक, अल्प, कृच्छ्र आणि कतिपय या शब्दांहून करण या अर्थीं तृतीया किंवा पंचमी होते; उदा०–स्तोकान्मुक्तः स्तोकेन मुक्तः, अल्पेन मुक्तःअल्पान्मुक्तः.

१. दूर किंवा जवळ या अर्थाच्या शब्दांचा योग असतांना षष्ठी किंवा पंचमी होते; उदा०–दूरं निकटं ग्रामस्य ग्रामाद्वा.

१. दूर किंवा जवळ या अर्थाच्या शब्दाहून द्वितीया, तृतीया किंवा पंचमी होते; उदा०–ग्रामस्य दूरं, दूरात् किंवा दूरेण; अन्तिकम्, अन्तिकात्, किंवा अन्तिकेन.

२. राहण्याच्या ठिकाणापासून दूर अंतरावर मूत्रोत्सर्ग करणें, पाय धुणें, वगैरे गोष्टी कराव्या. तसेंच चोरापासून आणि क्रुद्ध झालेल्या गुरूपासून दूर असावें.

## सप्तम्यधिकरणे च ॥२।३।३६॥

### सप्तमीविधाने क्तस्येन्विषयस्य कर्मण्युपसंख्यानम् ॥१॥

सप्तमीविधाने क्तस्येन्विषयस्य कर्मण्युपसंख्यानं कर्तव्यम् । अधीती व्याकरणे । परिगणिती याज्ञिक्ये । आम्नाती छन्दसि ॥

### साध्वसाधुप्रयोगे च ॥२॥

साध्वसाधुप्रयोगे च सप्तमी वक्तव्या । साधुर्देवदत्तो मातरि । असाधुः पितरि ॥

### कारकार्हाणां च कारकत्वे ॥३॥

कारकार्हाणां च कारकत्वे सप्तमी वक्तव्या । ऋद्धेषु भुञ्जानेषु दरिद्रा आसते । ब्राह्मणेषु तरत्सु वृषला आसते ॥

### अकारकार्हाणां चाकारकत्वे ॥४॥

अकारकार्हाणां चाकारकत्वे सप्तमी वक्तव्या । मूर्खेष्वासीनेष्वृद्धा भुञ्जते । वृषलेष्वासीनेषु ब्राह्मणास्तरन्ति ॥

### तद्विपर्यासे च ॥ ५ ॥

तद्विपर्यासे च सप्तमी वक्तव्या । ऋद्धेष्वासीनेषु मूर्खा भुञ्जते । ब्राह्मणेष्वासीनेषु वृषलास्तरन्ति ॥

### निमित्तात्कर्मसंयोगे ॥६॥

निमित्तात्कर्मसंयोगे सप्तमी वक्तव्या । चर्माणि द्वीपिनं हन्ति दन्तयोर्हन्ति कुञ्जरम् । केशेषु चमरीं हन्ति सीम्नि पुष्कलको हतः ॥

## यस्य च भावेन भावलक्षणम् ॥ २ । ३ । ३७ ॥

थशब्दाहून पंचमी केलेली दृष्टीस पडते.

(सू. ३६, वा. १) क्रियावाचक धातूहून क्त-प्रत्यय करून त्याच्यापुढें इन्प्रत्यय केला असतांना त्या क्रियेच्या कर्माहून सप्तमी होते असें वचन करावें; जसें— अधीती व्याकरणे, परिगणिती याज्ञिक्ये, आम्नाती छन्दसि.

(वा. २) साधु किंवा असाधु या शब्दांचा प्रयोग असतांना सप्तमी होते; जसें— साधुर्देवदत्तो मातरि, असाधुः पितरि.

(वा. ३) ज्या क्रियेविषयीं जे योग्य आहेत त्यांना त्या क्रियेचा संबंध दाखवावयाचा असतांना सप्तमी होते; जसें— ऋद्धेषु[२] भुञ्जानेषु दरिद्रा आसते, ब्राह्मणेषु तरत्सु वृषला आसते.

(वा. ४) जे ज्या क्रियेविषयीं योग्य नाहींत त्यांना त्या क्रियेचा संबंध नाहीं असें दाखवावयाचें असतानां सप्तमी होते; जसें— मूर्खेषु[३] आसीनेषु ऋद्धा भुञ्जते, वृषलेषु आसीनेषु ब्राह्मणास्तरन्ति.

(वा. ५) ज्या क्रियेविषयीं जे योग्य त्यांना त्या क्रियेचा संबंध नाहीं असें दाखवावयाचें असतांनाही सप्तमी होते, किंवा ज्या क्रियेविषयीं जे योग्य नव्हेत त्यांना त्या क्रियेचा संबंध दाखवावयाचा असतांनाही सप्तमी होते; जसें— ऋद्धेषु आसीनेषु मूर्खा भुञ्जते, ब्राह्मणेषु आसीनेषु वृषलास्तरन्ति.

(वा. ७) ज्याला उद्देशून कांहीं एक क्रिया करण्यांत येते तें त्या क्रियेचें फल म्हटलें जातें. तसल्या फलवाचक शब्दापुढें सप्तमी करावी, पण त्या फलाचा त्या क्रियेच्या कर्माबरोबर संयोग वगैरे संबंध असेल तर; जसें— चर्मणि[४] द्वीपिनं हन्ति०

(सू. ३७, वा. १) क्रियेचें लक्षण दाखवाव-

१. अधिकरणकारकाहून आणि दूर किंवा जवळ या अर्थाला दाखविणाऱ्या शब्दाहून सप्तमी होते; उदा० कटे आस्ते, स्थाल्यां पचति, वनस्य दूरे अन्तिके वा.

२. समृद्ध लोक हे प्रथमभोजनक्रियेला योग्य आहेत.

३. मूर्ख लोक प्रथमभोजनाविषयीं योग्य नाहीत.

४. कातड्याकरितां वाघाला मारतो, दाताकरितां हत्तीला मारतो, केसाकरितां चमरीमृगाला मारतो आणि अंडकोश मिळण्याकरितां गंधमृगाला मारतो.

१. ज्याच्यावरील कळलेल्या क्रियेनें न कळलेली क्रिया कळविली जाते त्याहून सप्तमी होते; जसें— गोषु दुह्यमानासु गतः.

**भावलक्षणे सप्तमीविधानेऽभाव-लक्षण उपसंख्यानम् ॥ १ ॥**

भावलक्षणे सप्तमीविधानेऽभावलक्षण उपसंख्यानं कर्तव्यम् । अग्निषु हूयमानेषु प्रस्थितो हुतेष्वागतः । गोषु दुह्यमानासु प्रस्थितो दुग्धास्वागतः । किं पुनः कारणं न सिध्यति । लक्षणं हि नाम तद्भवति येन पुनः पुनर्लक्ष्यते सकृच्चासौ कथंचिदग्निषु हूयमानेषु प्रस्थितो हुतेष्वागतो गोषु दुह्यमानासु प्रस्थितो दुग्धास्वागतः ॥

**सिद्धं तु भावप्रवृत्तौ यस्य भावारम्भवचनात् ॥ २ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । यस्य भावप्रवृत्तौ द्वितीयो भाव आरभ्यते तत्र सप्तमी वक्तव्या । सिध्यति । सूत्रं तर्हि भिद्यते ॥ यथान्यासमेवास्तु । ननु चोक्तं भावलक्षणे सप्तमीविधानेऽभावलक्षण उपसंख्यानमिति । नैष दोषः । न खल्ववश्यं तदेव लक्षणं भवति येन पुनः पुनर्लक्ष्यते । सकृदपि यन्निमित्तत्वाय कल्पते तदपि लक्षणं भवति । तद्यथा । अपि भवान्कमण्डलुपाणिं छात्रमद्राक्षीदिति । सकृदसौ कमण्डलुपाणिर्दृष्टश्छात्रस्तस्य तदेव लक्षणं भवति ॥

---

याचें असतांना जी ही सप्तमी सांगितली आहे ती क्रियेचें लक्षण जरी नसेल तरी तेथें होते असें म्हणावें; जसें— अग्निषु हूयमानेषु गतः, हुतेषु आगतः; गोषु दुह्यमानासु गतः, दुग्धासु आगतः.

पण या उदाहरणांमध्यें 'यस्य च भावेन' या प्रकृत सूत्रानें सप्तमी होऊं शकत नाहीं याचें काय बरें कारण ?

कारण असें की लक्षण असें त्यालाच म्हणतां येतें जें अमक्याचें लक्षण अमुक असें सांगितलें असतां पुनः केव्हांही त्यावरून तें ओळखतां आलें पाहिजे.[२] आणि प्रकृत उदाहरणामध्यें पाहिलें तर हा हवन चाललें असतां एखादे वेळींच काकतालीयन्यायानें गेलेला आणि हवन झाल्यानंतर आलेला आहे. तसेंच गाईची धार काढीत असतांना हा कसा तरी काकतालीयन्यायानें त्या वेळीं गेला आहे व धार काढल्यानंतर तसाच आला आहे.

(वा.२) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

'यस्य च भावप्रवृत्तौ भावारम्भः' असें सूत्र करावें. म्हणजे ज्याच्यावरील क्रिया प्रवृत्त असतां दुसऱ्यावरील क्रिया प्रतिपादन केली जाते त्याहून सप्तमी होते.

असें सूत्र केल्यामुळें जें भावलक्षण नव्हे तेथेंही करतां येतें हें खरें परंतु मूळ सूत्र बदललें जात आहे.

तर मग मूळचें आहे तसेंच सूत्र असूं दे.

पण मूळचें सूत्र ठेवलें तर ज्या क्रियेला लक्षण हें नांव लागू पडत नाहीं तेथें सप्तमीचें विधान करावें लागतें असा पूर्वीं दोष दाखविला आहे ना ?

हा दोष येत नाहीं. कारण अमक्याचें लक्षण अमुक असें सांगितलें असतां पुनः केव्हांही त्यावरून तें ओळखतां येतें त्यालाच लक्षण म्हणावयाचें असा कांहीं कायदा नाहीं. तर जी वस्तु एखादे वेळींही दुसऱ्याला दाखवूं शकते त्या वस्तूलाही लक्षण हें नांव लागू पडतें; जसें— हातात झारी घेतलेल्या अशा शिष्याला तूं पाहिलेंस काय, असें विचारलें असतां तेथें यानें हातांत झारी घेतलेल्या शिष्याला एकदा पाहिलें होतें म्हणून हातांतील झारी हेंच त्या शिष्याला ओळखण्याचें

---

२. जसें धूम हें अग्नीचें लक्षण आहे असें एकदां सांगितलें असतां पुनः केव्हांहि धूम पाहिला असतां त्यावरून तेथें अग्नीची खात्रीनें कल्पना करतां येते.

[षष्ठी चानादरे ॥ २ । ३ । ३८ ॥
स्वामीश्वराधिपतिदायादसाक्षिप्रतिभूप्रसूतैश्च ॥२।३।३९॥
आयुक्तकुशलाभ्यां चासेवायाम् ॥ २ । ३ । ४० ॥
यतश्च निर्धारणम् ॥२।३।४१॥]
पञ्चमी विभक्ते ॥२।३।४२॥

इह कस्मान्न भवति । कृष्णा गवां संपन्नक्षीरतमेति । विभक्त इत्युच्यते न चैतद्विभक्तम् । विभक्तमेतत् । गोभ्यः कृष्णा विभज्यते । विभक्तमेव यन्नित्यं तत्र भवितव्यं न चैतन्नित्यं विभक्तम् । किं वक्तव्यमेतत् । न हि । कथमनुच्यमानं गंस्यते । विभक्तग्रहणसामर्थ्यात् । यदि हि यद्विभक्तं चाविभक्तं च तत्र स्याद्विभक्तग्रहणमनर्थकं स्यात् ॥

साधुनिपुणाभ्यामर्चायां सप्तम्यप्रतेः ॥ २ । ३ । ४३ ॥

अप्रत्यादिभिरिति वक्तव्यम् । इहापि यथा स्यात् । साधुर्देवदत्तो मातरं परि ।

---

लक्षण होतें.

(सू.४२) कृष्णा[2] गवां संपन्नक्षीरतमा येथें प्रकृत सूत्रानें पञ्चमी कां बरें होत नाहीं ?

ज्या वस्तूपेक्षां जो पदार्थ निराळा त्या उभयतांचा विभाग असतां असें म्हटलें आहे, आणि येथें तर त्या उभयतांचा विभाग नाहीं म्हणून पंचमी होत नाहीं.

येथेंही विभाग आहेच. कारण गोमंडलापासून काळी गाय विभागून दाखविली जात आहे.

जेथें त्या उभयतांचा मूळपासूनच विभाग गृहीत धरलेला असतो तेथें पंचमी होते, आणि या उदाहरणामध्यें तर गवाम् या पदानें अविभाग गृहीत धरला आहे.

पण 'जेथें मूळपासूनच विभाग गृहीत धरलेला असतो तेथें पंचमी करावी' असें निराळें वचन केलें पाहिजे काय ?

तसें वचन करावयास नको.

तर मग सांगितल्यावांचून कशावरून हें ठरविलें जाईल ?

'विभक्ते' म्ह. विभाग असतां असें म्हटलें आहे त्याचे जोरावरूनच तें ठरविलें जाईल. कारण जर जेथें विभागही आहे आणि अविभागही आहे तेथें पंचमी होणें इष्ट असेल तर 'विभाग असतां' असें सांगण्यांत कांहीं तात्पर्यच राहत नाहीं.

(सू.४३) या सूत्रामध्यें अप्रतेः याचे ऐवजीं अप्रत्यादिभिः असें म्हणावें. कारण प्रति, परि,

---

१. (३८) पूर्वसूत्राचा विषय असून त्यांत जर अनादर दाखवावयाचा असेल तर तेथें षष्ठी किंवा सप्तमी होते; उदा०—रुदति रुदतो वा प्राव्राजीत्.

(३९) स्वामिन्, ईश्वर, अधिपति, दायाद, साक्षिन्, प्रतिभू आणि प्रसूत या शब्दांचा योग असतां षष्ठी किंवा सप्तमी होते; उदा०-गवां गोषु वा स्वामी, प्रसूतः.

(४०) आयुक्त आणि कुशल यांचा योग असतां षष्ठी किंवा सप्तमी होते, तत्परता हा अर्थ गम्यमान असतांना; उदा०—आयुक्तः कुशलो वा हरिपूजनस्य हरिपूजने वा.

(४१) जातीनें, गुणानें, क्रियेनें किंवा संज्ञेनें समुदायांतील एक भाग निराळा काढून कळवावयाचा असतां ज्यापासून तो निराळा काढावयाचा तद्वाचक शब्दांपुढें षष्ठी किंवा सप्तमी होते. नृणां नृषु वा ब्राह्मणः श्रेष्ठः, गवां गोषु वा कृष्णा बहुक्षीरा.

१ ज्या वस्तूपेक्षां जो पदार्थ जातीनें, गुणानें, क्रियेनें किंवा संज्ञेनें निराळा म्हणून कळवावयाचा तो पदार्थ मूळचाच त्या वस्तूपेक्षां निराळा दाखविला असेल तेथें त्या वस्तूला दाखविणाऱ्या शब्दाहून पंचमी होते; उदा०—माथुराः पाटलिपुत्रकेभ्य आढ्यतराः.

२. गाईमध्यें काळी गाय पुष्कळ दूध देणारी आहे.

१. साधु किंवा निपुण यांचा योग असतांना सप्तमी होते, पूजा गम्यमान असतांना; पण प्रतिशब्दाचा प्रयोग मात्र नसला पाहिजे; उदा०—मातरि साधुर्निपुणो वा.

मातरमनु ॥

**प्रसितोत्सुकाभ्यां तृतीया च ॥ २ । ३ । ४४ ॥**

प्रसित इत्युच्यते कः प्रसितो नाम । यस्तत्र नित्यं प्रतिबद्धः । कुत एतत् । सिनोतिरयं बध्नात्यर्थे वर्तते । बद्ध इवासौ तत्र भवति ॥

**नक्षत्रे च लुपि ॥ २ । ३ । ४५ ॥**

इह कस्मान्न भवति । अद्य पुष्यः । अद्य मघा इति । अधिकरण इति वर्तते ॥

**इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरण-महाभाष्ये द्वितीयस्याध्यायस्य तृतीये पादे द्वितीयमाह्निकम् ।**

---

अनु, यांचा प्रयोग असतां सप्तमी न झाली पाहिजे; उदा०— साधुर्देवदत्तो मातरं परि, मातरमनु.

(सू.४४) येथें प्रसितः हा शब्द उच्चारला आहे त्याचा कोणता अर्थ येथें समजावयाचा ?

जो त्या ठिकाणीं नेहमीं प्रतिबद्ध असतो तो प्रसित होय.

हें कशावरून ?

सिनोतिधातु हा बध्नातिधातूच्या अर्थाला म्ह. बंधन या अर्थाला दाखवितो. त्या ठिकाणीं हा बद्ध झाल्यासारखाच असतो.

(सू.४५) अद्य पुष्यः, अद्य मघा, येथें कां बरें प्रकृत सूत्रानें सप्तमी होत नाहीं ?

'सप्तम्यधिकरणे च' (२।३।३६) या सूत्रांतून मंडूकप्लुतीनें 'अधिकरणे' या शब्दाची येथें अनुवृत्ति येत आहे.

याप्रमाणें भगवान् पतंजलिऋषींनीं रचिलेल्या व्याकरण महाभाष्यांतील दुसऱ्या अध्यायाच्या तिसऱ्या पादांतील दुसरें आन्हिक समाप्त झालें.

---

१. प्रसित किंवा उत्सुक यांचा योग असतां तृतीया किंवा सप्तमी होते; उदा०—प्रसित उत्सुको वा, हरिणा हरौ वा.

२. प्रपूर्वक षिञ् बन्धने या धातूच्या पुढें कर्मणि क्तप्रत्यय करून प्रसितशब्द बनविला आहे.

१. नक्षत्रवाचक शब्दापुढील प्रत्ययाचा लुप् झाला असतां तेथें अधिकरण या अर्थीं तृतीया किंवा सप्तमी होते; उदा०—मूलेन मूले वा आवाहयेद्देवीं, श्रवणेन श्रवणे वा विसर्जयेत्.

२. येथें 'पुष्यनक्षत्रानें युक्त चन्द्र' या अर्थाच्या पुष्यशब्दाहून पुष्येण युक्तः कालः या अर्थीं केलेल्या अण्प्रत्ययाचा 'लुबविशेषे' (४।२।४) या सूत्रानें लुप् केला आहे. असेंच 'मघा' येथेंही समजावें. परंतु त्या काळीं अमुक करावें असें पुढें कांहींच सांगितलें नसल्यामुळें त्याला अधिकरण म्हणतां येत नाहीं.

**प्रातिपदिकार्थलिङ्गपरिमाणवचनमात्रे प्रथमा ॥ २ । ३ । ४६ ॥**

प्रातिपदिकग्रहणं किमर्थम् । उच्चैः नीचैरित्यत्रापि यथा स्यात् । किं पुनरत्र प्रथमया प्रार्थ्यते । पदत्वम् । नैतदास्ति। षष्ठयात्र पदत्वं भविष्यति ॥ इदं तर्हि प्रयोजनम् । ग्राम उच्चैस्ते स्वम् । ग्राम उच्चैस्तव स्वम् । सपूर्वायाः प्रथमाया विभाषा [८.१.२६] इत्येष विधिर्यथा स्यात् ॥ अथ लिङ्गग्रहणं किमर्थम् । स्त्री पुमान् नपुंसकमित्यत्रापि यथा स्यात् । नैतदस्ति प्रयोजनम् । एष एवात्र प्राति-

---

(सू.४६) येथें प्रातिपदिक हा शब्द घातला आहे तो कशाकरितां ?

उच्चैः, नीचैः, येथेंही प्रथमा व्हावी म्हणून.

पण येथें प्रथमा करून काय मिळवावयाचें आहे ?

पदसंज्ञा मिळवावयाची आहे.[2]

प्रथमा करण्याचें हें फळ नाहीं. कारण तेथें षष्ठी केल्यानें पदसंज्ञा मिळवितां येईल.[3]

तर प्रातिपदिक शब्द घालण्याचें हें प्रयोजन समजावें की ग्राम उच्चैस्तव स्वम्, ग्राम उच्चैस्ते स्वम्, येथें 'सपूर्वायाः प्रथमाया विभाषा' (८।१।२६) या सूत्रानें प्रथमान्त शब्दाच्या पुढील युष्मद्, अस्मद्, या शब्दांना सांगितलेला वैकल्पिक आदेश व्हावा.

आतां येथें लिङ्ग हा शब्द घातला आहे तो कशासाठीं ?

स्त्री, पुमान्, नपुंसकम्, येथेंही प्रथमा व्हावी म्हणून.

लिङ्गशब्दाचें हें प्रयोजन होत नाहीं. कारण येथें स्त्रीलिंग, पुंलिंग, हा प्रातिपदिका-

---

१. प्रातिपदिकार्थश्च लिङ्गं च परिमाणं च वचनं च असा द्वंद्वसमास करून पुढें प्रातिपदिकार्थलिङ्ग-परिमाणवचनान्येव प्रातिपदिकार्थलिङ्गपरिमाणवचन-मात्रम् असा त्याचा मात्रशब्दाबरोबर समास केला आहे. द्वंद्वाच्या पुढें असलेल्या मात्रशब्दाचा द्वंद्वांतील प्रत्येक शब्दाकडे संबंध होतो. जें प्राति-पदिक उच्चारिलें असतां त्यापासून जो अर्थ नियमानें मनांत येतो तेवढाच तेथें प्रातिपदिकार्थ समजावा. तेव्हां असा अर्थ होतो: फक्त प्रातिपदिकार्थ च गम्यमान असेल तर प्रथमा होते; लिङ्ग हाच फक्त अर्थ अधिक असेल तर तेथेंही प्रथमा होते; परिमाण-वाचक शब्दाहून प्रथमा होते आणि संख्यावाचक शब्दाहून प्रथमा होते; उदा०— उच्चैः, नीचैः, हें प्रातिपदिकार्थमात्र याचें उदाहरण होय. उच्चैः, नीचैः, या शब्दांपासून नियमानें जो अर्थ मनांत येतो तेवढाच येथें उच्चैः, नीचैः, यापासून दाखवावयाचा आहे, त्या प्रातिपादिकार्थापेक्षां जास्त असा लिङ्ग, संख्या, कारक, यांपैकीं कोणताही अर्थ येथें दाखवावयाचा नाहीं. कृष्णः, श्रीः, ज्ञानम्, तटः, तटी, तटम्, हीं लिङ्गमात्राचीं उदाहरणें होत. येथें प्राति-पदिकार्थापेक्षां फक्त लिंग तेवढें अधिक विवक्षित आहे. द्रोणो व्रीहिः हें परिमाणमात्राचें उदाहरण होय. द्रोण या शब्दाचा परिमाण या अर्थी जेव्हां प्रयोग केला असेल तेव्हां तें लिंगमात्राचेंच उदाहरण होईल. पण जेव्हां त्या परिमाणानें मोजलेला या अर्थी व्रीहि वगैरेचें विशेषण होतो तेव्हां तो अर्थ अधिक विवक्षित असल्यामुळें लिंगमात्राचें उदाहरण होत नाहीं. त्याकरितांच येथें परिमाणग्रहण केलें आहे. एकः, द्वौ, बहवः, हीं वचनमात्राचीं उदाहरणें होत. ह्या ठिकाणीं संख्याविशेष हा प्रातिपदिकानेंच उक्त होत असल्यामुळें पुनः त्या अर्थी एकवचन, द्विवचन, वगैरे प्रत्यय होणार नाहींत. म्हणून येथें मुद्दाम वचनशब्द घातला आहे.

२. जरी उच्चैः येथें पुढील सुप्रत्ययाचा लुक् (२।४।८२) झाला तरी प्रत्ययलक्षणानें (१।१।६२) होणार आहे.

३. षष्ठी शेषे (२।३।५०) येथें शेष म्हणजे पूर्वी न सांगितलेला अर्थ होय. कारक आणि प्रातिप्रदिकार्थ हे दोन्ही पूर्वी सांगितले आहेत. पण जर येथें प्राति-पदिकार्थ शब्द घातला नाही तर तोही शेषशब्दानें घेतां येईल आणि प्रातिपदिकार्थी षष्ठी होईल.

पदिकार्थः ॥ इदं तर्हि । कुमारी वृक्षः कुण्डमिति ॥ अथ परिमाणग्रहणं किमर्थम् । द्रोणः खारी आढकमित्यत्रापि यथा स्यात् ॥ अथ वचनग्रहणं किमर्थम् । इह समुदाये वाक्यपरिसमाप्तिर्दृश्यते । तद्यथा । गर्गाः शतं दण्ड्यन्तामिति । अर्थिनश्च राजानो हिरण्येन भवन्ति न च प्रत्येकं दण्डयन्ति । सत्येतस्मिन्दृष्टान्ते यत्रैतानि समुदितानि भवन्ति तत्रैव स्यात् । द्रोणः खारी आढकमिति । इह न स्यात् । कुमारी वृक्षः कुण्डमिति । नैतदस्ति प्रयोजनम् । प्रत्येकमपि वाक्यपरिसमाप्तिर्दृश्यते । तद्यथा । वृद्धिगुणसंज्ञे प्रत्येकं भवतः ॥ इदं तर्हि प्रयोजनमुक्तेष्वप्येकत्वादिषु प्रथमा यथा स्यात् । एकः द्वौ बहव इति ॥ अथ मात्रग्रहणं किमर्थम् ।

---

र्थच होत आहे.

तर मग कुमारी, वृक्षः, कुण्डम्, हे लिङ्गशब्द घालण्याचें प्रयोजन समजावें.

आतां परिमाणशब्द घातला त्याचा काय उद्देश ?

द्रोणः, खारी, आढकम्, येथेंही प्रथमाविभक्ति व्हावी.

आतां वचन हा जो शब्द घातला आहे तो कशासाठीं ?

अनेकांना उद्देशून सांगितलेलें कार्य प्रत्येकाला निरनिराळें लागू न होतां समुदायाला मिळून लागू होतें अशाबद्दल एक लोकांतील न्याय दृष्टीस पडतो तो असाः– गर्ग नांवाच्या कुलांतील मनुष्यांना शंभर रुपये दंड केला असतां व राजे लोक द्रव्यार्थी असतांही गर्गकुलांतील प्रत्येक मनुष्याकडून शंभर केला जात नाहीं, तर सर्व गर्गांकडून मिळूनच शंभर रुपये दंड वसूल केला जातो. हा दृष्टान्त जागरूक असतां त्याप्रमाणें जेथें प्रातिपदिकार्थ, लिंग आणि परिमाण हे तीनही अर्थ गम्यमान असतील तेथेंच प्रकृत सूत्रानें प्रथमा होईल; उदा०– द्रोणः खारी आढकम्; आणि तिन्ही मिळून नसतील तेथें होणार नाहीं; उदा०– कुमारी वृक्षः काण्डम्, येथें प्रथमा होणार नाहीं.

वचनशब्द घालण्याचें हें प्रयोजन म्हणतां येत नाहीं. कारण समुदायाला उद्देशून सांगितलेल्या कार्याचा त्या समुदायांतील प्रत्येक अवयवालाही संबंध झालेला दृष्टीस पडतो; जसें:– गुणसंज्ञा अ ए ओ यांना तसेंच वृद्धिसंज्ञा आ ऐ औ यांना उद्देशून सांगितली आहे तरी ती अ ए ओ आणि आ ऐ औ या प्रत्येक वर्णाला केली आहे. या दृष्टान्तावरून प्रातिपदिकार्थादि प्रत्येकाहून प्रथमोत्पत्ति होईल.

तर मग एक, द्वौ, बहवः, येथें त्या त्या शब्दानें एकत्वादि संख्या उक्त झाली असतांही प्रथमा व्हावी हें वचनशब्द घालण्याचें

---

४. जेव्हां परिमाण, परिमेय, यांचा संबंध असल्यामुळें द्रोण, आढक, वगैरे शब्द लक्षणेनें परिमेय व्रीह्यादिक या अर्थानें वापरण्यांत येतात तेव्हां तो परिमेयार्थ त्या आढकादि शब्दांचा प्रातिपदिकार्थ होत नाहीं. तेव्हां त्याही वेळीं प्रथमा होण्याकरितां परिमाणशब्द घातला आहे.

५. येथील वचनशब्दाचा वाचक असा अर्थ आहे असें गृहीत धरून हा प्रश्न विचारला आहे. तेव्हां ज्याप्रमाणें कर्मणि द्वितीया (२।३।२) या सूत्रामध्यें वचनशब्द घातला नसून ही कर्मसंज्ञा झालेल्या पदार्थाच्या पुढें द्वितीया करतां येत नसल्यामुळें तद्वाचक शब्दाच्यापुढें द्वितीया होते, 'कर्तृकरणयोस्तृतीया' (२।३।१८) इत्यादि सूत्रामध्येंही तसेंच समजावें, त्याप्रमाणें प्रकृत सूत्रामध्येंही वचनशब्दावांचून काम भागेल असा अभिप्राय आहे.

६. वचनशब्द घातला असतां त्याचा प्रातिपदिकार्थ लिंग आणि परिमाण या प्रत्येकाशीं संबंध केल्यामुळें तीन वाक्यें होतात, आणि प्रत्येक ठिकाणीं

एतन्मात्र एव प्रथमा यथा स्यात्कर्मादिविशिष्टे मा भूदिति । कटं करोति ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । कर्मादिषु द्वितीयाद्या विभक्तयस्ताः कर्मादिविशिष्टे बाधिका भविष्यन्ति ॥ अथवाचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति न कर्मादिविशिष्टे प्रथमा भवतीति यदयं संबोधने प्रथमां शास्ति । नैतदस्ति ज्ञापकम् । अस्ति ह्यन्यदेतस्य वचने प्रयोजनम् । किम् । सामन्त्रितम् [२.३.४८] इति वक्ष्यामीति । यत्तर्हि योगविभागं करोति । इतरथा हि संबोधन आमन्त्रितमित्येव ब्रूयात् ॥ इदं तर्ह्युक्तेष्वप्येकत्वादिषु प्रथमा यथा स्यात् । एकः द्वौ बहव इति । वचनग्रहणस्याप्येतत्प्रयोजनमुक्तम् ।

---

प्रयोजन समजावें.

आतां येथें 'मात्र' हा शब्द येथें घातला आहे त्याचा काय उद्देश ?

जेथें केवळ प्रातिपदिकार्थच गम्यमान होत असेल तेथेंच प्रथमा व्हावी आणि जेथें कर्म, करण, वगैरेंनीं युक्त असा प्रातिपदिकार्थ आहे तेथें न व्हावी; उदा०— कटं करोति.

मात्र शब्द घालण्याचें हें प्रयोजन बरोबर नाहीं. कारण कर्म, करण, वगैरे अर्थी द्वितीया, तृतीया, वगैरे विभक्ति विहित आहेत.

तेव्हां जेथें कर्म वगैरे अर्थ अधिक असतील तेथें द्वितीया वगैरे त्या त्या विभक्ति प्रथमेच्या बाधक होतील.

अथवा ज्यापेक्षां हा आचार्य 'संबोधने च' (२।३।४७) या सूत्रानें संबोधनार्थी प्रथमेचें विधान करीत आहे त्यापेक्षां तो प्रातिपदिकार्थापेक्षां कर्म वगैरे जास्त अर्थ गम्यमान असतांना प्रथमा प्रवृत्त होत नाहीं असें ज्ञापन करीत आहे.

हें ज्ञापक बरोबर नाहीं. कारण संबोधनार्थी प्रथमा विधान करण्याचा निराळा उपयोग आहे.

तो कोणता ?

'सामन्त्रितम्' यानें संबोधन या अर्थी प्रथमा ज्या ठिकाणीं होते त्या ठिकाणीं त्या पदाला आमन्त्रित हें नांव ठेवावयाचें आहे. तेव्हां त्याकरितां संबोधन या अर्थी प्रथमेचें विधान केलें पाहिजे.

हा उपयोग आहे खरा, पण तेवढ्याकरितां कांहीं 'संबोधने च' हें निराळें सूत्र करून त्यानें प्रथमा सांगावयास नको. कारण मात्रग्रहण नसेल तर प्रातिपदिकार्थापेक्षां संबोधन हा अर्थ अधिक असला तरी प्रकृत सूत्रानें प्रथमा सिद्धच आहे. फक्त तसल्या प्रथमान्ताला आमन्त्रितसंज्ञा 'संबोधने आमन्त्रितम्' असें एकच सूत्र करून सांगितली म्हणजे झालें.

तर मग एकः द्वौ बहवः येथें प्रातिपदिकानें एकत्व वगैरे संख्या उक्त झाली असतांही तेथें प्रथमा व्हावी यासाठीं मात्रशब्द घातला आहे असें समजावें.

वचनशब्द घातल्याचाही हाच उपयोग सांगितला आहे ना ?

---

प्रथमा करतां येते.

७. एक, द्वि, वगैरे शब्दांचा जरी संख्या हा प्रातिपदिकार्थच आहे तरी तेथें पुनः त्या संख्येला दाखविणारे प्रत्यय वचनग्रहणाच्या जोरावर होतात.

८. तेव्हां 'संबोधने च' हें निराळें प्रथमा सांगणारें सूत्र केल्यावरून 'प्रातिपदिकार्थापेक्षां अधिक अर्थ गम्यमान असतांना प्रकृत सूत्रानें प्रथमा होत नाहीं' असें ज्ञापन होतें. म्हणून मात्रग्रहण करावयास नको.

९. मात्र या शब्दाचा अर्थ साकल्य घेतला म्हणजे यच्चयावत् प्रातिपदिकांहून प्रथमा होते असा अर्थ होतो. त्याच्या जोरावर एकत्व वगैरे संख्या प्रातिपदिकानें उक्त असली तरी प्रथमा होईल. अथवा मीयतेऽनया मात्रा अशा व्युत्पत्तीनें मात्रशब्द संख्या या अर्थाला दाखवितो. तेव्हां संख्या या अर्थी प्रथमेचें मुद्दाम निराळें विधान केलें असल्यामुळें एकत्व वगैरे संख्या उक्त असतांही प्रथमा होईल.

अन्यतरच्छक्यमकर्तुम् ॥

**प्रातिपदिकार्थलिङ्गपरिमाणवचनमात्रे प्रथमालक्षणे पदसामानाधिकरण्य उपसंख्यानमधिकत्वात् ॥१॥**

प्रातिपदिकार्थलिङ्गपरिमाणवचनमात्रे प्रथमालक्षणे पदसामानाधिकरण्य उपसंख्यानं कर्तव्यम् । वीरः पुरुषः । किं पुनः कारणं न सिध्यति । अधिकत्वात् । व्यतिरिक्तः प्रातिपदिकार्थ इति कृत्वा प्रथमा न प्राप्नोति । कथं व्यतिरिक्तः । पुरुषे वीरत्वम् ॥

**न वा वाक्यार्थत्वात् ॥ २ ॥**

न वा वक्तव्यम् । किं कारणम् । वाक्यार्थत्वात् । यदत्राधिक्यं वाक्यार्थः सः ॥

अथवाभिहिते प्रथमेत्येतल्लक्षणं करिष्यते ।

**अभिहितलक्षणायामनभिहिते प्रथमाविधिः ॥ ३ ॥**

अभिहितलक्षणायामनभिहिते प्रथमा विधेया । वृक्षः प्लक्ष इति ॥

**उक्तं वा ॥ ४ ॥**

किमुक्तम् । अस्तिर्भवन्तीपरः प्रथमपुरुषोऽप्रयुज्यमानोऽप्यस्तीति । वृक्षः

---

तर मग एका उपयोगाकरितां दोन उपायांची जरूर नसल्यामुळें वचनशब्द किंवा मात्रशब्द या उभयतांपैकीं एक कांहीं तरी काढून टाकणें शक्य आहे.

(वा.१) प्रातिपदिकार्थ लिङ्ग, परिमाण, आणि वचन एवढेच अर्थ प्रथमेच्या उत्पत्तीला निमित्त म्हणून गृहीत धरले असतां समानाधिकरण अशा 'वीरः पुरुषः' इत्यादि उदाहरणांमध्यें प्रथमाविधायक असें नवीन वचन केलें पाहिजे.

पण 'वीरः पुरुषः' वगैरे उदाहरणांमध्यें प्रथमा कां बरें होत नाहीं ?

प्रातिपदिकार्थापेक्षां येथें अधिक अर्थ मनांत येत आहे म्हणून प्रथमा होणार नाहीं.

प्रातिपदिकार्थापेक्षां अधिक मनांत येणारा अर्थ कोणता, व तो कसा बरें मनांत येतो ?

पुरुषशब्दार्थाचे ठिकाणीं वीरशब्दार्थाकडून आलेलें विशेष्यत्व हा अर्थ अधिक भासतो, आणि पुरुषशब्दार्थाकडून आलेलें वीरशब्दार्थाचे ठिकाणीं विशेषणत्व हा अर्थ अधिक मनांत येतो.

(वा.२) प्रथमाविधायक असें निराळें वचन करावयास नको.

काय कारण ?

कारण असें की प्रातिपदिकार्थापेक्षां अधिक जो विशेषणविशेष्यभाव मनांत येत आहे तो परस्परांच्या सांनिध्यामुळें मनांत येत असल्यामुळें तो वाक्याचा अर्थ आहे.

किंवा 'अभिहिते प्रथमा' असें प्रथमाविधायक सूत्र करण्यांत येईल. तिङ्, कृत्, तद्धित किंवा समास यांनीं कर्ता, कर्म, वगैरे उक्त झालें असतां तेथें प्रथमाविभक्ति होते.

(वा.३) तिङ्, कृत्, वगैरेंकडून अभिहित झालेला जो कर्ता, कर्म, वगैरे अर्थ तेथें प्रथमा होते असें प्रथमाविधायक सूत्र केलें असतां जेथें कर्ता हा अर्थ तिङ् वगैरेंकडून उक्त झाला नाहीं तेथें प्रथमा होण्याबद्दल निराळें विधान करावयास पाहिजे; उदा०– वृक्षः, प्लक्षः.

(वा.४) अथवा हें सांगितलेंच आहे.

काय सांगितलें आहे ?

जेथें इतर कोणत्याही क्रियापदाचा प्रयोग केलेला नसेल तेथें पुढें लट्प्रत्यय केलेल्या

---

१०. तेव्हां वीर या एका शब्दापासून कांहीं विशेषणत्व मनांत येत नाहीं. तसेंच पुरुष या एका शब्दापासून कांहीं त्याचें विशेष्यत्व मनांत येत नाहीं. तेव्हां त्याहून प्रकृत सूत्रानें प्रथमा होण्यास कांहींच हरकत दिसत नाहीं.

प्लक्षः । अस्तीति गम्यते ॥

**अभिहितानभिहिते प्रथमाभावः ॥५॥**

अभिहितानभिहिते प्रथमा प्राप्नोति । क । प्रासाद आस्ते । शयन आस्ते । सदिप्रत्ययेनाभिहितमधिकरणमिति कृत्वा प्रथमा प्राप्नोति ॥ एवं तर्हि तिङ्समानाधिकरणे प्रथमेत्येतल्लक्षणं करिष्यते ।

**तिङ्समानाधिकरण इति चेत्तिङोऽप्रयोगे प्रथमाविधिः ॥ ६ ॥**

तिङ्समानाधिकरण इति चेत्तिङोऽप्रयोगे प्रथमा विधेया । वृक्षः प्लक्ष इति ।

**उक्तं पूर्वेण ॥ ७ ॥**

किमुक्तम् । अस्तिर्भवन्तीपरः प्रथमपुरुषोऽप्रयुज्यमानोऽप्यस्तीति । वृक्षः प्लक्षः । अस्तीति गम्यते ॥

**शतृशानचोश्च निमित्तभावात्तिङोऽभावस्तयोरपवादत्वात् ॥ ८ ॥**

शतृशानचोश्च निमित्तभावात्तिङोऽ-

---

अशा असूधातूचा प्रयोग आहेच असें समजतें. कारण वृक्षः, प्लक्षः, असें उच्चारलें असतां त्यापासून वृक्ष आहे, प्लक्ष आहे, असा अस्ति याचा अर्थ मनांत येतो.

(वा.५) 'अभिहिते प्रथमा' असें सूत्र प्रथमाविधायक केलें असतां जेथें कर्तृत्व वगैरे एकच अर्थ अभिहित असून अनभिहितही आहे तेथें प्रथमा प्राप्त होऊं शकत नाहीं.

तेथें म्हणजे कोठें ?

प्रासादे आस्ते, शयने आस्ते, येथें. या ठिकाणीं प्रासाद हा सदिक्रियेचें अधिकरण आहे. तें सद्धातूपुढील घञ्प्रत्ययानें उक्त झालें आहे. पण आसधातूपुढील कर्ता या-अर्थी केलेल्या तिङ्प्रत्ययानें उक्त झालें नाहीं, म्हणून तेथें अधिकरणीं सप्तमी होत असते, परंतु त्या सप्तमीचा परत्वास्तव बाध करून 'अभिहिते प्रथमा' यानें प्रथमा प्राप्त होत आहे.

असें आहे तर 'तिङ्समानाधिकरणे प्रथमा' असें प्रथमाविधायक सूत्र करण्यांत येईल[११].

(वा.६) तिङ्प्रत्ययाशीं सामानाधिकरण्य ज्या कारकाचें असेल त्याहून प्रथमा होते असें विधान केलें तर जेथें तिङ्प्रत्ययाचा प्रयोग नाहीं तेथें प्रथमेचें विधान करणें भाग पडत आहे; जसें– वृक्षः, प्लक्षः.

(वा.७) याबद्दल पूर्वी सांगितलें आहे.

तें काय सांगितलें आहे ?

जेथें इतर कोणत्याही क्रियापदाचा प्रयोग केलेला नसेल तेथें पुढें लट् केलेल्या अशा असूधातूचा प्रयोग केला आहेच असें समजावें. कारण नुसतें वृक्षः, प्लक्षः, एवढेंच उच्चारलें असलें तरी तेथें वृक्ष आहे, प्लक्ष आहे, असा अस्ति याचा आहे हा अर्थ नियमानें मनांत[१२] येतो.

(वा.८) तिङाशीं सामानाधिकरण्य असतांना प्रथमा होते असें म्हटलें तर शतृ आणि शानच् (३।२।१२४) या प्रत्ययांचें निमित्त म्हणून धरलेलें जें प्रथमान्तभिन्न पदाचें सामानाधिकरण्य तें कार्यमें[१३] असल्यामुळें तिङ्प्रत्यय उत्पन्नच होऊं शकत नाहीं.

---

११. तिङ् म्हणजे क्रियापदांतील प्रत्यय. तो जर कर्ता या अर्थी केला असेल तर त्या तिङ्प्रत्ययाचें कर्त्याशीं सामानाधिकरण्य असतें म्हणून तेथें कर्त्याहून प्रथमा होते, इतराहून होत नाहीं; उदा०– देवदत्तः कटं करोति. तसेंच तो तिङ्प्रत्यय जर कर्म या अर्थी केला असेल तर त्याचें सामानाधिकरण्य कर्माशीं असतें, म्हणून तेथें कर्माहून प्रथमा होते, इतरांहून होत नाहीं; उदा०– देवदत्तेन कटः क्रियते. इतर कारकें तिङ्प्रत्ययानें कोठेंही उक्त होत नाहींत. तेव्हां अर्थातच प्रासादे आस्ते येथें प्रासाद या अधिकरणाहून प्रथमा होत नाहीं.

१२. तेव्हां त्या अस्ति या क्रियापदांतील तिङ्प्रत्ययाशीं सामानाधिकरण्य वृक्षः प्लक्षः या कर्त्यांचें असल्यामुळें प्रथमा होईल.

१३ पचत्योदनं देवदत्तः येथें पच्धातूहून लट्प्रत्यय केला असतां त्याला तिङादेश होणार

भावः । क्व । पचत्योदनं देवदत्त इति । किं कारणम् । तयोरपवादत्वात् । शतृशानचौ तिङपवादौ तौ चात्र बाधकौ न चापवादविषय उत्सर्गोऽभिनिविशते । पूर्वं ह्यपवादा अभिनिविशन्ते पश्चादुत्सर्गाः । प्रकल्प्य वापवादविषयं तत उत्सर्गोऽभिनिविशते । तन्न तावदत्र कदाचित्तिङादेशो भवत्यपवादौ तावच्छतृशानचौ प्रतीक्षते ॥ पाक्षिक एष दोषः । कतरस्मिन्पक्षे । शतृशानचोर्द्वैतं भवति । अप्रथमा वा विधिनाश्रीयते प्रथमा वा प्रतिषेधेनेति । विभक्तिनियमे चापि द्वैतं भवति । विभक्तिनियमो वा स्यादर्थनियमो वेति । तद्यदा तावदर्थनियमोऽप्रथम·

---

कोठें ?

पचत्योदनं देवदत्तः येथें.

काय कारण ?

कारण असें की शतृ शानच् हे तिङ्प्रत्ययांचे अपवाद असल्यामुळें येथें तिङ्प्रत्ययांचा बाध करून ते होतील. कारण अपवादाच्या विषयामध्यें सामान्यशास्त्र येऊं शकत नाहीं. 'प्रथमतः अपवाद प्रवृत्त होतो आणि मागून अपवादरहित स्थलीं उत्सर्ग प्रवृत्त होतो' किंवा 'अपवादाचा विषय सोडून देऊन उत्सर्ग प्रवृत्त होतो' अशी परिभाषा आहे. तेव्हां पचत्योदनं देवदत्तः येथें तिङादेश प्रवृत्त होणार नाहींत, तर आपले अपवाद असे जे शतृ शानच् त्यांचें हें स्थल असावें असें समजून त्यांची वाट पहात असतात.

हा दोष पाक्षिक आहे.[१४]

पण कोणत्या पक्षीं बरें हा दोष येत आहे ?

शतृ, शानच्, यांच्या विधानाविषयीं दोन पक्ष आहेत.

'अप्रथमा' हा पर्युदास घेऊन शतृ, शानच्, यांचा विधि हा एक पक्ष होय. या वेळीं प्रथमान्तभिन्न म्ह. द्वितीयाद्यन्ताशीं समानाधिकरण अशा लटाचे स्थानीं शतृ, शानच् हे आदेश होतात असा अर्थ होतो, व अप्रथमा हा प्रसज्यप्रतिषेध गृहीत धरून म्हणजे प्रथमान्ताचा आश्रय करून शतृ, शानच् यांचा निषेध हा दुसरा पक्ष होय. यावेळीं सामान्यतः शतृशानच् प्रत्ययाचे विधि करून नंतर प्रथमान्ताशीं समानाधिकरण अशा लटाचे स्थानीं शतृ, शानच् करूं नयेत असा त्यांचा निषेध होतो. तसेंच प्रथमा वगैरे विभक्तींच्या नियमाविषयींही दोन पक्ष आहेत. एक विभक्तिनियम[१५] व दुसरा अर्थनियम[१६]. विभक्तिनियमपक्षीं प्रातिपदिकार्थ मात्र विवक्षित असतांनाच प्रथमा होते, अन्यार्थी होत नाहीं; कर्मार्थींच द्वितीया होते, अन्यार्थी होत नाहीं, असा अर्थ होतो. अर्थनियमाच्या वेळीं प्रातिपदिकार्थ मात्र विवक्षित असतांना प्रथमाच

---

नाहींत. कारण तिङादेश झाल्यानंतर 'तिङ् समानाधिकरणे प्रथमा यानें' प्रथमा होणार आणि ती प्रथमा झाल्यानंतर शतृ, शानच्, याचें निमित्त जें प्रथमान्तभिन्नाशीं लटाचें सामानाधिकरण्य तें नष्ट होणार. तेव्हां अर्थातच तिङादेश करण्याचे पूर्वी शतृ, शानच्, यांचें निमित्त कायम असतें.

१४. तेव्हां ज्या पक्षीं दोष येत नाहीं तो पक्ष स्वीकारावा म्हणजे दोष येणार नाहीं.

१५. या वेळीं 'कर्मणि द्वितीया' याचा असा नियमाकार ठरतोः- द्वितीयाविभक्ति करणें झाल्यास कर्म या अर्थींच करावी. या नियमानें कर्म हा अर्थ अन्य विभक्ति न करण्यास बांधला जात नाहीं. द्वितीयाविभक्ति मात्र अन्य अर्थी न करण्यास बांधली जाते. म्हणून याला विभक्तिनियम म्हणतात.

१६. या वेळीं कर्म या अर्थी विभक्ति करणें झाल्यास द्वितीयाच करावी असा नियमाचा आकार ठरतो. या नियमानें द्वितीयाविभक्ति ही अन्य अर्थी न करण्याबद्दल बांधली जात नाहीं, कर्म हा अर्थ मात्र अन्य विभक्ति न करण्यास बांधला जातो, म्हणून या नियमाला अर्थनियम म्हणतात.

च विधिनाश्रीयते तदैष दोषो भवति । यदा हि विभक्तिनियमो यद्येवाप्रथमा विधिनाश्रीयतेऽथापि प्रथमा प्रतिषेधेन न तदा दोषो भवति ॥

[संबोधने च ॥२।३।४७॥

साऽऽमन्त्रितम् ॥२।३।४८।

एकवचनं संबुद्धिः ॥२।३।४९॥]

षष्ठी शेषे ॥ २ । ३ । ५० ॥

शेष इत्युच्यते कः शेषो नाम । कर्मादिभ्यो येऽन्येऽर्थाः स शेषः । यद्येवं

---

होते, इतर विभक्ति होत नाहीं; कर्मार्थी द्वितीयाच होते, इतर विभक्ति होत नाहीं असा अर्थ होतो. त्यांत जेव्हां अर्थनियम घेऊन त्याच्या जोडीला 'अप्रथमा' हा पर्युदास घेतला तेव्हां हा पूर्वोक्त[१७] दोष येतो; आणि जेव्हां विभक्तिनियम गृहीत धरून त्याच्या जोडीला 'अप्रथमा' हा पर्युदास घेतला किंवा प्रसज्यप्रतिषेध घेतला तेव्हांही पूर्वोक्त दोष येत नाहीं[१८].

(सू.५०) येथें शेषे असें म्हटलें आहे. तेथें शेषपदानें कोणता शेष घ्यावयाचा ?

कर्म वगैरेपेक्षां जो निराळा अर्थ तो येथें शेषपदानें घेतला आहे.

---

१७. अर्थनियमपक्षीं तिङ्सामानाधिकरण्य असतांना प्रथमाच होते, अनभिहित कर्म अर्थ असतांना द्वितीयाच होते, अशा प्रकारचे नियम होतात. तेव्हां पचति येथें पच्+लट् या अवस्थेंत तिङ् करण्याचे पूर्वी देवदत्ताला तिङ्सामानाधिकरण्य नाहीं व अनभिहित कर्म वगैरे कांहींच अर्थ नाहींत म्हणून कोणताच नियम लागू होत नसल्यामुळें 'स्वौजसमौट्' (४।१।२) या सामान्य शास्त्रानें देवदत्त शब्दाहून प्रथमा, द्वितीया, वगैरे सगळ्याच विभक्ति होणार आहेत. तेव्हां तेथें प्रथमान्ताशीं सामानाधिकरण्य आहे आणि प्रथमान्तभिन्न द्वितीयान्त वगैरेंशींही सामानाधिकरण्य आहे. आतां जेव्हां अप्रथमा (२।२।१२४) हा पर्युदास घेतला तेव्हां त्याला प्रथमान्ताशीं सामानाधिकरण्य असो अथवा नसो, प्रथमान्तभिन्नाशीं सामानाधिकरण्य असलें म्हणजे शतृ शानच् होणारच, म्हणून दोष येतो. प्रसज्यप्रतिषेध घेतला म्हणजे हा दोष येत नाहीं. कारण त्या पक्षीं प्रथमान्तभिन्नाशीं सामानाधिकरण्य असो किंवा नसो, प्रथमान्ताशीं सामानाधिकरण्य असलें म्हणजे शतृ-शानच्प्रत्ययांचा निषेध होणारच म्हणून दोष येत नाहीं.

१८. आतां प्रत्ययनियमपक्षीं तिङ्सामानाधिकरण्य असतांनाच प्रथमा होते, अनभिहित कर्म असतांनाच द्वितीया होते, अशा प्रकारचे नियम होतात. तेव्हां पच्+लट् या अवस्थेंत तिङ् करण्याचे पूर्वी देवदत्ताला तिङ्सामानाधिकरण्य नाहीं व अनभिहित कर्म वगैरे कांहींच अर्थ नाहींत, म्हणून कोणतीच विभक्ति प्राप्त होत नाहीं. तेव्हां च, वा, ह, येथें उत्सर्गतः प्रथमा होते अशी जी कल्पना करावी लागते त्याप्रमाणें येथें देवदत्तशब्दाहून फक्त प्रथमा त्या वेळीं होईल. तेव्हां प्रथमान्ताशींच फक्त सामानाधिकरण्य आहे, द्वितीयान्त वगैरेंशीं नाहीं. म्हणून अप्रथमा हा पर्युदास घेतला काय आणि प्रसज्यप्रतिषेध घेतला काय, त्या दोन्ही पक्षीं शतृ-शानच्प्रत्यय प्राप्त होत नाहींत; म्हणून कांहीं दोष येत नाहीं.

१. ज्याचें दुसरीकडे लक्ष आहे त्याचें आपलेकडे लक्ष लावणें याला येथें संबोधन म्हणतात. त्या संबोधन या अर्थी प्रथमा होते; उदा.-हे देवदत्त, हे देवदत्तौ, हे देवदत्ताः.

१. संबोधन या अर्थाला दाखविणारी जी प्रथमा ती शेवटीं असलेल्या शब्दाला आमन्त्रितसंज्ञा होते; उदा.- अग्ने तव. येथें अग्ने याला आमन्त्रितसंज्ञा झाल्यामुळें त्याला अविद्यमानवद्भाव (८।१।७२) झाला म्हणून तव याला 'ते' आदेश होत नाहीं.

१. संबोधन या अर्थाला दाखविणाऱ्या प्रथमेच्या एकवचनाला संबुद्धि अशी संज्ञा होते; उदा.-हे पटो, हे राम.

१. कर्म वगैरे कारक आणि प्रातिपदिकार्थ यांपेक्षां निराळा असा जो स्वस्वामिभाव वगैरे संबंध त्या अर्थी षष्ठी होते; उदा०- राज्ञः पुरुषः, पशोः पादः.

शेषो न प्रकल्पते। न हि कर्मादिभ्योऽन्येऽर्थाः सन्ति। इह तावद्राज्ञः पुरुष इति राजा कर्ता पुरुषः संप्रदानम्। वृक्षस्य शाखेति वृक्षः शाखाया अधिकरणम्। तथा यदेतत्स्वं नाम चतुर्भिरेतत्प्रकारैर्भवति क्रयणादपहरणाद्याच्ञाया विनिमयादिति। अत्र च सर्वत्र कर्मादयः सन्ति ॥ एवं तर्हि कर्मादीनामविवक्षा शेषः। कथं पुनः सतो नामाविवक्षा स्यात्। सतोऽप्यविवक्षा भवति। तद्यथा। अलोमिकैडका। अनुदरा कन्येति। असतश्च विवक्षा भवति। समुद्रः कुण्डिका। विन्ध्यो वर्धितकमिति ॥

किमर्थं पुनः शेषग्रहणम्।

**प्रत्ययावधारणाच्छेषवचनम् ॥१॥**

प्रत्ययावधारणाच्छेषग्रहणं कर्तव्यम्। प्रत्यया नियता अर्था अनियतास्तत्र षष्ठी प्राप्नोति। तत्र शेषग्रहणं कर्तव्यं षष्ठीनियमार्थम्। शेष एव षष्ठी भवति नान्यत्रेति ॥

---

असें आहे तर तो शेषपदाचा अर्थ येथें संभवतच नाहीं. कारण कर्म वगैरेंपेक्षां निराळा अर्थ मुळीं अस्तित्वांतच नाहीं. राज्ञः पुरुषः येथेंही राजा हा कर्ता आहे व पुरुष हा संप्रदान[२] आहे. वृक्षस्य शाखा येथें वृक्ष हें शाखेचें अधिकरण होय. तसेंच हें जें आपल्या मालकीचें म्हणून लोकांत म्हणतात ती मालकी विकत घेणें, युद्धांत जिंकून घेणें, प्रतिग्रह घेणें, आणि अदलाबदल करणें, या चार प्रकारांनीं उत्पन्न होते. या सर्व ठिकाणीं क्रियाकारकभावसंबंध असल्यामुळें कर्म वगैरे अर्थ आहेतच.

असें आहे तर कर्म, करण, वगैरे अर्थांची अविवक्षा करणें हा शेषपदार्थ होय.

पण जो अर्थ वस्तुतः विद्यमान आहे त्याची अविवक्षा तरी कशी बरें करतां येईल?

कां बरें? वस्तुतः असलेल्याही अर्थाची अविवक्षा होते; जसें— अलोमिका[३] एडका, अनुदरा कन्या. तसेंच नसलेल्याही अर्थाची विवक्षा करतां येते; जसें— समुद्रः कुण्डिका[४], विन्ध्यो वर्धितकम्.

आतां प्रकृत सूत्रामध्यें जो हा शेषशब्द घातला आहे त्याचा काय उद्देश?

(वा.१) प्रत्ययनियम असल्यामुळें येथें शेषे असें म्हटलें पाहिजे. कारण त्या पक्षीं करण या अर्थींच तृतीया करावी अशा रीतीनें इतर अर्थीं न करण्याविषयीं ते ते प्रत्यय बांधले जातात, अर्थ बांधले जात नाहींत. अशा स्थितींत येथें शेषशब्द नसेल तर षष्ठी अमुकच अर्थीं होते अशी बांधली गेली नसल्यामुळें कर्म वगैरे अर्थीं होऊं लागेल. ती न व्हावी म्हणून शेष या अर्थींच षष्ठी करावी, इतर अर्थीं करूं नये, असें षष्ठीचें नियमन होण्या-

---

२. क्रियेवांचून द्रव्याद्रव्यांचा संबंध संभवत नसल्यामुळें द्रव्याद्रव्यांमध्यें संबंध जोडणारीं कांहींतरी क्रिया कल्पिणें जरूर आहे. ती क्रिया म्हणजे 'राज्ञः पुरुषः' येथें दानक्रिया होय. राजा हा त्या पुरुषाला द्रव्य देत आहे; म्हणून त्या उभयतांचा संबंध आहे. तो संबंध म्हणजे राजा हा त्या दानक्रियेचा कर्ता, आणि पुरुष हा उद्देश्य-संप्रदान होय.

३. एडकी म्ह. मेंढी. त्या मेंढीला केस आहेत, परंतु ते फारच आखूड असल्यामुळें नसल्यासारखेच आहेत, या आशयानें मेंढीला अलोमिका असें म्हटलें आहे. असेंच 'अनुदरा कन्या'. येथें उदर फारच लहान आहे हें दाखविण्याकरितां उदराची अविवक्षा केली आहे.

४. कुंडी मोठी असल्यामुळें तीमध्यें उदक पुष्कळ सांठवतें, म्हणून ती वस्तुतः समुद्र नसतांही तिला समुद्राचें रूपक केलें आहे. त्याचप्रमाणें 'विन्ध्यो वर्धितकम्' येथेंही समजावें. वर्धितक म्ह. अन्नराशि. तो मोठा आहे हें दाखविण्याकरितां त्याला डोंगराचें रूपक दिलें आहे.

अर्थावधारणाद्वा ॥ २ ॥

अथवार्था नियताः प्रत्यया अनियतास्ते शेषेऽपि प्राप्नुवन्ति । तत्र शेषग्रहणं कर्तव्यं शेषनियमार्थम् । शेषे षष्ठ्येव भवति नान्या इति ॥ अर्थनियमे शेषग्रहणं शक्यमकर्तुम् । कथम् । अर्था नियताः प्रत्यया अनियताः । ततो वक्ष्यामि षष्ठी भवतीति । तन्नियमार्थं भविष्यति । यत्र षष्ठी चान्या च प्राप्नोति षष्ठ्येव तत्र भवतीति ॥

षष्ठी शेष इति चेद्विशेष्यस्य प्रतिषेधः ॥ ३ ॥

षष्ठी शेष इति चेद्विशेष्यस्य प्रतिषेधो वक्तव्यः । राज्ञः पुरुष इत्यत्र राजा विशेषणं पुरुषो विशेष्यः । तत्र प्रातिपदिकार्थो व्यतिरिक्त इति कृत्वा प्रथमा न प्राप्नोति । तत्र षष्ठी स्यात्तस्याः प्रतिषेधो वक्तव्यः ॥

तत्र प्रथमाविधिः ॥ ४ ॥

तत्र षष्ठीं प्रतिषिध्य प्रथमा विधेया । राज्ञः पुरुष इति ॥

उक्तं पूर्वेण ॥ ५ ॥

किमुक्तम् । न वा वाक्यार्थत्वादिति । यदत्राधिक्यं वाक्यार्थः सः । कुतो नु

---

करितां सूत्रामध्यें शेषशब्द घातला पाहिजे.

(वा.२) अथवा अर्थनियमपक्षीं 'कर्म या अर्थीं द्वितीयाच करावी' असे कर्म वगैरे अर्थ इतर विभक्ति न करण्याबद्दल बांधले जातात; पण द्वितीया वगैरे विभक्ति ह्या इतर अर्थीं करूं नयेत, असा नियम नसल्यामुळें शेष या अर्थींही त्या प्राप्त होत आहेत. त्या होऊं नयेत यासाठीं 'शेष या अर्थीं षष्ठीच करावी', इतर करूं नये, असें नियमन होण्याकरितां सूत्रामध्यें शेषशब्द घालणें जरूर आहे. अर्थनियमपक्षीं शेषशब्द काढून टाकणें शक्य आहे.

तें कसें ?

त्या वेळीं कर्म वगैरे अर्थ हे नियत आहेत व प्रत्यय हे नियत नाहींत. अर्थात् शेष या अर्थींही द्वितीयादिक प्रत्यय प्रसक्त होत आहेत, म्हणून शेषशब्द काढून टाकून 'षष्ठी' एवढेंच सूत्र करीन. ङ्यन्त, आबन्त आणि प्रातिपादिक यांच्यापुढें षष्ठीविभक्ति करावी असा त्याचा अर्थ होय. 'स्वौजस्' या सामान्य सूत्रानें सिद्ध असतां जें हें षष्ठीविधान केलें जात आहे तें नियमार्थ होईल. तो नियम असा:– जेथें षष्ठी आणि तीहून अन्य विभक्ति प्राप्त होते तेथें षष्ठीच करावी. अर्थात् शेष या अर्थीं द्वितीयादिकांची निवृत्ति सिद्ध होत असल्यामुळें सूत्रांतील शेषशब्दाची जरूरी नाहीं.

(वा.३) स्वस्वामिभाव वगैरे संबंध या अर्थीं षष्ठी होते असें म्हटलें असल्यामुळें विशेष्याहून षष्ठी न व्हावी यासाठीं तिचा निषेध केला पाहिजे; जसें– राज्ञः पुरुषः येथें राजा हा विशेषण व पुरुष हा विशेष्य आहे; तेव्हां पुरुषशब्दापासून प्रातिपदिकार्थ मात्रापेक्षा विशेष्यता ही अधिक भासते म्हणून तेथें प्रथमा येऊं शकत नाहीं. आणि षष्ठी येत आहे तिच्या प्रतिषेधाकरितां वचन केलें पाहिजे.

(वा.४) त्या विशेष्याचे पुढें षष्ठीचा निषेध करून प्रथमेचें विधान करावें; जसें– राज्ञः पुरुषः.

(वा.५) हें मागें (२।३।४६ वा.२) सांगितलेंच आहे.

तें काय सांगितलें आहे ?

येथें पुरुषाचे ठिकाणीं जें प्रातिपदिकार्थ-

---

५. प्रातिपदिकार्थमात्र गम्यमान असेल तरच प्रथमा करावी, असा नियम असल्यामुळें प्रातिपदिकार्थापेक्षां अतिरिक्त अर्थ असतां तेथें प्रथमा येऊं शकत नाहीं, आणि प्रातिपदिकार्थमात्र नसल्यामुळें शेषशब्दानें त्याचें ग्रहण होऊन षष्ठी होऊं लागेल.

खल्वेतत्पुरुषे यदाधिक्यं स वाक्यार्थ इति न पुना राजनि यदाधिक्यं स वाक्यार्थः स्यात् । अन्तरेणापि पुरुषशब्द-प्रयोगं राजनि सोऽर्थो गम्यते न पुन-रन्तरेण राजशब्दप्रयोगं पुरुषे सोऽर्थो गम्यते । अस्ति कारणं येनैतदेवं भवति । किं कारणम् । राजशब्दाद्धि भवान्षष्ठी-मुच्चारयति । अङ्ग हि भवान्पुरुषशब्दा-दप्युच्चारयतु गंस्यते सोऽर्थः ॥ ननु च नैतेनैवं भवितव्यम् । न हि शब्दकृतेन नामार्थेन भवितव्यम् । अर्थकृतेन नाम शब्देन भवितव्यम् । तदेतदेवं दृश्यता-मर्थरूपमेवैतदेवंजातीयकं येनात्रान्तरे-णापि पुरुषशब्दप्रयोगं राजनि सोऽर्थो गम्यते । किं पुनस्तत् । स्वामित्वम् । किं-कृतं पुनस्तत् । स्वकृतम् । तद्यथा । प्राति-पदिकार्थानां क्रियाकृता विशेषा उपजायन्ते तत्कृताश्चाख्याः प्रादुर्भवन्ति कर्म करण-मपादानं संप्रदानमधिकरणमिति । ताश्च पुनर्विभक्तीनामुत्पत्तौ कदाचिन्निमित्तत्वे-

---

मात्रापेक्षां अधिक विशेष्यत्व भासतें तें राज्ञः या पदान्तराच्या संनिधानामुळें भासतें, म्हणून तो वाक्याचा अर्थ आहे. पुरुष या प्रातिपदि-काचा तो अर्थ नव्हे.[६]

पण हें कशावरून की पुरुषाचे ठिकाणीं जें अधिक विशेष्यत्व भासतें तो वाक्याचा अर्थ होय आणि राजाचे ठिकाणीं जें अधिक विशेषणत्व भासतें तो मात्र वाक्यार्थ नव्हे ? असा फरक कां ?

तो फरक होण्याचें कारण असें की पुरुष शब्दाचा प्रयोग केल्यावांचूनही नुसत्या राज्ञः यापासून राजाचे ठिकाणीं असलेला विशेष-णत्व हा अर्थ मनांत येतो. पण राजशब्दाचा प्रयोग केल्यावांचून मात्र नुसत्या पुरुषः या शब्दापासून पुरुषाचे ठिकाणीं असलेला विशेष्यत्व हा अर्थ मनांत उतरत नाहीं. पण तसा फरक होण्याचें कारण निराळेंच आहे.

तें काय कारण ?

कारण असें की राजशब्दाच्या पुढें तूं षष्ठी उच्चारीत आहेस म्हणून तसें होत आहे. असें पहा की पुरुषशब्दाच्या पुढें तूं षष्ठी उच्चार म्हणजे पुरुषाचे ठिकाणींही विशेषणत्व हा अधिक अर्थ तुला प्रतीत होईलच.

हें म्हणणें बरोबर नाहीं. कारण शब्दाच्या अस्तित्वावर अवलंबून कांहीं नवीन अर्थ उत्पन्न होत नाहीं, तर विवक्षित असलेल्या अर्थाच्या अस्तित्वावर अवलंबून त्या अर्थाला दाखविणारा शब्द योजावयाचा असतो. तेव्हां येथें असें समजावें की या अर्थाचें स्वरूपच अशा प्रकारचें आहे की पुरुष-शब्दाचा प्रयोग केल्यावांचूनही राजाचे ठिकाणीं तो अर्थ प्रतीत होतो.

तो अर्थ कोणता ?

स्वामित्व हा होय.

आतां तें स्वामित्व कोणामुळें आलेलें आहे ?

राजाच्या मालकींतील वस्तूमुळें; जसें प्रातिपदिकांच्या अर्थांना क्रियेमुळें कांहीं एक विशेषाचा संबंध जडतो, व त्या जडलेल्या विशेषामुळें प्रातिपदिकाच्या अर्थाला कर्ता, कर्म, करण, संप्रदान, अपादान व अधिकरण हीं नांवें मिळतात, आणि तीं नांवें प्रातिपदिका-हून ती ती विभक्ति उत्पन्न होण्याविषयीं कदा-

---

६. तेव्हां पुरुष या प्रातिपादिकाच्या पुढें अंत-रंगत्वास्तव प्रथमतः प्रातिपदिकार्थीं प्रथमा केली. नंतर राज्ञः या पदाच्या सांनिध्यामुळें येणारें विशे-ष्यत्व हें मागाहून येणारें असल्यामुळें तें बहिरंग आहे. तेव्हां पूर्वीं झालेल्या प्रथमेला बहिरंग आधिक्य हें परत फिरवूं शकत नाहीं.

७. तेव्हां पुरुषः येथीलप्रमाणें राज्ञः येथेंही प्रथमाच प्राप्त होत आहे.

८. तसें राजाच्या अंगीं वस्तुतः असलेलें स्वामि-त्व कोठें षष्ठी होण्याला कारणीभूत होते आणि कोठें

नोपादीयन्ते कदाचिन्न । कदा च विभक्तीनामुत्पत्तौ निमित्तत्वेनोपादीयन्ते । यदा व्यभिचरन्ति प्रातिपदिकार्थम् । यदा हि न व्यभिचरन्त्याख्याभूता एव तदा भवन्ति कर्म करणमपादानं संप्रदानमधिकरणमिति ॥ यथैव तर्हि राजनि स्वकृतं स्वामित्वं तत्र षष्ठ्येवं पुरुषेऽपि स्वामिकृतं स्वत्वं तत्र षष्ठी प्राप्नोति । राजशब्दादुत्पद्यमानया षष्ठ्याभिहितः सोऽर्थ इति कृत्वा पुरुषशब्दात्षष्ठी न भविष्यति ॥ न तर्हीदानीमिदं भवति पुरुषस्य राजेति । भवति राजशब्दात्तु तदा प्रथमा ॥ न तर्हीदानीमिदं भवति राज्ञः पुरुषस्येति । भवति बाह्यमर्थम-

चित् कारण होतात व कदाचित् होत नाहींत.

तीं कर्म, करण, वगैरे नांवें केव्हां बरें विभक्तीच्या उत्पत्तीविषयीं कारण होतात ?

जेव्हां क्रियेमुळें त्या त्या पदार्थावरील घडलेला कर्ता, कर्म, वगैरे विशेष स्पष्ट करून दाखवावयाचा असतो तेव्हां तो विशेष प्रातिपदिकार्थापेक्षां निराळा भासतो. म्हणून तीं नांवें त्या वेळीं विभक्तींच्या उत्पत्तीला कारण होतात. आणि जेव्हां तो विशेष स्पष्ट करून दाखवावयाचा नसतो तेव्हां तो प्रातिपदिकार्थापेक्षां निराळा असा भासत नाहीं, तर त्या त्या पदार्थांमध्यें अन्तर्भूत असा प्रातिपदिकार्थस्वरूपच असतो. त्या वेळीं त्या प्रातिपदिकार्थामध्यें असलेल्या त्या शक्ति फक्त कर्ता, कर्म, करण, संप्रदान, अपादान व अधिकरण या नांवांनीं दाखवितां येतात; विभक्तींच्या उत्पत्तीला त्या कारण होऊं शकत नाहींत.

तर मग जसें स्वमुळें राजाचे ठिकाणीं स्वामित्वसंबंध असल्यामुळें तेथें षष्ठी होते तसें पुरुषाचे ठिकाणींही स्वामीमुळें स्वत्वसंबंध असल्यामुळें तेथेंही षष्ठी प्रसक्त होत आहे.

राजशब्दाच्या पुढें उत्पन्न झालेल्या षष्ठीनेंच पुरुषावरीलही संबंध दाखविला गेला असल्यामुळें पुरुषशब्दाच्या पुढें षष्ठी होणार नाहीं.

तर मग आतां पुरुषस्य राजा अशी पुरुषशब्दाच्या पुढें षष्ठी होतच नाहीं कीं काय ?

पुरुषशब्दाच्या पुढें षष्ठी होते; मात्र त्या वेळीं राजशब्दाच्या पुढें प्रथमा होते.

तर मग आतां राज्ञः पुरुषस्य अशी दोन्ही ठिकाणीं षष्ठी होतच नाहीं काय ?

दोन्ही ठिकाणींही षष्ठी होते, पण त्या वेळीं पुरुषाला राजापेक्षां निराळा बाहेरचा घट वगैरे

---

होत नाहीं.

९. वृक्ष, प्लक्ष, वगैरे प्रत्येक पदार्थ आपल्या योग्यतेप्रमाणें अनेक क्रियांचा वस्तुतः कर्ता असतो. तसेंच कर्म, करण, वगैरेही असतो. याप्रमाणें त्या त्या पदार्थांमध्यें वस्तुतः अस्तित्वांत असलेल्या कर्ता, कर्म, वगैरे सर्व शक्ति त्या त्या पदार्थाच्या स्वरूपामध्येंच अन्तर्भूत होऊन लीन झाल्या असल्यामुळें प्रातिपदिकार्थमात्रापेक्षां निराळ्या स्वरूपांत भासत नाहींत. त्यामुळें तेथें त्या त्या कारकशक्तीला दाखविणारी ती ती विभक्ति होत नाहीं. प्रातिपदिकार्थमात्रीं प्रथमाच होते. तसें योग्यतेप्रमाणें असलेल्या त्या त्या शक्तीला अनुसरून होणारा जो क्रियेशीं संबंध तो न दाखवितां कर्ता, कर्म, वगैरे नांवानेंच फक्त ती शक्ति दाखवावयाची असली तरी तेथें प्रथमाच होते; उदा०— वृक्षः कर्ता, वृक्षः कर्म वगैरे. आतां जेव्हां वृक्ष वगैरे पदार्थांचा क्रियेशीं संबंध सांगून एखादी शक्ति विशेष रीतीनें स्पष्ट करून दाखविणें असेल तेव्हां मात्र त्या त्या कारकशक्तीप्रमाणें त्या त्या विभक्ति होतात.

१०. तात्पर्य, एका संबंधामुळें त्या संबंधाचें संबंधी जें विशेष्य आणि विशेषण हे दोन पदार्थ त्या दोन्ही ठिकाणीं षष्ठी होत नाहीं, तर विशेषणाहूनच होते. आतां तें विशेष्य जर दुसऱ्या कोणाचें विशेषण झालें असेल तर त्या निराळ्या संबंधामुळें त्याहूनही विशेषण म्हणून षष्ठी होईल.

भिसमीक्ष्य ॥

[ज्ञोऽविदर्थस्य करणे ॥२।३।६१॥]

अधीगर्थदयेशां कर्माणि २॥३।५२

कर्मादिष्वकर्मकवद्वचनम् ॥ १ ॥

कर्मादिष्वकर्मकवद्भावो वक्तव्यः । किं प्रयोजनम् । अकर्मकाणां भावे लो भवतीति भावे लो यथा स्यात् । मातुः स्मर्यते । पितुः स्मर्यते ॥ अथ वत्करणं किमर्थम् । स्वाश्रयमपि यथा स्यात् । माता स्मर्यते । पिता स्मर्यत इति ॥

कर्माभिधाने हि लिङ्गवचनानुपपत्तिः ॥ २ ॥

कर्माभिधाने हि सति लिङ्गवचनयोरनुपपत्तिः स्यात् । मातुः स्मृतम् । मात्रोः स्मृतम् । मातॄणां स्मृतमिति । मातुर्यल्लिङ्गं वचनं च तत्स्मृतशब्दस्यापि प्राप्नोति ॥

षष्ठीप्रसङ्गश्च ॥ ३ ॥

षष्ठी च प्राप्नोति । कुतः । स्मृतशब्दात् । मातुः सामानाधिकरण्यात्षष्ठी प्राप्नोति ॥

---

अर्थ विशेष्य घेतला म्हणजे होते.

(सू.५२, वा.१) 'अधीगर्थ०' या सूत्राला आरंभ करून 'प्रेष्यब्रुवो०' या सूत्रापर्यंतच्या सूत्रांनीं ज्या धातूंच्या कर्माहून षष्ठी सांगितली आहे ते धातु अकर्मकांसारखे समजावेत असें म्हणावें.

याचें काय प्रयोजन ?

अकर्मक धातूंहून भाव या अर्थी सांगितलेला लकार या धातूंहून झाला पाहिजे; जसें– मातुः स्मर्यते, पितुः स्मर्यते.

आतां या वचनामध्यें अकर्मकवत् असा वत्प्रत्यय घातला आहे त्याचा काय उपयोग ?

उपयोग असा की वस्तुतः तो धातु सकर्मक असल्यामुळें सकर्मकामुळें होणारें कार्यही झालें पाहिजे; जसें– माता स्मर्यते, पिता स्मर्यते.

(वा.२) जर हे धातु अकर्मकांसारखे समजावेत असें म्हटलें नाहीं तर या धातूंच्या पुढें भावेप्रत्यय होणार नाहीं. कर्मणि केला तर त्या क्तप्रत्ययानें कर्म हा अर्थ दाखविला जाईल. तेव्हां मातुः स्मृतं, मात्रोः स्मृतं, मातॄणां स्मृतम्, येथें मातृशब्दानें जो अर्थ दाखविला गेला तोच अर्थ स्मृतशब्दानेंही दाखविला असल्यामुळें मातृशब्दाचें जें लिङ्ग किंवा वचन तें स्मृतशब्दालाही लागू करण्याचा प्रसंग प्राप्त होत आहे.

(वा.३) शिवाय षष्ठीविभक्ति करण्याचीही पाळी येत आहे.

कोणाच्या पुढें ?

स्मृतशब्दाच्या पुढें. कारण स्मृतशब्दानें माताच दाखविली जात असल्यामुळें मातुः वस्त्रम् जेथें जशी वस्त्रामुळें मातृशब्दाच्या पुढें षष्ठी झाली आहे तशी स्मृतशब्दाच्या पुढेंही ती प्राप्त होते.

---

१. ज्ञान या अर्थापेक्षां इतर अर्थाचा जो ज्ञाधातु त्याच्या करणाहून षष्ठी होते, परंतु तें करण या नात्यानें न दाखवितां फक्त शेष म्ह. केवळ संबंधी या नात्यानें दाखविणें असेल तर; उदा० सर्पिषो ज्ञानम्. 'तुपाच्या संबंधानें प्रवृत्ति' असा याचा अर्थ आहे. येथें प्रवृत्तीचें वस्तुतः तूप हें करण आहे.

१. स्मरण या अर्थाला दाखविणारे धातु, तसेंच दय आणि ईश, या धातूंच्या कर्माहून षष्ठी होते, पण तें कर्म शेष या नात्यानें दाखवावयाचें असलें पाहिजे; उदा० मातुः स्मरणम्, सर्पिषो दयनम् ईशनम् वा.

२. स्मृधातु हा मूळचा सकर्मक आहे. तो 'अकर्मक समजावा' असें वचन केलें तर त्या वचनाच्या जोरावर मूळचा सकर्मक असूनही सकर्मक समजतां येणार नाहीं. कारण सकर्मक आणि अकर्मक यांमध्यें विरोध आहे. आतां 'अकर्मकासारखा समजावा' असें वचन केलें तर स्मृधातु मूळचा सकर्मक असल्यामुळें सकर्मक असेंही समजतां येतें. कारण सकर्मक आणि 'अकर्मकासारखा' यांमध्यें विरोध नाहीं. तेव्हां सकर्मक असल्यामुळें माता स्मर्यते असा कर्मणिप्रयोग करतां येतो.

अपर आह । षष्ठीप्रसङ्गश्च । षष्ठी च प्रसङ्क्तव्या । कुतः । मातृशब्दात् । स्मृतशब्देनाभिहितं कर्मेति कृत्वा षष्ठी न प्राप्नोति ॥

तर्त्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । अविवक्षिते कर्मणि षष्ठी भवति । किं वक्तव्यमेतत् । न हि । कथमनुच्यमानं गंस्यते । शेष इति वर्तते । शेषश्च कः । कर्मादीनामविवक्षा शेषः । यदा कर्म विवक्षितं भवति तदा षष्ठी न भवति । तद्यथा । स्मराम्यहं मातरम् । स्मराम्यहं पितरमिति ॥

## [कृञः प्रतियत्ने ॥२।३।५३॥]

## रुजार्थानां भाववचनानामज्वरेः ॥ २ । ३ । ५४ ॥

अज्वरिसंताप्योरिति वक्तव्यम् । इहापि यथा स्यात् । चौरं संतापयति । वृषलं संतापयति ॥ अथ किमर्थं भाववचनानामित्युच्यते यावता रुजार्था भाववचना एव भवन्ति । भावकर्तृकाद्यथा स्यात् ।

---

अन्य कोणी एक वैयाकरण असें म्हणतोः—

शिवाय षष्ठी होते असें सांगावें लागणार आहे.

कोणत्या शब्दापुढें ?

मातृशब्दाच्या पुढें. कारण स्मृतशब्दातील क्तप्रत्ययानें कर्म हा अर्थ अभिहित झाल्यामुळें षष्ठी येऊं शकत नाहीं.

तर मग एकंदरींत 'हे धातु अकर्मकासारखे समजावेत' असें वचन केलें पाहिजे.

तसें वचन करावयास नको. कारण कर्माची कर्म या रूपानें अविवक्षा केली असतांनाच ही प्रकृत सूत्रानें षष्ठी होत असते.

तर मग तसें स्पष्ट सांगितलें पाहिजे ना ?

स्पष्ट सांगावयास नको.

तर मग सांगितल्यावांचून कशावरून वरें हा अर्थ समजला जाणार आहे ?

शेषे हें पद अनुवृत्त येत आहे.

शेषशब्दाचा अर्थ काय ?

कर्मादिक अर्थांची विवक्षा न करणें हाच शेषशब्दाचा अर्थ होय.

ज्या वेळीं कर्म हा अर्थ अविवक्षित असतो त्या वेळीं षष्ठी होतच नाहीं; जसें— स्मराम्यहं मातरम्, स्मराम्यहं पितरम्.

(सू. ५४) अज्वरिसंताप्योः. म्ह. अज्वरेः याच्या ऐवजीं 'अज्वरिसंताप्योः' असा शब्द घालावा. कारण चोरं संतापयति, वृषलं संतापयति, येथें षष्ठी न होतां कर्माहून द्वितीया झाली पाहिजे.

आतां येथें भाववचनानाम् असें जें म्हटलें आहे तें कशाकरितां ? कारण भाववचन म्हणजे क्रियावाचक होत, आणि रुजार्थक जे धातु ते क्रियावाचक आहेतच.

अशाकरितां म्हटलें आहे की जेथें रुजार्थक धातूंचा भाव हाच कर्ता आहे तेथेंच षष्ठी व्हावी व नदीकूलानि रुजति येथें न व्हावी.

---

३. तेव्हां मातुः स्मृतम् इत्यादि भावेप्रयोग होण्याकरितां प्रथम वार्तिक केलें पाहिजे असें सिद्ध झालें.

१. कृञ्धातूच्या कर्माहून षष्ठी होते पण त्या कर्माची कर्मत्वानें अविवक्षा करून शेषत्वानें विवक्षा केली पाहिजे; तसेंच गुणाचें आधान हा अर्थ गम्यमान असला पाहिजे; उदा० एध दकस्य उपस्कुरुते. अस्तित्वांत आलेल्या वस्तूचे ठिकाणीं कांहीं एक गुण उत्पन्न करणें हें गुणाचें आधान होय; जसें:— आंबा आढींत घालून त्याचे ठिकाणीं मऊपणा, पिवळेपणा, उत्पन्न करणें.

१. ज्वरधातूखेरीज इतर जे पीडा या अर्थाचे धातु त्यांच्या कर्माहून षष्ठी होते. पण त्या कर्माची कर्मत्वानें अविवक्षा करून शेषत्वानें विवक्षा केली असली पाहिजे आणि त्या धातूचा कर्ता भाववाचक शब्दानें दाखविला असला पाहिजे; उदा०— चौरस्य रोगस्य रुजा.

२. ज्यांचा कर्ता भावप्रत्ययान्त शब्दानें दाख-

इह मा भूत् । नदी कूलानि रुजतीति ॥

**[आशिषि नाथः ॥२।३।५५॥**

**जासिनिप्रहणनाटक्राथपिषां हिंसायाम् ॥२।३।५६॥**

**व्यवहृपणोः समर्थयोः ॥२।३।५७॥**

**दिवस्तदर्थस्य ॥२।३।५८**

**विभाषोपसर्गे ॥२।३।५९॥]**

**द्वितीया ब्राह्मणे ॥२।३।६०॥**

किमुदाहरणम् । गां घ्नन्ति गां प्रदीव्यन्ति गां सभासद्भ्य उपहरन्ति । नैतदस्ति । पूर्वेणाप्येतत्सिद्धम् ॥ इदं तर्हि । गामस्य तदहः सभायां दीव्येयुः ॥

**प्रेष्यब्रुवोर्हविषो देवतासंप्रदाने ॥ २ । ३ । ६१ ॥**

**हविषोऽप्रस्थितस्य ॥ १ ॥**

हविषोऽप्रस्थितस्येति वक्तव्यम् । इन्द्राग्निभ्यां छागं हविर्वपां मेदः प्रस्थितं

---

(सू.६०) या सूत्राचें उदाहरण काय ?

गां निघ्नन्ति, गां प्रदीव्यन्ति, गां सभासद्भ्य उपहरन्ति.

हीं या प्रकृत सूत्राचीं उदाहरणें होत नाहींत. कारण 'विभाषोपसर्गे' या पूर्वसूत्रानेंही तेथें द्वितीया साधत आहे.

तर मग 'गामस्य तदहः सभायां दीव्येयुः' हें उदाहरण समजावें.

(सू.६१,वा.१) प्रस्थित हें हवीला विशेषण लाविलें असेल तर तेथें षष्ठी होत नाहीं असें म्हणावें; जसें– इन्द्राग्निभ्यां छागं हविर्वपां मेदः प्रस्थितं प्रेष्य.

---

विला आहे असा 'भाववचन' शब्दाचा अर्थ आहे. येथें नदी हा कर्ता तसा नाहीं. म्हणून षष्ठी होत नाहीं.

१.(५५). इच्छा या अर्थाच्या नाथधातूच्या कर्माहून षष्ठी होते; पण त्या कर्माची कर्मत्वानें अविवक्षा करून शेषत्वानें विवक्षा केली असली पाहिजे; उदा०– सर्पिषो नाथनम्.

(५६). जासि, निपूर्वक किंवा प्रपूर्वक अथवा निप्रपूर्वक हन्, नाट, क्राथ आणि पिष् हे जे हिंसा या अर्थाचे धातु त्यांच्या कर्माहून षष्ठी होते, पण त्या कर्मांची कर्मत्वानें अविवक्षा करून शेषत्वानें विवक्षा केली असली पाहिजे; उदा०– चौरस्योज्जासनम्.

(५७) वि, अव, एतत्पूर्वक हृधातु आणि पणधातु यांच्या कर्माहून षष्ठी होते, मात्र त्या कर्मांची कर्मत्वानें अविवक्षा करून शेषत्वानें विवक्षा केली असली पाहिजे आणि अक्षक्रीडा किंवा क्रयविक्रयव्यवहार हा त्या धातूंचा अर्थ असला पाहिजे; उदा०– शतस्य व्यवहरणं पणनं वा.

(५८). अक्षक्रीडा किंवा क्रयविक्रयव्यवहार या अर्थाचा जो दिवधातु त्याच्या कर्माहून षष्ठी होते उदा०– शतस्य दीव्यति.

(५९). पूर्वसूत्राचा विषय असतांना जर त्या धातूच्या मागें उपसर्ग असेल तर त्याच्या कर्माहून विकल्पानें षष्ठी होते; उदा०– शतस्य शतं वा प्रतिदीव्यति.

१. दिवस्तदर्थस्य या सूत्राचा विषय असतांना दिव्धातूच्या कर्माहून द्वितीया होते; मात्र वेदभागापैकीं ब्राह्मणग्रंथांतील तो प्रयोग असला पाहिजे; उदा०– गामस्य तदहः सभायां दीव्येयुः

२. कारण ह्या उदाहरणामध्यें धातूच्या मागें उपसर्ग दृष्टीस पडत आहे, आणि 'विभाषोपसर्गे' या सूत्रानें विकल्पानें षष्ठी सांगितली असल्यामुळें षष्ठीच्या अभावपक्षीं 'कर्मणि द्वितीया' यानेंच द्वितीया सिद्ध होत आहे. आतां एकदा षष्ठी प्राप्त होते खरी, पण तसा प्रयोग ब्राह्मणग्रन्थांत नाहीं.

३. येथें दिवधातु उपसर्गरहित असल्यामुळें 'विभाषोपसर्गे' याची प्राप्ति येत नाहीं. तेव्हां 'दिवस्तदर्थस्य' यानें नित्य षष्ठी येत आहे, तिचा बाध करून प्रकृत सूत्रानें येथें द्वितीया झाली आहे.

१. देवता हें ज्या क्रियेचें संप्रदान आहे त्या क्रियेचीं वाचक अशीं जीं प्रेष्य किंवा ब्रूहि हीं क्रियापदें त्यांचें जें हविर्द्रव्यरूपी कर्म तद्वाचक शब्दाहून षष्ठी होते; उदा०– अग्नये छागस्य हविषो वपाया मेदसः प्रेष्य अनुब्रूहि वा.

प्रेष्य ॥

**चतुर्थ्यर्थे बहुलं छन्दसि ॥२।३।६२**

**षष्ठ्यर्थे चतुर्थीवचनम् ॥ १ ॥**

षष्ठ्यर्थे चतुर्थी वक्तव्या । या खर्वेण पिबति तस्यै खर्वस्तिस्रो रात्रिः । तस्या इति प्राप्ते । यस्ततो जायते सोऽभिशस्तो यामरण्ये तस्यै स्तेनो यां पराचीं तस्यै ह्रीतमुख्यपगल्भो या स्नाति तस्या अप्सु मारुको याभ्यङ्क्ते तस्यै दुश्चर्मा या प्रलिखते तस्यै खलतिरपमारी याङ्क्ते तस्यै काणो या दतो धावते तस्यै श्यावदन्या नखानि निकृन्तते तस्यै कुनखी या कृणत्ति तस्यै क्लीबो या रज्जुं सृजति तस्या उद्बन्धुको या पर्णेन पिबति तस्या उन्मादुको जायते । अहल्यायै जारः । मनाय्यै तन्तुः ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । योगविभागात्सिद्धम् । चतुर्थी । ततोऽर्थे बहुलं छन्दसीति ॥

**[यजेश्च करणे ॥ २ । ३ । ६३॥**

**कृत्वोऽर्थप्रयोगे कालेऽधिकरणे ॥ २ । ३ । ६४ ॥ ]**

**कर्तृकर्मणोः कृति ॥ २ । ३ । ६५ ॥**

कृद्ग्रहणं किमर्थम् । इह मा भूत् । पचत्योदनं देवदत्त इति ।

**कर्तृकर्मणोः षष्ठीविधाने कृद्ग्रहणानर्थक्यं लप्रतिषेधात् ॥ १ ॥**

---

(सू.६२,वा.१) षष्ठीच्या अर्थाला दाखविणारी चतुर्थी होते असें वचन करावें; जसें:– या खर्वेण पिबति तस्यै खर्वो इत्यादि.

तर मग तें षष्ठ्यर्थी चतुर्थीचें विधान करावयास पाहिजे.

विधान करावयास नको. कारण 'चतुर्थी' असा योगविभाग केल्यानें साधत आहे. चतुर्थीच्या अर्थाला दाखविणारी षष्ठी होते, असा त्याचा अर्थ. त्याचे पुढें 'अर्थे बहुलं छन्दसि' असें दुसरें सूत्र समजावें.

(सू.६५) येथें 'कृति' हा शब्द घातला आहे तो कशाकरितां ?

पचत्योदनं देवदत्तः येथें तिङन्तापासून मनांत येणाऱ्या क्रियेच्या कर्त्याहून आणि कर्माहून षष्ठी न झाली पाहिजे म्हणून घातला आहे.

(वा.१) कर्ता आणि कर्म यांहून षष्ठी सांगणाऱ्या या प्रकृत सूत्रामध्यें जो कृति हा

---

१. वेदामध्यें चतुर्थीच्या अर्थी षष्ठी होते, बाहुल्येंकरून; उदा०–पुरुषमृगश्चन्द्रमसे गोधा कालकादार्वाघाटस्ते वनस्पतीनाम्.

२. तैत्तिरीयसंहिता कांड २ प्रपाठक ५ अनुवाक १ मध्यें हीं वाक्यें आहेत. त्यांमध्यें तस्यै ही चतुर्थी तस्याः या अर्थाची आहे. रजस्वला स्त्रियांनीं कसें वागावें तें येथें सांगितलें आहे. खर्वेण म्ह. भाजलेल्या थाळ्यानें. खर्व म्ह. वामन. मलवद्वासस् म्ह. रजस्वला. संभवन्ति म्ह. रत होतात. अभिशस्त म्ह. जनापवादयुक्त. अरण्ये या पदापुढें मलवद्वाससं संभवन्ति या पदांचा संबंध होतो. पराची म्ह. पराङ्मुखी. ह्रीतमुखी म्ह. लाजाळू. अपगल्भ म्ह. अधीर. मारुक म्ह. मरणशील. दुश्चर्मा म्ह. कुष्ठी. खलति म्ह. केशरहित. अपमारी म्ह. दुर्मरणयुक्त. श्यावदन् म्ह. मळकट दातांचा. कृणत्ति म्ह. तृणच्छेद करते. उद्बन्धुक म्ह. गळफास लागून मरणारा.

१. तसेंच वेदामध्यें यज्धातूच्या करणाहून बाहुल्येंकरून षष्ठी होते; उदा० घृतस्य घृतेन वा यजते.

१. कृत्वसुच्प्रत्ययाच्या अर्थाला दाखविणारा प्रत्यय शेवटीं असलेल्या शब्दाचा प्रयोग असतांना कालवाचक अधिकरणाहून षष्ठी होते. पण त्या अधिकरणाची अधिकरण या रूपानें अविवक्षा करून शेषत्वानें विवक्षा केली असली पाहिजे; उदा०– पञ्चकृत्वोऽह्नो भोजनम्, द्विरह्नो भोजनम्.

१. कृत्नावाचा प्रत्यय शेवटीं असलेल्या शब्दाचा प्रयोग असतां त्या शब्दापासून मनांत येणाऱ्या क्रियेचा जो अनुक्त कर्ता किंवा कर्म त्याहून षष्ठी होते; उदा०–कृष्णस्य कृतिः, जगतः कर्ता कृष्णः.

कर्तृकर्मणोः षष्ठीविधाने कृद्ग्रहणमनर्थकम्। किं कारणम्। लप्रतिषेधात्। प्रतिषिध्यते तत्र षष्ठी लप्रयोगेनेति॥

तस्य कर्मकर्त्रर्थं तर्हि कृद्ग्रहणं कर्तव्यम्। कृतो ये कर्तृकर्मणी तत्र यथा स्यादन्यस्य ये कर्तृकर्मणी तत्र मा भूदिति। नैतदस्ति प्रयोजनम्। धातोर्हि द्वये प्रत्यया विधीयन्ते तिङश्च कृतश्च। तत्र कृत्प्रयोग इष्यते तिङ्प्रयोगे प्रतिषिध्यते॥ न ब्रूम इहार्थं तस्य कर्मकर्त्रर्थं कृद्ग्रहणं कर्तव्यमिति। किं तर्हि। उत्तरार्थम्। अव्ययप्रयोगे नेति षष्ठ्याः प्रतिषेधं वक्ष्यति स कृतोऽव्ययस्य ये कर्तृकर्मणी तत्र यथा स्यादकृतोऽव्ययस्य ये कर्तृकर्मणी तत्र मा भूदिति। उच्चैः कटानां स्रष्टेति।

**तस्य कर्मकर्त्रर्थमिति चेत्प्रतिषेधेऽपि तदन्तकर्मकर्तृत्वात्सिद्धम्॥२॥**

कृत एते कर्तृकर्मणी नाव्ययस्य। अधिकरणमत्राव्ययम्॥

इदं तर्हि प्रयोजनम्। उभयप्राप्तौ कर्मणि षष्ठ्याः प्रतिषेधं वक्ष्यति स

---

शब्द घातला आहे त्याचा उपयोग होत नाहीं.

काय कारण ?

कारण असें की 'न लोका०' (२।३।६९) या सूत्रानें लादेशाचा प्रयोग केला असतां या षष्ठीचा निषेध केला आहे.

तर मग कर्तृ, कर्म, यांना विशेषण लावण्याकरितां म्हणून 'कृति' हा शब्द सूत्रांत घातला पाहिजे; म्हणजे कृत्प्रत्यय ज्या क्रियावाचकाहून केला असेल त्या क्रियेचा जो कर्ता किंवा कर्म तेथें षष्ठी व्हावी आणि इतराचा जो कर्ता किंवा कर्म तेथें न व्हावी म्हणून.

यासाठीं कृद्ग्रहण करावयास नको. कारण येथें कर्ता किंवा कर्म या अर्थी षष्ठी सांगितली आहे. कर्ता किंवा कर्म हें नांव क्रियेमुळेंच मिळत असतें व ती क्रिया धातुच दाखवितात. त्या धातूंचे पुढें दोन तऱ्हेचे प्रत्यय करावयास सांगितले आहेत. एक तिङ् नांवाचे व दुसरे कृत् नांवाचे. त्यांत कृत्प्रत्यय असेल तेथें षष्ठी होणें इष्ट आहे. आणि तिङ्प्रत्यय असेल तेथें षष्ठीचा 'न लोका०' यानें निषेध केला जात आहे.

प्रकृत सूत्रामध्यें कर्तृकर्माला विशेषण लावण्याकरितां कृद्ग्रहण केलें पाहिजे असें आम्ही म्हणत नाहीं.

तर मग काय म्हणत आहांत ?

पुढील सूत्रामध्यें अव्ययाला विशेषण लागू करण्याकरितां कृद्ग्रहण पाहिजे असें म्हणत आहोंत. म्हणजे 'न लोकाव्यय०' या सूत्रानें अव्ययाचा प्रयोग केला असतां तेथें षष्ठी करूं नये असा निषेध पुढें सांगितला आहे. तो निषेध कृदन्त अव्ययानें दाखविलेल्या क्रियेचा जो कर्ता किंवा कर्म तेथेंच व्हावा आणि इतर अव्ययाचा जो कर्ता किंवा कर्म तेथें म्हणजे उच्चैः कटानां स्रष्टा येथें निषेध न व्हावा म्हणून.

(वा.२) कृदन्त अव्ययाचें जें कर्म किंवा कर्ता असा अर्थ होण्याकरितां कृद्ग्रहण केलें पाहिजे असें म्हणणें असेल तर अव्ययाचें जें कर्म किंवा कर्ता असा अर्थ केला म्हणजे कृदन्त अव्ययच घेतलें जाईल. उच्चैः कटानां स्रष्टा इत्यादि उदाहरणांमध्यें कृत्प्रत्ययान्तानें दाखविलेल्या क्रियेचेंच कट वगैरे हें कर्म व कर्ता आहेत; उच्चैः वगैरे अव्ययाचे नव्हेत. अव्यय हें येथें अधिकरण आहे.

तर मग कृद्ग्रहणाचें हें प्रयोजन समजावें की 'उभयप्राप्तौ कर्मणि' या पुढील सूत्रानें कर्त्याहून जो षष्ठीचा प्रतिषेध सांगितला आहे तो एकाच कृदन्ताचा जो कर्ता आणि कर्म तेथेंच व्हावा; दोन कृदन्तांचा जो कर्ता आणि कर्म तेथें न व्हावा; जसें:— आश्चर्यमिदं

कृतो ये कर्तृकर्मणी तत्र यथा स्यात्क्तयोर्ये कर्तृकर्मणी तत्र मा भूदिति। आश्चर्यमिदं वृत्तमोदनस्य च नाम पाको ब्राह्मणानां च प्रादुर्भाव इति। अथ क्रियमाणेऽपि कृद्ग्रहणे कस्मादेवात्र न भवति। उभयप्राप्ताविति नैवं विज्ञायत उभयोः प्राप्तिरुभयप्राप्तिः उभयप्राप्ताविति। कथं तर्हि। उभयोः प्राप्तिर्यस्मिन्कृति सोऽयमुभयप्राप्तिः कृत् उभयप्राप्ताविति ॥

अथवा कृतो ये कर्तृकर्मणी तत्र यथा स्यात्ताद्धितस्य ये कर्तृकर्मणी तत्र मा भूदिति। कृतपूर्वी कटम्। भुक्तपूर्व्योदनमिति ॥ ननु च वाक्येनैवानेन न भवितव्यम्। द्वितीयया तावन्न भवितव्यम्। किं कारणम्। क्तेनाभिहितं कर्मेति कृत्वा। इनिप्रत्ययेन चापि नोत्पत्तव्यम्। किं कारणम्। असामर्थ्यात्। कथमसामर्थ्यम्। सापेक्षमसमर्थं भवतीति ॥ यत्तावदुच्यते द्वितीयया तावन्न भवितव्यम् किं कारणम् क्तेनाभिहितं

---

वृत्तमोदनस्य च नाम पाको ब्राह्मणानां च प्रादुर्भाव इति.

आतां कृद्ग्रहण केलें असतांही कां बरें वरील उदाहरणांमध्यें षष्ठीचा निषेध होत नाहीं ?

'उभयप्राप्तौ' हा उभयोः प्राप्तिः उभयप्राप्तिः तस्याम् उभयप्राप्तौ असा तत्पुरुष समजूं नये. तर उभयोः प्राप्तिर्यस्मिन् कृति स उभयप्राप्तिः कृत्प्रत्ययः तस्मिन्नुभयप्राप्तौ असा बहुव्रीहि करून तें कृति याचें विशेषण समजावें.

अथवा फक्त कृत्प्रत्यय केला असतांनाच कर्त्याहून किंवा कर्माहून षष्ठी झाली पाहिजे. तद्धितप्रत्यय अधिक केला असतां तेथें होऊं नये असा कृति याचा उपयोग समजावा; जसें– कृतपूर्वी कटम्, भुक्तपूर्वी ओदनम्.

पण 'कृतपूर्वी कटम्' अशा तऱ्हेचें वाक्यच बनूं शकत नाहीं. अगोदर त्यांत कटम् येथें द्वितीया येऊं शकत नाहीं.

काय कारण ?

कारण असें की येथील क्तप्रत्ययानें कर्म उक्त झालें आहे.

तसेंच कृतपूर्वी येथें इनिप्रत्ययही उत्पन्न होऊं शकत नाहीं.

काय कारण ?

कारण असें की सामर्थ्य नाहीं. अन्याविषयीं साकांक्ष असलेला अर्थ सामर्थ्यरहित असतो म्हणून.

आतां कटम् येथें द्वितीया येऊं शकत नाहीं. काय कारण ? कृत येथील क्तप्रत्ययानें कर्म हा अर्थ उक्त झाला आहे म्हणून, असें जें

---

२. कृधातु सकर्मक आहे तरी कर्माची अविवक्षा करून अकर्मक समजून भावे क्तप्रत्यय केला आहे. त्या कृतशब्दाबरोबर पूर्वं या क्रियाविशेषणाचा पूर्वं कृतं कृतपूर्वम् असा 'सुपा' (२।१।४) या सूत्रानें समास होतो. नंतर 'पूर्वादिनिः' 'सपूर्वाच्च' (५।२।८६-८७) यानें 'अनेन' या अर्थी इनि हा तद्धितप्रत्यय झाला आहे. नंतर कर्माची विवक्षा करून कटाचा संबंध केला आहे. येथें इनिप्रत्ययानें कर्ता उक्त आहे. कर्म मात्र कोणीही उक्त नाहीं. तेव्हां तेथें षष्ठी होऊं लागेल, त्याकरितां कृति हा शब्द घातला आहे.

३. क्तप्रत्यय भावे केला आहे हें मनांत न धरतां ही शंका केली आहे. तेव्हां द्वितीया येऊं शकत नसल्यामुळें तिची अपवादभूत षष्ठीही येऊं शकत नाहीं; कारण येथेंही अनभिहिते हा अधिकार आहेच.

४. कृतः पूर्वं कटोऽनेन अशी आरंभींच कर्माची विवक्षा केली असतां कृतशब्द विशेष्यभूत कटाविषयीं सापेक्ष आहे म्हणून तद्धितप्रत्ययही येऊं शकत नाहीं.

कर्मेति कृत्वेति। योऽसौ कृतकटयोरभिसंबन्धः स उत्पन्ने प्रत्यये निवर्तते। अस्ति च करोतेः कटेन सामर्थ्यमिति कृत्वा द्वितीया भविष्यति। यदप्युच्यत इनिप्रत्ययेन चापि नोत्पत्तव्यम् किं कारणम् असामर्थ्यात् कथमसामर्थ्यम् सापेक्षमसमर्थं भवतीति। नेदमुभयं युगपद्भवति वाक्यं च प्रत्ययश्च। यदा वाक्यं न तदा प्रत्ययः। यदा प्रत्ययः सामान्येन तदा वृत्तिस्तत्रावश्यं विशेषार्थिना विशेषोऽनुप्रयोक्तव्यः। कृतपूर्वी। किम्। कटम्। भुक्तपूर्वी। किम्। ओदनमिति॥

अथवेदं प्रयोजनं कर्तृभूतपूर्वमात्रादपि षष्ठी यथा स्यात्। भेदिका देवदत्तस्य यज्ञदत्तस्य काष्ठानामिति॥

## उभयप्राप्तौ कर्मणि ॥२।३।६६॥

**उभयप्राप्तौ कर्मणि षष्ठ्याः प्रतिषेधेऽकादिप्रयोगेऽप्रतिषेधः ॥१॥**

उभयप्राप्तौ कर्मणि षष्ठ्याः प्रतिषेधेऽ-

---

म्हटलें आहे त्याचें उत्तरः— कृतः कटोऽनेन या वाक्यामध्यें जो हा कृत आणि कट या उभयतांचा संबंध दिसतो तो वृत्तीमध्यें तद्धित इनिप्रत्यय केला असतां निवृत्त होतो[५]. नंतर त्या करोतिक्रियेला कर्माविषयीं आकांक्षा असल्यामुळें कर्माची विवक्षा केली असतां करोतिक्रियेचें कट हें कर्म होतें म्हणून तेथें द्वितीया होण्यास अडचण पडत नाहीं.

आणखीही जें म्हटलें आहे की "इनिप्रत्ययही उत्पन्न होऊं शकत नाहीं. काय कारण ? सामर्थ्य नाहीं. तें सामर्थ्य कां बरें नाहीं ? दुसऱ्या अर्थाविषयीं साकांक्ष असलेला अर्थ सामर्थ्यरहित असतो म्हणून" त्यावर उत्तरः— पूर्वं कृतः कटः अनेन हें वाक्य आणि कृतपूर्वी ही इनिप्रत्यय करून तद्धितवृत्ति या दोन गोष्टी एका कालीं करतां येत नाहींत. जेव्हां वाक्य विवक्षित असेल तेव्हां इनिप्रत्यय नाहीं व जेव्हां इनिप्रत्यय करावयाचा विवक्षित असेल तेव्हां कर्माची अविवक्षा करून अकर्मक झाल्यामुळें भावार्थक क्तप्रत्ययान्ताशीं वृत्ति करावयाची. तशी तद्धित वृत्ति केल्यानंतर मागून ज्याला विशेष रूपानें कर्म जाणण्याची इच्छा असेल त्यानें त्या विशेष कर्माचा प्रयोग करावा; जसें— कृतपूर्वी किम् ? म्ह. पूर्वी काय करता झाला ? उत्तर— कटम्. भुक्तपूर्वी किम् ? उत्तर— ओदनम्.

अथवा कृति या पदाचा उपयोग असा समजावा की जो पूर्वी मुख्यत्वानें कर्ता होता तो पुढें मुख्यत्वानें कर्ता नसला तरी त्याहून षष्ठी व्हावी; जसें— भेदिका देवदत्तस्य यज्ञदत्तस्य काष्ठानाम्[६].

(सू. ६६, वा. १) कर्ता आणि कर्म या उभ-

---

५. तेव्हां वाक्यामध्यें जरी कृधातूहून क्तप्रत्यय कर्म या अर्थीं झाला आहे तरी वृत्तीमध्यें तो भाव या अर्थींच केला आहे.

६. याचें असें तात्पर्यः— करोतीति कृत् या व्युत्पत्तीनें 'कृत्' हा शब्द कर्ता या अर्थाला दाखवितो. तेव्हां सूत्रांतील 'कृति' या पदानें कर्ता या अर्थीं पुनः षष्ठीचें विधान केलें जातें. त्यामुळें अप्रधान अशाही कर्त्याहून षष्ठी करतां येते. भेदिका येथें तोडणें या अर्थाचा भिद्धातू आहे. त्याहून णिच्प्रत्यय (३।१।२६) करून पुढें ण्वुल्प्रत्यय (३।३।१११) केला आहे. भिद्धातूचा कर्ता यज्ञदत्त आहे आणि काष्ठ हें कर्म आहे. पुढें णिच्प्रत्यय केल्यानंतर देवदत्त हा प्रयोजक कर्ता मुख्य कर्ता समजला जातो. आणि यज्ञदत्त हा प्रयोज्य कर्ता असल्यामुळें तो अमुख्य समजला जातो. तेव्हां अर्थातच तेथें 'कर्तृकर्मणोः' या प्रकृत सूत्रानें प्रधान कर्तृवाचकाहूनच षष्ठी होईल आणि अप्रधान कर्तृवाचकाहून होणार नाहीं. आणि 'कृति' या पदानें कर्तृवाचकाहून पुनः षष्ठीचें विधान केलें म्हणजे त्याच्या जोरावर अप्रधान कर्तृवाचकाहूनही षष्ठी होते.

१. एकाच वाक्यामध्यें एकाच क्रियेच्या कर्त्या-

कादिप्रयोगे प्रतिषेधो न भवतीति वक्तव्यम् । भेदिका देवदत्तस्य काष्ठानाम् । चिकीर्षा विष्णुमित्रस्य कटस्य ॥

अपर आह । अकाकारयोः प्रयोगे प्रतिषेधो नेति वक्तव्यं शेषे विभाषा । शोभना खलु पाणिनेः सूत्रस्य कृतिः । शोभना खलु पाणिनिना सूत्रस्य कृतिः । शोभना खलु दाक्षायणस्य संग्रहस्य कृतिः । शोभना खलु दाक्षायणेन संग्रहस्य कृतिरिति ॥

## क्तस्य च वर्तमाने ॥२।३।६७॥

### क्तस्य च वर्तमाने नपुंसके भाव उपसंख्यानम् ॥१॥

क्तस्य च वर्तमाने नपुंसके भाव उपसंख्यानं कर्तव्यम् । छात्त्रस्य हसितम् । नटस्य भुक्तम् । मयूरस्य नृत्तम् । कोकिलस्य व्याहृतमिति ॥

### शेषविज्ञानात्सिद्धम् ॥२॥

शेषलक्षणात्र षष्ठी भविष्यति । शेष इत्युच्यते कश्च शेषः । कर्मादीनाम-

---

यतांहून षष्ठी प्राप्त झाली असतां तेथें कर्तृवाचकाहून जो षष्ठीचा प्रतिषेध केला जात आहे तो अक किंवा अ या कृत्प्रत्ययाचा प्रयोग असेल तेथें लागू होत नाहीं असें वचन करावें; जसें– भेदिका[२] देवदत्तस्य काष्ठानाम्, चिकीर्षा विष्णुमित्रस्य कटस्य.

अन्य एक वैयाकरण म्हणतो—

अक किंवा अकार प्रत्यय शेवटीं असलेल्या कृदन्ताचा प्रयोग असतां तेथें कर्तृवाचकाहून षष्ठीचा प्रतिषेध होत नाहीं.

अक आणि अकार यांहून अन्य कृत्प्रत्यय शेवटीं असलेल्या शब्दाचा प्रयोग असतां तेथ 'उभयप्राप्तौ' हा षष्ठीचा प्रतिषेध विकल्पानें होतो; जसें:– शोभना खलु पाणिनेः सूत्रस्य कृतिः[३], शोभना खलु पाणिनिना सूत्रस्य कृतिः; शोभना खलु दाक्षायणस्य संग्रहस्य कृतिः, शोभना खलु दाक्षायणेन संग्रहस्य कृतिः.

(सू.६७, वा.१) वर्तमानकालाला दाखविणारा क्तप्रत्यय शेवटीं असलेल्या शब्दाचा योग असतांना जी ही षष्ठी सांगितली आहे तेथें भावे क्तप्रत्यय शेवटीं असलेल्या नपुंसकलिंगी शब्दाचा प्रयोग असतांना षष्ठी होते असें वचन करावें; जसें– छात्त्रस्य हसितम्, नटस्य भुक्तम्, मयूरस्य नृत्तम्, कोकिलस्य व्याहृतम्.

तर मग तसें वचन केलें पाहिजे.

तसें वचन करावयास नको.

(वा.२) वरील उदाहरणांमध्यें कर्त्याची कर्तृत्वानें अविवक्षा करून शेषत्वानें विवक्षा केली असतां तेथें 'षष्ठी शेषे' (२।३।५०) ही षष्ठी होईल.

पण तेथें शेषे असें म्हटलें आहे. तो शेष

---

हून आणि कर्मांहून पूर्वसूत्रानें षष्ठी प्राप्त झाली असतां तेथें कर्मांहूनच षष्ठी करावी, कर्त्यांहून षष्ठी करूं नये; उदा०– आश्चर्यो गवां दोहोऽगोपेन.

२. भेदिका येथें ण्वुच्-(३।३।१११)प्रत्ययाला अक आदेश (७।१।१), टाप्प्रत्यय (४।१।४), अक यांतील प्रथम अकाराला ह्रस्व इकार आदेश (७।३।४४) झाला आहे. येथें अकप्रत्यय शेवटीं असलेल्या भेदिका या शब्दाचा प्रयोग असल्यामुळें 'उभयप्राप्तौ' हा कर्त्याहून षष्ठीचा निषेध येत नाहीं. सबब कर्ता व कर्म या दोन्हीही ठिकाणीं षष्ठी झाली आहे. तसेंच चिकीर्षा येथें चिकीर्ष या सन्प्रत्ययान्त धातूहून अप्रत्यय (३।३।१०२) झाला आहे.

३. कृधातूहून क्तिन् (३।३।९४) प्रत्यय झाला आहे. येथें पाणिनि हा कर्ता व सूत्र हें कर्म. सूत्राबद्दलची पाणिनीची कृति फार चांगली आहे असा या वाक्याचा अर्थ आहे. येथें अक व अकार यांहून व्यतिरिक्त क्तिन्प्रत्यय शेवटीं असलेल्या कृदन्ताचा प्रयोग आहे. त्यामुळें पाणिनि या कर्त्याहून षष्ठीचा विकल्प होऊन एकदा तृतीया केली आहे.

१. वर्तमानकालाला दाखविणारा क्तप्रत्यय शेवटीं असलेल्या शब्दाचा प्रयोग असेल तेथें कर्तृवाचकाहून षष्ठी होते: राज्ञां मतो बुद्धः पूजितो वा. 'न लोकाव्ययनिष्ठा०' (२।३।६९) या निषेधाचा हा अपवाद सांगितला आहे,

विवक्षा शेषः। कथं पुनः सतो नामाविवक्षा स्याद्यदा छात्रो हसति नटो भुङ्क्ते मयूरो नृत्यति कोकिलो व्याहरति। सतोऽप्यविवक्षा भवति। तद्यथा अलोमिकैडका। अनुदरा कन्येति। असतश्च विवक्षा। समुद्रः कुण्डिका। विन्ध्यो वर्धितकमिति॥ यद्येवमुत्तरत्र चातुःशब्द्यं प्राप्नोति। इदमहेः सृप्तम्। इहाहिना सृप्तम्। इहाहिः सृप्तः। इहाहेः सृप्तं ग्रामस्य पार्श्वे ग्रामस्य मध्य इति। इष्यत एव चातुःशब्द्यम्॥

[अधिकरणवाचिनश्च॥२।३।६८॥][1]

न लोकाव्ययनिष्ठाखलर्थतृनाम् ॥२।३।६९॥

लादेशे सल्लिङ्ग्रहणं किकिनोः प्रतिषेधार्थम्॥१॥

---

येथें कसा म्हणतां येईल ?

कर्म, कर्ता, वगैरेंची त्या त्या विशेष रूपांनीं अविवक्षा केली असतां शेष म्हणतां येतें.

पण वस्तुतः असलेल्या अर्थांची अविवक्षा कशी बरें होऊं शकेल? कारण छात्र, कोकिल, वगैरे हे प्रत्यक्ष हसन वगैरे ती ती क्रिया करीत असल्यामुळें कर्ते आहेत.

वस्तुतः[2] असलेल्याही अर्थांची अविवक्षा दिसते; जसें– अलोमिका एडका, अनुदरा कन्या. तसेंच वस्तुतः नसलेल्याही अर्थांची विवक्षा दृष्टीस पडते; जसें– समुद्रः कुण्डिका, विन्ध्यो वर्धितकम्.

कर्ता, कर्म, वगैरेंची त्या त्या विशेषरूपानें अविवक्षा केली असतां तेथें शेषे षष्ठी होत असेल तर 'अधिकरणवाचिनश्च' या पुढील सूत्राच्या उदाहरणांमध्यें चार तऱ्हेचे प्रयोग प्राप्त होऊं लागतील; जसें:– इदमहेः[3] सृप्तम्, इहाहिना सृप्तम्, इहाहिः सृप्तः, इहाहेः सृप्तम्, ग्रामस्य पार्श्वे, ग्रामस्य मध्ये.

असे चार तऱ्हेचे प्रयोग होणें हें आम्हांला इष्टच आहे.

(सू.६९, वा.१) सूत्रांतील लशब्द काढून

---

२. कर्म वगैरे अर्थांची अविवक्षा केली असतां तेथें तो अर्थ विशेषपदानें घेतां येतो असें मागें (२।३।५०) सांगितलें आहे तेथें हीं उदाहरणें दिलीं आहेत.

३. ज्यांत कालाचा निर्देश नाहीं अशा 'नपुंसके भावे क्तः' (३।३।१४) या सूत्रानें सांगितलेला क्तप्रत्यय शेवटीं असलेल्या शब्दाचा योग असतां षष्ठी होते असें वार्तिककाराचें मत आहे. त्यामुळें अहिना सृप्तम् येथें भूतकालीं केलेला नपुंसकलिंगी भावार्थक क्तप्रत्यय शेवटीं असलेल्या शब्दाचा योग असतां 'कर्तृकर्मणोः' या सूत्रानें आलेल्या षष्ठीचा 'न लोका०' यानें निषेध झाल्यामुळें 'कर्तृकरण०' (२।३।१८) या सूत्रानें कर्तृवाचकापुढें तृतीया सिद्ध होते. 'क्तोऽधिकरणे च०' (३।४।७६) या सूत्रानें अधिकरण, कर्ता व भाव या अर्थीं क्तप्रत्यय सांगितला आहे. तेव्हां अधिकरण या अर्थीं क्तप्रत्यय केला म्हणजे 'इदमहेः सृप्तम्' असा प्रयोग होतो. 'ही सापाची सरपटण्याची जागा' असा त्याचा अर्थ आहे. भाव या अर्थीं क्तप्रत्यय केला म्हणजे 'इहाहिना सृप्तम्' असा प्रयोग होतो. 'ह्या ठिकाणीं सापानें केलेलें सरपटणें आहे', असा त्याचा अर्थ आहे. कर्ता या अर्थीं क्तप्रत्यय केला म्हणजे 'इहाहिः सृप्तः' असा प्रयोग होतो. येथें सरपटणारा साप असा त्याचा अर्थ होतो. आणि भावे क्तप्रत्यय करूनच अहि याची कर्तृत्वानें अविवक्षा करून शेषे षष्ठी केली असतां इहाहेः सृप्तम् असा प्रयोग होतो. 'येथें सापाचें सरपटणें आहे' असा याचा अर्थ आहे.

१. अधिकरण या अर्थाला दाखविणारा क्तप्रत्यय (३।४।७६) शेवटीं असलेल्या शब्दाचा योग असतां कर्त्याहून आणि कर्माहून षष्ठी होते; उदा० इदमेषामासितं शयितं गतं भुक्तं वा.

१. लादेश, उ, उक, अव्यय, निष्ठा, खलर्थ, आणि तृन् या शब्दांचा प्रयोग असतांना कर्त्याहून आणि कर्माहून षष्ठी होत नाहीं; उदा०– कुर्वन् कुर्वाणो वा सृष्टिं हरिः, हरिं दिदृक्षुः.

लादेशे सल्लिड्ग्रहणं कर्तव्यम् । सल्लिटोः प्रयोगे नेति वक्तव्यम् । किं प्रयोजनम् । किकिनोः प्रतिषेधार्थम् । किकिनोरपि प्रयोगे प्रतिषेधो यथा स्यात् । पपिः सोमं ददिर्गाः ॥ किं पुनः कारणं न सिध्यति ।

तयोरलादेशत्वात् ॥ २ ॥

न हि तौ लादेशौ ॥ अथ तौ लादेशौ स्यातां स्यात्प्रतिषेधः । बाढं स्यात् । लादेशौ तर्हि भविष्यतः । तत्कथम् । आदृगमहनजनः किकिनौ लिट् च [३.२.१७१] इति लिड्वदिति वक्ष्यामि । स तर्हि वतिनिर्देशः कर्तव्यो न ह्यन्तरेण वतिमतिदेशो गम्यते । अन्तरेणापि वतिमतिदेशो गम्यते । तद्यथा । एष ब्रह्मदत्तः । अब्रह्मदत्तं ब्रह्मदत्त इत्याह ते मन्यामहे ब्रह्मदत्तवदयं भवतीति । एवमिहाप्यलिटं लिडित्याह लिड्वदिति विज्ञास्यते ॥

उकारप्रयोगे नेति वक्तव्यम् । कटं चिकीर्षुः । ओदनं बुभुक्षुः ॥ तत्तर्हि

---

टाकून त्याचे ऐवजीं 'सल्लिट्' हा शब्द घालावा म्हणजे शतृ, शानच्, कानच्, कसु, कि, आणि किन् हे प्रत्यय शेवटीं असलेल्या शब्दांचा प्रयोग असतांना कर्तृकर्मवाचकाहून षष्ठी होत नाहीं असें वचन करावें.

असें करण्याचें काय प्रयोजन ?

कि किंवा किन्प्रत्यय शेवटीं असलेल्या शब्दांचा प्रयोग असतां तेथें षष्ठीचा निषेध झाला पाहिजे; जसें– पपिः सोमम्, ददिर्गाः.[२]

पण सूत्रांत लशब्द घातला असतां कि, किन्, ह्या प्रत्ययांच्या प्रयोगामध्यें षष्ठीचा निषेध कां बरें होऊं शकत नाहीं ?

(वा.२) कि आणि किन् हे लकाराचे आदेश नव्हेत म्हणून.

आतां जर कि व किन् हे लकाराचे आदेश गृहीत धरले तर त्यांच्या प्रयोगांमध्यें लग्रहणानेंच षष्ठीचा निषेध होईल काय ?

होय. खात्रीनें होईल.

तर मग कि आणि किन् हे लकाराचे आदेश समजतां येतील.

ते कसे ?

आदन्त, ऋदन्त, गम, हन व जन या धातूंच्या पुढें कि किंवा किन् असे प्रत्यय होतात, आणि ते कि-किन्प्रत्यय लिड्वत् म्हणजे लिट्प्रत्ययासारखे समजावेत, अशी 'आदृगमहन०' या सूत्राची व्याख्या करण्यांत येईल.

तर मग लिट्प्रत्ययासारखा असा अर्थ होण्याकरितां लिट्शब्दाचे पुढें वत्प्रत्यय घातला पाहिजे. कारण वत्प्रत्ययाशिवाय तसा अतिदेश मानतां येणार नाहीं.

वत्प्रत्यय घातल्यावांचूनही लिट्पदाची लिड्वत् अशी व्याख्या करतां येईल; जसें– हा मैत्र ब्रह्मदत्त आहे. येथें मैत्र हा ब्रह्मदत्त नसतां ज्यापेक्षां त्या मैत्राला ब्रह्मदत्त असें नांव दिलें जातें त्यापेक्षां तो मैत्र ब्रह्मदत्तासारखा आहे असें समजण्यांत येतें; त्याप्रमाणें येथेंही वत्प्रत्यय घातला नसतांही लिट्पदाचा अर्थ लिटासारखा असा समजला जाईल.

उकारान्त प्रत्यय शेवटीं असलेल्या शब्दाचा प्रयोग असतां तेथें 'कर्तृकर्मणोः कृति' यानें प्राप्त झालेली षष्ठी होत नाहीं असें वचन करावें; जसें– कटं चिकीर्षुः,[३] ओदनं बुभुक्षुः.

---

२. पाधातूहून 'आदृगमहन०' (३।२।१७१) या सूत्रानें कि किंवा किन्प्रत्यय, लिड्वत् असा अतिदेश केला असल्यामुळें द्वित्व, 'आतो लोप इटि च' (६।४।६४) यानें आकारलोप. असेंच ददिः हें दाधातूचें समजावें.

३. चिकीर्ष या सन्प्रत्ययान्त कृधातूहून 'सनाशंसभिक्ष उः' (३।२।१६८) यानें उकारप्रत्यय. असेंच बुभुक्षुः येथेंही समजावें.

वक्तव्यम्। न वक्तव्यम्। उकारोऽप्यत्र निर्दिश्यते। कथम्। प्रश्लिष्टनिर्देशोऽयम्। उ उक ऊक ल ऊक लोकेति ॥

**उकप्रतिषेधे कमेर्भाषायामप्रतिषेधः॥३**

उकप्रतिषेधे कमेर्भाषायां प्रतिषेधो न भवतीति वक्तव्यम्। दास्याः कामुकः। वृषल्याः कामुकः॥

**अव्ययप्रतिषेधे तोसुन्कसुनोरप्रतिषेधः॥ ४ ॥**

अव्ययप्रतिषेधे तोसुन्कसुनोः प्रतिषेधो न भवतीति वक्तव्यम्। पुरा सूर्यस्योदेतोराधेयः। पुरा वत्सानामपाकर्तोः। पुरा क्रूरस्य विसृपो विरप्शिन्॥

**शानंश्चानश्शतॄणामुपसंख्यानम् ॥५॥**

शानंश्चानश्शतॄणामुपसंख्यानं कर्तव्यम्। सोमं पवमानः। नडमाघ्नानः। अधीयन्पारायणम्। लप्रयोगे नेति प्रतिषेधो न प्राप्नोति। मा भूदेवं तृन्नित्येवं भविष्यति। कथम्। तृन्निति नेदं प्रत्ययग्रहणम्। किं तर्हि। प्रत्याहारग्रहणम्। क्व संनिविष्टानां प्रत्याहारः। लटः शत्रित्यतः प्रभृत्या तृनो नकारात्॥ यदि

---

तर मग तसें वचन केलें पाहिजे.

तसें वचन करावयास नको. कारण या सूत्रामध्यें उकाराचाही निर्देश केला आहे.

तो उकाराचा निर्देश कसा बरें केला आहे?

उ _ उक=ऊक. ल – ऊक=लोक असा हा प्रश्लिष्टनिर्देश आहे.

(वा.३) उकप्रत्यय शेवटीं असलेल्या शब्दाचा प्रयोग असतांना जो हा षष्ठीचा निषेध केला आहे तेथें कम्‌धातूहून उकप्रत्यय (३।२।१३४) करून त्याचा प्रयोग केला असतां भाषेमध्यें षष्ठीचा प्रतिषेध होत नाहीं असें वचन करावें; जसें– दास्याः कामुकः, वृषल्याः कामुकः.

(वा.४) अव्ययांचा योग असतांना जो षष्ठीचा निषेध केला आहे तेथें तोसुन् किंवा कसुन्प्रत्यय शेवटीं असलेल्या अव्ययाचा प्रयोग असतां षष्ठीचा प्रतिषेध होत नाहीं असें वचन करावें; जसें– पुरा सूर्यस्योदेतोराधेयः, पुरा वत्सानामपाकर्तोः, पुरा क्रूरस्य विसृपो विरप्शिन्.

(वा.५) शानन् (३।२।१२८), चानश् (३।२।१२९) आणि शतृ (३।२।१३०) हे प्रत्यय शेवटीं असलेल्या शब्दांचा प्रयोग असतां कर्मवाचकाहून षष्ठी होत नाहीं असें वचन करावें; जसें– सोमं पवमानः, नटमाघ्नानः, अधीयन् पारायणम्. हे तीन प्रत्यय लादेश नसल्यामुळें तेथें 'लप्रयोगे' हा षष्ठीनिषेध येऊं शकत नाहीं.

सदर प्रत्यय लादेश नसल्यामुळें लग्रहणानें षष्ठीनिषेध न होवो, पण तृन्ग्रहणानें तेथें षष्ठी निषेध होईल.

तो कसा?

सूत्रामध्यें तृन् या पदानें तृन्प्रत्ययाचें ग्रहण केलेलें नाहीं तर काय?

तृशब्दापासून नकारापर्यंत असलेला प्रत्याहार या तृन्पदानें दाखविला आहे.

कोठें उच्चारलेल्या तृशब्दापासून कोठें उच्चारलेल्या नकारापर्यंत हा प्रत्याहार समजावयाचा?

'लटः शतृ०' (३।२।१२४) येथील तृशब्दाला आरंभ करून 'तृन्' (३।२।१३५) येथील नकारापर्यंत. अर्थात् यांमध्यें सांपडलेल्या सर्व प्रत्ययांचें ह्या प्रत्याहारामध्यें ग्रहण होत आहे.

जर तृन् हा प्रत्याहार आहे तर चोरस्य

---

४. उदेतोः येथें उद्‌उपसर्गपूर्वक इण्धातूहून तोसुन्प्रत्यय (३।४।१६), धातूला गुण आणि अव्ययसंज्ञा (१।१।४०) झाली आहे. अपकर्तोः येथें अप-उपसर्गपूर्वक कृधातूहून तोसुन्प्रत्यय झाला आहे. विसृपः येथें कसुन्प्रत्यय (३।४।१७) झाला आहे. कित्त्व असल्यामुळें लघूपधगुण होत नाहीं.

प्रत्याहारग्रहणं चौरस्य द्विषन् वृषलस्य द्विषन् अत्रापि प्राप्नोति ।

## द्विषः शतुर्वावचनम् ॥ ६ ॥

द्विषः शतुर्वेति वक्तव्यम् । तच्चावश्यं वक्तव्यं प्रत्ययग्रहणे सति प्रतिषेधार्थम् । तदेव प्रत्याहारग्रहणे सति विध्यर्थं भविष्यति ॥

## अकेनोर्भविष्यदाधमर्ण्ययोः ॥ २ । ३ । ७० ॥

## अकस्य भविष्यति ॥ १ ॥

अकस्य भविष्यतीति वक्तव्यम् । यवाँल्लावको व्रजति । ओदनं भोजको व्रजति । सक्तून्पायको व्रजति ॥

## इन आधमर्ण्ये च ॥ २ ॥

तत इन आधमर्ण्ये च भविष्यति चेति वक्तव्यम् । शतं दायी । सहस्रं दायी । ग्रामं गमी ॥

## कृत्यानां कर्तरि वा ॥ २।३।७१ ॥

कर्तृग्रहणं किमर्थम् । कर्मणि मा भूदिति । नैतदस्ति प्रयोजनम् । भावकर्म-

---

द्विषन्[५] येथें षष्ठीचा निषेध प्राप्त होत आहे.

(वा.६) द्विषधातूहून शतृप्रत्यय केला असेल तेथें षष्ठीचा निषेध विकल्पानें होतो असें वचन करावें. हें वचन अवश्य केलेंच पाहिजे. कारण 'तृन्' हा प्रत्याहार न घेतां प्रत्ययच घेतला त्या वेळीं चोरस्य द्विषन् येथें शतृप्रत्यय हा लादेश नसल्यामुळें 'कर्तृकर्मणोः कृति' यानें षष्ठी नित्य प्राप्त झाली असतां एकदा तिच्या निषेधासाठीं प्रकृत वचन करणें जरूर आहे, तेंच आतां म्हणजे तृन् हा प्रत्याहार घेतला त्या वेळीं चोरस्य द्विषन् येथें नित्य षष्ठीनिषेध प्राप्त झाला असतां एकदा षष्ठी होण्याकरितां उपयोगीं पडेल.

(सू.७०, वा.१) अकप्रत्ययान्ताचा प्रयोग असतांना जो हा षष्ठीचा निषेध सांगितला आहे तो फक्त भविष्यकाळ गम्यमान असतांनाच होतो असें म्हणावें; जसें:— यवान् लावको व्रजति, ओदनं भोजको व्रजति.

(वा.२) तसेंच इन्प्रत्ययान्ताचा प्रयोग असतांना जो हा षष्ठीचा निषेध सांगितला आहे तो भविष्यकाळ गम्यमान असतांना किंवा आधमर्ण्य अर्थ गम्यमान असतांना होतो असें म्हणावें; जसें:— शतं दायी[३], सहस्रं दायी, ग्रामं गमी[४].

(सू.७१) येथें कर्तरिशब्द घातला आहे तो कशाकरितां ?

कर्माहून ही षष्ठी न व्हावी म्हणून घातला आहे.

हे कर्तृशब्द घालण्याचें प्रयोजन होत नाहीं. कारण भाव किंवा कर्म या अर्थाला दाख-

---

५. 'द्विषोऽमित्रे' (३।२।१३१) या सूत्रानें येथें शतृप्रत्यय झाला आहे. हा शतृप्रत्यय लादेश नाहीं, तरी पण तृन्प्रत्याहारांत सांपडत आहे.

१. भविष्यकाळ या अर्थाला दाखविणारा अक (ण्वुल्) प्रत्यय, आणि भविष्यकाळ किंवा आधमर्ण्य या अर्थाला दाखविणारा इनिप्रत्यय शेवटीं असलेल्या शब्दाचा प्रयोग असतांना तेथें षष्ठी होत नाहीं; उदा०— सतः पालकोऽवतरति, व्रजं गामी, शतं दायी.

२. 'तुमुन्ण्वुलौ०'(३।३।१०) यानें ण्वुल्प्रत्यय भविष्यकालीं सांगितला आहे.

३. येथें 'आवश्यकाधमर्ण्ययोर्णिनिः'(३।३।१७०) यानें णिनिप्रत्यय झाला आहे.

४. येथें 'भविष्यति गम्यादयः' (३।३।३) यानें भविष्यत्कालीं गमधातूहून इनिप्रत्यय झाला आहे. येथें ही जी ह्या दोन वार्तिकांनीं व्यवस्था केली आहे ती केली नसती तर क्रमानें अन्वय (१।३।१०) झाला असता, आणि ग्रामं गमी येथें निषेध झाला नसता.

१. कृत्यप्रत्यय शेवटीं असलेल्या शब्दाचा प्रयोग असतांना कृत्याहून षष्ठी विकल्पानें होते; उदा०— मया मम वा सेव्यो हरिः.

णोः कृत्या विधीयन्ते तत्र कृत्यैरभिहितत्वात्कर्मणि षष्ठी न भविष्यति ॥ अत उत्तरं पठति ।

## भव्यादीनां कर्मणोऽनभिधानात्कृत्यानां कर्तृग्रहणम् ॥ १ ॥

भव्यादीनां कर्म कृत्यैरनभिहितम् । गेयो माणवकः साम्नाम् । भव्यादीनां कर्मणोऽनभिधानात्कृत्यानां कर्तृग्रहणं क्रियते ॥ किमुच्यते भव्यादीनां कर्म कृत्यैरनभिहितमिति । नेहाप्यनभिहितं भवति । आक्रष्टव्या ग्रामं शाखेति ॥ एवं तर्हि योगविभागः करिष्यते । कृत्यानां प्रयोगे षष्ठी न भवतीति । किमुदाहरणम् । ग्राममाक्रष्टव्या शाखा । ततः कर्तरि वेति ॥ इहापि तर्हि प्राप्नोति । गेयो माणवकः साम्नामिति । उभयप्राप्ताविति वर्तते । ननु चोभयप्राप्तिरेषा । गेयो माणवकः साम्नामिति च गेयानि माणवकेन

---

विण्याकरितां कृत्यप्रत्ययांचें विधान (३।४।७०) केलें आहे. तेव्हां कर्म या अर्थी कृत्यप्रत्यय केला तर त्या प्रत्ययांकडून कर्म अर्थ उक्त झाला असल्यामुळें तेथें षष्ठी होणार नाहीं,[२] असें मनांत घेऊन वार्तिककार म्हणतातः—

(वा.१) भव्य, गव्य (३।४।६८), वगैरे जीं कर्ता या अर्थी कृत्यप्रत्यय करून निपातनें केलीं आहेत तेथें कृत्यप्रत्ययांकडून कर्म उक्त झालें नसल्यामुळें गेयो माणवकः साम्नाम् येथें कर्माहून षष्ठी विकल्पानें होऊं नये यासाठीं 'कृत्यानां०' या प्रकृत सूत्रामध्यें कर्तरि हा शब्द घातला आहे.

भव्य, गेय, वगैरे कृत्यप्रत्ययान्त शब्दांचा प्रयोग असतांना साम वगैरे कर्म हें कृत्यप्रत्ययांनीं अनुक्त असतें एवढेंच काय म्हणतां? त्याप्रमाणेंच[३] 'आक्रष्टव्या ग्रामं शाखा' येथें ग्राम हें अप्रधानकर्म कृत्यप्रत्ययांनीं अनुक्त असें नाहीं का?

असें आहे तर मग योगविभाग करण्यांत येईल. तो असाः— 'कृत्यानाम्'; कृत्यप्रत्ययान्ताचा प्रयोग असतां तेथें कर्ता आणि कर्म या उभयतांकडूनही षष्ठी होत नाहीं असा त्याचा अर्थ.

याचें काय उदाहरण?

ग्राममाक्रष्टव्या शाखा हें होय.

त्यानंतर 'कर्तरि वा' हें दुसरें सूत्र होय.

योगविभाग केला तर त्या पहिल्या सूत्रानें गेयो माणवकः साम्नाम् येथें षष्ठीचा निषेध कां बरें होत नाहीं?

'उभयप्राप्तौ' या पदाची अनुवृत्ति त्या 'कृत्यानाम्' या पहिल्या सूत्रामध्यें आहे. त्यामुळें जेथें कृत्यप्रत्ययाचा प्रयोग केला असतां कर्ता आणि कर्म या उभयतांहून षष्ठी प्राप्त होते तेथेंच तो निषेध प्रवृत्त होतो.[४]

अहो पण, गेयो माणवकः साम्नाम् येथें उभयप्राप्ति आहेच. कारण कर्तरि कृत्यप्रत्यय केला असतां गेयो माणवकः साम्नाम् येथें

---

२. आणि भाव या अर्थी कृत्यप्रत्यय हा अकर्मक धातूहूनच होणार असल्यामुळें तेथें कर्मच नाहीं.

३. तेव्हां जसें प्रकृत सूत्रामध्यें कर्तरि असें म्हटल्यामुळें गेयो माणवकः साम्नाम् येथें साम या कर्माहून प्रकृतसूत्रानें विकल्पानें षष्ठी होत नाहीं तर 'कर्तृकर्मणोः' या सूत्रानें नित्य षष्ठी होते तशी आक्रष्टव्या ग्रामं शाखा येथें ग्राम या कर्माहून नित्य षष्ठी कां होत नाहीं, असा आशय या भाष्यग्रंथाचा आहे. आक्रष्टव्या येथें तव्य हा कृत्यप्रत्यय शाखा या मुख्य कर्माला दाखवितो. ग्राम हें अप्रधान कर्म (१।४।५१) आहे.

४. देवदत्तेन असा तृतीयान्त कर्ता येथें घ्यावा. येथें देवदत्त हा कर्ता व ग्राम हें अप्रधानकर्म या उभयतांहून ही षष्ठी होत नाहीं. देवदत्तशब्दाहून तृतीया व ग्रामशब्दाहून द्वितीया झाली आहे.

सामानीति च भवति । उभयप्राप्तिर्नाम सा भवति यत्रोभयस्य युगपत्प्रसङ्गोऽत्र च यदा कर्मणि न तदा कर्तरि यदा कर्तरि न तदा कर्मणीति ॥

**[तुल्यार्थैरतुलोपमाभ्यां तृतीयाऽन्यतरस्याम् ॥२।३।७२॥**

**चतुर्थी चाशिष्यायुष्यमद्रभद्रकुशलसुखार्थहितैः ॥२।३।७३॥]**

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये द्वितीयस्याध्यायस्य तृतीये पादे तृतीयमाह्निकम् ॥ पादश्च समाप्तः ॥

---

कर्माहून षष्ठी येत आहे व कर्मणि कृत्यप्रत्यय केला असतां गेयानि माणवकेन सामानि येथें कर्त्याहून षष्ठी येत आहे.

ज्या ठिकाणीं कर्ता आणि कर्म या दोहोंच्यापुढें एकदम षष्ठी प्राप्त होते तेथेंच उभयप्राप्ति समजली जाते, आणि प्रकृत स्थलीं गेय हा कृत्यप्रत्यय कर्ता या अर्थी केला तर कर्माहूनच षष्ठी प्राप्त होते; त्या वेळीं कर्त्याहून येत नाहीं. आणि कर्म या अर्थी कृत्यप्रत्यय केला तर कर्त्याहूनच षष्ठी प्राप्त होते, कर्माहून येत नाहीं.

याप्रमाणें भगवान् पतंजलिऋषींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्यांतील दुसऱ्या अध्यायाच्या तिसऱ्या पादांतील तिसरें आन्हिक व तिसरा पाद समाप्त झाला.

---

१. तुला आणि उपमा हे दोन शब्द वगळून 'तुल्य' या अर्थाला दाखविणाऱ्या शब्दाचा योग असतांना विकल्पेंकरून तृतीया होते; अर्थात् तृतीयेच्या अभावपक्षीं षष्ठी होते; उदा०— तुल्यः सदृशः समो वा कृष्णेन कृष्णस्य वा.

१. आशीर्वाद म्ह. शुभाशंसन हा अर्थ गम्यमान असतांना आयुष्य, मद्र, भद्र, कुशल, सुख, अर्थ व हित यांचा योग असतांना विकल्पानें चतुर्थी होते; अर्थात् चतुर्थीच्या अभावपक्षीं षष्ठी होते; उदा०— आयुष्यं चिरं जीवितं कृष्णाय कृष्णस्य वा भूयात.

## द्विगुरेकवचनम् ॥ २ । ४ । १ ॥

किमर्थमिदमुच्यते ।

**प्रत्यधिकरणं वचनोत्पत्तेः संख्यासामानाधिकरण्याच्च द्विगोरेकवचनविधानम् ॥ १ ॥**

प्रत्यधिकरणं वचनोत्पत्तिर्भवति । किमिदं प्रत्यधिकरणमिति । अधिकरणमधिकरणं प्रति प्रत्यधिकरणम् । संख्यासामानाधिकरण्याच्च । संख्यया बह्वर्थया चास्य सामानाधिकरण्यम् । प्रत्यधिकरणं वचनोत्पत्तेः संख्यासामानाधिकरण्याच्च बहुषु बहुवचनम् [१.४.२१] इति बहुवचनं प्राप्नोति । इष्यते चैकवचनं स्यादिति तच्चान्तरेण यत्नं न सिध्यतीति द्विगोरेकवचनविधानम् । एवमर्थमिदमुच्यते ॥ अस्ति प्रयोजनमेतत् । किं तर्हीति ।

**तत्रानुप्रयोगस्यैकवचनाभावोऽद्विगुत्वात् ॥ २ ॥**

तत्रानुप्रयोगस्यैकवचनं न प्राप्नोति । पञ्चपूलीयमिति । किं कारणम् । अद्विगुत्वात् । द्विगोरेकवचनमित्युच्यते न चात्रानुप्रयोगो द्विगुसंज्ञः ॥

**सिद्धं तु द्विग्वर्थस्यैकवद्वचनात् ॥३॥**

सिद्धमेतत् । कथम् । द्विग्वर्थ एकवद्भवतीति वक्तव्यम् ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । नेदं पारिभाषिकस्य वचनस्य ग्रहणम् । किं तर्हि । अन्वर्थग्रहणम् । उच्यते वचनम् एकस्यार्थस्य वच-

---

(सू.१) द्विगुसमासाच्या समाहाररूपी अर्थाला हा जो एकवद्भाव सांगितला जात आहे तो कशासाठीं ?

(वा.१) प्रत्यधिकरण वचन उत्पन्न होतें.

प्रत्यधिकरण म्हणजे काय ?

अधिकरणमधिकरणम् प्रत्यधिकरणम्; आणि ज्या द्रव्यांचा समाहार असतो त्यांची संख्या बहुत असते. तेव्हां प्रत्येक द्रव्यासंबंधानें त्याची संख्या दाखविणारें त्या त्या शब्दाहून वचन उत्पन्न होत असतें आणि समाहारांतील पदार्थ पुष्कळ असतात, म्हणून द्विगुसमासाच्या पुढें 'बहुषु बहुवचनम्' यानें बहुवचन प्राप्त होत आहे. आणि त्याहून नेहमीं एकवचन होणें तर इष्ट आहे. तें यत्न केल्यावांचून साधणें शक्य नाहीं. म्हणून द्विगुसमासाच्या अर्थाला एकवद्भावाचें विधान करणारें हें सूत्र केलें आहे.

सूत्र करण्याचा हा उपयोग खरा— पण काय ?

(वा.२) द्विगुसमासाहून एकवचन झालें तरी त्याच्या अनुप्रयोगाहून एकवचन प्राप्त होत नाहीं; जसें— पञ्चपूली इयम्.

काय कारण ?

द्विगुसमासाहून एकवचन होतें असें म्हटलें आहे आणि अनुप्रयोग असा जो इदंशब्द तो तर द्विगुसंज्ञक नाहीं.

(वा.३) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

द्विगुसमासाचा जो अर्थ तो एकत्वसंख्येनें युक्त असा समजावा असें वचन करावें.

तर मग तसें वचन केलें पाहिजे.

तसें वचन करावयास नको. कारण सूत्रांत एकवचन असा जो शब्द उच्चारला आहे तो संज्ञाशब्द (१।४।१०१) नव्हे तर तो एकवचनशब्द अन्वर्थ आहे. तो असाः— उच्यते इति वचनम्; एकस्य अर्थस्य वचनम् एक-

---

१. द्विगुसमासाचा अर्थ जो समाहार तो एकत्वसंख्येनें युक्त असा समजावा, म्हणजे त्या द्विगुसमासापुढें एकवचन करावें; उदा०— पञ्चानां गवां समाहारः पञ्चगवम्.

२. द्विगुसमासाच्या जवळच प्रयोग केलेला त्या समाहारालाच लागू पडणारा जो शब्द त्याला अनुप्रयोग म्हणतात. येथें इयम् हा तसा शब्द आहे.

३. तेव्हां द्विगुसमास हा एकत्वसंख्येनें युक्त अशा अर्थाचा वाचक समजावा असा सूत्राचा अर्थ होतो. ज्या शब्दाचा अर्थ एकत्वसंख्येनें युक्त असतो

नमेकवचनमिति ॥

**एकशेषप्रतिषेधश्च ॥ ४ ॥**

एकशेषस्य च प्रतिषेधो वक्तव्यः । पञ्चपूली च पञ्चपूली च पञ्चपूली च पञ्चपूल्यः ॥

**न वान्यस्यानेकत्वात् ॥ ५ ॥**

न वा वक्तव्यः । किं कारणम् । अन्यस्यानेकत्वात् । नैतद्द्विगोरनेकत्वम् । कस्य तर्हि । द्विग्वर्थसमुदायस्य ॥

**समाहारग्रहणं च तद्धितार्थप्रतिषेधार्थम् ॥ ६ ॥**

समाहारग्रहणं च कर्तव्यम् । किं प्रयोजनम् । तद्धितार्थप्रतिषेधार्थम् । तद्धितार्थे यो द्विगुस्तस्य मा भूदिति । पञ्चकपालौ पञ्चकपाला इति ॥ किं पुनरयं पञ्चकपालशब्दः प्रत्येकं परिसमाप्यत आहोस्वित्समुदाये वर्तते । किं चातः । यदि तावत्प्रत्येकं परिसमाप्यते पुरस्तादेव चोदितं परिहृतं च । अथ समुदाये वर्तते ।

---

वचनम्.

(वा.४) एकशेष केल्यानंतर एकवद्भाव होत नाहीं असें म्हणावें; जसें:— पञ्चपूली च पञ्चपूली च पञ्चपूली च पञ्चपूल्यः.

(वा.५) एकशेषाविषयीं एकवद्भावाचा प्रतिषेध करावयास नको.

काय कारण ?

कारण असें की एकशेष केल्यानंतर जें बहुत्व भासतें तें द्विगूच्या अर्थाचें नव्हे.

तर मग तें बहुत्व कोणाचें ?

अनेक द्विगूंच्या अर्थांचा जो समुदाय त्याचें तें बहुत्व होय.

(वा.६) ह्या सूत्रामध्यें समाहारग्रहण करावें, म्हणजे समाहार या अर्थी केलेला जो द्विगु त्यालाच एकवद्भाव होतो असें सांगावें.

याचें काय प्रयोजन ?

तद्धितार्थी केलेला जो द्विगु त्याला एकवद्भाव न व्हावा; जसें:— पञ्चसु कपालेषु संस्कृतौ पुरोडाशौ पञ्चकपालौ, पञ्चकपालाः.

पण काय हो, पांच कपालांचे ठिकाणीं संस्कार केलेला पुरोडाश अशा अर्थाचा हा पञ्चकपालशब्द अनेक पुरोडाशांपैकीं प्रत्येक पुरोडाशाचा वाचक आहे किंवा अनेक पुरोडाश मिळून समुदायाचा वाचक आहे ?

या दोन तऱ्हांमध्यें काय विशेष आहे ?

जर पञ्चकपालशब्द प्रत्येक पुरोडाशाचा वाचक असेल तर पञ्चकपालौ इत्यादि स्थलीं द्विगूचा अर्थ अनेक नसून द्विगूंच्या अर्थांचा समुदाय अनेक आहे असें ठरतें. तेव्हां अशा स्थलीं एकवद्भावाची प्रसक्ति आणि तिचा परिहार हीं दोन्ही पूर्वीं 'एकशेषप्रतिषेधश्च', 'न वाऽन्यस्यानेकत्वात्' या दोन वार्तिकांनीं सांगितलींच आहेत.

आतां पञ्चकपाल हा शब्द तशा प्रकारचे अनेक पुरोडाश मिळून समुदायाचा वाचक

---

त्या शब्दाहून एकवचनच होणार आहे. पञ्चपूली इयम् येथें पञ्चपूलीशब्दाप्रमाणें इयम् हा इदंशब्दही त्याच अर्थाला दाखवीत असल्यामुळें तेथेंही एकवचनच होईल.

४. पञ्चपूल्यः येथें एकशेष केल्यानंतर जो एक पञ्चपूलीशब्द उरला तो त्या तीन पञ्चपूलीशब्दांचा अर्थ दाखवितो, म्हणून तेथें बहुवचन होतें. तेथें प्रकृत सूत्रानें एकवद्भाव प्राप्त होतो, त्याचा निषेध केला पाहिजे.

५. तेव्हां जसें स्वाङ्गांचा समुदाय स्वांगपदानें घेतला जात नाहीं तसें पञ्चपूली या द्विगूच्या अर्थांचा जो समुदाय तो द्विगूचा अर्थ होत नाहीं, म्हणून तेथें प्रकृत सूत्र प्रवृत्त होत नाहीं असा आशय.

६. पञ्चसु कपालेषु संस्कृतः पुरोडाशः या तद्धितार्थी पञ्च आणि कपाल या शब्दांचा द्विगुसमास (२।१।५१) करून 'संस्कृतं भक्षाः' (४।१।१६) यानें केलेल्या अण्प्रत्ययाचा 'द्विगोर्लुक्०' (४।१।८७) यानें लुक्. अशा रीतीनें पञ्चकपालशब्द तयार होतो, आणि एकशेषानें पञ्चकपालौ इत्यादि प्रयोग होतात.

**न वा समाहारैकत्वात् ॥ ७ ॥**

न वैतत्समाहारैकत्वादपि सिध्यति । एवं तर्हि प्रत्येकं परिसमाप्यते । पुरस्तादेव चोदितं परिहृतं च ॥

अपर आह । न वा समाहारैकत्वात् । न वा योगारम्भेणैवार्थः । किं कारणम् । समाहारैकत्वात् । एकोऽयमर्थः समाहारो नाम तस्यैकत्वादेकवचनं भविष्यति ॥

**द्वन्द्वश्च प्राणितूर्यसेनाङ्गानाम् ॥ २ । ४ । २ ॥**

**प्राणितूर्यसेनाङ्गानां तत्पूर्वपदोत्तरपदग्रहणम् ॥ १ ॥**

प्राणितूर्यसेनाङ्गानां तत्पूर्वपदोत्तरपदग्रहणं कर्तव्यम् । प्राण्यङ्गानां प्राण्यङ्गैरिति वक्तव्यम् । तूर्याङ्गानां तूर्याङ्गैः । सेनाङ्गानां सेनाङ्गैरिति । किं प्रयोजनम् । व्यतिकरो मा भूदिति ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् ।

**योगविभागात्सिद्धम् ॥ २ ॥**

योगविभागः करिष्यते । द्वन्द्वश्च प्राण्यङ्गानाम् । ततस्तूर्याङ्गानाम् । ततः सेनाङ्गानामिति ॥ स तर्हि योगविभागः कर्तव्यः । न कर्तव्यः । प्रत्येकमङ्गशब्दः

---

आहे असें गृहीत धरलें तर—

(वा.७) प्रकृत सूत्रामध्यें समाहारग्रहण केल्यामुळें प्रकृत सूत्राची प्रवृत्ति झाली नाहीं तरी तो समुदाय एक असल्यामुळें पञ्चकपालौ, पञ्चकपालाः, येथें एकवचनाची निवृत्ति सिद्ध होत नाहीं.

असें आहे तर मग पञ्चकपालशब्द प्रत्येक पुरोडाशाचा वाचक आहे असेंच म्हणतों. तेथें एकवद्भावाची प्रसक्ति आणि परिहार हीं पूर्वी (वा.३।५) सांगितलीं आहेतच.

येथें दुसऱ्या कोणीं एका वैयाकरणानें ह्या वार्तिकाची योजना निराळीच केली आहेः

‘द्विगुरेकवचनम्’ हें एकवद्भाव सांगणारें सूत्रच मुळीं करावयास नको.

काय कारण ?

कारण असें की द्विगुसमासाचा अर्थ जो समुदाय तो एकच आहे.

(सू.२, वा.१) प्राण्यङ्ग, तूर्याङ्ग आणि सेनाङ्ग यांचा जो द्वंद्व तो एकत्वसंख्येनें युक्त अशा अर्थाचा वाचक होतो, पण त्या द्वंद्वांतील पूर्वपद ज्या अङ्गाचें वाचक असेल त्याच अङ्गाचें वाचक असें उत्तरपद असलें पाहिजे असें वचन करावें; म्हणजे प्राण्यङ्गवाचकाचा प्राण्यङ्गवाचकाबरोबरच, तूर्याङ्गवाचकाचा तूर्याङ्गवाचकाबरोबरच आणि सेनाङ्गवाचकाचा सेनाङ्गवाचकाबरोबरच तो द्वंद्वसमास केला असला पाहिजे.

असें सांगण्याचें काय प्रयोजन ?

भिन्न भिन्न अङ्गांचा द्वंद्व केला असतां तेथें एकवद्भाव न व्हावा म्हणून.

तर मग तसें अवश्य सांगितलें पाहिजे.

तसें सांगावयास नको. कारण

(वा.२) सूत्राचा विभाग केला म्हणजे तें साधेल. तो असा– ‘प्राण्यङ्गानाम्’ असें एक सूत्र, पुढें तूर्याङ्गानाम्, व त्याचे पुढें सेनाङ्गानाम्, अशीं तीन सूत्रें करण्यांत येतील.

तर मग तसा सूत्राचा विभाग केला पाहिजे.

सूत्राचा विभाग करावयास नको. कारण प्राणि, तूर्य आणि सेना या प्रत्येकाचा बहुवचनान्त अशा अङ्गशब्दाशीं संबंध करून

---

७. तेव्हां त्याहून सहजच एकवचन होईल. त्याकरितां यत्न करण्याची जरूर नाहीं.

१. प्राण्यङ्ग, तूर्याङ्ग आणि सेनाङ्ग यांचा द्वंद्व ज्या अर्थाला दाखवितो तो अर्थ एकत्वसंख्येनें युक्त आहे असें समजावें; उदा०— पाणी च पादौ च पाणिपादम्, मार्दङ्गिकपाणविकम्, रथिकाश्वारोहम्.

२. पाणि हे प्राण्यङ्ग आणि मार्दङ्गिक हें तूर्याङ्ग यांचा जर द्वंद्व केला तर तेथें एकवद्भाव होत नाहीं.

परिसमाप्यते ॥

**अनुवादे चरणानाम् ॥ २ । ४ । ३ ॥**

इह कस्मान्न भवति । नन्दन्तु कठकालापाः । वर्धन्तां कठकौथुमाः ।

**स्थेणोः ॥ १ ॥**

स्थेणोरिति वक्तव्यम् ॥ एवमपि तिष्ठन्तु कठकालापा इत्यत्रापि प्राप्नोति ।

**अद्यतन्यां च ॥ २ ॥**

अद्यतन्यां चेति वक्तव्यम् । उदगात्कठकालापम् । प्रत्यष्ठात्कठकौथुमम् । उदगान्मौदपैप्पलादम् ॥

**[अध्वर्युक्रतुरनपुंसकम् ॥ २ । ४ । ४ ॥**

**अध्ययनतोऽविप्रकृष्टाख्यानाम् ॥ २ । ४ । ५ ॥**

**जातिरप्राणिनाम् ॥ २ । ४ । ६ ॥]**

**विशिष्टलिङ्गो नदी देशोऽग्रामाः ॥ २ । ४ । ७ ॥**

**ग्रामप्रतिषेधे नगरप्रतिषेधः ॥ १ ॥**

अग्रामा इत्यत्रानगराणामिति वक्तव्यम् । इह मा भूत् । मथुरापाटलिपुत्र-

---

तसाच पुढें निरनिराळा त्यांचा द्वंद्वाशीं संबंध केला म्हणजे काम भागेल.

(सू. ३) नन्दन्तु कठकालापाः, वर्धन्तां कठकौथुमाः, येथें एकवद्भाव कां बरें होत नाहीं?

(वा. १) स्थाधातु किंवा इण्धातु यांचा प्रयोग असतां शाखाध्येतृवाचकांच्या द्वंद्वाला एकवद्भाव होतो असें वचन करावें. त्यामुळें वरील उदाहरणांमध्यें एकवद्भाव होत नाहीं.

तरी पण तिष्ठन्तु कठकालापाः येथें एकवद्भाव प्राप्त होत आहे.

(वा. २) स्था किंवा इण्धातु यांच्यापुढें 'लुङाचा प्रयोग असतां' असें वचन करावें; जसें:— उदगात्कठकालापम्, प्रत्यष्ठात्कठकौथुम्, उद्गान्मौदपैप्पलादम्.

(सू. ७, वा. १) येथें अग्रामाः असा जो ग्रामवाचकांचा प्रतिषेध केला आहे तेथें ग्रामपदानें नगराचें ग्रहण होत नाहीं असा प्रतिषेध करावा, म्हणजे 'अनगराणाम्' असें तेथें

---

१. शाखाध्येतृवाचकांच्या द्वंद्वाला एकवद्भाव होतो, सिद्ध अर्थाचा अनुवाद केला असेल तर; उदा०— उदगात्कठकालापम्, प्रत्यष्ठात्कठकौथुमम्. कठ आणि कालाप या शब्दांचा द्वंद्व होऊन त्याला एकवद्भाव झाला आहे. कठानें सांगितलेल्या वेदभागाचें अध्ययन करणारे असा कठशब्दाचा अर्थ आहे. कठशब्दाहून प्रोक्त या अर्थी णिनिप्रत्यय (४।३।१०४), पुढें अध्ययन करणारा या अर्थीं अण्प्रत्यय (४।२।५९), णिनिप्रत्ययाचा लुक् (४।३।१०७) आणि अण्प्रत्ययाचा लुक् (४।२।६४) झाला आहे. तसेंच कलापिन्शब्दाहून प्रोक्त या अर्थी अण्प्रत्यय (४।३।१०८), टिलोप (६।४।१४४, वा. १), त्यानंतर अध्ययन करणारा या अर्थी अण्प्रत्यय आणि त्याचा लुक् पूर्वीप्रमाणेंच समजावा.

२. अद्यतनी असें प्राचीन वैयाकरणांनीं लुङ्प्रत्ययाला नांव दिलें आहे. तेव्हां लुङ्प्रत्यय पुढें असलेल्या स्था आणि इण् या धातूंचा प्रयोग असतांना शाखाध्येतृवाचकांच्या द्वंद्वाला एकवद्भाव होतो.

१. यजुर्वेदामध्यें ज्यांचें विधान केलें आहे असे जे क्रतु तद्वाचक असून नपुंसकलिंगी नव्हेत अशा शब्दांच्या द्वंद्वसमासाला एकवद्भाव होतो; उदा०— अर्कश्च अश्वमेधश्च अर्काश्वमेधम्.

१. अध्ययनामुळें तात्कालिक नवीन मिळालेल्या संज्ञाशब्दांच्या द्वंद्वसमासाला एकवद्भाव होतो; उदा०—पदकाश्च क्रमकाश्च पदकक्रमकम्. पदें म्हणणाऱ्याला पदक म्हणतात, क्रम म्हणणाऱ्याला क्रमक म्हणतात, पद व क्रम या शब्दाहून अध्ययन करणारा या अर्थीं वुन्प्रत्यय (४।२।६१) झाला आहे.

१. प्राणिजाति वगळून जातिवाचक शब्दांच्या द्वंद्वाला एकवद्भाव होतो; उ०— धानाश्च शष्कुलयश्च धानाशष्कुलि.

१. निरनिराळ्या लिंगांचे जे नदीवाचक शब्द किंवा देशवाचक शब्द त्यांच्या द्वंद्वाला एकवद्भाव होतो, पण त्या द्वंद्वामध्यें ग्रामवाचक शब्द नसावा; उदा०—उद्ध्यश्च इरावती च उद्ध्येरावति, गङ्गा च शोणश्च गङ्गाशोणम्, कुरवश्च कुरुक्षेत्रं च कुरुकुरुक्षेत्रम्.

मिति ॥

**उभयतश्च ग्रामाणाम् ॥ २ ॥**

उभयतश्च ग्रामाणां प्रतिषेधो वक्तव्यः। इह मा भूत्। शौर्यं च केतवता च शौर्यकेतवते। जाम्बवं च शालुकिनी च जाम्बवशालुकिन्यौ ॥

**क्षुद्रजन्तवः ॥ २।४।८ ॥**

क्षुद्रजन्तव इत्युच्यते के पुनः क्षुद्रजन्तवः। क्षोत्तव्या जन्तवः। यद्येवं यूकालिक्षम् कीटपिपीलिकमिति न सिध्यति ॥ एवं तर्ह्यनस्थिकाः क्षुद्रजन्तवः। अथवा येषां स्वं शोणितं नास्ति ते क्षुद्रजन्तवः। अथवा येषामा सहस्रादञ्जलिर्न पूर्यते ते क्षुद्रजन्तवः। अथवा येषां गोचर्ममात्रं राशिं हत्वा न पतितो भवति ते क्षुद्रजन्तवः। अथवा नकुलपर्यन्ताः क्षुद्रजन्तवः ॥

**येषां च विरोधः शाश्वतिकः ॥ २।४।९ ॥**

किमर्थश्चकारः। एवकारार्थश्चकारः। येषां विरोधः शाश्वतिकस्तेषां द्वन्द्व एकवचनमेव यथा स्याद्यदन्यत्प्राप्नोति तन्म

म्हणावें; मथुरापाटलिपुत्रम् येथें एकवद्भावाचा प्रतिषेध न व्हावा म्हणून.

(वा.२) द्वंद्वामध्यें ग्रामवाचक शब्द नसावा असें जें म्हटलें आहे तेथें तो ग्रामवाचक शब्द पूर्वपद किंवा उत्तरपद यांपैकीं कोठेंही नसावा असें वचन करावें; जसें:– शौर्यं च केतवता च शौर्यकेतवते, जाम्बवं च शालुकिनी च जाम्बवशालुकिन्यौ.

(सू.८) येथें क्षुद्रजन्तु हा शब्द घातला आहे ते क्षुद्रजन्तु म्हणजे कोणते ?

जे प्राणी चुरगळले असतांही मरत नाहींत ते क्षुद्रजन्तु होत.

असें आहे तर यूकालिक्षम्, कीटपिपीलिकम्, दंशमशकम्, या उदाहरणांमध्यें एकवद्भाव होणार नाहीं.

तर मग ज्या जन्तूंमध्यें हाडें नाहींत ते क्षुद्रजन्तु होत.

अथवा ज्या जन्तूंमध्यें स्वतःचें रक्त नाहीं असे उवा, लिखा, वगैरे प्राणी क्षुद्रजन्तु होत.

किंवा जे जन्तु ओंजळीमध्यें हजारापर्यंत घातलें असता देखील ओंजळ भरत नाहीं ते क्षुद्रजन्तु होत.

किंवा जे जन्तु मारून त्यांचा गोचर्माएवढा ढीग घातला तरी पातित्य येत नाहीं ते क्षुद्रजन्तु होत.

किंवा अगदीं लहान प्राण्याला आरंभ करून उत्तरोत्तर स्थूल असे जे मुंगसापर्यंत प्राणी ते क्षुद्रजन्तु होत.

(सू.९) येथें चशब्द घातला आहे त्याचा अर्थ काय समजावयाचा ?

एवशब्दाच्या ऐवजीं येथें चशब्द वापरला आहे. ज्यांचें कायमचें वैर अशा प्राण्यांच्या वाचक शब्दांचा द्वंद्व नेहमीं एकवचनींच चालावा, तेथें जें दुसरें कांहीं येऊं शकत

२. तेव्हां नगरवाचकांचा द्वंद्व वगळून ग्रामवाचकांच्या द्वंद्वाला एकवद्भाव होत नाहीं असें सिद्ध होतें.

३. मथुरा हें नगर आहे आणि पाटलिपुत्र हेंही नगर आहे.

४. शौर्यशब्द नगरवाचक आहे आणि केतवता हा शब्द ग्रामवाचक आहे; व जाम्बवशब्द नगरवाचक आहे आणि शालुकिनीशब्द ग्रामवाचक आहे.

१. अगदीं लहान अशा कीटकाला आरंभ करून मुंगसापर्यंत मोठे जे प्राणी ते सर्व क्षुद्रजन्तु म्हटले जातात. तसल्या क्षुद्रजन्तुवाचक शब्दांच्या द्वंद्वाला एकवद्भाव होतो; उदा०—यूकालिक्षम्.

२. जळु हा प्राणी चुरगळला तरी मरत नाहीं.

१. ज्या प्राण्यांचें स्वाभाविक वैर आहे तसल्या प्राण्यांच्या द्वंद्वाला एकवद्भाव होतो; उदा०—अहिनकुलम्, गोव्याघ्रम्, काकोलूकम्.

भूदिति । किं चान्यत्प्राप्नोति । पशुशकुनिद्वन्द्वे विरोधिनां पूर्वविप्रतिषिद्धमित्युक्तं स पूर्वविप्रतिषेधो न वक्तव्यो भवति ॥

**[1]शूद्राणामनिरवसितानाम् ॥ २ । ४ । १० ॥**

अनिरवसितानामित्युच्यते कुतोऽनिरवसितानाम् । आर्यावर्तादनिरवसितानाम् । कः पुनरार्यावर्तः । प्रागादर्शात्प्रत्यक्कालकवनाद्दक्षिणेन हिमवन्तमुत्तरेण पारियात्रम् । यद्येवं किष्किन्धगन्धिकम् शकयवनम् शौर्यक्रौञ्चमिति न सिध्यति ॥ एवं तर्ह्यार्यनिवासादनिरवसितानाम् । कः पुनरार्यनिवासः । ग्रामो घोषो नगरं संवाह इति । एवमपि य एते महान्तः संस्त्यायास्तेष्वभ्यन्तराश्चण्डाला मृतपाश्च वसन्ति तत्र चण्डालमृतपा इति न सिध्यति ॥ एवं तर्हि याज्ञात्कर्मणोऽनिरवसितानाम् । एवमपि तक्षायस्कारम् रजकतन्तुवायमिति न सिध्यति ॥ एवं तर्हि पात्रादनिरवसितानाम् । यैर्भुक्ते पात्रं संस्कारेण शुध्यति तेऽनिर-

असेल तें न व्हावें म्हणून.

तेथें दुसरें काय येऊं शकतें ?

ज्या ठिकाणीं 'विभाषा वृक्षमृग०' (२।४।१२) यानें एकवद्भावाचा विकल्प प्राप्त होते तेथें 'ज्यांचा कायमचा विरोध आहे अशा पशु किंवा पक्षिवाचकांचा द्वंद्व, पूर्वविप्रतिषेधानें विकल्पाचा बाध करून नेहमीं एकवचनींच चालतो (२।४।१२,वा.२)' असें जें वचन केलें आहे तें करावें लागत नाहीं.

(सू.१०) निरवसित म्ह. बहिष्कृत. जे बहिष्कृत नव्हेत ते अनिरवसित होत.

पण ते कोणापासून बहिष्कृत नसले पाहिजेत ?

आर्यावर्तदेशापासून बहिष्कृत नसले पाहिजेत.

आर्यावर्तदेश तो कोणता ?

आदर्शपर्वताच्या पूर्वेकडे, कालकवनपर्वताच्या पश्चिमेकडे, हिमालयपर्वताच्या दक्षिणेकडे आणि पारियात्रपर्वताच्या उत्तरेकडे जो प्रदेश तो आर्यावर्त होय.

असें आहे तर किष्किन्धगन्धिकम्, शकयवनम्, शौर्यक्रौञ्चम्, [2]या उदाहरणांमध्यें एकवद्भाव येऊं शकत नाहीं.

असें आहे तर जेथें आर्यलोक राहतात त्यापासून जे बहिष्कृत नव्हेत ते अबहिष्कृत असें समजावें.

ते आर्य लोक कोठें राहतात ?

[3]ग्राम, घोष, नगर व संवाह या ठिकाणीं राहतात.

असें म्हटलें तरीही हे जे मोठे आर्यांचे निवास दाखविले त्यांमध्यें चंडाल आणि डोंब हे लोक राहतात. तेव्हां चण्डालमृतपाः हें उदाहरण साधत नाहीं.

असें आहे तर यज्ञकर्मापासून जे बहिष्कृत नव्हेत ते अनिरवसित असें समजावें.

तरींही तक्षायस्कारम्, रजकतन्तुवायम्, हीं उदाहरणें साधत नाहींत.

असें आहे तर भोजनपात्रापासून जे बहिष्कृत नव्हेत ते अनिरवसित असें समजावें. म्हणजे ज्या लोकांनीं पात्रांत भोजन केलें

१. भोजनपात्रांतून बहिष्कृत नव्हेत असे जे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, यांहून निराळे लोक तद्वाचक शब्दांचा द्वंद्व नेहमीं एकवचनींच चालतो; उदा०—तक्षायस्कारम्.

२. किष्किंधा, गन्धिक, शक, यवन, वगैरे आर्यावर्ताच्या बाहेरील देश असल्यामुळें एकवद्भाव येऊं शकत नाहीं.

३. पुढें अ.७, पा.३, सू.१४ टीप पहा.

४. येथें एकवद्भाव प्राप्त होत आहे.

५. येथें एकवद्भाव प्राप्त होत नाहीं.

वसिताः। यैर्भुक्ते पात्रं संस्कारेणापि न न शुध्यति ते निरवसिताः॥

**गवाश्वप्रभृतीनि च ॥२।४।११॥**

**गवाश्वप्रभृतिषु यथोच्चारितं द्वन्द्ववृत्तम् ॥ १ ॥**

गवाश्वप्रभृतिषु यथोच्चारितं द्वन्द्ववृत्तं द्रष्टव्यम्। गवाश्वम् गवाविकम् गवैडकम्॥

**विभाषा वृक्षमृगतृणधान्यव्यञ्जनपशुशकुन्यश्ववडवपूर्वापराधरोत्तराणाम् ॥ २ । ४ । १२ ॥**

**बहुप्रकृतिः फलसेनावनस्पतिमृगशकुन्तक्षुद्रजन्तुधान्यतृणानाम् ॥ १ ॥**

फलसेनावनस्पतिमृगशकुन्तक्षुद्रजन्तुधान्यतृणानां द्वन्द्वो विभाषैकवद्भवति बहुप्रकृतिरिति वक्तव्यम्। फल। बदरामलकम् बदरामलकानि। सेना। हस्त्यश्वम् हस्त्यश्वाः। वनस्पति। प्लक्षन्यग्रोधम् प्लक्षन्यग्रोधाः। मृग। रुरुपृषतम् रुरुपृषताः। शकुन्त। हंसचक्रवाकम् हंसचक्रवाकाः। क्षुद्रजन्तु। यूकालिक्षम् यूकालिक्षाः। धान्य। व्रीहियवम् व्रीहियवाः। माषतिलम् माषतिलाः। तृण। कुशकाशम् कुशकाशाः। शरशीर्यम् शरशीर्याः। किं प्रयोजनम्। बहुप्रकृतिरेव यस्तत्र यथा स्यात्। क मा भूत्। बद-

---

असतां स्मृत्युक्त संस्कारानें पात्रशुद्धि होते ते अनिरवसित होत. आणि ज्या लोकांनी पात्रांत भोजन केलें असतां स्मृत्युक्त संस्कारानेंही पात्रशुद्धि होत नाही ते लोक निरवसित होत.

(सू.११,वा.१) गवाश्वादिगणामध्यें अवङ्[३] वगैरे करून जसे द्वंद्व समास पठित आहेत तसल्या द्वंद्वांनाच हा एकवद्भाव करावयाचा. जसें— गवाश्वम्, गवाविकम्, गवैडकम्.

(सू.१२, वा.१) फल, सेना, वनस्पति, मृग, शकुनि, क्षुद्रजन्तु, धान्य आणि तृण या अर्थांना दाखविणाऱ्या शब्दांच्या द्वंद्वसमासांना जो एकवद्भाव सांगितला आहे तो त्या द्वंद्वांचीं सर्व पदें बहुवचनान्त असतील तरच होतो असें वचन करावें; जसें:— फल— बदरामलकम् बदरामलकानि; सेना— हस्त्यश्वम् हस्त्यश्वाः; वनस्पति— प्लक्षन्यग्रोधम् प्लक्षन्यग्रोधाः; मृग— रुरुपृषतम् रुरुपृषताः; शकुनि— हंसचक्रवाकम् हंसचक्रवाकाः; क्षुद्रजन्तु— यूकालिक्षम् यूकालिक्षाः; धान्य— व्रीहियवम् व्रीहियवाः; माषतिलम् माषतिलाः, तृण— कुशकाशम् कुशकाशाः, शरशीर्यम् शरशीर्याः.

असें वचन करण्याचें काय प्रयोजन ?

ज्या द्वंद्वांतील सर्व पदें बहुवचनान्तच आहेत तेथेंच एकवद्भाव व्हावा म्हणून.

कोठें एकवद्भाव होऊं नये ?

---

१. गवाश्वप्रभृति गणांतील शब्द जसे उच्चारिले आहेत तसेच ते साधु समजावेत, म्हणजे गवाश्वम् येथें पशुवाचकांचा द्वंद्व असल्यानें 'विभाषा वृक्ष०' या पुढील सूत्रानें प्राप्त झालेल्या विकल्पाचा बाध करून नित्य एकवद्भाव होतो; उदा०—गवाश्वम्, दासीदासम्.

२. एकवद्भावरूपी जें द्वंद्वप्रयुक्त कार्य त्याला येथें द्वंद्ववृत्त असें म्हटलें आहे.

३. त्यामुळें 'सर्वत्र विभाषा' यानें प्रकृतिभाव केला म्हणजे अवङ् केला नाहीं त्या वेळीं किंवा पूर्वरूप केलें त्या वेळीं हा एकवद्भाव होत नाहीं.

१. वृक्ष, मृग, तृण, धान्य, व्यञ्जन, पशु आणि शकुनि या अर्थांना दाखविणाऱ्या विशेष शब्दांचा द्वंद्व व अश्ववडव, पूर्वापर आणि अधरोत्तर हे तीन द्वंद्व विकल्पानें एकवचनीं चालतात; उदा०—प्लक्षन्यग्रोधम् प्लक्षन्यग्रोधाः, रुरुपृषतम् रुरुपृषताः, अश्ववडवम् अश्ववडवौ.

२. येथें एकवद्भाव केलेल्या द्वंद्वांचीं सर्व पदें बहुवचनान्त आहेत, असें कळविण्याकरितां बदरामलकानि वगैरे बहुवचनान्त द्वंद्वसमास दाखविले आहेत. जर बदर एक व आमलकही एक असेल तर बदरामलके असें द्विवचनच होईल.

रामलके तिष्ठतः ॥ किं पुनरनेन या प्राप्तिः सा नियम्यत आहोस्विदविशेषेण। किं चातः। यद्यनेन या प्राप्तिः सा नियम्यते प्लक्षन्यग्रोधौ जातिरप्राणिनाम् [२.४.६] इति नित्यो द्वन्द्वैकवद्भावः प्राप्नोति। अथाविशेषेण न दोषो भवति। यथा न दोषस्तथास्तु ॥

## पशुशकुनिद्वन्द्वे विरोधिनां पूर्वविप्रतिषिद्धम् ॥ २ ॥

पशुशकुनिद्वन्द्वे येषां च विरोधः शाश्वतिकः [२.४.९] इत्येतद्भवति पूर्वविप्रतिषेधेन। पशुशकुनिद्वन्द्वस्यावकाशः। महाजोरभ्रम् महाजोरभ्राः। हंसचक्रवाकम् हंसचक्रवाकाः। येषां च विरोध इत्यस्यावकाशः। श्रमणब्राह्मणम्। इहोभयं प्राप्नोति। काकोलूकम् श्वशृगालमिति। येषां च विरोध इत्येतद्भवति पूर्वविप्रतिषेधेन ॥ स तर्हि पूर्वप्रतिषेधो वक्तव्यः। न वक्तव्यः। उक्तं तत्र चकारकरणस्य प्रयोजनं येषां च विरोधः शाश्वतिकस्तेषां द्वन्द्व एकवचनमेव यथा स्याद्यदन्यत्प्राप्नोति तन्मा भूदिति ॥

## अश्ववडवयोः पूर्वलिङ्गत्वात्पशुद्वन्द्वनपुंसकम् ॥ ३ ॥

अश्ववडवयोः पूर्वलिङ्गत्वात्पशुद्वन्द्वनपुंसकं भवति पूर्वविप्रतिषेधेन। अश्व-

---

बदरामलके तिष्ठतः वगैरे ठिकाणीं.

द्वंद्वांतील सर्व पदें बहुवचनान्त असतील तरच एकवद्भाव होतो अशी जी व्यवस्था केली आहे ती प्रकृत सूत्रानें सांगितलेल्या एकवद्भावासंबंधानेंच आहे किंवा या प्रकरणांतील कोणत्याही सूत्रानें सांगितलेल्या एकवद्भावासंबंधानें आहे ?

यांत काय बरें फरक आहे ?

जर प्रकृत सूत्रानें प्राप्त झालेल्याच एकवद्भावासंबंधानें ही व्यवस्था असेल तर प्लक्षन्यग्रोधौ येथें 'जातिरप्रा०' (२।४।६) यानें नित्य एकवद्भाव प्राप्त होत आहे. आतां जर कोणत्याही सूत्रानें येणाऱ्या एकवद्भावासंबंधानें ही व्यवस्था असेल तर मात्र हा दोष येत नाहीं.

जी तऱ्हा घेतली असतां दोष येणार नाहीं तीच तऱ्हा असो.

(वा.२) ज्यांमध्यें कायमचें वैर आहे अशा पशूंच्या किंवा शकुनींच्या वाचकांच्या द्वंद्वाला पूर्वविप्रतिषेधानें 'येषां च विरोधः' (२।४।९) यानें नित्य एकवद्भाव होतो. पशूंच्या किंवा शकुनींच्या वाचकांच्या द्वंद्वाला जो प्रकृत सूत्रानें वैकल्पिक एकवद्भाव सांगितला आहे त्याला महाजोरभ्रम् महाजोरभ्राः, हंसचक्रवाकम् हंसचक्रवाकाः, येथें अवकाश आहे. 'येषां च विरोधः' या नित्य एकवद्भावाला श्रमणब्राह्मणम् येथें अवकाश आहे, आणि काकोलूकम्, श्वशृगालम्, येथें उभयतांची प्राप्ति येते; तेव्हां विप्रतिषेध असल्यामुळें 'येषां च विरोधः' या पूर्वसूत्रानें सांगितलेला नित्य एकवद्भाव होतो.

तर मग तसें पूर्वविप्रतिषेधानें बाध करण्याबद्दलचें वचन करावयास पाहिजे.

तसें वचन करावयास नको. कारण 'येषां च०' (२।४।९) येथें घातलेल्या चकाराचें प्रयोजन असें आहे की ज्यांचा कायमचा विरोध आहे तद्वाचक शब्दांचा द्वंद्व नेहमीं एकवचनींच चालावा, तेथें दुसरें जें कांहीं वैकल्पिक एकवद्भावामुळें रूप प्राप्त होतें तें होऊं नये.

(वा.३) अश्ववडव या द्वंद्वाला 'पूर्ववदश्ववडवौ' (२।४।२७) यानें सांगितलेल्या पूर्वपदाच्या लिंगापेक्षां पशुद्वंद्वाला प्रकृत सूत्रानें सांगितलेल्या एकवद्भावामुळें प्राप्त होणारें नपुंसकलिंग (२।४।१७) होतें असें वचन करावें. 'पूर्ववदश्ववडवौ' यानें सांगितलेल्या

वडवयोः पूर्वलिङ्गत्वस्यावकाशः। विभाषा पशुद्वन्द्वनपुंसकं यदा न पशुद्वन्द्वनपुंसकं सोऽवकाशः। अश्ववडवौ। पशुद्वन्द्वनपुंसकस्यावकाशः। अन्ये पशुद्वन्द्वाः। महाजोरभ्रम् महाजोरभ्राः। पशुद्वन्द्वनपुंसकप्रसङ्ग उभयं प्राप्नोति। अश्ववडवम्। पशुद्वन्द्वनपुंसकं भवति पूर्वविप्रतिषेधेन॥ स तर्हि पूर्वप्रतिषेधो वक्तव्यः। न वक्तव्यः।

## प्रतिपदविधानात्सिद्धम् ॥ ४ ॥

प्रतिपदमत्र नपुंसकं विधीयते। अश्ववडवपूर्वापरेति॥

## एकवचनमनर्थकं समाहारैकत्वात् ॥ ५ ॥

एकवद्भावोऽनर्थकः। किं कारणम्। समाहारैकत्वात्। एकोऽयमर्थः समाहारो नाम तस्यैकत्वादेकवचनं भविष्यति॥ इदं तर्हि प्रयोजनम्। एतज्ज्ञास्यामीह नित्यो विधिरिह विभाषेति। नैतदस्ति प्रयोजनम्। आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति सर्वो द्वन्द्वो विभाषैकवद्भवतीति यदयं तिष्यपुनर्वस्वोर्नक्षत्रद्वन्द्वे बहुवचनस्य द्विवचनं नित्यम् [१.२.६३] इत्याह॥ इदं तर्हि प्रयोजनम्। स नपुंसकम् [२.४.१७]

---

पूर्वपदाच्या लिंगाला 'विभाषा वृक्ष०' यानें एकवद्भाव विकल्पानें सांगितला असल्यामुळें जेव्हां एकवद्भाव होत नाहीं आणि त्या नपुंसकलिंगाची प्राप्ति येत नाहीं, त्या वेळीं अवकाश आहे; उदा.—अश्ववडवौ०. पशुद्वंद्वाला प्रकृत सूत्रानें सांगितलेल्या एकवद्भावामुळें प्राप्त होणाऱ्या नपुंसकलिंगाला अश्ववडव याहून अन्य पशुद्वंद्व अवकाश आहेत, जसें—महाजोरभ्रम् महाजोरभ्राः; आणि अश्ववडव या द्वंद्वाला उभयतांची प्रसक्ति आली असतां पूर्वविप्रतिषेधानें पशुद्वंद्वाला एकवद्भावाबरोबर नपुंसकलिंग (२।४।१७) होतें; जसें— अश्ववडवम्.

तर मग तसें पूर्वविप्रतिषेधाचें वचन केलें पाहिजे.

तसें वचन करावयास नको. कारण—

(वा.४) अश्ववडव या द्वंद्वाला हा 'पशुद्वंद्व आहे' म्हणून एकवद्भाव आम्ही करीत नाहीं, तर ह्या प्रकृत सूत्रामध्यें अश्ववडव असा मुद्दाम शब्द उच्चारून सांगितलेला जो एकवद्भाव तो केला जात आहे. तेव्हां अर्थातच तोच येथें होईल.

(वा.५) हा जो एकवद्भाव सांगितला आहे त्याचा कांहींच उपयोग होत नाहीं.

काय कारण ?

कारण असें की समाहार म्हणजे समुदाय. हा केव्हांही एकच आहे म्हणून अर्थात् तेथें एकवचनच होईल.

तर एकवद्भाव सांगण्याचें हें प्रयोजन समजावें की येथें नित्य एकवद्भाव होतो आणि येथें विकल्पानें एकवद्भाव होतो ही व्यवस्था[3] समजावी.

एकवद्भाव सांगण्याचा हा उपयोग संभवत नाहीं. कारण ज्यापेक्षां हा आचार्य 'तिष्यपुनर्वस्वोः' (१।२।६३) येथें बहुवचनस्य हा शब्द घालीत आहे त्यावरून सर्व प्रकारच्या द्वंद्वसमासाला विकल्पानें एकवद्भाव होतो असें आचार्य सुचवीत आहे.[4]

तर मग एकवद्भाव झालेल्या समासाला उद्देशून 'स नपुंसकम्' (२।४।१७) यानें नपुंसकलिंग सांगणार आहे, त्याकरितां हा एकवद्भाव सांगितला आहे, असें त्याचें प्रयोजन

---

३. प्रकृत सूत्र आणि 'विप्रतिषिद्धम्' (२।४।१३) या दोन सूत्रांनीं सांगितलेला एकवद्भाव विकल्पानें होतो, आणि इतर सूत्रांनीं सांगितलेला एकवद्भाव नित्य होतो.

४. मागें भाष्य १।२।६३, पृ. ५६२ पहा.

इति वक्ष्यामीति । एतदपि नास्ति प्रयोजनम् । लिङ्गमशिष्यं लोकाश्रयत्वाल्लिङ्गस्य ॥ न तर्हीदानीमिदं वक्तव्यम् । वक्तव्यं च । किं प्रयोजनम् । पूर्वत्र नित्यार्थमुत्तरत्र व्यभिचारार्थं विभाषा वृक्षमृगेति ॥

**[विप्रतिषिद्धं चानधिकरणवाचि ॥२।४।१३॥**

**न दधिपयआदीनि ॥२।४।१४॥**

**अधिकरणैतावत्त्वे च ॥२।४।१५॥]**

**विभाषा समीपे ॥ २ । ४ । १६ ॥**

किमुदाहरणम् । उपदशं पाणिपादम् । उपदशाः पाणिपादाः । नैतदस्ति प्रयोजनम् । अयं द्वन्द्वैकवद्भाव आरभ्यते तत्र कः प्रसङ्गो यदनुप्रयोगस्य स्यात् ॥ एवं तर्ह्यव्ययस्य संख्ययाऽव्ययीभावोऽप्यारभ्यते बहुव्रीहिरपि । तद्यदा तावदेकवचनं तदाऽव्ययीभावोऽनुप्रयुज्यत एकार्थस्यैकार्थ इति । यदा बहुवचनं तदा बहुव्रीहिरनुप्रयुज्यते बह्वर्थस्य बह्वर्थ इति ॥

**[सं नपुंसकम् ॥२।४।१७॥**

**अव्ययीभावश्च ॥२।४।१८॥]**

---

समजावें.

हेंही प्रयोजन संभवत नाहीं. कारण लिंग हें लोकव्यवहारावरून ठरत असल्यामुळें त्याचें शास्त्रामध्यें विधान करावयास नको आहे.

तर मग आतां हें एकवद्भावप्रकरण आरंभावयास नकोच कीं काय ?

आरंभावयास पाहिजे.

तर मग त्याचा उपयोग तरी काय ?

उपयोग असा की प्राण्यङ्ग, तूर्याङ्ग, वगैरेंचा समाहारद्वंद्वच होतो, असा आरंभींच्या कांहीं सूत्रांनीं नियम केला आहे आणि पुढें 'विभाषावृक्षमृग०' इत्यादि सूत्रांनीं वृक्ष वगैरे शब्दांविषयीं तो नियम नाहीं असें सांगितलें आहे.

(सू.१६) या सूत्राचें उदाहरण काय ?

उपदशं पाणिपादम् उपदशाः पाणिपादाः.

हें या सूत्राचें प्रयोजन होत नाहीं. कारण द्वंद्वसमासाला हा विकल्पानें एकवद्भाव सांगितला आहे तो त्या द्वंद्वाच्या अनुप्रयोगाला म्ह. उपदशशब्दाला कसा बरें लागू होईल ?

असें आहे तर अव्ययाचा संख्यावाचकाबरोबर अव्ययीभावसमास (२।१।५) होत आहे आणि बहुव्रीहिही (२।२।२५) होत आहे. तेव्हां ज्या वेळीं द्वंद्वाला एकवद्भाव केला त्या वेळीं अव्ययीभावाचाच अनुप्रयोग करावयाचा. कारण एका अर्थाला एका अर्थाचाच अनुप्रयोग करणें योग्य आहे, आणि जेव्हां द्वंद्वाहून बहुवचन केलें त्या वेळीं बहुव्रीहीचाच अनुप्रयोग करावयाचा, कारण बह्वर्थाला बह्वर्थाचाच अनुप्रयोग करणें योग्य आहे.

---

१. (१३) परस्परविरोधी असे जे द्रव्यभिन्न पदार्थ तद्वाचक शब्दांच्या द्वंद्वाला विकल्पानें एकवद्भाव होतो; उदा०–शीतोष्णम् शीतोष्णे.

१. (१४) दधिपयस्, इध्माबर्हिस्, वगैरे द्वंद्वाला एकवद्भाव मुळींच होत नाहीं; उदा०–दधिपयसी, इध्माबर्हिषी, ऋक्सामे.

१. (१५) द्वंद्वसमासांतील घटक पदार्थांची संख्या शेजारच्या शब्दावरून प्रतीत होत असेल तर त्या द्वंद्वाला एकवद्भाव होत नाहीं; उदा० -दश दन्तोष्ठाः.

१. द्वंद्वसमासांतील घटक पदार्थांची इयत्ता सामीप्यानें कळली जात असतां 'समाहारच होतो' हा नियम विकल्पानें समजावा; उदा०–उपदशं दन्तोष्ठम्, उपदशा दन्तोष्ठाः.

२. तेव्हां उपदशम्, उपदशाः, हीं या प्रकृत सूत्राचीं उदाहरणें नव्हेतच; दन्तोष्ठम्, दन्तोष्ठाः, हींच या सूत्राचीं उदाहरणें होत.

१. (१७) समाहार या अर्थीं केलला जो द्विगु किंवा द्वंद्व तो नपुंसकलिंगी होतो; उदा०–पञ्चगवम्, दन्तोष्ठम्.

१. (१८) अव्ययीभावसमास नपुंसकलिंगी होतो; उदा०–अधिहरि,

## तत्पुरुषोऽनञ्कर्मधारयः ॥२।४।१९॥

किमर्थमिदमुच्यते । संज्ञायां कन्थोशीनरेषु [२.४.२०] इति वक्ष्यति तदतत्पुरुषस्य नञ्समासस्य कर्मधारयस्य वा मा भूदिति । नैतदस्ति प्रयोजनम् । न हि संज्ञायां कन्थान्त उशीनरेष्वतत्पुरुषो नञ्समासः कर्मधारयो वास्ति ॥ उत्तरार्थं तर्हि । उपज्ञोपक्रमं तदाद्याचिख्यासायाम् [२१] इति वक्ष्यति तदतत्पुरुषस्य नञ्समासस्य कर्मधारयस्य वा मा भूदिति । एतदपि नास्ति प्रयोजनम् । न हि तदाद्याचिख्यासायामुपज्ञोपक्रमान्तोऽतत्पुरुषो नञ्समासः कर्मधारयो वास्ति ॥ उत्तरार्थमेव तर्हि । छाया बाहुल्ये [२२] इति वक्ष्यति तदतत्पुरुषस्य नञ्समासस्य कर्मधारयस्य वा मा भूदिति । एतदपि नास्ति प्रयोजनम् । न हि च्छायान्तो बाहुल्येऽतत्पुरुषो नञ्समासः कर्मधारयो वास्ति ॥ उत्तरार्थमेव तर्हि । सभा राजामनुष्यपूर्वा [२३] अशाला च [२४] इति वक्ष्यति तदतत्पुरुषस्य नञ्समासस्य कर्मधारयस्य वा मा भूदिति । एतदपि नास्ति प्रयोजनम् । न हि सभान्तोऽशालायामतत्पु-

---

(सू.१९) हें अधिकारसूत्र करण्याचा काय उद्देश ?

'संज्ञायां कन्थोशीनरेषु' (२।४।२०) ह्यानें ज्या शब्दाला नपुंसकलिंग सांगितलें आहे तें तत्पुरुषभिन्नसमास किंवा नञ्समास अथवा कर्मधारय यांना लागू न व्हावें यासाठीं हें सूत्र केलें आहे.

हें प्रयोजन संभवत नाहीं. कारण कन्थाशब्द शेवटीं असलेला सामासिक शब्द उशीनरदेशोत्पन्न कन्थेची संज्ञा असून तो तत्पुरुषभिन्न समास, नञ्समास अथवा कर्मधारय समास असा नाहींच.

मग त्याच्यापुढें 'उपज्ञोपक्रमम्०' (२।४।२१) ह्या सूत्रानें ज्या शब्दाला नपुंसकलिंग सांगितलें आहे तें तत्पुरुषभिन्न समास किंवा नञ्समास अथवा कर्मधारय समास यांना लागू न व्हावें यासाठीं हें सूत्र केलें आहे.

हेंही प्रयोजन संभवत नाहीं. कारण उपज्ञा किंवा उपक्रमशब्द शेवटीं असलेला आणि उपज्ञायमान व उपक्रम्यमाण यांचें प्राथम्य दाखविणारा असा सामासिक शब्द तत्पुरुषभिन्न समास किंवा नञ्समास अथवा कर्मधारयसमास असा नाहींच.

तर मग त्याच्यापुढें 'छायाबाहुल्ये' (२।४।२२) ह्या सूत्रानें ज्या शब्दाला नपुंसकलिंग सांगितलें आहे तें तत्पुरुषभिन्न समास किंवा नञ्समास अथवा कर्मधारयसमास यांना लागू न पडावें यासाठीं हें सूत्र केलें आहे.

हेंही प्रयोजन संभवत नाहीं. कारण छायाशब्द शेवटीं असलेला व पूर्वपदाच्या अर्थाचें बहुत्व दाखविणारा असा सामासिक शब्द, तत्पुरुषभिन्न समास किंवा नञ्समास अथवा कर्मधारयसमास असा नाहींच.

मग त्याच्यापुढें 'सभा राजा मनुष्यपूर्वा' (२।४।२३) 'अशाला च' (२।४।२४) ह्या सूत्रांनीं ज्या शब्दाला नपुंसकलिंग सांगितलें आहे तें तत्पुरुषभिन्न समास किंवा नञ्समास अथवा कर्मधारयसमास यांना लागू न व्हावें यासाठीं हें सूत्र केलें आहे.

हाही ह्या अधिकारसूत्राचा उपयोग संभवत नाहीं. कारण राजपर्यायशब्द वगैरेंच्या पुढें असलेला किंवा संघात या अर्थाचा जो सभाशब्द तो शेवटीं असलेला सामासिकशब्द

---

१. हें अधिकारसूत्र आहे. तेव्हां ह्या पदांची अनुवृत्ति पुढील सूत्रांत होते. त्यामुळें नञ्समास आणि कर्मधारय वगळून तत्पुरुषसमासाला पुढील सूत्रांनीं सांगितलेलीं कार्यें होतात.

रुषो नञ्समासः कर्मधारयो वास्ति ॥ इदं तर्हि । विभाषा सेनासुरा [२५] इति वक्ष्यति तदतत्पुरुषस्य नञ्समासस्य कर्मधारयस्य वा मा भूदिति ॥ तत्पुरुष इति किमर्थम् । दृढसेनो राजा ॥ अनञिति किमर्थम् । असेना ॥ अकर्मधारय इति किमर्थम् । परमसेना उत्तमसेना ॥

**[संज्ञायां कन्थोशीनरेषु ॥२।४।२०॥**

**उपज्ञोपक्रमं तदाद्याचिख्यासायाम् ॥ २ । ४ । २१ ॥**

**छाया बाहुल्ये ॥ २ । ४ । २२ ॥**

**सभा राजामनुष्यपूर्वा ॥२।४।२३॥**

**अशाला च ॥ २ । ४ । २४ ॥**

**विभाषा सेनासुराच्छायाशालानिशानाम् ॥ २ । ४ । २५ ॥ ]**

**परवल्लिङ्गं द्वन्द्वतत्पुरुषयोः ॥ २ । ४ । २६ ॥**

किमर्थमिदमुच्यते । द्वन्द्वोऽयमुभय-

---

हा तत्पुरुषभिन्न समास किंवा नञ्समास अथवा कर्मधारयसमास असूं शकत नाहीं.

तर मग ह्या अधिकाराचा हा उपयोग समजावा की 'सेना, सुरा, छाया, शाला आणि निशा हे शब्द शेवटीं असलेला सामासिक शब्द विकल्पेंकरून नपुंसकलिंगी होतो (२।४।२५)' असें जें पुढें सांगितलें आहे तें तत्पुरुषभिन्न समासाला किंवा नञ्समासाला अथवा कर्मधारयसमासाला लागू होऊं नये. आतां या अधिकारसूत्रामध्यें तत्पुरुष असा शब्द घातला आहे तो कशासाठीं ?

दृढसेनो राजा येथें दृढसेन या बहुव्रीहीला नपुंसकलिंगाचा नियम (२।४।२५) लागू न व्हावा म्हणून.

अनञ् असा शब्द घातला तो कशासाठीं ?

असेना या नञ्समासाला तो नियम लागू न पडावा म्हणून.

आतां अकर्मधारय असा शब्द घातला तो कशासाठीं ?

परमसेना, उत्तमसेना, हा कर्मधारय त्या नियमाखालीं न यावा म्हणून.

(सू.२६) कशासाठीं हें सूत्र आरंभिलें जात

---

१.(२०)कन्थाशब्द शेवटीं असलेला तत्पुरुषसमास नपुंसकलिंगीं होतो, पण ती उशीनरदेशामध्यें तयार झालेल्या कन्थेची (वाकळ) संज्ञा असेल तर, आणि नञ्तत्पुरुष व कर्मधारय नसेल तर; उदा०—सुशमस्यापत्यानि सौशमयः, तेषां कन्था सौशमिकन्थम्.

(२१) उपज्ञा किंवा उपक्रम हे शब्द शेवटीं असलेला तत्पुरुष समास नपुंसकलिंगी होतो, पण उपज्ञायमान किंवा उपक्रम्यमाण यांचें प्राथम्य कळविण्याची इच्छा असेल तर, आणि नञ्तत्पुरुष व कर्मधारय नसेल तर; उदा०—पाणिनेरुपज्ञा पाणिन्युपज्ञम् ग्रन्थः, नन्दोपक्रमं द्रोणः.

(२२) छायाशब्द शेवटीं असलेला तत्पुरुषसमास नपुंसकलिंगी होतो, पण त्या छायाशब्दापेक्षां जें पूर्वपद त्याच्या अर्थाचें बहुत्व गम्यमान असेल तर, आणि नञ्तत्पुरुष व कर्मधारय नसेल तर; उदा०—इक्षूणां छाया इक्षुच्छायम्,

(२३)राजपर्यायशब्द किंवा मनुष्यभिन्न जे राक्षस, पिशाच, वगैरे त्यांचा वाचक शब्द ज्या सभाशब्दाच्या पूर्वीं आहे असा सभाशब्द शेवटीं असलेला तत्पुरुषसमास नपुंसकलिंगी होतो, पण नञ्तत्पुरुष व कर्मधारय नसेल तर; उदा०—इनसभम्, ईश्वरसभम्, रक्षःसभम्, पिशाचसभम्.

(२४) संघात या अर्थाला दाखविणारा सभाशब्द शेवटीं असलेला तत्पुरुषसमास नपुंसकलिंगी होतो, पण नञ्तत्पुरुष व कर्मधारय नसेल तर; उदा०—स्त्रीसभम्.

(२५) सेना, सुरा, छाया, शाला आणि निशा हे शब्द शेवटीं असलेला तत्पुरुषसमास एकदा नपुंसकलिंगीं चालतो, अर्थात् एकदा स्त्रीलिंगींही चालतो, पण नञ्तत्पुरुष व कर्मधारय नसेल तर; उदा०—ब्राह्मणसेनम् ब्राह्मणसेना, यवसुरम् यवसुरा.

१. द्वंद्व किंवा तत्पुरुष यांतील शेवटला शब्द ज्या लिंगाला दाखवितो त्याच लिंगामध्यें तो द्वंद्व

पदार्थप्रधानस्तत्र कदाचित्पूर्वपदस्य यल्लिङ्गं तत्समासस्यापि स्यात्कदाचिदुत्तरपदस्य । इष्यते च परस्य यल्लिङ्गं तत्समासस्य यथा स्यादिति तच्चान्तरेण यत्नं न सिध्यतीति परवल्लिङ्गं द्वन्द्वतत्पुरुषयोरिति । एवमर्थमिदमुच्यते ॥ तत्पुरुषश्चापि कः प्रयोजयति । यः पूर्वपदार्थप्रधानः । एकदेशिसमासः । अर्धपिप्पलीति । यो ह्युत्तरपदार्थप्रधानो दैवकृतं तस्य परवल्लिङ्गम् ॥

**परवल्लिङ्गं द्वन्द्वतत्पुरुषयोरिति चेत्प्राप्तापन्नालंपूर्वगतिसमासेषु प्रतिषेधः ॥१॥**

परवल्लिङ्गं द्वन्द्वतत्पुरुषयोरिति चेत्प्राप्तापन्नालंपूर्वगतिसमासेषु प्रतिषेधो वक्तव्यः । प्राप्तो जीविकां प्राप्तजीविकः । आपन्नो जीविकामापन्नजीविकः ॥ अलंपूर्वे । अलं जीविकाया अलंजीविकः ॥ गतिसमास । निष्कौशाम्बिः निर्वाराणसिः ॥

**पूर्वपदस्य च ॥२॥**

पूर्वपदस्य च प्रतिषेधो वक्तव्यः । मयूरीकुक्कुटौ । यदि पुनर्यथाजातीयकं

---

आहे ?

द्वंद्वसमासांतील घटक उभयपदार्थांनाही प्राधान्य असल्यामुळें पाळीपाळीनें म्ह. एकदा पूर्वपदार्थाचे लिंगांत द्वंद्वसमास चालेल व एकदा उत्तरपदार्थाचे लिंगांत चालेल. पण नेहमीं उत्तरपदार्थाचेंच लिंग द्वंद्वाला लागू होणें इष्ट आहे. तें कांहीं यत्न केल्यावाचून साधणार नाहीं. म्हणून परवल्लिङ्गं द्वंद्वतत्पुरुषयोः हें सूत्र केलें आहे. अर्धपिप्पली वगैरे जो पूर्वपदार्थाला प्राधान्य आहे असा एकदेशिसमास (२।२।१) तो तत्पुरुषासंबंधानें हें सूत्र करावयास लावीत आहे. आतां ज्या तत्पुरुषामध्यें उत्तरपदार्थाला प्राधान्य आहे त्याला सहजगत्याच पुढील पदाचें लिंग लागू होईल.

(वा.१) द्वंद्व किंवा तत्पुरुष या समासांना त्यांच्या उत्तरपदाचें लिंग लागू होत असेल तर प्राप्त किंवा आपन्न या शब्दांचा तत्पुरुष (२।२।४), अलंशब्द पूर्वी असलेला तत्पुरुष आणि गतिसमास (२।२।१८) या समासांना त्यांच्या उत्तरपदाचें लिंग लागू होत नाहीं, असें निषेधादाखल वचन करावें; जसें– प्राप्तो जीविकां प्राप्तजीविकः[2], आपन्नो जीविकामापन्नजीविकः, अलं कुमार्यै अलंकुमारिः[3], निष्कौशाम्बिः, निर्वाराणसिः.

(वा.२) द्वंद्व किंवा तत्पुरुष या समासांतील उत्तरपदाचें लिंग पूर्वपदाला लागू होत नाहीं असेंही निषेधादाखल वचन करावें; जसें– मयूरीकुक्कुटौ.

---

किंवा तत्पुरुष चालवावा; उदा०—कुक्कुटमयूर्याविमे मयूरीकुक्कुटाविमौ; अर्धपिप्पली. ह्या सूत्राचा अर्थ दोन प्रकारचा होतो. पराचें जें लिंग तेंच समासाला लागू होतें. तेव्हां अर्थातच कुक्कुटमयूरी, अर्धपिप्पली, राजकुमारी, येथें जो स्त्रीप्रत्यय उत्तरपदाचें लिंग दाखवितो तेंच समासाचें लिंग असल्यामुळें त्यालाही दाखविणारा तोच स्त्रीप्रत्यय समजावा. या वेळीं सूत्रामध्यें उच्चारलेला परवत् हा वतिप्रत्यय स्वार्थीच समजावा, किंवा औपचारिक अर्थानें लावावा; म्हणजे उत्तरपद हें वृत्तीच्या पूर्वीचें आणि वृत्तीमध्यें प्रविष्ट झालेलें अवस्थाभेदानें निराळें मानून वतिप्रत्ययाची उपपत्ति करावी. दुसरा अर्थ असा की उत्तरपदाचें लिंग त्याचें त्याला कायम राहून त्याच्यासारखें निराळें दुसरें लिंग समासाला लागू होतें. ह्या वेळीं वतिप्रत्यय चांगला जमतो.

२. या सर्व उदाहरणांमध्यें पूर्वपदाच्या अर्थाला प्राधान्य असल्यामुळें त्याचें लिंग समासाला लागू होत आहे.

३. येथें 'पर्यादयो ग्लानाद्यर्थे चतुर्थ्या' (२।२।१८ वा.४) यानें समास झाला आहे.

४. द्वंद्वतत्पुरुषयोः ही सप्तमी आहे, असें गृहीत धरलें असतां द्वंद्वांतील किंवा तत्पुरुषांतील उत्तर-

परस्य लिङ्गं तथाजातीयकं समासादन्यदतिदिश्येत

**समासादन्यल्लिङ्गमिति चेदश्ववडवयोष्टाब्लुग्वचनम् ॥ ३ ॥**

समासादन्यल्लिङ्गमिति चेदश्ववडवयोष्टापो लुग्वक्तव्यः । अश्ववडवौ ॥

**निपातनात्सिद्धम् ॥ ४ ॥**

निपातनात्सिद्धमेतत् । किं निपातनम् ॥ अश्ववडवपूर्वापरेति ॥

**उपसर्जनह्रस्वत्वं वा ॥ ५ ॥**

अथवोपसर्जनस्येति ह्रस्वत्वं भविष्यति ॥ इहापि तर्हि प्राप्नोति । कुक्कुटमयूर्यौ । अस्तु ।

**परवल्लिङ्गमिति शब्दशब्दार्थौ ॥६॥**

परवल्लिङ्गमिति शब्दशब्दार्थावतिदिश्येते । तत्रौपदेशिकस्य ह्रस्वत्वमातिदेशि-

---

आतां उत्तरपदार्थाचें लिंग ज्या तऱ्हेचें असेल त्याच तऱ्हेचें लिंग त्या लिंगापेक्षां निराळें असें समासार्थाला लागू करावें, असें विधान करण्याकरितां हें सूत्र केलें आहे असें गृहीत धरलें तर 'पूर्वपदस्य च' हा प्रतिषेध करण्याची जरूर राहत नाहीं. पण

(वा.३) उत्तरपदार्थाच्या लिंगापेक्षां निराळें पण त्यासारखें असें स्वतंत्र लिंग समासार्थाला लागू होतें असें असेल तर 'अश्ववडवौ' या द्वंद्वाचे ठिकाणीं टापाचा लुक् होतो असें वचन केलें पाहिजे.

(वा.४) अश्ववडवौ येथें निपातनावरून टापाची निवृत्ति सिद्ध होत आहे.

तें निपातन कोणतें ?

अश्ववडवपूर्वापराधरोत्तराणाम् (२।२।१२) हें होय.

(वा.५) किंवा 'गोस्त्रियोरुपसर्जनस्य' (१।२।४८) यानें ह्रस्व होईल.

तर मग कुक्कुटमयूर्यौ येथेंही ह्रस्व होऊं लागेल.

होईल तर होऊं दे.

(वा.६) परवल्लिङ्गम् येथील लिंगशब्दानें स्त्रीपुंनपुंसक हें लिंग व त्या लिंगाला दाखविणारा प्रत्यय या उभयतांचें तंत्रानें ग्रहण केलें आहे, तेव्हां त्या दोघांचाही अतिदेश द्वंद्व आणि तत्पुरुष यांना होतो. त्यांत मूळच्या कुक्कुटमयूरी ह्या स्त्रीप्रत्ययान्ताला ह्रस्व झाला तरी अतिदेशानें झालेला ङीप्प्रत्यय कायम

---

पदाचें लिंग लागू करावें, असा सूत्रार्थ होतो. पण तें पूर्वपदाला किंवा समासाला, या बाबतींत संशय उत्पन्न झाला असतां परशब्दानें पूर्वाचा आक्षेप होत असल्यामुळें, अर्थात् प्रत्यासत्तिन्यायानें, पूर्वपदाला उत्तरपदाचें लिंग लागू होईल, आणि मयूरीकुक्कुटौ येथें मयूरीशब्दाला पुंल्लिंग लागू झालें असतां स्त्रीप्रत्ययाच्या निवृत्तीचा प्रसंग ओढवतो, म्हणून हा निषेध केला आहे.

५. द्वंद्वतत्पुरुषयोः ही षष्ठी समजून द्वंद्व किंवा तत्पुरुष यांच्या अर्थाला उत्तरपदार्थाच्या लिंगासारख्या लिंगाचें विधान केलें म्हणजे उत्तरपदार्थाचें लिंग कोणाला लागू करावें, असा संशय येत नसल्यामुळें परशब्दानें पूर्वाचा आक्षेप होणार नाहीं, म्हणून 'पूर्वपदस्य च' या वार्तिकाची जरूरी नाहीं.

६. प्रकृत सूत्राप्रमाणें 'पूर्ववदश्ववडवौ' या पुढील सूत्रामध्येंही पूर्वपदार्थाच्या लिंगासारखें निराळें लिंग समासार्थालाच लागू केलें जाईल, उत्तरपदार्थाला लागू केलें जाणार नाहीं. तेव्हां उत्तरपदार्थाचें वडवा याचें स्त्रीलिंग कायमच राहत असल्यामुळें तेथें टाप्प्रत्ययाची निवृत्ति होणार नाहीं. म्हणून त्याचा लुक् सांगितला पाहिजे.

७. 'अश्ववडवापूर्वापर' असें दीर्घाचें उच्चारण करावयाचें असतां ऱ्हस्व उच्चारण केलें आहे, त्यावरून टापाची निवृत्ति होते.

८. चार्थे द्वंद्वः (२।२।२९) येथें अनेकम् या प्रथमान्तपदाची अनुवृत्ति येते म्हणून द्वंद्वांतील सर्वच पदांना 'प्रथमानिर्दिष्टम्०' (१।२।४३) यानें उपसर्जनसंज्ञा झाल्यामुळें वडवाशब्दाला ऱ्हस्व होईल.

कस्य श्रवणं भविष्यति ॥ इदं तर्हि । दत्ता च कारीषगन्ध्या च दत्ताकारीषगन्ध्ये । दत्ता च गार्ग्यायणी च दत्तागार्ग्यायण्यौ । द्वौ ष्यङौ द्वौ ष्फौ च प्राप्नुतः । स्ताम् । पुंवद्भावेनैकस्य निवृत्तिर्भविष्यति ॥ इदं तर्हि । दत्ता च युवतिश्च दत्तायुवती । द्वौ तिशब्दौ प्राप्नुतः । तस्मान्नैतच्छक्यं वक्तुं शब्दशब्दार्थावतिदिश्येते इति । ननु चोक्तं समासादन्यल्लिङ्गमिति चेदश्ववडवयोष्टाब्लुग्वचनमिति । परिहृतमेतन्निपातनात्सिद्धमिति ॥ अथवा नैवं विज्ञायते परस्यैव परवदिति । कथं तर्हि । परस्येव परवदिति । यथाजातीयकं परस्य लिङ्गं तथाजातीयकं समासस्यातिदिश्यते॥ अथ पूर्वपदस्य न प्रतिषिध्यते प्राप्तादिषु कथम् ।

---

राहील[९].

पण तसा अतिदेश होत असेल तर दत्ता च कारीषगन्ध्या च दत्ताकारीषगध्ये, दत्ता च गार्ग्यायणी च दत्तागार्ग्यायण्यौ, येथें क्रमानें दोन ष्यङ् आणि दोन ष्फ असे प्रत्यय होऊं लागतील[१०].

दोन ष्यङ्प्रत्यय आणि दोन ष्फप्रत्यय झाले तरी 'भस्याढे तद्धिते' (६।३।३५ वा. ११) यानें पुंवद्भाव होऊन पूर्वीच्या ष्यङ्प्रत्ययाची आणि ष्फप्रत्ययाची निवृत्ति होईल.

तर मग दत्ता च युवतिश्च दत्तायुवती, येथें दोन तिप्रत्यय होऊं लागतील[११].

एकंदरींत 'परवल्लिङ्गम्०' या प्रकृत सूत्रानें लिंग आणि त्या अर्थाचा प्रत्यय या दोघांचा अतिदेश करणें शक्य नाहीं.

पण जर समासार्थाला लागू होत असेल तर अश्ववडवौ येथें टाप्प्रत्ययाचा लुक् होण्यासाठीं वचन केलें पाहिजे, असा दोष दाखविला आहे ना ?

दोष दाखविला आहे खरा, पण अश्ववडवपूर्वापर० या निपातनावरून टापाचा लुक् होईल असा त्या दोषाचा परिहारही केलाच आहे. अथवा समासार्थसमुदायाला उत्तरपदाचेंच लिंग लागू होतें असा अर्थ आम्ही करीत नाहीं.

तर कसा अर्थ करतां ?

परस्येव परवत् असा अर्थ समजतों. म्हणजे ज्या प्रकारचें परपदाचें लिंग असेल त्याच प्रकारचें पण त्यापेक्षां निराळें असें लिंग समासार्थाला लागू करावें. म्हणजे अर्थातच पूर्वपदार्थाला लागू होणारच नसल्यामुळें 'पूर्वपदस्य च' हा प्रतिषेध करावयास नको.

---

९. तेव्हां ऱ्हस्व झाला तरी कुक्कुटमयूरि या सामासिक शब्दाहून ह्या प्रकृत अतिदेशानें ङीप्प्रत्यय होऊन सवर्णदीर्घानें (६।१।१०१) रूप साधेल.

१०. करीष म्हणजे वाळलेलें शेण. त्याप्रमाणें गंध ज्याचा आहे अशा अर्थीं करीष आणि गंध या शब्दांचा बहुव्रीहि होऊन शेवटच्या अकाराला इकार आदेश (५।४।१३७) झाला आहे. त्या करीषगन्धिशब्दाहून त्याची नात या अर्थीं अण्प्रत्यय (४।१।९२), इकारलोप (६।४।१४८), आदिवृद्धि (७।४।११७) झाल्यानंतर 'अणिञोः' (४।१।७८) या सूत्रानें अणाचे स्थानीं स्त्रीप्रत्ययष्यङादेश व पुढें 'यङश्चाप्' (४।१।७४) यानें चाप्प्रत्यय होऊन करीषगन्ध्या असें होतें. तसेंच गर्गशब्दाहून त्याची नात या अर्थीं यञ्प्रत्यय (४।१।१०५), पुढें ष्फ हा स्त्रीप्रत्यय (४।१।१७), आयन्आदेश (७।१।२) आणि ङीष्प्रत्यय (४।१।४१) होऊन गार्ग्यायणी असें होतें. येथें कारीषगन्ध्या येथें ष्यङ् हा एक स्त्रीप्रत्यय मूळचा झालेला आहे, आणि दत्ताकारीषगन्ध्या या द्वंद्वाहून प्रकृत अतिदेशानें पुनः दुसरा ष्यङ् हा स्त्रीप्रत्यय होऊं लागेल. तसेंच दत्तागार्ग्यायणी या द्वंद्वाहून प्रकृत अतिदेशानें पुन्हा दुसरा ष्फप्रत्यय होऊं लागेल.

११. येथें ति हा स्त्रीप्रत्यय (४।१।७७) आहे. येथें भसंज्ञा (१।४।१८) नसल्यामुळें पुंवद्भावानें काम भागणार नाहीं.

**प्राप्तादिषु चैकदेशिग्रहणासिद्धम् ॥७॥**

द्वन्द्वैकदेशिनोरिति वक्ष्यामि ॥ तदेकदेशिग्रहणं कर्तव्यम् । न कर्तव्यम् । एकदेशिसमासो नारप्स्यते । कथमर्धपिप्पलीति । समानाधिकरणसमासो भविष्यति । अर्धं च सा पिप्पली चार्धपिप्पलीति । न सिध्यति । परत्वात्षष्ठीसमासः प्राप्नोति । अद्य पुनरयमेकदेशिसमास आरभ्यमाणः षष्ठीसमासं बाधते । इष्यते च षष्ठीसमासोऽपि । तद्यथा । अपूपार्धं मया भक्षितम् । ग्रामार्धं मया लब्धमिति । एवं पिप्पल्यर्धमिति भवितव्यम् । कथमर्धपिप्पलीति । समानाधिकरणो भविष्यति ॥

**[पूर्ववदश्ववडवौ[1] ॥ २ । ४ । २७ ॥**
**हेमन्तशिशिरावहोरात्रे[1] च च्छन्दसि ॥ २ । ४ । २८ ॥]**
**रात्राह्नाहाः[1] पुंसि ॥२।४।२९॥**

---

आतां प्राप्त, आपन्न, वगैरेंविषयीं कसें ?

(वा.७) परवल्लिङ्गं द्वंद्वतत्पुरुषयोः याचे ऐवजीं 'परवल्लिङ्गं द्वंद्वैकदेशिनोः' असें सूत्र करण्यांत येईल[12].

तर मग 'परवल्लिङ्गम्०' या प्रकृत सूत्रामध्यें तत्पुरुषशब्द काढून त्याच्या जागीं एकदेशिन् हा शब्द घातला पाहिजे.

तसा शब्द घालावयास नको[13]. तर पूर्वापराधरो०' (२।२।१ ते ३) इत्यादि एकदेशिसमासविधायक सूत्रेंच करीत नाहीं.

पण मग एकदेशिसमास आरंभिला नाहीं तर अर्धपिप्पली[14] इत्यादि उदाहरणें कशीं साधावयाचीं ?

अर्धं च सा पिप्पली च 'अर्धपिप्पली' असा 'विशेषणं विशेष्येण' (२।१।५७) यानें कर्मधारय समास होईल[15].

कर्मधारयसमासानें अर्धपिप्पली हें साधत नाहीं. कारण पिप्पली वगैरे शब्दांचा मुख्यार्थ घेणें श्रेष्ठ असल्यामुळें षष्ठीसमासच प्राप्त होत आहे; आणि एकदेशिसमासाचा आरंभ केला म्हणजे मात्र तो षष्ठीसमासाचा बाध करून होतो.

पण एकदेशिसमासाविषयीं षष्ठीसमासही इष्ट आहे. तें जसें:- अपूपस्यार्धम् अपूपार्धम् मया भक्षितम्, ग्रामार्धं मया लब्धम्. याप्रमाणें पिप्पल्यर्धम् असा षष्ठीसमासही इष्ट आहे[16].

तर मग अर्धपिप्पली हा समास कसा ?

गौण अर्थ घेऊन कर्मधारयसमास होईल.

---

१२. द्वंद्व आणि एकदेशिसमास (२।२।१) यांना परपदाच्या लिंगासारखें लिंग लागू होतें, असा त्याचा अर्थ होय. तेव्हां एकदेशिसमासापेक्षां इतर तत्पुरुषसमासाच्या संबंधानें प्रकृत सूत्राची प्राप्तिच येत नाहीं, म्हणून त्याच्या निषेधाकरितां वचन करावयास नको.

१३. प्रकृत सूत्रामध्यें एकदेशिन् असा शब्द नको व मूळचा तत्पुरुषशब्दही नको.

१४. षष्ठीतत्पुरुष होऊन पिप्पल्यर्धम् असेंच होईल, अर्धपिप्पली असें होणार नाहीं.

१५. पिप्पली वगैरे शब्द हे आपल्या अर्थांच्या कांहीं भागालाही गौण रीतीनें लावतां येतात. तेव्हां अर्ध्या भागालाही पिप्पली असें गौण रीतीनें म्हणतां येतें.

१६. तेव्हां तो प्रयोग साधण्याकरितां एकदेशिसमासाचीं सूत्रें न करणें हेंच बरें.

१. अश्ववडवा या द्वंद्वसमासाला पूर्वपदाच्या लिंगासारखें लिंग लागू करावें, उदा०—अश्वश्च वडवा च अश्ववडवौ अश्ववडवान् अश्ववडवैः. अश्ववडव या द्वंद्वाला एकवद्भाव विकल्पानें सांगितला (२।४।१२) असल्यामुळें तो होत नाहीं, त्या वेळीं या प्रकृत सूत्राचा उपयोग होतो.

१. हेमन्तशिशिर आणि अहोरात्र या दोन द्वंद्वसमासांना वेदामध्यें पूर्वपदाचें लिंग लागू होतें; उदा०—हेमन्तशिशिरौ, अहोरात्रे.

१. रात्र, अह्न आणि अह हे शब्द शेवटीं असलेला द्वंद्व किंवा तत्पुरुष हा पुंल्लिंगी चालवावा. उदा०—अहोरात्रः; रात्रेः पूर्वभागः पूर्वरात्रः;

## अनुवाकादयः पुंसि ॥ १ ॥

अनुवाकादयः पुंसि भाष्यन्त इति वक्तव्यम् । अनुवाकः शंयुवाकः सूक्तवाकः ॥

## अपथं[1] नपुंसकम् ॥ २ । ४ । ३० ॥

पुण्यसुदिनाभ्यामह्नो नपुंसकत्वं वक्तव्यम् । पुण्याहम् सुदिनाहम् ॥

## पथः संख्याव्ययादेः ॥ १ ॥

पथः संख्याव्ययादेरिति वक्तव्यम् । द्विपथम् त्रिपथम् चतुष्पथम् । उत्पथम् विपथम् ॥

## द्विगुश्च ॥२॥

द्विगुश्च समासो नपुंसकलिङ्गो भवतीति वक्तव्यम् । पञ्चगवम् दशगवम् ।

अकारान्तोत्तरपदो द्विगुः स्त्रियां भाष्यत इति वक्तव्यम् । पञ्चपूली दशपूली ॥

## वाबन्तः ॥ ३ ॥

वाबन्तः स्त्रियां भाष्यत इति वक्तव्यम् । पञ्चखट्वम् पञ्चखट्वी । दशखट्वम् दशखट्वी ॥

अनो नलोपश्च वा च स्त्रियां भाष्यत इति वक्तव्यम् । पञ्चतक्षम् पञ्चतक्षी । दशतक्षम् दशतक्षी ॥

पात्रादिभ्यः प्रतिषेधो वक्तव्यः । द्विपात्रम् पञ्चपात्रम् ।

---

(सू.२९, वा.१) अनुवाक वगैरे शब्द पुंल्लिंगीं चालतात असें वचन करावें; उदा०—अनुवाकः, शंयुवाकः, सूक्तवाकः. विशेष प्रकारचें वाक्य हा या शब्दांचा अर्थ असल्यामुळें नपुंसकलिंग प्राप्त झालें असतां पुंल्लिंगाचें विधान केलें आहे.

(सू.३०) पुण्य किंवा सुदिन या शब्दांच्या पुढील जो अहन्‌शब्द तो शेवटीं असलेला तत्पुरुष नपुंसकलिंगीं चालतो, असें वचन करावें; उदा०—पुण्यं च तदहश्च पुण्याहम्[2], सुदिनाहम्.

(वा.१) संख्या किंवा अव्यय यांच्यापुढील जो पथशब्द तो शेवटीं असलेला तत्पुरुष नपुंसकलिंगीं चालतो, असें वचन करावें; जसें—द्विपथम्, त्रिपथम्, चतुष्पथम्, उत्पथम्, विपथम्.

(वा.२) द्विगुसमासही नपुंसकलिंगीं चालतो असें वचन करावें; जसें— पञ्चगवम्[3].

अकारान्त उत्तरपद असलेला द्विगुसमास स्त्रीलिंगीं चालतो, असें वचन करावें; जसें—पञ्चपूली[4], दशपूली.

(वा.३) आप्प्रत्यय शेवटीं असलेलें उत्तरपद असेल तर तो द्विगुसमास विकल्पानें स्त्रीलिंगीं चालतो असें म्हणावें; जसें— पञ्चखट्वी[5], पञ्चखट्वम्.

अन्‌शब्द शेवटीं असलेला असा द्विगुसमास विकल्पानें स्त्रीलिंगीं चालतो आणि अन् यांतील नकाराचा नित्य लोप होतो, असें वचन करावें; जसें— पञ्चतक्षी, पञ्चतक्षम्.

पात्र, त्रिभुवन, युग, वगैरे पात्रादि गणांतील शब्द शेवटीं असलेला द्विगुसमास स्त्री-

---

पूर्वाह्णः; द्व्यहः.

१. अपथ ह्या नञ्तत्पुरुषाला नपुंसकलिंग लागू होतें; उदा०—न पन्थाः अपथम्. येथें समासान्त अप्रत्यय (५।४।७४) आणि टिलोप (६।४।१४४) झाला आहे.

२. पुण्यशब्दाचा अहन्‌शब्दाबरोबर कर्मधारय समास, समासान्त टच्प्रत्यय (५।४।९१) आणि टिलोप (६।४।१४५) झाला आहे.

३. पञ्चानां गवां समाहारः पञ्चगवम्,—समाहारद्विगु. 'गोरतद्धित०' (५।४।९२) यानें समासान्त टच्प्रत्यय झाला आहे.

४. पञ्चानां पूलानां समाहारः पञ्चपूली,—समाहारद्विगु होऊन 'द्विगोः' (४।१।२१) यानें ङीप्प्रत्यय झाला आहे.

५. पञ्चानां खट्वानां समाहारः पञ्चखट्वी, पञ्चखट्वम्,—समाहारद्विगु; 'एकविभक्ति' (१।२।४४) यानें उपसर्जनसंज्ञा; 'गोस्त्रियोः' (१।२।४८) यानें ऱ्हस्व झाला आहे.

## अर्धर्चाः पुंसि च ॥ २ । ४ । ३१ ॥

अर्धर्चादय इति वक्तव्यम् । अर्धर्चम् अर्धर्चः । कार्षापणम् कार्षापणः । गोमयम् गोमयः । सारम् सारः ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । बहुवचननिर्देशादाद्यर्थो गम्यते ॥

## इदमोऽन्वादेशेऽशनुदात्तस्तृतीयादौ ॥ २ । ४ । ३२ ॥

### अन्वादेशे समानाधिकरणग्रहणम्

अन्वादेशे समानाधिकरणग्रहणं कर्तव्यम् । किं प्रयोजनम् ।

### देवदत्तं भोजयेमं चेत्यप्रसङ्गार्थम् ॥ १ ॥

इह मा भूत् । देवदत्तं भोजयेमं च यज्ञदत्तं भोजयेति ॥

### अन्वादेशश्च कथितानुकथनमात्रम् ॥ २ ॥

अन्वादेशश्च कथितानुकथनमात्रं द्रष्टव्यम् । तद्द्वेष्यं विजानीयादिदमा कथितमिदमैव यदानुकथ्यत इति । तदाचार्यः सुहृद्भूत्वान्वाचष्टेऽन्वादेशश्च कथितानुकथनमात्रं द्रष्टव्यमिति ॥

अथ किमर्थमशादेशः क्रियते न

---

लिंगीं चालवूं नये असें वचन करावें; जसें—पञ्चपात्रम्, द्विपात्रम्.

(सू.३१) अर्धर्चाः याचे ऐवजीं अर्धर्चादयः असा शब्द घालावा; उदा०—अर्धर्चः अर्धर्चम्, कार्षापणः कार्षापणम्, गोमयः गोमयम्, सारः सारम्.

तर मग अर्धर्चादयः असा शब्द घातला पाहिजे.

तसा शब्द घालावयास नको. अर्धर्च या शब्दापुढें बहुवचन घातलें आहे त्यावरून अर्धर्चाः याचाच अर्धर्चादिक असा अर्थ मनांत येत आहे.[2]

(सू.३२,वा.१) पूर्वी निर्दिष्ट केलेल्या वस्तूचाच जर पुढें इदम्‌शब्दानें निर्देश केला असेल तरच अन्वादेश समजावा.

काय प्रयोजन ?

देवदत्त भोजय इमं च यज्ञदत्त भोजय, येथें इदंशब्दाला पुढील सूत्रानें (२।४।३४) एन आदेश न व्हावा म्हणून.

(वा.२) ज्या अर्थाचें प्रथमतः प्रतिपादन केलें त्याचेंच पाठीमागून प्रतिपादन करणें एवढ्यालाच अन्वादेश असें म्हणतात. आतां 'पूर्वी इदंशब्दानें दाखविलेल्या अर्थाचें पुनः इदंशब्दानेंच दाखविणें' हा अन्वादेश होय असें जें म्हणतात तें बरोबर नाहीं, ही गोष्ट मित्रत्वाच्या नात्यानें येथें आचार्य वार्तिककार कळवीत आहेत.

आतां या अश्‌आदेशाचें विधान कशासाठीं केलें आहे ? तें करावयास नको. तृतीयादि विभक्ति पुढें असतांना फक्त इदंशब्दाला अनुदात्तच सांगावा. कारण द्वितीया, तृतीयेच्या एकवचनाचा टाप्रत्यय आणि ओस्‌प्रत्यय पुढें असतांना एन-आदेश (२।४।३४) होणारच. त्यांवांचून

---

१. अर्धर्च, गोमय, कषाय, वगैरे अर्धर्चादिगणांतील शब्द पुंलिंगीं आणि नपुंसकलिंगींही चालतात.

२. अर्धर्चः हा शब्द एक असल्यामुळें तेथें बहुवचन घातलें तें संगतवार होत नाहीं. त्यावरून असें अनुमान निघतें की बहुवचन जुळून येईल अशा तऱ्हेचा अर्धर्च या शब्दाचा अर्थ पाणिनीनें मनांत धरिला आहे, म्हणजे अर्धर्च हा शब्द गणपठित शब्दसमुदायाला लावीत आहे. अशा रीतीनें बहुवचनापासून आद्यर्थाची अवगति होत आहे.

१. कांहींएक कार्य सांगण्यासाठीं ज्याचा निर्देश केला असेल त्याचाच फिरून दुसरें कार्य सांगण्यासाठीं निर्देश करणें याला अन्वादेश म्हणतात. हा दुसऱ्यांदा निर्देश इदंशब्दानें केला असेल तर त्या इदंशब्दाला अनुदात्त स्वराचा अश् असा आदेश होतो, तृतीयेपासून पुढील विभक्ति पुढें असतांना; उदा०—आयुराशास्तेऽयं यजमानः, तदस्मै देवा देयासुः.

२. तेव्हां तृतीयादि विभक्ति पुढें असतांना

तृतीयादिष्वित्येवोच्येत । तत्र टायामोसि चैनेन भवितव्यमन्याः सर्वा हलादयो विभक्तयस्तत्रेद्रूपलोपे कृते केवलमिदमोऽनुदात्तत्वमेव वक्तव्यम् ॥ अत उत्तरं पठति ।

## आदेशवचनं साकच्कार्थम् ॥३॥

आदेशवचनं साकच्कार्थं क्रियते । साकच्कस्यापीदम आदेशो यथा स्यात् । इमकाभ्यां छात्राभ्यां रात्रिरधीता अथो आभ्यामहरप्यधीतम् ॥ अथ किमर्थं शित्करणम् ।

## शित्करणं सर्वादेशार्थम् ॥ ४ ॥

शित्करणं क्रियते सर्वादेशार्थम् । शित्सर्वस्येति सर्वादेशो यथा स्यात् । इमकाभ्यां छात्राभ्यां रात्रिरधीता अथो आभ्यामहरप्यधीतमिति । अक्रियमाणे हि शित्करणेऽलोऽन्त्यस्य विधयो भवन्तीत्यन्त्यस्य प्रसज्येत ॥

## न वान्त्यस्य विकार-वचनानर्थक्यात् ॥ ५ ॥

न वा कर्तव्यम् । किं कारणम् । अन्त्यस्य विकारवचनानर्थक्यात् । अकारस्याकारवचने प्रयोजनं नास्तीति कृत्वान्तरेणापि शकारं सर्वादेशो भविष्यति ॥

## अर्थवत्त्वादेशप्रतिषेधार्थम् ॥ ६ ॥

अर्थवत्त्वकारस्याकारवचनम् । कोऽर्थः।आदेशप्रतिषेधार्थम्।येऽन्येऽकारस्यादेशाः प्राप्नुवन्ति तद्बाधनार्थम् । तद्यथा। मो राजि समः क्वौ [८.३.२५] इति मकारस्य मकारवचने प्रयोजनं नास्तीति कृत्वानुस्वारादयो बाध्यन्ते ॥

---

बाकीच्या सर्व विभक्ति हलादिच आहेत. तेथें 'हलि लोपः' (७।२।११३) यानें इद्भागाचा लोप केला असतां इदंशब्दांपैकीं फक्त अकारच राहतो. तेव्हां त्याला अनुदात्ताचें विधान केलें असतां काम भागेल.

(वा.३) अकच् केलेल्याही इदंशब्दाला[३] हा आदेश व्हावा यासाठीं अश्‌आदेशाचें विधान केलें आहे; जसें– इमकाभ्यां रात्रिरधीता, अथो आभ्यामहरप्यधीतम्.

आतां अश् या आदेशामध्यें इत्संज्ञक शकार जोडला आहे तो कशासाठीं ?

(वा.४) अनेकाल्शित्सर्वस्य (१।१।५५) यानें अकज्विशिष्ट सगळ्या इदंशब्दाचे स्थानीं अश्‌आदेश व्हावा यासाठीं त्यांत इत्संज्ञक शकार जोडला आहे; जसें– इमकाभ्यां रात्रिरधीता अथो आभ्यामहरप्यधीतम्. जर शकार जोडला नाहीं तर 'अलोऽन्त्यस्य (१।१।५२) या परिभाषेनें अन्त्याचे स्थानीं हा आदेश करण्याची पाळी येईल.

(वा.५) शकार जोडावयास नको.

काय कारण ?

कारण असें की इदंशब्दाच्या अन्त्य वर्णाला अकाराला अकार करण्यामध्यें कांहीं फायदा नसल्यामुळें शकार जोडल्यावांचूनही हा सगळ्या इदंशब्दाचे ठिकाणीं आदेश होईल.

(वा.६) अकाराला अकार करण्यांत फायदा आहे.

तो फायदा कोणता ?

तो अकारादेश केल्यानंतर त्या अकाराला जे दुसरे आदेश प्राप्त होतात, त्यांचा बाध करणें हा होय; जसें– 'मो राजि समः क्वौ' (८।३।२५) यानें सम्-शब्दाच्या मकाराला मकाराचें विधान करण्यांत कांहीं फायदा नसल्यामुळें त्या मकाराला प्राप्त होणाऱ्या अनु-

---

प्रकृत सूत्रानें अश्‌आदेश सांगितला तरी तो त्या विभक्तीपैकीं टा आणि ओस् पुढें असतांना होत नसतोच.

३. 'हलि लोपः' येथें अकः या पदाची अनुवृत्ति येत असल्यामुळें अकच्प्रत्यय केला असतां त्याची प्रवृत्ति होत नाहीं.

**तस्माच्छित्करणम् ॥ ७ ॥**

तस्माच्छकारः कर्तव्यः। न कर्तव्यः। प्रश्लिष्टनिर्देशोऽयम्। अ अ इति। अनेकाल्शित्सर्वस्य [१.१.५५] इति सर्वादेशो भविष्यति ॥ अथवा विचित्रास्तद्धितवृत्तयः। नान्वादेशेऽकजुत्पत्स्यते ॥

**एतदस्त्रतसोस्त्रतसौ चानुदात्तौ ॥ २। ४। ३३ ॥**

किमर्थं त्रतसोरनुदात्तत्वमुच्यते। उदात्तौ मा भूतामिति। नैतदस्ति प्रयोजनम्। लित्स्वरे कृते निघात एतदोऽनुदात्तत्वेन सिद्धम्। इदमिह संप्रधार्यम्। अनुदात्तत्वं क्रियतां लित्स्वर इति किमत्र कर्तव्यम्। परत्वाल्लित्स्वरः। नित्यमनुदात्तत्वम्। कृतेऽपि लित्स्वरे प्राप्नोत्यकृतेऽपि। तत्र नित्यत्वादनुदात्तत्वे कृते लिति पूर्वं उदात्तभावी नास्तीति कृत्वा यथाप्राप्तः प्रत्ययस्वरः प्रसज्येत। तद्यथा।

---

स्वार वगैरे विधींचा बाध केला जातो. त्याप्रमाणें प्रकृतस्थलींही पररूप वगैरेंचा बाध होऊं लागेल.

(वा.७) म्हणून शकार जोडला आहे.

शकार जोडावयास नको. कारण येथें अ-अ या दोन अकारांचा संधि करून अ असा उच्चार केला आहे. तेव्हां अनेकाल् असल्यामुळें हा अकारादेश सगळ्या इदंशब्दाचे स्थानीं होईल.

अथवा तद्धितवृत्ति या विचित्र आहेत[4]. तेव्हां अन्वादेश असेल तेथें अकच्प्रत्ययाची उत्पत्तिच मुळीं होत नाहीं.

(सू.३३) त्र किंवा तस् या प्रत्ययाला अनुदात्त कशासाठीं सांगितला आहे?

प्रत्ययस्वरानें (३।१।३) ते त्र आणि तस् हे प्रत्यय उदात्त न व्हावेत म्हणून.

हें प्रयोजन बरोबर नाहीं. कारण 'लिति' (६।१।१९३) या लित्स्वरानें[2] प्रत्ययाच्या मागील भागाला उदात्त स्वर केला असतां शेषनिघातस्वरानें(६।१।१५८)त्र आणि तस् या प्रत्ययांचा अनुदात्त स्वर अनायासानेंच साधत आहे.

पण येथें अगोदर असा विचार उत्पन्न होतो की एतद्शब्दाहून त्र, तस्, हे प्रत्यय केल्यानंतर प्रकृत सूत्रानें अनुदात्त अश्आदेश करावा अथवा 'लिति' यानें प्रत्ययाच्या मागील भागाला उदात्त करावा.

मग या उभयतांमध्यें काय बरें करावें?

पर असल्यामुळें 'लिति' यानें उदात्त अगोदर करावा.

पण हा अनुदात्त अश्आदेश नित्य आहे. कारण 'लिति' यानें उदात्त स्वर केला किंवा न केला तरीही ह्याची प्राप्ति येत आहे. तेव्हां नित्य असल्यामुळें एतद्शब्दाला अनुदात्त अश् आदेश केल्यानंतर लकारेत्संज्ञक प्रत्ययाच्या मागील त्या अनुदात्त अकाराला उदात्त करतां येत नसल्यामुळें[3] त्र, तस्, यांचा प्रत्ययस्वरच कायम राहण्याची पाळी येते; जसें—गोष्पदप्रं वृष्टो देवः येथें 'वर्षप्रमाण ऊलोपः०'

---

४. तेभ्यः प्रयोगेभ्यः हिताः तद्धिताः अशी तद्धितशब्दाची व्युत्पत्ति आहे. तेव्हां प्रामाणिक प्रयोग असेल तेवढा साधण्याकरितांच फक्त तद्धितप्रत्यय होत असतो.

१. अन्वादेश असतांना एतद्शब्दाला अनुदात्त असा अश्आदेश होतो, त्र किंवा तस्प्रत्यय पुढें असतांना, आणि तो त्र किंवा तस् हा अनुदात्त होतो; उदा०—एतस्मिन् ग्रामे सुखं वसामः, अतोऽत्राधीमहे, अतो न गन्तास्मः. येथें अतः आणि अत्र हीं पदें सर्वानुदात्त आहेत.

२. त्रल् (५।३।१०) आणि तसिल् (५।३।७) असे हे प्रत्यय मूळचे लित् आहेत.

३. अनुदात्त अशादेश मुद्दाम सांगितला असल्यामुळें त्याच्या जोरावर तो केल्यानंतर त्याला उदात्त करतां येत नाहीं.

गोष्पदप्रं वृष्टो देव इत्यूलोपे कृते पूर्व उदात्तभावी नास्तीति कृत्वा यथाप्राप्तः प्रत्ययस्वरो भवति । तस्मात्त्रतसोरनुदात्तत्वं वक्तव्यम् ॥

**द्वितीयाटौस्स्वेनः ॥ २ । ४ । ३४ ॥**

कस्यायमेनो विधीयते । एतदः प्राप्नोति । इदमोऽपि त्विष्यते तदिदमो ग्रहणं कर्तव्यम् । न कर्तव्यम् । प्रकृतमनुवर्तते । क्व प्रकृतम् । इदमोऽन्वादेशेऽशनुदात्तस्तृतीयादौ [२.४.३२] इति ॥ यदि तदनुवर्तत एतदस्त्रतसोस्त्रतसौ चानुदात्तौ [३३] इतीदमश्चेतीदमोऽपि प्राप्नोति । नैष दोषः । संबन्धमनुवर्तिष्यते । इदमोऽन्वादेशेऽशनुदात्तस्तृतीयादौ । एतदस्त्रतसोस्त्रतसौ चानुदात्तौ इदमोऽन्वादेशेऽशनुदात्तस्तृतीयादावश्भवति । ततो द्वितीयाटौस्स्वेन इदम एतदश्च । तृतीयादाविति निवृत्तम् ॥ अथवा मण्डूकगतयोऽधिकाराः । तद्यथा । मण्डूका उत्प्लुत्योत्प्लुत्य गच्छन्ति तद्वदधिकाराः ॥ अथवैकयोगः करिष्यते । इदमोऽन्वादेशेऽशनुदात्तस्तृतीयादावेतदस्त्रतसोस्त्रतसौ चानुदात्तौ । ततो द्वितीयाटौस्स्वेन इदम एतदश्च ॥ अथवोभयं

---

(३।४।३२) या सूत्रानें पूरधातूहून णमुल् करून ऊकाराचा लोप केला असतां लकारेत्संज्ञक प्रत्ययाच्या मागें उदात्त होण्यास लायक वर्ण नसल्यामुळें उदात्त होत नाहीं. त्यामुळें तेथें प्रत्ययस्वरच कायम राहतो. त्याप्रमाणेंच हें होय. एकंदरींत येथें अनुदात्त अशादेशाचें विधान करणें जरूर आहे.

(सू. ३४) हा एनादेश कोणत्या शब्दाला सांगितला आहे ? एतद्शब्दाला प्राप्त होतो, पण इदंशब्दालाही तो इष्ट आहे म्हणून 'इदमः' असें येथें म्हटलें पाहिजे.

इदमः असें येथें म्हणावयास नको. कारण मागून इदंशब्दाची अनुवृत्ति येत आहे.

तो इदंशब्द मागें कोठें उच्चारला आहे ?

'इदमोऽन्वादेशेऽशनु०' येथें.

जर त्या इदंशब्दाची येथें अनुवृत्ति येत आहे तर 'एतदस्त्रतसो०' या मधल्या सूत्रामध्येंही त्याची अनुवृत्ति होत असल्यामुळें त्यानें सांगितलेला अनुदात्त अशादेश इदंशब्दालाही होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण 'इदमोऽन्वादेशे०' येथें इदंशब्दाचा तृतीयादौ वगैरे ज्या ज्या पदार्थांशीं संबंध झाला आहे त्या संबंधासह त्याची अनुवृत्ति 'एतदस्त्रतसो०' येथें करण्यांत येईल. अर्थात् इदंशब्दाचा त्रतसोः याकडे संबंध होत नाहीं. पुढें 'द्वितीयाटौस्सु०' येथें एतच्छब्दाची आणि इदमोऽन्वादेशे० याचीही अनुवृत्ति करावयाची. पण त्यांतील तृतीयादौ हा शब्द मात्र निवृत्त होतो.

अथवा मंडूकांच्या गतीप्रमाणें अधिकारांची गति असते; म्हणजे बेडूक जसे उड्या मारीत मारीत जातात तसे अधिकारही कांहीं सूत्रें ओलांडून पुढें उड्या मारीत जातात.

किंवा 'इदमोऽन्वादेशेऽशनुदात्तस्तृतीयादावेतदस्त्रतसोस्त्रतसौ चानुदात्तौ' असें दोन्ही मिळून एकच सूत्र करण्यांत येईल.[२] पुढें 'द्वितीयाटौस्सु०' येथें एतद्शब्दाची आणि इदंशब्दाची अनुवृत्ति करावी व तृतीयादौ हें मात्र

---

१. अन्वादेश असतांना आणि द्वितीया, टा व ओस् यांपैकीं प्रत्यय पुढें असतांना इदम् आणि एतद् या शब्दांना एन असा आदेश होतो; उदा०—अनेन व्याकरणमधीतम्, एनं छन्दोऽध्यापय.

२. एकसूत्र केलें तरी त्यांत पोटवाक्यें दोन निरनिराळीं करावयाचीं. तशीं केलीं म्हणजे इदंशब्दाचा त्रतसोः याकडे संबंध होणार नाहीं, आणि एतदः याचा तृतीयादौ याकडे संबंध होणार नाहीं.

निवृत्तं तदपेक्षिष्यामहे ॥

**एनदिति नपुंसकैकवचने ॥ १ ॥**

एनदिति नपुंसकैकवचने कर्तव्यम् । कुण्डमानय प्रक्षालयैनत्परिवर्तयैनत् ॥ यद्येनत्क्रियत एनो न वक्तव्यः । का रूपसिद्धिः अथो एनम् अथो एने अथो एनानीति । त्यदाद्यत्वेन सिद्धम् ॥ यद्येवमेनश्रितको न सिध्यति । एनच्छ्रितक इति प्राप्नोति । यथालक्षणमप्रयुक्ते ॥

## आर्धधातुके ॥ २ । ४ । ३५ ॥

**जग्ध्यादिष्वार्धधातुकाश्रयत्वात्सति तस्मिन्विधानम् ॥ १ ॥**

जग्ध्यादिष्वार्धधातुकाश्रयत्वात्सति तस्मिन्नार्धधातुके जग्ध्यादिभिर्भवितव्यम् ॥ किमतो यत्सति भवितव्यम् ।

**तत्रोत्सर्गलक्षणप्रतिषेधः ॥ २ ॥**

तत्रोत्सर्गलक्षणं कार्यं प्राप्नोति तस्य प्रतिषेधो वक्तव्यः । भव्यम् प्रवेयम् आख्येयमिति । व्यत्यवस्थितेऽनिष्टे

---

अनिवृत्त समजावें.

किंवा इदम्, एतद्, या उभयतांचीही निवृत्ति समजावी. एन हा आदेश कोणाला करावयाचा अशी आकांक्षा आली असतां उदाहरणें पाहून त्या धोरणानें इदम् आणि एतद् या दोन शब्दांना हा एनआदेश होतो असें ठरवावें.

(वा.१) द्वितीयेचें एकवचन पुढें असतां नपुंसकलिंगामध्यें इदम् आणि एतद् या शब्दांचे स्थानीं एनत् असा आदेश होतो असें वचन करावें; उदा०– इदं कुण्डमानय, प्रक्षालयैनत्, परिवर्तयैनत्.

जर एनत् असा आदेश सांगितला तर एन असा आदेश मुळींच सांगावयास नको.

तर मग अथो एनम्, अथो एने, अथो एनानि, या उदाहरणांची सिद्धि कशी बरें होईल?

एनत् आदेश केल्यानंतर 'त्यदादीनामः' (७।२।१०२) यानें अकारादेश केला म्हणजे उदाहरणें साधतील.

असें आहे तर एनश्रितकः[3] हें उदाहरण साधत नाहीं; त्याचे जागीं एनच्छितकः असें होऊं लागेल.

जेथें स्पष्ट प्रयोग उपलब्ध होत नाहीं तेथें सूत्राला धरून जसें रूप होईल तसाच प्रयोग करावा. खरें म्हटलें तर ज्याचा स्पष्ट प्रयोग आढळून येत नाहीं तें सूत्राचें लक्ष्यच नव्हे असें समजावें.

(सू.३५, वा.१) पुढील सूत्रांनीं सांगितलेले जग्धि वगैरे आदेश हे आर्धधातुकाच्या निमित्तानें सांगितले असल्यामुळें तो आर्धधातुक पुढें असतांना ते करावे लागतील.

आर्धधातुक केल्यानंतर आदेश करण्यामध्यें काय बिघडत आहे?

(वा.२) तसें झालें असतां स्थानीच्या निमित्तानें जें कार्य प्राप्त होत आहे त्याच्या निषेधाकरितां वचन करावें लागेल; जसें– भव्यम्, प्रवेयम्, आख्येयम्. येथें अस्, अज्, चक्ष्, हे जे भू, वी आणि ख्या यांचे स्थानी ते

---

३. एनत्-अम्-श्रितक-सु असें असतां द्वितीयातत्पुरुष (२।१।२४) करून सामासिक लुक् (२।४।७१) केला असतां प्रत्ययलक्षणाचा निषेध (१।१।६३) असल्यामुळें त्यदाद्यत्व होणार नाही. एनादेश कर्तव्य असतांना मात्र प्रत्ययलक्षणाचा निषेध होत नाहीं. कारण 'न लुमताऽङ्गस्य' हा निषेध अङ्गस्य या अधिकारांतील कार्य कर्तव्य असतांनाच प्रवृत्त होत असतो, असें गृहीत धरून एनश्रितक हें रूप होतें. वस्तुतः विचार केला तर तसें गृहीत धरणें बरोबर नाहीं. तेव्हां एनश्रितकः असें रूप होतच नाहीं; एतच्छ्रितकः असेंच झालें पाहिजे.

१. 'आर्धधातुके' हें अधिकारसूत्र आहे. तो अधिकार 'ण्यक्षत्रियार्ष०' (२।४।५८) या सूत्रापर्यंत समजावा, व येथील सप्तमी विषयसप्तमी समजावी. तेव्हां येथून पुढें जीं कार्यें सांगितलीं आहेत तीं आर्धधातुक प्रत्यय विवक्षित असतांना होतात.

प्रत्यय आदेशः स्यात्। ण्यतः श्रवणं प्रसज्येत॥ नैष दोषः। सामान्याश्रयत्वाद्विशेषस्यानाश्रयः। सामान्ये ह्याश्रीयमाणे विशेषो नाश्रितो भवति। तत्रार्धधातुकसामान्ये जग्ध्यादिषु कृतेषु यो यतः प्रत्ययः प्राप्नोति स ततो भविष्यति।

**सामान्याश्रयत्वाद्विशेषस्यानाश्रय इति चेदुवर्णाकारान्तेभ्यो ण्यद्विधिप्रसङ्गः॥ ३॥**

सामान्याश्रयत्वाद्विशेषस्यानाश्रय इति चेदुवर्णाकारान्तेभ्यो ण्यत्प्राप्नोति। लव्यम् पव्यमिति। आर्धधातुकसामान्ये गुणे कृते यि प्रत्ययसामान्ये च वान्तादेशे हलन्तादिति ण्यत्प्राप्नोति। इह च दित्स्यम् धित्स्यम् आर्धधातुकसामान्येऽकारलोपे कृते हलन्तादिति ण्यत्प्राप्नोति॥

**पौर्वापर्याभावाच्च सामान्येनानुपपत्तिः॥ ४॥**

पौर्वापर्याभावाच्च सामान्येन जग्ध्यादीनामनुपपत्तिः। न हि सामान्येन पौर्वापर्यमस्ति॥

**सिद्धं तु सार्वधातुके प्रतिषेधात्॥५॥**

---

हलन्त असल्यामुळें त्या धातूंहून अनिष्ट असा ण्यत्प्रत्यय केला असतां ते आदेश होतील, आणि ण्यत्प्रत्ययाचें श्रवण होईल.

हा दोष येत नाहीं. कारण आर्धधातुक सामान्य निमित्त धरलें असल्यामुळें विशेषाची जरूरी नाहीं[२]. जग्धि वगैरे आदेशांना आर्धधातुकत्व हें निमित्त असल्यामुळें विशेष प्रत्यय पुढें असण्याची जरूर नाहीं. तेव्हां आर्धधातुकसामान्य मनांत आणून अगोदरच भू, वी, ख्याञ्, वगैरे आदेश केले असतां ज्याच्यापुढें जो प्रत्यय सरळ प्राप्त होतो तोच प्रत्यय त्याच्यापुढें होईल[३].

(वा.३) आर्धधातुकसामान्य निमित्त धरलें असल्यामुळें विशेष प्रत्यय पुढें असण्याची जरूर नाहीं असें म्हटलें तर उकार आणि अकार शेवटीं असलेल्या धातूंहून ण्यत्प्रत्यय होऊं लागेल[४]; जसें— भव्यम्, पव्यम्. येथें आर्धधातुक प्रत्यय करावयाचा मनांत आणल्याबरोबर अगोदरच गुण (७।३।८४) होईल. नंतर तसाच कृत्यप्रत्यय यकारादि करावयाचा असल्यामुळें गुणानें झालेल्या ओकाराला अवादेश (६।१।८०) केला असतां हलन्ताहून सांगितलेला ण्यत्प्रत्यय होऊं लागेल. तसेंच दित्स्यम्[५], धित्स्यम्, येथें आर्धधातुक प्रत्यय करावयाचा मनांत आल्याबरोबर प्रत्यय करण्याचे पूर्वीच अकाराचा लोप (६।४।४८) केला असतां हलन्ताहून सांगितलेला ण्यत्प्रत्यय होऊं लागेल.

(वा.४) शिवाय आर्धधातुकत्व हें सामान्य निमित्त धरलें तर जाति ही अमूर्त्त असल्यामुळें तिला पौर्वापर्य संभवत नाहीं, म्हणून जग्धि वगैरे आदेश होण्याला अडचण येत आहे.

(वा.५) हें सिद्ध होत आहे.

तें कसें?

---

२. आणि त्यामुळें भव्यम् वगैरे ठिकाणीं वृद्धि (७।२।१५) होऊं लागेल.

३. कृत्यप्रत्ययांना (३।१।९५) आर्धधातुक संज्ञा आहे. अस् वगैरे धातूंहून कृत्यप्रत्यय करावयाचा आहे इतकें मनांत आल्याबरोबर त्या सामान्य आर्धधातुकाच्या निमित्तानें भू वगैरे आदेश होतात. नंतर भू वगैरे धातूच्या शेवटीं अच् असल्यामुळें ण्यत्प्रत्यय (३।१।१२४) न होतां यत्प्रत्यय (३।१।९७) होतो. तेव्हां अर्थात् आर्धधातुके ही विषयसप्तमी फलित होते, आणि आर्धधातुक प्रत्यय पुढें येण्याच्या अगोदरच आदेश प्रवृत्त होतात.

४. आर्धधातुके याप्रमाणें इतर कार्यांचीं निमित्तेंही मनांत आल्याबरोबर तीं तीं कार्यें होतील अशा आशयानें हा दोष दिला आहे.

५. दा व धा या धातूंहून सन्प्रत्यय (३।१।७), द्वित्व (६।१।९), इस्आदेश (७।४।७४), अभ्यासलोप (७।४।५८), इस्आदेशाच्या सकाराला तकार (७।४।४९), होऊन सन्प्रत्यय शेवटीं असलेले असे

सिद्धमेतत् । कथम् । अविशेषेण जग्ध्यादीनुक्त्वा सार्वधातुके नेति प्रतिषेधं वक्ष्यामि । सिध्यति । सूत्रं तर्हि भिद्यते॥

यथान्यासमेवास्तु । ननु चोक्तं जग्ध्यादिष्वार्धधातुकाश्रयत्वात्सति तस्मिन्विधानमिति । परिहृतमेतत्सामान्याश्रयत्वाद्विशेषस्यानाश्रय इति । ननु चोक्तं सामान्याश्रयत्वाद्विशेषस्यानाश्रय इति चेदुवर्णाकारान्तेभ्यो ण्याद्विधिप्रसङ्ग इति । नैष दोषः । वक्ष्यति तत्राज्ग्रहणस्य प्रयोजनमजन्तभूतपूर्वमात्रादपि याथ स्यादिति ॥ यदप्युच्यते पौर्वापर्याभावाच्च सामान्येनानुपपत्तिरिति । अर्थसिद्धिरेवैषा यत्सामान्येन पौर्वापर्यं नास्ति । असति पौर्वापर्ये विषयसप्तमी विज्ञास्यते । आर्धधातुकविषय इति । तत्रार्धधातुकविषये जग्ध्यादिषु कृतेषु यो यतः प्राप्नोति प्रत्ययः स ततो भविष्यति ॥

असें की जग्धि वगैरे ह्या आदेशांना निमित्त म्हणून कांहीं एक धरूं नये. फक्त 'सार्वधातुकेन' असें त्यांचे निषेधाकरितां सूत्र करावें म्हणजे झालें.

अशा रीतीनें अडचण दूर होते हें खरें, पण मूळ सूत्रांत बदल होतो.

तर मग मूळचें जसें सूत्र आहे तसेंच तें असूं दे.

पण मूळचें सूत्र ठेवलें तर आर्धधातुकाच्या निमित्तानें आदेश सांगितले असल्यामुळें ते आर्धधातुक प्रत्यय पुढें केल्यानंतर करावे लागतील असा दोष दाखविला आहे ना ?

आर्धधातुकत्व हें सामान्य निमित्त असल्यामुळें प्रत्यय पुढें असण्याची जरूर नाहीं असा त्याचा परिहार सांगितलाच आहे.

पण तसें म्हटलें तर उकार आणि अकार शेवटीं असलेल्या धातूंहून ण्यत्प्रत्यय होऊं लागेल असा पुनः दोष दाखविला आहे त्याची वाट काय ?

हा दोष येत नाहीं. कारण व्यञ्जन शेवटीं असलेल्या धातूहून ण्यत्प्रत्ययाचें विधान केलें असल्यामुळें अर्थात् स्वर शेवटीं असलेल्या धातूच्या पुढें यत्प्रत्यय होईल. तेव्हां अज्ग्रहण न केलें तरी हरकत नाहीं. असें असतां अज्ग्रहण केल्याचे जोरावर हल्लीं अजन्त नसला तरी देखील जो धातु पूर्वीं केव्हां तरी अजन्त अशा स्वरूपांत पाहिला गेला अशाही धातूच्या पुढें यत्प्रत्ययच व्हावा यासाठीं अज्ग्रहण केलें आहे, असा अज्ग्रहणाचा उपयोग 'अचो यत्' (३।१।९७) या सूत्रावर सांगण्यांत येणार आहे. आतां सामान्य हें अमूर्त्त असल्यामुळें त्याला पौर्वापर्य संभवत नाहीं असा जो आक्षेप घेतला त्यावर उत्तरः— सामान्याशीं पौर्वापर्य संभवत नाहीं ही तुम्हीं अडचण म्हणून दाखविली, परंतु त्यामुळें आम्हांला जें पाहिजे तेंच साधत आहे. म्हणजे पौर्वापर्य संभवत नाहीं म्हणून 'आर्धधातुके' ही विषयसप्तमी समजली जाईल. तेव्हां आर्धधातुकाचा विषय असतां प्रथमतः जग्धि वगैरे आदेश केले असतां मागून ज्याहून जो प्रत्यय सरळ प्राप्त होतो तोच प्रत्यय त्याहून होईल. अथवा, 'आर्धधातुके' याचे ऐवजीं 'आर्धधातुकासु' असें सूत्र करावें. ज्या शब्दव्यक्तींमध्यें आर्धधातुक प्रत्यय आहे अशा शब्दव्यक्ति 'आर्धधातुका' या शब्दानें घेतल्या जातात.

ज्यामध्यें आर्धधातुक प्रत्यय आहे अशा

---

अकारान्त धातु दित्स आणि धित्स हे तयार होतात.

६. सार्वधातुक प्रत्ययांमध्यें निषेध केला म्हणजे अर्थात् आर्धधातुक असेल तेथेंच हे आदेश होतील आणि आर्धधातुक प्रत्यय करण्याच्या पूर्वींही होतील. आर्धधातुकत्व निमित्त न धरल्यामुळें पौर्वापर्याचीही अडचण येत नाहीं.

७. आर्धधातुक शब्दाहून मत्वर्थीय अच्प्रत्यय (५।२।१२७) व स्त्रीलिंगी टाप् (४।१।४) प्रत्यय करून 'आर्धधातुका' असा शब्द सिद्ध होतो.

अथवार्धधातुकास्विति वक्ष्यामि । कास्वार्धधातुकासु । उक्तिषु युक्तिषु रूढिषु प्रतीतिषु श्रुतिषु संज्ञासु ॥

## अदो जग्धिर्ल्यप्ति किति ॥ २ । ४ । ३६ ॥

ल्यब्ग्रहणं किमर्थं न ति कितीत्येव सिद्धम् । ल्यपि कृते न प्राप्नोति । इदमिह संप्रधार्यम् । ल्यप्क्रियतामादेश इति किमत्र कर्तव्यम् । परत्वाल्ल्यप् । अन्तरङ्ग आदेशः । एवं तर्हि सिद्धे सति यल्ल्यब्ग्रहणं करोति तज्ज्ञापयत्याचार्योऽन्तरङ्गानपि विधीन्बहिरङ्गो ल्यब्बाधत इति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । ल्यबादेश उपदेशिवद्वचनमनादिष्टार्थं बहिरङ्गलक्षणत्वादिति वक्ष्यति तन्न वक्तव्यं भवति ॥

जग्धिविधिर्ल्यपि यत्तदकस्मा-
त्सिद्धमदस्ति कितीति विधानात् ।
हिप्रभृतींस्तु सदा बहिरङ्गो
ल्यब्भरतीति कृतं तदु विद्धि ॥

---

शब्दव्यक्ति त्या कोणत्या ?

उच्चारल्या जाणाऱ्या, अर्थानें युक्त अशा, मूळच्या नित्यच पण व्यवहारामध्यें नवीन भासणाऱ्या, ऐकूं येण्याजोग्या आणि अज्ञानी लोकांकरितां ज्यांमध्यें प्रकृतिप्रत्यय वगैरे कल्पना केली जात आहे अशा त्या शब्दव्यक्ति होत.

(सू.३६) येथें ल्यप् हा शब्द घातला आहे तो कशासाठीं ? तो घालावयास नको. कारण तकारादि कित्प्रत्यय पुढें असतांना या म्हणण्यानेंच तेथें काम भागणार आहे.

पण क्त्वाप्रत्ययाला ल्यप्आदेश (७।१।३७) केल्यानंतर तकारादि कित्प्रत्यय नसल्यामुळें जग्धि आदेश प्राप्त होऊं शकत नाहीं.

आतां येथें असा विचार उत्पन्न होतो की प्र– अद्– त्वा असें असतां प्रथमतः त्वा–प्रत्ययाचे स्थानीं ल्यप्आदेश करावा किंवा तकारादि कित्प्रत्यय पुढें असल्यामुळें अद्-धातूचे स्थानीं जग्धिआदेश करावा.

यांत काय बरें करावें ?

पर असल्यामुळें प्रथमतः ल्यप्आदेश करावा.

पण जग्धिआदेश अन्तरङ्ग[२] आहे ना ?

तर मग अशा रीतीनें 'ति किति' यानेंच साधत असतांना ज्यापेक्षां हा आचार्य ल्यप्-शब्द घालीत आहे. त्यापेक्षां 'अन्तरङ्ग अशाही विधींचा बहिरंग अशा ल्यपाकडून बाध होतो' असें तो सुचवीत आहे.

असें सुचविल्याचें काय प्रयोजन ?

ल्यप्आदेश हा बहिरंग असल्यामुळें तो प्रदाय, प्रधाय, वगैरे उदाहरणांमध्यें अन्तरंग अशा हि (७।४।४२), दथ् (७।४।४६), वगैरे आदेशांपेक्षां प्रथमतः होणार नाहीं, म्हणून तो उपदेशींच होतो असें 'समासेऽनञ्पूर्वे क्त्वो ल्यप्' (७।१।३७) या सूत्रावर वचन करणार आहे, तें वचन करावयास नको.

ल्यप् पुढें असतां जो जग्धिआदेश सांगितला आहे तो निष्फल होत आहे. कारण तकारादि कित्प्रत्यय पुढें असतांना त्याचें विधान केलेंच आहे. तथापि हि, दथ्, वगैरे

---

८. आर्धधातुक प्रत्ययाची ज्यामध्यें कल्पना केली अशा शव्य, प्रवेय, आख्येय, वगैरे शब्दव्यक्तींमध्यें प्रकृति, प्रत्यय, वगैरेंची कल्पना कर्तव्य असतांना ह्या आदेशांची कल्पना कसावी असा अर्थ 'आर्धधातुकासु' या अधिकारापासून निष्पन्न होतो. तेव्हां हे आदेश नवीन करावयाचे नसल्यामुळें दोष येत नाहीं.

१. अद्धातूला जग्ध् असा आदेश होतो, ल्यप् किंवा तकारादि कित्प्रत्यय पुढें असतांना; उदा०– प्रजग्ध्य, जग्धः जग्धवान्.

२. ल्यप्आदेशाला समासाची जरूरी असल्यानें तो बहिरंग होय, आणि समासाची जरूर नसल्यामुळें जग्धि हा आदेश अंतरंग होय. तेव्हां अर्थातच जग्धिआदेश अगोदर होईल. तेव्हां ल्यप् हें निराळें निमित्त धरावयास नको.

एष एवार्थः ।
जग्धौ सिद्धेऽन्तरङ्गत्वात्ति कितीति ल्यबुच्यते ।
ज्ञापयत्यन्तरङ्गाणां ल्यपा भवति बाधनम् ।

**लुङ्सनोर्घस्लृ ॥ २ । ४ । ३७ ॥**

**घस्लृभावेऽच्युपसंख्यानम् ॥ १ ॥**

घस्लृभावेऽच्युपसंख्यानं कर्तव्यम् । प्रात्तीति प्रघसः ॥

**[घञपोश्च ॥ २ । ४ । ३८ ॥**

**बहुलं छन्दसि ॥२।४।३९॥**

**लिट्यन्यतरस्याम् ॥ २ । ४ । ४० ॥**

**वेञो वयि ॥ २ । ४ । ४१ ॥]**

**हनो वध लिङि ॥ २ । ४ । ४२ ॥**

**लुङि च ॥ २ । ४ । ४३ ॥**

किमयं वधिर्व्यञ्जनान्त आहोस्विददन्तः । किं चातः । यदि व्यञ्जनान्तो

**वधौ व्यञ्जनान्त उक्तम् ॥ १ ॥**

किमुक्तम् । वध्यादेशे वृद्धितत्वप्रतिषेध इड्विधिश्चेति । अथादन्तो न दोषो भवति । यथा न दोषस्तथास्तु ॥

---

अन्तरङ्ग अशा आदेशांचाही बहिरंग असलेला ल्यप्आदेश बाध करतो म्हणून ह्या प्रकृत सूत्रामध्यें ल्यप्ग्रहण केलें आहे, असें समज.

याच अर्थाचा दुसरा श्लोक आहे तो असाः— जग्धौ इ०.

(सू.३७,वा.१) घस्लृआदेश सांगणाऱ्या ह्या सूत्रामध्यें अच्प्रत्यय पुढें असतांना अद्‌धातूला घस्लृआदेश होतो असें विधान करावें; जसें— प्रात्तीति प्रघसः.

(सू.४२,४३) काय हा वधआदेश ह्रस्व-अकारान्त आहे किंवा व्यंजनान्त म्हणजे धकारान्त आहे ? यांत काय फरक आहे ?

जर वधआदेश व्यंजनान्त असेल तर—

(वा.१) व्यंजनान्त वधधातूविषयीं सांगितलें आहे.

तें काय सांगितलें आहे ?

'वधआदेश केल्यानंतर त्याला वृद्धि आणि तकारआदेश यांचा निषेध करावा, आणि इडागमाचें विधान करावें' असें मागें (१।१।५६, वा.२२) सांगितलेंच आहे.

आतां जर हा वधादेश अकारान्त असेल तर वरील वचन करण्याची पाळी येत नाहीं.

मग ज्या रीतीनें दोष न येईल तसेंच असो.

---

१. लुङ् किंवा सन्प्रत्यय पुढें असतांना अद्‌धातूला घस्लृ असा आदेश होतो; उदा०—अघसत् अघसताम्, जिघत्सति.

२. येथें प्र-उपसर्गपूर्वक अद्‌धातूहून अच्प्रत्यय (३।१।१३४) केला आहे.

१ (३८). अदधातूला घस्लृ आदेश होतो, घञ् किंवा अप्प्रत्यय पुढें असतांना; उदा०—प्रघसः, घासः.

(३९). वेदामध्यें बाहुल्येंकरून अदधातूला घस्लृ आदेश होतो; उदा०—घस्तां नूनम्, सग्धिश्च मे.

(४०). अदधातूला विकल्पानें घस्लृ आदेश होतो, लिट् प्रत्यय पुढें असतांना; उदा०—जघास जक्षतुः, आद आदतुः.

(४१). लिट् पुढें असतां वेञ्धातूला विकल्पानें वय् असा आदेश होतो; उदा०—उवाय ऊयतु ऊयुः, उवाय ऊवतुः ऊवुः.

१. हनधातूला वध असा आदेश होतो, आर्धधातुक लिङ् पुढें असतांना; उदा०—वध्यात् वध्यास्ताम् वध्यासुः.

१. लुङ् पुढें असतां हनधातूला वध असा आदेश होतो; उदा०—अवधीत् अवधिष्टाम् अवधिषुः.

२. वधआदेश हलन्त समजला असतां अवधीत् येथें 'वदव्रज०' (७।२।३) यानें वृद्धि प्राप्त होते. तसेंच ण्वुल्प्रत्यय केला असतां वधादेश केल्यानंतर स्थानिवद्भावानें 'हनस्तो०' (७।३।३२) यानें तकारादेश प्राप्त होतो, आणि अवधीत् येथें 'एकाच उपदेशे०' (७।२।१०) यानें इडागमाचा निषेध प्रसक्त होतो; म्हणून 'वध्यादेशे वृद्धितत्त्व०' इत्यादि वचन करावें लागतें, असा दोष येतो. आणि 'वध' आदेश अकारान्त समजला तर अल्लोपाला 'अचःपरस्मिन्०' (१।१।५७) या स्थानिवद्भावानें व्यवधान होत असल्यामुळें वृद्धि, तत्त्व, वगैरेंची प्राप्तिच येत नाहीं; म्हणून दोष येत नाहीं.

**[ आत्मनेपदेष्वन्यतरस्याम् ॥ २ । ४ । ४४ ॥ ]**

**इणो गा लुङि ॥ २ । ४ । ४५ ॥**

इण्वदिकः ॥ १ ॥

इण्वदिक इति वक्तव्यम् । इहापि यथा स्यात् । अध्यगात् अध्यगाताम् अध्यगुः ॥

**णौ गमिरबोधने ॥ २ । ४ । ४६ ॥**

इण्वदिक इत्येव । अधिगमयति अधिगमयतः अधिगमयन्ति ॥

**सनि च ॥ २ । ४ । ४७ ॥**

इण्वदिक इत्येव । अधिजिगमिषति अधिजिगमिषतः अधिजिगमिषन्ति ॥

**[इङश्च ॥ २ । ४ । ४८ ॥]**

**गाङ्लिटि ॥ २ । ४ । ४९ ॥**

ङित्करणं किमर्थम् ।

**गाङ्यनुबन्धकरणं विशेषणार्थम् ॥१॥**

गाङ्यनुबन्धकरणं क्रियते विशेषणार्थम् । क विशेषणार्थेनार्थः । गाङ्कुटादिभ्योऽञ्णिन्ङित् [१.२.१] इति । गाकुटादिभ्योऽञ्णिन्ङिदितीयत्युच्यमान इणादेशस्यापि प्रसज्येत ॥

---

(सू.४५,वा.१) इण्धातुला उद्देशून सांगितलेलें जें कार्य तें इक्धातूलाही होतें असें वचन करावें, अध्यगात् अध्यगाताम् अध्यगुः येथेंही गा आदेश व्हावा म्हणून.

(सू.४६) इण्वदिकः या वचनानें हाही आदेश इक्धातुला होतो; जसें– अधिगमयति अधिगमयतः अधिगमयन्ति.

(सू.४७) इण्वदिकः या वचनानें हाही आदेश इक्धातुला होतो; जसें– अधिजिगमिषति अधिजिगमिषतः अधिजिगमिषन्ति.

(सू.४९) गाङ् येथें जो ङकार लावला आहे तो कशासाठीं ?

(वा.१) गाङ् या आदेशामध्यें अनुबंध म्हणून जो ङकार लावला आहे तो ह्या गा-आदेशाला ङकारेत्संज्ञक असें विशेषण लागावें म्हणून लावला आहे.

असें विशेषण लावण्याचा कोठें बरें उपयोग होत आहे ?

गाङ्कुटादिभ्योऽञ्णिन्ङित् (१।२।१) येथें. येथें जर ङकार न लावतां 'गाकुटादिभ्यः' असें म्हटलें तर इण्धातूला केलेला जो गाआदेश तोही गाशब्दानें घेतला जाईल.

---

१. हनधातूला विकल्पेंकरून वधआदेश होतो लुङाचे स्थानीं आत्मनेपद पुढें केलें असतांना; उदा०—आवधिष्ट, आवधिषाताम्, किंवा आहत, आहसाताम्.

१. लुङ्प्रत्यय पुढें असतांना इण्धातूला गा असा आदेश होतो; उदा०–अगात्, अगाताम्, अगुः.

१. ज्ञानाखेरीज अर्थाला दाखविणाऱ्या इण्धातूला गम् असा आदेश होतो, णिप्रत्यय पुढें असतांना; उदा०–गमयति गमयतः.

१. सन्प्रत्यय पुढें असतांना ज्ञानाखेरीज अर्थाला दाखविणाऱ्या इण्धातूला गम् असा आदेश होतो; उदा०–जिगमिषति जिगमिषतः जिगमिषन्ति.

१. इङ्धातूला गम् असा आदेश होतो, सन्प्रत्यय पुढें असतांना; उदा०–अधिजिगांसते अधिजिगांसेते अधिजिगांसन्ते.

१. इङ्धातूला गाङ् असा आदेश होतो, लिट्प्रत्यय पुढें असतांना; उदा०–अधिजगे अधिजगाते अधिजगिरे.

२. धातूच्या इत्संज्ञक ङकाराचा उपयोग आत्मनेपद (१।३।१२) होणें हा आहे. परंतु येथें ह्या गाङ्-आदेशाचा स्थानीं जो इङ् त्याच्या इत्संज्ञक ङकारामुळेंच तें काम भागणार आहे. म्हणून ह्या गाङ्-आदेशाच्या ङकाराचा कांहीं उपयोग दिसत नाहीं.

३. इण् गतौ, कर्मणि लुङ्, आताम्, गाआदेश. सिच्, अडागम, अगासातां ग्रामौ देवदत्तेन, येथें चिण्वदिडागमाचे अभावपक्षीं सिचाला ङित्त्व झालें तर 'घुमास्था०' (६।४।६६) यानें ईत्व होऊं लागेल.

**ज्ञापकं वा सानुबन्धकस्यादेशवचन इत्कार्याभावस्य ॥ २ ॥**

अथवैतज्ज्ञापयत्याचार्यः सानुबन्धकस्यादेश इत्कार्यं न भवतीति ॥ किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् ।

**प्रयोजनं चक्षिङः ख्याञ् ॥ ३ ॥**

ङित इत्यात्मनेपदं न भवति ॥

**लटः शतृशानचौ ॥ ४ ॥**

लटः शतृशानचौ प्रयोजनम् । पचमानः यजमान इति । टित इत्येत्वं न भवति ॥

**युवोरनाकौ ॥ ५ ॥**

युवोरनाकौ च प्रयोजनम् । नन्दनः कारकः नन्दना कारिकेति । उगिल्लक्षणौ ङीब्नुमौ न भवतः ॥

**मेश्चाननुबन्धकस्याम्वचनम् ॥ ६ ॥**

मेश्चाननुबन्धकस्याम्वक्तव्यः । अचिनवम् अकरवम् असुनवम् ॥ अत्यल्पमिदमुच्यते मेरिति । तिप्सिब्मिपामिति वक्तव्यम् । इहापि यथा स्यात् । वेद वेत्थ ॥

---

(वा.२) किंवा गाङ् या आदेशामध्यें ङकार अनुबंध लावण्यानें आचार्य असें सुचवितात की जेथें अनुबंधविशिष्ट स्थानीचा निर्देश केला जाईल तेथें त्या स्थानींतील अनुबंधावर अवलंबून असलेलें कोणतेंही कार्य आदेशाला करावयाचें नाहीं.

अशा अर्थाचें ज्ञापन केल्याचें काय फळ?

(वा.३) ज्ञापनाचें फल चक्षिङ्धातूला सांगितलेला ख्याञ्आदेश होय. म्हणजे चख्यौ, ख्यास्यति, येथें स्थानींतील ङित्त्वामुळें 'अनुदात्तङित०' (१।३।१२) यानें सांगितलेलें नित्य आत्मनेपद प्रवृत्त होत नाहीं, तर 'स्वरितञितः' (१।३।७२) यानें आदेशांतील ञित्त्वामुळें पाक्षिक परस्मैपद होतें.

(वा.४) 'लटः शतृशानचा०'(३।२।१२४) या सूत्रानें लटाचे स्थानीं सांगितलेला शानच्आदेश हा पूर्वोक्त ज्ञापनाचें फळ होय. पचमानः, यजमानः, येथें शानच्आदेशाचे स्थानिभूत लटांतील टित्त्वामुळें 'टित आत्मनेपदानाम्०' (३।४।७८) यानें एत्व प्रवृत्त होत नाहीं.

(वा.५) युवोरनाकौ (७।१।१) या सूत्रानें अनुनासिक उकारविशिष्ट अशा यु, वु, शब्दांचे स्थानीं सांगितलेले अन, अक, हे आदेश सदर ज्ञापकाचें फल होत; जसें—नन्दनः कारकः, नन्दना कारिका, येथें आदेशांचे स्थानिभूत अशा यु, वु, यांतील उगित्त्वामुळें 'उगिदचाम्०' (७।१।६९) आणि 'उगितश्च' (४।१।६) यानें नुम् आणि ङीप् होत नाहींत.

(वा.६) 'तस्थस्थमिपाम्०' (३।४।१०१) या सूत्रामध्यें मिप्प्रत्ययांतील पकारअनुबंध काढून टाकून अनुबंधरहित 'मि'प्रत्ययाला अम् आदेश होतो असें विधान करावें. त्यामुळें अचिनवम्, असुनवम्, अकरवम्, वगैरे स्थळीं अम्आदेशाचा स्थानी अनुबन्धविशिष्ट असा निर्दिष्ट नसल्यामुळें तेथें ज्ञापक प्रवृत्त होत नाहीं. तेव्हां अम्आदेश पित् समजल्यामुळें त्याला ङित् (१।२।४) समजतां येत नाहीं, म्हणून गुणाचा निषेध (१।१।५) होत नाहीं.

अनुबंध काढून टाकून मि असा स्थानीचा निर्देश करावा असें जें म्हटलें आहे तें अगदींच थोडें म्हटलें आहे. तिप्, सिप्, मिप्, या तिघांचाही अनुबंध काढून स्थानी या नात्यानें निर्देश केला पाहिजे. कारण वेद, वेत्थ, येथेंही स्थानिभूत ति, सि, यांच्या पित्त्वामुळें णल् व थल् हे आदेश ङित् सम-

---

४. हें ज्ञापक घेतलें म्हणजे येथें इङ् या स्थानीच्या ङकारामुळें होणारें आत्मनेपद गाआदेश झाल्यावर होणार नाहीं म्हणून गाङ् या आदेशाला येथें निराळा ङकार इत्संज्ञक जोडला आहे.

५. आतांपर्यंत ज्ञापकाचे उपयोग दाखविले. आतां त्या ज्ञापकावर आलेले दोष येथून दाखवीत आहेत.

अस्य ज्ञापकस्य सन्ति दोषाः सन्ति प्रयोजनानि। दोषाः समा भूयांसो वा। तस्मान्नार्थोऽनेन ज्ञापकेन। कथं यानि प्रयोजनानि। नैतानि सन्ति। इह तावच्चक्षिङः ख्याञिति ञित्करणसामर्थ्याद्विभाषात्मनेपदं भविष्यति। लटः शतृशानचाविति। वक्ष्यत्येतत्प्रकृतानामात्मनेपदानामेत्वं भवतीति। युवोरनाकाविति। वक्ष्यत्येतत्सिद्धं तु युवोरनुनासिकत्वादिति ॥

**[ विभाषा लुङ्लृङोः ॥२।४।५०॥**
**णौ च संश्चङोः ॥ २ । ४ । ५१ ॥**
**अस्तेर्भूः ॥ २ । ४ । ५२ ॥**
**ब्रुवो वचिः ॥ २ । ४ । ५३ ॥]**
**चक्षिङः ख्याञ् ॥ २ । ४ । ५४ ॥**

किमयं कशादिराहोस्वित्खयादिः।

**चक्षिङः क्शाङ्ख्याञौ ॥ १ ॥**

चक्षिङः ख्याङ्कशादिः खयादिश्च ॥

**खशादिर्वा ॥ २ ॥**

अथवा खशादिर्भविष्यति। केनेदानीं

---

जळें जात नाहींत आणि त्यामुळें गुणाचा निषेध प्रवृत्त होत नाहीं.

एकंदरींत या ज्ञापकावर दोषही येतात आणि त्याला फळेंही मिळतात. त्यांत दोष हे फळांइतकेच असोत किंवा फळांपेक्षां अधिक असोत, दोष आहेत एवढें खरें. त्यामुळें हें ज्ञापक त्याज्य ठरत आहे.

जर हें ज्ञापक त्याज्य आहे तर या ज्ञापकाचीं जीं प्रयोजनें दाखविलीं त्यांची काय वाट ?

त्यांची अन्य तऱ्हेनें उपपत्ति होत असल्या मुळें तीं या ज्ञापकाचीं फळेंच होऊं शकत नाहींत; जसः– चक्षिङः ख्याञ्, येथें स्थानीचें ङित्त्व ख्याञादेशाला लागू होऊन नित्य आत्मनेपद होईल तर ख्याञादेशांतील ञकारानुबंध अगदीं निरुपयोगी ठरेल. तेव्हां त्याचे जोरावर ख्याञादेश केला असतां वैकल्पिकच आत्मनेपद प्रवृत्त होतें अशी कल्पना करणें जरूर आहे. तसेंच 'लटः शतृशानचौ०' याविषयीं असें की 'टित आत्मनेपदानाम्०'(३।४।७९) येथें त्याच्या पूर्वीं (३।४।७८) सांगितलेले जे त, आताम्, वगैरे आत्मनेपदप्रत्यय त्यांनाच तें एत्व होतें असें तेथें सांगावयाचें आहे. 'युवोरनाकौ' (७।७।१) याविषयींही असें की यु आणि वु यांतील यकार आणि वकार हे अनुनासिक आहेत. उकार अनुनासिकच नाहीं, तेव्हां त्याला इत्संज्ञाच नाहीं.

(सू.५४) 'काय ह्या आदेशाच्या आरंभीं ककार आणि शकार हीं दोन व्यंजनें आहेत किंवा खकार आणि यकार हीं दोन व्यंजनें आहेत ?

(वा.१) चक्षिङ्धातूला क्शाञ् आणि ख्याञ् असे दोन्ही आदेश इष्ट आहेत.

(वा.२) अथवा खकार आणि शकार हीं दोन व्यंजनें आरंभीं असलेला असा ख्शाञ् आदेश घ्यावा.

---

१ (५०). लुङ् किंवा लृङ् पुढें असतांना इङ्धातूला विकल्पानें गाङ् असा आदेश होतो; उदा०–अध्यगीष्ट, अध्यैष्ट, अध्यगीष्यत, अध्यैष्यत.

(५१). सन् आहे पुढें ज्याच्या किंवा चङ् आहे पुढें ज्याच्या असा णिप्रत्यय पुढें असतांना इङ्धातूला विकल्पानें गाङ् असा आदेश होतो; उदा०–अधिजिगापयिषति, अध्यापिपयिषति, अध्यजीगपत, अध्यापिपत.

(५२). अस्धातूचे स्थानीं भू असा आदेश होतो, आर्धधातुक प्रत्यय कर्तव्य असतांना; उदा०–बभूव, भविता, भवितुम्.

(५३). ब्रूधातूचे स्थानीं वच् असा आदेश होतो, आर्धधातुक प्रत्यय कर्तव्य असतांना; उदा०–उवाच, ऊचे.

१. चक्षिङ्धातूचे स्थानीं ख्याञ् असा आदेश होतो, आर्धधातुक प्रत्यय कर्तव्य असतांना; उदा०–चख्यौ, चख्ये.

कशादिर्भविष्यति । चर्त्वेन । अथ ख-यादिः कथम् ।

**असिद्धे शस्य यवचनं विभाषा ॥३॥**

असिद्धे शस्य विभाषा यत्वं वक्तव्यम् ॥ किं प्रयोजनम् ।

**प्रयोजनं सौप्रख्ये वुञ्विधिः ॥४॥**

सौप्रख्य इति योपधलक्षणो वुञ्विधिर्न भवति । सौप्रख्यीयः । वृद्धाच्छः [४.२.११४] इति च्छो भवति ॥

**निष्ठानत्वमाख्याते ॥ ५ ॥**

आख्यात इति निष्ठानत्वं न भवति ॥

**रुविधिः पुंख्याने ॥ ६ ॥**

पुंख्यानमिति रुविधिर्न भवति ॥

**णत्वं पर्याख्याने ॥ ७ ॥**

पर्याख्यानमिति णत्वं न भवति ॥

**सस्थानत्वं नमःख्यात्रे ॥ ८ ॥**

---

जर हा आदेश ख्शाञ् असा असेल तर मग तो क्शाञ् असा कशानें बरें होऊं शकेल?

खकाराला 'खरि च' (८।४।५५) यानें चर्त्व केलें म्हणजे क्शादि होईल.

आतां तो आदेश ख्याञ् असा कसा बरें होऊं शकेल?

(वा.३) असिद्धकांडामध्यें णत्वप्रकरणानंतर 'ख्शाञ्आदेशांतील शकाराला विकल्पानें यकार होतो' असें वचन करावें.

असें वचन केल्याचें प्रयोजन काय?

(वा.४) सौप्रख्यम् येथें यकार उपधेला असल्यामुळें प्राप्त झालेला वुञ्प्रत्यय होत नाहीं. तसेंच सौप्रख्यीयः येथें 'वृद्धाच्छः' यानें छप्रत्यय होतो.

(वा.५) आङ्उपसर्गपूर्वक चक्षिङ्धातूला ख्या आदेश करून पुढें निष्ठा क्तप्रत्यय केला असतां आख्यात हा शब्द तयार होतो. तेथें त्या तकाराला 'संयोगादेरातो धातोः०' (८।२।४३) यानें यकार असिद्ध असल्यामुळें नत्व होत नाहीं.

(वा.६) पुंख्यानशब्दामध्यें यकार असिद्ध असल्यामुळें अम्परक खय्पुढें नाहीं म्हणून 'पुमः खय्यम्परे' (८।३।६) यानें पुम्शब्दाला रुत्व होत नाहीं.

(वा.७) पर्याख्यानशब्दामध्यें यकार असिद्ध असल्यामुळें शकारानें व्यवधान होत आहे, म्हणून 'कृत्यचः' (८।४।२९) यानें णत्व होत नाहीं.

(वा.८) नमः ख्यात्रे येथें 'कुप्वोः०' (८।३।३७) यानें विसर्गाला सस्थान म्हणजे जिव्हामूलीय होत नाहीं, तर यत्व असिद्ध असल्यामुळें 'शर्परे०' (८।३।२५) यानें विसर्गच होतो.

(वा.९) वर्जन या अर्थाला दाखविणाऱ्या चक्षिङ्धातूला ख्याङ्आदेश होत नाहीं,

---

२. त्रिपादीमध्यें णत्वप्रकरणाच्या पुढें चर्त्वाच्या पूर्वीं हें वचन करावें. तेव्हां चर्त्व असिद्ध असल्यामुळें त्याच्यापूर्वींच यकार होईल. नंतर खर् पुढें नसल्यामुळें चर्त्व होत नाहीं. जेव्हां हा यकार होत नाहीं तेव्हां चर्त्व होतें. तेव्हां दोन प्रकारचीं रूपें होतात.

३. सुप्रचष्टे सुप्रख्यः, सु, प्र, उपसर्गपूर्वक चक्षिङ् धातूला आर्धधातुक प्रत्यय कर्तव्य असतां ख्शाञ् आदेश केल्यानंतर 'आतश्चोपसर्गे' (३।१।१३६) यानें कप्रत्यय व 'आतो लोपः' (६।४।६४) यानें लोप होतो. शकाराला झालेला यकार असिद्ध असल्यामुळें 'तस्य भावः' या अर्थी 'योपधाद्गुरू०'(५।१।१३२) यानें वुञ्प्रत्यय होत नाहीं, तर ब्राह्मणादित्वास्तव ष्यञ्प्रत्यय (५।१।१२४) होऊन सौप्रख्यम् असें रूप तयार होतें. तसेंच सुप्रख्येन निर्वृत्तो देशः या अर्थीं सुप्रख्यशब्दाहून अण्प्रत्यय (४।२।६८) होतो. नंतर तत्र भवः या अर्थीं त्या सौप्रख्यशब्दाच्या पुढें 'धन्वयोपधा०' (४।२।१२१) यानें वुञ्प्रत्यय होत नाहीं. कारण यकार असिद्ध आहे. तेव्हां वृद्धत्वास्तव छप्रत्यय करून सौप्रख्यीयः असें रूप बनतें.

४. परि, आङ् ह्या उपसर्गांच्या पुढील चक्षिङ्-

नमःख्यात्र इति सस्थानत्वं न भवति ॥

**वर्जने प्रतिषेधः ॥ ९ ॥**

वर्जने प्रतिषेधो वक्तव्यः । अवसंचक्ष्याः परिसंचक्ष्याः ॥

**असनयोश्च ॥ १० ॥**

असनयोश्च प्रतिषेधो वक्तव्यः । नृचक्षा रक्षः । विचक्षण इति ॥

**बहुलं तणि ॥ ११ ॥**

बहुलं तणीति वक्तव्यम् । किमिदं तणीति । संज्ञाछन्दसोर्ग्रहणम् । किं प्रयोजनम् ।

**अन्नवधकगात्रविचक्षणाजिराद्यर्थम् ॥ १२ ॥**

अन्न । अन्नम् । वधक । वधकम् । गात्र । गात्रं पश्य । विचक्षण । विचक्षणः । अजिर । अजिरे तिष्ठति ॥

**[वा लिटि ॥२।४।५५॥]**

**अजेर्व्यघञपोः ॥ २ । ४ । ५६ ॥**

**घञपोः प्रतिषेधे क्यप उपसंख्यानम् ॥ १ ॥**

घञपोः प्रतिषेधे क्यप उपसंख्यानं कर्तव्यम् । इहापि यथा स्यात् । सम-

---

असें वचन करावें; जसें:– अवसंचक्ष्याः, परिसंचक्ष्याः.

(वा.१०) अस् आणि अनप्रत्यय पुढें असतांनाही चक्षिङ्धातूला ख्या आदेश होत नाहीं, असें निषेधाकरितां वचन करावें; जसें:– नृचक्षा रक्षः, विचक्षणः.

(वा.११) संज्ञाशब्दामध्यें आणि वेदामध्यें हे आदेश बाहुल्येंकरून होतात असें वचन करावें.

येथें 'तणि' असा शब्द घातला आहे त्यापासून काय अर्थ मनांत घ्यावयाचा ?

संज्ञा आणि वेद हा त्याचा अर्थ आहे.

या वचनाचें काय प्रयोजन ?

(वा.१२) अन्न, वधक, गात्र, विचक्षण आणि अजिर वगैरे शब्द साधणें हें त्याचें प्रयोजन आहे.

(सू.५६ वा.१) घञ् आणि अप्प्रत्यय पुढें असतांना जो वीआदेशाचा प्रतिषेध केला आहे तेथें क्यप्प्रत्ययाचें ग्रहण करावें. कारण समजनम्, समज्या, येथेंही वीआदेश न झाला पाहिजे.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

---

धातूला ख्याआदेश करून पुढें ल्युट्प्रत्यय (३।३।११५) झाला आहे.

५. वर्जनीय असा याचा अर्थ आहे. अव, सम् या उपसर्गांच्या पुढील चक्षिङ्धातूहून ण्यत्प्रत्यय झाला आहे.

६. चष्ट इति चक्षाः, नृणां चक्षाः नृचक्षाः, चक्षिङ्धातूच्या पुढें असुन्प्रत्यय उणा० ४।२७६ यानें झाला आहे.

७. 'अनुदात्तेतश्च०' (३।२।१४९) यानें युच्प्रत्यय झाला आहे.

८. अन्नशब्दामध्यें अद्धातूहून क्तप्रत्यय केला असतां जग्धिआदेश (२।४।३६) होत नाहीं. वधकशब्दामध्यें हन्धातूहून ण्वुल्प्रत्यय केला असतां वधआदेश (२।४।४२) झाला. गात्रशब्दामध्यें इण्धातूहून ष्ट्रन्प्रत्यय (उणादि ४।१६८) केला असतां गाआदेश (२।४।४५) झाला. विचक्षणशब्दामध्यें चक्षिङ्धातूहून युच्प्रत्यय (३।२।१४९) केला असतां ख्याञ्आदेश होत नाहीं. अजिरशब्दामध्यें अज्धातूहून किरच्प्रत्यय (उणा० १।५४) केला असतां वीआदेश (२।४।५६) होत नाहीं.

१. लिट्प्रत्यय पुढें असतांना चक्षिङ्धातूला ख्याञ्आदेश विकल्पानें होतो; उदा०–आचख्यौ, आचचक्षे.

१. घञ् आणि अप्प्रत्यय खेरीज करून आर्धधातुक प्रत्यय कर्तव्य असतांना अजधातूला वी असा आदेश होतो; उदा०–विवाय विव्यतुः विव्यु.

२. सम्उपसर्गाच्या पुढील अजधातूहून 'संज्ञायां समज०' (३।३।९९) यानें भावे क्यप्प्रत्यय झाला आहे. भाव हा अर्थ दाखविण्याकरितांच 'समजनम्' या भावल्युडन्ताचा प्रयोग केला आहे.

जनं समज्येति ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । अपीत्येव भविष्यति। कथम्। अपीति नेदं प्रत्ययग्रहणम् । किं तर्हि । प्रत्याहारग्रहणम् । क संनिविष्टानां प्रत्याहारः । अपोऽकारात्प्रभृत्या क्यपः पकारात् । यदि प्रत्याहारग्रहणं संवीतिर्न सिध्यति ॥ एवं तर्हि नार्थ उपसंख्यानेन नापि घञपोः प्रतिषेधेन । इदमस्ति चक्षिङः ख्याञ् वा लिटि [२.४.५४; ५५] इति । ततो वक्ष्यामि । अजेर्वी भवति वा व्यवस्थितविभाषा चेति । तेनेह च भविष्यति प्रवेता प्रवेतुम् प्रवीतो रथः संवीतिरिति । इह च न भविष्यति समाजः उदाजः समजः उदजः समजनम् उदजनम् समज्येति । तत्रायमप्यर्थ इदमपि सिद्धं भवति प्राजितेति । किं च भो इष्यत एतद्रूपम् । बाढमिष्यते । एवं हि कश्चिद्वैयाकरण आह । कोऽस्य रथस्य प्रवेतेति । सूत आह । आयुष्मन्नहं प्राजितेति । वैयाकरण आह । अपशब्द इति ।

---

तसें म्हणावयास नको, कारण अप् पुढें असतांना वीआदेश होत नाहीं, असें सूत्रांत म्हटलें आहे तेवढ्यानेंच काम भागेल.

तें कसें ?

सूत्रांतील अप्‌शब्द हा प्रत्यय नव्हे.

तर काय आहे ?

तो प्रत्याहार आहे.

त्या प्रत्याहारामध्यें कोठें उच्चारलेले प्रत्यय घ्यावयाचे बरें ?

'ऋदोरप्' (३।३।५७) येथील अप्‌प्रत्ययाच्या अकाराला आरंभ करून 'व्रजयजोर्भावे क्यप्' (३।३।९८) या सूत्रांतील पकारापर्यंत मध्यें सांगितलेले प्रत्यय त्या प्रत्याहारामध्यें येतात.

जर अप् हा प्रत्याहार असेल तर संवीतिः हें रूप साधत नाहीं.

असें आहे तर मग क्यप्‌प्रत्ययाचें उपसंख्यान करण्यांतही अर्थ नाहीं; आणि घञ् आणि अप् हे प्रत्यय पुढें असतांना वीआदेशाचा निषेध करण्यांतही अर्थ नाहीं. कारण 'चक्षिङः ख्याञ्', 'वा लिटि' अशीं जीं सूत्रें आहेत त्यांच्यापुढें 'अजेर्वी' एवढेंच सूत्र करण्यांत येईल. अजधातूला विकल्पानें वी असा आदेश होतो, असा त्याचा अर्थ व हा व्यवस्थित विकल्प होय. त्यामुळें प्रवेता, प्रवेतुम्, प्रवीतो रथः, संवीतिः, या ठिकाणीं वी आदेश होईल. आणि समाजः, समजः, उदाजः, उदजः, समजनम्, उदजनम्, समज्या, या ठिकाणीं होणार नाहीं.

शिवाय 'प्राजिता' येथें वीआदेश केला नाहीं हाही एक व्यवस्थित विकल्प घेण्यांत फायदाच होतें आहे.

काय हो पण, प्राजिता हें उदाहरण तुम्हांला मान्य आहे काय ?

अलबत मान्य आहे. कारण कोणी एक वैयाकरण पंडित 'या रथाचा प्रवेता (म्ह. हाकणारा) कोण' असें एका सूताला (म्ह. गाडीवाल्याला) विचारीत आहे. त्यावर तो सूत उत्तर देतो की महाराज, मी या रथाचा 'प्राजिता' (म्ह. हाकणारा) आहें'

नंतर त्या सूताला पुनः तो वैयाकरण म्हणतो– 'प्राजिता' असा जो तूं शब्द वापरलास तो अपशब्द आहे.

नंतर तो सूत त्या वैयाकरणाला म्हणतो की– आपण फार शहाणे दिसतां. शास्त्राला

---

३. येथें सम्‌उपसर्गपूर्वक अजधातूहून क्तिन् (३।३।९४) प्रत्यय होऊन अजधातूला प्रकृतसूत्रानें वीआदेश झाला आहे.

४. प्राजिता येथें अजधातूहून तृच्‌प्रत्यय (३।१।१३३) केला आहे. अप् हा प्रत्याहार घेतला तरी तृच्‌प्रत्यय त्या प्रत्याहारामध्यें नसल्यामुळें येथें वीआदेश करण्याचें कारण कांहींच सांगतां येत नाहीं. तेव्हां व्यवस्थित विकल्प घेण्यानेंच हें साधत आहे.

सूत आह । प्राजितो देवानांप्रियो न त्विष्टिज्ञ इष्यत एतद्रूपमिति । वैयाकरण आह । आहो खल्वनेन दुरुतेन बाध्यामह इति । सूत आह । न खलु वेञः सूतः सुवतेरेव सूतो यदि सुवतेः कुत्सा प्रयोक्तव्या दुःसूतेनेति वक्तव्यम् ॥ न तर्हीदानीमिदं वा यौ [२.४.५७] इति वक्तव्यम् । वक्तव्यं च । किं प्रयोजनम् । नेयं विभाषा । किं तर्हि । आदेशोऽयं विधीयते । वा इत्ययमादेशो भवत्यजेर्यौ परतः । वायुरिति ॥

[वा यौ ॥ २ । ४ । ५७ ॥]

ण्यक्षत्रियार्षञितो यूनि लुगणिञोः ॥ २ । ४ । ५८ ॥

अणिञोर्लुकि तद्राजाद्युवप्रत्ययस्योपसंख्यानम् ॥ १ ॥

---

धरून उदाहरण कसें बनतें एवढेंच आपल्याला माहीत आहे. पण शास्त्रकारांना कोणतें उदाहरण इष्ट आहे हें आपणाला ठाऊक नाहीं. प्राजिता हा शब्द तर शास्त्रकारांना इष्ट आहे.

नंतर वैयाकरण रागानें म्हणतो—अरे सूता, तुझ्या या दुरुतानें (म्ह. दुरुक्तीनें) आम्हाला फार पीडा होत आहे.

सूत म्हणतो[६]—सूत हा शब्द वेञ्धातूपासून बनलेला आपण समजत आहांत; पण तसा तो नाहीं, तर षू प्रेरणे या धातूपासूनच बनला आहे. तेव्हां सूत अशा मला 'दुरुतेन' असें जें आपण लागून बोललांत तें तसें न बोलतां दुःसूतेन असें आपण बोलावें.

तर मग आतां 'वा यौ' हें पुढील सूत्र करावयास नको कायँ ?

तें सूत्र तर केलेंच पाहिजे.

काय प्रयोजन ?

'वा यौ' येथें वाशब्द विकल्प या अर्थाचा नव्हे.

तर काय ?

आदेशविधायक हें सूत्र आहे. अज्धातूला 'वा' असा आदेश होतो, युप्रत्यय पुढें असतां, असा त्याचा अर्थ आहे; उदा०— वायुः.

(सू.५८, वा.१) विशेष प्रकारच्या गोत्रप्रत्ययान्ताच्या पुढील अण् आणि इञ् या प्रत्ययांचा जो लुक् सांगितला तेथें तद्राज नांवाचा प्रत्यय शेवटीं असलेल्या शब्दापुढील युवापत्यार्थक कोणत्याही प्रत्ययाचा लुक् होतो,

---

५. वेञ्धातूहून क्तप्रत्यय करून संप्रसारण केलें असतां उत असें रूप बनतें. त्याच्यामागें उत्कृष्ट अशा अर्थाचा सु हा शब्द लाविला असतां 'उत्कृष्ट शब्द गुंफणारा' अशा अर्थाचा 'सूत'शब्द तयार होतो हें मनांत धरून त्या सूताला वैयाकरण म्हणत आहे कीं 'तूं नांवाचा सूत आहेस पण तुझी कृति तर दुरुत दिसते, म्हणून दिलगिरी वाटते. तूं आपल्या नांवाकडे बघून तरी कांहीं लाज धर असा वैयाकरणाच्या मनांतील अभिप्राय आहे.

६. वैयाकरण जरी रागानें बोलला तरी सूत न रागावतां शान्त वृत्तीनेंच त्या वैयाकरणाची समजूत चुकीची आहे असें दाखवीत आहे. तात्पर्य, या संवादावरून प्राजिता हा साधुशब्द आहे असें सिद्ध झालें.

७. व्यवस्थित विकल्प स्वीकारल्यानेंच युप्रत्यय पुढें असतांना अजधातूला वीआदेश विकल्पानें होऊन प्रवयण आणि प्राजन हीं दोन रूपें साधत आहेत, या आशयानें हा प्रश्न केला आहे.

८. 'यजिनमि०' (उणा० ३।२०) या उणादिसूत्रानें अजधातूहून बाहुलकास्तव युच्प्रत्यय. 'वा यौ' या सूत्रानें अजधातूला 'वा' आदेश झाला आहे.

१. अजधातूला वी असा आदेश विकल्पेंकरून होतो, युप्रत्यय (ल्युट्) पुढें असतांना; उदा०— प्रवयणम्, प्राजनम्.

१. गोत्रापत्य या अर्थाला दाखविणाऱ्या ण्यप्रत्ययान्ताहून आणि क्षत्रियाभिधायक किंवा ऋष्यभिधायक जें गोत्रार्थक प्रत्ययान्त त्याहून, अथवा गोत्रापत्यार्थक जो ञकारेत्संज्ञक प्रत्यय तदन्ताहून पुढें युवापत्यार्थी केलेला जो अण् किंवा इञ् त्याचा लुक् होतो; उदा०—कौरव्यः पिता कौरव्यः पुत्रः, श्वाफल्कः पिता श्वाफल्कः पुत्रः, वासिष्ठः पिता वासिष्ठः पुत्रः, तैकायनिः पिता तैकायनिः पुत्रः.

अणिञोर्लुकि तद्राजाद्युवप्रत्ययस्योपसंख्यानं कर्तव्यम् । बौधिः पिता बौधिः पुत्रः । औदुम्बरिः पिता औदुम्बरिः पुत्रः ॥

अपर आह । अणिञोर्लुकि क्षत्रियगोत्रमात्राद्युवप्रत्ययस्योपसंख्यानं कर्तव्यमिति । जाबालिः पिता जाबालिः पुत्रः ।

अपर आह । अब्राह्मणगोत्रमात्राद्युवप्रत्ययस्योपसंख्यानं कर्तव्यम् । किं प्रयोजनम् । इदमपि सिद्धं भवति । भाण्डिजङ्घिः पिता भाण्डिजङ्घिः पुत्रः । कार्णखरकिः पिता कार्णखरकिः पुत्रः ॥

[पैलादिभ्यश्च ॥ २ । ४ । ५९ ॥

इञः प्राचाम् ॥ २ । ४ । ६० ॥

न तौल्वलिभ्यः ॥ २ । ४ । ६१ ॥]

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये द्वितीयस्याध्यायस्य चतुर्थे पादे प्रथममाह्निकम् ।

---

असें वचन करावें; जसें:— बौधिः[2] पिता, बौधिः पुत्रः, औदुम्बरिः पिता, आदुम्बरिः पुत्रः.

अन्य कोणी एक वैयाकरण पंडित म्हणतोः—

अण्[3] आणि इञ् या प्रत्ययांचा जो हा लुक् सांगितला तेथें क्षत्रियगोत्रवाचक प्रत्ययान्ताहून पुढील कोणत्याही युवप्रत्ययाचा लुक् होतो असें मोघम विधान करावें; जसें:— जाबालिः पिता, जाबालिः[4] पुत्रः.

अन्य कोणी एक वैयाकरण म्हणतोः—

ब्राह्मणाशिवाय क्षत्रिय किंवा वैश्य या अर्थाला दाखविणाऱ्या गोत्रप्रत्ययान्ताहून पुढील युवप्रत्ययाचा लुक् होतो असें वचन करावें.

काय प्रयोजन ?

भाण्डिजंघिः पिता, भाण्डिजंघिः[5] पुत्रः; कार्णखरकिः पिता, कार्णखरकिः पुत्रः.

याप्रमाणें भगवान्पतंजलिऋषींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्यांतील दुसऱ्या अध्यायाच्या चौथ्या पादांतील पहिलें आन्हिक समाप्त झालें.

---

२. बुध आणि उदुम्बर या शब्दांहून 'साल्वावयवप्र०' (४।१।१७३) या सूत्रानें गोत्रापत्यार्थी इञ्प्रत्यय; त्यानंतर 'यञिञोश्च' (४।१।१०१) यानें युवापत्य दाखवावयाचें असतां फक्; इञ्प्रत्यय तद्राजसंज्ञक असल्यामुळें त्या फक्प्रत्ययाचा प्रकृत वार्तिकानें लुक् झाला आहे.

३. क्षत्रियगोत्रवाचक तो प्रत्यय असला म्हणजे झालें, तो तद्राजसंज्ञक असला पाहिजे असा आग्रह नाहीं.

४. जबालशब्दाहून गोत्रापत्य या अर्थी इञ् (४।१।९५)प्रत्यय; त्यानंतर फक्प्रत्यय(४।१।१०१); त्याचा लुक्.

५. भण्डिजङ्घ आणि कर्णखरक हे वैश्यजातींतील आहेत. गोत्रापत्यार्थ दाखवावयाचा असतां 'अत इञ्' प्रत्यय; त्याहून फक्प्रत्यय; त्याचा लुक्.

१. पैल, शालङ्कि, वगैरे पैलादिगणपठित शब्दांच्या पुढील युवापत्यार्थाला दाखविणाऱ्या प्रत्ययाचा लुक् होतो; उदा०—पीलाया गोत्रापत्यं पुमान् पैलः. 'स्त्रीभ्यो ढक्' (४।१।१२०) या ढक्प्रत्ययाचा बाध करून 'पीलाया वा' (४।१।११८) यानें अण्पुढें पैलस्यापत्यम् असा अपत्यार्थ दाखवावयाचा असतां 'अणो द्व्यचः' (४।१।१५६) यानें फिञ्; त्याचा लुक्; पैलः पिता पुत्रश्च.

१. गोत्रापत्य या अर्थाला दाखविणारा जो इञ्-प्रत्यय तदन्त शब्दाच्या पुढील युवप्रत्ययाचा लुक् होतो, पण तें गोत्रापत्य पूर्वेकडील लोकांचें असेल तर; उदा०—पूर्वेकडील देशांतील पन्नागार नांवाचा कोणीएक मनुष्य त्याचें गोत्रापत्य हा अर्थ विवक्षित असतां पन्नागारशब्दाहून 'अत इञ्' (४।१।९५) यानें इञ्, पान्नागारिः. त्याचें अपत्य अर्थात् युवापत्य दाखवावयाचें असतां 'यञिञोश्च' (४।१।१०१)यानें फक्; त्याचा या सूत्रानें लुक्; पान्नागारिः पिता पुत्रश्च.

१. तौल्वलि, धारणि, रावणि, वगैरे तौल्वल्यादि गणांतील शब्दांच्या पुढील युवापत्यार्थक प्रत्ययाचा लुक् होत नाहीं. 'इञः प्राचाम्' या सूत्रानें प्राप्त झालेल्या लुकाचा हा प्रतिषेध समजावा; उदा०— तुल्वल नांवाचा पूर्वदेशांतील एक माणूस. त्याचें गोत्रापत्य कळवावयाचें असतां तुल्वलशब्दापुढें 'अत इञ्' यानें इञ्; तौल्वलिः; त्याचें अपत्य अर्थात् युवापत्य कळवावयाचें असतां 'यञिञोश्च' यानें फक्; तौल्वलायनः. येथें फक्प्रत्ययाचा लुक् करावयाचा नाहीं.

## तद्राजस्य बहुषु तेनैवास्त्रियाम् ॥ २।४।६२ ॥

## तद्राजादीनां लुकि समासबहुत्वे प्रतिषेधः ॥ १ ॥

तद्राजादीनां लुकि समासबहुत्वे प्रतिषेधो वक्तव्यः । प्रिय आङ्ग एषां त इमे प्रियाङ्गाः । प्रियो वाङ्ग एषां त इमे प्रियवाङ्गा इति ॥ किमुच्यते समासबहुत्वे प्रतिषेध इति यावता तेनैव चेत्कृतं बहुत्वमित्युच्यते न चात्र तेनैव कृतं बहुत्वम्। भवति वै किंचिदाचार्याः क्रियमाणमपि चोदयन्ति । तद्वा कर्तव्यं तेनैव चेद्बहुत्वमिति समासबहुत्वे वा प्रतिषेधो वक्तव्य इति ॥

## अबहुत्वे च लुग्वचनम् ॥ २ ॥

अबहुत्वे च लुग्वक्तव्यः । अतिक्रान्तोऽङ्गानत्यङ्ग इति । बहुवचने परतो यस्तद्राज इत्येवं च कृत्वा चोद्यते ॥ अथ किमर्थं पुनरिदं न बहुवचन इत्येव सिद्धम्। न सिध्यति । बहुवचन इत्युच्यते न चात्र

---

(सू.६२, वा.१)[2] ह्या सूत्रानें व पुढील सूत्रांनीं जो तद्राज वगैरे प्रत्ययांचा लुक् सांगितला आहे तो समासार्थाची बहुत्वसंख्या असेल तर होत नाहीं असें प्रतिषेधाकरितां वचन करावें; जसें:– प्रियः[3] आङ्गः एषां त इमे प्रियाङ्गाः, प्रियः वाङ्गः एषां ते प्रियवाङ्गाः.

समासार्थाची बहुत्वसंख्या असेल तर लुक् होत नाहीं असें जें म्हटलें आहे तें कशासाठीं ? कारण सूत्रामध्यें 'तेनैव' म्हणजे तद्राज नांवाचा जो प्रत्यय त्याच्या अर्थाची बहुत्वसंख्या असली पाहिजे असें म्हटलें आहे. आणि प्रियाङ्गाः वगैरे उदाहरणांमध्यें तर तद्राजप्रत्ययाचा जो अपत्य हा अर्थ त्याची बहुत्वसंख्या नाहीं.

असें कांहीं तरी एखादे वेळीं होत असतें की एखाद्या ठिकाणीं उपाय करून ठेविला असला तरी पुनः त्याबद्दल आचार्य प्रश्न करतात. तात्पर्य, येथें 'तेनैव चेत्कृतं बहुत्वम्' असें म्हणावें किंवा 'समासबहुत्वे प्रतिषेधः' असें वचन करावें.

(वा.२) बहुवचन पुढें नसतां तद्राजप्रत्ययाचा लुक् होतो असें वचन करावें; जसें:– अतिक्रान्तोऽङ्गान् अत्यङ्गः[4]; अतिवङ्गः. बहुवचनप्रत्यय पुढें असतांना तद्राजप्रत्ययाचा लुक् होतो असा सूत्राचा अर्थ मनांत धरून हें वार्तिक केलें आहे.

तरी पण हें वचन कशास पाहिजे ? अर्थात् वचन करावयास नको. कारण बहुवचन पुढें असतां लुक् होतो अशा अर्थानेंही येथें लुक् करतां येतो.

---

१. बहुत्वसंख्येनें युक्त आणि स्त्रीलिंगी नसलेल्या अशा अर्थाला दाखविणाऱ्या तद्राजप्रत्ययाचा लुक् होतो. 'ते तद्राजाः' (४।१।१७४), ञ्यादयस्तद्राजाः (५।३।११९), या सूत्रांनीं तद्राजसंज्ञा सांगितली आहे; उदा०— इक्ष्वाकुनामक राजाचीं बहुत अपत्यें असा अर्थ कळवावयाचा असतां इक्ष्वाकुशब्दाचे पुढें 'जनपदशब्दात्' (४।१।१४८) यानें अञ्प्रत्यय; त्याचा प्रकृत सूत्रानें लुक् केला असतां इक्ष्वाकूचीं बहुत अपत्यें अशा अर्थाचें इक्ष्वाकवः असें होतें, तसेंच 'पञ्चालाः' वगैरे.

२. बहुषु या शब्दानें 'नामैकदेशे नामग्रहणम्' या न्यायाला अनुसरून बहुवचन हा अर्थ दाखविला जातो. तेव्हां बहुवचनप्रत्यय पुढें असतांना स्त्रीलिंगाला न दाखविणाऱ्या अशा तद्राजप्रत्ययाचा लुक् होतो, असा सूत्रार्थ गृहीत धरून प्राप्त झालेल्या दूषणांच्या निरसनासाठीं हें वार्तिक प्रवृत्त झालें आहे.

३. अङ्ग, वङ्ग, या शब्दांहून त्याचें अपत्य या अर्थी 'जनपदशब्दात्०' (४।१।१६८) यानें अञ्प्रत्यय होऊन वृद्धि (७।२।११७) झाली आहे. नंतर प्रियशब्दाचा आङ्ग व वाङ्ग या शब्दांबरोबर बहुव्रीहिसमास झाला आहे.

४. अङ्गान् अतिक्रान्तः असा द्वितीयातत्पुरुष करतेवेळीं जो अङ्गशब्दाहून द्वितीयाबहुवचनाचा शस्-

बहुवचनं पश्यामः । प्रत्ययलक्षणेन भविष्यति । न लुमता तस्मिन्निति प्रत्ययलक्षणस्य प्रतिषेधः। न लुमताङ्गस्य [१.१.६३] इति वक्ष्यामि । नैवं शक्यम् । इह हि दोषः स्यात् । पञ्चभिर्गार्गीभिः क्रीतः पटः पञ्चगार्ग्यः दशगार्ग्य इति ॥

## द्वन्द्वेऽबहुषु लुग्वचनम् ॥ ३ ॥

द्वन्द्वेऽबहुषु लुग्वक्तव्यः । गर्गवत्सवाजा इति ॥ इह च लुग्वक्तव्यः। गर्गेभ्य आगतं गर्गरूप्यम् गर्गमयमिति॥ इह च

लुक् करतां येणार नाहीं. कारण 'बहुवचन पुढें असतां' असें म्हटलें आहे आणि अत्यङ्गः येथें तर बहुवचन पुढें दिसत नाहीं.

बहुवचनप्रत्ययाचा लुक् झाला तरी देखील प्रत्ययलक्षणानें (१।१।६२) तो प्रत्यय पुढें आहे असें गृहीत धरतां येतें.

पण 'न लुमता तस्मिन्' (१।१।६३) या सूत्रानें प्रत्ययलक्षणाचा निषेध केला असल्यामुळें प्रत्ययलक्षण होणार नाहीं.

'न लुमताऽङ्गस्य' असें मूळचें सूत्र ठेवण्यांत येईल.

अंगाला उद्देशून सांगितलेलें कार्य कर्तव्य असेल तर प्रत्ययलक्षण होत नाहीं अशा अर्थाचें मूळचें सूत्र ठेवणें शक्य नाहीं. कारण पञ्चभिर्गार्गीभिः क्रीतः पटः पञ्चगार्ग्यः, दशगार्ग्यः, या ठिकाणीं दोष येईल.

(वा.३) द्वंद्वसमासामध्यें बहुवचन पुढें नसल्यामुळें तेथें लुक् होण्यासाठीं वचन करावें; जसें:- गर्गवत्सवाजाः. शिवाय गर्गेभ्य आगतं गर्गरूप्यम्, गर्गमयम्, येथेंही लुक् होण्यासाठीं वचन केलें पाहिजे. आणि अत्रयः येथें उदात्तनिवृत्तिस्वर प्राप्त होत आहे.

---

प्रत्यय केला आहे तो पुढें आहे म्हणून तद्राजप्रत्ययाचा लुक् होईल.

५. कारण त्या बहुवचनप्रत्ययाचा सामासिक लुक् (२।४।७१) झाला आहे.

६. लुक्, श्लु व लुप् या शब्दांनीं प्रत्ययाचें अदर्शन झालें असतां तेथें अङ्गाला उद्देशून सांगितलेलें कार्य कर्तव्य असेल तर प्रत्ययलक्षण होत नाहीं असा त्याचा अर्थ आहे. आणि येथें तद्राजप्रत्ययाचा लुक् हा अङ्गाला उद्देशून सांगितला नसून केवळ प्रत्ययाला उद्देशून सांगितला आहे, म्हणून येथें प्रत्ययलक्षणाचा निषेध होत नाहीं.

७. गर्गाच्या गोत्रापत्य स्त्रिया अशा अर्थी गर्गशब्दाहून यञ्प्रत्यय (४।१।१०५); त्यानंतर 'यञश्च' (४।१।१६) यानें ङीप्; पुढें त्या पांच गार्गी स्त्रियांनीं खरेदी केलेला पट या तद्धितार्थी पञ्चभिस्-गार्ग्य-ङी-भिस् येथें 'तद्धितार्थोत्तरपदसमाहारे च' (२।१।५१) यानें द्विगुसमास; भिस्प्रत्ययांचा सामासिक लुक् (२।४।७१); 'तेन क्रीतम्' (५।१।३७) यानें ठक्प्रत्यय; त्याचा 'अध्यर्धपूर्व०' (५।१।२८) यानें लुक्; 'लुक् तद्धितलुकि' (१।१।४९) यानें ङीप्रत्ययाचा लुक्, अशीं कार्यें केलीं असतां पञ्चगार्ग्यः असें रूप बनतें. तेथें प्रत्ययलक्षणानें भिस् हा बहुवचनप्रत्यय पुढें असल्यामुळें 'यञञोश्च' (२।४।६४) यानें यञ्प्रत्ययाचा लुक् होऊं लागेल. कारण यञाचा लुक् हें अङ्गोद्देश्यक नव्हे, म्हणून प्रत्ययलक्षणाचा निषेध येणार नाहीं. येथें अस्त्रियाम् हा लुकाचा निषेध होईल, असें मात्र मानूं नये. कारण 'बहुवचन पुढें असतां' असा अर्थ करणाऱ्याला 'अस्त्रियाम्' हा निषेध नकोच आहे. स्त्रीलिंग असेल तेथें स्त्रीप्रत्ययानें व्यवधान येत असल्यामुळें बहुवचन पुढें असत नाहीं. एकंदरींत 'न लुमताऽङ्गस्य' असें मूळचेंच सूत्र ठेवतां येत नाहीं.

८. गार्ग्यश्च वात्स्यश्च वाज्यश्च असा येथें द्वंद्वसमास झाला आहे. प्रत्येक शब्दाच्यापुढें बहुवचन नाहीं, म्हणून यञ्प्रत्ययाचा लुक् होणार नाहीं; याकरितां वचन केलें पाहिजे. कारण येथें लुक् इष्ट आहे.

९. प्रातिपदिकाहून तद्धित प्रत्यय उत्पन्न होत असल्यामुळें मध्यें विभक्तिप्रत्यय उत्पन्नच झाला नाहीं. तेव्हां बहुवचन पुढें नसल्यामुळें लुक् होणार नाहीं.

१०. अत्रेरपत्यानि या अर्थी 'इतश्चानिञः' (४।१।१२२)यानें अत्रिशब्दाच्यापुढें ढक्प्रत्यय, आणि 'कितः' (६।१।१६५) यानें अन्तोदात्त स्वर होतो. आतां बहुवचन जस्प्रत्यय पुढें असतां 'अत्रिभृगुकुत्स०' (२।४।६५) यानें त्या ढकाचा लुक् केला

अत्रय इत्युदात्तनिवृत्तिस्वरः प्राप्नोति ॥

## सिद्धं तु प्रत्ययार्थबहुत्वे लुग्वचनात् ॥ ४ ॥

सिद्धमेतत्। कथम्। प्रत्ययार्थबहुत्वे लुग्वक्तव्यः॥ यदि प्रत्ययार्थबहुत्वे लुगुच्यतेऽस्त्रियामिति वक्तव्यम्। इह मा भूत्। आङ्ग्यः स्त्रियः वाङ्ग्यः स्त्रिय इति। यस्य पुनर्बहुवचने परतो लुगुच्यते तस्येकारेण व्यवहितत्वान्न भविष्यति। यस्यापि बहुबचने परतो लुगुच्यते तेनाप्यस्त्रियामिति वक्तव्यम्। आम्बष्ठ्याः स्त्रियः सौवीर्याः स्त्रिय इत्येवमर्थम्। अत्रापि चापा व्यवधानम्। एकादेशे कृते नास्ति व्यवधानम्। एकादेशः पूर्वविधौ स्थानिवद्भवतीति स्थानिवद्भावाद्व्यवधानमेव ॥

## द्वन्द्वेऽबहुषु लुग्वचनम् ॥ ५ ॥

द्वन्द्वेऽबहुषु लुग्वक्तव्यः। गर्गवत्सवाजा इति ॥

## गोत्रस्य बहुषु लोपिनो बहुवचनान्तस्य प्रवृत्तौ द्व्येकयोरलुक् ॥ ६ ॥

गोत्रस्य बहुषु लोपिनो बहुवचनान्तस्य प्रवृत्तौ द्व्येकयोरलुग्वक्तव्यः। बिदानाम-

(वा.४) हें सर्व सिद्ध होत आहे.

तें कसें बरें ?

ज्या प्रत्ययाचा लुक् करावयाचा त्या प्रत्ययाच्या अर्थाचें बहुत्व असतां लुक् होतो असा 'बहुषु' याचा अर्थ गृहीत धरला म्हणजे झालें.

जर प्रत्ययाच्या अर्थाचें बहुत्व असतां लुक् होतो असें गृहीत धरलें तर 'अस्त्रियाम्' हा शब्द सूत्रामध्यें ठेवला पाहिजे. कारण अङ्गस्य राज्ञो गोत्रापत्यानि स्त्रियः आङ्ग्यः, वाङ्ग्यः, येथें प्रत्ययार्थबहुत्व असतांही लुक् न व्हावा म्हणून.

आतां ज्याच्या मतानें बहुवचन पुढें असतां लुक् होतो त्याच्या मतीं बहुवचन आणि तद्राजप्रत्यय या उभयतांमध्यें ईकारानें व्यवधान असल्यामुळें लुक् होणार नाहीं.

पण ज्याच्या मतीं बहुवचन पुढें असतां लुक् होतो त्याच्या मतींही सूत्रामध्यें अस्त्रियाम् हा शब्द ठेवलाच पाहिजे. कारण आम्बष्ठ्याः[११] स्त्रियः, सौवीर्याः स्त्रियः, येथें लुक् न झाला पाहिजे.

याही उदाहरणांमध्यें बहुवचन आणि तद्राज या उभयतांमध्यें चाप्प्रत्ययानें व्यवधान असल्यामुळें लुक् येऊं शकणार नाहीं.

पण ञ्यङ्प्रत्ययाच्या अकाराबरोबर चापाचा एकादेश (६।१।१०१) केल्यानंतर व्यवधान येत नाहीं.

त्या एकादेशाला 'अचः परस्मिन्' (१।१।५७) यानें पूर्वाला कार्य कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होऊन व्यवधान होणारेंच[१२].

(वा.५) द्वंद्वसमासामध्यें त्यांतील प्रत्येक प्रत्ययार्थाला बहुत्व नसल्यामुळें लुकाचें विधान करावें;[१३] जसें:– गर्गवत्सवाजाः.

(वा.६) बहुत्वसंख्येनें युक्त अशा गोत्रापत्यार्थाला दाखविणाऱ्या प्रत्ययाचा ज्या ठिकाणीं लुक् प्राप्त होतो त्या ठिकाणीं जर पुढें बहुवचन केलेल्या अशा त्या गोत्रप्रत्ययान्ताहून एक युवापत्य किंवा दोन युवापत्यें असा अर्थ दाखविणारा प्रत्यय कर्तव्य असेल तर

---

तर 'अनुदात्तस्य च०' (६।१।१६१) यानें जस्प्रत्ययाला उदात्तस्वर प्राप्त होतो. तेव्हां अत्रयः हें उदाहरण अन्तोदात्त होऊं लागेल.

११. आम्बष्ठ आणि सौवीर या शब्दांहून त्यांचें अपत्य या अर्थी ञ्यङ्प्रत्यय (४।१।१७१) करून पुढें स्त्रीलिंगी चाप्प्रत्यय (४।१।७४) केला आहे.

१२. तेव्हां 'बहुवचन पुढें असतांना' असा अर्थ करणाऱ्याच्या मतीं सूत्रामध्यें 'अस्त्रियाम्' हा शब्द ठेवावयास नको असें सिद्ध होतें.

१३. तेव्हां 'बहुवचन पुढें असतांना' असा अर्थ घेणाऱ्यालाच हें वचन पाहिजे असें नाहीं, तर 'प्रत्ययार्थ बहुत्व असतांना' असा अर्थ घेणाऱ्यालाही हें वचन पाहिजे.

पत्यं माणवको बैदः। बैदौ ॥ किमर्थमिदं नाचीत्येवालुक्सिद्धः। अचीत्युच्यते न चात्राजादिं पश्यामः। प्रत्ययलक्षणेन। वर्णाश्रये नास्ति प्रत्ययलक्षणम् ॥

**एकवचनद्विवचनान्तस्य प्रवृत्तौ बहुषु लोपो यूनि ॥ ७ ॥**

एकवचनद्विवचनान्तस्य प्रवृत्तौ बहुषु लोपो यूनि वक्तव्यः। बैदस्यापत्यं बहवो माणवका बिदाः। बैदयोर्वा बिदाः। अञ्यो बहुषु यञ्यो बहुष्वित्युच्यमानो लुग्न प्राप्नोति। मा भूदेवम्। अञन्तं यद्बहुषु यञन्तं यद्बहुष्वित्येवं भविष्यति। नैवं शक्यम्। इह हि दोषः स्यात्। काश्यपप्रतिकृतयः काश्यपा इति ॥

ततोऽयमाह यस्य प्रत्ययार्थबहुत्वे लुक्। द्वन्द्वेऽबहुषु लुग्वचनमित्यस्य परि-

---

तेथें त्या गोत्रप्रत्ययाचा लुक् होत नाहीं, असें वचन करावें; जसें:— बिदानाम[१४]पत्यं माणवको बैदः, बैदौ.

हें गोत्रप्रत्ययाचा अलुक् सांगणारें वचन कशासाठीं? हें वचनच करावयास नको. कारण 'गोत्रेऽलुगचि' (४।१।८९) यानेंच लुकाचा निषेध होत आहे.

पण तेथें अचि असें म्हटलें आहे. आणि बैदः, बैदौ, येथें तर गोत्रप्रत्ययाच्या पुढील इञ् हा अजादि प्रत्यय लुक् झाल्यामुळें दिसत नाहीं.

लुक् झाला तरी प्रत्ययलक्षणानें तो पुढें आहे असें म्हणतां येईल. 'वर्णावर अवलंबून असलेलें कार्य कर्तव्य असतांना प्रत्ययलक्षण करूं नये', असा प्रत्ययलक्षणाचा निषेध आहे.

(वा.७) एक किंवा दोन अशा गोत्रापत्यार्थाला दाखविणाऱ्या प्रत्ययाचा लुक् होतो, पण पुढें एकवचन किंवा द्विवचन केलेल्या अशा त्या गोत्रप्रत्ययान्ताहून बहुत युवापत्यें दाखविणारा प्रत्यय कर्तव्य असेल तर, असें वचन करावें; जसें:— बैदस्यापत्यानि बहवो माणवकाः बिदाः, बैदयोर्वा बहूनि अपत्यानि बिदाः. येथें बहुत या अर्थाला दाखविणारा जो यञ् किंवा अञ् हा प्रत्यय त्याचा 'यञञोश्च' यानें लुक् सांगितला असल्यामुळें तो येथें होणार नाहीं म्हणून हें वचन[१५] केलें पाहिजे.

तसा अर्थ केल्यामुळें लुक् न होवो, पण बहुत अशा अर्थाला दाखविणारें यञन्त किंवा अञन्त असा अर्थ केल्यामुळें 'यञञोश्च' यानें लुक् होईल.

बहुत या अर्थाला दाखविणारें यञन्त किंवा अञन्त असा अर्थ करणें[१६] शक्य नाहीं. काश्यपस्य प्रतिकृतयः काश्यपाः येथें अञ्-प्रत्ययाचा लुक् होऊं लागेल.

आतां ज्याच्या मतानें प्रत्ययार्थाचें बहुत्व

---

१४. बिदाचीं बहुत गोत्रापत्यें या अर्थी बिद-शब्दाच्या पुढें 'अनृष्यानन्तर्ये०' (४।१।१०४) यानें अञ्प्रत्यय, आदिवृद्धि (७।२।११७), पुढें युवापत्यार्थी बैद शब्दाच्या पुढें 'अत इञ्' (४।१-९५) यानें इञ्प्रत्यय, त्याचा 'ण्यक्षत्रियार्ष०' (२।४।५८) यानें लुक्, बैदः; बैदौ. येथें बहुत्वार्थी उत्पन्न झालेल्या गोत्रप्रत्ययाचा 'यञञोश्च' (२।४।६४) यानें लुक् प्राप्त झाला आहे त्याच्या निषेधाकरितां हें वचन केलें पाहिजे. 'बहुवचन पुढें असतांना' असा अर्थ येथें करणाऱ्याच्या मतीं 'यञञोश्च' या पुढील सूत्रामध्येंही तसाच अर्थ होईल आणि बैदः, बैदौ, येथें बहुवचन पुढें नसल्यामुळेंच लुक् होणार नाहीं, म्हणून वचन करावयास नको.

१५. अर्थातच 'बहुवचन पुढें असतांना' असा अर्थ घेणाऱ्याच्या मतीं येथें सूत्रानेंच लुक् होत असल्यामुळें हेंही वचन करावयास नको.

१६. कश्यपाचें एक गोत्रापत्य या अर्थी कश्यप-शब्दाहून अञ्प्रत्यय (४।१।१०४), आदिवृद्धि, पुढें त्या काश्यपाच्या अनेक प्रतिकृति या अर्थी त्या काश्यपशब्दाहून 'इवे प्रतिकृतौ' (५।३।९६) यानें कन्प्रत्यय, त्याचा 'जीविकार्थे चापण्ये' (५।३।९९) यानें लुप् केल्यामुळें काश्यप हें अञन्त बहुत्वार्थक होत आहे, म्हणून लुक् प्राप्त होतो. सबब बहुत्वार्थक जें अञन्त असा 'यञञोश्च' याचा अर्थ करणें बरोबर नाहीं.

हारो

**न वा सर्वेषां द्वन्द्वे बह्वर्थत्वात् ॥८॥**

न वैष दोषः । किं कारणम् । सर्वेषां द्वन्द्वे बह्वर्थत्वात् । सर्वाणि द्वन्द्वे बह्वर्थानि । कथम् । युगपदधिकरणविवक्षायां द्वन्द्वो भवति ॥

ततोऽयमाह यस्य बहुवचने परतो लुक् । यदि सर्वाणि द्वन्द्वे बह्वर्थान्यहमपीदमचोद्यं चोद्ये द्वन्द्वेऽबहुषु लुग्वचनमिति । ममापि ह्यत्र सर्वत्र बहुवचनं परं भवति । लुकि कृते न प्राप्नोति । प्रत्ययलक्षणेन । न लुमता तस्मिन्निति प्रत्ययलक्षणस्य प्रतिषेधः । न लुमताङ्गस्येति वक्ष्यामि । ननु चोक्तं नैवं शक्यमिह हि दोषः स्यात् पञ्चभिर्गार्गीभिः क्रीतः पटः पञ्चगार्ग्यः दशगार्ग्य इति । इष्टमेवैतत्सं-

---

असतांना लुक् होतो, तो 'द्वंद्वेऽबहुषु लुग्वचनम्' यावर उत्तर सांगत आहे—

(वा.८) द्वंद्वांतील घटक प्रत्येक शब्द बहुत्वार्थवाची नसल्यामुळें तेथें लुक् होणार नाहीं, असा जो दोष दिला आहे तो दोष येत नाहीं.

काय कारण ?

द्वंद्वसमासांतील घटक प्रत्येक पदाला बह्वर्थप्रतिपादकत्व आहे म्हणून.

तें बह्वर्थप्रतिपादकत्व कसें ?

द्वंद्वांतील प्रत्येक शब्द आपला स्वतःचा अर्थ दाखवून त्याच वेळीं आपल्या शेजारच्या सर्वही पदांचा अर्थ दाखँवितो अशा वेळीं द्वंद्वसमासाचें विधान केलें आहे म्हणून.

यानंतर ज्याच्या मतानें बहुवचन पुढें असतांना लुक् होतो तो म्हणत आहे की जर द्वंद्वांतील सर्व शब्द बह्वर्थाला दाखवितात तर मी असें म्हणतों की 'द्वंद्वांतील प्रत्येक शब्दापुढें बहुवचन नसल्यामुळें तेथें लुकाचें विधान केलें पाहिजे', असा भलताच आक्षेप तूं माझ्यावर घेत आहेस. कारण ज्या रीतीनें तुझ्या मतीं द्वंद्वांतील प्रत्येक शब्द बह्वर्थ दाखवीत आहे त्याच रीतीनें द्वंद्वांतील प्रत्येक शब्दापुढें बहुवचनच उत्पन्न होणार आहे असें मलाही म्हणतां येतें.

पण यञाचा लुक् करण्यापूर्वींच तें बहुवचन लुकानें नाहींसें होत आहे ना ?

नाहींसें झालें तरी प्रत्ययलक्षणानें तें पुढें आहे, असें समजण्यांत येईल.

पण 'न लुमता तस्मिन्' (१।१।६३) ह्या सूत्रानें त्या प्रत्ययलक्षणाचा निषेध केला आहे ना ?

तेथें 'न लुमताऽङ्गस्य' असें सूत्र आहे. पण 'न लुमताङ्गस्य' असें मूळचेंच सूत्र ठेवतां येत नाहीं. कारण तसें सूत्र ठेवलें तर पञ्चभिः गार्गीभिः क्रीतः पटः पञ्चगार्ग्यः, दशगार्ग्यः, येथें यञाचा लुक् हा अंगाला उद्देशून नसल्यामुळें प्रत्ययलक्षणाचा निषेध होणार नाहीं. तेव्हां प्रत्ययलक्षणानें भिसाचा आश्रय करून यञाचा लुक् होऊन पञ्चगर्गः इत्यादि अनिष्ट प्रयोग होईल, असा दोष मागें दाखविला आहे ना ?

हें अनिष्ट नसून इष्टाचाच संग्रह आहे. कारण येथें यञ्प्रत्ययाचा लुक् होऊन पञ्च-

---

१७. घटपटौ इत्यादि द्वंद्वांमध्यें प्रत्येक शब्दाला आपापला अर्थ दाखविण्याची शक्ति असून आपल्या शेजारच्या शब्दाचा अर्थ दाखविण्याची शक्ति येते ती द्वंद्वामध्यें दुसऱ्या शब्दाच्या सांनिध्याचे जोरावर येते अशी कल्पना आहे. तेव्हां घट हा शब्द घटपट या दोन अर्थांना दाखवितो. याला शास्त्रामध्यें 'युगपदधिकरणवचनतापक्ष' म्हणतात. तेव्हां गार्ग्यश्च वात्स्यश्च वाज्यश्च या द्वंद्वामध्यें प्रत्येक यञन्त शब्दाला बहुत्वार्थप्रतिपादकत्व असल्यामुळें 'यञञोश्च' (२।४।६४) हा लुक् होण्यास कांहींही अडचण नाहीं; तेव्हां त्याकरितां वचन नको.

गृहीतम् । पञ्चगर्गः दशगर्ग इत्येव भवितव्यम् ॥ तथेदमपरमचोद्यं चोद्ये गर्गरूप्यम् गर्गमयम् । अत्रापि बहुवचन इत्येव सिद्धम् । कथम् । समर्थात्तद्धित उत्पद्यते सामर्थ्यं च सुबन्तेन ॥

ततोऽयमाह यस्य प्रत्ययार्थबहुत्वे लुक् । यदि समर्थात्तद्धित उत्पद्यतेऽहमपीदमचोद्यं चोद्ये गोत्रस्य बहुषु लोपिनो बहुवचनान्तस्य प्रवृत्तौ द्व्येकयोरलुगिति । कथम् । यस्यापि बहुवचने परतो लुक्तेनाप्यत्रालुग्वक्तव्यः । तस्यापि ह्यत्र बहुवचनं परं भवति ॥ न वक्तव्यः । अचीत्येवालुक्सिद्धः । अचीत्युच्यते न चात्राजादिं पश्यामः । प्रत्ययलक्षणेन । ननु चोक्तं वर्णाश्रये नास्ति प्रत्ययलक्षणमिति । यदि वा कानिचिद्वर्णाश्रयाण्यपि प्रत्ययलक्षणेन भवन्ति तथेदमपि भविष्यति ॥ अथवाविशेषेणालुकमुक्त्वा हलि नेति

---

गर्गः, दशगर्गः, असेंच होणें इष्ट आहे. तसेंच आणखीही दुसरा एक भलता आक्षेप गर्गरूप्यम्, गर्गमयम्, या उदाहरणांसंबंधानें तूं माझ्यावर दिला आहेस. तेथेंही 'बहुवचन पुढें असतां लुक् होतो' असें गृहीत धरलें तरी लुक् साधत आहे.

तो कसा ?

असा की 'समर्थानां प्रथमाद्वा' असा अधिकार चालू असल्यामुळें आपला अर्थ लोकांच्या मनांत आणून देण्याविषयीं समर्थ असा जो शब्द त्याहून तद्धितप्रत्यय उत्पन्न होत असतो. तें सामर्थ्य तो शब्द सुबन्त बनल्यानेंच उत्पन्न होतें.[१९]

आतां ज्याच्या मतानें प्रत्ययाच्या अर्थाचें बहुत्व असतां लुक् होतो, तो म्हणत आहे की 'गोत्रस्य बहुषु लोपिनो बहुवचनान्तस्य प्रवृत्तौ द्व्येकयोरलुक्' (वा.६) असें वचन मला करावें लागेल, असा जो आक्षेप करीत आहेस, तो आक्षेप सुबन्ताहून तद्धितप्रत्यय उत्पन्न होत असेल तर माझ्यावर तूं भलताच दोष देत आहेस.

तो कसा ?

ज्या तुझ्या मतानें बहुवचन पुढें असतांना लुक् होतो त्या तुलाही तेथें लुक् न व्हावा यासाठीं वचन केलेंच पाहिजे. कारण प्रत्ययलक्षणानें तेथें तुझ्याही मतीं बहुवचन पुढें आहेच.

पूर्वोक्त स्थलीं गोत्रप्रत्ययाचा अलुक् सांगावयास नको. कारण 'गोत्रेऽलुगचि' (४।१।८९) यानेंच तेथें अलुक् साधत आहे.

पण येथें अच् पुढें असतांना असें म्हटलें आहे, आणि प्रकृत उदाहरणामध्यें तर अजादि प्रत्यय पुढें दिसत नाहीं.

प्रत्ययलक्षणानें अजादि प्रत्यय पुढें आहे.

पण 'वर्णावर अवलंबून असलेलें कार्य कर्तव्य असतां प्रत्ययलक्षण करूं नये' असा निषेध आहे, असें पूर्वी सांगितलें आहे ना ?

जर कांहीं एक वर्णावर अवलंबून असलेलींही कार्यें प्रत्ययलक्षणानें होत असतांत तर त्याप्रमाणें हेंही होईल.

किंवा कांहीं एक विशेष निमित्त न धरतां 'गोत्रेऽलुक्' एवढेंच सूत्र करून कोणताही प्राग्दीव्यतीय प्रत्यय विवक्षित असतांना गोत्र-

---

१८. टीप ९ पहावी.

१९. तेव्हां गार्ग्य या प्रातिपदिकाहून रूप्यप्रत्यय न होतां गार्ग्य-भ्यस् या सुबन्ताहूनच होणार आहे. तो भ्यस् हा बहुवचनप्रत्यय प्रत्ययलक्षणानें पुढें असल्यामुळें लुक् साधत आहे.

२०. जें कार्य केवळ वर्णावर अवलंबून नसून त्या वर्णानें युक्त अशा समुदायावर अवलंबून असतें तें कार्य प्रत्ययलक्षणानें होतें; जसें—अतृणेट्; हें तृहधातूचें लङाचें प्रथमैकवचनी क्रियापद आहे. येथें तिप्प्रत्ययाचा लोप (६।१।६८) झाल्यानंतर प्रत्ययलक्षणानें हलादिपित् सार्वधातुकप्रत्यय पुढें आहे असें समजून इमागम (७।३।९२) होतो.

वक्ष्यामि ॥ यद्यविशेषेणालुकमुक्त्वा हलि नेत्युच्यते बिदानामपत्यं बहवो माणवका बिदाः अत्राप्यलुक्प्राप्नोति । अस्तु । पुनरस्य युवबहुत्वे वर्तमानस्य लुग्भविष्यति । पुनरलुकस्मान्न भवति । समर्थानां प्रथमस्य गोत्रप्रत्ययान्तस्यालुगुच्यते न चैतत्समर्थानां प्रथमं गोत्रप्रत्ययान्तम् । किं तर्हि । द्वितीयमर्थमुपसंक्रान्तम् ॥ अवश्यं चैतदेवं विज्ञेयमत्रिभरद्वाजिका वसिष्ठकश्यपिका भृग्वङ्गिरसिका कुत्सकुशिकि-

---

प्रत्ययाचा अलुक् सांगून नंतर 'हलि न', हल् पुढें असतां गोत्रप्रत्ययाचा अलुक् होत नाहीं, असें सांगावें.

जर तसा मोघम अलुक् सांगून त्याचा हल् पुढें असतांना निषेध सांगण्यांत येईल तर बिदानामपत्यं बहवो माणवका बिदाः येथेंही पुढें युवापत्य या अर्थी प्रत्यय कर्तव्य असतांना गोत्रप्रत्ययाचा अलुक् होईल, व बैद याहून प्रत्यय होईल.

वरील उदाहरणामध्यें गोत्रप्रत्ययाचा अलुक् झाला तर होऊं दे. युवापत्य या अर्थी केलेल्या इञ्प्रत्ययाचा 'ण्यक्षत्रियार्षञितो०' (२।४।५८) यानें लुक् केल्यानंतर बहुत युवापत्यें या अर्थाला दाखविणाऱ्या बैद या अञन्तांतील अञ्प्रत्ययाचा 'यञञोश्च' यानें लुक् होईल[21].

लुक् होईल हें खरें, पण 'गोत्रेऽलुक्' यानें अलुक्ही प्राप्त होत आहे, तेव्हां अलुक् कां बरें होऊं नये ?

'गोत्रेऽलुक्' या मोघम सूत्रामध्यें 'समर्थानां प्रथमाद्वा' हा अधिकार येत असल्यामुळें आपला अर्थ लोकांच्या मनांत आणून देण्याविषयीं समर्थ जीं पदें त्यांतील प्रथमोच्चारित जें गोत्रप्रत्ययान्त त्यांतील गोत्रप्रत्ययाचा अलुक् सांगितला आहे. आणि प्रकृतस्थलीं युवापत्यार्थाला दाखविणारा जो अञन्त बैदशब्द हा समर्थांमध्यें प्राथमिक गोत्रप्रत्ययान्त नव्हे, तर गोत्रापत्याच्या पुढील दुसरा जो युवापत्यार्थ त्या अर्थाप्रत प्राप्त झाला आहे. आणि प्राथमिक जो प्रत्यय त्याच्या अर्थालाच दाखविणाऱ्या यञन्तांतील किंवा अञन्तांतील प्रत्ययाचा अलुक् होतो असें अवश्य गृहीत धरलें पाहिजे. अत्रिभरद्वाजिका[22], वसिष्ठकश्यपिका, भृग्वङ्गिरसिका, कुत्सकुशिकिका,

---

२१. अपत्याधिकारावांचून अन्य ठिकाणीं गोत्रशब्दाचा सामान्य अपत्य एवढाच मोघम अर्थ समजावयाचा असल्यानें हें अञन्त युवापत्य बहुत्वाला दाखवितें; तरीही लुक् होण्यास अडचण नाहीं.

२२. अत्रीचीं बहुत अपत्यें या अर्थी अत्रिशब्दाहून 'इतश्चानिञः' (४।१।१२२) यानें ढक्प्रत्यय. तसेंच भरद्वाजाचीं बहुत अपत्यें या अर्थी भरद्वाजशब्दाहून 'अनृष्यानन्तर्ये०' (४।१।१०४) यानें अञ्प्रत्यय. नंतर बहुत युवापत्यें दाखवावयाचीं असतां त्या प्रत्येक शब्दापुढें 'अत इञ्' (४।१।९६) यानें इञ्प्रत्यय, त्याचा 'ण्यक्षत्रियार्ष०' (२।४।५८) यानें लुक्. अत्रिशब्दाच्या पुढील ढक्प्रत्ययाचा 'अत्रिभृगुकुत्स०' (२।४।६५) यानें लुक् व भरद्वाजशब्दापुढील अञ्प्रत्ययाचा 'यञञोश्च' (२।४।६४) यानें लुक्. पुढें अत्रिभरद्वाजानां मैथुनिका असा अर्थ कळवावयाचा असतां अत्रिभरद्वाज या द्वंद्वापुढें 'द्वंद्वाद्वुन् वैरमैथुनिकयोः' (४।३।१२५) यानें वुन्प्रत्यय. त्याला अकादेश केल्यानें 'अत्रींचीं युवापत्यें आणि भरद्वाजाचीं युवापत्यें यांचा परस्परविवाह' अशा अर्थाचा 'अत्रिभरद्वाजिका' हा शब्द तयार होतो. गोत्राच्या पुढील दुसरा जो अपत्यार्थ (म्ह. युवापत्यार्थ) त्या अर्थाला दाखविणाऱ्याही अञन्तांतील अञाचा अलुक् करणें इष्ट असेल तर 'गोत्रेऽलुगचि' असें सूत्र आहे त्या वेळींही भरद्वाजशब्दापुढील अञाचा अलुक् करणें प्राप्त होत आहे. सबब प्रथमतः ज्या अपत्यार्थाला दाखविणारा प्रत्यय केला त्याच अपत्यार्थाला दाखविणाऱ्या अञन्तांतील अञाचा अलुक् होतो. आणि दुसऱ्या वेळीं ज्या अपत्यार्थी प्रत्यय केला त्या दुसऱ्या अपत्यार्थाला दाखविणाऱ्या अञन्तांतील अञाचा अलुक् होत

केत्येवमर्थम् ॥ गर्गभार्गविकाग्रहणं वा क्रियते तन्नियमार्थं भविष्यति।एतस्यैव द्वितीयमर्थमुपसंक्रान्तस्यालुग्भवति नान्यस्येति ॥ यदप्युच्यत एकवचनद्विवचनान्तस्य प्रवृत्तौ बहुषु लोपो यूनि वक्तव्य इति । मा भूदेवमङ्यो बहुषु यङ्यो बहुष्विति । अञन्तं यद्बहुषु यञन्तं यद्बहुष्वित्येवं भविष्यति । ननु चोक्तं नैवं

---

येथें लुक् व्हावा म्हणून.

किंवा गोपवनादिगणामध्यें गोत्रप्रत्ययाच्या लुकाच्या प्रतिषेधासाठीं गर्गभार्गविका या शब्दाचा पाठ केला आहे, तो नियमार्थ समजला जाईल. तो नियम असाः— दुसऱ्यांदा केलेला जो अपत्यप्रत्यय त्या प्रत्ययाच्या अर्थाला दाखविणाऱ्या गोत्रप्रत्ययान्तांतील गोत्रप्रत्ययाचा अलुक् करणें झाल्यास 'गर्गभार्गविका'[२३] या ठिकाणींच करावा, अन्य ठिकाणीं करूं नये.

आतां 'एकवचनद्विवचनान्तस्य प्रवृत्तौ बहुषु लोपो यूनि' (वा.७) असें वचन 'प्रत्ययार्थबहुत्व असतांना लुक् होतो' असा अर्थ घेणाऱ्याच्या मतीं केलें पाहिजे असें जें म्हटलें आहे, त्यावर उत्तरः— बहुत गोत्रापत्यें या अर्थाला दाखविणारा जो यञ् किंवा अञ् हा प्रत्यय त्याचा लुक् असा 'यञञोश्च' याचा अर्थ गृहीत धरला असतां 'बैदस्य बैदयोर्वा बहूनि अपत्यानि' या अर्थाला दाखविणाऱ्या बैदशब्दांतील अञाचा लुक् होऊं शकत नाहीं, तरी पण बहुत अपत्यें अशा अर्थाला दाखविणारा जो यञन्त किंवा अञन्त शब्द त्यांतील प्रत्ययाचा लुक्, असा

---

नाहीं, असें जरूर स्वीकारलें पाहिजे. वसिष्ठशब्दाच्या पुढें अपत्यार्थीं 'ऋष्यन्धक०' (४।१।११४) यानें अण्. कश्यपशब्दापुढें बिदादित्वास्तव अञ्. पुढें युवापत्यार्थीं प्रत्येकाचे पुढें इञ्, त्याचा लुक्, अण् व अञ् यांचाही लुक्, नंतर वुन्, त्याला अकादेश केल्यानें 'वसिष्ठकश्यपिका' असें रूप बनतें. वसिष्ठाचीं युवापत्यें व कश्यपाचीं युवापत्यें या उभयतांचा विवाह असा त्याचा अर्थ होय. भृगुऋषीचीं आणि अङ्गिरस्ऋषीचीं बहुत गोत्रापत्यें दाखवावयाचीं असतां 'ऋष्यन्धक०' (४।१।११४) यानें ऋषित्वास्तव प्रत्येक शब्दाच्या पुढें अण्, नंतर प्रत्येक शब्दापुढें युवापत्यार्थीं अत इञ्, त्या इञाचा 'ण्यक्षत्रियार्ष०' (२।४।४८) यानें लुक्, अणाचाही 'अत्रिभृगुकुत्स०' (२।४।६५) यानें लुक्, नंतर वुन् प्रत्यय, त्याला अकादेश केला असतां भृगवङ्गिरसिका असें रूप तयार होतें. कुत्सशब्दाच्या पुढें ऋषित्वास्तव अण्, कुशिकशब्दाच्या पुढें बिदादित्वास्तव अञ्, पुढें युवापत्यार्थी इञ्, त्याचा लुक्, अण व अञ् यांचा लुक् , वुन्, अकादेश,- कुत्सकुशिकिका.

२३. गर्गाचीं बहुत गोत्रापत्यें असा अर्थ कळवावयाचा असतां गर्गशब्दाच्या पुढें 'गर्गादिभ्यो०' (४।१।१०५) यानें यञ्, असेंच भृगुशब्दापुढें 'ऋष्यन्धक०' यानें ऋषित्वास्तव अण्, पुढें युवापत्यार्थी प्रत्येकाहून इञ्, त्याचा 'ण्यक्षत्रियार्ष०'(२।४।५८) यानें लुक्, नंतर गर्गभृगूणां मैथुनिका असा अर्थ विवक्षित असतां भृगुशब्दापुढील अण्प्रत्ययाचा 'अत्रिभृगु०' (२।४।६५) यानें लुक् प्राप्त झाला असतां 'न गोपवनादिभ्यः' (२।४।६७) यानें त्याचा निषेध केला, याकरितांच गोपवनादि गणामध्यें गर्गभार्गविका या शब्दाचा पाठ करावयाचा; पुढें वुन्; त्याला अकादेश केला असतां गर्गाचीं युवापत्यें व भृगूचीं युवापत्यें या परस्परांचा विवाह अशा अर्थाला दाखविणारा 'गर्गभार्गविका' हा शब्द तयार होतो. येथें युवापत्यार्थक इञ्प्रत्ययाचा लुक् करून उरलेला जो भृगुशब्दापुढील अण्प्रत्यय तदन्त शब्द (भार्गव) हा दुसऱ्यांदा केलेला जो अपत्यप्रत्यय त्याच्या अर्थाला दाखवीत आहे. तेव्हां अशा तऱ्हेनें द्वितीय अर्थाप्रत प्राप्त झालेल्या शब्दांतील गोत्रप्रत्ययाचा जर अलुक् होईल तर गोपवनादिकांमध्यें गर्गभार्गविकाशब्दाचा पाठ करण्याचें कारण राहत नाहीं. असें असतां ज्यापेक्षां पाठ केला जात आहे, त्यापेक्षां द्वितीय अर्थाप्रत प्राप्त झालेल्या शब्दांतील गोत्रप्रत्ययाचा अलुक् करणें झाल्यास 'गर्गभार्गविका' याच शब्दांतील गोत्रप्रत्ययाचा अलुक् करावा, अन्य शब्दांतील गोत्रप्रत्ययाचा अलुक्

शक्यमिह हि दोषः स्यात्काश्यपप्रतिकृतयः काश्यपा इति । नैष दोषः । लौकिकस्य तत्र गोत्रस्य ग्रहणं न चैतल्लौकिकं गोत्रम् ॥

यस्य बहुवचने परतो लुक्समासबहुत्वे तेन प्रतिषेधो वक्तव्यस्तेनैव चेत्कृतं बहुत्वमिति वा वक्तव्यम् । यस्य प्रत्ययार्थबहुत्वे लुक्तेनास्त्रियामिति वक्तव्यम् । यस्य बहुवचने परतो लुक्तस्यायमधिको दोषोऽत्रय इत्युदात्तनिवृत्तिस्वरः प्राप्नोति । तस्मात्प्रत्ययार्थबहुत्वे लुगित्येष एव पक्षो ज्यायान् ॥

अथेह कथं भवितव्यम् । गार्गी च वात्स्यश्च वाज्यश्चेति । यदि तावदस्त्री विधिनाश्रीयतेऽस्त्यत्रास्त्रीति कृत्वा भवितव्यं

त्या सूत्राचा अर्थ गृहीत धरला असतां पूर्वोक्तस्थलीं लुक् होईल.

पण 'बहुत अपत्यें या अर्थाला दाखविणारें जें यञन्त किंवा अञन्त त्यांतील तद्धिताचा लुक् होतो' असा यञञोश्च याचा अर्थ गृहीत धरणें शक्य नाहीं. कारण काश्यपस्य प्रतिकृतयः काश्यपाः येथें अञ्प्रत्ययाचा लुक् करण्याचा प्रसंग येईल असा दोष दाखविला आहे नां?[२४]

हा दोष नाहीं. कारण 'यञञोश्च' येथें 'यस्कादिभ्यो गोत्रे' येथून गोत्रे या पदाची अनुवृत्ति आहे. अपत्याधिकारावांचून अन्य ठिकाणीं गोत्र शब्दाचा फक्त अपत्य एवढाच अर्थ समजावयाचा. तेव्हां अपत्यार्थगत बहुत्व दाखविणारें जें यञन्त किंवा अञन्त त्यांतील तद्धिताचा लुक् होतो असा 'यञञोश्च' या सूत्राचा अर्थ होतो. प्रकृत उदाहरणामध्यें काश्यपस्य प्रतिकृतयः काश्यपाः येथील अञन्त शब्द अपत्यार्थाचें बहुत्व दाखवीत नसून प्रतिकृतींचें बहुत्व दाखवीत आहे. सबब येथें लुक् येऊंच शकत नाहीं. आतां ज्याच्या मतानें 'बहुवचन पुढें असतांना लुक् होतो' असा अर्थ आहे त्यानें 'समासार्थावरील बहुत्व दाखविणारें बहुवचन पुढें असतां लुक् करूं नये', असें वचन तरी केलें पाहिजे किंवा 'तेनैव' असें सूत्रामध्यें म्हणून 'प्रत्ययाचा अर्थ जो अपत्यार्थ त्यावरीलच बहुत्वाला दाखविणारें बहुवचन पुढें असतां', असें तरी म्हटलें पाहिजे. आणि ज्याच्या मतीं प्रत्ययार्थावरील बहुत्व असतां लुक् होतो असा अर्थ आहे त्यानें 'अस्त्रियाम्' असें सूत्रामध्यें पद घातलें पाहिजे. मिळून दोन्ही पक्ष सारखेच दिसतात. त्यांत ज्याच्या मतीं 'बहुवचन पुढें असतां लुक् होतो' त्याच्या मतीं अत्रयः[२५] येथें उदात्तनिवृत्तिस्वर प्राप्त होतो असा अधिक दोष येतो. सबब दोन बाजूंपैकीं 'प्रत्ययार्थावरील बहुत्व असतां लुक् होतो' हीच बाजू श्रेष्ठ ठरते.

आतां येथें गार्गी[२६] च वात्स्यश्च वाज्यश्च असा विग्रह असतां सामासिक रूप कसें बरें व्हावें? कारण जर स्त्रीभिन्नाला उद्देशून लुकाचें विधान केलें तर या उदाहरणामध्यें स्त्रीभिन्न अपत्यार्थ असल्यामुळें लुक् व्हावा, आणि जर स्त्र्यपत्यार्थाला उद्देशून लुकाचा

करूं नये, असें सूचित होतें.

२४. टीप १६ पहा.

२५. टीप १० पहा.

२६. गर्गवत्सवाजाः येथें प्रत्येकीं एकच अपत्य गृहीत धरलें तरी तीनही प्रत्यय अपत्यार्थाचेच असल्यामुळें तें तिघांचें मिळून बहुत्व घेऊन लुक् होतो तसा येथेंही लुक् व्हावा. परंतु येथें एक शब्द स्त्रीलिंगी असल्यामुळें संशय येतो, तो असा:— 'अस्त्रियाम्' हा पर्युदास गृहीत धरला तर स्त्रीभिन्न अपत्यार्थ असतांना तद्धितप्रत्ययाचा लुक् होतो, असा अर्थ झाल्यामुळें सर्वच शब्दांतील यञ्प्रत्ययाचा लुक् व्हावा आणि प्रसज्यप्रतिषेध गृहीत धरला तर स्त्रीरूप अपत्यार्थ असतांना लुक् होत नाहीं असा अर्थ झाल्यामुळें सर्वच शब्दांतील यञाचा लुक् होऊं नये असा संशय उत्पन्न होतो, म्हणून त्याच्या निर्णयासाठीं हा प्रश्न उपस्थित केला आहे.

लुका। अथ स्त्री प्रतिषेधेनाश्रीयतेऽस्त्यत्र स्त्रीति कृत्वा भवितव्यं प्रतिषेधेन। किं पुनरत्रार्थसतत्त्वम्। देवा एतज्ज्ञातुमर्हन्ति ॥

अथ यो लोप्यलोपिनां समासस्तत्र कथं भवितव्यम्। उभयं हि दृश्यते। शरद्वच्छुनकदर्भाद्भृगुवत्साग्रायणेषु [४.१.१०२] नोदात्तस्वरितोदयमगार्ग्यकाश्यपगालवानाम् [८.४.६७] इति ॥

[यस्कादिभ्यो गोत्रे ॥२।४।६३॥]

यञञोश्च ॥ २।४।६४ ॥

यञादीनामेकद्वयोर्वा तत्पुरुषे षष्ठ्या उपसंख्यानम् ॥ १ ॥

यञादीनामेकद्वयोर्वा तत्पुरुषे षष्ठ्या उपसंख्यानं कर्तव्यम्। गार्ग्यस्य कुलं गार्ग्यकुलं गर्गकुलं वा। गार्ग्ययोः कुलं गार्ग्यकुलं गर्गकुलं वा। बैदस्य कुलं बैदकुलं बिदकुलं वा। बैदयोः कुलं बैदकुलं बिदकुलं वा॥ यञादीनामिति किमर्थम्। आङ्गस्य कुलमाङ्गकुलम्। आङ्गयोः

निषेध केला तर सदर उदाहरणामध्यें स्त्रीरूप अपत्यार्थ असल्यामुळें लुकाचा निषेध व्हावा. तेव्हां अशा स्थितींत पाणिनीच्या मनांत खरा तत्त्वभूत अर्थ काय बरें असावा ?

यांतील खरें तत्त्व जाणण्याविषयीं देव [27]समर्थ आहेत.

आतां ज्या शब्दांतील तद्धितप्रत्ययाचा लोप प्राप्त आहे असा शब्द आणि ज्या शब्दांतील तद्धितप्रत्ययाचा लोप प्राप्त नाहीं असा शब्द, अशा अनेक शब्दांचा द्वंद्वसमास केला असतां तेथें लुक् करावा किंवा न करावा ?

अशा ठिकाणीं दोन्हीही तऱ्हा दिसतात; जसें:– ‘शरद्वच्छुनकदर्भाद्भृगुवत्साग्रायणेषु’ (४।१।१०२),‘नोदात्तस्वरितोदयमगार्ग्यकाश्यपगालवानाम्’ (८।४।६७). तेव्हां दोन्हीही तऱ्हेचीं रूपें होतात.[28]

(सू.६४, वा.१) एक किंवा दोन अपत्यें या अर्थाला दाखविणारे जे यञ् वगैरे प्रत्यय ते शेवटीं असलेल्या शब्दांचा इतर शब्दांबरोबर षष्ठीतत्पुरुष समास केला असेल तर त्यांतील यञ् वगैरे प्रत्ययांचा विकल्पानें लुक् होतो, असें वचन करावें; जसें:– गार्ग्यस्य कुलं गार्ग्यकुलम्, गर्गकुलम्; गार्ग्ययोः कुलं गार्ग्यकुलम्, गर्गकुलम्; बैदस्य कुलं बैदकुलम्, बिदकुलम्; बैदयोः कुलं बैदकुलम्, बिदकुलम्.

येथें यञ् वगैरे प्रत्यय असें जें म्हटलें त्याचा काय उपयोग ?

आङ्गस्य कुलम् आङ्गकुलम्, आङ्गयोः कुलम् आङ्गकुलम्, येथें लुक् होत नाहीं.

आतां येथे ‘एक किंवा दोन अपत्यें या

२७. पर्युदासामध्यें असमर्थसमासाभाव व एकवाक्यता हे गुण असल्यामुळें प्रसज्यप्रतिषेधापेक्षां त्यांत लाघव आहे, म्हणून ‘अस्त्रियाम्’ हा पर्युदासच समजणें योग्य आहे. तेव्हां स्त्रीव्यतिरिक्त अपत्यार्थांचें बहुत्व असल्यामुळें सर्वच ठिकाणी यञाचा लुक् व्हावा हें योग्य आहे.

२८. भृगु आणि वत्स हे दोन शब्द तद्धितलोपी आहेत व तिसरा नडादिकगन्त तद्धितलोपी नव्हे, तरी पण दोन ठिकाणीं लुक् केला आहे. गार्ग्य व काश्यप हे दोन शब्द तद्धितलोपी होत, आणि गालवशब्द ऋष्यणप्रत्ययान्त तद्धितलोपी नव्हे. तरीही तद्धितलोपी दोन्हीही शब्दांचे ठिकाणीं लुक् केलेला नाहीं. तेव्हां दोन तऱ्हेचें ज्ञापक असल्यामुळें दोन्हीही प्रयोग होतात.

१. यस्क वगैरे यस्कादिगणांतील शब्दांच्या पुढील अपत्यार्थक प्रत्ययाचा लुक् होतो, त्या अपत्यार्थांमुळेंच बहुत्व असून तीं अपत्यें स्त्रीलिंगी नसतील तर; उदा०–मित्रयोरपत्यानि पुमांसः मित्रयवः.

१. स्त्रीभिन्न बहुत गोत्रापत्यें या अर्थाला दाखविणारा जो यञ्प्रत्यय किंवा अञ्प्रत्यय त्याचा लुक् होतो; उदा०– गर्गस्य गोत्रापत्यानि पुमांसः गर्गाः, वत्साः, बिदाः.

२. यञ् वगैरे प्रत्यय, म्हणजे ‘यञञोश्च’ या प्रकृतसूत्राला आरंभ करून ‘आगस्त्यकौण्डिन्ययोः०’

कुलमाङ्गकुलम्॥ एकद्वयोरिति किमर्थम्। गर्गाणां कुलं गर्गकुलम् ॥ तत्पुरुष इति किमर्थम्। गार्ग्यस्य समीपमुपगार्ग्यम्॥ षष्ठ्या इति किमर्थम्। शोभनगार्ग्यः परमगार्ग्यः॥

## [अत्रिभृगुकुत्सवसिष्ठगोतमाङ्गिरोभ्यश्च ॥ २ । ४ । ६५ ]

## बह्वच इञः प्राच्यभरतेषु ॥ २ । ४ । ६६ ॥

किमयं समुच्चयः। प्राक्षु भरतेषु चेति। आहोस्विद्भरतविशेषणं प्राग्ग्रहणम्। प्राञ्चो ये भरता इति। किं चातः। यदि समुच्चयो भरतग्रहणमनर्थकं न ह्यन्यत्र भरताः सन्ति। अथ प्राग्ग्रहणं भरतविशेषणं प्राग्ग्रहणमनर्थकं न ह्यप्राञ्चो भरताः सन्ति। एवं तर्हि समुच्चयः।

---

अर्थाला दाखविणारें असें म्हटलें आहे त्याचा काय उपयोग ?

गर्गाणां कुलं गर्गकुलम् येथें प्रकृत सूत्रानें नेहमींच यञ्प्रत्ययाचा लुक् होतो.

तत्पुरुषसमासामध्यें असें म्हटलें आहे त्याचा काय उपयोग ?

गार्ग्यस्य समीपम् उपगार्ग्यम् येथें यञाचा लुक् न होणें.

आतां येथें तत्पुरुष एवढेंच म्हणावयाचें तें षष्ठीतत्पुरुष असें जें म्हटलें त्याचा काय उपयोग ?

शोभनश्चासौ गार्ग्यश्च शोभनगार्ग्यः, परमगार्ग्यः, येथें यञाचा लुक् न होणें.

(सू.६६) काय 'प्राच्यभरतेषु' हा समुच्चय आहे, म्हणजे प्रत्ययार्थ गोत्र हें प्राच्यदेशांतील असावें किंवा भरतवंशांतील असावें, असा अर्थ समजावयाचा, किंवा प्राच्य हें भरतांचें विशेषण आहे, म्हणजे प्राच्यदेशांतील जो भरतवंश त्यांतील गोत्र पाहिजे असा समजावयाचा ?

यांत काय विशेष आहे ?

जर समुचय म्हटला तर भरतशब्द व्यर्थ होतो. कारण प्राच्यदेशावांचून इतर ठिकाणीं भरतवंश नाहीं.

आतां प्राच्यशब्द भरतांचें विशेषण असें गृहीत धरलें तर प्राच्यशब्द फुकट होतो. कारण प्राच्यभिन्न असे भरत नाहींत.

असें आहे तर समुच्चय असूं दे.

पण समुच्चय म्हटला तर भरतशब्द फुकट होतो. कारण प्राच्यदेशावांचून इतर ठिकाणीं

---

(२।४।७०) या सूत्रापर्यंतच्या सूत्रांनीं ज्या प्रत्ययांचा लुक् सांगितला आहे ते प्रत्यय ध्यावयाचे आहेत. त्यामुळें 'तद्राजस्य०' (२।४।६२) या सूत्राविषयीं हें वार्तिक प्रवृत्त होत नाहीं.

३. येथें 'अव्ययं विभक्ति०' (२।१।६) यानें समीपार्थीं अव्ययीभावसमास झाला आहे. हा षष्ठीसमास आहे, पण तत्पुरुष नव्हे; म्हणून हें वार्तिक प्रवृत्त होत नाहीं.

४. 'विशेषणं विशेष्येण०' (२।१।५७) यानें कर्मधारय झाला आहे. हा तत्पुरुषसंज्ञक आहे तरी पण षष्ठ्यन्त गार्ग्यशब्द नसल्यामुळें येथें यञाचा लुक् होत नाहीं, हा षष्ठीग्रहणाचा उपयोग होय.

१. अत्रि, भृगु, कुत्स, वसिष्ठ, गोतम आणि अङ्गिरस् या शब्दांच्यापुढील अपत्यार्थक प्रत्ययाचा लुक् होतो, तीं अपत्यें स्त्रीलिंगी नसून बहुत असतील तर; उदा०—अत्रेरपत्यानि पुमांसः अत्रयः. येथें 'इतश्चानिञः' यानें अत्रिशब्दाच्या पुढें केलेल्या ढक्प्रत्ययाचा प्रकृत सूत्रानें लुक् केला आहे.

१. बहुत आहे अच् ज्यामध्यें अशा प्रातिपदिकाच्या पुढील अपत्य या अर्थीं केलेल्या इञ्प्रत्ययाचा लुक् होतो, तीं अपत्यें बहुत असून आणि प्राच्यदेशांतील किंवा भरतवंशांतील असून स्त्रीलिंगी नसतील तर; उदा०—पन्नागारस्यापत्यानि पुमांसः पन्नागाराः. येथें 'अत इञ्' यानें केलेल्या इञ्प्रत्ययाचा लुक् झाला आहे. युधिष्ठिरस्यापत्यानि पुमांसः युधिष्ठिराः. येथें 'बाह्वादिभ्यश्च' यानें केलेल्या इञ्प्रत्ययाचा लुक् झाला आहे.

ननु चोक्तं भरतग्रहणमनर्थकं न ह्यन्यत्र भरताः सन्तीति । नानर्थकम् । ज्ञापकार्थम् । किं ज्ञाप्यते । एतज्ज्ञापयत्याचार्योऽन्यत्र प्राग्ग्रहणे भरतग्रहणं न भवतीति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । इञः प्राचाम् [२.४.६०] भरतग्रहणं न भवति। औद्दालकिः पिता औद्दालकायनः पुत्र इति ॥

## न[१] गोपवनादिभ्यः ॥ २।४।६७ ॥

**गोपवनादिप्रतिषेधः प्राग्घरितादिभ्यः ॥ १ ॥**

गोपवनादिभ्यः प्रतिषेधः प्राग्घरितादिभ्यो द्रष्टव्यः । हारितः हारितौ । बहुषु हरिताः ॥

## [तिकाकितवादिभ्यो द्वन्द्वे ॥ २ । ४ । ६८ ॥]

## उपकादिभ्योऽन्यतरस्यामद्वन्द्वे ॥ २ । ४ । ६९ ॥

किमर्थमद्वन्द्व इत्युच्यते । द्वन्द्वे मा भूदिति । नैतदस्ति प्रयोजनम् । इष्यत

---

भरतवंश नाहीं असें पूर्वी सांगितलें आहे ना?

भरतशब्द फुकट नाहीं. तर तो ज्ञापनासाठीं घातला आहे.

त्यानें काय ज्ञापन केलें आहे ?

या सूत्रावांचून अन्य ठिकाणीं जेथें प्राच्यशब्द असेल तेथें त्या शब्दानें भरतांचें ग्रहण करूं नये असें आचार्य सुचवीत आहेत.

असें सुचविल्याचा काय उपयोग ?

इञः प्राचाम् (२।४।६०) येथें प्राच् या शब्दानें भरत हा अर्थ मनांत घ्यावयाचा नाहीं. म्हणून औद्दालकिः पिता, औद्दालकायनः पुत्रः.[२]

(सू.६७, वा.१) गोपवनादिक शब्दांच्या पुढील गोत्रापत्यप्रत्ययाच्या लुकाचा जो हा प्रतिषेध केला आहे तो हरितशब्दापर्यंतच समजावा[२]; जसें:– हारितः हारितौ; बहुत्व अर्थ असतांना हरिताः.

(सू.६९) येथें अद्वंद्वे हा शब्द घातला आहे तो कशासाठीं ?

द्वंद्वसमासामध्यें हें सूत्र प्रवृत्त न व्हावें म्हणून.

हा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण

---

२. भरतवंशांतील उद्दालक नांवाचा पुरुष. त्याचें गोत्रापत्य या अर्थी उद्दालकशब्दाच्या पुढें 'अत इञ्' यानें इञ्,– औद्दालकिः. त्याचें अपत्य अर्थात् उद्दालकाचें युवापत्य या अर्थी औद्दालकिशब्दापुढें 'यञिञोश्च' (४।१।१०१) यानें फक्. त्याला आयनआदेश केला असतां औद्दालकायनः असें रूप होतें. येथें 'इञः प्राचाम्' (२।४।६०) यानें युवापत्यार्थी केलेल्या फक्प्रत्ययाचा लुक् प्राप्त होतो, परंतु प्राक्शब्दानें भरतांचें ग्रहण करावयाचें नसल्यामुळें होत नाहीं, हा ज्ञापकाचा उपयोग होय.

१. गोपवन वगैरे शब्दांच्या पुढील गोत्रापत्य या अर्थी केलेल्या अञ्प्रत्ययाचा लुक् होत नाहीं; उदा०—गौपवनाः.

२. बिदादिगणामध्यें (४।१।१०४) गोपवनशब्दाला आरंभ करून हरितशब्दाच्या पूर्वी श्वापर्णशब्दापर्यंत आठच शब्द गोपवनादिगणांतील समजावेत. तेव्हां हरितस्यापत्यानि पुमांसः बहवः या अर्थी हरिताः असेंच होतें. प्रकृत सूत्रानें लुकाचा निषेध होत नाहीं.

१, तिककितव वगैरे द्वंद्वांमध्यें दोन्ही पदांपुढील अपत्य या अर्थाच्या प्रत्ययाचा लुक् होतो, अपत्यांचें बहुत्व असतांना; उदा०—तैकायनयश्च कैतवायनयश्च तिककितवाः.

१. उपक, लमक, वगैरे शब्दांच्या पुढील बहुत्वार्थक अपत्यप्रत्ययाचा विकल्पानें लुक् होतो, त्या उपकादिप्रकृतिक अपत्यप्रत्ययान्ताचा द्वंद्वसमास असो किंवा नसो; उदा०—औपकायनाश्च लामकायनाश्च उपकलमकाः. येथें 'नडादिभ्यः फक्०' (४।१।९९) यानें फक्प्रत्यय. त्याचा लुक्. लुक् केला नाहीं त्या वेळीं औपकायनलामकायनाः; उपकाः औपकायनाः; लमकाः लामकायनाः.

एव द्वन्द्वे । आष्टककपिष्ठलाः आष्टकिकापिष्ठलय इति ॥ अत उत्तरं पठति ।

**अद्वन्द्व इति द्वन्द्वाधिकारनिवृत्त्यर्थम् ॥ १ ॥**

अद्वन्द्व इत्युच्यते द्वन्द्वाधिकारनिवृत्त्यर्थम् । द्वन्द्वाधिकारो निवर्त्यते । तस्मिन्निवृत्तेऽविशेषेण द्वन्द्वे चाद्वन्द्वे च भविष्यति ॥

**आगस्त्यकौण्डिन्ययोरगस्तिकुण्डिनच् ॥ २ । ४ । ७० ॥**

**आगस्त्यकौण्डिन्ययोः प्रकृतिनिपातनम् ॥ १ ॥**

आगस्त्यकौण्डिन्ययोः प्रकृतिनिपातनं कर्तव्यम् । अगस्तिकुण्डिनजित्येतौ प्रकृत्यादेशौ भवत इति वक्तव्यम् ॥ किं प्रयोजनम् ।

**लुक्प्रतिषेधे वृद्ध्यर्थम् ॥ २ ॥**

लुक्प्रतिषेधे वृद्धिर्यथा स्यात् ॥

**प्रत्ययान्तनिपातने हि वृद्ध्यभावः ॥ ३ ॥**

प्रत्ययान्तनिपातने हि सति वृद्ध्यभावः स्यात् । आगस्तीयाः कौण्डिना इति ॥ यदि प्रकृतिनिपातनं क्रियते केनेदानीं प्रत्ययस्य लोपो भविष्यति ।

---

द्वंद्वसमासामध्यें हें सूत्र प्रवृत्त होणें इष्ट आहे; जसें– आष्ट्रकपिष्ठलाः, आष्ट्रकिकापिष्ठलयः.

म्हणून वार्तिककार म्हणतात—

(वा.१) येथें अद्वंद्वे असें जें म्हटलें आहे तें द्वंद्वे या अधिकाराच्या निवृत्तीसाठीं म्हटलें आहे. तेव्हां द्वंद्वे या पदाची निवृत्ति झाली असतां मोघम सांगितलेल्या ह्या लुकाची अर्थात् द्वंद्व आणि अद्वंद्व या दोन्ही ठिकाणीं प्रवृत्ति होईल.

(सू.७०,वा.१) आगस्त्य व कौण्डिन्य यांतील प्रकृतिभागाला अगस्ति व कुण्डिनच् असे आदेश होतात असें वचन करावें. असें वचन करण्याचा काय उपयोग ?

(वा.२) अपत्यप्रत्ययाच्या लुकाचा निषेध झाला असतां तेथें वृद्धि टिकावी हा उपयोग आहे.

(वा.३) अगस्ति व कुण्डिनच् हे आदेश क्रमानें आगस्त्य आणि कौण्डिन्य या प्रत्ययान्ताचे ठिकाणीं केले तर आदेशांतील आदि अच् वृद्धि असूं शकत नाहीं. त्यामुळें आगस्तीयाः, कौण्डिनाः, हीं उदाहरणें साधणार नाहींत.

जर केवळ प्रकृतिभागाला आदेश केले तर उरलेल्या प्रत्ययाचा लोप कशानें बरें होईल?

---

२. आष्ट्रकस्यापत्यानि इञ्, कपिष्ठलस्यापत्यानि इञ्, त्याचा विकल्पानें लुक् झाल्यामुळें दोन तऱ्हेचीं रूपें होतात.

१. आगस्त्य आणि कौण्डिन्य या शब्दांतील बहुत अपत्यें या अर्थाचा जो अण् व यञ्प्रत्यय त्यांचा लुक् होतो, व अवशिष्ट जो प्रकृतिभाग त्याला क्रमानें अगस्ति, कुण्डिनच्, असे आदेश होतात; उदा०—अगस्त्यस्य अपत्यानि बहूनि 'ऋष्यन्धक०' (४।१।११४) यानें अण्, त्याचा लुक् व प्रकृतीला अगस्तिआदेश; कुण्डिनशब्दाच्या पुढें गर्गादित्वास्तव यञ् (४।१।१०५), त्याचा लुक्, प्रकृतीला कुण्डिनआदेश,– अगस्तयः, कुण्डिनाः.

२. अगस्त्यस्य अपत्यानि बहवः पुमांसः या अर्थी अगस्त्यशब्दापुढें ऋषित्वास्तव अण्प्रत्यय (४।१।११४), पुढें त्या अगस्त्याच्या अपत्यांचे छात्र या अर्थी अजादिप्रत्यय कर्तव्य असतां 'गोत्रेऽलुगचि' यानें आगस्त्यशब्दांतील अणाच्या लुकाचा निषेध केला असतां प्रकृतसूत्रानें त्या लुकाच्या बरोबर सांगितलेला अगस्तिआदेशही होत नाहीं. आतां जर लुक् न सांगतां आगस्त्य या अण्प्रत्ययान्ताचे स्थानीं हा अगस्तिआदेश केला तर आदेशांतील आदि अच् वृद्धिसंज्ञक नाहीं, व त्यामुळें 'वृद्धाच्छः' (४।२।११४) यानें छप्रत्यय होणार नाहीं. तेव्हां आगस्तीयाः असें जें रूप इष्ट आहे तें साधणार नाहीं.

**अधिकारात्प्रत्ययलोपः ॥ ४ ॥**

अधिकारात्प्रत्ययलोपो भविष्यति ॥

तत्तर्हि प्रकृतिनिपातनं कर्तव्यम् । न कर्तव्यम् । योगविभागः करिष्यते । आगस्त्यकौण्डिन्ययोर्बहुषु लुग्भवति । ततोऽगस्तिकुण्डिनजित्येतौ च प्रकृत्यादेशौ भवत आगस्त्यकौण्डिन्ययोरिति ॥ एवमपि प्रत्ययान्तयोरेव प्राप्नोति प्रत्ययान्ताद्धि भवान्षष्ठीमुच्चारयति । आगस्त्यकौण्डिन्ययोरिति । नैष दोषः । यथा हि परिभाषितं प्रत्ययस्य लुक्श्लुलुपो भवन्तीति प्रत्ययस्यैव भविष्यत्यवशिष्टस्यादेशौ भविष्यतः ।

**[सुपो धातुप्रातिपदिकयोः ॥ २ । ४ । ७१ ॥**

**अदिप्रभृतिभ्यः शपः ॥२।४।७२॥**

**बहुलं छन्दसि ॥ २ । ४ । ७३ ॥]**

**यङोऽचि च ॥ २ । ४ । ७४ ॥**

**ऊतोऽचि ॥ १ ॥**

ऊतोऽचीति वक्तव्यम् । इह मा भूत् ।

---

(वा.४) 'ण्य क्षत्रियार्ष०' येथून लुगधिकार चालू असल्यानें प्रत्ययाचा लुक् होईल, व अर्थात् उरलेल्या प्रकृतिभागाला आदेश होतील.

तर मग प्रकृतिभागाला आदेश होतात अशाबद्दल वचन केलें पाहिजे.

वचन करावयास नको; कारण योगविभाग करण्यांत येईल. तो असाः— 'आगस्त्यकौण्डिन्ययोः' असें पूर्वसूत्र होय. बहुत अपत्यें या अर्थाला दाखविणाऱ्या आगस्त्य आणि कौण्डिन्य या शब्दांतील प्रत्ययाचा लुक् होतो असा त्याचा अर्थ. पुढें 'अगस्तिकुण्डिनच्' असें दुसरें सूत्र होय. त्या सूत्रानें अर्थातच आगस्त्य आणि कौण्डिन्य या शब्दांतील प्रत्ययाचा लुक् झाल्यानंतर उरलेल्या प्रकृतिभागाला क्रमानें अगस्ति व कुण्डिनच् असे आदेश होतील.

असा योगविभाग केला तरी देखील आगस्त्य आणि कौण्डिन्य या प्रत्ययान्तांनाच आदेश प्राप्त होत आहेत. कारण तूं 'आगस्त्यकौण्डिन्ययोः' असा प्रत्ययान्ताहूनच पुढें षष्ठीचा उच्चार करीत आहेस.

हा दोष येत नाहीं. कारण प्रत्ययान्ताहूनच पुढें षष्ठी उच्चारून लुक् सांगितला आहे, तरी 'प्रत्ययाच्या अदर्शनाला लुक् म्हणावयाचें' (१।१।६१) अशी मर्यादा केली असल्यामुळें तिला अनुसरून प्रत्ययाचा लुक् होईल. तेव्हां अर्थात् उरलेल्या प्रकृतिभागालाच आदेश होतील.

(सू.७४, वा.१) अच्प्रत्यय पुढें असतांना जो हा यङ्प्रत्ययाचा लुक् सांगितला आहे तो लुक् ऊकाराच्या पुढें यङ्प्रत्यय असेल तर होतो असें वचन करावें. कारण सनीस्रसः, दनीध्वंसः, येथें यङाचा लुक् न झाला पाहिजे.

---

१. (७१) धातु किंवा प्रातिपदिक यांतील सुप्विभक्तीचा लुक् होतो; उदा०—पुत्रम् आत्मन इच्छति पुत्रीयति राजपुरुषः.

(७२) अद् वगैरे अदादिगणांतील धातूंच्या पुढील शप्प्रत्ययाचा लुक् होतो; उदा०— अत्ति अत्तः.

(७३) वेदांतील प्रयोगामध्यें शपाचा बाहुल्येंकरून लुक् होतो; म्हणजे लुकाची प्राप्ति आहे तेथेंही लुक् होत नाहीं व जेथें लुकाची प्राप्ति नाहीं तेथेंही होतो; उदा०—वृत्रं हनति, त्राध्वं नो देवाः.

१. अच्प्रत्यय पुढें असतांना यङ्प्रत्ययाचा लुक् होतो, किंवा अच्प्रत्यय पुढें नसला तरी देखील बाहुल्येंकरून यङाचा लुक् होतो; उदा०—लोलुवः, पोपुवः, बोभवीति.

२. स्रंसु आणि ध्वंसु या धातूंहून 'धातोरेकाचो०' (३।१।२२) यानें यङ्प्रत्यय, 'सन्यङोः' (६।१।९) यानें द्वित्व, 'नीग्वञ्चु०' (७।४।८४) यानें अभ्यासाला नीक्आगम, यङन्ताहून अच्प्रत्यय (३।१।१३४), झाला आहे. येथें यङाचा लुक् होईल तर प्रत्ययलक्षणाचा निषेध असल्यामुळें नकाराचा लोप होणार नाहीं. लुक् न होतां 'अतो लोपः' (६।४।

सनीस्रसः दनीध्वस इति ॥ अथोत इत्युच्यमाने इह कस्मान्न भवति । योयूयः रोरूयः । विहितविशेषणमूकारान्तग्रहणम् । ऊकारान्ताद्यो विहित इति ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । इष्टमेवैतत्संगृहीतम् । सनीस्रंसः दनीध्वंस इत्येव भवितव्यम् ॥

**[जुहोत्यादिभ्यः श्लुः ॥२।४।७५॥**
**बहुलं छन्दसि ॥ २ । ४ । ७६ ॥]**

**गातिस्थाघुपाभूभ्यः सिचः परस्मैपदेषु ॥ २ । ४ । ७७ ॥**

**गापोर्ग्रहण इण्पिबत्योर्ग्रहणम् ॥१॥**

गापोर्ग्रहण इण्पिबत्योर्ग्रहणं कर्तव्यम् । इणो यो गाशब्दः पिबतेर्यः पाशब्द इति वक्तव्यम् । इह मा भूत् । अगासीन्नटः । अपासीद्धनमिति ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । इणो ग्रहणे तावद्वार्त्तम् । निर्देशादेवेदं व्यक्तं लुग्वि-

---

आतां ऊकाराच्या पुढील यङाचा लुक् होतो असें म्हटलें तरी योयूयः, रोरूयः, येथें कां बरें लुक् होत नाहीं ?

ऊकारान्ताहून केलेला यङ्प्रत्यय अशा अर्थाचें 'ऊतः' हें यङाचें विशेषण आहे. वरील उदाहरणांमध्यें तो यङ् करतांना ऊकारान्ताहून केलेला नाहीं, तर यङ् केल्यानंतर मागून दीर्घ झालेला आहे. म्हणून तेथें यङाचा लुक् होत नाहीं.

तर मग 'ऊतोऽचि' हें वार्तिक केलें पाहिजे.

वार्तिक करावयास नको; कारण 'यङोऽचि' असें सूत्र करण्यांत इष्टाचाच संग्रह केला आहे. सनीस्रंसः, दनीध्वंसः, असेंच रूप होतें.

(सू.७७, वा.१) येथें गा आणि पा हे जे धातु घेतले आहेत त्यांविषयीं इण् व पिबति या धातूंचें ग्रहण करावें. म्हणजे इण्धातूचा आदेश जो गाधातु आणि पिब या आदेशाचा स्थानी असा जो पाधातु, असें म्हणावें. कारण अगासीन्नटः, अपासीद्धनम्, येथें सिच्प्रत्ययाचा लुक् न झाला पाहिजे.

तर मग तें तसें वचन केलें पाहिजे.

तसें वचन करावयास नको. इणग्रहणाविषयीं तर तसें वचन करण्यांत कांहींच अर्थ नाहीं. कारण गाति या निर्देशावरूनच स्पष्ट होत आहे की ज्याच्यापुढील विकरणाचा लुक् होतो असा गाधातु येथें घ्यावयाचा आहे.

---

४८) यानें अकारलोप, 'यस्य हलः' (६।४।४९) यानें यकारलोप केला असतां प्रत्ययलक्षण होत असल्यामुळें नलोप होतो.

३. योयूयः येथें दीर्घ ऊकारान्ताहून यङ्प्रत्यय केला नाहीं. यु या ह्रस्व उकारान्त धातूहून यङ्प्रत्यय केल्यानंतर दीर्घ (७।४।२५) झाला आहे.

१. हु वगैरे जुहोत्यादिगणांतील धातूंच्या पुढें असलेल्या शप्प्रत्ययाचा श्लु होतो; उदा०-जुहोति, बिभेति.

१. वेदांतील प्रयोगामध्यें बाहुल्येंकरून शपाचा श्लु होतो. म्हणजे जेथें श्लूची प्राप्ति नाहीं तेथेंही तो होतो व जेथें श्लूची प्राप्ति आहे तेथेंही तो होत नाहीं; उदा०—दाति प्रियाणि, पूर्णा विवष्टि.

१. गा, स्था, दा, धा, पा आणि भू या धातूंच्यापुढें सिच्प्रत्ययाचा लुक् होतो, पण त्याच्यापुढें परस्मैपदप्रत्यय असेल तर; उदा०—अगात्, अभूत्.

२. गै शब्दे आणि पा रक्षणे या धातूंहून लुङ्, तिप्, इकाराचा लोप (३।४।१००), च्लि, सिच्, 'यमरमनमाताम्०' (७।२।७३) यानें सक्आगम व सिचाला इट्आगम, ईट्आगम (७।३।९६), अट्आगम (६।४।७१), सिचाचा लोप (८।२।२८), होऊन अगासीत् आणि अपासीत् हीं रूपें होतात.

३. येथें गाधातूच्या पुढें श्तिप्प्रत्यय (३।३।१०८ वा. इक्श्तिपौ धातुनिर्देशे) करून गाति असा निर्देश केला आहे. आतां गैधातूच्या पुढील विकरणाचा लुक् होत नसल्यामुळें 'गायति' असें रूप बनतें; आणि येथें तर 'गाति' असें रूप उच्चारिलें आहे; तेव्हां ज्याच्या पुढील विकरणाचा लुक् होतो असला गाधातु येथें उच्चारला आहे असें उघड उघड होत आहे.

करणस्य ग्रहणमिति । पाग्रहणे चापि वार्त्तम् । वक्तव्यमेवैतत्सर्वत्रैव पाग्रहणेऽलुग्विकरणस्य ग्रहणमिति ॥

## [विभाषा घ्राधेट्शाच्छासः ॥ २ । ४ । ७८ ॥]

## तनादिभ्यस्तथासोः ॥२।४।७९॥

### तथासोरात्मनेपदवचनम् ॥ १ ॥

तथासोरात्मनेपदस्य ग्रहणं कर्तव्यम् । आत्मनेपदं यौ तथासाविति वक्तव्यम् ॥

### एकवचनग्रहणं वा ॥ २ ॥

अथवैकवचने ये तथासी इति वक्तव्यम् ॥ तच्चावश्यमन्यतरत्कर्तव्यम् ।

### अवचने ह्यनिष्टप्रसङ्गः ॥ ३ ॥

अनुच्यमाने ह्येतस्मिन्ननिष्टं प्रसज्येत । अतनिष्ट यूयम् । असनिष्ट यूयमिति ॥

तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । यद्यपि तावदयं तशब्दो दृष्टापचारोऽस्त्यात्मनेपदमस्त्येव परस्मैपदमस्त्येकवचनमस्ति बहुवचनमयं खलु थास्शब्दोऽदृष्टापचार आत्मनेपदमेकवचनमेव तस्यास्य कोऽन्यः सहायो भवितुमर्हत्यन्यदत आत्मनेपदादेकवचनाच्च । तद्यथा । अस्य गोर्द्वितीयेनार्थ इति गौरेवानीयते नाश्वो न गर्दभः ॥

## [मन्त्रे घसह्वरणशवृदहाद्वृच्कृगमिजनिभ्यो लेः ॥२।४।८०॥]

तसेंच पाधातूविषयीं देखील तसें करण्यांत कांहीं अर्थ दिसत नाहीं. कारण असें म्हटलें आहे की जेथें जेथें म्हणून पाधातु उच्चारला असेल त्या सर्व ठिकाणीं 'लुग्विकरणालुग्विक०' या परिभाषेनें ज्याच्या पुढील विकरणाचा लुक् होत नाहीं अशा पाधातूचें ग्रहण करावयाचें आहे.

(सू.७९, वा. १) त आणि थास् यांच्याविषयीं आत्मनेपद हा शब्द घालावा, म्हणजे आत्मनेपद असा जो तकिंवा थास् हा प्रत्यय असें सांगावें.

(वा.२) किंवा एकवचन जो त किंवा थास् असें म्हणावें. या दोहोंपैकीं कांहीं तरी एक अवश्य स्वीकारलें पाहिजे.

(वा.३) जर यांपैकीं कांहींच म्हटलें नाहीं तर अनिष्ट प्रसंग ओढवेल. म्हणजे अतनिष्ट यूयम्, असनिष्ट यूयम्, येथें परस्मैपदमध्यमपुरुषबहुवचन असा तप्रत्यय पुढें असतांनाही सिचाचा लुक् होऊं लागेल.

तर मग तसें कांहीं तरी म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण तप्रत्यय हा आत्मनेपद आहे व परस्मैपदही आहे; तसेंच एकवचनही आहे आणि बहुवचनही आहे. म्हणून तो अनिश्चित स्वरूपाचा आहे. पण थास्प्रत्यय हा आत्मनेपदच आणि एकवचनच असल्यामुळें तो निश्चित अशा एक स्वरूपाचाच आहे. त्याचा जोडीदार म्हणून येथें 'तथासोः' या द्वंद्वामध्यें आचार्यांनीं उच्चारलेला तशब्द हा थास्प्रत्ययापेक्षां निराळ्या प्रकारचा म्हणजे जो आत्मनेपद नव्हे आणि एकवचनही नव्हे असा कसा बरें असूं शकेल? जसें या बैलाला जोडीदार घेऊन ये असें सांगितलें असतां लोकांमध्यें जोडीदार म्हणून बैलच आणला जातो, अश्व किंवा गर्दभ आणिला जात नाहीं, असें दृष्टीस पडतें, तसेंच येथें समजावें.

---

१. घ्रा, धेट्, शा, छा आणि सा या धातूंच्या पुढील सिच्प्रत्ययाचा विकल्पानें लुक् होतो, परस्मैपद पुढें असतांना; उदा०—अघ्रात् अघ्रासीत्, अधात् अधासीत्.

२. तनु वगैरे तनादिगणांतील धातूंच्या पुढील सिच्प्रत्ययाचा विकल्पानें लुक् होतो, त किंवा थास् प्रत्यय पुढें असतांना; उदा०—अतत अतथाः; अकृत अकृथाः.

१. वेदांतील प्रयोगांमध्यें घस, ह्वृ, णश, वृ, दह, आदन्त धातु, वृच्, कृ, गमि आणि जनि या धातूंच्या पुढील लिप्रत्ययाचा लुक् होतो; उदा०—अक्षन्नमीमदन्त, माह्वर्मित्रस्य, प्रणङ्मर्त्यस्य.

## आमः ॥ २।४।८१ ॥

### आमो लेर्लोपे लुङ्लोटोरुपसंख्यानम् ॥ १ ॥

आमो लेर्लोपे लुङ्लोटोरुपसंख्यानं कर्तव्यम् । तां वैजवापयो विदामक्रन् । अत्र भवन्तो विदांकुर्वन्तु ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । लिग्रहणं निवर्तिष्यते । यदि निवर्तते प्रत्ययमात्रस्य लुक्प्राप्नोति । इष्यत एव प्रत्ययमात्रस्य । आतश्चेष्यत एवं ह्याह कृञ्चानुप्रयुज्यते लिटि [३.१.४०] इति यदि च प्रत्ययमात्रस्य लुग्भवति तत एतदुपपन्नं भवति ॥

### आमन्तेभ्यो णलः प्रतिषेधः ॥ २ ॥

आमन्तेभ्यो णलः प्रतिषेधो वक्तव्यः। शशाम तताम । वृद्धौ कृतायामाम इति लुक्प्राप्नोति ॥ आमन्तेभ्योऽर्थवद्ग्रहणाण्णलोऽप्रतिषेधः । आमन्तेभ्योऽर्थवद्ग्रहणाण्णलोऽप्रतिषेधः । अनर्थकः प्रतिषेधोऽप्रतिषेधः । लुकस्मान्न भवति । शशाम ततामेति। अर्थवद्ग्रहणात् । अर्थ-

---

(सू.८०, वा.१) आम्प्रत्ययाच्या पुढील लिप्रत्ययाचा जो हा लुक् सांगितला आहे तेथें लुङ् आणि लोट् यांचाही लुक् होतो असें वचन करावें; जसें:— तां वैजवापयो विदामक्रन्, विदांकुर्वन्तु.

तर लुङ् व लोट् यांचा लुक् होण्याबद्दल वचन केलें पाहिजे.

वचन करावयास नको. कारण 'मन्त्रे घसह्वरण०' या सूत्रांतून जी 'लेः' या पदाची अनुवृत्ति येत आहे ती आणूं नये म्हणजे झालें.

जर 'लेः' या शब्दाची अनुवृत्ति आणिली नाहीं तर आम्प्रत्ययाच्या पुढील कोणत्याही प्रत्ययाचा लुक् होऊं लागेल.

आम्प्रत्ययाच्या पुढें येणाऱ्या कोणत्याही प्रत्ययाचा लुक् होणें इष्टच आहे. कारण लिट्प्रत्यय पुढें केलेल्या अशा कृ, भू किंवा अस् या धातूंचा आमन्ताच्या पुढें अव्यवहित अनुप्रयोग (३।१।४०) सांगितला आहे. जर आम्प्रत्ययाच्या पुढील कोणत्याही प्रत्ययाचा लुक् झाला तरच आम्प्रत्ययाच्या पुढें अव्यवहित अनुप्रयोग सांगितला तो जुळून येतो.

(वा.२) आमन्ताच्या पुढील णल्प्रत्ययाचा लुक् होत नाहीं असें प्रतिषेधादाखल वचन करावें; जसें:—शशाम, तताम. येथें उपधावृद्धि केल्यानंतर णलाचा लुक् प्राप्त होत आहे.

आम् हा अर्थवान् घ्यावयाचा असल्यामुळें आमन्ताच्या पुढील णलाच्या लुकाचा प्रतिषेध व्यर्थ होत आहे. अनर्थक जो प्रतिषेध तो अप्रतिषेध होय.

शशाम, तताम, येथें आमन्ताच्या पुढील णलाचा लुक् कां बरें होत नाहीं ?

'आमः' येथें अर्थवान् अशा आम्शब्दाचें ग्रहण केलें आहे आणि शशाम, तताम, येथील आम्शब्द तर अर्थवान् नाहीं.

---

१. आम्प्रत्ययाच्या पुढील प्रत्ययाचा लुक् होतो; उदा०— एधांचक्रे.

२. विद्धातूहून लुङ् 'अभ्युत्सादयाम्०' (३।१।४२) या सूत्रानें आम्प्रत्यय केला असतां त्याच्या पुढील लुङाचा प्रकृत वार्तिकानें लुक्, पुढें अक्रन् याचा अनुप्रयोग. कृधातु, लुङ्, झि, अन्तादेश, 'इतश्च' यानें इकारलोप, च्लि, त्याचा 'मन्त्रे घस०' (२।४।८०) यानें लुक्, अडागम, यण्, संयोगान्त लोप केल्यानें अक्रन् असें रूप तयार होतें.

३. विद्धातूच्या पुढे लोट्प्रत्यय. विदांकुर्वन्तु० (३।१।४१) यानें आम्प्रत्यय केला असतां त्याच्या पुढील लोटाचा प्रकृतवार्तिकानें लुक्, पुढें कुर्वन्तु या क्रियापदाचा अनुप्रयोग.

४. लुक् ही संज्ञा प्रत्ययाच्या अदर्शनालाच सांगितली असल्यामुळें आम्प्रत्ययाच्या पुढें असलेल्याचा लुक् होतो असें म्हटल्यानें अर्थात् लुङ् किंवा लोट्प्रत्यय यांचाही अनायासानेंच लुक् होइल.

५. आम्प्रत्ययान्ताच्या पुढें लकाराखेरीज तरप्, तमप्, वगैरे प्रत्यय येण्याचा संभव आहे, त्यांचाही लुक् होऊं लागेल.

वत आम्शब्दस्य ग्रहणं न चैषोऽर्थवान् ॥

**आमन्तेभ्योऽर्थवद्ग्रहणाण्णलोऽप्रतिषेध इति चेदमः प्रतिषेधः ॥३॥**

आमन्तेभ्योऽर्थवद्ग्रहणाण्णलोऽप्रतिषेध इति चेदमः प्रतिषेधो वक्तव्यः । आम ॥

**उक्तं वा ॥ ४ ॥**

किमुक्तम् । संनिपातलक्षणो विधिरनिमित्तं तद्विघातस्येति ॥

किं पुनर्लुगादेशानामपवाद आहोस्वित्कृतेष्वादेशेषु भवति ।

**लुगादेशापवादः ॥५॥**

लुगादेशानामपवादः ॥

**तिङ्कृताभावस्तु ॥६॥**

तिङ्कृतस्य त्वभावः । कस्य । पदत्वस्य ॥

**सुबन्तपदत्वात्सिद्धम् ॥ ७ ॥**

सुबन्तं पदमिति पदसंज्ञा भविष्यति ॥ कथं स्वाद्युत्पत्तिः ।

**लकारस्य कृत्त्वात्प्रातिपदिकं तदाश्रयं प्रत्ययविधानम् ॥ ८ ॥**

लकारः कृत्कृत्प्रातिपदिकमिति प्रातिपदिकसंज्ञा तदाश्रयं प्रत्ययविधानम् । प्रातिपदिकाश्रयत्वात्स्वाद्युत्पत्तिर्भविष्यति ॥ सुपः श्रवणं प्राप्नोति । अव्ययादिति लुग्भविष्यति । कथमव्ययत्वम् ।

**अव्ययत्वं मकारान्तत्वात् ॥ ९ ॥**

कृदन्तं मान्तमव्ययसंज्ञं भवतीत्य-

---

(वा.३) अर्थवान् असा आम्शब्द घेतला असल्यामुळें आमन्ताच्या पुढील णलाच्या लुकाचा प्रतिषेध व्यर्थ होतो, असें म्हणणें असेल तर 'अम' धातूच्या पुढील णलाच्या लुकाचा प्रतिषेध केलाच पाहिजे; जसें:—आम.

(वा.४) अथवा सांगितलेंच (१।१।३९, वा.३) आहे.

तें काय सांगितलें आहे ?

'दोहोंच्या संबंधावर अवलंबून झालेला विधि तो त्या दोघांच्या संबंधांत विघात आणणाऱ्या शास्त्राला मदत करीत नाहीं,' असें म्हटलें आहे. तेव्हां 'आम' येथें अदुपधक अंग व णल् या उभयतांच्या पौर्वापर्यसंबंधामुळें झालेली वृद्धि ही त्या दोघांच्या पौर्वापर्यसंबंधाला आड येणाऱ्या 'आमः' या शास्त्राला मदत करीत नाहीं, म्हणजे हा आम्शब्दच नव्हे असें म्हणते.

काय हो, हा लुक् लिटाचे स्थानीं सांगितलेल्या तिप् वगैरे आदेशांचा अपवाद आहे किंवा ते आदेश केल्यानंतर हा लुक् होतो ?

(वा.५) हा लुक् तिप् वगैरे आदेशांचा अपवाद आहे.

(वा.६) जर हा लुक् तिप् वगैरे आदेशांचा अपवाद आहे तर तिङामुळें होणारें कार्य त्या आमन्ताला होणार नाहीं.

तें कार्य कोणतें ?

पदसंज्ञा (१।४।१४) हें तें कार्य होय.

(वा.७) तिङामुळें होणारी पदसंज्ञा न झाली तरी सुबन्तामुळें पदसंज्ञा होईल.

पण या आमन्ताच्या पुढें सुप्प्रत्ययांची उत्पत्ति कशी बरें होईल ?

(वा.८) लकाराला 'कृदतिङ्' (३।१।९३) यानें कृत्संज्ञा होते. त्यामुळें 'कृत्तद्धित०' (१।२।४६) यानें प्रातिपदिकसंज्ञा होऊन त्या प्रातिपदिकसंज्ञेवर अवलंबून सुप्प्रत्ययांची उत्पत्ति होईल.

जर आमन्ताच्या पुढें सुप्प्रत्ययांची उत्पत्ति होत असेल तर त्यांचें श्रवण होऊं लागेल.

'अव्ययादाप्सुपः' (२।४।८२) या पुढील सूत्रानें त्या सुप्प्रत्ययांचा लुक् होईल.

त्या आमन्ताला अव्ययसंज्ञा कशानें बरी करावयाची ?

(वा.९) कृन्मेजन्तः (१।१।३९) यानें

---

६. अम्धातूहून लिट्, तिप्, णल्, वृद्धि, द्विर्वचन, एकादेश. हा अम्शब्द अर्थवान् असल्यामुळें त्याच्या पुढील णलाचा लुक् होऊं लागेल, म्हणून प्रतिषेधादाखल वचन केलें पाहिजे.

व्ययसंज्ञा भविष्यति ॥ स्वरः कथम् । यत्प्रकारयांचकार ।

**स्वरः कृदन्तप्रकृतिस्वरत्वात् ॥१०॥**

कृदन्तमुत्तरपदं प्रकृतिस्वरं भवतीत्येष स्वरो भविष्यति ॥

**तथा च निघातानिघातसिद्धिः ॥११॥**

तथा च निघातानिघातसिद्धिर्भवति। चक्षुष्कामं याजयांचकार । तिङ्ङतिङः [८.१.२८] इति तस्य चानिघातस्तस्माच्च निघातः सिद्धो भवति ॥

**नञा तु समासप्रसङ्गः ॥ १२ ॥**

नञा तु समासः प्राप्नोति । न कारयाम् । न हारयाम् । नञ्सुबन्तेन सह समस्यत इति समासः प्राप्नोति ॥

**उक्तं वा ॥ १३ ॥**

किमुक्तम् । असामर्थ्यादिति । नात्र नञ आमन्तेन सामर्थ्यम् । केन तर्हि । तिङन्तेन । न चकार कारयाम् । न चकार हारयामिति ॥

**अव्ययादाप्सुपः ॥ २ । ४ । ८२ ॥**

**अव्ययादापो लुग्वचनानर्थक्यं लिङ्गाभावात् ॥ १ ॥**

अव्ययादापो लुग्वचनमनर्थकम् । किं कारणम् । लिङ्गाभावात् । अलिङ्गम-

---

मकारान्त कृत्प्रत्ययाला अव्ययसंज्ञा सांगितली आहे. ती अव्ययसंज्ञा येथें आमन्ताला होईल.

यत्प्रकारयांचकार येथें इष्ट असलेला स्वर कसा बरें साधेल ?

(वा.१०) 'गतिकारकोपपदात्०' (६।२।१३९) यानें कृदन्त उत्तरपदाला प्रकृतिस्वर होतो असें सांगितलें आहे. तो स्वर येथें होईल.

(वा.११) तिबादिक आदेश न करतां अगोदरच लुक् झाल्यामुळें अनुदात्त होणें व न होणें या गोष्टी साधतात. म्हणजे चक्षुष्कामं याजयांचकार येथें 'तिङ्ङतिङः' (८।१।२८) यानें तिङन्तभिन्न अशा आमन्ताच्या पुढील 'चकार' या तिङन्ताला अनुदात्त होतो, आणि आमन्त हे तिङन्त नसल्यामुळें चक्षुष्कामम् या अतिङन्ताच्या पुढें असून त्याला अनुदात्त होत नाहीं.

(वा.१२) आमन्ताच्या पुढें सुप्प्रत्ययांची उत्पत्ति झाली तर 'नञ्' (२।२।६) यानें त्या आमन्ताबरोबर नञाचा समास प्राप्त होतो; जसें:– न कारयाम्, न हारयाम्, वगैरे.

(वा.१३) अथवा हें सांगितलेंच आहे.

तें काय सांगितलें आहे ?

नञाचा आमन्ताकडे अन्वय नसल्यामुळें समास होणार नाहीं.

तर मग त्या नञाचा कोणाकडे अन्वय आहे बरें ?

कारयांचकार, हारयांचकार यांपैकीं चकार इत्यादिक जें लिट्प्रत्ययान्त त्याच्याकडे नञाचा अन्वय आहे.

(सू.८२, वा.१) अव्ययापुढील स्त्रीलिंगी आप्प्रत्ययाचा जो लुक् सांगितला आहे तो निष्फल आहे.

काय कारण ?

कारण असें की अव्ययाला मुळीं लिंगच

---

७. यत्प्रकारयाम् येथें प्रशब्दाला अनुदात्त स्वर होणें इष्ट आहे. तो आमन्ताच्या पुढील तिबादिकांचा लुक् झाला असतां प्रत्ययलक्षण करून 'तिङि चोदात्तवति०' (८।१।७१) यानें साधतां येतो. तिङ् उत्पन्न होण्याच्या पूर्वीच लुक् झाला तर मात्र 'तिङि चोदात्त०' हें सूत्र प्रवृत्त होणार नाहीं.

८. प्रशब्दाचा 'कारयाम्' या शब्दाबरोबर गतिसमास केला असतां कृदुत्तरपदप्रकृतिस्वर (६।२।१३९) होऊन शेषनिघात-(६।१।१५८)-स्वरानें गतिसंज्ञक प्रशब्दाला अनुदात्तस्वर साधेल.

९. नञाचा आमन्ताबरोबर समास झाला तर नञाच्या नकाराचा लोप (६।३।७३) व अव्ययपूर्वपदप्रकृतिस्वर (६।२।२) होऊं लागेल.

१. अव्ययाच्या स्त्रीलिंगी आप्प्रत्ययाचा आणि स्वादिक विभक्तींचा लुक् होतो; उदा०—तत्र शालायाम्, उच्चैः, नीचैः.

व्ययम् ॥ किमिदं भवान्सुपो लुकं मृष्यत्यापो लुकं न मृष्यति । यथैव ह्यलिङ्गमव्ययमेवमसंख्यमपि । सत्यमेतत् । प्रत्ययलक्षणमाचार्यः प्रार्थयमानः सुपो लुकं मृष्यति । आपः पुनरस्य लुकि सति न किंचिदपि प्रयोजनमस्ति ॥ उच्यमानेऽप्येतस्मिन्स्वाद्युत्पत्तिर्न प्राप्नोति । किं कारणम् । एकत्वादीनामभावात् । एकत्वादिष्वर्थेषु स्वादयो विधीयन्ते न चैषामेकत्वादयः सन्ति । अविशेषेणोत्पद्यन्त उत्पन्नानां नियमः क्रियते ॥ अथवा प्रकृतानर्थानपेक्ष्य नियमः । के च प्रकृताः । एकत्वादयः । एकस्मिन्नेवैकवचनं न द्वयोर्न बहुषु । द्वयोरेव द्विवचनं नैकस्मिन्न बहुषु । बहुष्वेव बहुवचनं नैकस्मिन्न द्वयोरिति ॥ अथवाचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयत्युत्पद्यन्तेऽव्यये-

---

नसल्यामुळें त्याच्या पुढें स्त्रीलिंगी प्रत्यय येण्याचा संभवच नाहीं.

पण काय तुझा हा चमत्कार की अव्ययाच्या पुढील सुपाचा लुक् सांगितला तो तुला खपतो, आणि त्याच्या पुढील स्त्रीलिंगी आप्-प्रत्ययाचा लुक् सांगितला तो मात्र तुला खुपतो. असें पहा की अव्ययाला जसें लिंग नाहीं, तशी त्याला एक, दोन, वगैरे संख्याही नाहीं. तेव्हां त्याहून सुप्प्रत्यय होण्याचाही संभव नाहीं.

अव्ययाला जसें लिंग नाहीं तशी त्याला एक, दोन, वगैरे संख्याही नाहीं, हें अगदीं खरें आहे. पण सुप्प्रत्ययाच्या निमित्तानें सांगितलेलें कार्य अव्ययाला व्हावें अशी अपेक्षा करणारा आचार्य अव्ययाच्या पुढील सुपाचा लुक् सहन करतो आणि अव्ययाच्या पुढें केलेल्या आप्-प्रत्ययाचा लुक् सांगितला असतां त्याचा कांहींच उपयोग दिसत नाहीं.

पण अव्ययाचा पुढील सुपाचा लुक् होतो असें म्हटलें तरी देखील अव्ययाच्या पुढें सुप्-प्रत्ययांची उत्पत्ति होणार नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं अव्ययाला एक, दोन, वगैरे संख्या नाहीं. आणि सुप्प्रत्यय तर एक, दोन, वगैरे संख्येला दाखविणारे असेच सांगितले आहेत.

'स्वौजस्' या सूत्रानें कोणताही अर्थ निमित्त म्हणून न धरतां सामान्यतःच प्रातिपदिकाहून सु, औ, वगैरे प्रत्यय करावयास सांगून उत्पन्न झालेल्या त्या सु, औ, वगैरेंचा 'द्व्येकयोः०' (१।४।२२) इत्यादि सूत्रांनीं अर्थनियम केला आहे.

किंवा प्रत्ययनियमपक्ष घेतला तरी एक, दोन, वगैरे निर्दिष्ट केलेले जे अर्थ त्या अर्थांना धरूनच 'द्व्येकयोः०' इत्यादि नियमांनीं व्यावृत्ति केली जाईल.

निर्दिष्ट केलेले अर्थ ते कोणते ?

एकत्व, द्वित्व, वगैरे हे होत. तेव्हां नियमाचा असा आकार होतो की एकत्व अर्थ असतांनाच एकवचन होतें. ह्या नियमानें व्यावृत्ति अशी होते की द्वित्व असतांना एकवचन होत नाहीं, आणि बहुत्व असतांना होत नाहीं. तसेंच द्वित्वसंख्या असतांनाच द्विवचन होतें म्हणजे एकत्व असतांना व बहुत्व असतांना होत नाहीं. तसेंच बहुत्व असतांनाच बहुवचन होतें म्हणजे एकत्व अस-

---

२. एकत्व असतांना एकवचन होतें, द्वित्व असतांना द्विवचन होतें आणि बहुत्व असतांना बहुवचन होतें, ह्या नियमांनीं एकत्व वगैरे संख्या असेल तेथें जरी ते ते प्रत्यय ठरविले गेले तरी मुळींच संख्या नसेल तेथें सामान्य सूत्रानें सर्वच प्रत्यय उत्पन्न होणारच. तेव्हां अव्ययाहून सुप्प्रत्ययांची उत्पत्ति होण्यास कांहींच हरकत नाहीं.

३. तेव्हां अव्ययाला एकत्व नाहीं हें खरें, तरी पण द्वित्व नाही आणि बहुत्वही नाहीं म्हणून त्या नियमानें एकवचनाची व्यावृत्ति होत नाहीं. याप्रमाणेंच पुढील नियमांनींही द्विवचनाची आणि बहुवचनाची व्यावृत्ति होत नाहीं. तेव्हां अव्ययाहून सुप्-प्रत्ययांची उत्पत्ति होण्यास कांहींच हरकत दिसत नाहीं.

भ्यः स्वादय इति यदयमव्ययादाप्सुप इति सुब्लुकं शास्ति ॥

**नाव्ययीभावादतोऽम्त्वपञ्चम्याः ॥ २।४।८३ ॥**

**नाव्ययीभावादत इति योगव्यवसानम् ॥ १ ॥**

नाव्ययीभावादत इति योगो व्यवसेयः । नाव्ययीभावादकारान्तात्सुपो लुग्भवति । ततोऽम्त्वपञ्चम्या ॥ किमर्थो योगविभागः ।

**पञ्चम्या अम्प्रतिषेधार्थम् ॥ २ ॥**

पञ्चम्या अमः प्रतिषेधो यथा स्यात् ॥

**एकयोगे ह्युभयोः प्रतिषेधः ॥३॥**

एकयोगे हि सत्युभयोः प्रतिषेधः स्यादमोऽलुकश्च ॥ स तर्हि योगविभागः कर्तव्यः । न कर्तव्यः ।

**तुर्नियामकः ॥ ४ ॥**

तुः क्रियते स नियामको भविष्यति । अमेवापञ्चम्या इति ॥

**अमि पञ्चमीप्रतिषेधेऽपादानग्रहणम् ॥ ५ ॥**

अमि पञ्चमीप्रतिषेधेऽपादानग्रहणं कर्तव्यम् । अपादानपञ्चम्या इति वक्तव्यम् । किं प्रयोजनम् ।

**कर्मप्रवचनीययुक्तेऽप्रतिषेधार्थम् ॥६॥**

कर्मप्रवचनीययुक्ते मा भूत् । आ-

---

तांना होत नाहीं व द्वित्व असतांना होत नाहीं.

अथवा ज्यापेक्षां प्रकृत सूत्रानें आचार्य अव्ययाच्या पुढील सुपाचा लुक् सांगत आहेत त्यापेक्षां ते अव्ययाला संख्या नसली तरी अव्ययाच्या पुढें स्वादिक उत्पन्न होतात असें सुचवीत आहेत.

(सू.८३, वा.१) 'नाव्ययीभावादतः' असें येथें एक सूत्र संपवावें. अकारान्त अव्ययीभावाच्या पुढील सुपाचा लुक् होत नाहीं असा त्याचा अर्थ. पुढें 'अम्त्वपञ्चम्याः' असें दुसरें सूत्र होय.

हा योगविभाग कशासाठीं केला जात आहे ?

(वा.२) अव्ययीभावाच्या पुढील पञ्चमीला अम्आदेशाचाच फक्त निषेध व्हावा म्हणून.

(वा.३) जर एकच सूत्र ठेवलें तर एका सूत्रांत असल्यामुळें अपञ्चम्याः हा प्रतिषेध अम्आदेश व अलुक् या उभयतांचाही होईल. तर मग तसा योगविभाग केला पाहिजे ?

तसा योगविभाग करावयास नको. कारण (वा.४) सूत्रामध्यें जो अम् या शब्दापुढें 'तु' शब्द घातला आहे तो नियामक होईल. म्हणजे अम्आदेशच फक्त पंचमीशिवाय होतो. अर्थात्च लुकाचा निषेध हा पंचमीलाही लागू होतो.

(वा.५) प्रकृत सूत्रानें सांगितलेला हा अम्आदेश पंचमीला होत नाहीं असा जो निषेध केला आहे तो निषेध अपादान या अर्थीं केलेल्या पंचमीलाच लागू होतो, असें वचन करावें.

असें करण्याचें काय प्रयोजन ?

(वा.६) कर्मप्रवचनीयाचा योग असतांना जी पंचमी (२।३।१०) सांगितली आहे तिला हा अम्आदेशाचा निषेध होऊं नये; जसें— आपाटलिपुत्रं[2] वृष्टो देवः.

---

१. ऱ्हस्व अकार शेवटीं असलेल्या अव्ययीभाव नांवाच्या अव्ययापुढील कोणत्याही सुप्विभक्तीचा लुक् तर करावयाचा नाहींच, उलट पञ्चमीखेरीज करून त्या सुप्विभक्तीला अम् असा आदेश होतो; उदा०— दिशयोर्मध्ये अपदिशम्, अपदिशात्.

२. येथें 'आङ्मर्यादावचने' (१।४।८९) यानें आङाला कर्मप्रवचनीयसंज्ञा, त्यामुळें 'पञ्चम्यपाङ्०' (२।३।१०) या सूत्रानें पाटलिपुत्रशब्दापुढें पञ्चमी, व 'आङ्मर्यादा०' (२।१।१३) यानें अव्ययीभावसमास; तेव्हां ही पञ्चमी अम्-आदेश करण्यांतून वगळली न जावी म्हणून पञ्चमीला 'अपादाने' हें विशेषण द्यावें, असा पूर्वपक्षाचा अभिप्राय आहे.

पाटलिपुत्रं वृष्टो देवः ॥

**न वोत्तरपदस्य कर्मप्रवचनीययोगात्समासात्पञ्चम्यभावः ॥ ७ ॥**

न वा वक्तव्यम् । किं कारणम् । उत्तरपदमत्र कर्मप्रवचनीययुक्तम् । उत्तरपदस्य कर्मप्रवचनीययोगात्समासात्पञ्चमी न भविष्यति । यदा च समासः कर्मप्रवचनीययुक्तो भवति तदा प्रतिषेधः । तद्यथा । आ उपकुम्भात् । आ उपमणिकादिति ॥

## तृतीयासप्तम्योर्बहुलम् ॥ २ । ४ । ८४ ॥

**सप्तम्या ऋद्धिनदीसमाससंख्यावयवेभ्यो नित्यम् ॥ १ ॥**

सप्तम्या ऋद्धिनदीसमाससंख्यावयवेभ्यो नित्यमिति वक्तव्यम् । ऋद्धि । सुमद्रम् सुमगधम् । नदीसमास । उन्मत्तगङ्गम् लोहितगङ्गम् । संख्यावयव । एकविंशतिभारद्वाजम् त्रिपञ्चाशद्गौतमम् ॥

## लुटः प्रथमस्य डारौरसः ॥ २ । ४ । ८५ ॥

**टितां टेरेविधेर्लुटो डारौरसः पूर्वविप्रतिषिद्धम् ॥ १ ॥**

टितां टेरेविधेर्लुटो डारौरसो भवन्ति पूर्वविप्रतिषेधेन । टेरेत्वस्यावकाशः । पचते पचेते पचन्ते । डारौरसामवकाशः ।

---

(वा.७) अथवा अपादानशब्द घालावयास नको.

काय कारण ?

कारण असें की आपाटलिपुत्रम् या वरील उदाहरणामध्यें 'पाटलिपुत्र' या उत्तरपदाला कर्मप्रवचनीयाचा योग आहे. समासाला कर्मप्रवचनीयाचा योग आहे. तेव्हां तेथें समासाहून ती पंचमी होतच नाहीं[३]. आतां जेव्हां समासाला कर्मप्रवचनीयाचा योग असेल तेव्हां त्या पंचमीला अमादेशाचा प्रतिषेध होतोच; जसें:— आ उपकुम्भात्, आ उपमणिकात्.

(सू.८४, वा.१) ऋद्धि या अर्थाला दाखविणारा अव्ययीभाव, नदीवाचक शब्दांचा अव्ययीभाव आणि संख्यावाचक शब्द पूर्वपद असलेला अव्ययीभाव यांच्यापुढील सप्तमीचे स्थानीं नित्य अम्‌आदेश होतो असें वचन करावें; जसें:— मद्राणां समृद्धिः सुमद्रम्[२] तस्मिन् सुमद्रम्, सुमगधम्; उन्मत्तगङ्गम्[३], लोहितगङ्गम्; एकविंशतिभारद्वाजम्[४], त्रिपञ्चाशद्गौतमम्.

(सू.८५, वा.१) टकारेत्संज्ञक लकाराचे ठिकाणीं केलेल्या आत्मनेपदप्रत्ययांच्या टिभागाला सांगितलेल्या एत्वा–(३।४।७९)पेक्षां लुटाचे स्थानीं केलेल्या आत्मनेपदप्रथमपुरुषाला डा–रौ–रस्‌आदेश पूर्वविप्रतिषेधानें प्रथमतः होतात, असें वचन करावें. 'टित आत्मनेपदानाम्०' या एत्वाला पचते पचेते

---

३. तेव्हां आपाटलिपुत्रम् येथें समासाहून प्रथमाच झाली आहे, व तिलाच अम्‌आदेश झाला आहे.

१. ऱ्हस्व अकार शेवटीं असलेल्या अव्ययीभाव नांवाच्या अव्ययाच्या पुढील तृतीया किंवा सप्तमी यांचे स्थानीं अम्‌आदेश बाहुल्येंकरून होतो; उदा० अपदिशम्, अपदिशेन; अपदिशम्, अपदिशे.

२. येथें समृद्धि या अर्थी 'अव्ययं विभक्ति०' (२।१।६) यानें अव्ययीभावसमास झाला आहे.

३. येथें 'अन्यपदार्थे च' (२।१।२१) यानें अव्ययीभाव समास झाला आहे.

४. एकविंशतिश्च ते भारद्वाजाश्च असा विग्रह आहे. कर्मधारयाचा बाध करून 'संख्या वंश्येन' (२।१।१९) यानें अव्ययीभाव समास झाला आहे.

१. लुटाचे ठिकाणीं केलेल्या प्रथमपुरुषाचे स्थानीं क्रमानें डा, रौ, रस्, असे आदेश होतात; उदा०— भविता भवितारौ भवितारः, एधिता एधितारौ एधितारः.

श्वः कर्ता श्वः कर्तारौ श्वः कर्तारः । इहोभयं प्राप्नोति । श्वोऽध्येता श्वोऽध्येतारौ श्वोऽध्येतार इति । डारौरसो भवन्ति पूर्वविप्रतिषेधेन ॥ स तर्हि पूर्वविप्रतिषेधो वक्तव्यः । न वक्तव्यः ।

**आत्मनेपदानां चेति वचनात्सिद्धम् ॥ २ ॥**

आत्मनेपदानां च डारौरसो भवन्तीति वक्तव्यम् ॥

**तच्च समसंख्यार्थम् ॥ ३ ॥**

तच्चावश्यमात्मनेपदग्रहणं कर्तव्यं समसंख्यार्थम् । संख्यातानुदेशो यथा स्यात् । अक्रियमाणे ह्यात्मनेपदग्रहणे षट् स्थानिनस्त्रय आदेशाः । वैषम्यात्संख्यातानुदेशो न प्राप्नोति ॥

पूर्वविप्रतिषेधार्थेन तावन्नार्थ आत्मनेपदग्रहणेन । इदमिह संप्रधार्यम् । डारौरसः क्रियन्तां टेरेत्वमिति किमत्र कर्तव्यम् । परत्वादेत्वम् । नित्या डारौरसः। कृतेऽप्येत्वे प्राप्नुवन्त्यकृतेऽपि प्राप्नुवन्ति। टेरेत्वमपि नित्यम् । कृतेष्वपि डारौरस्सु प्राप्नोत्यकृतेष्वपि प्राप्नोति । अनित्यमेत्वम् । अन्यस्य कृतेषु डारौरस्सु प्राप्नोत्यन्यस्याकृतेषु शब्दान्तरस्य च प्राप्नुवन्विधिरनित्यो भवति। डारौरसोऽप्यनित्याः। अन्यस्य कृत एत्वे प्राप्नुवन्त्यन्यस्याकृते

---

पचन्ते येथें अवकाश आहे. डा रौ रस् या आदेशांना श्वः कर्ता, श्वः कर्तारौ, श्वः कर्तारः, येथें परस्मैपदामध्यें अवकाश आहे, आणि श्वोऽध्येता, श्वोऽध्येतारौ, श्वोऽध्येतारः, येथें उभययांची प्राप्ति येत आहे. तेथें पूर्वविप्रतिषेधानें डा रौ रस् होतात.

तेव्हां तें पूर्वविप्रतिषेधादाखल वचन केलें पाहिजे.

पूर्वविप्रतिषेधवचन करावयास नको. कारण

(वा.२) लुटाचे ठिकाणीं केलेल्या प्रथमपुरुषसंज्ञक आत्मनेपदालाही डा, रौ, रस् हे आदेश होतात असें वचन केल्यानें इष्ट सिद्ध होत आहे.

(वा.३) तें 'आत्मनेपदानां च' हें वचन अवश्य केलेंच पाहिजे, स्थानी आणि आदेश यांचा यथासंख्यानें अन्वय व्हावा म्हणून. जर तें वचन केलें नाहीं तर 'प्रथमपुरुषस्य' या पदानें तिप् तस् झि, त आताम् झ, असे सहा स्थानी होतात व डा रौ रस् असे तीन आदेश होतात. तेव्हां विषमसंख्या होत असल्यामुळें त्यांचा क्रमानें संबंध होणार नाहीं.

आतां पूर्वविप्रतिषेधवचनाच्या प्रत्याख्यानासाठीं तर आत्मनेपदग्रहणाचा उपयोग होत नाहीं. कारण येथें असा विचार करावा की अध्येता वगैरे उदाहरणांमध्यें डा रौ रस् हे आदेश पूर्वी करावेत किंवा एत्व पूर्वी करावें, यांपैकीं काय बरें करावें ?

पर असल्यामुळें एत्व करावें.

पण डा रौ रस् हे आदेश नित्य आहेत. कारण एत्व केलें अथवा न केलें तरी देखील ते येऊं शकत आहेत.

एत्व देखील नित्य आहे. कारण डा, रौ, रस्, हे आदेश केले किंवा न केले तरीही तें एत्व प्राप्त होऊं शकतें.

एत्व नित्य नाहीं. कारण डा रौ रस् हे आदेश केल्यानंतर त्या आदेशांच्या टिभागाला एत्व प्राप्त होतें आणि आदेश करण्याच्या पूर्वी स्थानींच्या टिभागाला एत्व प्राप्त होतें. आणि निरनिराळ्या शब्दाला प्राप्त होणारा विधि अनित्य म्हटला जातो.

पण तसे डा रौ रस् हे आदेशही नित्य नव्हेत. कारण एत्व केल्यानंतर निराळ्या तऱ्हेच्या व्यक्तींना आदेश प्राप्त होतात व एत्व करण्याच्या पूर्वी निराळ्या तऱ्हेच्या

---

२. तेव्हां विशेषविहित अशा डा, रौ, रस्, या आदेशांनीं एत्वाचा बाध होतो.

शब्दान्तरस्य च प्राप्नुवन्तोऽनित्या भवन्ति । उभयोरनित्ययोः परत्वादेत्वम् । एत्वे कृते पुनःप्रसङ्गविज्ञानाड्डारौरसो भविष्यन्ति ॥ समसंख्यार्थेन चापि नार्थ आत्मनेपदग्रहणेन । स्थानेऽन्तरतमेन व्यवस्था भविष्यति । कुत आन्तर्यम् । अर्थतः । एकार्थस्यैकार्थो द्व्यर्थस्य द्व्यर्थो बह्वर्थस्य बह्वर्थः ॥ अथवादेशा अपि षडेव निर्दिश्यन्ते । कथम् । एकशेषनिर्देशात् । एकशेषनिर्देशोऽयम् ॥ अथैतस्मिन्नेकशेषनिर्देशे सति किमयं कृतैकशेषाणां द्वन्द्वः । डा च डा च डा । रौ च रौ च रौ । रश्च रश्च रः । डा च रौ च रश्च डारौरस इति आहोस्वित्कृतद्वन्द्वानामेकशेषः । डा च रौ च रश्च डारौरसः । डारौरसश्च डारौरसश्च डारौरस इति । किं चातः । यदि कृतैकशेषाणां द्वन्द्वोऽनिष्टः समसंख्यः प्राप्नोति । एकवचनद्विवचनयोर्डा प्राप्नोति बहुवचनैकवचनयो रौ प्राप्नोति द्विवचनबहुवचनयोश्च रस्प्राप्नोति । अथ

शब्दव्यक्तींना आदेश प्राप्त होतात. तेव्हां निरनिराळ्या शब्दांना प्राप्त होत असल्यामुळें तें आदेश अनित्य आहेत. अशा रीतीनें उभयतांनाही अनित्यत्व असल्यामुळें पर असें एत्व अगोदर होईल, आणि एत्व केल्यानंतर पुनःप्रसंगन्यायानें मागून डा रौ रस् हे आदेश होतील.

तसेंच स्थानी आणि आदेश यांचा क्रमानें संबंध होण्यासाठींही आत्मनेपदग्रहणाचा उपयोग होत नाहीं. कारण 'स्थानेऽन्तरतमः' या परिभाषेनें व्यवस्था होईल.

पण स्थानी आणि आदेश यांचें सादृश्य कशामुळें बरें आहे ?

अर्थामुळें सादृश्य आहे. तेव्हां स्थानी म्हणून सहा उपस्थित झाले तरी तरी एक या अर्थाला दाखविणाऱ्या प्रथमपुरुषाला एक या अर्थाला दाखविणारा डाआदेश होईल. याप्रमाणें दोन या अर्थाला दाखविणाऱ्या प्रथमपुरुषाला त्याच अर्थाचा रौ आणि बहुत या अर्थाला दाखविणाऱ्या प्रथमपुरुषाला तसलाच रस्आदेश होईल.

अथवा स्थानीप्रमाणें आदेश देखील सूत्रामध्येंच सहा निर्दिष्ट आहेत.

ते कसे ?

डारौरसः हा एकशेष करून निर्देश केला आहे.

आतां डारौरसः हा एकशेषानें निर्देश असूं दे. पण येथें काय एकशेष केलेल्यांचा द्वंद्व करावयाचा; जसें:– डा च डा च डा; रौ च रौ च रौ, रश्च रश्च रः, डा च रौ च रश्च डारौरसः; किंवा द्वंद्व केलेल्यांचा एकशेष करावयाचा; जसें:– डा च रौ च रश्च डारौरसः, डारौरसश्च डारौरसश्च डारौरसः ?

मग यांत फरक काय होतो ?

जर एकशेष केलेल्यांचा द्वंद्व असेल तर इष्ट असा क्रमानें संबंध होत नाहीं, तर अनिष्ट तऱ्हेचा संबंध प्राप्त होतो; जसें:–परस्मैपदांतील एकवचन व द्विवचन या उभयतांना डाआदेश, परस्मैपदांतील बहुवचन व आत्मनेपदांतील एकवचन या उभयतांना रौ, आणि आत्मनेपदांतील द्विवचन व बहुवचन या उभयतांना रस्आदेश असा अनिष्ट

३. डा, रौ आणि रस् या आदेशांना एकत्व, द्वित्व आणि बहुत्व हे अर्थ आहेत असें सिद्ध प्रयोगांवरून ठरवितां येतें.

४. प्रथमपुरुष या शब्दापासून परस्मैपद व आत्मनेपद मिळून तिप् तस् झि, त आताम् झ, असे सहा प्रत्यय क्रमानें उपस्थित होतात, आणि एकशेष केलेल्यांचा द्वंद्व असें गृहीत धरलें असतां डारौरस् या पदापासून डा-डा-रौ-रौ-रस्-रस् असे सहा क्रमानें उपस्थित होतात. तेव्हां या सहा स्थानींचा सहा आदेशांशीं क्रमानें संबंध केला असतां पहिल्या तिप्प्रत्ययाला पहिला डा, दुसऱ्या तस्प्रत्ययाला दुसरा डाआदेश प्राप्त होतो. असेंच पुढेंही

कृतद्वन्द्वानामेकशेषो न दोषो भवति। यथा न दोषस्तथास्तु ॥ किं पुनरत्र ज्यायः। उभयमित्याह। उभयं हि दृश्यते। बहु शक्तिकिटकम्। बहूनि शक्तिकिटकानि। बहु स्थालीपिठरम्। बहूनि स्थालीपिठराणि ॥

डारौरसः कृते टेरे यथा द्वित्वं प्रसारणे।
समसंख्येन नार्थोऽस्ति सिद्धं स्थानेऽर्थतोऽन्तराः ॥
आन्तर्यतो व्यवस्था त्रय एवेमे भवन्तु सर्वेषाम्।
टेरेत्वं च परत्वात्कृतेऽपि तस्मिन्निमे सन्तु ॥

**डाविकारस्य शित्करणं सर्वादेशार्थम् ॥ ४ ॥**

डाविकारः शित्कर्तव्यः। किं प्रयोजनम्। सर्वादेशार्थम्। शित्सर्वस्येति सर्वादेशो यथा स्यात्। अक्रियमाणे हि

---

संबंध होऊं लागेल.

आतां द्वंद्व केलेल्यांचा एकशेष असेल तर हा दोष येत नाहीं.

ज्या रीतीनें दोष येणार नाहीं तसेंच असूं दे.

पण या दोन प्रकारांपैकीं कोणता प्रकार श्रेष्ठ होय ?

दोन्ही प्रकार दृष्टीस पडतात; जसेंः— बहु शक्तिकिटकम्[६], बहूनि शक्तिकिटकानि; बहु स्थालीपिठरम्, बहूनि स्थालीपिठराणि.

ज्याप्रमाणें ईजतुः, ईजुः, येथें परत्वास्तव प्रथमतः संप्रसारण (६।१।१५) केलें असतां पुनःप्रसङ्गविज्ञानन्यायानें मागून द्विर्वचन (६।१।८) होतें त्याप्रमाणें अध्येता वगैरे उदाहरणांमध्यें 'टि'भागाला एत्व केल्यानंतर मागून पुनःप्रसंगन्यायानें हे आदेश होतील. तसेंच स्थानी सहा आहेत म्हणून त्यांच्या बरोबरीनें संख्या जमण्याकरित एकशेष करण्याची जी खटपट केली त्यांत कांहीं अर्थ नाहीं. कारण 'स्थानेऽन्तरतमः' या परिभाषेनें अर्थानें साहश्य घेतलें म्हणजे काम भागणार आहे.

(वा.४) या डाआदेशाला इत्संज्ञक शकार जोडण्यांत यावा.

काय प्रयोजन ?

'ज्याचा शकार इत्संज्ञक आहे असा आदेश ज्याला सांगितला त्या सर्वांचे ठिकाणीं करावा' (१।१।५५) या परिभाषेनें डाआदेश सर्वांचे ठिकाणीं व्हावा म्हणून. जर शकार जोडण्यांत न येईल तर 'ज्याचे ठिकाणीं आदेश करावयास सांगितला त्यांतील शेवटल्या वर्णाचे

---

समजावें.

५. द्वंद्व केलेल्यांचा एकशेष असें गृहीत धरलें तर डारौरस्, डारौरस्, या क्रमानें सहा आदेश उपस्थित होतात. तेव्हां त्यांचा क्रमानें अन्वय केला असतां तिपाला डा, तसाला रौ, या क्रमानें इष्ट असलेला क्रमानें संबंध होत असल्यामुळें दोष येत नाहीं.

६. जातिरप्राणिनाम् (२।४।६) यानें शक्ति आणि किटक या उभयतांचा समाहारद्वंद्व करून त्याला बहु हें विशेषण लाविलें आहे. तेथें द्वंद्वामध्यें शक्ति आणि किटक असे दोन पदार्थ असल्यानें त्यांना बहु हें विशेषण लावणें संभवत नाहीं. यावरून शक्तिश्च शक्तिश्च शक्ती, किटकं च किटकं च किटके, असा प्रथमतः एकशेष करून नंतर एकशेष केलेल्यांचा समाहारद्वंद्व केला आहे असें ठरतें व म्हणूनच दिलेलें बहु हें विशेषण जुळून येतें. तसेंच शक्तिकिटकानि येथें द्वंद्वसमासाच्या पुढें बहुवचन केलें आहे, तेथें 'जातिरप्राणिनाम्' या नियमानें येथें समाहारच करावयाचा असल्यामुळें व समाहार हा स्वभावसिद्ध एकवचनींच असल्यामुळें एकशेष केलेल्यांचा समाहारद्वंद्व करून सुद्धां त्याचेपुढें बहुवचनप्रत्यय येणें संभवनीय नाहीं. यावरून शक्तिकिटकं च शक्तिकिटकं च शक्तिकिटकं च शक्तिकिटकानि, असा द्वंद्व केलेल्यांचा एकशेष केला आहे असें दिसतें, आणि म्हणूनच तेथें केलेलें बहुवचन जुळून येतें. तेव्हां एकशेष केलेल्यांचा द्वंद्व किंवा द्वंद्व केलेल्यांचा एकशेष या दोन्हीही तऱ्हा न्याय्य ठरतात.

७. मागील श्लोकाचा अर्थच या आर्येमध्यें गोविला आहे.

शकारेऽलोन्त्यस्य विधयो भवन्तीत्यन्त्यस्य प्रसज्येत ॥

**निघातप्रसङ्गस्तु ॥ ५ ॥**

निघातस्तु प्राप्नोति । श्वः कर्ता । तासेः परं लसार्वधातुकमनुदात्तं भवतीत्येष स्वरः प्राप्नोति ॥

यत्तावदुच्यते डाविकारस्य शित्करणं सर्वादेशार्थमिति ।

**सिद्धमलोऽन्त्यविकारात् ॥ ६ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । अलोऽन्त्यविकारात् । अस्त्वयमलोऽन्त्यस्य । का रूपसिद्धिः । कर्ता ।

**डिति टेर्लोपाल्लोपः ॥ ७ ॥**

डिति टेर्लोपेन लोपो भविष्यति । अभत्वान्न प्राप्नोति । डित्करणसामर्थ्याद्भविष्यति ॥

**अनित्त्वाद्वा ॥ ८ ॥**

अथवानित्त्वादेतत्सिद्धम् । किमिदमनित्त्वादिति । अन्त्यस्यायं स्थाने भवन्न प्रत्ययः स्यात् । असत्यां प्रत्ययसंज्ञायामित्संज्ञा न । असत्यामित्संज्ञायां लोपो न । असति लोपेऽनेकाल् । यदानेकाल्तदा सर्वादेशः । यदा सर्वादेशस्तदा प्रत्ययः । यदा प्रत्ययस्तदेत्संज्ञा । यदेत्संज्ञा तदा लोपः ॥

**प्रश्लिष्टनिर्देशाद्वा ॥ ९ ॥**

---

ठिकाणीं तो आदेश करावा' (१।१।५२) या परिभाषेनें डाआदेश प्रथमपुरुषाच्या एकवचनांतील शेवटल्या वर्णाला होऊं लागेल.

(वा.५) श्वः कर्ता येथें 'तास्प्रत्ययापुढील लकाराचे ठिकाणीं केलेल्या सार्वधातुकाला अनुदात्तस्वर होतो'(६।१।१८६) असा सांगितलेला अनुदात्त डा या आदेशाला होऊं लागेल.

डाआदेश सर्वांचे ठिकाणीं व्हावा यासाठीं त्याला इत्संज्ञक शकार जोडण्यांत यावा असें जें म्हटलें त्यावर उत्तर—

(वा.६) शकार जोडल्यावांचूनच इष्ट साधत आहे.

तें कसें ?

अलोऽन्त्यपरिभाषेनें शेवटच्या वर्णाला हा डाआदेश होऊं दे.

पण मग कर्ता हें रूप कसें बरें साधेल?

(वा.७) 'टेः' (६।४।१४३) या सूत्रानें डकारेत्संज्ञक आकार पुढें असल्यामुळें मागील तकारासकट टिभागाचा लोप झाला म्हणजे कर्ता हें रूप साधेल.

पण डकारेत्संज्ञक आकाराच्या मागील तकारान्त भागाला भसंज्ञा नसल्यामुळें टिलोप प्राप्त होऊं शकत नाहीं.

आकाराला इत्संज्ञक डकार जोडल्याचे जोरावर भसंज्ञा नसली तरी देखील तकारासकट टिभागाचा लोप होईल.

(वा.८) किंवा डकाराला इत्संज्ञा नसल्यामुळें डाआदेश सर्वांचे ठिकाणीं होणें हें साधत आहे.

'डकाराला इत्संज्ञा नसल्यानें' असें म्हटलें, पण डकाराला इत्संज्ञा कां बरें होत नाहीं ?

हा डाआदेश अन्त्यवर्णाला झाला तर त्याला प्रत्यय म्हणतां येणार नाहीं. प्रत्यय हें नांव न मिळाल्यामुळें इत्संज्ञा (१।३।७) होणार नाहीं. इत् हें नांव न मिळाल्यामुळें त्या डकाराचा लोप (१।३।९) होणार नाहीं. लोप न झाल्यामुळें डाआदेश अनेकाल् ठरतो. आणि असा अनेकाल् ठरला तर तो सर्वांचे ठिकाणीं होतो. आणि सर्वांचें ठिकाणीं झाला तर त्याला प्रत्यय म्हणतां येतें. आणि प्रत्यय म्हणतां आलें तरच त्यांतील डकाराला इत्संज्ञा होते. आणि ज्यापेक्षां तो डकार इत्संज्ञक होतो त्यापेक्षां त्याचा लोप होतो.

(वा.९) किंवा डा+आ या आदेशामध्यें संधि करून डा असा निर्देश केला आहे;

अथवा प्रश्लिष्टनिर्देशोऽयम् । डा आ डा । सोऽनेकाल्शित्सर्वस्य [१.१.५५] इति सर्वादेशो भविष्यति ॥

यदा तर्ह्ययमन्त्यस्य स्थाने भवति तदा तिङ्ग्रहणेन ग्रहणं न प्राप्नोति ।

**तिङ्ग्रहणमेकदेशविकृतस्यानन्यत्वात् ॥ १० ॥**

एकदेशविकृतमनन्यवद्भवतीति तिङ्ग्रहणेन ग्रहणं भविष्यति ॥

स्वरः कथम् ।

**स्वरे विप्रतिषेधात्सिद्धम् ॥११॥**

डारौरसः क्रियन्तामनुदात्तत्वमिति किमत्र कर्तव्यम् । परत्वादनुदात्तत्वम् । नित्या डारौरसः । कृतेऽप्यनुदात्तत्वे प्राप्नुवन्त्यकृतेऽपि प्राप्नुवन्ति । अनुदात्तत्वमपि नित्यम् । कृतेष्वपि डारौरस्सु प्राप्नोत्यकृतेष्वपि प्राप्नोति । अनित्यमनुदात्तत्वम् । अन्यस्य कृतेषु डारौरस्सु प्राप्नोत्यन्यस्याकृतेषु शब्दान्तरस्य च प्राप्नुवन्विधिरनित्यो भवति । डारौरसोऽप्यनित्याः । अन्यथास्वरस्य कृतेऽनुदात्तत्वे प्राप्नुवन्त्यन्यथास्वरस्याकृते स्वराभिन्नस्य च प्राप्नुवन्तोऽनित्या भवन्ति । उभयोरनित्ययोः परत्वादनुदात्तत्वम् । अनुदात्तत्वे कृते पुनःप्रसङ्गविज्ञानाड्डारौरसः । टिलोप उदात्तनिवृत्तिस्वरेण सिद्धम् ॥ न सिध्यति ।

---

तेव्हां 'डा आ' एवढा आदेश अनेकाल्त्वास्तव सर्वादेश होईल.

आतां जेव्हां हा डाआदेश अन्त्य वर्णाचे स्थानीं केला होता तेव्हां तो तिङाचे स्थानीं केला नसल्यामुळें त्याला तिङ् हें नांव देतां येणार नाहीं.

(वा.१०) अन्त्य वर्णाचे ठिकाणीं डाआदेश केला तरी 'एकदेशाला विकार झाला असतां तो निराळा समजूं नये' या न्यायानें त्याला तिङ् हें नांव देतां येतें. तेव्हां पदसंज्ञा होईल.

आतां श्वः कर्ता येथें 'तास्यनुदा०' (६।१ १८६) यानें डाआदेशाला अनुदात्तस्वर प्राप्त होतो; आणि उदात्तस्वर तर इष्ट आहे; त्याची काय वाट ?

(वा.११) स्वराविषयीं विप्रतिषेधामुळें इष्ट साधतें. तेथें असा विचार करावा की कृ+तास्, ति, वगैरे असें असतां तेथें तिबादिकांना डारौरस्आदेश करावेत किंवा 'तास्यनुदात्ते०' यानें त्यांना अनुदात्तस्वर करावा.

यांपैकीं प्रथमतः काय करावें ?

आदेशापेक्षां पर असल्यामुळें अनुदात्तस्वर अगोदर करावा. पण डारौरस् हे आदेश नित्य आहेत. कारण अनुदात्तस्वर केला अथवा न केला तरी देखील आदेश प्राप्त होत आहेत म्हणून.

अनुदात्तस्वरही नित्य आहे. कारण डा रौ रस् हे आदेश केले किंवा न केले तरीही तो प्राप्त होत आहे म्हणून.

अनुदात्तस्वर नित्य नाहीं. कारण डारौरस्आदेश केले असतां निराळ्या शब्दांना अनुदात्तस्वर प्राप्त होतो आणि आदेश केले नसतां निराळ्याच शब्दाला प्राप्त होतो आणि असा निरनिराळ्या शब्दांना प्राप्त होणारा विधि अनित्य म्हटला जातो. पण तसे डा रौ रस् हे आदेशही अनित्य आहेत; कारण अनुदात्त स्वर केला असतां भिन्न स्वराच्या ति वगैरेंना आदेश येतात व अनुदात्त स्वर केला नसतां त्यापेक्षां भिन्न स्वराच्या ति वगैरेंना आदेश येतात; आणि भिन्न भिन्न स्वरांच्या शब्दाला प्राप्त होणारा विधि अनित्य म्हटला जातो.

तेव्हां अशा रीतीनें उभयतांही विधि अनित्य ठरले असतां त्यांमध्यें पर असल्यामुळें प्रथमतः अनुदात्त स्वर होईल. अनुदात्त स्वर केला असतां मागून पुनःप्रसङ्गविज्ञानन्यायानें डा रौ रस् हे आदेश होतील. त्यानंतर टिलोप केला असतां 'अनुदात्तस्य०' (६।१।

किं कारणम् । अन्तरङ्गत्वाड्डारौरसः । तत्रान्तरङ्गत्वाड्डारौरस्सु कृतेष्वनुदात्तत्वं क्रियतां टिलोप इति किमत्र कर्तव्यम् । परत्वाट्टिलोपेन भवितव्यम् ॥ एवं तर्हि स्वरे विप्रतिषेधात्सिद्धम् । न्याय्य एवायं स्वरे विप्रतिषेधः । इदमिह संप्रधार्यम् । अनुदात्तत्वं क्रियतामुदात्तनिवृत्तिस्वर इति किमत्र कर्तव्यम् । परत्वादनुदात्तत्वम् । अनुदात्तत्वे कृते पुनःप्रसङ्गविज्ञानादुदात्तनिवृत्तिस्वरो भविष्यति ॥ तदेतत्क सिद्धं भवति । यत्पिद्वचनम् । यदपिद्वचनं तत्र न सिध्यति । तत्रापि सिद्धम् । कथम् । इदमद्य लसार्वधातुकानुदात्तत्वं प्रत्ययस्वरस्यापवादः । न चापवादविषय उत्सर्गोऽभिनिविशते । पूर्वं ह्यपवादा अभिनिविशन्ते पश्चादुत्सर्गाः । प्रकल्प्य वापवादविषयं तत उत्सर्गोऽभिनिविशते । तन्न तावदत्र

१६१) या उदात्तनिवृत्तिस्वरानें डाआदेशाला उदात्त साधत आहे. पण तसाही उदात्तस्वर साधत नाहीं.

काय कारण ?

कारण असें की डा रौ रस् हे आदेश अंतरंग असल्यामुळें प्रथमतः प्राप्त होत आहेत. तेव्हां अंतरंगास्तव स्वराचे पूर्वी डा रौ रस् हे आदेश केले असतां त्यांना अनुदात्तस्वर करावा किंवा त्याच्यामुळें मागें टिलोप करावा यांपैकीं काय करावें, अशी स्पर्धा उत्पन्न होते. तेव्हां त्यांमध्यें पर असल्यामुळें टिलोप पूर्वी करावा; नंतर डा वगैरेंना अनुदात्त होऊन तो कायम राहील; कारण अनुदात्त पुढें असतांना उदात्ताचा लोप झाला नसल्यामुळें उदात्तनिवृत्तिस्वर येऊं शकत नाहीं.

असें आहे तर स्वरविप्रतिषेधामुळेंच हें इष्ट साधत आहे. आणि येथें हा विप्रतिषेध योग्यच आहे. तो असाः– कृ+तास्, ति, असें असतां अंतरंगास्तव डा रौ रस् हे आदेश केले, व लसार्वधातुकानुदात्तत्वापेक्षां परत्वास्तव टिलोप केला असतां कृ त्-आ अशी स्थिति होते. तेथें लसार्वधातुकानुदात्तस्वर (६।१।१८६) करावा किंवा उदात्तनिवृत्तिस्वर करावा यांपैकीं काय करावें ?

पर असल्यामुळें लसार्वधातुकानुदात्तस्वर करावा. तो अनुदात्तस्वर केला असतां पुनःप्रसंगन्यायानें उदात्तनिवृत्तिस्वर होईल.

पण अशा रीतीनें उदात्तनिवृत्तिस्वर कोठें साधेल ? ज्या ठिकाणीं पित्प्रत्यय आहे तेथें साधेल. पण ज्या ठिकाणीं पित्प्रत्यय नाहीं तेथें हा स्वर साधत नाहीं.

तेथेंही उदात्तनिवृतिस्वर साधत आहे.

तो कसा ?

लसार्वधातुकानुदात्तस्वर ( ६।१।१८६ ) प्रत्ययस्वराचा (३।१।३) अपवाद आहे, आणि अपवादाच्या विषयामध्यें तर उत्सर्ग येऊं शकत नाहीं. कारण प्रथमतः अपवाद मनांत येतात आणि अपवादांचें हें स्थल नव्हे असें ठरल्यानंतर तेथें उत्सर्ग प्रवृत्त होतात. तेव्हां अपवादाचा विषय वगळूनच उत्सर्गाची प्रवृत्ति होत असल्यामुळें येथें केव्हांही प्रत्ययस्वर होणार नाहीं, तर अपवाद असा जो लसार्वधातुकानु-

८. ह्या दोन्ही स्वरांमध्यें कोणी अंतरंग नाहीं व कोणी बहिरंग नाहीं. तेव्हां दोन्ही सारख्याच बलाच आहेत, आणि त्यांत सुद्धां जो हा स्वर पर आहे तोच विप्रतिषेधानें करावयाचा आहे.

९. तिप् हा पित्प्रत्यय मूळचाच अनुदात्त (३।१।४) असल्यामुळें त्याला झालेला डाआदेशही अनुदात्त आहे. तेव्हां तेथें 'तास्यनुदात्तेत्' (६।१।१८१) ह्यानें प्रत्ययाला अनुदात्त केल्यानंतरच उदात्तनिवृत्तिस्वर (६।१।१६१) प्राप्त होतो असें नाहीं, तर त्या दोन्ही स्वरांची बरोबर प्राप्ति येते, म्हणून तेथें वर केलेली व्यवस्था जुळते.

कदाचित्प्रत्ययस्वरो भवत्यपवादं लसार्वधातुकानुदात्तत्वं प्रतीक्षते। तत्रानुदात्तत्वं क्रियतां लोप इति यद्यपि परत्वाल्लोपः सोऽसावविद्यमानोदात्तत्वेऽनुदात्त उदात्तो लुप्यते ॥

प्रत्ययस्वरापवादो लसार्वधातुकानुदात्तत्वम् । तेन तत्र न प्रसक्तः प्रत्ययस्वरः कदाचित् ॥

प्रत्ययस्वरश्च तासेर्वृत्तिसंनियोगशिष्टः। तेन चाप्यसावुदात्तो लोप्स्यते तथा न दोषः ॥

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये द्वितीयस्याध्यायस्य चतुर्थे पादे द्वितीयमाह्निकम् ॥ पादश्च समाप्तः ॥

---

दात्तस्वर त्याची वाट पाहत बसेल. तेव्हां अध्येता येथें तप्रत्ययाचे ठिकाणीं केलेला डाआदेश उदात्तस्वराचा म्हणतां येत नाहीं. तेव्हां कृ-तास्-आ असें असतां लसार्वधातुकानुदात्तस्वर करावा किंवा टिलोप करावा असा विचार उपस्थित झाला असतां जरी पर असल्यामुळें टिलोप झाला तरी त्यानंतर उदात्तनिवृत्तिस्वर प्रवृत्त होतो. जरी त हा प्रत्यय पित् नसल्यामुळें अनुदात्तस्वराचा नाहीं व त्यामुळें अनुदात्त पुढें नसल्यामुळें उदात्तनिवृत्तिस्वर येणार नाहीं तरी वर सांगितल्याप्रमाणें प्रत्ययस्वर उदात्त न झाल्यामुळें 'ज्यामध्यें उदात्त नाहीं' अशा अर्थानें त हा अनुदात्त[१०] पुढें आहे, म्हणून उदात्तनिवृत्तिस्वर प्रवृत्त होतो.

लसार्वधातुकानुदात्तस्वर प्रत्ययस्वराचा अपवाद असल्यामुळें अध्येता येथें तप्रत्ययाला प्रत्ययस्वर केव्हांही येऊं शकत नाहीं, आणि तास्प्रत्ययाविषयीं अपवाद नसल्यामुळें प्रत्ययस्वर तास्प्रत्ययाच्या प्रवृत्तीबरोबरच प्रवृत्त होतो; त्यामुळें डकारेत्संज्ञक आप्रत्ययाच्या निमित्तानें झालेला तास्प्रत्ययांतील टिलोप हा ज्यांत उदात्त नाहीं असा अनुदात्त पुढें असतांना उदात्तलोप झाला असल्यामुळें उदात्तनिवृत्तिस्वर प्रवृत्त होतो, म्हणून दोष येत नाहीं.

याप्रमाणें भगवान्पतंजलिऋषींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्यांतील दुसऱ्या अध्यायाच्या चौथ्या पादांतील दुसरें आह्निक समाप्त झालें व पाद आणि अध्याय हेही समाप्त झाले.

---

१०. 'अनुदात्तस्य च०' या सूत्रांतील अनुदात्तपदानें पारिभाषिक अनुदात्त घ्यावयाचा नाहीं, तर अविद्यमानः उदात्तः यत्र सोऽनुदात्तः, असा यौगिक अनुदात्त घ्यावयाचा.